श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचित

# व्याकरणमहाभाष्य

## मूळ आणि

## मराठी भाषांतर

भाग तिसरा ( अध्याय ३ )

भाषांतरकार

महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर

संपादक

प्राध्यापक काशीनाथ वासुदेव अभ्यंकर

डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणे.

कार्तिक शुद्ध प्रतिपदा शके १८७३ ] [ ३१ आक्टोबर सन १९५१

# प्रास्ताविक निवेदन.



सुमारें १० वर्षांपूर्वी व्याकरण महाभाष्याचे भाग १ व २ प्रसिद्ध झाल्या-नंतर महायुद्धजन्य परिस्थितीमुळें व इतर अडचणींमुळें पुढील भाग प्रकाशित करण्याचें काम स्थगित झालें होतें. दोन वर्षांपूर्वी पुन्हां कामास सुरुवात झाली व जानेवारी सन १९५१ मध्यें शेवटचा म्हणजे ६ वा भाग ( पूर्वसंकल्पित ५ वा भाग ) प्रसिद्ध झाला, व आज ३ रा भाग प्रसिद्ध करीत आहों. प्रकाशनाचे सोयीसाठीं संकल्पित ५ भागांऐवजीं एकंदर ६ भाग करण्याचें ठरवून प्रस्तुत ३ ऱ्या भागामध्यें संपूर्ण तिसरा अध्याय, चवथ्या भागांत ४ व ५ अध्याय, पांचव्या भागांत ६ वा अध्याय व सहाव्या भागांत ७ व ८ अध्याय देण्याचें योजिलें आहे.

दुर्दैवानें सहाव्या व प्रस्तुत तिसऱ्या भागांचें काम शास्त्रीबुवांचे द्रष्टृत्वा-खालीं होऊं शकलें नाहीं, तरी त्यांचे चिरंजीव सेवानिवृत्त प्रोफेसर काशिनाथराव अभ्यंकर यांनीं तें काम आपले अंगावर घेऊन संस्थेस उपकृत केलें हें नमूद कर-ण्यांत मला आनंद वाटतो. राहिलेल्या भागांचें काम त्यांचेच द्रष्टृत्वाखालीं चालूं असून लवकरच चवथा व पांचवा भाग प्रसिद्ध होतील अशी आशा आहे.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें.<br>
ता. ३१ ऑक्टोबर १९५१

चिंतामण रामचंद्र देवधर.<br>
सेक्रेटरी, डे. ए. सोसायटी.



अधिकारेणेयं प्रत्ययसंज्ञा क्रियते । सा प्रकृत्युपपदोपाधीनामपि प्राप्नोति । तस्याः प्रतिषेधो वक्तव्यः । प्रकृति । गुप्तिज्किद्भ्यः सन् [३.१.५] । उपपद । स्तम्बकर्णयो रमिजपोः [३.२.१३] । उपाधि । हरतेर्दृतिनाथयोः पशौ [३.२ २५] । एतेषां प्रतिषेधो वक्तव्यः । किं च स्याद्यद्येतेषामपि प्रत्ययसंज्ञा स्यात् । परत्वमाद्युदात्तत्वमङ्गसंज्ञेत्येते विधयः प्रसज्येरन् ॥ अत उत्तरं पठति ।

**प्रत्ययाधिकारे प्रकृत्युपपदोपाधीनामप्रतिषेधः ॥ १ ॥**

अधिकारेणापि प्रत्ययसंज्ञायां सत्यां प्रकृत्युपपदोपाधीनामप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः ॥ प्रत्ययसंज्ञा कस्मान्न भवति ।

**निमित्तस्य निमित्तिकार्यार्थत्वादन्यत्रापि ॥ २ ॥**

निमित्तानि हि निमित्तिकार्यार्थानि भवन्ति । किं पुनर्निमित्तं को वा निमित्ती । प्रकृत्युपपदोपाधयो निमित्तं प्रत्ययो निमित्ती । अन्यत्रापि चैष न्यायो दृष्टः । कान्यत्र । लोके । तद्यथा । बहु-

(सू.१) हें अधिकारसूत्र आहे. या सूत्रानें प्रत्ययसंज्ञेचें विधान केलें आहे. तेव्हां पुढील प्रत्येक सूत्राचा वाक्यार्थ झाला की त्याच्याबरोबर सांगितली जाणारी ही प्रत्ययसंज्ञा प्रकृति, उपपद, आणि उपाधि म्ह. इतर निमित्त यांनाही प्रसक्त होतें, तिच्या निषेधादाखल वचन केलें पाहिजे; जसें:– गुप्तिज्कित् (३।१।५) या प्रकृति, 'स्तम्बकर्णयोः०' (३।२।१३) या सूत्रांतील स्तम्ब आणि कर्ण हीं उपपदें, 'हरतेर्दृतिनाथयोः०' (३।२।२५) यांतील पशु हा उपाधि, यांना प्रत्ययसंज्ञा होत नाहीं, असा प्रतिषेध केला पाहिजे.

जर प्रकृति, उपपद व उपाधि यांना प्रत्ययसंज्ञा झाली तर काय बिघडेल ?

परश्च (३।१।२) या नियमानुसार त्याचा परप्रयोग करावा लागेल. तसेंच त्यांना आद्युदात्तस्वर (३।१।३) होईल, आणि त्याच्यामुळें अङ्गसंज्ञा (१।४।१३) होऊं लागेल. हें मनांत धरून वार्तिककार म्हणतात—

(वा.१) उत्तर सूत्राशीं एकवाक्यतेनें प्रत्ययसंज्ञेचें विधान आहे तरी देखील प्रकृति, उपपद आणि उपाधि यांना प्रत्ययसंज्ञेचा अप्रतिषेधच होय. अनर्थक जो प्रतिषेध त्याला अप्रतिषेध असें म्हटलें आहे.

तर मग प्रकृत्यादिकाना प्रत्ययसंज्ञा कां बरें होत नाहीं ?

(वा. २) निमित्तें हीं निमित्तीकरितांच असतात.

प्रकृत स्थलीं कोण बरें निमित्त आणि कोण बरें निमित्ती ?

प्रकृति, उपपद आणि उपाधि हीं निमित्तें होत आणि प्रत्यय हा निमित्ती होय[२]. केवळ शास्त्रामध्येंच हा न्याय आहे असें नाहीं, तर इतर ठिकाणींही हा न्याय दृष्टीस पडतो.

इतर ठिकाणीं म्हणजे कोठें ?

लोकांमध्यें; जसें:– कोणी एक मनुष्य

१. प्रत्यय हा शब्द संज्ञा म्हणून अधिकार केला आहे. हा अधिकार पांचवा अध्याय संपेपर्यंत चालू राहील, येथून पुढील सूत्रांनीं जें सांगितलें आहे त्याला प्रत्यय म्हणावें.

२. तेव्हां गुप्तिज्कित् ह्या प्रकृतीचें उच्चारण सनाकरितांच उपयोगी पडतें, म्हणून त्या प्रकृतीचा स्वतंत्र रीतीनें प्रत्ययसंज्ञेशीं संबंध होत नाहीं. याप्रमाणेंच उपपदांचा व उपाधींचाहि संबंध होत नाहीं.

ष्वासीनेषु कश्चित्कंचित्पृच्छति कतमो देवदत्तः कतरो यज्ञदत्त इति । स तस्मा आचष्टे । योऽश्वे यः पीठ इत्युक्ते निमित्तस्य निमित्तिकार्यार्थत्वादध्यवस्यत्ययं देवदत्तोऽयं यज्ञदत्त इति नेदानीमश्वस्य पीठस्य वा देवदत्त इति संज्ञा भवति ॥ किं पुनर्निमित्तं को वा निमित्ती । निर्ज्ञातोऽर्थो निमित्तमनिर्ज्ञातोऽर्थो निमित्ती । इह च प्रत्ययोऽनिर्ज्ञातः प्रकृत्युपपदोपाधयो निर्ज्ञाताः । क । धातूपदेशे प्रातिपदिकोपदेशे च । ते निर्ज्ञाता निमित्तत्वेनोपादीयन्ते ॥

**प्रधाने कार्यसंप्रत्ययाद्वा सिद्धम् ॥३॥**

अथवा प्रधाने कार्यसंप्रत्ययो भवति । किं च प्रधानम् । प्रत्ययः । तद्यथा । बहुषु यात्सु कश्चित्कंचित्पृच्छति को यातीति । स आह राजेति । राजेत्युक्ते प्रधाने कार्यसंप्रत्ययाद्यः पृच्छति यश्चाचष्ट उभयोः संप्रत्ययो भवति ॥ किंकृतं पुनः प्राधान्यम् । अर्थकृतम् । यथा पुनर्लोकेऽर्थकृतं प्राधान्यं शब्दस्येदानीं किंकृतं प्राधान्यम् । शब्दस्यापूर्वोपदेशः प्राधा-

---

दुसऱ्या कोणाला तरी विचारीत आहे की देवदत्त कोणता आणि यज्ञदत्त कोणता ? तो सांगतोः– जो घोड्यावर बसला आहे आणि जो व्यासपीठावर बसला आहे. येथें जो घोड्यावर आणि जो पीठावर असें सांगितलें असतां घोडा व पीठ हीं निमित्तें निमित्तीकरितांच उच्चारिलीं असल्यामुळें 'घोड्यावरील हा देवदत्त आणि पीठावरील हा यज्ञदत्त' असेंच तो निश्चित समजतो. पण तो कांहीं घोड्याला आणि पीठाला देवदत्त आणि यज्ञदत्त असें मुळींच समजत नाहीं.

आतां अमुक निमित्त आणि अमुक निमित्ती असें कसें ओळखावें ?

पूर्वी जाणलेला जो अर्थ तो निमित्त होय आणि न जाणलेला जो अर्थ तो निमित्ती होय. प्रकृत स्थलीं सन्प्रत्यय हा अन्यत्र कोठें जाणलेला नाहीं, व प्रकृति, प्रत्यय, उपाधि, हे अन्यत्र जाणले जातात.

प्रकृत्यादिक हे कोठें बरें जाणले जातात ?

धातूंचा उपदेश करते वेळीं आणि प्रातिपदिकांचा उपदेश करते वेळीं प्रकृत्यादिक जाणले जातात. तेव्हां ते प्रकृत्यादिक अर्थ येथें निमित्त म्हणून गृहीत धरले आहेत.

(वा.३) अथवा प्रधानाचे ठिकाणीं कार्याचा संबंध होतो म्हणून अप्रधान अशा प्रकृति वगैरेंना प्रत्ययसंज्ञा होत नाहीं, हें सिद्ध होतें.

पण येथें प्रधान कोण ?

प्रत्यय हा प्रधान होय. जसें बहुत लोक चालले असतां कोणी एक दुसऱ्या कोणाला विचारीत आहे की कोण चालला आहे ? तो सांगतो की राजा चालला आहे. येथें राजा चालला आहे असें म्हटलें असतां मुख्याचे ठिकाणींच कार्याचा संबंध होत असल्यामुळें जो विचारीत आहे आणि जो उत्तर देत आहे त्या उभयतांकडूनही त्यांतील जो मुख्य तोच राजा समजला जातो.

आतां राजाला मुख्यत्व कशामुळें समजावयाचें ?

राजाकरितां इतर लोक बरोबर असतात म्हणून समजावयाचें.

पण लोकांमध्यें जसें राजाकरितां इतर लोक असतात म्हणून राजाला मुख्यत्व समजलें जातें, तसें शास्त्रामध्यें सन् वगैरे शब्दांना मुख्यत्व कसें समजावयाचें ?

---

३. प्रकृति, उपपद आणि उपाधि यांपैकीं ज्या ठिकाणीं जे धातु असतील ते धातुपाठांतील उपदेशावरून समजतात आणि जीं प्रातिपदिकें असतील त्यांचें ज्ञान प्रातिपदिकांच्या उपदेशावरून होतें.

४. उत्तर देणाराही मुख्याला उद्देशूनच उत्तर देतो आणि ऐकणाराहि तसेंच समजतो.

न्यम्। यस्यापूर्वोपदेशः स प्रधानम्। प्रकृत्युपपदोपाधयश्चोपदिष्टाः। क। धातूपदेशे प्रातिपदिकोपदेशे च ॥

यद्येव निमित्तस्य निमित्तिकार्यार्थत्वादथापि प्रधाने कार्यसंप्रत्ययात्प्रकृत्युपपदोपाधीनां न भवति विकारागमानां तु प्राप्नोति। हनस्त च [३.१.१०८] त्रपुजतुनोः षुक् [४.३.१३८] इति। एतेषां ह्यपूर्वोपदेशात्प्राधान्यं निमित्तिनश्चैवैते।

**विकारागमेषु च परविज्ञानात् ॥ ४॥**

विकारागमेषु च परविज्ञानात्प्रत्ययसंज्ञा न भविष्यति। प्रत्ययः परो भवतीत्युच्यते न च विकारागमाः परे संभवन्ति ॥ किं पुनः कारणं समानेऽपूर्वोपदेशे प्रत्ययः परो विकारागमा न परे।

**षष्ठीनिर्दिष्टस्य च तद्युक्तत्वात् ॥ ५॥**

षष्ठीनिर्दिष्टं विकारागमयुक्तं पञ्चमीनिर्दिष्टाच्च प्रत्ययो विधीयते ॥

**प्रत्ययविधानानुपपत्तिस्तु ॥ ६ ॥**

प्रत्ययविधिस्तु नोपपद्यते। क। यत्र विकारागमा विधीयन्ते। हनस्त च। त्रपुजतुनोः षुगिति। किं पुनः कारणं न सिध्यति। विकारागमयुक्तत्वादपञ्चमी-

---

येथें सन् वगैरे ज्या शब्दांचा अपूर्व उपदेश असतो तो तेथें मुख्य समजला जातो. कारण त्याच्याकरितांच ते तेथे फक्त निमित्त म्हणून प्रकृति वगैरे शब्द गृहीत धरले जातात. ते अन्य ठिकाणीं अपूर्व म्हणून सांगितले असतातच.

ते कोठें ?

प्रकृति, उपपद व उपाधि यांपैकीं जे धातु असतील त्यांचा धातुपाठामध्यें अपूर्व उपदेश आहे आणि जीं प्रातिपदिकें असतील त्यांचा प्रातिपदिकाचा उपदेश करते वेळीं त्यांचा अपूर्व उपदेश केलेला आहे.

पण निमित्त हे निमित्तीकरितांच उच्चारलें असतें म्हणून कार्य हें मुख्यालाच केलें जातें; म्हणून प्रकृति, उपपद आणि उपाधि यांना प्रत्ययसंज्ञा होत नाहीं; तरी पण विकार आणि आगम यांना प्रत्ययसंज्ञा प्राप्त होत आहे; जसें:– हनस्त च (३।१।१०८), त्रपुजतुनोः षुक् (४।३।१३८), या विकारागमांचा अपूर्व उपदेश असल्यामुळें त्यांना प्राधान्य आहे, आणि ते निमित्तीही आहेत.

(वा.४) विकार आणि आगम यांना प्रत्ययसंज्ञा होत नाहीं. कारण प्रत्यय हा ज्याला उद्देशून सांगितला त्याच्यापुढें होतो, असें पुढील सूत्रानें सांगितलें आहे. आणि विकार किंवा आगम हे तर पुढें करतां येत नाहींत.

पण प्रत्ययाप्रमाणें विकार आणि आगम यांचा अपूर्व उपदेश असतांना प्रत्यय मात्र पुढें लागतो आणि विकार व आगम हे पुढें लागत नाहींत, याचें काय बरें कारण ?

(वा.५) विकार आणि आगम ज्याला सांगितले असतात तो शब्द षष्ठीविभक्ति लावून उच्चारला असतो, आणि पंचमीविभक्ति लावून उच्चारलेल्याहून प्रत्ययाचें विधान केलें जातें.

(वा.६) पण प्रत्ययाचें विधानच तेथें करतां येत नाहीं.

कोठें ?

जेथें विकार आणि आगम यांचें विधान केलें असेल तेथें; जसें:– 'हनस्त च' 'त्रपुजतुनोः षुक्.'

पण प्रत्ययाचें विधान करतां येत नाहीं याचें काय बरें कारण ?

हन् याला विकार सांगितला आहे, आणि

---

५. तेव्हां पुढील परश्च हें सूत्र विकार आणि आगम यांचेविषयीं प्रवृत्त होत नाहीं, म्हणून हेंही सूत्र तेथें प्रवृत्त होत नाहीं. कारण हे दोन्ही अधिकार संनियोगशिष्ट आहेत.

निर्दिष्टत्वाच्च ॥

**तस्मात्तत्र पञ्चमीनिर्देशात्सिद्धम् ॥७॥**

तस्मात्तत्र पञ्चमीनिर्देशः कर्तव्यः ॥ न कर्तव्यः। इह तावद्धनस्त चेति धातोः [३.१.९१] इति वर्तते। इह त्रपुजतुनोः षुगिति प्रातिपदिकादिति वर्तते। यद्येवं हनस्त च धातोः क्यब्भवतीति धातुमात्रात्क्यप्प्राप्नोति। नैष दोषः। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न धातुमात्रात्क्यब्भवतीति यदयमेतिस्तुशास्वृदृजुषः क्यप् [३.१.१०९] इति परिगणनं करोति। अथवा हन्तिमेवात्र धातुग्रहणेनाभिसंभन्त्स्यामः। हनस्तो भवति धातोः क्यब्भवतीति। कस्मात्। हन्तेरिति ॥

**अर्थाश्रयत्वाद्वा ॥८॥**

अथवार्थाश्रयः प्रत्ययविधिः। यस्तमर्थं संप्रत्याययति स प्रत्ययः॥ किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। प्रत्यय इति महती संज्ञा क्रियते। संज्ञा च नाम यतो न लघीयः। कुत एतत्। लघ्वर्थं हि संज्ञाकरणम्। तत्र महत्याः संज्ञायाः करण एतत्प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत। प्रत्याययतीति प्रत्ययः। यदि प्रत्याययतीति प्रत्ययोऽविकादीनां प्रत्ययसंज्ञा

---

त्रपु, जतु, यांना षुक्आगम सांगितला आहे. शिवाय त्यांचा पंचमीविभक्ति लावून निर्देश केला नाहीं.

(वा.७) म्हणून हनस्त० त्रपुजतुनोः० येथें पंचमीनिर्देश केला म्हणजे सिद्ध होईल.

पंचमीनें निर्देश करावयास नको. कारण हनस्त च येथें धातोः या पंचमीची अनुवृत्ति येत आहे, आणि 'त्रपुजतुनोः' येथें प्रातिपदिकात् या पंचमीची अनुवृत्ति येत आहे.

पण धातूहून क्यप्प्रत्यय सांगितला तर वाटेल त्या धातूहून होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां हे आचार्य ज्या धातूंहून क्यप्प्रत्यय होतो त्या धातूंची'एतिस्तुशास्वृदृजुषः क्यप्'(३।१।१०९) इत्यादि सूत्रांनीं मोजदाद करीत आहेत, त्यापेक्षां वाटेल त्या धातूहून क्यप् होत नाहीं असें सुचवीत आहेत. अथवा येथें धातुशब्दाशीं हन्धातूचाच संबंध करण्यांत येईल; जसें:– हन्धातूचे स्थानीं तकारआदेश होतो व धातूहून क्यप्प्रत्यय होतो, असा वाक्यार्थ झाल्यानंतर 'कोणत्या धातूहून' अशी आकांक्षा उत्पन्न झाली असतां हनः हें पद जवळ असल्यामुळें हन्धातूहून क्यप्प्रत्यय होतो असें सहजच सिद्ध होईल.

(वा.८) अथवा प्रत्ययसंज्ञा ही अर्थावर अवलंबून होणारी आहे, म्हणजे जो आपल्या अर्थाला दाखवितो तो प्रत्यय म्हटला जातो.[६]

पण काय, असें वचन केलें पाहिजे?

वचन करावयास नको.

तर मग वचन केल्यावांचून हें कसें समजावें?

प्रत्यय ही तीन अक्षरांची मोठी संज्ञा केली आहे, आणि संज्ञा म्हणून जी केली जाते ती इतकी लहान असूं शकते की तिच्यापेक्षां दुसरा लहान शब्द असूं नये.

हें कशावरून?

अशावरून की लाघवाकरितांच संज्ञा केली जाते. तेव्हां जेथें एका अक्षराची संज्ञा करावयाची असतां 'प्रत्यय' अशी जी मोठी संज्ञा केली आहे तिचा असा उपयोगः अर्थं प्रत्याययति इति प्रत्ययः, म्ह. अर्थ दाखवितो तो प्रत्यय, असा प्रत्ययशब्दाचा अर्थ आहे.

पण जर जो अर्थ दाखवितो तो प्रत्यय असें म्हटलें तर अविक वगैरे शब्दांतील क वगैरेंना प्रत्ययसंज्ञा होणार नाहीं. कारण ते कांहींही

---

६. तेव्हां 'हनस्त च' या सूत्रानें सांगितलेला तकारादेश आणि 'त्रपुजतुनोः षुक्' या सूत्रानें सांगितलेला षुगागम यांना कांहींच अर्थ नसल्यामुळें त्यांना प्रत्ययसंज्ञा होत नाहीं.

न प्राप्नोति । न हि ते किंचित्प्रत्याय- यन्ति । एवं तर्हि प्रत्याय्यते प्रत्यय इति । एवमपि सनादीनां न प्राप्नोति । एवं तर्ह्युभयसाधनोऽयं कर्तृसाधनः कर्मसाध- नश्च ॥ एवमपि कुत एतत्समानेऽपूर्वोप- देशे त्रापुषम् जातुषमित्यत्राकारस्तमर्थं संप्रत्याययति न पुनः षकार इति । अन्य- त्राप्यकारेण तस्यार्थस्य वचनान्मन्यामहे- ऽकारस्तमर्थं संप्रत्याययति न षकार इति । क्वान्यत्र । बिल्वादिभ्योऽण् [४.३.१३६] बैल्वः ॥

## परश्च ॥ ३ । १ । २ ॥

किमर्थमिदमुच्यते । परो यथा स्या- त्पूर्वो मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । यमिच्छति पूर्वमाह तम् । विभाषासुपो बहुच्पुरस्तात्तु [५.३.६८] इति । मध्ये तर्हि मा भूदिति । मध्येऽपि यमिच्छत्याह तम् । अव्ययसर्वनाम्नामकच्प्राक् टेः [५.३.७१] इति । य इदानीमतोऽन्यः प्रत्ययः शेषः सोऽन्तरेण वचनं पर एव

---

अर्थ दाखवीत नाहींत.[७]

असें आहे तर 'प्रत्याय्यते इति प्रत्ययः' असें म्हणतों, म्ह. ज्याचा अर्थ प्रकृतीनें दाख- विला जातो तो प्रत्यय होय.

असें म्हटलें तर सन् वगैरेंना प्रत्ययसंज्ञा होऊं शकत नाहीं.

तर मग अर्थ दाखविणारा, असाही प्रत्यय- शब्दाचा अर्थ आहे आणि ज्याचा अर्थ प्रकृ- तीनें दाखविला जातो, असाही प्रत्ययशब्दाचा अर्थ आहे.

पण हें कशावरून की अपूर्व उपदेश सारखाच असतांना त्रापुषम्, जातुषम्, येथें षकारापुढील अकार मात्र विकार वगैरे त्या त्या अर्थांना दाखवितो आणि षकार मात्र त्या अर्थांना दाखवीत नाहीं ?

अन्य ठिकाणींही अकारानें तो अर्थ दाख- विला जात आहे यावरून आम्ही असें अनु- मान बांधतों की अकारच त्या अर्थाला दाखवितो, आणि षकार मात्र त्या अर्थाला दाखवीत नाहीं.

अन्य ठिकाणीं म्हणजे कोठें ?

बिल्वादिभ्योऽण् (४।३।१३६) या सूत्रानें अ ण्प्रत्यय करून बनलेल्या बैल्वः या शब्दामध्यें.

(सू.२) कशासाठीं हें सूत्र केलें आहे ?

प्रत्यय हा प्रकृतीच्या पुढें लावावा, मागें लावूं नये, हें सांगण्यासाठीं केलें आहे.

हा उपयोग येत नाहीं. कारण जो प्रत्यय प्रकृतीच्या मागें लावला पाहिजे तेथें सूत्र- कारांनीं पुरस्तात् असें म्हटलें आहे; जसें:– विभाषा सुपो बहुच् पुरस्तात्तु (५।३।६८).

तर मग प्रकृतीच्यामध्यें प्रत्ययाचा शिर- काव न व्हावा यासाठीं हें सूत्र केलें आहे.

पण जो प्रत्यय प्रकृतीमध्यें शिरावा असें असेल तेथें सूत्रकारांनीं 'टेः प्राक्' असें म्हटलें आहे; जसें:– 'अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक् टेः' (५।३।७१). तेव्हां या दोन प्रकारच्या प्रत्ययां- खेरीज उरलेला प्रत्यय 'पुढें होतो' असें प्रत्यक्ष म्हटलें नाहीं तरी पुढेंच होईल. तेव्हां 'पुढें होतो' असें सांगणाऱ्या प्रकृत सूत्राचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

---

७. अवि याच अर्थाचा अविकशब्द आहे. येथें अवि याच्या अर्थापेक्षां अधिक अर्थ कांहींच नाहीं.

८. 'अनिर्दिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे' म्हणजे ज्या प्रत्ययांचा अर्थ अमुक असें सूत्रकारांनीं सांगितलें नाहीं असे प्रत्यय स्वार्थीं म्ह० प्रकृतीच्या अर्थीं समजावेत, असा न्याय आहे.

९. कर्तुमिच्छति चिकीर्षति येथें इच्छा हा सन्- प्रत्ययाचा (३।१।७) अर्थ आहे. तरी पण तो त्याचा अर्थ प्रकृतीनें म्हणजे कृधातूनें दाखविला जात नाहीं, म्हणून त्याला प्रत्ययसंज्ञा होणार नाहीं.

१. हेंही अधिकारसूत्रच आहे. तेव्हां पुढील सूत्रांनीं ज्या प्रकृतीला उद्देशून जो प्रत्यय सांगितला

भविष्यतीति नार्थः परवचनेन ॥ एवमपि येषामेव प्रत्ययानां देशो नियम्यते त एव नियतदेशाः स्युर्य इदानीमनियतदेशः स कदाचित्पूर्वः कदाचित्परः कदाचिन्मध्ये स्यात् । तद्यथा । मातुर्वत्सः कदाचिदग्रतः कदाचित्पृष्ठतः कदाचित्पार्श्वतो भवति । पर एव यथा स्यादित्येवमर्थं परवचनम् ॥

## परवचनमनर्थकं पञ्चमीनिर्दिष्टाद्धि परस्य ॥ १ ॥

परग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । पञ्चमीनिर्दिष्टाद्धि परस्य कार्यमुच्यते । तद्यथा । द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत् [६.३.९७] इति । विषम उपन्यासः । सतस्तत्र परस्य कार्यमुच्यत इहेदानीं कस्य सतः परस्य कार्यं भवितुमर्हति । इहापि सत एव । कथम् । परत्वं स्वाभाविकम् । अथ वाचनिके परत्वे सत्यर्थः स्यात्परग्रहणेन । वाचनिके च नार्थः । एतद्धि तत्परस्य कार्यं यदसौ परः स्यात् । अथवा यदस्य परस्य सतः संज्ञा स्यात् ॥

यत्र तर्हि पञ्चमी नास्ति तदर्थमयं

---

तरी देखील ज्या प्रत्ययांचा प्रदेश पूर्वी किंवा मध्यें अशा रीतीनें नक्की ठरविला गेला ते प्रत्यय ठराविक जागींच येऊन बसतील, पण ज्या प्रत्ययाचा प्रदेश नक्की ठरविला नाहीं तो प्रत्यय कदाचित् पुढें होईल, कदाचित् पूर्वींही होईल, आणि कदाचित् मध्येंही होईल. ज्याप्रमाणें लहान मूल कदाचित् आईच्या पुढेंही चालतें, कदाचित् मागेंही चालतें आणि कदाचित् बाजूनेंही चालतें. तेव्हां प्रत्यय हा पुढेंच यावा यासाठीं 'परश्च' हें सूत्र केलें पाहिजे.

(वा.१) 'पुढें होतो' असें विधान केलें तें विफल होत आहे.

काय कारण ?

पंचमीविभक्ति लावून सांगितलेलें कार्य त्याच्या पुढच्याला करावयास सांगितलें आहे (१।१।६७); जसें– 'द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत्' (६।३।९७).

येथें 'द्व्यन्तरुपसर्गेभ्यः०' याचा उपन्यास केला तो विसंगत आहे. कारण 'द्व्यन्तरुपसर्गे०' या स्थलीं पुढें असलेल्याला कार्य सांगितलें आहे. आणि प्रकृत स्थलीं कोणी पुढें नसल्यामुळें कोणत्या पुढें असलेल्याला कार्य करतां येईल बरें ?

येथेंही पुढें असलेल्यालाच कार्य कर्तव्य आहे.

तें कसें ?

स्वभावतःच सन् वगैरे पुढें आहेतच.[2]

आतां सन् वगैरे प्रत्यय करणें हें काम 'गुप्तिज्किद्भ्यः०' वगैरे वचनांचें असेल तर 'परश्च' हें सूत्र करण्याचा उपयोग संभवतो.

प्रत्यय प्रकृतीच्या पुढें करणें हें काम वचनाचें आहे असें गृहीत धरलें तरी देखील परश्च हें सूत्र करण्याचा उपयोग नाहीं. कारण मूळचें पुढें कोणी नाहीं तरी सन् पुढें केला म्हणजे त्या पुढच्या सनाचें अस्तित्व संभवतें.[3] अथवा प्रत्ययसंज्ञा हें पुढच्याचें कार्य आहे, तें कार्य पुढें प्रत्यय केला तरच पुढच्याला होतें, असें म्हणतां येईल.

तर मग जेथें पंचमीनिर्देश नाहीं त्याकरितां 'परश्च' हें सूत्र केलें पाहिजे.

कोठें बरें पंचमीनिर्देश नाहीं ?

---

असेल तो प्रत्यय त्या प्रकृतीच्या पुढें होतो.

२. शब्द मूळचे सिद्धच आहेत. 'गुप्तिज्किद्भ्य०' वगैरे वचनांनीं फक्त त्याला साधुत्व सांगितलें आहे.

३. तेव्हां सन्प्रत्यय मागें केला किंवा मध्यें केला तर हें पुढच्याचें अस्तित्व संभवत नाहीं. तस्मादित्युत्तरस्य (१।१।६७) या परिभाषेच्या जोरावर पुढेंच होईल.

योगो वक्तव्यः । क्व च पञ्चमी नास्ति । यत्र विकारागमाः शिष्यन्ते । क्व च विकारागमाः शिष्यन्ते । हनस्त च [३.१.१०८] त्रपुजतुनोः षुक् [४.३.१३८] इति ।

## विकारागमेषु चोक्तम् ॥२॥

किमुक्तम् । प्रत्ययविधानानुपपत्तिस्तु तस्मात्तत्र पञ्चमीनिर्देशात्सिद्धमिति ॥

## अत्यन्तापरदृष्टानां वा परभूतलोपार्थम् ॥ ३ ॥

अत्यन्तापरदृष्टानां तर्हि परभूतलोपार्थं परग्रहणं कर्तव्यम् । य एतेऽत्यन्तापरदृष्टाः क्विबादयो लुप्यन्ते तेषां परभूतानां लोपो यथा स्यादपरभूतानां मा भूत् । किं पुनरत्यन्तापरदृष्टानां परभूतलोपवचने प्रयोजनम् । किति णितीति कार्याणि यथा स्युरिति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्यत्यन्तापरदृष्टाः परभूता लुप्यन्त इति यदयं तेषु कादीननुबन्धानासजति । कथं कृत्वा ज्ञापकम् । अनुबन्धासञ्जन एतत्प्रयोजनं किति णितीति कार्याणि यथा स्युरिति । यदि चात्रात्यन्तापरदृष्टाः परभूता लुप्यन्ते ततोऽनुबन्धासञ्जनमर्थवद्भवति ॥

## प्रयोगनियमार्थं वा ॥ ४ ॥

---

जेथें विकार किंवा आगम सांगितले आहेत तेथें.

कोठें बरें विकार, आगम सांगितले आहेत ?

'हनस्त च' (३।१।१०८), 'त्रपुजतुनोः षुक्' (४।३।१३८) येथें.

(वा.२) विकार, आगम, याविषयीं सांगितलेंच आहे !

काय सांगितलें आहे ?

प्रत्ययविधानानुपपत्तिस्तु, तस्मात्तत्र पञ्चमीनिर्देशात्सिद्धम् (३।१।१, वा.६,७).

(वा.३) तर मग क्विप् वगैरे प्रत्यय प्रयोगामध्यें केव्हांही दृष्टीस पडत नाहींत; अशा प्रत्ययांचा प्रकृतीच्या पुढें असलेल्यांचाच लोप झाला आहे अशी कल्पना होण्याकरितां परश्च हें सूत्र केलें पाहिजे.

प्रयोगामध्यें कधींहि दृष्टीस न पडणाऱ्या अशा क्विप् वगैरे प्रत्ययांचा प्रकृतीच्या पुढें असलेल्यांचाच लोप झाला आहे अशा कल्पनेचा काय फायदा ?

कित् किंवा णित् हे प्रत्यय पुढें असतांना सांगितलेलीं कार्यें होणें हा फायदा आहे.

हाही फायदा नाहीं. कारण ज्यापेक्षां हे आचार्य क्विप् वगैरे प्रत्ययांना ककार, णकार, इत्याहि अनुबंध जोडीत आहेत, त्यापेक्षां प्रयोगामध्यें प्रत्यक्ष कधींही दृष्टीस न पडणाऱ्या अशा क्विप् वगैरेंचा प्रकृतीच्या पुढें केलेल्यांचाच लोप होतो असें सुचवीत आहेत.

कसें बरें हें सूचित होत आहे ?

असें सूचित होतें की ककार, णकार, इत्यादि अनुबंध जोडण्याचा असा उपयोग आहे की कित् किंवा णित् पुढें असतांना सांगितलेलीं कार्यें व्हावींत. आतां जर प्रत्यक्ष कधींही दृष्टीस न पडणाऱ्या अशा क्विप् वगैरेंचा प्रकृतीच्या पुढें केलेल्यांचा लोप झाला तरच त्यांना ककारादि अनुबन्ध जोडण्याचा उपयोग होतो, एरवीं अनुबंध जोडणें फुकट होईल.

(वा.४) किंवा पुढें प्रत्यय केलेल्याच

---

४. परिवीः येथें परि या उपसर्गाच्या पुढें व्याधातूहून क्विप्प्रत्यय केला असतां त्याचा लोप झाला तरी प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) तो कित्प्रत्यय पुढें आहे अशी कल्पना करून संप्रसारण (६।१।१५) होतें. तसेंच अंशभाक् येथें भज्धातूहून ण्विप्रत्यय (३।२।६२) केला असतां तो णित्प्रत्यय पुढें आहे अशी कल्पना करून भज्धातूच्या अकाराला वृद्धि (७।२।११६) होते.

प्रयोगनियमार्थं तर्हि परग्रहणं कर्तव्यम् । परभूतानां प्रयोगो यथा स्यादपरभूतानां मा भूदिति ॥ अस्ति पुनः किंचिदनिष्टं दृश्यते यदर्थो नियमः स्यात् । अस्तीत्याह ।

**प्रकृतेरर्थाभिधाने प्रत्ययादर्शनात् ॥५**

प्रकृतिरर्थाभिधानेऽप्रत्ययिका दृश्यते । क्व स देवदत्तः क्व स यज्ञदत्तो बभ्रुर्मण्डुर्लमक इति । बाभ्रव्यो माण्डव्यो लामकायन इति प्रयोक्तव्ये बभ्रुर्मण्डुर्लमक इति प्रयुज्यते ॥

**द्वयसजादीनां च केवलदृष्टत्वात् ॥६॥**

द्वयसजादीनां च केवलानां प्रयोगो दृश्यते । किमस्य द्वयसम् किमस्य मात्रम् काद्य तिथीति ॥ द्वयसादयो वै वृत्तिजसदृशा अवृत्तिजा यथा बहुस्तथा ॥

**वावचने चानुत्पत्त्यर्थम् ॥७॥**

वावचने चानुत्पत्त्यर्थं परग्रहणं कर्तव्यम् । वावचनेनानुत्पत्तिरपि यथा स्यात् अथ क्रियमाणेऽपि वै परग्रहणे कथमिव वावचनेनानुत्पत्तिर्लभ्या । क्रियमाणे परग्रहणे वावचनेन वा पर इत्येतदभिसं-

---

प्रकृतींचा प्रयोग व्हावा आणि अपरभूतांचा म्हणजे पुढें प्रत्यय नसलेल्या प्रकृतींचा प्रयोग होऊं नये असा प्रयोगनियम करण्यासाठीं 'परश्च' हें सूत्र केलें पाहिजे. तसेंच अपरभूतांचा म्हणजे प्रकृतीहून केलेले नव्हेत अशा प्रत्ययांचा स्वतंत्र रीतीनें प्रयोग होऊं नये, या नियमाकरितांही हें सूत्र केलें पाहिजे.

पण असें कांहीं अनिष्ट नजरेस येत आहे काय की ज्यामुळें असा नियम घालावा लागत आहे ?

होय, अनिष्ट नजरेस येत आहे, असें आचार्य दाखवितात.

(वा.५) जिच्यापुढें प्रत्यय दिसत नाहीं अशी केवळ प्रकृतिच प्रत्ययाच्या अर्थाला दाखविण्यासाठीं उपयोगांत आणलेली दृष्टीस पडते; जसें:– कोठें आहे तो बभ्रु, मण्डु किंवा लमक असा देवदत्त किंवा यज्ञदत्त ?' असें लोक बोलतात. येथें देवदत्त, यज्ञदत्त हे मण्डु, बभ्रु, लमक, यांच्या अपत्यांपैकीं असल्यामुळें येथें बाभ्रव्य, माण्डव्य, लामकायन, असा प्रयोग करावयाचा असतां नुसत्या प्रकृतीचाच त्या अर्थी प्रयोग केला आहे.

(वा.६) तसेंच ज्यांच्या मागें प्रकृति नाहीं अशा केवळ द्वयसच्, मात्रच्, वगैरेंचाही प्रयोग केलेला दृष्टीस पडतो; जसें:– किमस्य द्वयसम्, किमस्य मात्रम्, काऽद्य तिथी. ज्याप्रमाणें वृत्तीमध्यें बहुप्रत्यय (५।३।६८) जो होतो त्यासारखा बहु असा शब्द वृत्तीशिवाय निराळा दृष्टीस पडतो, त्याप्रमाणें वृत्तीमध्यें जे द्वयसच् (५।२।३७) वगैरे प्रत्यय होतात त्यांसारखे हे वृत्तीशिवाय निराळे दृष्टीस पडतात.

(वा.७) जेथें विकल्प सांगितला आहे तेथें त्या प्रत्ययाची एकदा उत्पत्ति न व्हावी यासाठीं 'परश्च' हें सूत्र केलें पाहिजे.

आतां परश्च हें सूत्र केलें तरी त्या वा शब्दानें प्रत्ययाची अनुत्पत्ति कशी बरें लब्ध होते ?

परश्च हें सूत्र केलें असतां वाशब्दाचा परः याच्याशीं संबंध करावयाचा. तेव्हां पर

---

५. प्रत्ययाचा अर्थ गम्यमान असूनही पुढें प्रत्यय न केलेल्या अशा केवल प्रकृतींचा.

६. याचें काय प्रमाण आहे असा याचा अर्थ आहे. येथें प्रमाण या अर्थी द्वयस आणि मात्र यांचा प्रकृतीवांचूनच प्रयोग झाला आहे. तसेंच, बहुशब्दाच्या पुढें पूरणप्रत्यय (५।२।४८,५२) लागून बहुतिथी असें होतें. त्यावरून तिथी हा पूरणार्थी प्रत्यय आहे असें समजून त्याचा काऽद्य तिथी येथें प्रकृतीवांचून प्रयोग केला आहे. 'आज ही कितवी' असा याचा अर्थ आहे.

बध्यते। अक्रियमाणे पुनः परग्रहणे वावचनेन किमन्यच्छक्यमभिसंबन्द्धुमन्यदतः संज्ञायाः। न च संज्ञाया भावाभावाविष्येते ॥

**वावचने चोक्तम् ॥ ८ ॥**

किमुक्तम्। वावचनानर्थक्यं च तत्र नित्यत्वात्सन इति ॥

प्रयोगनियमार्थमेव तर्हि परग्रहणं कर्तव्यम् ॥ अथैतस्मिन्प्रयोगनियमार्थे सति किमयं प्रत्ययनियमः। प्रकृतिपर एव प्रत्ययः प्रयोक्तव्योऽप्रकृतिपरो नेति। आहोस्वित्प्रकृतिनियमः। प्रत्ययपरैव प्रकृतिः प्रयोक्तव्याप्रत्ययपरा नेति। कश्चात्र विशेषः।

**तत्र प्रत्ययनियमे प्रकृतिनियमाभावः ॥ ९ ॥**

तत्र प्रत्ययनियमे सति प्रकृतेर्नियमो न प्राप्नोति। अप्रत्ययिकायाः प्रकृतेः प्रयोगः प्राप्नोति। क स देवदत्तः क स यज्ञदत्तो बभ्रुर्मण्डुर्लमक इति ॥ अस्तु तर्हि प्रकृतिनियमः।

**प्रकृतिनियमे प्रत्ययानियमः ॥ १० ॥**

प्रकृतिनियमे सति प्रत्ययस्य नियमो न प्राप्नोति। किमस्य द्व्यसम् किमस्य

---

वा भवति, म्ह. पर होणारा असा सन्प्रत्यय विकल्यानें होतो, असा अर्थ झाल्यामुळें पक्षीं अनुत्पत्ति सिद्ध होते[७], आणि परश्च हें सूत्र केलें नाहीं तर त्या विकल्पाचा प्रत्ययसंज्ञेवांचून दुसऱ्या कोणाशीं बरें संबंध होऊं शकेल? आणि प्रत्ययसंज्ञेचा विकल्प होणें तर इष्ट नाहीं.

(वा.८) वाग्रहणाविषयीं सांगितलेंच आहे (३।१।७, वा.९).

काय सांगितलें आहे?

वाशब्दाचें ग्रहण केलें तें अनर्थक होतें. कारण वृत्तीमध्यें सन्प्रत्यय नित्यच इष्ट आहे. प्रयोगनियमासाठींच परश्च हें सूत्र करावयास पाहिजे.

आतां प्रयोगनियमासाठीं हें सूत्र केलें आहे असें ठरलें असतां प्रकृतीच्या पुढें असाच नेहमीं प्रत्यय योजावा आणि प्रकृति नसेल तर केवळ योजूं नये, असा हा प्रत्ययनियम समजावयाचा, अथवा प्रत्ययाच्या अर्थाची विवक्षा असेल तर पुढें प्रत्यय लावूनच प्रकृतीचा प्रयोग करावा आणि प्रत्यय लावल्यावांचून केवळ प्रकृतीचा प्रयोग करूं नये, असा हा प्रकृतिनियम समजावा?

या दोहोंत काय बरें फरक आहे?

(वा.९) या दोन प्रकारच्या नियमांपैकीं प्रत्ययनियम गृहीत धरला असतां प्रकृतिनियम होत नाहीं. तेव्हां पुढील प्रत्ययानें रहित अशा केवळ प्रकृतीचा प्रयोग होऊं लागेल; जसें:– कोठें आहे तो बभ्रु, मण्डु व लमक असा देवदत्त किंवा यज्ञदत्त?

तर मग प्रकृतिनियम असूं दे.

(वा.१०) प्रकृतिनियम गृहीत धरला तर त्यांत प्रत्ययनियम सिद्ध होत नाहीं. तेव्हां प्रकृतीनें रहित अशा केवळ प्रत्ययाचा प्रयोग होऊं लागेल; जसें:– किमस्य द्व्यसम्, किमस्य

---

७. 'धातोः कर्मणः समानकर्तृकात्' (३।१।७) येथें वाशब्दाचें ग्रहण केलें आहे. तेथें त्या वाशब्दार्थाचा सन्पदार्थाशीं संबंध करून प्रधानाचा एकदा बाध करण्यापेक्षां अप्रधान अशा प्रत्ययसंज्ञेशीं संबंध होऊन तिचा एकदा बाध होईल, तेव्हां धातूच्या पुढें सन् होतो आणि त्याला विकल्पानें प्रत्ययसंज्ञा होते असा अर्थ होईल, तो इष्ट नाहीं; आणि परश्च हें सूत्र केलें असतां त्याचे जोरावर वाशब्दाचा परग्रहणाशीं संबंध होऊन पुढें होणारा असा सन्प्रत्यय विकल्पानें होतो असा अर्थ होतो. अर्थात् एकदा सन्प्रत्ययाची अनुत्पत्ति सिद्ध होते.

८. वाग्रहणाचें प्रत्याख्यान केलें म्हणजे अर्थातच 'त्या वाशब्दाचा संबंध सनाकडेसच व्हावा याकरितां परश्च हें सूत्र पाहिजे' असें म्हणतां येत

मात्रम् काद्य तिथीति । अप्रकृतिकस्य प्रत्ययस्य प्रयोगः प्राप्नोति ॥

**सिद्धं तूभयनियमात् ॥ ११ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । उभयनियमात् । उभयनियमोऽयम् । प्रकृतिपर एव प्रत्ययः प्रयोक्तव्यः प्रत्ययपरैव च प्रकृतिरिति ॥ किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । परग्रहणसामर्थ्यात् । अन्तरेणापि परग्रहणं स्यादयं परः । पर एव यथा स्यादित्येवमर्थं परग्रणम् ॥

**आद्युदात्तश्च ॥ ३ । १ । ३ ॥**

किमर्थमिदमुच्यते । आद्युदात्तो यथा स्यादन्तोदात्तो मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । यमिच्छत्यन्तोदात्तं करोति तत्र चकारमनुबन्धमाह च चितोऽन्तोदात्त इति ॥ मध्योदात्तस्तर्हि मा भूदिति । मध्योदात्तमपि यमिच्छति तत्र रेफमनुबन्धं करोत्याह चोपोत्तमं रिति [६.१.२१७] इति ॥ अनुदात्तस्तर्हि मा भूदिति । अनुदात्तमपि यमिच्छति तत्र पकारमनुबन्धं करोत्याह चानुदात्तौ सुप्पितौ [३.१.४] इति ॥ स्वरितस्तर्हि मा भूदिति ।

---

मात्रम्, काऽद्य तिथी.

(वा.११) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें की येथें दोन्ही प्रकारचे नियम आहेत. प्रकृतीनें युक्त अशाच प्रत्ययाचा प्रयोग करावा, आणि प्रत्ययानें युक्त अशाच प्रकृतीचा प्रयोग करावा.

पण अशा दोन्ही नियमांदाखल नवीन वचन करावयाचें कीं काय ?

नवीन वचन करावयाचें नाहीं.

तर मग वचन केल्यावांचून कसें बरें हें समजतें ?

प्रत्यय पुढें होतो असें विधान केल्यावांचूनही 'तस्मादित्युत्त०' (१।१।६७) या परिभाषेनें प्रत्यय हा प्रकृतीच्या पुढें येईलच. तेव्हां प्रकृतीच्या पुढें प्रत्यय नेहमीं आणलाच पाहिजे, असा नियम करण्यासाठीं परश्च हें सूत्र केलें आहे.

(सू.३) कशासाठीं हें सूत्र केलें आहे ?

आद्युदात्त व्हावा आणि अन्तोदात्त होऊं नये म्हणून केलें आहे.

हें प्रयोजन होत नाहीं. कारण ज्या प्रत्ययाला अन्तोदात्त इष्ट असेल त्याला चकार अनुबंध जोडला आहे, आणि 'चितः' (६।१।१६३), चित्प्रत्ययाचा अन्त उदात्त होतो, असें सांगितलें आहे[२].

तर मग मध्योदात्त न व्हावा म्हणून हें सूत्र केलें आहे.

मध्योदात्तही ज्याला पाहिजे असेल तेथें अनुबंध रेफ जोडला आहे. आणि 'उपोत्तमं रिति' (६।१।२१७), रित्प्रत्ययान्ताचा उपोत्तम उदात्त होतो, असें सांगितलें आहे.

तर मग अनुदात्त न व्हावा म्हणून हें सूत्र केलें आहे.

अनुदात्तही ज्याला व्हावयास पाहिजे असेल तेथें पकार हा अनुबंध जोडला आहे. आणि सुप्पितौ अनुदात्तौ (३।१।४), सुप् नांवाचा प्रत्यय आणि पकारेत्संज्ञक प्रत्यय अनुदात्त होतो, असें सांगितलें आहे.

तर मग स्वरित स्वर न व्हावा यासाठीं

---

नाहीं.

९. या नियमामुळें प्रत्ययाचा स्वतंत्र प्रयोग होत नाहीं आणि नुसत्या प्रकृतीचाही प्रयोग होणार नाहीं.

१. हेंही अधिकारसूत्रच आहे. पुढील सूत्रांनी सांगितलेले जे प्रत्यय त्यांतील आदि असा अच् उदात्त होतो; जसें:– कर्तव्यम्, तैत्तिरीयम्.

२. तेव्हां अर्थांतच त्यावरून इतर ठिकाणीं अन्तोदात्त होत नाहीं असें सिद्ध होतें.

:स्वरितमपि यमिच्छति करोति तत्र त-
कारमनुबन्धमाह च तित्स्वरितम् [६.१.
१८५] इति ॥ य इदानीमतोऽन्यः प्रत्ययः
ोषः सोऽन्तरेणापि वचनमाद्युदात्त एव
भविष्यतीति नार्थ आद्युदात्तवचनेन ॥
एवमपि येषामेव प्रत्ययानां स्वरो निय-
म्यते त एव नियतस्वराः स्युर्य इदानी-
मनियतस्वरः स कदाचिदाद्युदात्तः कदा-
चिदन्तोदात्तः कदाचिन्मध्योदात्तः कदा-
चिदनुदात्तः कदाचित्स्वरितः स्यात् ।
आद्युदात्त एव यथा स्यादित्येवमर्थमिद-
मुच्यते ॥

अथ किमर्थं प्रत्ययसंज्ञासंनियोगेना-
द्युदात्तत्वमुच्यतेऽनुदात्तत्वं च न यत्रै-
वान्यस्वरस्तत्रैवायमुच्येत । ञ्नित्यादि-
र्नित्यम् [६.१.१९७] प्रत्ययस्य च । अदु-
पदेशाल्लसार्वधातुकमनुदात्तम् सुप्पितौ
चेति । तत्रायमप्यर्थो द्विराद्युदात्तग्रहणं
द्विश्चानुदात्तग्रहणं न कर्तव्यं भवति ।
प्रकृतमनुवर्तते ॥ अत उत्तरं पठति ।

**आद्युदात्तत्वस्य प्रत्ययसंज्ञासंनियोगे प्रयोजनं यस्य संज्ञाकरणं तस्याद्युदात्तार्थम् ॥ १ ॥**

आद्युदात्तत्वस्य प्रत्ययसंज्ञासंनियोग-

---

हें सूत्र केलें आहे.

स्वरितही ज्याला व्हावयास पाहिजे असेल तेथें तकार अनुबंध जोडला आहे, आणि 'तित्स्वरितम्'(६।१।१८५), तित्प्रत्ययाला स्वरित स्वर होतो, असें सांगितलें आहे. तेव्हां या स्वरभेदानें दाखविलेल्या या चार प्रकारच्या प्रत्ययांहून उरलेला म्हणजे आद्युदात्त स्वराचा प्रत्यय होय, म्हणून आद्युदात्त होतो असें विधान केल्यावांचूनही आपोआपच आद्युदात्त होईल. तेव्हां आद्युदात्तश्च हें सूत्र करण्याचा उपयोग दिसत नाहीं.

असें आहे तरी देखील प्रकृत सूत्राचा उपयोग असा आहे की ज्या प्रत्ययांना स्वर नियत ठरविला असेल ते प्रत्यय ठराविक स्वरानेंच उच्चारण्यांत येतील आणि ज्या प्रत्ययाला स्वर नियत ठरविला नाहीं तो प्रत्यय स्वर लावल्यावांचून उच्चारतां येत नाहीं, म्हणून कदाचित् आद्युदात्तस्वरानें, कदाचित् मध्योदात्तस्वरानें, कदाचित् अन्तोदात्त स्वरानें, कदाचित् अनुदात्तस्वरानें आणि कदाचित् स्वरितस्वरानेंही उच्चारण्यांत येईल. तो आद्युदात्त स्वरानेंच उच्चारण्यांत यावा यासाठीं हें सूत्र केलें आहे.

आतां 'प्रत्ययसंज्ञक होतो आणि तो आद्युदात्त होतो असें येथें आणि पुढील सूत्रामध्यें, 'प्रत्ययसंज्ञक होतो व तो प्रत्यय सुप् किंवा पित् असेल तर अनुदात्त होतो', असा प्रत्ययसंज्ञेच्या जोडीनें येथेंच उदात्त आणि अनुदात्त कशासाठीं सांगितला आहे? तसा सांगावयास नको, तर जेथें दुसरा उदात्त आणि अनुदात्त सांगितला आहे तेथेंच हाही उदात्त आणि अनुदात्त सांगण्यांत यावा. म्हणजे 'ञ्नित्यादिर्नित्यम्' (६।१।१९७) यानें आद्युदात्त सांगितला आहे, त्याच्या पुढें 'प्रत्ययस्य च' म्ह. प्रत्ययाला आद्युदात्त होतो, असें सूत्र करावें. तसेंच 'तास्यनुदात्तेत्०' (६।१।१८५) यानें अनुदात्त सांगितला आहे त्याच्या पुढें 'सुप्पितौ च', म्ह. सुप् किंवा पित् हे प्रत्यय अनुदात्त होतात, असें सूत्र करावें. शिवाय असें करण्यांत हा एक फायदा होत आहे की आद्युदात्त आणि अनुदात्त हे शब्द दोन वेळ उच्चारावयास नकोत. कारण तेथें मागून उदात्त आणि अनुदात्त हें पद अनुवृत्त होत आहे. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात:

(वा.१) प्रत्ययसंज्ञेच्या बरोबर आद्युदात्त सांगण्यांत असा हेतु आहे की ज्याला प्रत्यय-

---

१. कारण स्वररहित असें अचाचें उच्चारण संभवतच नाहीं.

करण एतत्प्रयोजनं यस्य संज्ञा क्रियते तस्याद्युदात्तत्वं यथा स्यात् ॥

**असंनियोगे हि यस्मात्स तदादेराद्युदात्तत्वं तदन्तस्य चानुदात्तत्वम् ॥ २ ॥**

अक्रियमाणे हि प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वे प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति तदादेरेवाद्युदात्तत्वं प्रसज्येत तदन्तस्य चानुदात्तत्वम् ॥ अथ क्रियमाणेऽपि प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वेऽनुदात्तत्वे च कस्मादेव तदादेराद्युदात्तत्वं न भवति तदन्तस्य चानुदात्तत्वम् । उत्पन्नः प्रत्ययः प्रत्ययाश्रयाणां कार्याणां निमित्तं भवति नोत्पद्यमानः । तद्यथा। घटः कृतो घटाश्रयाणां कार्याणां निमित्तं भवति न क्रियमाणः ॥

**न वा प्रकृतेराद्युदात्तवचनं ज्ञापकं तदादेरग्रहणस्य ॥ ३ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । यदयं ञ्नित्यादिर्नित्यमिति प्रकृतेराद्युदात्तत्वं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न तदादेराद्युदात्तत्वं भवतीति ॥ तदन्तस्य तर्ह्यनुदात्तत्वं प्राप्नोति ।

**प्रकृतिस्वरस्य च विधानसामर्थ्यात्प्रत्ययस्वराभावः ॥ ४ ॥**

यदयं धातोरन्तः प्रातिपदिकस्यान्त

---

संज्ञा केली आहे त्याला हा आद्युदात्त व्हावा.

(वा.२) प्रत्ययसंज्ञेच्या बरोबर आद्युदात्त सांगितला नाहीं तर 'प्रत्ययाचें ग्रहण केलें असतां तेथें तो प्रत्यय ज्याच्यापुढें केला आहे त्या प्रकृतीला आरंभ करून त्या प्रत्ययावर समाप्त होणाऱ्या समुदायाचें त्या प्रत्ययानें ग्रहण करावें' या परिभाषेनें प्रत्ययान्ताच्या आदीलाच आद्युदात्त आणि प्रत्ययाला अनुदात्त होऊं लागेल.

आतां प्रत्ययसंज्ञेच्या बरोबर आद्युदात्त आणि अनुदात्त सांगितला तरी देखील कां बरें प्रत्ययान्ताला आद्युदात्त व प्रत्ययाला अनुदात्त होत नाहीं?

उत्पन्न झालेला प्रत्यय स्वतःला प्रत्ययसंज्ञेवर अवलंबून असलेलीं कार्यें करून घेण्याविषयीं समर्थ होतो, उत्पन्न होतांना कार्यें करून घेण्याविषयीं समर्थ होत नाहीं; जसें— तयार झालेला घट पाणी आणण्याच्या कामीं उपयोगीं पडतो, उत्पन्न होतांना उपयोगीं पडत नाहीं.

(वा.३) हा दोष[६] येत नाहीं.

काय कारण?

कारण असें की ज्यापेक्षां हे पाणिनिआचार्य 'ञ्नित्यादिर्नित्यम्' (६।१।१९७) या सूत्रानें ञित्प्रत्ययान्त आणि नित्प्रत्ययान्त यांचा आदि उदात्त होतो असें सांगत आहेत त्यापेक्षां प्रत्ययान्ताला आद्युदात्त होत नाहीं असें सुचवीत आहेत.

आद्युदात्ताविषयींचा दोष दूर झाला तरी सुप्पित्प्रत्ययान्ताला अनुदात्त होऊं लागेल असा दोष उरत आहेच.

(वा.४) ज्यापेक्षां धातोः (६।१।१६२) या

---

४. 'ञ्नित्यादिर्नित्यम्' याचे पुढें 'प्रत्ययस्य च' असें आणि 'तास्यनुदात्तेत्' याचे पुढें 'सुप्पितौ च' असें सूत्र केलें तर.

५. प्रत्ययः या अधिकारसूत्राच्या पुढें 'आद्युदात्तश्च' 'अनुदात्तौ सुप्पितौ' हीं अधिकारसूत्रें केलीं असतां प्रत्येक सूत्रामध्यें हे तीन अधिकार उपस्थित होतात. तेव्हां तव्य वगैरे धातूंहून पुढें होतात आणि ते प्रत्ययसंज्ञक होतात व आद्युदात्त होतात. तसेंच सुप् किंवा पित् हा प्रत्ययसंज्ञक होतो व अनुदात्त होतो असा अर्थ होत असल्यामुळें उत्पन्न होतांनाच आद्युदात्त आणि अनुदात्त होतो, म्हणून प्रत्ययान्ताला आद्युदात्त आणि अनुदात्त होत नाहीं.

६. येथें आद्युदात्त व अनुदात्त न सांगता त्या त्या प्रकरणांत सांगितला तर तदन्ताला होईल हा दोष.

इति प्रकृतेरन्तोदात्तत्वं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न तदन्तस्यानुदात्तत्वं भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् । यत्र ह्यनुदात्तः प्रत्ययः प्रकृतिस्वरस्तत्र प्रयोजयति ॥

## आगमानुदात्तार्थं वा ॥ ५ ॥

आगमानुदात्तार्थं तर्हि प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वमुच्यते । प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वे कृत आगमा अनुदात्ता यथा स्युरिति ॥

## न वागमस्यानुदात्तवचनात् ॥ ६ ॥

न वैतदपि प्रयोजनमस्ति । किं कारणम् । आगमस्यानुदात्तवचनात् । आगमा अनुदात्ता भवन्तीति वक्ष्यामि ॥ के पुनरागमा अनुदात्तत्वं प्रयोजयन्ति । इट् । लविता ॥ इट् तावन्न प्रयोजयति । इदमिह संप्रधार्यम् । इट् क्रियतामाद्युदात्तत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादिडागमः । नित्यमाद्युदात्तत्वम् । कृतेऽपीटि प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । इडपि नित्यः । कृतेऽप्याद्यु-

---

सूत्रानें धातूचा अन्त उदात्त सांगितला आहे, तसाच फिषोऽन्त उदात्तः (फिट् सू.१।१) या सूत्रानें प्रातिपादिकाचा अन्त उदात्त सांगितला आहे, त्यापेक्षां सुप्पित्प्रत्ययान्ताला अनुदात्त होत नाहीं असें सूचित होत आहे.

कसें बरें हें सूचित होतें?

असें सूचित होतें की जेथें केवळ प्रत्यय अनुदात्त होत आहे तेथेंच म्हणजे सुप् किंवा पित्प्रत्यय असतांना धातूला आणि प्रातिपदिकाला सांगितलेल्या ह्या अन्तोदात्ताचा उपयोग होतें आहे.

(वा.५) तर मग आगमांना अनुदात्त होण्यासाठीं प्रत्ययसंज्ञेच्या बरोबर येथेंच आद्युदात्ताचें विधान केलें आहे. म्हणजे प्रत्ययसंज्ञेच्या बरोबरच आद्युदात्त केला असतां मागून होणारा आगम शेषनिघातानें अनुदात्त होतो.

(वा. ६) हाही उपयोग होऊं शकत नाहीं.

काय कारण?

आगम अनुदात्त होतात असें स्वतंत्रच सांगण्यांत येणार आहे.

कोणत्या बरें आगमाला ह्या अनुदात्त सांगण्याचा उपयोग होत आहे?

इडागमाला उपयोग होत आहे; जसें:—लविता.[९]

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण येथें असा विचार करावा की प्रथमतः इडागम करावा किंवा तास्प्रत्ययाला आद्युदात्त करावा.

तर मग यांत काय बरें करावें?

इडागम पर असल्यामुळें प्रथम करावा.

पण आद्युदात्त नित्य आहे. कारण इडागम केला तरी देखील आद्युदात्त येऊं शकतो, आणि इडागम न केला तरी देखील

---

७. कारण जेथें पुढील प्रत्यय आद्युदात्त होतो तेथें त्याच्याबरोबर शेषनिघातानें (६।१।१५८) धातु अनुदात्त होत आहे. आतां जर सुप्पित्प्रत्ययान्ताला अनुदात्त होईल, तर तेथेंही धातूला व प्रातिपादिकाला पूर्वी केलेला अन्तोदात्त टिकणारा नसल्यामुळें अन्तोदात्त सांगणें व्यर्थच होईल.

८. नाहीं तर लवितव्यम् इत्यादि स्थळीं परत्वारतव अगोदर इडागम होईल, आणि प्रत्ययाला केला जाणारा आद्युदात्त इडागमालाच करण्याची पाळी येईल.

९. लूधातूहून लुट्, तिप्, डा, तास्, त्या तास्प्रत्ययाला इडागम. येथें इडागमाला अनुदात्त केला नाहीं तर तो इट् तास्प्रत्ययाचा अवयव असल्यामुळें प्रत्ययस्वरानें उदात्त होईल, आणि शेषनिघातानें तास् यांतील आकार अनुदात्त होईल. उदात्तलोपाचा अभाव झाल्यानें डाप्रत्ययाला उदात्तनिवृत्तिस्वर (६।१।१६१) होणार नाहीं; आणि इडागमाला अनुदात्त केला म्हणजे तास्प्रत्ययांतील उदात्त आकाराचा लोप केला असतां उदात्तनिवृत्तिस्वर साधतो.

दात्तत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । अनित्य इट् । अन्यथास्वरस्य कृत आद्युदात्तत्वे प्राप्नोत्यन्यथास्वरस्याकृते स्वराभिन्नस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । आद्युदात्तत्वमप्यनित्यम् । अन्यस्य कृत इटि प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । उभयोरनित्ययोः परत्वादिडागमः । अन्तरङ्गं तर्ह्याद्युदात्तत्वम् । कान्तरङ्गता । उत्पत्तिसंनियोगेनाद्युदात्तत्वमुच्यत उत्पन्ने प्रत्यये प्रकृतिप्रत्ययावाश्रित्याङ्गस्येडागमः । आद्युदात्तत्वमपि नान्तरङ्गं यावता प्रत्यय आश्रीयमाणे प्रकृतिरप्याश्रिता भवति । अन्तरङ्गमेवाद्युदात्तत्वम् । कथम् । इदानीमेव ह्युक्तं न प्रत्ययस्वरविधौ तदादिविधिर्भवतीति ॥ सीयुट् तर्हि प्रयोजयति ।

**अवचने हि सीयुडादेराद्युदात्तत्वम् ॥ ७ ॥**

अक्रियमाणे ह्यागमानुदात्तत्वे क्रियमाणेऽपि प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वे सीयुडादेर्लिङ आद्युदात्तत्वं प्रसज्येत । लविषीय पविषीय ॥

---

येऊं शकतो.

इडागमही नित्य आहे. कारण आद्युदात्त केला तरीही इडागम येऊं शकतो. आणि आद्युदात्त न केला तरीही येऊं शकतो.

पण इडागम अनित्य आहे. कारण आद्युदात्त केला असतां ज्या स्वराच्या तास्प्रत्ययाला इडागम प्राप्त होतो त्यापेक्षां निराळ्या स्वराच्या तास्प्रत्ययाला आद्युदात्त करण्याच्या पूर्वी प्राप्त होतो. 'स्वरामुळें भेद पावलेल्याला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो'.

पण अशा रीतीनें आद्युदात्तही अनित्य होणार आहे. कारण इट् केला असतां इतास्शब्दाला आद्युदात्त प्राप्त होतो व इट् करण्याच्या पूर्वी तास्शब्दाला आद्युदात्त प्राप्त होतो. आणि भिन्न भिन्न शब्दाला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो. तेव्हां दोन्ही अनित्य असल्यामुळें त्यांमध्यें प्रथमतः परत्वास्तव इडागम व्हावा.

तर मग आद्युदात्त अंतरंग आहे.

तो अंतरंग कसा ?

असा की उत्पन्न होतांनाच प्रत्ययाला आद्युदात्त प्राप्त होत आहे, आणि उत्पन्न झाल्यानंतर तो प्रत्यय आणि प्रकृति या उभयतांच्या आश्रयानें अंगसंज्ञा झाल्यानंतर इडागम प्राप्त होतो, म्हणून तो अंतरंग नाहीं.

आद्युदात्तही अंतरंग नाहीं. कारण प्रत्यय हा कारण म्हणून गृहीत धरला असेल तेथें त्याची प्रकृतीही गृहीत धरलीशी होते असा तदादिविधि सांगितला आहे.[10]

पण आद्युदात्त हा अंतरंग आहेच.

तों कसा ?

असा की आतां नुकतेंच (३।१।३,वा.३) सांगितलें ना की प्रत्ययाला उद्देशून सांगितलेल्या स्वरविधीविषयीं तदादीचें ग्रहण करावयाचें नाहीं ?

तर मग आगम अनुदात्त होतात याचा उपयोग सीयुडागमाविषयीं होत आहे.

(वा.७) 'आगमा अनुदात्ताः' हें वचन केलें नाहीं तर प्रत्ययसंज्ञेच्याबरोबर आद्युदात्त सांगितला तरीही सीयुडागमासकट लिङाला आद्युदात्त होऊं लागेल; जसें:– लविषीय[11], पविषीय.

---

१०. तेव्हां प्रकृति आणि प्रत्यय या समुदायाची अपेक्षा दोघांनाही सारखी आहे म्हणून त्यांतील कोणालाही एकाला दुसऱ्यापेक्षां अंतरंग म्हणतां येत नाहीं.

११. लूधातूहून आशिषि लिङ्, त्याला सीयुट् (३।४।१०२), नंतर आत्मनेपदी उत्तमपुरुष एकवचनी इट्प्रत्यय झाला आहे. त्या इट्प्रत्ययाला आद्युदात्त करावयाचा तो सीयुट् हा इट्प्रत्ययाचा

तत्तर्हि वक्तव्यमागमा अनुदात्ता भवन्तीति । न वक्तव्यम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्यागमा अनुदात्ता भवन्तीति यदयं यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च [३.४.१०३] इत्याह । नैतदस्ति ज्ञापकम् । वक्ष्यत्येतत् । यासुटो ङिद्वचनं पिदर्थमुदात्तवचनं चेति । शक्यमनेन वक्तुं यासुट् परस्मैपदेषु भवत्यपिच्च लिङ् भवतीति । सोऽयमेवं लघीयसा न्यासेन सिद्धे सति यद्गरीयांसं यत्नमारभते तज्ज्ञापयत्याचार्य आगमा अनुदात्ता भवन्तीति । शक्यमिदं लब्धुम् ॥

यद्येव वचनादथापि ज्ञापकादागमा अनुदात्ता भवन्त्यागमैस्तु व्यवहितत्वादाद्युदात्तत्वं न प्राप्नोति । आगमा अविद्यमानवद्भवन्तीति वक्ष्यामि । यद्यागमा

---

तर मग 'आगम अनुदात्त होतात' असें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण 'आगम अनुदात्त होतात' असें आचार्यांच्या व्यवहारावरून सूचित होत आहे. परस्मैपदामध्यें लिङाला यासुट् होतो आणि तो उदात्त व ङित् होतो (३।४।१०३) असें जें आचार्यांनीं सांगितलें आहे त्यावरून आगम अनुदात्त होतात असें सूचित[12] होतें.

यासुडागमाला सांगितलेला उदात्त हा 'आगम अनुदात्त होतात' या अर्थाचा सूचक होऊं शकत नाहीं. कारण यासुट् हा ङित् होतो आणि उदात्त होतो या दोन्ही गोष्टींचा उपयोग तिप्, सिप्, वगैरे पित्प्रत्यय केला असतां होतो, असें पुढें (३।४।१०३,वा.१२) सांगणार[13] आहे.

पण ङित् होतो आणि उदात्त होतो या दोन गोष्टी पित्प्रत्ययाकरितांच जर कराव्या लागत असतील तर परस्मैपदाच्या विषयांत लिङाला यासुट् होतो आणि तो लिङ्प्रत्यय अपित् समजावा इतकेंच सांगितलें तरी काम भागेल[14]. तेव्हां अशा लघुभूत सूत्रन्यासानें उदात्त, ङित्, या दोन पदांचें काम भागत असतां ज्यापेक्षां हे पाणिनिआचार्य दोन पदें निरनिराळीं उच्चारून गुरुभूत असा सूत्रन्यास करतात त्यापेक्षां 'आगम अनुदात्त होतात' असें ते सुचवीत आहेत[15]. अशा रीतीनें आगम अनुदात्त होतात या गोष्टीचा लाभ होणें शक्य आहे.

पण अपूर्ववचनावरून आगम अनुदात्त होवोत किंवा ज्ञापकावरून होवोत, त्या आगमांनीं पुढील वर्णाचें प्रत्ययादित्व नष्ट होत असल्यामुळें पुढील वर्णाला आद्युदात्त प्राप्त होऊं शकत नाहीं.

---

अवयव असल्यामुळें तो आद्युदात्त सीयुटालाच प्राप्त होतो, आणि 'आगम हे अनुदात्त होतात' असें म्हटलें म्हणून होत नाहीं.

१२. यासुडागम लिङाला सांगितला असल्यामुळें परस्मैपदाच्या विषयांत तो अगोदर होऊन नंतर लिङाचे स्थानीं तिङ्प्रत्यय होतात. तेव्हां त्या प्रत्ययांना होणारा आद्युदात्त यासुटालाच होईल. तेव्हां यासुट् उदात्त होतो असें विधान करण्याचें कारण नाहीं. तें तर केलें आहे, त्यावरून आगमानुदात्तत्व सूचित होतें.

१३. चिनुयात् इत्यादि स्थलीं यासुट् हा तिप् ह्या पित्प्रत्ययाचा अवयव असल्यामुळें तेथें यासुटाला 'अनुदात्तौ सुप्पितौ' यानें अनुदात्तच प्राप्त होतो, आद्युदात्त प्राप्त होत नाहीं. तेव्हां तेथें उदात्त होण्यासाठीं यासुट् उदात्त होतो असें सांगितलेंच पाहिजे; तें व्यर्थ होत नाही.

१४. अपित् सांगितल्यामुळें ङित्त्व (१।२।४) सिद्ध होतें, आणि सुप्पितौ० यानें अनुदात्त होत नसल्यामुळें उदात्त सिद्ध होतो.

१५. आगम अनुदात्त होतात असें ज्ञापन केलें म्हणजे अपित् म्हणण्यानें काम भागणार नाहीं. कारण अपित् म्हणण्यानें सुप्पितौ यानें अनुदात्त झाला नाहीं तरी या ज्ञापकामुळें प्रत्ययाद्युदात्त होणार नाहीं.

**अविद्यमानवद्भवन्तीत्युच्यते लविता अवादेशो न प्राप्नोति । स्वरविधाविति वक्ष्यामि । एवमपि लविता उदात्ताद्नुदात्तस्य स्वरितः [८.४.६६] इति स्वरितो न प्राप्नोति । षाष्ठिके स्वर इति वक्ष्यामि । एवमपि शिक्षितः निष्ठा च द्व्यजनात् [६.१.२०५] इत्येष स्वरः प्राप्नोति । प्रत्ययस्वरविधाविति वक्ष्यामि ॥ तत्तर्हि वक्तव्यमागमा अविद्यमानवद्भवन्तीति । न वक्तव्यम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्यागमा अविद्यमानवद्भवन्तीति यदयं यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्चेत्याह । नैतदस्ति ज्ञापकम् । वक्ष्यत्येतत् । यासुटो ङिद्वचनं पिदर्थमुदात्तवचनं चेति । शक्यमनेन वक्तुं यासुट् परस्मैपदेषु भवत्यपिच्च लिङ् भवतीति । सोऽयमेवं लघीयसा**

---

हा दोष जाण्याकरितां आगम नसल्यासारखे समजावेत असें वचन करण्यांत येईल.

पण आगम असून नसल्यासारखे समजावेत असें वचन केलें तर लविता या उदाहरणामध्यें अवादेश होणार नाहीं.

त्याकरितां त्या वचनामध्यें 'स्वरविधि कर्तव्य असतांना' असें म्हणतां येईल.

असें म्हटलें तरी लविता[16] येथें 'उदात्तादनुदात्तस्य०' (८।४।६६) यानें स्वरितस्वर होणार नाहीं.

त्यासाठीं सहाव्या अध्यायांतील स्वरविधि कर्तव्य असतांना आगम नसल्यासारखे समजावेत असें सांगण्यांत येईल.

तसें सांगितलें तरी चिन्तितः येथें 'निष्ठा च द्व्यजनात्' (६।१।२०५) यानें आद्युदात्त स्वर होऊं लागेल[17], हा दोष येतोच.

त्याकरितां प्रत्ययसंबंधी स्वरविधि कर्तव्य असतां आगम नसल्यासारखे समजावेत असें सांगण्यांत येईल.

तर मग आगम असून नसल्यासारखे समजावेत असें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण ज्यापेक्षां हे पाणिनिआचार्य 'यासुट्परस्मैपदेषूदात्तो ङिच्च' या सूत्रानें परस्मैपदविषयामध्यें लिङाला यासुट्आगम होतो व तो यासुट् उदात्त आणि ङित् होतो असें विधान करीत आहेत त्यापेक्षां 'आगम नसल्यासारखे समजावेत' असें सुचवीत आहेत[18].

यासुडागमाला सांगितलेला उदात्त हा 'आगम नसल्यासारखे समजावेत' या अर्थाचा सूचक होत नाहीं. कारण यासुट् हा ङित् होतो आणि उदात्त होतो या दोन्ही गोष्टींचा उपयोग तिप्, सिप्, वगैरे प्रत्यय केला असतां होतो, असें पुढें (३।४।१०३, वा.१,२) सांगणार आहें[19].

पण ङित् होतो आणि उदात्त होतो या दोन गोष्टी पित्प्रत्ययाकरितांच जर कराव्या लागत असतील तर परस्मैपदाच्या विषयांत लिङाला यासुडागम होतो आणि तो लिङ्प्रत्यय अपित् होतो इतकेंच सांगितलें तरी

---

१६. लूधातूहून तृन्प्रत्यय, धातूच्या ऊकाराला उदात्त (६।१।१९७), आणि त्याच्यापुढील इकाराला स्वरित (८।४।६६) झाला आहे.

१७. येथील इडागम नसल्यासारखा समजल्यामुळें हें बाध्य आहे असें म्हणतां येतें.

१८. यासुट् हा प्रत्ययाचा अवयव असल्यामुळें प्रत्ययाद्युदात्तत्व यासुडागमालाच होईल. असें असतां यासुडागमाला उदात्तत्वाचें विधान केलें तें अनुपयुक्त होतें. त्यावरून असें अनुमान निघतें की प्रत्ययाद्युदात्त कर्तव्य असतांना आगम नसल्यासारखे समजावेत. या वेळीं आगम अनुदात्त होतात हें ज्ञापक करावयास नको. कारण प्रत्ययाला आद्युदात्त केला म्हणजे शेषनिघातानेंच आगम अनुदात्त होतील. तेव्हां 'आगम अनुदात्त होतात' ह्याच्या बाधाकरतां यासुटाला उदात्त सांगितला पाहिजे, अशी शंका करूं नये.

१९. टीप १३ पहा.

न्यासेन सिद्धे सति यद्गरीयांसं यत्नमारभते तज्ज्ञापयत्याचार्य आगमा अविद्यमानवद्भवन्तीति ॥

**आद्युदात्तस्य वा लोपार्थम् ॥ ८ ॥**

आद्युदात्तस्य तर्हि लोपार्थं प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वमुच्यते। प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वे कृत उदात्तनिवृत्तिस्वरः सिद्धो भवति। स्रौघ्नी माथुरीति। अत्र हि परत्वाल्लोपः प्रत्ययस्वरं बाधेत ॥

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ९ ॥**

न वैतदपि प्रयोजनमस्ति। किं कारणम्। बहिरङ्गलक्षणत्वात्। बहिरङ्गलक्षणो लोपोऽन्तरङ्गलक्षणः स्वरः। असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ अवश्यं चैषा परिभाषाश्रयितव्या।

**अवचने हि ञिनिकित्स्वतिप्रसङ्गः १०**

अनाश्रीयमाणायामस्यां परिभाषायां क्रियमाणेऽपि प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वे ञिनिकित्स्वतिप्रसङ्गः स्यात्। औत्सी

---

काम भागेल. तेव्हां लघुभुत न्यासानें उदात्त आणि ङित् या दोन पदांचें काम भागत असतां ज्यापेक्षां हे पाणिनि आचार्य उदात्तः ङित् हीं दोन पदें घालून गुरुभूत असा सूत्रन्यास करीत आहेत त्यापेक्षां 'आगम नसल्यासारखे समजावेत' असें सुचवीत आहेत.

(वा ८) अथवा आद्युदात्ताचा लोप व्हावा यासाठीं प्रत्ययसंज्ञेच्या बरोबर येथेंच आद्युदात्त सांगितला आहे. म्हणजे [२०] स्रौघ्नी, माथुरी, येथें अणाला प्रत्ययसंज्ञा करण्याबरोबर आद्युदात्त केला असतां नंतर ङीपाच्या निमित्तानें झालेला अकारलोप (६।४।१४८) हा उदात्ताचा लोप होत असल्यामुळें त्या ङीपाला उदात्तनिवृत्तिस्वर (६।१।१६१) सिद्ध होतो. प्रत्ययसंज्ञा केल्यानंतर मागून'ञ्नित्यादिर्नित्यम्' याचे पुढें 'प्रत्ययस्य च' असें सूत्र करून आद्युदात्त करावयाचा असें म्हटलें तर परत्वास्तव अकारलोप आद्युदात्ताचा बाध करील. त्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वर होणार नाहीं.

(वा.९) प्रत्ययसंज्ञेच्या बरोबर आद्युदात्त सांगण्याचा हाही उपयोग येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की लोप बहिरंग आहे. स्रौघ्न+ई असें असतां येथें अकाराला 'प्रत्ययस्य च' यानें आद्युदात्त प्राप्त होतो व 'यस्येति च' यानें त्याचा लोप प्राप्त होतो. त्यांत आद्युदात्त अंतरंग आणि यस्येतिलोप बहिरंग आहे. तेथें 'अंतरंग कर्तव्य असतांना बहिरंग असिद्ध समजावें' या परिभाषेनें प्रथमतः आद्युदात्त करून नंतरच लोप करावयाचा असल्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वर साधत आहे.

आता ही अंतरंगपरिभाषा तर जरूर स्वीकारलीच पाहिजे.

(वा.१०) अंतरंगपरिभाषा न स्वीकारली तर प्रत्ययसंज्ञेच्या बरोबर आद्युदात्त सांगितला तरीही ञित्, नित् आणि कित् या प्रत्ययांचे ठिकाणीं दोष येतो;जसें:- [२१] औत्सी,कंसिकी, आत्रेयी. येथें परत्वास्तव यस्येतिलोप ञित्, होणाऱ्या आद्युदात्ताचा अपवाद 'ञ्नित्यादिः (६।१।१९७) यानें अञ्प्रत्ययान्ताला आद्युदात्त प्राप्त होतो व लोप (६।४।४८) प्राप्त होतो. त्यांत परत्वास्तव 'ञ्नित्यादिः' याचा जर लोप बाध करील तर अपवाद दूर होत असल्यामुळें प्रत्ययसंज्ञेच्या वेळींच अञ्प्रत्ययाला आद्युदात्त होईल. नंतर त्याचा लोप हा उदात्तलोप होतो म्हणून उदात्तनिवृत्तिस्वर होऊं लागेल, असा दोष येतो.

---

२०. स्रुघ्ने भवा स्रौघ्नी, मथुरायां भवा माथुरी, येथें अणूप्रत्यय (४।३।५३) भवार्थी केला आहे. त्याच्या पुढें ङीप् (४।१।१५) आणि आदिवृद्धि (७।२।११७) झाली आहे.

२१. उत्से जाता औत्सी. उत्सशब्दाच्या पुढें जातार्थी 'उत्सादिभ्योऽञ्' (४।१।८६) यानें अञ्, त्याच्या पुढें ङीप् (४।१।१५), आदिवृद्धि (७।२।११७) झाली आहे. प्रत्ययसंज्ञेच्या बरोबर प्राप्त

कंसिकी आत्रेयीति । अत्र हि परत्वाल्लोपो ञ्नितिकित्स्वरान्बाधेत ॥ नैष दोषः । ञ्नितिकित्स्वराः प्रत्ययस्वरापवादाः । न चापवादविषय उत्सर्गोऽभिनिविशते । पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः । प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते । न तावदत्र कदाचित्प्रत्ययाद्युदात्तत्वं भवत्यपवादाञ्ञ्नितिकित्स्वरान्प्रतीक्षते ॥ कंसिक्यां भूयान्परिहारः । अन्यस्यात्रोदात्तत्वमन्यस्य लोपः । आदेरुदात्तत्वमन्त्यस्य लोपः ॥ इदं तर्हि आत्रेयीति । अत्र हि परत्वाल्लोपः कित्स्वरं बाधेत । तस्मादेषा परिभाषाश्रयितव्या । एतस्यां च सत्यां शक्यं प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वमवक्तुम् ॥

**प्रत्ययाद्युदात्तत्वाद्धातोरन्तः ॥ ११ ॥**

प्रत्ययाद्युदात्तत्वाद्धातोरन्त इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । प्रत्ययाद्युदात्तत्वस्यावकाशो यत्रानुदात्ता प्रकृतिः । समत्वम् सिमत्वम् । धातोरन्त इत्येतस्याव-

नित् आणि कित् या स्वरांचा बाध करील.

हा दोष येत नाहीं. कारण ञित्स्वर, नित्स्वर आणि कित्स्वर हे प्रत्ययस्वराचे अपवाद आहेत, आणि अपवादाचे विषयामध्यें तर उत्सर्ग प्रवृत्त होत नाहीं. कारण 'प्रथमतः अपवाद मनामध्यें येतात आणि अपवादाचा विषय नव्हे अशी पक्की खात्री झाल्यावर उत्सर्ग उपस्थित होतात', म्हणून अपवादाचा विषय वगळूनच उत्सर्ग प्रवृत्त होतो. तेव्हां अपवादाचे विषयांमध्यें उत्सर्ग बिलकूल प्रवृत्त होत नाहीं असें ठरल्यामुळें अपवाद अशा ञ्नित्कित्स्वरांच्या औत्सी इत्यादि उदाहरणांमध्यें प्रत्ययस्वर बिलकूल प्रवृत्त होत नाहीं, तर अपवाद अशा त्या ञ्नित्कित्स्वरांचीच मार्गप्रतीक्षा करीत बसतो.

कंसिकी या उदाहरणांत तर चांगलाच दुसरा परिहार संभवतो. कंसिकी येथें ठकाराचे स्थानीं अगोदर इकादेश केल्यानंतर इकप्रत्ययाच्या आदि इकाराला प्रत्ययाद्युदात्त होतो आणि अर्थातच अनुदात्त अशा अकाराचा लोप होतो. तेव्हां तो उदात्तलोप होत नसल्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वराची मुळींच प्राप्ति येत नाहीं.

तर मग आत्रेयी येथें परत्वास्तव यस्येतिलोप कित्स्वराचा बाध करील, तेव्हां उदात्तनिवृत्तिस्वर होणार नाहीं; म्हणून बहिरंगपरिभाषा जरूर स्वीकारावयास पाहिजे. ती बहिरंगपरिभाषा स्वीकारिली असतां प्रत्ययसंज्ञेच्या बरोबरच आद्युदात्त सांगण्याचें कारण उरत नाहीं.[२२]

(वा.११) प्रत्ययाला सांगितलेल्या ह्या आद्युदात्तापेक्षां पर असल्यामुळें 'धातोः'

---

असेंच कंसिकी येथेंही. कंसेन क्रीता कंसिकी. कंसशब्दाच्या पुढें क्रीतार्थी 'कंसाट्टिठन्' (५।१।२५) यानें टिठन्प्रत्यय झाला आहे. त्या प्रत्ययाच्या अकाराला आद्युदात्त झाला तर त्याचा लोप झाल्यानंतर उदात्तनिवृत्तिस्वर होऊं लागेल. अत्रेरपत्यं स्त्री आत्रेयी. अत्रिशब्दाच्या पुढें अपत्यार्थी 'इतश्चानिञः' (४।१।१२२) यानें ढक्प्रत्यय झाला आहे. त्याला उपदेशींच एयादेश (७।१।२, वा.१), नंतर त्या प्रत्ययाच्या अकाराला 'कितः' (६।१।१६५) या कित्स्वरानें उदात्त होऊन येथें उदात्तनिवृत्तिस्वर होत असतो. पण त्या कित्स्वराचा परत्वास्तव यस्येतिलोपानें बाध केला तर अनुदात्तलोप होत असल्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वर होणार नाहीं.

२२. 'बह्वचो मनुष्यनाम्नः' (५।३।७८) येथें ठच्प्रत्ययाला इत्संज्ञक चकार जोडला आहे तो चितः (६।१।१६३) यानें प्रत्ययाचा अन्त उदात्त व्हावा म्हणून जोडून आहे. पण ठच् करण्याबरोबर प्रत्ययसंज्ञेच्या वेळीच जर प्रत्ययाद्युदात्त होईल तर आपोआपच त्या प्रत्ययाचा अन्त उदात्त होईल. तेव्हां चित्करण व्यर्थ होईल. त्यानें असें सुचविलें की ठकाराचे स्थानीं इकादेश केल्यानंतरच प्रत्ययाद्युदात्त प्रवृत्त होतो.

काशो यत्रानुदात्तः प्रत्ययः। पचति पठति। इहोभयं प्राप्नोति। गोपायति धूपायति। धातोरन्त इत्येतद्भवति विप्रतिषेधेन॥

**पित्स्वरात्तित्स्वरष्टापि॥१२॥**

पित्स्वरात्तित्स्वरष्टापि भवति विप्रतिषेधेन। पित्स्वरस्यावकाशः। पचति पठति। तित्स्वरस्यावकाशः।कार्यम् हार्यम्। इहोभयं प्राप्नोति। कार्या हार्या। तित्स्वरो भवति विप्रतिषेधेन॥

**चित्स्वरश्चापि पित्स्वरात्॥१३॥**

चित्स्वरश्चापि पित्स्वराद्भवति विप्रतिषेधेन। चित्स्वरस्यावकाशः। चलनः चोपनः। पित्स्वरस्य स एव। इहोभयं प्राप्नोति। आम्बष्ठ्या सौवीर्या। चित्स्वरो भवति विप्रतिषेधेन॥

**न वाद्युदात्तस्य प्रत्ययसंज्ञासंनियोगात्॥१४॥**

न वार्थो विप्रतिषेधेन। किं कारणम्। आद्युदात्तस्य प्रत्ययसंज्ञासंनियोगात्। प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वे कृते सति शिष्टत्वाद्धातुस्वरो भविष्यति॥

अयं चाप्ययुक्तो विप्रतिषेधः पित्स्वरस्य तित्स्वरस्य च। किं कारणम्।

**टापि स्वरितेनैकादेशः॥१५॥**

टापि स्वरितेनैकादेशो भवति॥ इदमिह संप्रधार्यम्। स्वरितत्वं क्रियतामेकादेश इति किमत्र कर्तव्यम्। परत्वात्स्व-

(६।१।१६२) हा अंतोदात्तस्वर होतो. जेथें प्रकृति अनुदात्त आहे अशा समत्वम्[२३], सिमत्वम्, येथें ह्या प्रत्ययाद्युदात्त स्वराला अवकाश आहे व धातोः या अंतोदात्तस्वराला जेथें प्रत्यय अनुदात्त आहे म्हणजे पचति, पठति, येथें अवकाश आहे; आणि गोपायति येथें आयप्रत्ययाचें ठिकाणीं उभयतांची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें अंतोदात्तस्वर होतो.

(वा.१२) टाप्प्रत्यय विवक्षित असतां पित्स्वरापेक्षां विप्रतिषेधानें तित्स्वर होतो. पित्स्वराला पचति, पठति, येथें अवकाश आहे. तित्स्वराला कार्य, हार्य येथें अवकाश आहे. कार्या, हार्या, येथें दोन्ही स्वर प्राप्त होतात. तेव्हां पित्स्वरापेक्षां तित्स्वर विप्रतिषेधानें होतो.

(वा.१३) चाप्प्रत्यय केला असतां पित्स्वरापेक्षां पर असल्यामुळे 'चितः' (६।१।१६३) हा अंतोदात्तस्वर होतो. चित्स्वराला चलनः, कम्पनः, येथें युच् (३।२।१४८) प्रत्ययाचे ठिकाणीं अवकाश आहे व पित्स्वराला पचति हा पूर्वोक्तच अवकाश आहे; आणि आॅम्बष्ठ्या[२४], सौवीर्या, येथें चापाचे ठिकाणीं उभयतांची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें परत्वास्तव चित्स्वर होतो.

(वा.१४)विप्रतिषेधाचा उपयोग होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की प्रत्ययसंज्ञेच्या बरोबरच आद्युदात्ताचें विधान केलें आहे. तेव्हां प्रथमतः आद्युदात्तस्वर केल्यानंतर मागून प्राप्त झालेला धातुस्वर होईलच.

पित्स्वर आणि तित्स्वर यांचा जो विप्रतिषेध दाखविला तोही योग्य नाहीं.

काय कारण ?

(वा.१५) टाप् केला असतां प्रथमतः ण्यत्प्रत्ययाला स्वरित केल्यानंतर त्या स्वरिताबरोबर टापाचा एकादेश होईल[२५].

पण येथें असा विचार करावा की कार्य

---

२३. सम, सिम, हे शब्द 'स्वरवसमासिमेत्यनुच्चानि' (फिट्सू० पा.४) यानें सर्वानुदात्त आहेत.

२४. आम्बष्ठस्यापत्यं स्त्री. 'वृद्धेत्कोसलाजा०' (४।१।१७१) यानें यङ्, 'यङश्चाप्' (४।१।७४) यानें चाप्. असेंच सौवीर्या येथेंही समजावें.

२५. तेव्हां अर्थातच तो स्थानीसारखा (१।१।५०) स्वरितच होईल.

रितत्वम् । नित्य एकादेशः । कृतेऽपि हि स्वरितत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । स्वरितत्वमपि नित्यम् । कृतेप्येकादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । अनित्यं स्वरितत्वम् । अन्यस्य कृत एकादेशे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । एकादेशोऽप्यनित्यः । अन्यथास्वरस्य कृते स्वरितत्वे प्राप्नोत्यन्यथास्वरस्याकृते स्वरितत्वे स्वराभिन्नस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । अन्तरङ्गस्तर्ह्येकादेशः । कान्तरङ्गता । वर्णावाश्रित्यैकादेशः पदस्य स्वरितत्वम् । स्वरितत्वमप्यन्तरङ्गम् । कथम् । वक्ष्यत्येतत् । पदग्रहणं परिमाणार्थमिति । उभयोरन्तरङ्गयोः परत्वात्स्वरितत्वम् । स्वरितत्वे कृत आन्तर्यतः स्वरितानुदात्तयोरेकादेशः स्वरितो भविष्यति ॥

अयं चाप्ययुक्तो विप्रतिषेधः पित्स्वरस्य चित्स्वरस्य च । किं कारणम् ।

**चापि चित्करणात् ॥ १६ ॥**

---

+आ किंवा हार्य + आ या स्थितींत अगोदर ण्यत्प्रत्ययाला स्वरित करावा किंवा त्याचा टापाबरोबर एकादेश करावा?

मग या उभयतांमध्यें पूर्वी काय बरें करावें?

एकादेशापेक्षां पर असल्यामुळें स्वरितस्वर पूर्वी करावा?

पण स्वरितस्वर केला अथवा न केला तरीही प्राप्त होत असल्यामुळें एकादेश नित्य आहे ना?

एकादेशाप्रमाणें स्वरितस्वरही नित्य आहेच. कारण एकादेश केला तरीही स्वरितस्वर प्राप्त होतो, अथवा एकादेश न केला तरीही प्राप्त होतो.

पण स्वरितस्वर अनित्य आहे. कारण एकादेश केला असतां एकाला म्हणजे आकाराला स्वरित प्राप्त होतो आणि एकादेश न केला तर दुसऱ्याला म्ह. अकाराला प्राप्त होतो. आणि अशा रीतीनें 'निरनिराळ्या शब्दांना प्राप्त होणारा जो विधि तो अनित्य होय' अशी परिभाषा आहे.

एकादेशही अनित्य होय. कारण स्वरित केला असतां स्वरितयुक्त अशा अकाराबरोबर टापाचा एकादेश प्राप्त होतो, आणि स्वरित न केला तर त्यापेक्षां निराळ्या स्वराच्या अकाराबरोबर टापाचा एकादेश प्राप्त होतो. आणि स्वरामुळें निरनिराळ्या स्थानीला प्राप्त होणारा विधि तो अनित्य होय अशी परिभाषा आहे.

तर मग एकादेश हा अंतरंग आहे म्हणून एकादेश होईल.

तो अंतरंग कसा?

असा की फक्त दोन वर्णांची अपेक्षा असल्यामुळें एकादेश अंतरंग आहे, आणि पदाची[२६] अपेक्षा असल्यामुळें स्वरित हा बहिरंग आहे.

स्वरितही अंतरंग आहे.

तो कसा?

असें सांगणार आहे की 'अनुदात्तं पदमेक०' येथें पदशब्द घातला आहे तो परिमाणासाठीं[२७] घातला आहे. तेव्हां अंतरंग अशा उभयतांमध्यें परत्वास्तव स्वरित होतो. स्वरित झाल्यानंतर केला जाणारा एकादेश स्थानीसारखा स्वरित होईल.

तसेंच पित्स्वर आणि चित्स्वर या उभयतांचा जो विप्रतिषेध दाखविला तोही बरोबर नाहीं.

काय कारण?

(वा.१६) यङश्चाप् (४।१।७४) या चाप-

---

२६. तित्स्वरितम् (६।१।१८५) याची अनुदात्तं पद० (६।१।१५८) या परिभाषेबरोबर एकवाक्यता होत असल्यामुळें स्वरिताला पदाची अपेक्षा आहे.

२७. शेषनिघात कोठपर्यंत करावा त्याची मर्यादा दाखविण्यासाठीं.

चापि चित्करणसामर्थ्यादन्तोदात्तत्वं भविष्यति ॥

[अनुदात्तौ सुप्पितौ ॥३।१।४॥]

गुप्तिज्किद्भ्यः सन् ॥ ३ । १ । ५॥

गुपादिष्वनुबन्धकरणं किमर्थम् ।

**गुपादिष्वनुबन्धकरणमात्मनेपदार्थम् ॥ १ ॥**

गुपादिष्वनुबन्धाः क्रियन्त आत्मनेपदं यथा स्यात् ॥ क्रियमाणेष्वप्यनुबन्धेष्वात्मनेपदं नैव प्राप्नोति । किं कारणम् । सना व्यवहितत्वात् । पूर्ववत्सनः [१.३.६२] इत्येवं भविष्यति । पूर्ववत्सन इत्युच्यते न चैतेभ्यः प्राक्सन आत्मनेपदं नापि परस्मैपदं पश्यामः । एवं तर्ह्यनुबन्धकरणसामर्थ्याद्भविष्यति ॥ अथवावयवे कृतं लिङ्गं समुदायस्य विशेषकं भविष्यति । तद्यथा । गोः सक्थनि कर्णे वा कृतं लिङ्गं गोर्विशेषकं भवति ॥ यद्यवयवे कृतं लिङ्गं समुदायस्य विशेषकं भवति जुगुप्सयति मीमांसयतीत्यत्रापि प्राप्नोति । अवयवे कृतं लिङ्गं कस्य समुदायस्य विशेषकं भवति । यं समुदायं

---

प्रत्ययामध्यें इत्संज्ञक चकार जोडला आहे, त्या जोरावरच आम्बष्ठ्या, सौवीर्या, येथें अंतोदात्त होईल.

(सू.५) गुप, तिज, कित आणि मान या धातूंच्या शेवटीं अनुदात्त अकार इत्संज्ञक आहे आणि या चार धातूंहून तर सन्प्रत्यय कायमचाच सांगितला आहे. तेव्हां या धातूंना इत्संज्ञक अकार जोडला आहे तो कशासाठीं?

(वा. १) आत्मनेपद (१।३।१२) व्हावें यासाठीं पूर्वोक्त चार धातूंना इत्संज्ञक अनुदात्त अकार जोडला आहे.

अनुबंध जोडला तरी देखील सदर चार धातूंहून आत्मनेपद होऊं शकत नाहीं.

काय कारण?

कारण असें की या धातूंहून सन्प्रत्यय हा कायमच होणार असल्यामुळें धातु आणि लकार यांच्यामध्यें सन्प्रत्ययानें व्यवधान येतें.

व्यवधान असलें तरी 'पूर्ववत्सनः' (१।३।६२) या सूत्रानें आत्मनेपद होईल.

पण तेथें सन्प्रत्ययाच्या मागील प्रकृतीप्रमाणें असें म्हटलें आहे. आणि या चार धातूंच्या पुढें तर आत्मनेपद व परस्मैपद हें कांहींच दिसत नाहीं.

तर मग या धातूंना जो अनुदात्त अकार इत्संज्ञक जोडला आहे त्याचे जोरावर व्यवधान असतांही या धातूंच्या पुढें आत्मनेपद (१।३।१२) होईल. अथवा अवयवाचे ठिकाणीं केलेल्या चिन्हाचा समुदायाकडे उपयोग होतो; जसें:— बैलाच्या मांडीला किंवा कानाला केलेली खूण ती 'अमुक खुणेचा' अशा रीतीनें तो बैल दाखविण्याच्या कामीं उपयोगीं पडते.

जर अवयवाचे ठिकाणीं केलेल्या खुणेचा उपयोग अवयवीकडे करतां येत असेल तर जुगुप्सयति, मीमांसयति, येथेंही आत्मनेपद होऊं लागेल.

अवयवाचे ठिकाणीं केलेलें चिन्ह कोणत्या समुदायाला उपयोगीं पडतें? अवयवाचे ठिकाणीं केलेलें चिन्ह तशाच

---

१. सुप्नांवाचे प्रत्यय किंवा पकारेत्संज्ञक प्रत्यय हे अनुदात्त होतात; जसें:- दृषदौ दृषदः, पचति पठति.

१. गुप्, तिज् आणि कित् या धातूंहून स्वार्थीं सन्प्रत्यय होतो; उदा०- जुगुप्सते, तितिक्षते, चिकित्सति.

२. जसा गुप्धातूला जोडलेल्या इत्संज्ञक अनुदात्त अकाराचा उपयोग जुगुप्सते येथें जुगुप्स या धातूहून आत्मनेपद करण्याच्या कामीं झाला, तसा जुगुप्स या सन्प्रत्ययान्त धातूहून णिच्प्रत्यय (३।१।२६) केल्यानंतर जुगुप्सि या णिच्प्रत्ययान्त धातूहूनही पुढें आत्मनेपद करण्याच्या कामी उपयोग करतां येईल.

योऽवयवो न व्यभिचरति । सनं च न व्यभिचरति णिचं पुनर्व्यभिचरति । तद्यथा । गोः सक्थनि कर्णे वा कृतं लिङ्गं गोरेव विशेषकं भवति न गोमण्डलस्य ॥

**मान्बधदान्शान्भ्यो दीर्घश्चाभ्यासस्य ॥ ३ । १ । ६ ॥**

**अभ्यासदीर्घत्वेऽवर्णस्य दीर्घप्रसङ्गः ॥ १ ॥**

अभ्यासस्य दीर्घत्वेऽवर्णस्य दीर्घत्वं प्राप्नोति । मीमांसते ॥ ननु चेत्त्वे कृते दीर्घत्वं भविष्यति । कथं पुनरुत्पत्तिसंनियोगेन दीर्घत्वमुच्यमानमित्त्वं प्रतीक्षते । अथ कथमभ्यासं प्रतीक्षते । वचनादभ्यासं प्रतीक्षत इत्त्वं पुनर्न प्रतीक्षते ॥

**न वाभ्यासविकारेष्वपवादस्योत्सर्गाबाधकत्वात् ॥ २ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अभ्यासविकारेष्वपवादस्योत्सर्गाबाधकत्वात् । अभ्यासविकारेष्वपवादा उत्सर्गान्न बाधन्त इत्येवं दीर्घत्वमुच्यमानमित्त्वं न बाधिष्यते ॥

अथवा मान्बधदान्शान्भ्य ई चाभ्यासस्येति वक्ष्यामि । एवमपि हलादिशेषापवाद ईकारः प्राप्नोति । ई चाच इति वक्ष्यामि ॥ अथवा मान्बधदान्शान्भ्यो दीर्घश्चेतोऽभ्यासस्येति वक्ष्यामि । सिध्यति।

---

समुदायाकडे उपयोगीं पडतें की तो अवयव त्या समुदायाला सोडून कधींही असूं शकत नाहीं. प्रकृत स्थलीं पहावें तर हा अनुदात्त इत्संज्ञक अकार फक्त जुगुप्स या समुदायाला सोडून कधींही असूं शकत नाहीं आणि जुगुप्सि या णिजन्तसमुदायाला सोडून असूं शकतो; जसें:— बैलाच्या मांडीला किंवा कानाला केलेली खूण त्या बैलाचाच विशिष्टपणा दाखविते;त्या बैलाच्या घोळक्याचा[3] विशिष्टपणा दाखवूं शकत नाहीं.

(सू. ६, वा. १) मान् वगैरे धातूंच्या अभ्यासाला सांगितलेला हा दीर्घ त्या अभ्यासांतील अवर्णाला होऊं लागेल; जसें, मीमांसते.

मीमांसते येथील अभ्यासांतील अकाराला इत्त्व (७।४।७९) केल्यानंतर मागून दीर्घ होईल.

पण सन्प्रत्ययाच्या उत्पत्तीबरोबर सांगितलेला हा अभ्यासदीर्घ इत्त्वाची काय म्हणून बरें वाट बघत बसेल ?

तर मग अभ्यासाची तरी काय म्हणून वाट बघत बसतो ?

सूत्रामध्यें 'अभ्यासस्य' असें म्हटलें असल्यामुळें अभ्यासाची वाट बघतो. पण इत्त्वाची वाट बघण्याचें कांहींही कारण नाहीं.

(वा.२) हा पूर्वोक्त दोष येऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की अभ्यासासंबंधीं कार्याविषयीं अपवाद हे उत्सर्गाचा बाध करीत नाहींत. सबब अभ्यासाला सांगितलेला दीर्घ इत्त्वाचा बाध करणार नाहीं, म्हणजे इत्त्व केल्यानंतर मागून दीर्घ होईल.

किंवा 'मान्बधदान्शान्भ्य ईचाभ्यासस्य' असें सूत्र करण्यांत येईल.

असें केलें तरी हलादिशेषाचा अपवाद होऊन शेवटच्या व्यंजनालाच ईकार होऊं लागेल.

त्यासाठीं 'ईचाचः' म्हणजे अभ्यासांतील अचाला ईकार होतो असें सांगेन. किंवा 'मान्बधदान्शान्भ्यो दीर्घश्चेतोऽभ्यासस्य', म्ह.

---

३. अमुक खुणेचा घोळका असा व्यवहार एका बैलाच्या खुणेनें कधींही होत नाहीं.

१. मान्, बध्, दान्, शान् या धातूंहून स्वार्थी सन्प्रत्यय होतो, आणि या धातूंच्या अभ्यासांतील इकाराला दीर्घ होतो; उदा० – मीमांसते, बीभत्सते.

सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमभ्यासदीर्घत्वेऽवर्णस्य दीर्घप्रसङ्ग इति । परिहृतमेतन्न वाभ्यासविकारेष्वपवादस्योत्सर्गाबाधकत्वादिति॥ अथवा नैवं विज्ञायते दीर्घश्च अभ्यासस्येति । कथं तर्हि । दीर्घश्च आभ्यासस्येति । किमिदमाभ्यासस्येति । अभ्यासविकार आभ्यासः तस्येति ॥

**धातोः कर्मणः समानकर्तृकादिच्छायां वा ॥ ३ । १ । ७ ॥**

धातोरिति किमर्थम् । प्रकर्तुमैच्छत् प्राचिकीर्षत् । सोपसर्गादुत्पत्तिर्मा भूत् ।

**कर्मग्रहणात्सन्विधौ धातुग्रहणानर्थक्यम् ॥ १ ॥**

कर्मग्रहणात्सन्विधौ धातुग्रहणमनर्थकम् । कर्मणः समानकर्तृकादिच्छायां वा सन्भवतीत्येव धातोरुत्पत्तिर्भविष्यति ॥ सोपसर्गं वै कर्म तत उत्पत्तिः प्राप्नोति ।

---

मान् वगैरेंच्या अभ्यासांतील इकाराला दीर्घ होतो, असें सूत्र करण्यांत येईल.

असें सूत्र केलें असतां इष्ट साधतें हें खरें, पण मूळ सूत्रांत बदल होतो.

तर मग मूळचें जसें सूत्र आहे तसें तें असूं दे.

पण मान् वगैरेंच्या अभ्यासाला सांगितलेला दीर्घ त्या अभ्यासांतील अवर्णाला होऊं लागेल असें म्हटलें आहे ना ?

'अभ्याससंबंधीं कार्याविषयीं अपवाद हे उत्सर्गाचा बाध करीत नाहींत', या परिभाषेनें त्या दोषाचा परिहारही केलाच आहे.

किंवा दीर्घश्चाभ्यासस्य येथें च-अभ्यासस्य असा परिच्छेद आम्ही समजत नाहीं.

तर मग कसा समजतां ?

च-आभ्यासस्य असा समजतों.

आभ्यासस्य याचा काय अर्थ ?

अभ्यासस्य विकारः आभ्यासः अशी ही तद्धितवृत्ति सोडवावयाची. अभ्यासाचा विकार जें इत्त्व त्याला दीर्घ होतो असा अर्थ झाल्यामुळें सर्व इष्ट साधतें.

(सू. ७) येथें धातोः हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

प्रकर्तुमैच्छत् प्राचिकीर्षत्, येथें उपसर्गविशिष्ट असा 'प्र कृ' एवढ्याहून सन्प्रत्यय न व्हावा यासाठीं धातोः हा शब्द घातला आहे.[3]

(वा. १) सन्प्रत्यय सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें कर्मणः म्ह. कर्मवाचकाहून असें म्हटलें असल्यामुळें धातोः हा शब्द व्यर्थ होतो. इच्छेची कर्मभूत[4] अशी आणि इच्छा करणाऱ्याकडून केली जाणारी जी क्रिया तद्वाचकाहून सन् विकल्पानें होतो असें मोघम म्हटलें तरी तेवढ्यानें धातूहूनच सन्प्रत्ययाची उत्पत्ति होईल.

पण 'सोपसर्गं वै कर्म०' इच्छेची कर्मभूत जी क्रिया ती प्रकर्तुमिच्छति प्रचिकीर्षति येथें उपसर्ग आणि धातु या उभयतांनीं मिळून दाखविली असल्यामुळें कर्मभूत क्रियेचें वाचकत्व त्या उभयतांना मिळून येतें. तेव्हां त्या उभयतांच्या संघाताहून सन्प्रत्ययाची उत्पत्ति

---

१. जी क्रिया आपण स्वतः करावी अशी कर्त्याला इच्छा होते तेथें त्या क्रियेचा वाचक जो धातु त्याहून इच्छा या अर्थी सन्प्रत्यय विकल्पानें होतो; उदा०—पठनमिच्छति पिपठिषति.

२. कर्ता हा क्रियेमुळेंच होतो, म्हणून इच्छेशीं समान आहे कर्ता जिचा अशी ती क्रियाच एवढ्यानें येईल. त्या क्रियावाचकाहून सन्प्रत्यय सांगितला असतां अर्थात् तो धातूहूनच होईल. कारण क्रियेचा वाचक धातुच असतो ह्या हेतूनें हा प्रश्न उभारला आहे.

३. उपसर्ग आणि धातु या उभयतांनीं मिळून एक विशेष प्रकारची क्रिया दाखविली आहे. तेव्हां प्र+कृ-हून सन्प्रत्यय झाल्यास त्या सनामुळें होणारें द्वित्व वगैरे कार्य प्रशब्दाला होऊं लागेल.

४. ज्या क्रियेची इच्छा केली जाते ती क्रिया इच्छेची कर्मभूत होय.

**सोपसर्गं कर्मेति चेत्कर्मविशेषकत्वादुपसर्गस्यानुपसर्गं कर्म ॥ २ ॥**

सोपसर्गं कर्मेति चेत्कर्मविशेषक उपसर्गः । अनुपसर्गमेव हि कर्म ॥ अवश्यं चैतदेवं विज्ञेयमनुपसर्गं कर्मेति ।

**सोपसर्गस्य हि कर्मत्वे धात्वधिकारेऽपि सनोऽविधानमकर्मत्वात् ॥ ३ ॥**

यो हि मन्यते सोपसर्गं कर्मेति क्रियमाणेऽपि तस्य धातुग्रहणे सनोऽविधिः स्यात् । किं कारणम् । अकर्मत्वात् ।

इदं तर्हि प्रयोजनं सुबन्तादुत्पत्तिर्मा भूत् ।

**सुबन्ताच्चाप्रसङ्गः क्यजादीनामपवादत्वात् ॥ ४ ॥**

सुबन्ताच्च सनोऽप्रसङ्गः । किं कारणम् । क्यजादीनामपवादत्वात् । सुबन्तात्क्यजादयो विधीयन्ते तेऽपवादत्वाद्बाधका भविष्यन्ति ॥

**अनभिधानाद्वा ॥ ५ ॥**

अथवानभिधानात्सुबन्तादुत्पत्तिर्न भविष्यति । न हि सुबन्तादुत्पद्यमानेन सनेच्छाया अभिधानं स्यात् । अनभिधानात्तत उत्पत्तिर्न भविष्यति ॥

इयं तावदगतिका गतिर्यदुच्यतेऽनभिधानादिति ॥ यदप्युच्यते सुबन्ताच्चाप्रसङ्गः क्यजादीनामपवादत्वादिति भवे-

---

प्रसक्त होते.

(वा. २) एक विशेष प्रकारची क्रिया दाखविली म्हणून उपसर्ग आणि धातु या उभयतांना मिळून कर्मभूत क्रियेचें वाचकत्व येतें, असें म्हणणें असेल तर तें क्रियावाचकत्व धातूलाच असून उपसर्ग हा केवळ त्या क्रियेचा द्योतक आहे. म्हणून उपसर्गरहित केवळ धातुच कर्मभूत क्रियेचा वाचक आहे. सबब उपसर्ग जवळ असतां केवळ धातूहूनच सन्प्रत्ययाची उत्पत्ति होईल.

उपसर्ग जवळ असला तरी केवळ धातुच कर्मभूत क्रियेचा वाचक आहे, असें अवश्य समजलें पाहिजे.

(वा. ३) एक विशिष्ट क्रिया दाखविली म्हणून उपसर्ग आणि धातु हे उभयतां मिळून कर्मभूत क्रियेचे वाचक होतात असें जो समजतो त्याच्या मतीं सूत्रामध्यें धातोः हा शब्द घातला तरी देखील प्र, कृ, यांतील कृधातूहून सन्प्रत्यय करतां येणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें की प्र कृ यांतील केवळ धातु हा कर्मभूत क्रियेचा वाचक नव्हे.

तर मग सुबन्ताहून सन्प्रत्यय न व्हावा, हा धातुशब्द घालण्याचा उपयोग समजावा.

(वा. ४) सुबन्ताहून सन्प्रत्ययाची प्राप्ति येऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की सुबन्ताहून क्यच्, क्यङ्, वगैरे प्रत्ययांचें विधान केलें आहे. ते प्रत्यय अपवाद असल्यामुळें सनाचे बाधक होतील.

(वा. ५) अथवा सुबन्ताहून सन्प्रत्यय होणार नाहीं. कारण सुबन्ताहून केलेल्या सन्प्रत्ययानें इच्छेचें अभिधान केलें जात नाहीं.

सुबन्ताहून सन्प्रत्यय होत नाहीं याचें अनभिधान हें कारण दाखविलें खरें, परंतु जेव्हां इतर सर्व मार्ग खुंटतो तेव्हांच अनभिधान हें कारण पुढें केलें जातें.

आतां क्यच् वगैरे प्रत्यय हे अपवाद असल्यामुळें सुबन्ताहून सन्प्रत्यय होणार नाहीं असें जें म्हटलें आहे तें ज्या ठिकाणीं सुब-

---

५. पुत्रमिच्छति पुत्रीयति येथें पुत्र हें इच्छेचें कर्म होय. आणि इच्छेचें जें कर्म तें इच्छेच्या द्वारानें समानकर्तृक असणारच. ; समानकर्तृकात् याचें प्रत्युदाहरण मात्र धातूहून सन्प्रत्यय करतांनाच मिळेल; जसें:- शिष्याः पठन्तु इतीच्छति गुरुः.

६. तात्पर्य, सुबन्ताहून सन्प्रत्यय न होण्याकरितां

त्कस्माच्चिदप्रसङ्गः स्यादात्मेच्छायाम् । परेच्छायां तु प्राप्नोति । राज्ञः पुत्रमिच्छतीति ॥ एवं तर्हीदमिह व्यपदेश्यं सदाचार्यो न व्यपदिशति । किम् । समानकर्तृकादित्युच्यते न च सुबन्तस्य समानः कर्तास्ति ॥ एवमपि भवेत्कस्माच्चिदप्रसङ्गः स्याद्यस्य कर्ता नास्ति । इह तु प्राप्नोति आसितुमिच्छति शयितुमिच्छतीति । इच्छायामर्थे सन्विधीयत इच्छार्थेषु च तुमुन् । तत्र तुमुनोक्तत्वात्तस्यार्थस्य सन्न भविष्यति ॥ एवमपीह प्राप्नोति आसनमिच्छति शयनमिच्छतीति । इह यो विशेष उपाधिर्वोपादीयते द्योत्ये तस्मिंस्तेन भवितव्यम् । यश्चेहार्थो गम्यते आसितुमिच्छति शयितुमिच्छतीति स्वयं तां क्रियां कर्तुमिच्छतीति नासाविह गम्यते आसनमिच्छति शयनमिच्छतीति। अन्यस्याप्यासनमिच्छतीत्येषोऽप्यर्थो ग-

---

न्ताचा जो अर्थ पुत्र वगैरे तो आपल्याला व्हावा अशी इच्छा असेल अशा कांहीं ठिकाणीं जमेल तेथें सुबन्ताहून सन्प्रत्यय होणार नाहीं. पण जेथें परसंबंधी अशा सुबन्तार्थाची इच्छा असेल तेथें म्हणजे राज्ञः पुत्रमिच्छति देवदत्तः येथें सन्प्रत्यय प्राप्त होत आहेच.

पण येथें जें सांगावयास पाहिजे तें आचार्य वार्तिककार सांगत नाहींत.

सांगावयास पाहिजे असें तें काय ?

समानकर्तृकात् म्ह. इच्छेचा जो कर्ता तो आहे कर्ता ज्याचा अशा कर्माहून, असें सूत्रामध्यें म्हटलें आहे. तो इच्छेशीं समान कर्ता तर सुबन्ताला मुळींच संभवत नाहीं.

पण ज्या कर्माला कर्ता संभवत नाहीं अशा कांहीं सुबन्तांहून सन्प्रत्यय प्राप्त झाला नाहीं तरी पण आसितुमिच्छति, शयितुमिच्छति, येथें सन्प्रत्यय प्राप्त होतो.

इच्छा या अर्थीं सन्प्रत्यय सांगितला आहे, आणि इच्छार्थक धातु उपपद असतांनाच तुमुन्प्रत्यय (३।३।१५८) सांगितला आहे. तेव्हां येथें तुमुन्प्रत्यय केला असल्यामुळें त्याचें निमित्त जें इच्छति हे उपपद त्यानेंच इच्छा हा अर्थ उक्त झाला असल्यामुळें 'उक्तार्थानामप्रयोगः' या न्यायानें पुनः त्या अर्थीं सन्प्रत्यय होणार नाहीं.

उक्तस्थलीं सन्प्रत्ययाची प्राप्ति नसली तरी आसनमिच्छति, शयनमिच्छति, येथें सन्प्रत्यय प्राप्त होतो.

येथें समानकर्तृकत्व वगैरे ज्या विशेष गोष्टी उच्चारल्या आहेत तसाच जो इच्छा हा अर्थ सन्प्रत्ययानें दाखविला जातो तो अर्थ गम्यमान असेल तर तेथें सन्प्रत्यय व्हावा. असें पहा की आसितुमिच्छति, शयितुमिच्छति, येथें कर्ता स्वतः हाच ती क्रिया करण्याची इच्छा करतो, असा जो अर्थ गम्यमान होतो तो अर्थ आसनमिच्छति या ठिकाणीं प्रतीत होत नाहीं. कारण आसनमिच्छति यापासून अन्याचें बसणें इच्छितो असाही अर्थ मनांत

---

येथें धातोः असा शब्द घातला आहे. हा उपाय असतांना तो बाजूला सारून अनभिधानाचा अवलंब करणें बरें नव्हे.

७. कारण क्यच्प्रत्यय सांगणाऱ्या शास्त्रामध्यें आत्मनः असें म्हटलें असल्यामुळें तेथें क्यच्प्रत्ययाची प्राप्ति येत नाहीं. तेव्हां अशा ठिकाणीं सन्प्रत्यय न व्हावा याकरितां धातोः असें म्हटलें पाहिजे.

८. कर्ता हा क्रियेलाच असतो, कर्माला नसतो, आणि पुत्रम् या सुबन्ताचा अर्थ क्रिया नसल्यामुळें समानकर्तृक म्हणतां येत नाहीं. म्हणून सन्प्रत्यय होत नाहीं. पुत्रम् हें इच्छाक्रियेच्या द्वारानें समानकर्तृक आहे, तरी तसें परंपरेनें समानकर्तृकत्व घेण्यास प्रमाण नाहीं.

९. कारण येथें आसितुम् या सुबन्ताचा अर्थ क्रियाच आहे. आणि ती बसणें ही क्रियाच इच्छेचें कर्म आहे. शिवाय येथें क्यच्प्रत्ययाची प्राप्ति नाहीं, कारण मकारान्त अव्ययाहून त्याचा निषेध केला आहे (३।१।८, वा. १).

न्यते। अवश्यं चैतदेवं विज्ञेयम्। यो हि मन्यतेऽयोग्ये तस्मिंस्तेन भवितव्यमिति क्रियमाणेऽपि तस्य धातुग्रहण इह प्रसज्येत संगतमिच्छति देवदत्तो यज्ञदत्तेनेति ॥

**कर्मसमानकर्तृकग्रहणानर्थक्यं चेच्छाभिधाने प्रत्ययविधानात् ॥६॥**

कर्मसमानकर्तृकग्रहणं चानर्थकम्। किं कारणम्। इच्छाभिधाने प्रत्ययविधानात्। इच्छायामभिधेयायां सन्विधीयते ॥

**अकर्मणो ह्यसमानकर्तृकाद्वानभिधानम् ॥ ७ ॥**

इच्छायामभिधेयायां सन्विधीयते न चाकर्मणोऽसमानकर्तृकाद्वोत्पद्यमानेन सनेच्छाया अभिधानं स्यात्। अनभिधानात्तत उत्पत्तिर्न भविष्यति ॥

**अङ्गपरिमाणार्थं तु ॥ ८ ॥**

अङ्गपरिमाणार्थं तर्ह्यन्यतरत्कर्तव्यं कर्मग्रहणं धातुग्रहणं वा। अङ्गपरिमाणं

---

येतो. अर्थात् इच्छेशीं समानकर्तृकत्व हा अर्थ येथें गम्यमान होत नसल्यामुळें सन्प्रत्यय होत नाहीं. आणि असें तर अवश्य गृहीत धरलेंच पाहिजे. 'समानकर्तृकत्व योग्य नसतांही सन्प्रत्यय होतो' असें जो समजतो त्याच्या मतानें सूत्रामध्यें धातुशब्द घातला तरी देखील संगतमिच्छति देवदत्तो यज्ञदत्तेन येथें सम् या उपसर्गाच्या पुढील गम्धातूच्या पुढें सन्प्रत्यय होऊं लागेल[१०].

(वा.६) सूत्रांतील कर्मणः आणि समानकर्तृकात् हा शब्द व्यर्थ होत आहे.

काय कारण ?

कारण असें की इच्छा हा अर्थ दाखवावयाचा असतां येथें सन्प्रत्ययाचें विधान केलें आहे.

(वा.७) तेव्हां जो त्या इच्छेचें कर्म नव्हे किंवा समानकर्तृक नव्हे अशा अर्थाच्या धातूहून पुढें केलेल्या सन्प्रत्ययानें इच्छा दाखविली जातच नाहीं, म्हणून तसल्या धातूच्या पुढें आपोआपच सन्प्रत्यय उत्पन्न होणार नाहीं[११].

(वा.८) तर अंगसंज्ञा केवढ्याला करावी तें समजण्याकरितां धातोः किंवा कर्मणः यांपैकीं कोणता तरी एक शब्द घालावयास पाहिजे.

पण त्यांतल्या त्यांत कोणता शब्द घालणें जास्त फायद्याचें आहे ?

धातोः हा शब्द घालणेंच जास्त फायद्याचें आहे. कारण धातूच्या मागें उपसर्ग

---

१०. यज्ञदत्ताबरोबर मैत्री इच्छितो असें म्हटलें असतां तेथें आपली किंवा दुसऱ्याची (मैत्री) असा संशय येतो. तेथें आपलीच असें निश्चित ठरवितां येत नाहीं. तेथें सन्प्रत्यय होत नाहीं. आतां जेथें त्या मैत्रीला आत्मकर्तृकत्व निश्चित ठरवितां येतें तेथें सन्प्रत्यय होतोच; जसें:—संजिगंसते वत्सो मात्रा. येथें वत्स आणि माता हे शब्द परस्परसापेक्ष असल्यामुळें प्रत्यासत्तिन्यायानें तो वत्स स्वतःचेंच संगत करूं इच्छितो, असा अर्थ मनांत येतो.

११. इच्छेला कर्म हें नियत असलच पाहिजे. तेव्हां कर्माविषयीं आकांक्षा उत्पन्न झाली असतां ज्या धातूहून सन् करावयाचा त्या धातूचा अर्थच कर्म म्हणून सहजच मनांत येतो; जसें:—ही कन्या मातृमुखी आहे असें म्हटलें असतां तेथें त्या कन्येचीच आई मनांत येते तसेंच हें होय. तसेंच कोणत्याही क्रियेला कर्ता हा असावयाचाच. तेव्हां ज्या धातूहून सन् करावयाचा त्या धातूचा कर्ता कोण असावा, अशी आकांक्षा उत्पन्न झाली असतां इच्छेचा जो कर्ता तोच त्या धातूचाही कर्ता असावा, असें सहजच मनांत येतें. तेव्हां जी क्रिया इच्छेची कर्म नव्हे किंवा समानकर्तृक नव्हे अशा ठिकाणीं तसा अर्थ सन्प्रत्ययानें दाखविला जात नसल्यामुळें अर्थातच तशा ठिकाणीं सन्प्रत्यय उत्पन्न होणार नाहीं.

ज्ञास्यामीति ॥ किं पुनरत्र ज्यायः । धातुग्रहणमेव ज्यायः । अङ्गपरिमाणं चैव विज्ञातं भवत्यपि च धातोर्विहितः प्रत्ययः शेष आर्धधातुकसंज्ञो भवतीति सन आर्धधातुकसंज्ञा सिद्धा भवति ॥

यच्चाप्येतदुक्तं कर्मग्रहणात्सन्विधौ धातुग्रहणानर्थक्यं सोपसर्गं कर्मेति चेत्कर्मविशेषकत्वादुपसर्गस्यानुपसर्गं कर्म सोपसर्गस्य हि कर्मत्वे धात्वधिकारेऽपि सनोऽविधानकर्मत्वादिति स्वपक्षोऽनेन वर्णितः । युक्तमिह द्रष्टव्यं किं न्याय्यं कर्मेति । एतच्चात्र युक्तं यत्सोपसर्गं क स्यात् । ननु चोक्तं सोपसर्गस्य हि कर्मत धात्वधिकारेऽपि सनोऽविधानमकर्मत्व दिति । नैष दोषः । कर्मण इति नै धातुसमानाधिकरणा पञ्चमी । कर्म धातोरिति । किं तर्हि । अवयवयोगे षष्ठी । कर्मणो यो धातुरवयव इति यद्यवयवयोगैषा षष्ठी केवलादुत्पत्ति प्राप्नोति । चिकीर्षति जिहीर्षतीति । एषोऽ व्यपदेशिवद्भावेन कर्मणो धातुरवयव भवति ॥ कामं तर्ह्यनेनैव हेतुना क्यजा

असला तरी तो वगळून धातूलाच अंगसंज्ञा होते हें कळून येतें. आणि धातोः हा शब्द उच्चारून सांगितलेल्या आणि तिङ्शिद्भिन्न अशा प्रत्ययाला आर्धधातुकसंज्ञा होते (३।४।११४) असें सांगितलें असल्यामुळें या सन्प्रत्ययाला आर्धधातुकसंज्ञा होते हेंही कळून येतें.

आतां, 'सन्विधीचे ठिकाणीं कर्मणः हा शब्द घातला असल्यामुळें धातोः हा शब्द फुकट आहे, 'उपसर्गविशिष्ट धातूही कर्मवाचक होऊं शकतो' असें म्हणणें असेल तर उपसर्ग हा वाचक नसून केवळ क्रियाविशेषाचा द्योतक आहे, म्हणून केवळ धातुच कर्मवाचक होतो, उपसर्ग आणि धातु मिळून कर्मवाचक मानला तर सूत्रामध्यें धातोः असें म्हटलें तरी केवळ धातुकर्म नसल्यामुळें त्याहून सन्प्रत्यय होणार नाहीं,' असें जें पूर्वी (वा. १,२,३) सांगितलें तें त्यानें केवळ आपलें मत मांडलें आहे. पण उपसर्गविशिष्ट धातु किंवा केवळ धातु यांमध्यें न्याय्य रीतीनें कोणाला कर्मवाचक म्हणावें हें आपणच ठरविलें पाहिजे. तर मग आतां उपसर्गविशिष्ट धातूलाच कर्मवाचक म्हणणें योग्य होय[१२].

पण उपसर्गविशिष्ट धातूला कर्मवाचक गृहीत धरलें तर धातोः असें म्हटलें त देखील केवळ धातूहून सन्प्रत्यय कर येणार नाहीं, असा दोष दाखविला आहे ना

हा दोष येऊं शकत नाहीं. कारण कर्म हें धातूचें विशेषण आहे, असें दाखविणा कर्मणः ही पंचमी नव्हे, तर अवयवार्थक ष आहे. तेव्हां कर्मार्थप्रतिपादक शब्दाचा अ यव जो धातु त्याहून, असा अर्थ झाल्यामु प्राचिकीर्षत् येथें प्रकृ एवढ्याला कर्मप्रति पादकत्व असलें तरी केवळ धातूहून स प्रत्यय होईल.

पण जर कर्मणः ही अवयवार्थक ष मानली तर मुळींच उपसर्ग नसतांना चिक र्षति, जिहीर्षति, येथें केवळ धातूहून सन्प्रत्य प्राप्त होणार नाहीं.

हाही कृधातु व्यपदेशिवद्भावानें कर्मा प्रतिपादक शब्दाचा अवयव होऊं शकत म्हणून हाही दोष येत नाहीं.

तर मग याच कारणावरून महान्तं पु मिच्छति येथें कर्मार्थप्रतिपादक शब्दा

१२. उपसर्ग असेल तेथें इच्छेचें कर्म म्हणून जी विशिष्ट क्रिया घेतली जाते त्या विशिष्ट क्रियेचा वाचक जरी केवळ धातु असला आणि उपसर्ग हा फक्त द्योतक असला तरी ती विशिष्ट क्रिया उपस आणि धातु मिळून प्रकाशित होते, म्हणून कर्मा प्रतिपादकत्व उपसर्गसहित धातूला मानणें योग्य हो

कर्तव्यः । महान्तं पुत्रमिच्छतीति । कर्मणो यत्सुबन्तमवयव इति । न कर्तव्यः। असामर्थ्यान्न भविष्यति । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति ॥

**वावचनानर्थक्यं च तत्र नित्यत्वात्सनः ॥ ९ ॥**

वावचनं चानर्थकम् । किं कारणम् । तत्र नित्यत्वात्सनः । इह द्वौ पक्षौ वृत्तिपक्षश्चावृत्तिपक्षश्च । स्वभावतश्चैतद्भवति वाक्यं च प्रत्ययश्च । तत्र स्वाभाविके वृत्तिविषये नित्ये प्रत्यये प्राप्ते वावचनेन किमन्यच्छक्यमभिसंबन्द्धुमन्यदतः संज्ञायाः । न च संज्ञाया भावाभावाविष्येते। तस्मान्नार्थो वावचनेन ॥

**तुमुनन्ताद्वा तस्य च लुग्वचनम्॥१०॥**

तुमुनन्ताद्वा सन्वक्तव्यस्तस्य च तुमुनो लुग्वक्तव्यः । कर्तुमिच्छति चिकीर्षति ॥

**लिङुत्तमाद्वा ॥११॥**

लिङुत्तमाद्वा सन्वक्तव्यस्तस्य च लिङो लुग्वक्तव्यः । कुर्यामितीच्छति चिकीर्षति ।

**आशङ्कायामचेतनेषूपसंख्यानम् ॥१२॥**

आशङ्कायामचेतनेषूपसंख्यानं कर्तव्यम् । अश्मा लुलुठिषते । कूलं

---

अवयवभूत जें पुत्र+अम् हें सुबन्त त्याहूनही पथेच्छ क्यच्प्रत्यय करावा असें होईल.

तसें करतां येणार नाहीं. कारण तेथें सामर्थ्य नसल्यामुळें क्यच्प्रत्यय होणार नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं?

इतरांविषयीं सापेक्ष असलेलें तें समर्थ असूं शकत नाहीं[१३], असें वचन आहे.

(वा. ९) सूत्रामध्यें जो वाशब्द घातला आहे त्याचाही उपयोग होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की वृत्तीविषयीं सन् नित्यच होतो. येथें लोकामध्यें किंवा शास्त्रामध्यें दोन पक्ष आहेत. पैकीं एक वृत्तिपक्ष आणि दुसरा वाक्यपक्ष. हे दोन्ही पक्ष स्वाभाविक आहेत. तेथें स्वाभाविक वृत्तिविषयामध्यें सन्प्रत्यय नित्यप्राप्त असतां वाशब्दाचा प्रत्ययसंज्ञेवांचून दुसऱ्या कोणाशीं बरें संबंध होईल? आणि प्रत्ययसंज्ञेचा तर विकल्प मुळींच इष्ट नाहीं. तात्पर्य, वाशब्द घातला तो व्यर्थच आहे[१४].

(वा. १०) किंवा तुमुन्प्रत्ययाहून विकल्पानें सन्प्रत्यय होतो आणि त्या तुमुन्प्रत्ययाचा लुक् होतो असें वचन करावें; जसें:— कर्तुमिच्छति चिकीर्षति.

(वा. ११) उत्तमपुरुषविषय जो लिङ् तदन्ताहून विकल्पानें सन्प्रत्यय होतो आणि त्या लिङाचा लुक् होतो, असें वचन करावें; जसें:– कुर्यामितीच्छति चिकीर्षति.

(वा.१२) अचेतन कर्त्याचे ठिकाणीं संभवणारी जी क्रिया तद्वाचक धातूहून स्वार्थीं सन्प्रत्यय होतो, असें वचन करावें; जसें:– अश्मा[१५] लुलुठिषते, कूलं पिपतिषति.

पण 'धातोः कर्मणः' या सूत्रानेंच येथें

---

१३. सुबन्ताहून क्यच्प्रत्ययाचें विधान केलें असल्यामुळें पदविधित्वास्तव समर्थपरिभाषा (२।१।१) उपस्थित होते. तेव्हां पुत्रम् महान्तम् हें विशेषण लागलें असल्यामुळें नुसत्या पुत्रम् याहून क्यच्प्रत्यय करून वृत्ति करतां येणार नाहीं. आतां सन्विधीचे ठिकाणीं समर्थपरिभाषा उपस्थित होत नसल्यामुळें इतर सापेक्ष अशाही धातूहून सन्प्रत्यय उत्पन्न होऊं शकतो.

१४. एकंदरींत 'धातोरिच्छायाम्' एवढेंच सूत्र केलें असतां सर्व इष्ट सिद्ध होतें.

१५. जसें बैलासारख्या बुद्धिमंद मनुष्याला 'अरे हा बैल आहे' असें गौण रीतीनें म्हणतात तसें लोळण घेऊन अडथळा करणाऱ्या मनुष्यासारख्या मध्यें पडलेल्या एखाद्या धोंड्याला उद्देशून गौण रीतीनें अश्मा लुलुठिषते हा प्रयोग होत आहे.

पिपतिषतीति । किं पुनः कारणं न सिध्यति । एवं मन्यते चेतनावत एतद्भवतीच्छेति कूलं चाचेतनम् ॥ अचेतनग्रहणेन नार्थः । आशङ्कायामित्येव । इदमपि सिद्धं भवति श्वा मुमूर्षति ॥

## न वा तुल्यकारणत्वादिच्छाया हि प्रवृत्तित उपलब्धिः ॥१३॥

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । तुल्यकारणत्वात् । तुल्यं हि कारणं चेतनावति देवदत्ते कूले चाचेतने । किं कारणम् । इच्छाया हि प्रवृत्तित उपलब्धिः । इच्छाया हि प्रवृत्तित उपलब्धिर्भवति । योऽप्यसौ कटं चिकीर्षुर्भवति नासावाघ षयति कटं करिष्यामीति । किं तर्हि संनद्धं रज्जुकीलकपूलपाणिं दृष्ट्वा तत इच्छा गम्यते । कूलस्यापि पिपतिषतो लो शीर्यन्ते भिदा जायते देशाद्देशान्तरमु संक्रामति । श्वानः खल्वपि मुमू एकान्तशीलाः शूनाक्षाश्च भवन्ति ॥

## उपमानाद्वा सिद्धम् ॥१४॥

उपमानाद्वा सिद्धमेतत् । कथम् लुलुठिषत इव लुलुठिषते । पिपतिषतीं पिपतिषति ॥ न तिङन्तेनोपमानमस्ति एवं तर्हीच्छेवेच्छा ।

---

सन्प्रत्यय कां बरें होऊं शकत नाहीं?

असें समजतों की इच्छा ही चेतन अशा प्राण्यालाच होत असते. आणि कूल हा पदार्थ तर अचेतन आहे.

आतां या वचनामध्यें अचेतन असा जो शब्द घातला आहे त्याचा कांहीं उपयोग दिसत नाहीं. आशङ्कायाम् एवढेंच करावें. शिवाय असें करण्यानें श्वा मुमूर्षति येथेंही सन्प्रत्यय सिद्ध होतो.

(वा. १३) आशङ्कायाम् हें वचन करावयास नको.

काय कारण?

कारण असें की इच्छा ओळखण्याचें चिन्ह हें देवदत्त वगैरे चेतन आणि कूल वगैरे अचेतन या उभयतांचे ठिकाणीं सारखेंच आहे.

कोणतें बरें तें कारण?

प्रवृत्तीवरून तिच्या पूर्वी असलेली इच्छा ओळखिली जाते. असें पहा की जो चेतन मनुष्य कट करूं इच्छितो तो 'मी कट करणार आहें' अशीं कांहीं दवंडी पिटीत नाहीं, तर दोरी, शस्त्र, कळकाच्या कामट्यांची पे हातांत घेऊन अशा रीतीनें कट करण्याविष सज्ज झालेला पाहून त्याच्या मनांतील बनविण्याची इच्छा ओळखिली जाते. पडायला झालेल्या अशा अचेतन कूलाची ढेंकळें गळून पडतात, भेगा पडून पाप सुटतात व प्रदेशान्तरीं जाऊन पडतात. वरून त्या कूलालाही असलेली पडण्या इच्छा ओळखिली जाईल. तसेंच मरणोन्मु झालेलें कुत्रें देखील एकीकडे जाऊन स्व बसतें व त्याचे डोळे कांहीं चमत्कारिक लागतात. यावरून त्याचीही मरणाची इच्छा ओळखिली जाईल.

(वा. १४) किंवा हा प्रयोग सारखेप मुळें गौण रीतीनें केला आहे असें समजा[15] जसें:—लुलुठिषते इव लुलुठिषते, पिपतिषति पिपतिषति.

पण क्रियापदाचा अर्थ उपमान अ रूपानें प्रतीत होत नाहीं[16].

तर मग सूत्रांतील इच्छाशब्द लक्षणेनें इच्छे सारखी अवस्थिति अशा अर्थाचा समजाव[17]

---

१६. क्रियापदापासून क्रियेची प्रतीति नेहमीं साध्यरूपानेंच होते. आणि सिद्धरूपानें प्रतीत होणाऱ्या वस्तुसंबंधानेंच हें उपमान, हें उपमेय, असें

१७. जेव्हां चेतनाला एखादी क्रिया करण्य इच्छा होते तेव्हां ती क्रिया करण्याच्या आरंभीं त्याची अवस्थिति होते तशी जी अचेतनाची

**सर्वस्य वा चेतनावत्त्वात् ॥१५॥**

अथवा सर्वं चेतनावत् । एवं ह्याह । कंसकाः सर्पन्ति । शिरीषोऽधः स्वपिति । सुवर्चला आदित्यमनुपर्येति । आस्कन्द कपिलकेत्युक्ते तृणमास्कन्दति । अयस्कान्तमयः संक्रामति । ऋषिः पठति । शृणोत ग्रावाणः ॥

इम इषयो बहवः पठ्यन्ते । तत्र न ज्ञायते कस्यायमर्थे सन्विधीयत इति । इषेश्छत्वभाविनः । यद्येवं कर्तुमन्विच्छति कर्तुमन्वेषणा अत्रापि प्राप्नोति । एवं तर्हि यस्य स्त्रियामिच्छेत्येतद्रूपं निपात्यते । कस्य चैतन्निपात्यते । कान्तिकर्मणः ॥

अथेह ग्रामं गन्तुमिच्छतीति कस्य किं कर्म । इषेरुभे कर्मणी । यद्येवं ग्रामं गन्तुमिच्छति ग्रामाय गन्तुमिच्छतीति गत्यर्थकर्मणि द्वितीयाचतुर्थ्यौ न प्राप्नुतः । एवं तर्हि गमेर्ग्रामः कर्मेषेर्गमिः कर्म ।

---

(वा.१५)अथवा सर्व वस्तु चेतनच आहेत. म्हणूनच लोकांमध्यें असें म्हणतात की कवडासे चालतात, शिरीषवृक्ष झोपीं जातो, सुवर्चला[१८] सूर्याला अनुसरते; 'हे कपिलक, आस्कन्द' असें सांगितलें असतां गवत हालचाल करूं लागतें, लोखंड चुंबकाकडे धावतें, वगैरे. वेदही 'शृणोत ग्रावाणः[१९]' असें म्हणतो.

आतां हे इष्धातु बहुत ठिकाणीं पठित [२०]आहेत. त्यांपैकीं कोणत्या इषधातूच्या अर्थी हा सन्प्रत्यय सांगितला आहे, हें कळत नाहीं.

ज्या इष्धातूच्या षकाराला छकार (७।३।७७) होतो त्या इष्धातूच्या अर्थी सन्[२१] होतो.

असें आहे तर कर्तुमन्विच्छति कर्तुमन्वेषणा या अर्थीही सन्[२२] प्राप्त होतो.

तर मग ज्या अर्थाच्या इष्धातूचें इच्छा असें भाववाचक स्त्रीलिंगी नाम निपातित आहे, त्या इष्धातूच्या अर्थी सन् होतो. कोणत्या बरें अर्थाच्या इष्धातूचें इच्छा असें रूप निपातित आहे ?

कान्ति– म्ह. अभिलाष करणें हा ज्याचा अर्थ आहे अशा इष्धातूचें इच्छा असें रूप निपातित आहे.

आतां ग्रामं गन्तुमिच्छति येथें गमन करणें आणि इच्छा करणें या दोन क्रियांपैकीं कोणत्या क्रियेचें कोणतें कर्म समजावयाचें ?

इच्छा करणें या क्रियेचीं ग्राम आणि गमनक्रिया हीं दोन्हीही कर्में होत[२३].

असें आहे तर ग्रामं गन्तुमिच्छति, ग्रामाय गन्तुमिच्छति, येथें 'गत्यर्थकर्मणि०'(२।३।१२) या सूत्रानें गत्यर्थक धातूच्या कर्मापुढें करावयास सांगितलेल्या द्वितीया आणि चतुर्थी या विभक्ति प्राप्त होऊं शकत नाहींत[२४].

तर मग गमन करणें या क्रियेचें ग्राम हें कर्म होय, आणि इच्छा करणें या क्रियेचें

---

१८. जिचें फूल नेहमी सूर्यासंमुख असतें अशी एक प्रकारची लता.

१९. 'हे पाषाणहो, ऐका', असा या वेदवाक्याचा अर्थ आहे. यावरून पाषाणही चेतन आहेत असें सिद्ध होतें.

२०. इष् इच्छायाम् असा तुदादिगणांत आहे, इष गतौ असा दिवादि गणामध्यें आहे आणि इष आभीक्ष्ण्ये असा क्र्यादि गणांत आहे. इच्छति, इष्यति, इष्णाति, अशीं क्रमानें तिघांचीं तीन प्रकारचीं रूपें होतात.

२१. कारण सूत्रामध्यें इच्छायाम् असा छकार केलेला इच्छाशब्द उच्चारला आहे. तेव्हां तुदादिगणांतील इषधातूच्या अर्थी सन्प्रत्यय होतो, असें सिद्ध झालें.

२२. अन्विच्छति हें इषधातूचेंच रूप आहे, आणि त्यालाच छत्व सांगितलें आहे. अन्विच्छति म्हणजे शोधतो. तेव्हां शोधणें या अर्थी सन्प्रत्यय होऊं लागेल.

२३. जो ग्रामगमनाची इच्छा करतो त्यास ग्राम आणि गमन हीं दोन्हीही इष्ट आहेत, केवळ ग्राम किंवा गमन इष्ट नाहीं, म्हणून इच्छतिक्रियेचीं दोन्ही कर्में होत.

२४. कारण ग्राम हें गत्यर्थक धातूचें कर्म नाहीं.

एवमपि इष्यते ग्रामो गन्तुमिति परसाधन उत्पद्यमानेन लेन ग्रामस्याभिधानं न प्राप्नोति । एवं तर्हि गमेर्ग्रामः कर्मेषेरुभे कर्मणी ॥

अथ सनन्तात्सना भवितव्यम् । चिकीर्षितुमिच्छति जिहीर्षितुमिच्छतीति। न भवितव्यम् । किं कारणम् । अर्थगत्यर्थः शब्दप्रयोगः । अर्थं संप्रत्याययिष्यामिति शब्दः प्रयुज्यते । तत्रैकेनोक्तत्वात्तस्यार्थस्यापरस्य प्रयोगेण न भवितव्यम् । किं कारणम् । उक्तार्थानामप्रयोग इति ॥ न तर्हीदानीमिदं भवति एषितुमिच्छति एषिषिषतीति । अस्त्यत्र विशेषः । एकस्यात्रेषेरिषिः साधनं वर्तमानकालश्च प्रत्ययः । अपरस्य बाह्यं साधनं सर्वकालश्च प्रत्ययः ॥ इहापि तर्ह्येकस्येषेः करोतिविशिष्ट इषिः साधनं वर्तमानकालश्च प्रत्ययः । अपरस्य बाह्यं

---

गमनक्रिया हें कर्म होय.

तरीही इष्यते ग्रामो गन्तुम् येथें इष या दुसऱ्या धातूच्या कर्मार्थी केलेल्या लट्प्रत्ययानें त्या क्रियेचें कर्म दाखविलें असलें तरी गम्धातूचें ग्राम हें कर्म दाखविलें जाणार नाहीं.[२५]

तर मग गम्धातूचें ग्राम हें कर्म होय, आणि इष्धातूचें ग्राम आणि गमनक्रिया हीं दोन्ही कर्मे होत.

आतां चिकीर्षितुमिच्छति, जिहीर्षितुमिच्छति, येथें चिकीर्ष इत्यादि सन्प्रत्ययान्त धातूंच्या पुढें पुनः इच्छा या अर्थी सन्प्रत्यय करावयाचा असल्यास करावा असें वाटतें.

पण न करावा.

काय कारण?

अर्थगत्यर्थः शब्दप्रयोगः, अर्थ कळविण्यासाठीं शब्दाचा प्रयोग केला जातो. तेव्हां प्रथमतः केलेल्या सन्प्रत्ययानेंच इच्छा कळविली जाते, म्हणून पुनः दुसऱ्यांदा सन्प्रत्यय करण्याचें कारण उरत नाहीं. तेव्हां 'उक्तार्थानामप्रयोगः' म्ह. जो अर्थ एका शब्दानें कळविला गेला तो अर्थ कळविण्यासाठीं पुनः शब्दप्रयोग करूं नये, या न्यायानें पुनः सन् होत नाहीं.

तर मग आतां एषितुमिच्छति एषिषिषति असा प्रयोग होतें[२६] नाहीं काय?

तसा प्रयोग होतो. कारण तेथें दोन प्रकारच्या निरनिराळ्या इच्छा आहेत. त्यांमध्यें फरक आहे. तो असा की एषितुमिच्छति एषिषिषति येथें सन्प्रत्ययानें दाखविलेली जी इच्छा तिचें इषधातूनें दाखविलेली जी इच्छा हें कर्म आहे. आणि ती सन्प्रत्ययानें दाखविलेली इच्छा वर्तमानकालची आहे, असें सन्प्रत्ययान्त धातूहून पुढें केलेला लट्प्रत्यय दाखवितो. आणि येथें जी इष्धातूनें इच्छा दाखविली जाते तिचें कर्म बाहेरचाच कांहीं तरी पदार्थ आहे. आणि ती इच्छा वर्तमानकालचीच आहे असें नाहीं, तर विवरणवाक्यामधील तुमुन्प्रत्ययसामान्यकाळीं होणार आहे.

तर मग चिकीर्षितुमिच्छति या अर्थीही दुसरा सन्प्रत्यय होऊं लागेल. कारण तेथेंही त्या दुसऱ्या सन्प्रत्ययानें दाखविली जाणारी जी इच्छा तिचें कर्म पहिल्या सन्प्रत्ययानें दाखविलेली कांही तरी करण्याची इच्छा हें होय, आणि ती दुसऱ्या सन्प्रत्ययानें दाखविली जाणारी इच्छा वर्तमानकालची आहे असें पुढील प्रत्ययानें दाखविणें शक्य आहे. आणि तेथें पहिल्या सन्प्रत्ययानें दाखविलेल्या इच्छेचें कर्म कांहीं तरी बाहेरचेंच असणार

---

२५. तेव्हां ग्राम हें कर्म अनुक्त असल्यामुळें त्याहून द्वितीया (२।३।२) होऊं लागेल.

२६. इष्धातूनेंच इच्छा हा अर्थ कळविला गेला असल्यामुळें त्या अर्थी सन्प्रत्यय त्या धातूहून मुळींच होणार नाहीं.

साधनं सर्वकालश्च प्रत्ययः। येनैव खल्वपि हेतुनैतद्वाक्यं भवति चिकीर्षितुमिच्छति जिहीर्षितुमिच्छतीति तेनैव हेतुना वृत्तिरपि प्राप्नोति । तस्मात्सनन्तात्सनः प्रतिषेधो वक्तव्यः । तं चापि ब्रुवतेषिसन इति वक्तव्यम् । भवति हि जुगुप्सिषते मीमांसिषत इति ॥

शैषिकान्मतुबर्थीयाच्छैषिको मतुबर्थिकः ।
सरूपः प्रत्ययो नेष्टः सनन्तान्न सनिष्यते ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य प्रथमे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

व तिचा कालही वर्तमानकालच आहे असें नाहीं. शिवाय जो कांहीं अनेक इच्छांमध्यें भेद मनांत धरून चिकीर्षितुमिच्छति असें वाक्य होतें त्याच कारणामुळें दुसरा सन्प्रत्ययही होऊं लागेल. तेव्हां सन्प्रत्ययान्ताहून पुनः दुसरा सन्प्रत्यय होत नाहीं असा स्पष्ट निषेध सांगितला पाहिजे. आणि त्यांत सुद्धां इच्छार्थी केलेल्या सन्प्रत्ययान्ताहून पुनः इच्छार्थी सन्प्रत्यय होत नाहीं असें म्हटलें पाहिजे. कारण जुगुप्सिषते, मीमांसिषते, येथें स्वार्थी केलेल्या सन्प्रत्ययान्ताहून पुढें इच्छार्थी सन्प्रत्यय इष्ट आहे.

शैषिक प्रत्ययान्ताहून सरूप शैषिक प्रत्यय होणें इष्ट नाहीं. तसेंच मत्वर्थीय प्रत्ययान्ताहून सरूप मत्वर्थीय प्रत्यय होणें इष्ट नाहीं. तसेंच सन्प्रत्ययान्ताहून सरूप सन्प्रत्यय होणें इष्ट नाहीं.

याप्रमाणें भगवान्पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

२७. सन्प्रत्ययनिषेधाच्या प्रसंगानें दुसऱ्याही कांही प्रत्ययांचा निषेध सांगितला आहे. शेषे (४।२।९२) या अधिकारांत सांगितलेले जे प्रत्यय ते शैषिक होत. शालायां भवः शालीयः येथें शालाशब्दाहून भव या अर्थी छप्रत्यय (४।२।११५) झाला आहे. त्या शालीयशब्दाहून पुन्हा भव या अर्थाची विवक्षा असेल तर शालीये भवः असें वाक्यच होतें, छप्रत्यय होत नाही. तसेंच दण्डोऽस्यास्तीति दण्डिकः येथें मत्वर्थी ठन्प्रत्यय (५।२।११५) झाला आहे. त्याहून पुनः मत्वर्थी ठन्प्रत्यय होत नाहीं. तसेंच चिकीर्षितुमिच्छति असें वाक्यच होतें, दुसरा सन्प्रत्यय होत नाहीं.

## सुपं[1] आत्मनः क्यच् ॥३।१।८॥

किमर्थश्चकारः । स्वरार्थः । चितोऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । एकाजयं तत्र नार्थः स्वरार्थेन चकारेणानुबन्धेन । प्रत्ययस्वरेणैव सिद्धम् ॥ विशेषणार्थस्तर्हि । क विशेषणार्थेनार्थः । अस्य च्वौ क्यचि च [७.४.३२;३३] इति । क्ये चेति ह्युच्यमाने अपि काकः श्येनायते अत्रापि प्रसज्येत । नैतदस्ति । तदनुबन्धकग्रहणेऽतदनुबन्धकस्य ग्रहणं नेत्येवमेतस्य न भविष्यति ॥ सामान्यग्रहणाविघातार्थस्तर्हि । क च सामान्यग्रहणाविघातार्थेनार्थः । नः क्ये [१.४.१५] इति ॥

---

(सू.८) येथें क्यच्प्रत्ययाला चकार कशाकरितां जोडला आहे ?

स्वरासाठी. 'चितः' (६।१।१६३), चित्-प्रत्ययाचा अन्त उदात्त होतो, या सूत्रानें अन्तोदात्त होण्यासाठीं चकार जोडला आहे.

चकार जोडण्याचा हा उपयोग होऊं शकत नाहीं. कारण क्यच् हा प्रत्यय एकाच् आहे. तेव्हां प्रत्ययस्वरानेंच क्यच्प्रत्ययाला आद्यु[2]दात्त होईल.

तर क्यप्रत्ययाला 'चकारेत्संज्ञक' असें विशेषण लावतां यावें म्हणून चकार जोडला आहे.

पण तसा विशेषण लावण्याचा कोठें बरें उपयोग आहे ?

'अस्य च्वौ' या सूत्राचा पुढील 'क्यचि च' (७।४।३३) येथें आहे. येथें चकार काढून टाकून 'क्ये च' असें म्हटलें तर अपि काकः श्येनायते येथेंही ईत्व होऊं लागेल[3].

चकार जोडण्याचा हा उपयोग येत नाहीं. कारण 'एकच इत्संज्ञक शब्द सूत्रामध्यें उच्चारला असेल तर तेथें त्या शब्दानें तो आणि दुसरा असे दोन इत्संज्ञक ज्याचे आहेत अशांचें ग्रहण करूं नये' या परिभाषेनें सूत्रांतील क्य या श[4]ब्दानें क्यङ्प्रत्ययाचें ग्रहण होत नसल्यामुळें श्येनायते येथें क्यङ् पुढें असतांना ईत्व होत नाहीं.

तर मग ज्या ठिकाणीं क्यशब्दानें क्यच्, क्यङ्, क्यष्, ह्या सर्वांचें ग्रहण होते तेथें त्याचा विघात न व्हावा यासाठीं चकार जोडला आहे असें समजावें.

क्यशब्दानें क्यच्, क्यष् आणि क्यङ् या स[5]र्वांचें ग्रहण करण्याचा उपयोग कोठें बरें आहे?

'नः क्ये' (१।४।१५) येथें [6]आहे.

---

१. इच्छेचें कर्म असून इच्छेच्या कर्त्याला स्वतःला प्राप्त होणारा जो पदार्थ तद्वाचक सुबन्ताहून इच्छा या अर्थी विकल्पानें क्यच्प्रत्यय होतो; उदा० आत्मनः पुत्रमिच्छति पुत्रीयति.

२. क्यच्प्रत्ययामध्यें अच् एकच असल्यामुळें अन्तोदात्त झाला काय आणि आद्युदात्त झाला काय, एकालाच होणार आहे.

३. तेव्हां चकारेत्संज्ञक असा जो क्यप्रत्यय तो पुढें असतांना मागील अकाराला ईत्व होते असा 'क्यचि च' या सूत्राचा अर्थ होतो. म्हणून श्येनायते येथें क्यङ् (३।१।११) पुढें असतांना ईत्व होत नाही.

४. क्यचि च येथें 'क्ये च' असें सूत्र केलें असतां त्या क्यशब्दानें.

५. क्यच्प्रत्ययाचा चकार काढून टाकला तर ज्या ठिकाणी मूळचेंच सूत्रामध्ये क्य असें उच्चारलें आहे, तेथें क्यशब्दानें एकानुबंधपरिभाषेच्या साहाय्यानें हा चकार काढलेला क्यप्रत्ययच घेतला जाईल आणि ज्यांत क आणि ङ असे दोन अनुबंध आहेत अशा क्यङ्प्रत्ययाचें ग्रहण होणार नाहीं, तेव्हां सामान्यग्रहणाचा बिघाड होईल व चकार जोडला असतां ज्यांत एकटा ककारच अनुबंध आहे, असा क्यशब्द कोठेंही नसल्यामुळें ज्यांत ककार अनुबंध आहे या सामान्य सबबीवर क्यच्, क्यष् आणि क्यङ् या सर्वांचें ग्रहण करण्यांत बिघाड होत नाहीं.

६. येथें क्यष्प्रत्ययाचें ग्रहण होईल. त्याचें उदाहरण मिळत नाहीं ही गोष्ट वेगळी.

अथात्मग्रहणं किमर्थम्। आत्मेच्छायां यथा स्यात्परेच्छायां मा भूदिति। राज्ञः पुत्रमिच्छतीति॥ क्रियमाणेऽपि वा आत्मग्रहणे परेच्छायां प्राप्नोति। किं कारणम्। आत्मन इतीयं कर्तरि षष्ठी। इच्छेत्यकारो भावे। स यद्येवात्मन इच्छत्यथापि परस्यात्मेच्छैवासौ भवति॥ नात्मग्रहणेनेच्छाभिसंबध्यते। किं तर्हि। सुबन्तमभिसंबध्यते। आत्मनो यत्सुबन्तमिति॥ यद्यात्मग्रहणं क्रियते छन्दसि परेच्छायां न प्राप्नोति। मा त्वा वृका अघायवो विदन्। तस्मान्नार्थ आत्मग्रहणेन। इह कस्मान्न भवति राज्ञः पुत्रमिच्छतीति। असामर्थ्यात्। कथमसामर्थ्यम्। सापेक्षमसमर्थं भवतीति। छन्दस्यपि तर्हि न प्राप्नोति। मा त्वा वृका अघायवो विदन्। अस्त्यत्र विशेषः। अन्तरेणाप्यत्र तृतीयस्य पदस्य प्रयोगं परेच्छा गम्यते। कथं पुनरन्तरेणाप्यत्र तृतीयस्य पदस्य प्रयोगं परेच्छा गम्यते। ते चैव हि वृका एव-

---

आतां येथें आत्मनः हा शब्द कशाकरितां घातला आहे?

आपली स्वतःची इच्छा दाखवावयाची असतां क्यच्प्रत्यय व्हावा आणि पराची इच्छा दाखवावयाची असतां क्यच् होऊं नये याकरितां घातला आहे; जसेः—राज्ञः पुत्रमिच्छति देवदत्तः.

पण आत्मनः हा शब्द घातला तरी देखील परेच्छा असतां क्यच्प्रत्यय प्राप्त होतोच.

काय कारण?

कारण असें की इच्छाशब्दामध्यें श प्रत्यय भावे (३।३।१०१) केला आहे. अर्थात् आत्मशब्दापुढील षष्ठी त्या इच्छेचा कर्ता या अर्थाला दाखविते. तेव्हां 'आत्मनः इच्छायाम्' याचा आपल्याला इच्छा झाली असतां इतकाच अर्थ ठरतो. तेथें आपल्याला पुत्राची इच्छा तो करो किंवा परक्याला पुत्राची इच्छा करो, पण इच्छा ही त्यालाच झालेली आहे.

हा दोष येत नाहीं. कारण आत्मनः याचा इच्छेकडे अन्वय करावयाचा नाहीं.

तर कोणाकडे करावयाचा?

आत्मनो यत्सुबन्तम् असा अर्थाच्या द्वारानें सुबन्ताकडे आत्मनः याचा अन्वय करावयाचा आहे.

पण अशा अर्थाचा जर आत्मनः हा शब्द घातला असेल तर वेदामध्यें 'मा त्वा वृका अघायवः' येथें परस्य अघमिच्छति अशी परेच्छा असतां क्यच्प्रत्यय प्राप्त होणार नाहीं. सबब आत्मनः हा शब्द घालण्यांत फायदा दिसत नाहीं.

पण आत्मनः हा शब्द घातला नाहीं तर राज्ञः पुत्रमिच्छति येथें कां बरें क्यच्प्रत्यय होत नाहीं?

सामर्थ्य नाहीं म्हणून होत नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं?

सापेक्ष असल तें समर्थ समजूं नये असा निषेध आहे.

तर मग वेदामध्येंही 'मा त्वा वृका अघायवो विदत्' येथें क्यच् होणार नाहीं.

राज्ञः पुत्रम् यापेक्षां अघायवः येथें थोडा फरक आहे. तो असा की अघमिच्छति म्हणजे पातकाची इच्छा करतो असें म्हटल्याबरोबर तेथें शत्रूला असा तिसऱ्या पदाचा प्रयोग केल्यावांचूनही येथें परक्याला पातकाची इच्छा करतो असें मनांत येतें.

---

७ तेव्हां पुत्रम् या सुबन्ताकडे कर्त्याचा संबंध होत असल्यामुळें 'राजाला पुत्र व्हावा' अशी इच्छा देवदत्ताला झाली असेल तेथें क्यच्प्रत्यय होत नाहीं.

८. वृत्तीमध्यें प्रविष्ट होणारें पुत्रम् हें सुबन्त वृत्तीच्या बाहेरील राज्ञः या पदानें संबद्ध झालें असल्यामुळें तेथें तें सुबन्त सापेक्ष होत आहे.

मात्मका हिंस्राः कश्चात्मनोऽघमेषितुमर्हति। अतोऽन्तरेणाप्यत्र तृतीयस्य पदस्य प्रयोगं परेच्छा गम्यते। यथैव तर्हि च्छन्दस्यघशब्दात्परेच्छायां क्यज्भवत्येवं भाषायामपि प्राप्नोति। अघमिच्छतीति। तस्मादात्मग्रहणं कर्तव्यम्। छन्दसि कथम्। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवति च्छन्दस्यघशब्दात्परेच्छायां क्यजिति यदयमश्वाघस्यात् [७.४.३७] इति क्यचि प्रकृत ईत्वबाधनार्थमाकारं शास्ति॥

अथ सुब्ग्रहणं किमर्थम्। सुबन्तादुत्पत्तिर्यथा स्यात्प्रातिपदिकान्मा भूदिति। नैतदस्ति प्रयोजनम्। नास्त्यत्र विशेषः सुबन्ताद्वोत्पत्तौ सत्यां प्रातिपदिकाद्वा। अयमस्ति विशेषः। सुबन्तादुत्पत्तौ सत्यां पदसंज्ञा सिद्धा भवति प्रातिपदिकात्पुनरुत्पत्तौ सत्यां पदसंज्ञा न प्राप्नोति। ननु च प्रातिपदिकादप्युत्पत्तौ सत्यां पदसंज्ञा सिद्धा। कथम्। आरभ्यते नः क्ये [१.४.१५] इति। तच्चावश्यं कर्तव्यं सुबन्तादुत्पत्तौ सत्यां नियमार्थम्। तदेव प्रातिपदिकादुत्पत्तौ सत्यां विध्यर्थं भविष्यति॥

---

तिसऱ्या पदाचा प्रयोग केल्याखेरीज परेच्छा कशी बरें मनांत येते?

वृक् म्ह. लांडगा. लांडगे हे प्राणी हिंस्र स्वभावाचे दुसऱ्याला दुःख देणारे प्रसिद्ध आहेत, आणि कोणताही प्राणी आपल्याला दुःखाची इच्छा करीत नाहीं. तेव्हां पातकाची म्हणजे दुःखाची इच्छा करतो असें म्हटल्याबरोबर अमक्याला असा विशेष शब्द नसला तरी दुसऱ्या कोणाला तरी हें सहजच मनांत येतें.[१]

तर मग ज्याप्रमाणें वेदामध्यें अघशब्दाच्या पुढें परेच्छा असतांही क्यच्प्रत्यय होतो त्याप्रमाणें भाषेमध्येंही परेच्छा असतां अघशब्दापुढें क्यच्प्रत्यय होऊं लागेल. तात्पर्य, त्यासाठीं आत्मनः हा शब्द सूत्रामध्यें घातला पाहिजे.

पण आत्मनः हा शब्द घातला तर वेदामध्यें परेच्छा असतां अघायन्तः येथें क्यच्प्रत्यय कसा बरें साधावा?

ज्यापेक्षां हे पाणिनिआचार्य 'अश्वाघस्यात्' (७।४।३७) या सूत्रानें क्यच् पुढें असतां प्राप्त झालेल्या ईत्वाच्या बाधासाठीं अश्व, अघ, या शब्दांना वेदांमध्यें आकारादेश सांगत आहेत त्यापेक्षां वेदामध्यें परेच्छा असतांही अघशब्दाहून क्यच्प्रत्यय होतो असें सुचवीत आहेत.

आतां येथें सुपः हा शब्द कशाकरितां घातला आहे?

सुबन्ताहून क्यच्प्रत्यय व्हावा आणि प्रातिपदिकाहून होऊं नये याकरितां घातला आहे.

हा सुपः याचा उपयोग नाहीं. कारण सुबन्ताहून क्यच्प्रत्यय झाला काय आणि प्रातिपदिकाहून झाला काय यांत कांही फरक नाहीं.

यांत फरक आहे तो असाः– सुबन्ताहून क्यच् झाला असता त्या सुपाचा लुक् झाला तरी पदसंज्ञा (१।४।१४) सिद्ध होते, आणि प्रातिपदिकाहून क्यच्प्रत्यय झाला तर क्यचाच्या प्रकृतीला पदसंज्ञा प्राप्त होत नाहीं.

पण प्रातिपदिकाहून क्यच्प्रत्यय झाला तरी देखील क्यचाच्या प्रकृतीला पदसंज्ञा साधत आहे.

ती कशी?

क्यप्रत्यय पुढें असतां त्याच्या प्रकृतीला पदसंज्ञा होण्यासाठीं 'नः क्ये' हें सूत्र आरंभिलें आहे. आणि तें सूत्र तर अवश्य आरंभिलेंच पाहिजे. कारण सुबन्ताहून क्यच्प्रत्यय झाला असतांही क्यप्रत्यय पुढें असतांना फक्त नकारान्तालाच पदसंज्ञा होते असा नियम झाला पाहिजे. तेंच

---

१. तेव्हां वृत्तीमध्यें प्रविष्ट होणारा अघ हा शब्द वृत्तीच्या बाहेरील कोणत्याही पदाशीं संबद्ध नसल्यामुळें तो असमर्थ समजला जात नाहीं.

इदं तर्हि प्रयोजनं सुबन्तादुत्पत्तिर्यथा स्याद्धातोर्मा भूदिति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। धातोः सन्विधीयते स बाधको भविष्यति। अनवकाशा हि विधयो बाधका भवन्ति सावकाशश्च सन्। कोऽवकाशः। परेच्छा। न परेच्छायां सना भवितव्यम्। किं कारणम्। समानकर्तृकादित्युच्यते यावच्चेहात्मग्रहणं तावत्तत्र समानकर्तृकग्रहणम्॥ इदं तर्हि प्रयोजनं सुबन्तादुत्पत्तिर्यथा स्याद्वाक्यान्मा भूदिति। महान्तं पुत्रमिच्छतीति। न वा भवति महापुत्रीयतीति। भवति यदैतद्वाक्यं भवति महान्पुत्रो महापुत्रः महापुत्रमिच्छति महापुत्रीयतीति। यदा त्वेतद्वाक्यं भवति महान्तं पुत्रमिच्छतीति तदा न भवितव्यं तदा च प्राप्नोति। तदा मा भूदिति॥ अथ क्रियमाणेऽपि सुब्ग्रहणे कस्मादेवात्र न भवति। सुबन्तं ह्येतद्वाक्यम्। नैतत्सुबन्तम्। कथम्। प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति॥

---

सूत्र आतां प्रातिपदिकाहून क्यच्प्रत्यय झाला असतां नकारान्ताला अप्राप्तपदसंज्ञेचें विधायक होईल.

तर मग आतां सुपः हा शब्द घालण्याचा असा उपयोग समजावा की सुबन्ताहूनच क्यच् प्रत्यय व्हावा, आणि धातूहून क्यच् होऊं नये.

हाही उपयोग संभवत नाहीं. कारण धातूहून सन्प्रत्यय सांगितला आहे, तो क्यचाचा बाध करील.

पण अनवकाश असे विधि सावकाशाचा बाध करतात, सावकाश विधि दुसऱ्याचा बाध करीत नाहींत; आणि हा सन्विधि तर सावकाश आहे.

तो अवकाश कोठें बरें आहे?

परेच्छा[१०] असतांना अवकाश आहे.

पण परेच्छा असतांना तेथें सन्प्रत्यय होऊं नये.

काय कारण?

कारण असें की समानकर्तृकात् म्ह. इच्छेचा जो कर्ता तोच ज्या क्रियेचा कर्ता आहे, त्या क्रियेच्या वाचक धातूहून, असें म्हटलें आहे. म्हणजे या प्रकृत सूत्रामध्यें आत्मनः हा शब्द ज्या हेतूनें घातला आहे त्याच हेतूनें सन्विधायक सूत्रामध्यें समानकर्तृकात् हा शब्द घातला आहे.

तर सुबन्ताहून क्यच्प्रत्यय व्हावा आणि वाक्याहून होऊं नये हा सुप्शब्द घालण्याचा उपयोग समजावा; जसें:– महान्तं पुत्रमिच्छति येथें क्यच्प्रत्यय होत नाहीं.

तर मग महापुत्रीयति असा प्रयोग होतच नाहीं काय?

असा प्रयोग होतो. पण जेव्हां महान् पुत्रो महापुत्रः, महापुत्रमिच्छति, असें वाक्य असेल तेव्हा महापुत्रीयति असा प्रयोग होतो. आणि जेव्हा महान्तं पुत्रमिच्छति असें वाक्य असेल तेव्हा क्यच्प्रत्यय होत नाहीं. आणि येथें सुपः असें म्हटलें नाहीं तर तेथेंही जो क्यच्प्रत्यय प्राप्त होतो तो न व्हावा यासाठीं सुपः असा शब्द घातला आहे.

आतां सुपः हा शब्द घातला तरी देखील कां बरें महान्तं पुत्रमिच्छति येथें क्यच्प्रत्यय होत नाही? कारण महान्तं पुत्रं हें वाक्य सुबन्त[११] आहेच.

हें वाक्य सुबन्त होऊं शकत नाहीं.

---

१०. प्रकृत सूत्रामध्यें आत्मनः असा शब्द आहे तसा सन्प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें घातलेला नाहीं. म्हणून शिष्याः पठन्तु इतीच्छति गुरुः अशी परकीय क्रियेची इच्छा असेल तेथें सन्प्रत्यय होण्यास हरकत नाहीं, असें येथें शंकाकार गृहीत धरीत आहे.

११. कारण पुत्रशब्दाहून केलेला अम् हा सुप्प्रत्यय 'महान्तं पुत्रम्' या समुदायाच्या शेवटीं आहेच.

अथ यदत्र सुबन्तं तस्मादुत्पत्तिः कस्मान्न भवति ।

## समानाधिकरणानां सर्वत्रावृत्तिरयोगादेकेन ।

समानाधिकरणानां सर्वत्रैव वृत्तिर्न भवति । क सर्वत्र । समासविधौ प्रत्ययविधौ च । समासविधौ तावत् । ऋद्धस्य राज्ञः पुरुषः । महत्कष्टं श्रित इति । प्रत्ययविधौ । ऋद्धस्योपगोरपत्यम् । महान्तं पुत्रमिच्छतीति ॥ किं पुनः कारणं समानाधिकरणानां सर्वत्र वृत्तिर्न भवति । अयोगादेकेन । न ह्यत्रैकेन पदेन योगो भवति । इह तावदृद्धस्य राज्ञः पुरुष इति षष्ठ्यन्तस्य सुबन्तेन सामर्थ्ये सति समासो विधीयते । यच्चात्र षष्ठ्यन्तं न तस्य सुबन्तेन सामर्थ्यं यस्य च सामर्थ्यं न तत्षष्ठ्यन्तं वाक्यं तत् । ऋद्धस्योपगोरपत्यमिति च षष्ठीसमर्थादपत्येन योगे प्रत्ययो विधीयते । यच्चात्र षष्ठीसमर्थं न तस्यापत्येन योगो यस्य चापत्येन योगो न तत्ष-

---

कां बरें ?

'प्रत्ययबोधक शब्दानें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल त्या प्रकृतीला आरंभ करूनच जो समुदाय त्याचें ग्रहण करावयाचें', अशी परिभाषा आहे म्हणून.[१२]

तरी पण त्या वाक्यामध्यें जेवढ्या समुदायाला सुबन्त म्हणतां येतें तेवढ्याहून क्यच्प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

जीं अनेक पदें भिन्न भिन्न रूपानें एकाच अर्थाला दाखवितात तीं पदें परस्पराशीं समानाधिकरण समजलीं जातात. त्यांपैकीं कोणत्याही एका पदाची त्यांतील इतर पदें सोडून भलत्याच शब्दाबरोबर कोणतीच वृत्ति होत नाहीं.

कोणतीच वृत्ति म्हणजे काय ?

समासवृत्ति होत नाहीं, आणि तद्धित वगैरे प्रत्यय करून होणारी वृत्तिही होत नाहीं. त्यापैकीं समासवृत्तीचें उदाहरणः—ऋद्धस्य राज्ञः पुरुषः, महत् कष्टं श्रितः; प्रत्यय करून होणाऱ्या वृत्तीचें उदाहरणः— ऋद्धस्य उपगोरपत्यम् महान्तं पुत्रमिच्छति.

पण समानाधिकरण पदांपैकीं कोणत्याही पदाची भलत्या शब्दाबरोबर कोणतीच वृत्ति होत नाहीं, याचें काय बरें कारण ?

त्या समानाधिकरणपदांपैकीं कोणत्याही एका पदाचा भलत्याशीं संबंधच असत नाहीं. असें पहा की ऋद्धस्य राज्ञः पुरुषः येथें राज्ञः या पदाची पुरुषशब्दाबरोबर समासवृत्ति करावयाची. समास तर षष्ठ्यन्ताचा सुबन्ताबरोबर संबंध असेल तर सांगितला आहे. आतां येथें राज्ञः हें जें षष्ठ्यन्त आहे त्या एकट्याचा पुरुषः या सुबन्ताकडे अन्वय नाहीं, आणि ज्या ऋद्धस्य राज्ञः या दोन पदांचा मिळून पुरुषाकडे अन्वय आहे, तें षष्ठ्यन्त नव्हे, तें वाक्यच आहे; म्हणून येथें वृत्ति होत नाहीं. तसेंच ऋद्धस्य उपगोरपत्यम् येथें समजावें. तें असें की अन्वययोग्य अशा षष्ठ्यन्ताहून त्याचा अपत्य या अर्थाशीं योग असतांना तद्धितप्रत्यय (४।१।९२) सांगितला आहे. आतां येथें उपगोः हें जें षष्ठ्यन्त अन्वययोग्य म्हणून घ्यावयाचें त्या एकट्याचा अपत्य या अर्थाशीं योग नाहीं, आणि ज्या ऋद्धस्य उपगोः या दोन पदांचा मिळून अपत्य या अर्थाशीं संबंध आहे तें अन्वययोग्य षष्ठ्यन्त नव्हे; तें वाक्य आहे.

समानाधिकरण अशा अनेक पदांतील कोणत्याही एका पदाची भलत्याशीं वृत्ति होत

---

१२. तात्पर्य, पुत्रशब्दाहून केलेल्या अम्प्रत्ययामुळें पुत्रम् एवढ्याच समुदायाला सुबन्त म्हणतां येईल. त्या समुदायामध्यें पुत्रशब्दाच्या मागील शब्द शिरणार नाहीं.

ष्ठयन्तं वाक्यं तत्॥ समानाधिकरणानामित्युच्यतेऽथ व्यधिकरणानां कथम्। राज्ञः पुत्रमिच्छतीति। एवं तर्हीदं पठितव्यं सविशेषणानां सर्वत्रावृत्तिरयोगादेकेनेति॥

द्वितीयानुपपत्तिस्तु।

द्वितीया तु नोपपद्यते। महान्तं पुत्रमिच्छतीति। किं कारणम्। न पुत्र इषिकर्म। यदि पुत्रो नेषिकर्म न चावश्यं द्वितीयैव। किं तर्हि। सर्वा द्वितीयादयो विभक्तयः। महता पुत्रेण कृतम्। महते पुत्राय देहि। महतः पुत्रादानय। महतः पुत्रस्य स्वम्। महति पुत्रे निधेहि। तस्मान्नैवं शक्यं वक्तुं न पुत्र इषिकर्मेति। पुत्र एवेषिकर्म तत्सामानाधिकरण्यान्महतो द्वितीयादयो भविष्यन्ति॥ वृत्तिस्तर्हि कस्मान्न भवति। सविशेषणानां वृत्तिर्न वृत्तस्य वा विशेषणं न प्रयुज्यत इति वक्तव्यम्। यदि सविशेषणानां वृत्तिर्न वृत्तस्य वा विशेषणं न प्रयुज्यत इत्युच्यते मुण्डयति माणवकमित्यत्र वृत्तिर्न प्राप्नोति। अमुण्डादीनामिति वक्तव्यम्॥ तत्तर्हि वक्तव्यं सविशेषणानां वृत्तिर्न वृत्तस्य वा

---

नाहीं, असें म्हटलें आहे. तेव्हां राज्ञः पुत्रमिच्छति येथें 'राज्ञः पुत्रम्' हीं दोन्ही व्यधिकरणपदें आहेत. तेव्हां त्यांतील पुत्रम् याची क्यच् वगैरेंबरोबर वृत्ति होत नाहीं, हें कसें बरें साधावें?

असें आहे तर 'सविशेषणानां[13] सर्वत्रावृत्तिरयोगादेकेन' असें पठन करावें.

महान्तं पुत्रमिच्छति येथें द्वितीया होणार नाहीं.

काय कारण?

विशेषण सोडून एकट्या पुत्राचा इच्छेशीं संबंध नसल्यामुळें पुत्र हा इच्छेचें कर्म होत नाहीं.

जर केवळ पुत्र हा इच्छेचें कर्म होत नाहीं तर केवळ द्वितीया होणार नाहीं, एवढेंच नव्हे तर द्वितीया वगैरे कोणतीही विभक्ति होणार नाहीं[14]; जसें:– महता पुत्रेण कृतम्, महते पुत्राय देहि, महतः पुत्रादानय, महतः पुत्रस्य स्वम्, महति पुत्रे निधेहि. केवळ प्रातिपदिकार्थाचा त्या त्या क्रियेशीं संबंध नसल्यामुळें ती ती विभक्ति प्राप्त होऊं शकत नाहीं. तेव्हां विशेषण लागलें असेल तशा ठिकाणीं पुत्र हा इच्छेचें कर्म नव्हे असें म्हणणें शक्य नाहीं, तर पुत्रच इच्छेचें कर्म होय, आणि त्याचें सामानाधिकरण्य असल्यामुळें महत् वगैरे विशेषणांहूनही द्वितीया विभक्ति होतील.

तर मग महान्तं पुत्रमिच्छति येथें वृत्ति कां बरें होत नाहीं?

तशा ठिकाणीं वृत्ति न होण्याकरितां विशेषणानें युक्त असा जो पदार्थ त्या एकट्याची भलत्याबरोबर वृत्ति होत नाहीं, आणि वृत्तींत सांपडलेल्याला विशेषण दिलें जात नाहीं, असें म्हटलें पाहिजे.

पण असें म्हटलें तर मुण्डयति माणवकम् येथें मुण्डशब्दाची जी वृत्ति केली आहे ती या नियमावरून प्राप्त होत नाहीं.

'असें आहे तर विशेषण दिलें असेल तेथें एकट्याची वृत्ति करावयाची नाहीं किंवा वृत्तींत सांपडलेल्याला विशेषण लावावयाचें नाहीं,' हा नियम मुण्ड वगैरे

---

१३. शोभन हें पुत्राचें समानाधिकरण विशेषण आहे आणि राज्ञः हें पुत्राचें व्यधिकरण विशेषण आहे. कोणत्याही प्रकारचें विशेषण ज्याला लागलें असेल त्या विशेष्याची तें विशेषण वगळून एकट्याची भलत्या कोणाहीबरोबर वृत्ति होत नाही. कारण भलत्याशीं संबंध हा त्या एकट्या विशेष्याचा नसतो, तर त्या विशेषणासकट त्या विशेष्याचा असतो.

१४. कारण पुत्राला विशेषण लागलें असेल अशा ठिकाणीं तें विशेषण सोडून केवळ पुत्राला कर्ता, करण, संप्रदान, वगैरे कांहीं म्हणतां येत नाहीं.

विशेषणं न प्रयुज्यतेऽमुण्डादीनामिति । न वक्तव्यम् । वृत्तिः कस्मान्न भवति महान्तं पुत्रमिच्छतीति । अगमकत्वात् । इह समानार्थेन वाक्येन भवितव्यं प्रत्ययान्तेन च । यश्चेहार्थो वाक्येन गम्यते महान्तं पुत्रमिच्छतीति नासौ जातुचित्प्रत्ययान्तेन गम्यते महान्तं पुत्रीयतीति । एतस्माद्धेतोर्ब्रूमोऽगमकत्वादिति न ब्रूमोऽपशब्दः स्यादिति । यत्र च गमकत्वं भवति भवति तत्र वृत्तिः । तद्यथा । मुण्डयति माणवकमिति ॥

अथास्य क्यजन्तस्य कानि साधनानि भवन्ति । भावः कर्ता च । अथ कर्म । नास्ति कर्म । ननु चायमिषिः सकर्मको यस्यायमर्थे क्यज्विधीयते । अभिहितं तत्कर्मान्तर्भूतं धात्वर्थः संपन्नो न चेदानीमन्यत्कर्मास्ति येन सकर्मकः स्यात् । कथं तर्ह्ययं सकर्मको भवति अपुत्रं पुत्रमिवाचरति पुत्रीयति माणवकमिति । अस्त्यत्र विशेषः । द्वे अत्र कर्मणी उपमानकर्मोपमेयकर्म च । उपमानकर्मान्तर्भूतमुपमेयेन कर्मणा सकर्मको भवति । तद्यथा । अपि काकः श्येनायत इत्यत्र द्वौ कर्तारावुपमानकर्ता चोपमेयकर्ता च । उपमानकर्तान्तर्भूत उपमेयकर्त्रा सकर्तृको भवति॥ अयं तर्हि कथं सकर्मको भवति मुण्ड-

---

शब्दांना लागू करावयाचा नाहीं, असें वचन करावें.

कांहींच वचन करावयास नको.

तर मग महान्तं पुत्रमिच्छति येथें वृत्ति कां बरें होत नाहीं ?

वृत्तीला बोधकत्व नाहीं म्हणून होत नाहीं. वृत्ति आणि विग्रहवाक्य या उभयतांचा अर्थ सारखा असला पाहिजे असा नियम आहे. तेथें 'महान्तं पुत्रमिच्छति' या वाक्याचा जो अर्थ त्या अर्थाची बोधक महान्तं पुत्रीयति ही वृत्ति होत नाहीं, म्हणून येथें वृत्ति होत नाहीं असें आम्ही म्हणतों. महान्तं पुत्रीयति हा अपशब्द आहे म्हणून अर्थबोधक नाहीं, असें आमचें म्हणणें नाहीं. जेथें वाक्याच्या अर्थाची बोधक वृत्ति असते तेथें म्हणजे मुण्डयति माणवकम् येथें वृत्ति होतेच (३।१।२१).

आतां या क्यजन्त धातूला कोणतीं कोणतीं कारकें असूं शकतात ?

भाव आणि कर्ता हीं दोन कारकें असूं शकतात.

आतां या क्यजन्त धातूला कर्म असूं शकतें कीं नाहीं ?

या धातूला कर्म असूं शकत नाहीं.

पण इषधातूच्या अर्थी क्यच्प्रत्यय सांगितला आहे, आणि इष धातु तर सकर्मक आहे. त्या इच्छेचें कर्म क्यजन्त धातूमध्यें शिरलें असल्यामुळें त्यासकट्च धात्वर्थ बनला आहे. आणि त्यावाचून दुसरें कर्म तर नाहीं की ज्या कर्मामुळें क्यजन्त धातूला सकर्मक असें म्हणतां येईल.

तर मग अपुत्रं पुत्रमिव आचरति पुत्रीयति माणवकम्, येथें आचारार्थक क्यजन्त-धातु कसा बरें सकर्मक होतो ?

या क्यजन्ताविषयीं विशेष आहे. या क्यजन्त धातूचीं दोन कर्में आहेत. पुत्र हें एक उपमानकर्म आणि दुसरें माणवक हें उपमेयकर्म. त्यांपैकीं उपमानकर्म क्यजन्तामध्यें शिरलें तरी न शिरलेल्या उपमेयकर्मामुळें या क्यजन्तधातूला सकर्मक म्हणतां येतें; जसें:— अपि काकः श्येनायते, येथें दोन कर्ते आहेत : श्येन हा उपमानकर्ता एक आणि दुसरा काक हा उपमेयकर्ता. त्यांपैकीं उपमानकर्ता क्यजन्तांत शिरला तरी क्यजन्तांत न शिरलेल्या अशा उपमेयकर्त्यामुळें हा क्यजन्त धातु सकर्तृक होतो.

तरी पण मुण्डयति माणवकम् येथील

**यति माणवकमिति । अत्रापि द्वे कर्मणी सामान्यकर्म विशेषकर्म च । सामान्यकर्मान्तर्भूतं विशेषकर्मणा सकर्मको भवति । ननु च वृत्त्यैवात्र न भवितव्यम्। किं कारणम्। असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । नैष दोषः । नात्रोभौ करोतियुक्तौ मुण्डो माणवकश्च । न हि माणवकत्वं क्रियते । यदा चोभौ करोतियुक्तौ भवतो न भवति तदा वृत्तिः । तद्यथा । बलीवर्दं करोति मुण्डं चैनं करोतीति ॥ कामं तर्ह्यनेनैव हेतुना क्यजपि कर्तव्यः माणवकं मुण्डमिच्छतीति नोभाविषियुक्ताविति । न कर्तव्यः । उभावत्रेषियुक्तौ मुण्डो माणवकश्च । कथम्। न ह्यसौ मौण्ड्यमात्रेण संतोषं करोति माणवकस्थमसौ मौण्ड्यमिच्छति। इहापि तर्हि न प्राप्नोति मुण्डयति माणवकमिति । अत्रापि ह्युभौ करोतियुक्तौ मुण्डो माणवकश्च । न ह्यसौ मौण्ड्यमात्रेण संतोषं करोति माणवकस्थमसौ मौण्ड्यं निर्वर्तयति ॥ एवं तर्हि मुण्डादयो गुणवचनाः । गुणवचनाश्च सापेक्षाः । वचनात्सापे-**

णिजन्त मुण्डि हा धातु सकर्मक कसा समजावा ?

येथेंही मुण्ड हें एक सामान्य कर्म आणि माणवक हें दुसरें विशेष कर्म, अशीं दोन कर्में आहेत. त्यांपैकीं मुण्ड हें सामान्य कर्म णिजन्त धातूमध्यें शिरलें तरी न शिरलेल्या माणवक या विशेष कर्मामुळें मुण्डि हा णिजन्त धातु सकर्मक होतो.

पण मुण्डयति माणवकम् येथें मुळीं वृत्तिच होऊं नये.

काय कारण ?

कारण असें की मुण्डशब्दार्थाचें णिजर्थाबरोबर सामर्थ्य नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

सापेक्ष असेल तर तें समर्थ समजूं नये, असा निषेध आहे[15] म्हणून.

हा दोष येत नाहीं. कारण येथें मुण्ड आणि माणवक ह्या दोघांचा करोतिक्रियेशीं संबंध नाहीं. कारण माणवक कांहीं केला जात नाहीं, तर फक्त तो मुण्ड केला जातो.[16] जेव्हां दोघांचाही करोतिक्रियेशीं संबंध असतो तेव्हां वृत्ति होत नाहीं; जसें:– बलीवर्दं करोति, मुण्डं च एनं करोति.

तर मग मुण्डयति माणवकम् येथें ज्या ह्या कारणावरून मुण्डशब्दाहून णिच्प्रत्यय होतो त्याच कारणावरून माणवकं मुण्डमिच्छति येथें मुण्डशब्दाहून क्यच्प्रत्यय होऊं लागेल.

माणवकं मुण्डमिच्छति येथें क्यच्प्रत्यय प्राप्त होऊं शकत नाहीं. कारण येथें माणवक व मुण्ड असे दोघेही इषिक्रियेनें युक्त आहेत.[17]

ते कसे ?

असे की इषिकर्ता हा येथें कोणाला तरी मुण्ड करून संतुष्ट होत नाहीं, तर तो माणवकालाच मुण्ड करूं इच्छितो, असा अर्थ विवक्षित आहे.

तर मग याच रीतीनें मुण्डयति माणवकम् येथेंही वृत्ति होऊं शकत नाहीं. कारण येथेंही मुण आणि माणवक असे दोघे करोतिक्रियेनें युक्त आहेत. कारण हा केवळ कोणाला

१५. राज्ञः पुत्रमिच्छति येथें जसें सामर्थ्य नाहीं (मागील टीप ८ पहा) तसेंच येथे समजावें.

१६. मौण्ड्य करोति याच अर्थी णिच्प्रत्यय उत्पन्न होतो. मुण्डं करोति माणवकम् या वाक्यामध्यें कर्मत्व फक्त एका मुण्डशब्दार्थालाच आहे. परंतु त्याच्याशी समानाधिकरण्य असल्यामुळे माणवकाहूनही द्वितीया होते. तेव्हां 'अयोगादेकेन' (भा.पृ. ३७ पं. ३-४) हा हेतु येथें संभवत नाहीं.

१७. येथें बलीवर्द हा उत्पन्न केला जात आहे, आणि तो मुंडा केला जात आहे, अशी विवक्षा आहे. (तेव्हां सापेक्षाचें ज्या अर्थाबरोबर सामर्थ्य विवक्षित आहे त्या अर्थाबरोबर अपेक्ष्यमाणाचा अन्वय नसल्यास सापेक्ष समर्थ आहेच असें समजावें.)

क्षाणां वृत्तिर्भविष्यति ॥ अथवा धातव एव मुण्डादयः । न चैव ह्यर्था आदिश्यन्ते क्रियावचनता च गम्यते ॥ अथवा नेदमुभयं युगपद्भवति वाक्यं च प्रत्ययश्च । यदा वाक्यं न तदा प्रत्ययः । यदा प्रत्ययः सामान्येन तदा वृत्तिः । तत्रावश्यं विशेषार्थिना विशेषोऽनुप्रयोक्तव्यः । मुण्डयति । कम् । माणवकमिति । मुण्डविशिष्टेन वा करोतिना तमाप्तुमिच्छति ॥ अथवोक्तमेतन्नात्र व्यापारोऽनुगन्तव्य इति । गमकत्वादिह वृत्तिर्भविष्यति मुण्डयति माणवकमिति ॥

अथेह क्यचा भवितव्यतम् इष्टः पुत्रः इष्यते पुत्र इति ॥ केचित्तावदाहुर्न भवि-

तरी मुण्ड करून संतोष पावत नाहीं, तर माणवकालाच मुण्ड करीत आहे.

तर मग आतां येथें असें समजावें की मुण्ड, मिश्र, इत्यादिक शब्द गुणवचनच आहेत आणि गुणवचन हे शब्द तर गुणीविषयीं सापेक्ष असावयाचेच. असें असतांही ज्या अर्थी त्या शब्दांहून णिच्प्रत्यय सांगितलाच आहे (३।१।२१) त्या अर्थी त्याच्याच जोरावर सापेक्ष अशाही मुण्ड वगैरे शब्दाहून णिच्प्रत्यय होऊन वृत्ति होईल[१८].

अथवा मुण्ड, मिश्र, वगैरे हे धातुच होत. कारण अमुक अर्थाचे हे धातु आहेत असें सांगितलें नाहीं तरी ते क्रियावाचक आहेत असें दिसून येतें[१९] आहे.

किंवा वाक्य आणि वृत्ति या दोन्ही गोष्टी एकदम होऊं शकत नाहींतच. जेव्हां वाक्य तेव्हां प्रत्यय नाहीं, आणि जेव्हा प्रत्यय तेव्हां वाक्य नाहीं[२०].

तेव्हां विशेष विवक्षा न करतां, म्हणजे माणवकाचा संबंध मनांत न घेतां, मोघमच मुण्डशब्दाहून णिच्प्रत्यय होईल. आता तो मुण्ड कोण असा विशेष कळवावयाचा असेल तर मागून खुशाल माणवकशब्दाचा प्रयोग करण्यास हरकत नाहीं; जसें:– मुण्डयति म्ह. भुंडा करतो. कोणाप्रत[२१]? माणवकाप्रत.

अथवा प्रथमतः मुण्डाबरोबर करोतिक्रियेचा संबंध करावयाचा, आणि मागून मुण्डविशिष्ट करोतिक्रियेशीं माणवकाचा संबंध करावयाचा[२२].

अथवा मुण्ड वगैरे शब्द व्यापारवाचक आहेत असें मानूं नये तर ते गुणवाचकच असोत. आतां मुण्डशब्द माणवकसापेक्ष जरी आहे तरी मुण्डं करोति माणवकम् या वाक्यापासून जो अर्थ मनांत येतो तो अर्थ मुण्डयति माणवकम् या वृत्तीपासूनही मनांत येतो, म्हणून वृत्ति होईल[२३], असें मागें (पृ. ३९, पं. ९ ११) सांगितलें आहे.

आतां पुत्रमिच्छति या वाक्याच्या अर्थी पुत्रीयति अशी वृत्ति होते त्याप्रमाणें 'इष्टः पुत्रः' किंवा 'इष्यते पुत्रः' या वाक्यांच्या[२४] अर्थी वृत्ति प्राप्त होते.

१८. क्यच्प्रत्यय मात्र निरपेक्ष अशा 'पुत्रमिच्छति' इत्यादि स्थलीं चरितार्थ असल्यामुळें सापेक्ष अशा 'माणवकं मुण्डमिच्छति' या ठिकाणीं होत नाहीं.

१९. तेव्हां मुण्ड, मिश्र, वगैरे हे सौत्र धातु समजून त्यांहून स्वार्थीं णिच्प्रत्यय 'मुण्डमिश्र०' (३।१।२१) या सूत्रानें होऊन मुण्डयति माणवकम् इत्यादि प्रयोग होतात.

२०. तेव्हां वाक्यामध्यें माणवकाचा प्रयोग असल्यामुळें मुण्डपद सापेक्ष असलें तरी वृत्तीमध्यें सामान्य विवक्षा केली असतां मुण्ड हें पद सापेक्ष नाहीं असें म्हणतां येतें.

२१. मागून विशेषरूपानें माणवकाचा संबंध झाला तरी पूर्वी झालेली वृत्ति कायमच राहते.

२२. आरंभापासून विशेषविवक्षा असली तरी 'माणवकाचा नुसत्या करोतिक्रियेशी संबंध न होतां मुण्ड करणें या विशिष्ट क्रियेशी संबंध व्हावा' अशी विवक्षा असल्यामुळें मुण्डाचा करोतिक्रियेशीं संबंध होतांना माणवकाचा संबंध प्रतीत होत नाहीं, म्हणून मुण्डपद सापेक्ष होत नाही.

२३. तेव्हां महान्तं पुत्रमिच्छति या वाक्यापासून जो अर्थ मनांत येतो तो अर्थ वृत्तीपासून मनांत येत नसल्यामुळें तेथें वृत्ति होत नाहीं.

२४. इष्टः इष्यते येथें कर्म या अर्थी क्तप्रत्यय

तव्यमिति । किं कारणम् । स्वशब्देनोक्तत्वादिति ॥ अपर आहुर्भवितव्यमिति । किं कारणम् । धात्वर्थेऽयं क्यज्विधीयते स च धात्वर्थः केनचिदेव शब्देन निर्देष्टव्य इति ॥ इह भवन्तस्त्वाहुर्न भवितव्यमिति । किं कारणम् । इह समानार्थेन वाक्येन भवितव्यं प्रत्ययान्तेन च यश्चेहार्थो वाक्येन गम्यत इष्टः पुत्रः इष्यते पुत्र इति नासौ जातुचित्प्रत्ययान्तेन गम्यते ॥

**क्यचि मान्ताव्ययप्रतिषेधः ॥१॥**

क्यचि मान्ताव्ययानां प्रतिषेधो वक्तव्यः । इह मा भूत् । इदमिच्छति । किमिच्छति । उच्चैरिच्छति । नीचैरिच्छति ॥

**गोसमानाक्षरनान्तादित्येके ॥२॥**

गामिच्छति गव्यति ॥ समानाक्षरात् । दधीयति मधूयति कर्त्रीयति हर्त्रीयति ॥

---

कांहीं एक वैयाकरण असें म्हणतात की 'इष्टः पुत्रः' किंवा 'इष्यते पुत्रः' या वाक्याच्या अर्थी वृत्ति होऊं नये.

काय कारण ?

कारण असें की क्यच्प्रत्ययान्त पुत्रीय या धातूनेंच कर्म हा[२५] अर्थ उक्त आहे.

अन्य कोणी वैयाकरण असें म्हणतात की वरील वाक्याच्या अर्थी वृत्ति व्हावी.

काय कारण ?

कारण असें की इच्छा या इष्धातूच्या अर्थी हा क्यच्प्रत्यय सांगितला आहे. तो इच्छा हा धात्वर्थ कोणत्याही शब्दानें दाखविण्यास हरकत नाहीं.[२६]

येथें तज्ज्ञ वैयाकरण असें म्हणतात की सदर वाक्याच्या अर्थी वृत्ति होऊं नये.

काय कारण ?

कारण असें की विग्रहवाक्य आणि वृत्ति म्ह. येथें प्रत्ययान्त या उभयतांचा अर्थ सर्व बाजूंनीं सारखा असला पाहिजे, असा नियम आहे. आणि येथें तर जो अर्थ इष्टः पुत्रः, इष्यते पुत्रः, या वाक्यापासून मनांत येतो तो अर्थ पुत्रीयति या प्रत्ययान्त वृत्तीपासून मनांत येत नाहीं.

(वा.१) मकारान्त आणि अव्ययसंज्ञक यांच्या पुढें क्यच्प्रत्यय करूं नये, असें वचन करावें, इदम् इच्छति, किम् इच्छति, उच्चैरिच्छति, नीचैरिच्छति, येथें क्यच्प्रत्यय होऊं नये म्हणून.

(वा.२) गोशब्द, समानाक्षर शब्द आणि नकारान्त शब्द यांहून क्यच्प्रत्यय होतो असें क्यच्विधायक सूत्र करावें, असें कोणी म्हणतात; जसें:– गामिच्छति गव्यति. समानाक्षरा[२७]चें उदाहरण:– घटीयति, दधीयति, मधूयति, कर्त्रीयति. नकारान्ताचें उदा०:– राजीयति,

---

आणि लट्प्रत्यय केला जातो. तेव्हां त्याप्रमाणें पुत्रीय या क्यच्प्रत्ययान्त धातूहून कर्म या अर्थींही प्रत्यय प्राप्त होतो. पुत्रीयति या कर्तरिप्रयोगाप्रमाणें कर्मणि प्रयोग होईल किंवा नाहीं असा अभिप्राय आहे.

२५. प्राणधारण करणें हा जीव्धातूचा अर्थ आहे. तेव्हां प्राण हें कर्म धात्वर्थामध्येंच प्रविष्ट झाल्यामुळें जीव हा धातु अकर्मक होतो. तसाच येथें 'पुत्राची इच्छा करणें' एवढा क्यच्प्रत्ययान्त धातूचा अर्थ आहे. तेव्हां पुत्र हें कर्म धात्वर्थामध्येंच प्रविष्ट होतें. तेव्हां पुत्रीय हा धातु अकर्मक असल्यामुळें त्याहून कर्माथीं प्रत्यय होत नाहीं.

२६. तेव्हां इष्टः पुत्रः, इष्यते पुत्रः, या वाक्यांपासून वृत्तीमधील प्रत्ययाचा इच्छा हा अर्थ आहे एवढेंच समजावयाचें आहे. त्या वाक्यामध्यें कर्माथीं प्रत्यय आहे वगैरे ज्या इतर गोष्टी आहेत त्याकडे लक्ष द्यावयाचें नाहीं. आतां पुत्रीय हा धातु अकर्मक असल्यामुळें त्याहून कर्मणिप्रत्यय होत नाहींच. तरी पण लौकिक विग्रहवाक्य इष्टः पुत्रः, इष्यते पुत्रः, असें कर्मणिप्रयोगानें दाखविण्यास हरकत नाहीं.

२७. अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ हे दहा स्वर समान होत. पैकीं शेवटचे तीन स्वर प्रातिपदिकाच्या शेवटीं असलेले सांपडत नसल्यामुळें

नान्तात् । राजीयति । तक्षीयति ॥

**काम्यच्च ॥ ३ । १ । ९ ॥**

किमर्थश्चकारः । स्वरार्थः । चितोऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । धातुस्वरेणाप्येतत्सिद्धम् ॥ ककारस्य तर्हीत्संज्ञापरित्राणार्थः आदितश्चकारः कर्तव्यः ॥ अत उत्तरं पठति ।

**काम्यचश्चित्करणानर्थक्यं कस्येदर्थाभावात् ॥१॥**

काम्यचश्चित्करणमनर्थकम् । ककारस्य तर्हीत्संज्ञा कस्मान्न भवति । इदर्थाभावात् । इत्कार्याभावादत्रेत्संज्ञा न भविष्यति । ननु च लोप एवेत्कार्यम् । अकार्यं लोपः । इह हि शब्दस्य कार्यार्थो वा भवत्युपदेशः श्रवणार्थो वा । कार्यं चेह नास्ति । कार्येऽसति यदि श्रवणमपि न स्यादुपदेशोऽनर्थकः स्यात् ॥ इदं तर्हीत्कार्यम् । अग्निचित्काम्यति । किंतीति गुणप्रतिषेधो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । सार्वधातुकार्धधातुकयोरङ्गस्य गुण उच्यते धातोश्च विहितः

---

तक्षीयति.

(सू.९) येथें चकार कशाकरितां जोडला आहे ?

'चितः' (६।१।१६३), चित्प्रत्ययान्ताचा अन्त उदात्त होतो, या सूत्रानें सांगितलेला अन्तोदात्त स्वर व्हावा म्हणून इत्संज्ञक चकार जोडला आहे.

चकार जोडण्याचा हा उपयोग नाहीं. कारण काम्यच्प्रत्ययान्ताला धातुसंज्ञा (३।१।३२) होत असल्यामुळें धातोः (६।१।१६२), 'धातूचा अन्त उदात्त होतो', या सूत्रानेंच अन्तोदात्त स्वर होईल.

तर मग काम्यप्रत्ययांतील ककाराला इत्संज्ञा (१।३।८) न व्हावी यासाठीं तो चकार ककाराच्या मागें जोडावा हें मनांत आणून वार्तिककार लिहितातः—

(वा.१) काम्यप्रत्ययांतील ककाराच्या मागें इत्संज्ञक चकार जोडण्याचा कांहीं उपयोग नाहीं.

मग ककाराला इत्संज्ञा कां बरें होत नाहीं ?

ककाराला इत्संज्ञेचा उपयोग होत नसल्यामुळें इत्संज्ञा होणार नाहीं.

पण 'तस्य लोपः' (१।३।९) या सूत्रानें लोप होणें हाच इत्संज्ञेचा उपयोग आहे.

लोप होणें हा इत्संज्ञेचा उपयोग नव्हे. कारण या शास्त्रामध्यें काहीं एक विशिष्ट कार्य करण्यासाठीं वर्ण जोडला असतो, किंवा त्या वर्णाचें उदाहरणामध्यें श्रवण व्हावें यासाठीं वर्ण जोडलेला असतो. आणि येथें तर काम्यप्रत्ययांत ककार जोडल्याचें काहीं विशिष्ट कार्य दिसत नाहीं. तेव्हां अशा स्थितींत जर त्या वर्णाचें लक्ष्यामध्यें श्रवणही होणार नाहीं तर मग ककार जोडणें अगदींच अनुपयुक्त होईल. मुळींच जोडला नाहीं तरी चालेल.

पण काम्यप्रत्ययातील ककाराला इत्संज्ञा केल्याचा लोपावांचून दुसरा उपयोग संभवतो. अग्निचित्काम्यति येथें चकारापुढील इकाराला 'क्ङिति च' (१।१।५) या सूत्रानें गुणाचा (७।३।८६) निषेध झाला पाहिजे.

काम्यप्रत्ययांतील ककाराला इत्संज्ञा करण्याचा हा उपयोग संभवत नाहीं. कारण सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना अंगाला तो गुण सांगितला आहे. आणि धातूच्या पुढें करावयास सांगितलेला तिङ्

---

सातच स्वर येथें ध्यावयाचे (कैयट).

१. जो पदार्थ इच्छेचें कर्म असून इच्छेच्या कर्त्याला स्वतःला प्राप्त होणारा आहे तद्वाचक सुबन्ताहून इच्छा या अर्थी काम्यच्प्रत्यय विकल्पानें होतो; उदा०— पुत्रमात्मन इच्छति पुत्रकाम्यति.

**प्रत्ययः शेष आर्धधातुकसंज्ञां लभते न चायं धातोर्विधीयते ॥ इदं तर्हि । उपयट्काम्यति । कितीति संप्रसारणं यथा स्यात् । एतदपि नास्ति प्रयोजनम् । यजादिभिरत्र कितं विशेषयिष्यामः । यजादीनां यः किदिति । कश्च यजादीनां कित् । यजादिभ्यो यो विहित इति ॥ अथापि कथंचिदित्कार्यं स्यात् । एवमपि न दोषः । क्रियते न्यास एव द्विचकारको निर्देशः । सुप आत्मनः क्यच्चकाम्यचेति ॥ अथवा छान्दसमेतत् । दृष्टानुविधिश्छन्दसि भवति न चात्र संप्रसारणं दृश्यते ॥**

## उपमानादाचारे ॥ ३ । १ । १० ॥

### अधिकरणाच्च ॥१॥

**अधिकरणाच्चेति वक्तव्यं प्रासादीयति कुट्याम् कुटीयति प्रासाद इत्यत्रापि यथा स्यात् ॥**

## कर्तुः क्यङ् सलोपश्च ॥ ३ । १ । ११ ॥

**सलोपसंनियोगेनायं क्यङ्विधीयते तेन**

आणि शित् यांखेरीज जो प्रत्यय त्याला आर्धधातुक संज्ञा होत असते. आणि काम्यच् हा प्रत्यय तर धातूच्या पुढें करावयास सांगितलेला नाहीं.

तर मग उपयट्काम्यति येथें ‘वचिस्वपि०’ (६।१।१५) यानें कित्प्रत्यय पुढें असतांना सांगितलेलें संप्रसारण होणें हा काम्यच्प्रत्ययांतील ककाराला इत्संज्ञा करण्याचा उपयोग समजावा.

हाही उपयोग संभवत नाहीं. कारण ‘वचिस्वपियजादीनां किति’ या सूत्रामध्यें किति याला यजादीनाम् हें विशेषण लावावयाचें. तेव्हां ‘यज् वगैरे धातूंचा जो कित्’ असा अर्थ आहे.

यज् वगैरे धातूंचा कित् म्हणजे कसा समजावा ?

यज् वगैरे धातूंच्या पुढें करावयास सांगितलेला जो कित् तो यज् वगैरे धातूंचा कित् समजावा.[२]

आतां कसें तरी इत्संज्ञाप्रयुक्त कार्य संभवलें तरी देखील ‘ककाराला इत्संज्ञा होऊं लागेल’ असा दोष येत नाहीं. कारण सुप आत्मनः क्यच्[३]काम्यच्च असा ककाराच्या मागें चकारद्वयाचा सूत्रामध्येंच निर्देश केला आहे.

किंवा उपयट्काम्यति हें उदाहरण छान्दस आहे, आणि वेदामध्यें तर उदाहरणामध्यें दृष्ट असलेलीं तेवढींच कार्यें करावयाचीं असतात, उपयट्काम्यति येथें तर संप्रसारण दृष्टीस पडत नाहीं, म्हणून संप्रसारण होणार नाहीं.

(सू.१०, वा.१) उपमानभूत जें अधिकरण तद्वाचक अशाही सुबन्ताहून आचारार्थीं क्यच्प्रत्यय होतो असें वचन करावें. कारण कुट्यामिवाचरति कुटीयति प्रासादे, प्रासादे इव आचरति प्रासादीयति कुट्याम्, येथेंही क्यच्प्रत्यय झाला पाहिजे.

(सू. ११) येथें सकाराचा लोप सांगून

---

२. काम्यच्प्रत्यय हा यज् वगैरे धातूंहून सांगितला नाहीं. तेव्हां उपयट्काम्यति येथें संप्रसारण होतच नाहीं.

३. ह्या दोन चकारांपैकीं पहिला चकार क्यच् या प्रत्ययाचा आहे, आणि दुसरा चकार च्काम्यच् असा काम्यच्प्रत्ययाच्या आरंभीं आहे. तेव्हां प्रत्ययाच्या आरंभीं ककार नसल्यामुळें त्याला इत्संज्ञा (१।३।८) होत नाहीं. चकाराला मात्र इत्संज्ञा (१।३।७) होते.

१. उपमानभूत जें कर्म तद्वाचक सुबन्ताहून आचार या अर्थीं क्यच्प्रत्यय विकल्पानें होतो; उदा. छात्रं पुत्रमिवाचरतिछात्रं पुत्रीयति.

१. उपमानभूत जो कर्ता तद्वाचक सुबन्ताहून आचार या अर्थीं विकल्पानें क्यङ्प्रत्यय होतो, आणि तो कर्तृवाचक शब्द सकारान्त असल्यास सकाराचा लोप होतो; उदा०—श्येनः इव आचरति श्येनायते काकः.

यत्रैव सलोपस्तत्रैव स्यात् । पयायते । इह न स्यात् । अपि काकः श्येनायते ॥ नैष दोषः । प्रधानशिष्टः क्यङ् । अन्वाचयशिष्टः सलोपो यत्र च सकारं पश्यसीति । तद्यथा । कश्चिदुक्तो ग्रामे भिक्षां चर देवदत्तं चानयेति स ग्रामे भिक्षां चराति यदि देवदत्तं पश्यति तमप्यानयति ॥

## सलोपो वा ॥१॥

सलोपो वेति वक्तव्यम् । पयायते पयस्यते ॥

## ओजोऽप्सरसोर्नित्यम् ॥२॥

ओजोऽप्सरसोर्नित्यं सलोपो वक्तव्यः । ओजायमानं यो अहिं जघान । अप्सरायते ॥

अपर आह । सलोपोऽप्सरस एव । पयस्यत इत्येव भवितव्यमिति ॥ कथमोजायमानं यो अहिं जघानेति । छान्दसः प्रयोगश्छन्दसि च दृष्टमनुविधीयते ॥

## आचारे गल्भक्लीबहोडेभ्यः क्विब्वा ॥३॥

आचारे गल्भक्लीबहोडेभ्यः क्विब्वा वक्तव्यः । अवगल्भते अवगल्भायते । क्लीब । विक्लीबते विक्लीबायते । क्लीब ।

---

त्याच्या बरोबर क्यङ्प्रत्यय सांगितला आहे. तेव्हां जेथें सकाराचा लोप होत असेल तेथेंच क्यङ्प्रत्यय होईल; जसें:– पय इव आचरति पयायते, आणि अपि काकः श्येनायते येथें क्यङ्प्रत्यय होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण येथें मुख्यत्वानें क्यङ्प्रत्यय सांगितला आहे आणि त्या ठिकाणीं सहज साधला तर करावा असा सकाराचा लोप सांगितला आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं सकार दृष्टीस पडतो तेथें तो होतो; जसें:–गुरूनें शिष्याला सांगितलें की गांवामध्यें भिक्षेला जा आणि देवदत्ताला घेऊन ये. तो आज्ञेप्रमाणें गांवामध्यें भिक्षेला जातो आणि जर देवदत्त दृष्टीस पडला तर त्यालाही घेऊन येतो.[२]

(वा.१) क्यङ्प्रत्ययाच्या प्रकृतींतील सकाराचा लोप विकल्पानें होतो असें वचन करावें; जसें:– पय इव आचरति तत्र पयायते, पयस्यते.

(वा.२) क्यङ्प्रत्ययाची अशा ओजस् किंवा अप्सरस् या शब्दांच्या सकाराचा लोप होतो, पण तो नित्य होतो असें वचन करावें; जसें:– ओज इव आचरति ओजायते, ओजायमानं यो अहिं जघान, अप्सरस इव आचरति वाराङ्गना अप्सरायते.

येथे कोणी एक वैयाकरण म्हणतो की अप्सरस्शब्दाच्याच सकाराचा लोप होतो. तेव्हां ओजस्यते असेंच रूप होतें, म्हणजे येथें सकारलोप होत नाहीं.

तर मग ओजायमानं यो अहिं जघान येथें लोप कसा?

हें उदाहरण वैदिक असल्यामुळें साधावें.[३]

(वा.३) गल्भ, क्लीब आणि होड या शब्दांहून आचारार्थी क्विप्प्रत्यय विकल्पानें होतो; असें वचन करावें; जसें:– अवगल्भते अवगल्भायते,[४] विक्लीबते विक्लीबायते, विहोडते विहोडायते.

---

२. देवदत्त तेथें नसला तरी हा शिष्य भिक्षेला जातोच. देवदत्ताला मात्र आणीत नाही.

३. वैदिक प्रयोगामध्यें जे कार्य केलेलें दृष्टीस पडेल तें कार्य शास्त्रानें प्राप्त होत नसल्यास छान्दस म्हणून तें कार्य तेथें झालें अशी कल्पना करावी.

४. क्विप्प्रत्यय केला नाहीं त्या वेळीं प्रकृत सूत्रानें क्यङ्प्रत्यय होतो. ह्या तीन शब्दांच्या शेवटीं अनुदात्त अकार इत्संज्ञक आहे, असें ह्याच वार्तिकानें सांगितलें आहे. त्यामुळें क्विप्प्रत्यय केला असतां त्याच्यापुढील लकाराचें स्थानीं आत्मनेपद (१।३।१२) होतें.

होड । विहोडते विहोडायते ॥ किं प्रयोजनम् । क्रियावचनता यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । धातव एव गल्भादयः । न चैव ह्यर्था आदिश्यन्ते क्रियावचनता च गम्यते ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । अवगल्भा विक्लीबा विहोडा । अ प्रत्ययात् [३.३.१०२] इत्यकारो यथा स्यात् । मा भूदेवम् । गुरोश्च हलः [१०३] इत्येवं भविष्यति ॥ इदं तर्हि । अवगल्भांचक्रे विक्लीबांचक्रे विहोडांचक्रे । कास्प्रत्ययादाममन्त्रे [३.१.३५] इत्याम्यथा स्यात् ॥

अपर आह । सर्वप्रातिपदिकेभ्य आचारे क्विब्वक्तव्योऽश्वति गर्दभतीत्येवमर्थम् ॥ न तर्हीदानीं गल्भाद्यनुक्रमणं कर्तव्यम् । कर्तव्यं च । किं प्रयोजनम् । आत्मनेपदार्थाननुबन्धानासङ्क्ष्यामीति । गल्भ क्लीब होड ॥

## भृशादिभ्यो भुव्यच्वेर्लोपश्च हलः ॥ ३ । १ । १२ ॥

हलो लोपसंनियोगेनायं क्यङ्विधीयते तेन यत्रैव हलो लोपस्तत्रैव प्रसज्येत । नैष दोषः । प्रधानशिष्टः क्यङ् । अन्वाचयशिष्टो हलो लोपो यत्र च हलं पश्य-

या शब्दांना क्विप्प्रत्यय सांगण्याचा काय बरें उपयोग ?

आचरण करणें ही क्रिया तेथें त्या शब्दांपासून मनांत येते हा उपयोग होय.

हा उपयोग संभवत नाहीं. कारण अव-उपसर्गपूर्वक गल्भ, क्लीब, आणि होड हे धातुच आहेत. जरी त्या अर्थी ते धातु आहेत असें सांगितलें नाहीं, तरी पण गल्भ वगैरेंपासून त्या त्या क्रियेची प्रतीति होत आहे.

तर मग अवगल्भा, विक्लीबा, विहोडा, येथें 'अ प्रत्ययात्' (३।३।१०२) या सूत्रानें अप्रत्यय व्हावा हा क्विप्प्रत्यय सांगण्याचा उपयोग समजावा.

हाही उपयोग संभवत नाहीं. कारण 'अ प्रत्ययात्' यानें अकारप्रत्यय झाला नाहीं तरी 'गुरोश्च हलः' (३।३।१०३) यानें अप्रत्यय होईल.

तर मग अवगल्भांचक्रे, विक्लीबांचक्रे, विहोडांचक्रे, येथें क्विप्प्रत्यय केला म्हणून प्रत्ययान्त समजून 'कास्प्रत्ययादा०' (३।१।३५) यानें आम्प्रत्यय व्हावा, हा उपयोग समजावा.

अन्य कोणी एक वैयाकरण म्हणतो की अश्व इवाचरति अश्वति, गर्दभति, इत्यादि प्रयोग सिद्ध होण्यासाठीं 'सर्वच प्रातिपदिकांहून आचारार्थी क्विप्प्रत्यय होतो', असें वचन करावें.

तर मग आतां 'आचारे गल्भक्लीब०' इत्यादि वचन करावयास नको काय ?

तें वचन तर केलेंच पाहिजे.

कशासाठीं ?

आत्मनेपद होण्याकरतां, म्ह. ह्या तीन शब्दांच्या शेवटीं इत्संज्ञक अनुदात्त अकार जोडला आहे हें समजण्यासाठीं, तें वचन केलें पाहिजे.

(सू.१२) येथें हलाचा लोप सांगून त्याच्याबरोबर क्यङ्प्रत्ययाचें विधान केलें आहे. तेव्हां जेथें हलाचा लोप होत असेल तेथेंच हा क्यङ्प्रत्यय होईल.

हा दोष येत नाहीं. कारण क्यङ्प्रत्यय हा येथें मुख्यत्वानें सांगितला आहे, आणि

१. अभूततद्भाव हा अर्थ गम्यमान असतांना च्विप्रत्यय केलेल्या भृश, शीघ्र, इत्यादि प्रातिपदिकांहून भूधातूच्या अर्थी क्यङ्प्रत्यय होतो आणि त्या प्रातिपदिकांच्या शेवटीं हल् असल्यास त्याचा लोप होतो; उदा०—अभृशः भृशो भवति भृशायते मणिः,असुमनाः सुमना भवति सुमनायते. भृश म्ह. नक्षत्र. मणि हा वस्तुतः नक्षत्र नसून नक्षत्ररूपी दिसतो असा भृशायते मणिः याचा अर्थ आहे. हाच

सीति ॥

**भृशादिष्वभूततद्भावग्रहणम् ॥१॥**

भृशादिष्वभूततद्भावग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । क्व दिवा भृशा भवन्तीति ॥

**च्विप्रतिषेधानर्थक्यं च भवत्यर्थे क्यङ्वचनात् ॥२॥**

च्विप्रतिषेधश्चानर्थकः । किं कारणम् । भवत्यर्थे क्यङ्वचनात् । भवत्यर्थे हि क्यङ्विधीयते ॥

**भवतियोगे च्विविधानम् ॥३॥**

भवतिना योगे च्विर्विधीयते । तत्र च्विनोक्तत्वात्तस्यार्थस्य क्यङ् न भविष्यति ॥ डाजन्तादपि तर्हि न प्राप्नोति । पटपटायते । डाजपि हि भवतिना योगे विधीयते भवत्यर्थे क्यष् ।

**डाचि वचनप्रामाण्यात् ॥४॥**

डाचि वचनप्रामाण्याद्भविष्यति । किं वचनप्रामाण्यम् । लोहितादिडाज्भ्यः क्यष् [३.१.१३] इति ॥

इह किंचिदक्रियमाणं चोद्यते किंचिच्च क्रियमाणं प्रत्याख्यायते । स सूत्रभेदः कृतो भवति ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमिह कस्मान्न भवति क्व दिवा भृशा भव-

---

हलाचा लोप हा आनुषंगिक म्हणजे जेथें हल् दृष्टीस पडेल तेवढ्यापुरता सांगितला आहे.

(वा.१) भृश वगैरे शब्दांविषयीं अभूततद्भावाचें ग्रहण करावें. कारण क्व दिवा भृशा[३] भवन्ति येथें क्यङ् न झाला पाहिजे.

(वा.२) आणि भृश वगैरे शब्द च्विप्रत्ययान्त नसावेत असा जो निषेध केला तो विफल आहे.

काय कारण ?

कारण असें की भवतिधातूच्या अर्थी क्यङ्प्रत्ययाचें विधान केलें आहे. आणि—

(वा.३) भूधातूशीं योग असतां च्विप्रत्ययाचें विधान केलें आहे. तेव्हां च्विप्रत्यय झाला असेल तेथें भूधातूचा योग असणारच. त्याच भूधातूनें भवति हा अर्थ उक्त झाला असल्यामुळें क्यङ्प्रत्यय होणारच नाहीं.

तर मग याप्रमाणेंच पटपटायते येथें डाच्प्रत्ययान्ताहूनही क्यष्प्रत्यय होणार नाहीं. कारण डाच्प्रत्ययही भूधातूशीं योग असतांनाच सांगितला आहे, आणि भवति या अर्थी क्यष्प्रत्यय होणार आहे.

(वा.४) वचनाचे जोरावर डाच्प्रत्यय केला असतां क्यष्प्रत्यय होईल.

तें वचन कोणतें ?

'लोहितादिडाज्भ्यः क्यष्' (३।१।१३) हें वचन होय.

आतां येथें या प्रकृत सूत्रामध्यें नसलेला अभूततद्भाव हा शब्द घालावयास सांगितला आहे, आणि सूत्रामध्यें घातलेला अच्वेः हा शब्द काढून टाकण्यास सांगितलें आहे. पण तसें केल्यास मूळ सूत्रांत बदल होतो याची काय वाट ?

तर मग जसें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण मूळचें आहे तसेंच सूत्र ठेवलें तर क्व दिवा भृशा भवन्ति येथें क्यङ्प्रत्यय होऊं लागेल, असें म्हटलें आहे ना ?

---

अभूततद्भाव होय.

२. चोपश्च येथील चशब्द समुच्चयार्थक घातला नसून अन्वाचयार्थक घातला आहे, असें समजावें.

३. अभूततद्भाव म्हणजे वस्तुतः अस्तित्व नसून कल्पित अस्तित्व. दिवसा नक्षत्रें कोठें असतात, असा याचा अर्थ आहे. येथें भृश याचा अर्थ नक्षत्रें हा खराच आहे. अभूततद्भाव नाहीं म्हणून क्यङ्प्रत्यय होत नाहीं.

न्तीति । नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः । नञ्युक्तमिवयुक्तं वा यत्किंचिदिह दृश्यते तत्रान्यस्मिंस्तत्सदृशे कार्यं विज्ञायते तथा ह्यर्थो गम्यते । अब्राह्मणमानयेत्युक्तो ब्राह्मणसदृश आनीयते नासौ लोष्टमानीय कृती भवति । एवमिहाप्यच्वेरिति च्विप्रतिषेधादन्यस्मिन्नच्व्यन्ते च्विसदृशे कार्यं विज्ञास्यते । किं चातोऽन्यदच्व्यन्तं च्विसदृशम् । अभूततद्भावः ॥

इह काश्चित्प्रकृतयः सोपसर्गाः पठ्यन्ते। अभिमनस् सुमनस् उन्मनस् दुर्मनस् । तत्र विचार्यते भृशादिषूपसर्गः प्रत्ययार्थविशेषणं वा स्यात् । अभिभवतौ सुभवतौ उद्भवतौ दुर्भवताविति । प्रकृत्यर्थविशेषणं वा । अभिमनस्शब्दात् सुमनस्शब्दात् उन्मनस्शब्दात् दुर्मनस्शब्दादिति ॥ युक्तं पुनरिदं विचारयितुम् । ननु तेनासंदिग्धेन प्रकृत्यर्थविशेषणेन भवितव्यं यावता प्राक्प्रकृतेः पठ्यन्ते । यदि हि प्रत्ययार्थविशेषणं स्यात्प्राग्भवतेः पठ्येरन् ॥ नेमे शक्याः प्राग्भवतेः पठितुम् । एवं विशिष्टे हि प्रत्ययार्थे भृशादिमात्रादुत्पत्तिः प्रसज्येत । तस्मान्नैवं शक्यं वक्तुम् । न चेदेवं जायते विचारणा ॥ कश्चात्र विशेषः ।

## भृशादिषूपसर्गः प्रत्ययार्थविशेषणमिति चेत्स्वरे दोषः ॥५॥

भृशादिषूपसर्गः प्रत्ययार्थविशेषणमिति

---

नञानें किंवा इवशब्दानें युक्त असा जो शब्द तो आपल्या अर्थाहून भिन्न आणि आपल्या अर्थासारखा अशाच पदार्थाला दाखवितो. कारण लोकांमध्यें तसाच अर्थ मनांत येतो. असें पहा की अब्राह्मणमानय, ब्राह्मणभिन्नाला आण, असें सांगितलें असतां ब्राह्मणाहून निराळा पण ब्राह्मणासारखा असा क्षत्रियादिकच आणिला जातो. एखाद्यानें ब्राह्मणाहून भिन्न म्हणन ढेकूळ आणिलें तर त्याला कोणी शहाणा म्हणत नाहीं. त्याप्रमाणें येथेंही अच्वेः या प्रतिषेधांतील नञानें युक्त च्वि हा शब्द च्विप्रत्ययान्ताहून निराळा, पण च्विप्रत्ययान्तासारखा, असाच भृश वगैरे शब्द मनांत आणून देईल.

आतां च्विप्रत्ययान्ताहून निराळा शब्द च्विप्रत्ययान्तासारखा कोणत्या धर्मानें ओळखावा?

अभूततद्भाव ह्यानें ओळखावा.

आतां या भृशादिगणामध्यें अभिमनस्, सुमनस्, उन्मनस्, दुर्मनस्, असे कांहीं शब्द उपसर्गसहित पठित आहेत. त्याविषयीं असा विचार उत्पन्न होतो की भृशादिकामध्यें पठित असलेला उपसर्ग प्रत्ययार्थ अशा भवतिक्रियेचें विशेषण होय. म्हणजे अभिभवति, सुभवति, उद्भवति, दुर्भवति, या अर्थी क्यङ् होतो. किंवा प्रकृत्यर्थाचे विशेषण होय. म्हणजे अभिमनस्, सुमनस्, उन्मनस्, दुर्मनस्, या प्रकृतींहून क्यङ् होतो?

पण अशा तऱ्हेचा विचार करणें योग्य आहे काय? कारण ज्यापेक्षां प्रकृतीच्या मागें उपसर्ग पठित आहेत त्यापेक्षां प्रकृत्यर्थाचेंच विशेषण हें निःसंशय ठरतें. जर प्रत्ययाचें विशेषण असतें तर भवतिक्रियेच्या मागें उपसर्गांचा पाठ केला असता.

भवतिधातूच्या मागें उपसर्गांचा पाठ करणें शक्य नाहीं. तसें केलें तर अभिभवति, उद्भवति, इत्यादि विशेष प्रकारच्या भवत्यर्थी भृशादिगणांतील उपसर्गरहित अशा त्या शब्दांहून क्यङ्प्रत्यय होऊं लागेल. सबब भवतिधातूच्या मागें त्यांचा पाठ करणें शक्य नाहीं. आणि जर तसें करणें शक्य नाहीं तर प्रकृत्यर्थाचें विशेषण किंवा प्रत्ययार्थाचें विशेषण हा विचार उत्पन्न होतो.

आतां या दोन तऱ्हांमध्यें काय बरें फरक आहे?

(वा.५) भृशादिगणामध्यें पठित अस-

चेत्स्वरे दोषो भवति। अभिमनायते। तिङ्ङतिङः [८.१.२८] इति निघातः प्रसज्यते॥ अस्तु तर्हि प्रकृत्यर्थविशेषणम्।

**सोपसर्गादिति चेदटि दोषः ॥६॥**

सोपसर्गादिति चेदटि दोषो भवति। स्वमनायतेति॥ अत्यल्पमिदमुच्यतेऽटि दोषो भवतीति। अड्ल्यब्द्विर्वचनेष्विवति वक्तव्यम्। अट्युदाहृतम्। ल्यपि। सुमनाय्य। द्विर्वचने। अभिमिमनायिषते। नैष दोषः। अवश्यं संग्रामयतेः सोपसर्गादुत्पत्तिर्वक्तव्या असंग्रामयत शूर इत्येवमर्थम्। तन्नियमार्थं भविष्यति। संग्रामयतेरेव सोपसर्गान्नान्यस्मात्सोपसर्गादिति॥ यदि नियमः क्रियते स्वरो न

लेला उपसर्ग हा प्रत्ययार्थाचें विशेषण असें गृहीत धरलें तर स्वराविषयीं दोष येतो. म्हणजे अभिमनायते येथें 'तिङ्ङतिङः' (८।१।२८) यानें मनायते या तिङन्ताला अनुदात्त स्वर प्राप्त होतो.[४]

तर मग भृशादिगणांतील उपसर्ग प्रकृत्यर्थाचेंच विशेषण असूं दे.

(वा.६) उपसर्गविशिष्ट अशा त्या त्या शब्दाहून क्यङ् होतो असें गृहीत धरलें तर अडागमाविषयीं दोष येतो. म्हणजे स्वमनायत येथें उपसर्गाच्या मागे अडागम प्राप्त होतो.

अटि दोषः असा येथें जो एकट्या अडागमाविषयीं दोष दाखविला आहे तो फारच थोडा दाखविला आहे. वस्तुतः विचार केला तर अडागम, ल्यबादेश, आणि द्विर्वचन इतक्या ठिकाणीं दोष येतो, असं सांगावयास पाहिजे. त्यांपैकीं अडागमाविषयीं उदाहरण दाखविलें. ल्यबादेशाविषयीं उदाहरण—सुमनाय्य[५]. द्विर्वचनाचें उदाहरण—अभिमिमनायिषते.[६]

हा दोष येत नाहीं. कारण असंग्रामयत शूरः येथें समूशब्दाच्या मागें अडागम होण्यासाठीं संग्राम एवढ्या धातूहून णिच्-प्रत्यय झाला पाहिजे. त्याकरितां 'संग्राम युद्धे' असें धातुपाठामध्यें चुरादिगणामध्यें वचन केलें आहे. परंतु संग्राम या प्रातिपदिकाहून 'तत्करोति०' (३।१।२६,वा.५) या वार्तिकानेंच णिच्प्रत्यय सिद्ध असल्यामुळें धातुपाठांतील वचन व्यर्थ होतें तें नियमार्थ होईल. तो नियम असा की ज्याच्या आरंभीं उपसर्गाच्या आकाराचा शब्द आहे त्या आरंभींच्या शब्दासहित अशा त्या विशिष्ट शब्दाहून णिच् वगैरे प्रत्यय[७] करणें झाल्यास फक्त संग्राम याहूनच तसा प्रत्यय करावयाचा. इतर ठिकाणीं तसा करावयाचा नाहीं. म्हणजे इतर ठिकाणीं उपसर्गाच्या आकाराचा शब्द वगळून फक्त पुढील शब्दाहूनच करावयाचा.[८]

पण जर नियम केला तर इष्ट स्वर साधत

४. कारण अभिमनस् एवढ्या शब्दाहून क्यङ्-प्रत्यय न करतां नुसत्या मनस्शब्दाहून क्यङ्-प्रत्यय केला असल्यामुळें मनायते एवढ्याला तिङन्त म्हणतां येतें, आणि ते अभि या अतिङन्ताच्या पुढें आहे.

५. येथें सुमनस्शब्दाहून क्यङ्प्रत्यय झाला असल्यामुळें सुमनाय या क्यङ्प्रत्ययान्त धातूच्या पुढील क्त्वाप्रत्ययाला (३।४।२१) ल्यबादेश (७।१।३७) होणार नाही. कारण सुशब्दाचा क्त्वाप्रत्ययान्ताबरोबर समास झालेला नाहीं. जर नुसत्या मनस्शब्दाहून क्यङ् झाला तर मात्र मनाय या क्यङ्प्रत्ययान्त धातूहून क्त्वाप्रत्यय करून त्या क्त्वाप्रत्ययान्ताबरोबर सुशब्दाचा समास करतां येईल.

६. अभिमनस्शब्दाहून क्यङ्प्रत्यय करून पुढें सन्प्रत्यय केला असतां 'अभिमनायिष' एवढा सन्-प्रत्ययान्त धातु होतो म्हणून त्यांतील द्वितीय एकाच्-भाग भि याला द्वित्व (६)१९) होऊं लागेल.

७. धातुसंज्ञेला (३।१।३२) कारण होणारे जे प्रत्यय ते प्रत्यय येथें णिच् वगैरे समजावेत.

८. तेव्हां अडागम, ल्यबादेश आणि द्वित्व यांसंबंधानें जे दोष दिले होते ते आतां येत नाहींत.

सिध्यति । एवं तर्हि भृशादिषूपसर्गस्य पराङ्गवद्भावं वक्ष्यामि ॥ यदि पराङ्गवद्भाव उच्यतेऽड्ल्यब्द्विर्वचनानि न सिध्यन्ति । स्वरविधाविति वक्ष्यामि । एवं च कृत्वास्तु प्रत्ययार्थविशेषणमपि । ननु चोक्तं भृशादिषूपसर्गः प्रत्ययार्थविशेषणमिति चेत्स्वरे दोषः इति । स्वरे पराङ्गवद्भावेन परिहृतम् ॥

अयं तर्हि प्रत्ययार्थविशेषणे सति दोषः क्यङोक्तत्वात्तस्यार्थस्योपसर्गस्य प्रयोगो न प्राप्नोति । किं कारणम् । उक्तार्थानामप्रयोग इति । तद्यथा । अपि काकः श्येनायत इति क्यङोक्तत्वादाचारार्थस्याङः प्रयोगो न भवति । अस्त्यत्र विशेषः । एकेनात्र विशिष्टे प्रत्ययार्थे प्रत्यय उत्पद्यत इह पुनरनेकेन । तत्र मनायत इत्युक्ते संदेहः स्यादभिभवतौ सुभवतावुद्भवतौ दुर्भवताविति । तत्रासंदेहार्थमुपसर्गः प्रयुज्यते ॥ यत्र तर्ह्येकेन । उत्पुच्छयते ।

---

नाहीं. म्हणजे अभिमनायते येथें 'तिङ्ङतिङः' यानें अनुदात्त होऊं लागेल, हा दोष येतोच.

असें आहे तर मग भृशादिगणांतील शब्दाच्या आरंभीं असलेला जो उपसर्गाच्या आकाराचा शब्द त्याला पराङ्गवद्भावाचें विधान करण्यांत येईल.

जर पराङ्गवद्भाव सांगितला तर अडागम, ल्यबादेश आणि द्वित्व हीं कार्यें जशीं इष्ट आहेत तशीं तीं साधत नाहींत.

हा पराङ्गवद्भाव स्वरविधीपुरताच आहे असें सांगण्यांत येईल.

तर मग आतां भृशादिगणामध्यें पठित उपसर्ग ह्यांना प्रत्ययार्थ भवतिक्रियेचें विशेषण केलें तरी हरकत दिसत नाहीं.

पण भृशादि गणामध्यें पठित उपसर्ग हे प्रत्ययार्थ भवतिक्रियेचें विशेषण असें गृहीत धरलें तर अभिमनायते येथें अनुदात्तस्वर प्राप्त होतो असा दोष दाखविला आहे ना ?

आतांच सांगितलेल्या पराङ्गवद्भावानें तो दोष दूर होत आहे.

तर मग प्रत्ययार्थाचें विशेषण म्हणून गृहीत धरलें असतां असा दोष समजावा की अभिमनायते इत्यादि ठिकाणीं उपसर्गाचा अर्थ क्यङ्प्रत्ययानें उक्त झाला असल्यामुळें उपसर्गाचा प्रयोग करतां येणार नाहीं.

काय कारण ?

'ज्या शब्दाचा अर्थ दुसऱ्यानें दाखविला गेला असेल त्याचा प्रयोग करावयाचा नाहीं', असा न्याय आहे; जसें:– अपि काकः श्येनायते येथें आचारार्थ हा क्यङ्प्रत्ययानें दाखविला गेला असल्यामुळें आङ्उपसर्गाचा प्रयोग होत नाहीं.

येथें फरक आहे. तो असा की श्येनायते येथें एकाच उपसर्गाच्या अर्थानें विशिष्ट अशा अर्थी प्रत्यय उत्पन्न होतो, आणि येथें मनस्शब्दाहून तर अनेक उपसर्गांच्या अर्थांनीं विशिष्ट अशा अनेक अर्थीं प्रत्यय उत्पन्न होतो. तेव्हां मनायते असें उच्चारलें असतां अभिभवति या अर्थी येथें प्रत्यय उत्पन्न झाला आहे, किंवा सुभवति, दुर्भवति अथवा उद्भवति या अर्थी प्रत्यय उत्पन्न झाला आहे असा संशय येतो. तो संशय दूर करण्यासाठीं उपसर्गाचा प्रयोग केला जातो.

तर मग आतां जेथें एकाच उपसर्गाच्या अर्थानें विशिष्ट अशा अर्थी प्रत्यय सांगितला आहे तेथें म्हणजे पुच्छमुदस्यति उत्पुच्छयते येथें उपसर्गाचा प्रयोग होतो तो कसा ?

येथेंही अनेक उपसर्गांच्या अर्थांनीं विशिष्ट अशा अर्थी प्रत्यय सांगितला आहे. पुच्छशब्दा

---

९. अभि हा उपसर्ग पुढील मनायते या क्रियापदाचें एक अंग म्ह० अवयव समजल्यामुळें अभिमनायते एवढें एकच पद झालें. त्याच्या मागें दुसरें अतिङन्त नसल्यामुळें अनुदात्त होत नाहीं.

अत्राप्यनेकेन । पुच्छादुदसने पुच्छाद्व्यसने पुच्छात्पर्यसन इति ॥

## लोहितादिडाज्भ्यः क्यष् ॥ ३ । १ । १३ ॥

किमर्थः ककारः । गुणवृद्धिप्रतिषेधार्थः । क्ङितीति गुणवृद्धिप्रतिषेधो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । सार्वधातुकार्धधातुकयोरङ्गस्य गुण उच्यते धातोश्च विहितः प्रत्ययः शेष आर्धधातुकसंज्ञां लभते न चायं धातोर्विधीयते। लोहितादीनि प्रातिपदिकानि ॥ सामान्यग्रहणार्थस्तर्हि । क्व सामान्यग्रहणार्थेनार्थः । नः क्ये [१.४.१५] इति । नायं नान्ताद्विधीयते ॥ इह तर्हि । यस्य हलः क्यस्य विभाषा [६.४.४९;५०] इति । नायं हलन्ताद्विधीयते ॥ इह तर्हि । आपत्यस्य च तद्धितेऽनाति क्यच्व्योश्च [६.४.१५१;१५२] इति । नायमापत्याद्विधीयते ॥ इह तर्हि । क्याच्छन्दसि [३.२.१७०] इति । याच्छन्दसीत्येतावद्वक्तव्यं चुरण्युः तुरण्युः भुरण्युरित्येवमर्थम् ॥ इदं

---

हून उदसन, व्यसन किंवा पर्यसन या अर्थी णिङ्प्रत्यय होतो असें वचन आहे.

(सू.१३) क्यष्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक ककार कशाकरितां जोडला आहे ?

क्ङिति च (१।१।५) यानें गुणवृद्धीचा निषेध व्हावा याकरितां ककार जोडला आहे.

ककार जोडण्याचा हा उपयोग संभवत नाहीं. कारण सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना अंगाला गुण सांगितला आहे आणि धातूच्या पुढें करावयास सांगितलेला आणि तिङ् व शित् यांपेक्षां भिन्न असा जो प्रत्यय त्याला आर्धधातुकसंज्ञा(३।४।११४) होत असते. आणि हा क्यष्प्रत्यय तर धातूच्या पुढें करावयास सांगितला नाहीं. कारण लोहितादि गणांतील शब्द हीं प्रातिपदकें आहेत.

तर मग क्य या शब्दाखालीं क्यच्, क्यङ्, यांप्रमाणें हा क्यष्ही यावा म्हणून ककार जोडला आहे.

क्य शब्दानें क्यष् घेतां येईल. पण त्याचा उपयोग कोठें ?

नः क्ये (१।४।१५) येथें.

पण हा क्यष्प्रत्यय नकारान्ताहून करावयास सांगितला नाहीं.

तर मग 'यस्य हलः' (६।४।४९) याच्या पुढील 'क्यस्य विभाषा' येथें क्यशब्दानें क्यष्प्रत्ययाचें ग्रहण होतें हा उपयोग समजावा.

पण हा क्यष्प्रत्यय हलन्ताहून करावयास सांगितला नाहीं.

तर मग 'आपत्यस्य च तद्धितेऽनाति' (६।४।१५१) याच्या पुढील 'क्यच्व्योश्च' या सूत्रामध्यें क्यशब्दानें क्यष्प्रत्ययाचें ग्रहण होतें हा उपयोग समजावा.

पण हा क्यष्प्रत्यय अपत्यप्रत्ययान्त शब्दाच्या पुढें करावयास सांगितला नाहीं.

तर मग 'क्याच्छन्दसि'(३।२।१७०) येथें क्यशब्दानें क्यष्प्रत्ययाचें ग्रहण होतें हा उपयोग समजावा.

पण चुरण्युः, तुरण्युः, भुरण्यु, येथें उप्रत्यय होण्यासाठीं 'क्याच्छन्दसि' याचे ऐवजीं 'याच्छन्दसि' असेंच सूत्र करणें भाग आहे.

---

१०. तेव्हां उदसन, व्यसन, किंवा पर्यसन यांपैकीं अमुकच अर्थ येथें विवक्षित आहे हें समजण्याकरितां तो तो उपसर्ग लाविला जातो. हे अर्थ पुढें भाष्यामध्यें (३।१।१९, वा.३ वरील) दिले आहेत.

१. लोहितादिगणपठित शब्द आणि डाच्प्रत्ययान्त शब्द यांहून भवति या अर्थी क्यष्प्रत्यय होतो; उदा०— लोहितायति लोहितायते, पटपटायति पटपटायते. येथें 'अव्यक्ता०' (५।४।५७) या सूत्रानें डाच्प्रत्यय झाला आहे.

२. चुरण्य, तुरण्य, भुरण्य, हे यक्प्रत्ययान्त (३।१।२७) धातु आहेत.

**तर्हि प्रयोजनम्। यत्तदकृद्यकार इति दीर्घत्वं तत्र क्ङिद्ग्रहणमनुवर्तते तदिहापि यथा स्यात् लोहितायते। किं पुनः कारणं तत्र क्ङिग्रहणमनुवर्तते। इह मा भूत्। उरुया धृष्णुयेति॥यदि क्ङिग्रहणमनुवर्तते पित्र्यमिति पितू रीङ्भावो न प्राप्नोति। रीङ्भावे क्ङिग्रहणं निवर्तिष्यते॥ यदि निवर्तते कथमसूया वसूया च यजामहे। असूयतेरसूया वसूयतेर्वसूया। अथवा छान्दसमेतद्दृष्टानुविधिश्च च्छन्दसि भवतीति॥ यदि च्छान्दसत्वं हेतुर्नार्थः क्ङिद्ग्रहणेनानुवर्तमानेन। कस्मान्न भवति उरुया धृष्णुयेति। छान्दसत्वात्॥ अथवास्त्वत्र दीर्घत्वं छान्दसं ह्रस्वत्वं भविष्यति।**

---

तर मग क्यष्प्रत्ययामध्यें ककार जोडण्याचा हा उपयोग समजावा की 'अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः' (७।४।२५) यानें यकारादि प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला दीर्घ क्यष्प्रत्यय पुढें असतांनाही व्हावा. कारण तेथें क्ङित्ग्रहणाची अनुवृत्ति आहे; जसें:– लोहितायति.

पण तेथें क्ङिद्ग्रहणाच्या अनुवृत्तीचा काय बरें उपयोग ?

उरुया[3], धृष्णुया, येथें दीर्घ न होणें हा उपयोग होय.

पण जर 'अकृत्सार्वधातुकयोः' येथें क्ङिद्ग्रहणाची अनुवृत्ति होत असेल तर ती पुढेंही चालू राहिली तर पित्र्यम्[4] येथें रीङादेश प्राप्त होणार नाहीं.

'रीङ्ऋतः' (७।४।२७) येथें क्ङिद्ग्रहण निवृत्त करण्यांत येईल.

जर तेथेंच फक्त क्ङिद्ग्रहण निवृत्त केलें तर 'असूया[5] वसूया च यजामहे' येथें दीर्घ केला तो कसा ?

कण्ड्वादि यगन्त असूय आणि इच्छाक्यजन्त वसूय या धातूंहून 'अ प्रत्ययात्' (३।३।१०२) यानें अप्रत्यय केल्यामुळें असूया, वसूया, हीं उदाहरणें साधत आहेत.

किंवा असूया, वसूया, हें उदाहरण छान्दस म्ह. वेदामधील आहे. आणि वेदामध्यें तर जें कार्य दृष्टीस पडतें तें प्राप्त नसेल तरी त्याच्या विधीची कल्पना करतां येते.

पण जर असूया,वसूया, येथें छान्दस म्हणून दीर्घ साधावयाचा तर 'अकृत्सार्वधातुक०' येथें क्ङिद्ग्रहणाची अनुवृत्ति आणण्याचा कांहींच उपयोग दिसत नाहीं.

पण अनुवृत्ति आणिली नाहीं तर उरुया, धृष्णुया, येथें दीर्घ कां बरें होत नाहीं ?

उरुया,धृष्णुया, हें छान्दस[6] उदाहरण आहे. आणि वेदामध्यें तर दिसेल तेवढेंच कार्य करावयाचें असतें.

अथवा उरुया, धृष्णुया, येथें 'अकृत्सार्व०'

---

३. सुपां सुलुक्० (७।१।३९) या सूत्रानें तृतीयैकवचनाचे स्थानीं याआदेश केला आहे.

४ पितुरागतम् या अर्थी पितुर्यच्च (४।३।७९) यानें पितृशब्दाहून यत्प्रत्यय झाला आहे. नंतर ऋकाराला रीङ्आदेश (७।४।२७) व त्यांतील ईकाराचा लोप (६।४।१४८) झाला आहे.

५. रीङ्विधीचे ठिकाणींच क्ङिद्ग्रहण निवृत्त करून 'अकृत्सार्वधातुकयोः' येथें क्ङिद्ग्रहण अनुवृत्त होत असेल तर असूया, वसूया, येथें असु, वसु, या शब्दांचे पुढील तृतीयैकवचनाचे ठिकाणीं 'सुपां सुलुक्'० (७।१।३९) यानें याआदेश केल्यानंतर मागील उकाराला दीर्घ होतो तो होणार नाहीं.

६. दीर्घविधीमध्यें क्ङिति याची अनुवृत्ति आणली तर उरुया हें उदाहरण साधतें, पण असूया हें उदाहरण छान्दस म्हणून साधावें लागतें. बरें, अनुवृत्ति आणिली नाहीं तर असूया हें उदाहरण साधतें, पण उरुया हें उदाहरण छान्दस म्हणून साधावें लागतें. तेव्हां कांहीं केलें तरी छान्दस ही कल्पना करावीच लागणार. तेव्हां क्ङिति याची अनुवृत्ति न करणेंच बरें.

तद्यथा । उपगायन्तु मां पत्नयो गर्भिणयो युवतय इति ॥

अथ किमर्थः षकारः । विशेषणार्थः । क विशेषणार्थेनार्थः । वा क्यषः [१.३.९०] इति । वा यादिति ह्युच्यमाने पाश्या अतोऽपि प्रसज्येत । नैतदस्ति प्रयोजनम् । परस्मैपदमित्युच्यते न चातः परस्मैपदं नाप्यात्मनेपदं पश्यामः ॥ सामान्यग्रहणाविघातार्थस्तर्हि भविष्यति । क सामान्यग्रहणाविघातार्थेनार्थः । क्याच्छन्दसीति । याच्छन्दसीत्येवं वक्तव्यं चुरण्युः तुरण्युः भुरण्युरित्येवमर्थम् ॥

**लोहितडाज्भ्यः क्यष्वचनम् ॥१॥**

लोहितडाज्भ्यः क्यष्वक्तव्यः । लोहि-

---

यानें दीर्घ होऊं दे; छान्दसत्वास्तव ह्रस्व होईल; जसें:– उपगायन्तु मां पत्नयो गर्भिणयो युवतयः.

आतां येथें क्यष्प्रत्ययाला षकार कशाकरितां लाविला आहे ?

ह्या क्यशब्दाला षकारेत्संज्ञक असें विशेषण लागावें म्हणून षकार जोडला आहे.

विशेषणार्थ षकार लावण्याचा उपयोग कोठें ?

'वा क्यषः' (१।३।९०) येथें.

जर षकार न लावितां वा क्यषः याच्या ऐवजीं 'वा यात्' असें सूत्र केलें तर पाशानां समूहः पाश्या येथेंही त्या शास्त्राची प्रवृत्ति होऊं लागेल.

षकार लावण्याचा हा उपयोग संभवत नाहीं. कारण 'वा क्यषः' यानें विकल्पानें परस्मैपदाचें विधान केलें आहे, आणि पाश्या येथें परस्मैपद किंवा आत्मनेपद कांहींच दृष्टीस पडत नाहीं.

तर मग ज्या ठिकाणीं क्य असा शब्द उच्चारला असेल तेथें त्या क्यशब्दानें क्यच्, क्यङ्, यांप्रमाणें क्यष्प्रत्ययाचेंही ग्रहण व्हावें याकरितां क्यष्प्रत्ययाला षकार जोडला आहे.

असें सामान्यग्रहण करण्याचा कुठें बरें उपयोग येतो ?

'क्याच्छन्दसि' (३।२।१७०) येथें होतो.[10]

पण चुरण्य, तुरण्य, भुरण्य, या कण्ड्वादि यगन्ताहून उप्रत्यय होण्यासाठीं क्याच्छन्दसि याचे ऐवजीं 'याच्छन्दसि' असेंच सूत्र केलें पाहिजे.[11]

(वा.१) लोहित हा शब्द आणि डाच्प्रत्ययान्त शब्द यांहून क्यष् होतो, असें येथें

---

७. येथें पत्नी आणि गर्भिणी या शब्दांना छान्दस म्हणून ऱ्हस्व करून नंतर गुण (७।३।१०९) केला आहे.

८. येथें पाशशब्दाहून समूह या अर्थी यप्रत्यय (४।२।४९) व पुढें स्त्रीलिंगी टाप्प्रत्यय झाला आहे.

९. कारण पाश्या हें क्रियापदच नव्हे.

१०. षकार जोडला नाही तर ह्या एकट्या क्यप्रत्ययाचेंच 'क्याच्छन्दसि' येथील क्य या शब्दानें ग्रहण होईल. कारण क्यच्, क्यङ्, या प्रत्ययांना चकार, डकार, हे अनुबंध जास्त आहेत, आणि सूत्रामध्यें एकच अनुबंध उच्चारला असेल आणि तेवढ्याच अनुबंधाचा जर प्रत्यय मिळेल तर तो एकच प्रत्यय त्यानें घेतला जातो अशी 'एकानुबंधकग्रहणे न द्व्यनुबंधकस्य ग्रहणम्' ही परिभाषा आहे. आणि येथें षकार लावला म्हणजे मात्र सर्वच प्रत्ययांना सारखेंच अनुबंध झाल्यामुळें क्य या शब्दानें तिघांचेंही ग्रहण होतें.

११. तसें सूत्र रचिलें असतां यप्रत्ययान्त धातूहून उप्रत्यय होतो असा त्याचा अर्थ होतो. तेथे ज्यांत बिलकूल अनुबंध नाहीं असा यप्रत्यय शेवटी असलेला धातु कोठेंही मिळत नाहीं. तेव्हां ज्यांत अनुबंध आहे असाच यप्रत्यय शेवटी असलेला धातु उप्रत्यय करण्यासाठी गृहीत धरला पाहिजे. तेव्हां कण्ड्वादियगन्ताहून जसा उप्रत्यय होतो तसा षकार काढून टाकलेला असा जो क्यप्रत्यय तो शेवटी असलेल्या धातूहूनही उप्रत्यय होण्यास हरकत नाहीं. सबब क्यष्प्रत्ययांतील षकाराचा कांहीही

तायति लोहितायते । पटपटायति पटपटायते ॥ अथान्यानि लोहितादीनि ।

**भृशादिष्वितराणि ॥२॥**

भृशादिष्वितराणि पठितव्यानि । किं प्रयोजनम् । ङित इत्यात्मनेपदं यथा स्यादिति ॥

**कष्टाय क्रमणे ॥ ३ । १ । १४ ॥**

कष्टायेति किं निपात्यते । कष्टशब्दाच्चतुर्थीसमर्थात्क्रमणेऽनार्जवे क्यङ्निपात्यते । कष्टाय कर्मणे क्रामति कष्टायते ॥ अत्यल्पमिदमुच्यते कष्टायेति ।

**सत्रकक्षकष्टगहनेभ्यः कण्वचिकीर्षायाम् ॥ १ ॥**

सत्रकक्षकष्टगहनेभ्यः कण्वचिकीर्षायामिति वक्तव्यम् । सत्त्रायते । सत्त्र ॥ कक्ष । कक्षायते । कक्ष ॥ कष्ट । कष्टायते । कष्ट ॥ गहन । गहनायते ॥

अपर आह । सत्त्रादिभ्यश्चतुर्थ्यन्तेभ्यः क्रमणेऽनार्जवे क्यङ्वक्तव्यः । एतान्येवोदाहरणानि ॥ सत्त्रादिभ्य इति किमर्थम् । कुटिलाय क्रामत्यनुवाकाय । चतुर्थ्यन्तेभ्य इति किमर्थम् । अजः कष्टं

---

सांगावें; जसें:– लोहितायति लोहितायते, पट[१२]पटायति पटपटायते, दमदमायति दमदमायते, मटमटायति मटमटायते.

लोहितशब्दाखेरीज इतर जे लोहितादिगणांतील शब्द त्यांची काय वाट ?

(वा.२) लोहितशब्दाखेरीज इतर जे लोहितादिगणांतील शब्द त्यांचा भृशादिगणामध्यें पाठ करावा.

भृशादिगणामध्यें त्यांचा पाठ करण्याचा काय उपयोग ?

त्या प्रातिपदिकांहून क्यङ्प्रत्यय होतो म्हणून क्यङन्ताहून 'अनुदात्तङितः०' (१।३।१२) यानें नित्य आत्मनेपद होतें, हा उपयोग होय.

(सू.१४) कष्टाय येथें काय निपातितें आहे ?[१]

अन्वययोग्य चतुर्थीविभक्त्यन्त अशा कष्टशब्दाहून कुटिलमार्गानें जाण्याविषयींचा उत्साह या अर्थी क्यङ्प्रत्ययाचें निपातन केलें आहे; जसें:– कष्टाय कर्मणे क्रामति कष्टा[३]यते.

कष्टाय क्रमणे असें जें सूत्र केलें आहे तें अगदींच अपुरें आहे.

(वा.१) सत्र, कक्ष, कष्ट, कृच्छ्र आणि गहन यांहून क्यङ् होतो, पाप करण्याची इच्छा गम्यमान असतांना, असें वचन करावें; जसें:– सत्रायते, कक्षायते, कष्टायते, कृच्छ्रायते, गहनायते.

अन्य कोणी एक वैयाकरण असें म्हणतो की चतुर्थीविभक्त्यन्त अशा सत्त्रादिशब्दाहून भलत्या मार्गानें जाण्याविषयींचा उत्साह या अर्थी क्यङ्प्रत्यय होतो असें वचन करावें. वर दाखविलेलीं तींच उदाहरणें समजावींत.

येथें सत्त्रादिभ्यः हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

कुटिलायानुवा[४]काय क्रामति.

चतुर्थ्यन्तेभ्यः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

अजः कष्टं क्रा[५]मति.

---

उपयोग नाहीं.

१२. वा क्यषः (१।३।९०) यानें येथें विकल्पानें परस्मैपद झालें आहे.

१. चतुर्थीविभक्त्यन्त अशा कष्टशब्दाहून उत्साह या अर्थी क्यङ्प्रत्यय होतो; उदा०– कष्टाय क्रमते कष्टायते.

२. कष्टशब्दाहून क्रमण या अर्थी क्यङ्प्रत्ययाचें विधान असें गृहीत धरलें तर अनृजुकर्मविषयक उत्साह या अर्थविशेषाचा लाभ होणार नाहीं म्हणून निपातनाचा आश्रय केला आहे.

३. भलत्या मार्गानें जाण्याविषयीं याचा पहिला पाय आहे, असा अर्थ येथें प्रतीत होतो.

४. एखादा कठिन अनुवाक एखादा विद्यार्थी मोठ्या हौसेनें वेड्यावाकड्या तऱ्हेनें म्हणतो असा अर्थ आहे.

५. वेड्यावाकड्या मार्गानें जातो,

क्रामति ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नैतत्प्रत्ययान्तनिपातनम् । किं तर्हि । तादर्थ्ये एषा चतुर्थी । कष्टाय यत्प्रातिपदिकम् । कष्टार्थे यत्प्रातिपदिकमिति ॥

**कर्मणो रोमन्थतपोभ्यां वर्तिचरोः ॥ ३ । १ । १५ ॥**

रोमन्थ इत्युच्यते को रोमन्थो नाम । उद्गीर्णस्य वावगीर्णस्य वा मन्थो रोमन्थ इति । यद्येवं हनुचलन इति वक्तव्यम् । इह मा भूत् । कीटो रोमन्थं वर्तयतीति ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । कस्मान्न भवति कीटो रोमन्थं वर्तयति । अनभिधानात् ॥

**तपसः परस्मैपदं च ॥ १ ॥**

तपसः परस्मैपदं चेति वक्तव्यम् । तपश्चरति तपस्यति । कथं तपस्यते लोकजिगीषुरग्नेः ।

छान्दसत्वाद्भविष्यति ।

**[1]बाष्पोष्मभ्यामुद्वमने ॥३।१।१६॥**

फेनाच्चेति वक्तव्यम् । फेनायते ॥

**शब्दवैरकलहाभ्रकण्वमेघेभ्यः**

---

तर मग सत्र, कक्ष, कष्ट, वगैरे शब्द सूत्रामध्यें घातले पाहिजेत.

घालावयास नकोत. कारण कष्टाय हें क्यङ्प्रत्ययान्ताचें निपातन आहे, असें समजूं नये. तर तादर्थ्य या अर्थाची जी चतुर्थी तदन्ताचें हें रूप आहे. तेव्हां कष्टाय यत् = कष्ट हा अर्थ दाखविण्याकरितां उच्चारलेलें जें प्रातिपदिक त्याहून असा अर्थ होतो.

(सू.१५) रोमन्थशब्दाहून असें येथें म्हटलें आहे. तेथें रोमन्थ म्हणजे काय ?

तोंडावाटे गिळलेल्या पदार्थांचें परत तोंडामध्यें आकर्षण करून चर्वण करणें तो रोमन्थ होय किंवा अपानप्रदेशांतून बाहेर पडलेल्या पदार्थांचें भक्षण करणें तोही रोमन्थ होय, असे रोमन्थशब्दाचे दोन अर्थ आहेत.

तर हनुचलन म्ह.हनुवटीचें चालन होत असतांना असें वचन करावें. कारण कीटो रोमन्थं[2] वर्तयति येथें क्यङ्प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तें तसें वचन केलें पाहिजे.

तें वचन करावयास नको.

मग कीटो रोमन्थं वर्तयति येथें क्यङ्प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

रोमन्थायते या क्यङन्तापासून लोकामध्यें रवंथ करणें हाच अर्थ मनांत येतो. अपानप्रदेशांतून बाहेर पडलेल्या पदार्थांचें भक्षण हा अर्थ मनांत येत नाहीं. म्हणून तेथें क्यङ्प्रत्यय होत नाहीं.

(वा.१) तपस्शब्दाहून क्यङ्प्रत्यय केला असतां पुढें परस्मैपद होतें असें वचन करावें; जसें:– तपश्चरति तपस्यति.

तर मग तपस्यते लोकजिगीषुरग्नेः येथें आत्मनेपद कसें केलें आहे ?

तो प्रयोग वैदिक असल्यामुळें तेथें आत्मनेपद होईल.

(सू.१६)फेनशब्दाहूनही उद्वमन या अर्थी क्यङ्प्रत्यय होतो असें वचन करावें; जसें:–

शकतें.

---

१. कर्मवाचक रोमन्थशब्दाहून चर्वण करणें या अर्थीं आणि कर्मवाचक तपस्शब्दाहून आचरण करणें या अर्थीं क्यङ्प्रत्यय होतो; उदा०– रोमन्थं वर्तयति रोमन्थायते, तपश्चरति तपस्यति.

२. येथें अपानप्रदेशांतून बाहेर पडलेला पदार्थ भक्षण करतो असा अर्थ आहे. या भक्षणामध्यें हनुचलन असत नाहीं. म्हणून येथें क्यङ् होत नाहीं. चघळणें (रवंथ करणें) यामध्येंच हनुचलन असे

१ कर्मवाचक अशा बाष्पशब्दाहून किंवा ऊष्मशब्दाहून उद्वमन म्हणजे बाहेर टाकणें या अर्थीं क्यङ्प्रत्यय होतो; उदा०– बाष्पमुद्वमति बाष्पायते, ऊष्माणमुद्वमति ऊष्मायते.

१. शब्द, वैर, कलह, अभ्र, कण्व आणि मेघ या शब्दांहून करोति या अर्थीं क्यङ्प्रत्यय होतो, उदा०– शब्दं करोति शब्दायते, वैरायते.

## करणे ॥ ३ । १ । १७ ॥

अटाट्टाशीकाकोटापोटासोटाप्रुष्टाप्लुष्टाग्रहणं कर्तव्यम् । अटा । अटायते ॥ अट्टा । अट्टायते ॥ शीका । शीकायते ॥ कोटा । कोटायते ॥ पोटा । पोटायते ॥ सोटा । सोटायते । प्रुष्टा । प्रुष्टायते ॥ प्लुष्टा । प्लुष्टायते ॥

### सुदिनदुर्दिनाभ्यां च ॥ १ ॥

सुदिनदुर्दिनाभ्यां चेति वक्तव्यम् । सुदिनायते दुर्दिनायते ॥

### नीहाराच्च ॥ २ ॥

नीहाराच्चेति वक्तव्यम् । नीहारायते ॥

## सुखादिभ्यः कर्तृवेदनायाम् ॥ ३ । १ । १८ ॥

कर्तृवेदनायामिति किमर्थम् । इह मा भूत् । सुखं वेदयते प्रसाधको देवदत्तस्य ॥ कर्तृवेदनायामित्युच्यमानेऽप्यत्र प्राप्नोति । किं कारणम् । कर्तुरितीयं कर्तरि षष्ठी । वेदनायामिति चानो भावे । स यद्येवात्मनो वेदयतेऽथापि परस्य कर्तृवेदनैवासौ भवति ॥ न कर्तृग्रहणेन वेदनाभिसंबध्यते । किं तर्हि । सुखादीन्यभिसंबध्यन्ते । कर्तुर्यानि सुखादीनि ॥

## नमोवरिवश्चित्रङः क्यच् ॥ ३ । १ । १९ ॥

---

फेनमुद्वमति फेनायते.

(सू.१७) अटा, अट्टा, शीका, कोटा, पोटा, सोटा, प्रुष्टा, प्लुष्टा, या शब्दांचें सूत्रामध्यें ग्रहण करावें; जसें– अटां करोति अटायते, अट्टायते, शीकायते, कोटायते, पोटायते, सोटायते, प्रुष्टायते, प्लुष्टायते.

(वा.१) सुदिन आणि दुर्दिन या शब्दांहूनही करोति या अर्थी क्यङ् होतो, असें वचन करावें; जसें:– सुदिनं करोति सुदिनायते, दुर्दिनायते.

नीहार या शब्दाहूनही क्यङ्प्रत्यय होतो, असें वचन करावें; जसें:– नीहारं करोति नीहारायते.

(सू.१८) येथें कर्तृवेदनायाम् हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

सुखं वेदयते प्रसाधको देवदत्तस्य येथें क्यङ्प्रत्यय न झाला पाहिजे.

पण कर्तृवेदनायाम् हा शब्द घातला तरी देखील येथें क्यङ्प्रत्यय प्राप्त होतोच.

काय कारण ?

कारण असें की कर्तुः वेदना कर्तृवेदना अशा ह्या षष्ठीतत्पुरुषसमासांतील कर्तुः ही ज्ञानाचा कर्ता अशा अर्थाची कर्तरि षष्ठी (२।३।६५) आहे, आणि वेदना ह्या शब्दांतील अन म्हणजे युच्प्रत्यय (३।३।१०७) भाव या अर्थी केला आहे. तेव्हां कर्त्याचें ज्ञान असा कर्तृवेदना या पदाचा अर्थ होतो. असें असतां तो कर्ता आपलें सुख जाणो किंवा दुसऱ्याचें सुख जाणो, पण तें जाणणें कर्त्याचेंच होतें.

कर्तृशब्दाचा वेदनेशीं संबंध करावयाचा नाहीं.

तर कोणाकडे संबंध करावयाचा ?

सुखादिकांकडे त्याचा संबंध करावयाचा[3]. तेव्हां जाणणारा हा स्वतःचेंच सुख जाणीत असेल तरच क्यङ्प्रत्यय होतो.

---

१. कर्मवाचक जे सुखादिगणपठित शब्द त्यांहून जाणणें या अर्थी क्यङ्प्रत्यय होतो; परंतु तें सुख वगैरे जाणणाऱ्याला स्वतःला होत असेल तर; उदा०— आत्मनः सुखं वेदयते सुखायते देवदत्तः, दुःखायते.

२. प्रसाधक म्हणजे सेवा करणारा चाकर. तो सेवेपासून मालकाला सुख होत आहे असें जाणतो, असा या वाक्याचा अर्थ आहे. तेव्हां येथें जाणणारा चाकर, आणि सुख मालकाला, असें होत आहे.

३. कर्तृवेदनायाम् येथील कर्तृशब्द लुप्तषष्ठ्यन्त पृथक् पद होय. तसें गृहीत धरल्याशिवाय त्याचा सुखादिकांबरोबर अन्वय करतां येणार नाहीं.

१. नमस्, वरिवस् आणि चित्रङ् या शब्दांहून क्यङ्प्रत्यय होतो, पण क्रमानें पूजा करणें, सेवा करणें आणि आश्चर्यचकित होणें हे अर्थ गम्यमान असतांना; उदा०– नमस्यति देवान्, वरि-

**नमसः क्यचि द्वितीयानुपपत्तिः॥१॥**

नमसः क्यचि द्वितीया नोपपद्यते। नमस्यति देवान्। किं कारणम्। नमःशब्देन योगे चतुर्थी विधीयते सा प्राप्नोति॥

**प्रकृत्यन्तरत्वात्सिद्धम् ॥२॥**

नमःशब्देन योगे चतुर्थी विधीयते नमस्यतिशब्दश्चायम्। ननु च नमस्यतिशब्दे नमःशब्दोऽस्ति तेन योगे प्राप्नोति। नैष दोषः। अर्थवतो नमःशब्दस्य ग्रहणं न च नमस्यतिशब्दे नमःशब्दोऽर्थवान्॥ अथवोपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसीति द्वितीया भविष्यति॥

**क्यजादिषु प्रत्ययार्थनिर्देशः ॥३॥**

क्यजादिषु प्रत्ययार्थनिर्देशः कर्तव्यः। नमसः पूजायाम्। वरिवसः परिचर्यायाम्। चित्रङ आश्चर्ये। भाण्डात्समाचयने। चीवरादर्जने परिधाने वा। पुच्छादुदसने व्यसने पर्यसने चेति। किं प्रयोजनम्। क्रियावचनता यथा स्यात्॥ नैतदस्ति प्रयोजनम्। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति क्रिया-

---

(सू.१९, वा.१) नमस्‌शब्दाहून क्यच्‌प्रत्यय केला असतां नमस्यति देवान् येथें देवशब्दाच्या पुढें द्वितीया केली ती बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें की नमस्‌शब्दाचा योग असतांना चतुर्थी सांगितली आहे (२।३।१६) ती प्राप्त होते.

(वा.२) नमस्‌शब्दाचा योग असतांना चतुर्थी सांगितली आहे, आणि येथें तर नमस्‌शब्दाहून निराळा जो नमस्यतिशब्द त्याचा योग आहे, म्हणून चतुर्थी होत नाहीं.

पण नमस्यति या शब्दामध्यें नमस् आहे ना ? तेव्हां त्याचा योग असल्यामुळें चतुर्थी प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'नमःस्वस्ति०' (२।३।१६) या सूत्रामध्यें अर्थवान् नमस्‌शब्द घ्यावयाचा आहे, आणि नमस्यति यांतील नमस्‌शब्द तर अर्थवान् नाहीं.[2]

अथवा 'उपपदविभक्तीपेक्षां कारकविभक्ति बलवत्तर आहे' या परिभाषेच्या[3] जोरावर चतुर्थीला मागें सारून कारकविभक्ति द्वितीया होईल.

(वा.३) प्रकृत सूत्रानें सांगितलेला क्यच् आणि पुढील सूत्रानें सांगितलेला णिङ् या प्रत्ययांच्या अर्थाचा उल्लेख करावा.

नमस्‌शब्दाहून करावयास सांगितलेला क्यच्‌प्रत्यय पूजा या अर्थी करावा.

वरिवस्‌शब्दाच्या पुढें करावयास सांगितलेला क्यच्‌प्रत्यय शुश्रूषा या अर्थी करावा.

चित्रङ्‌शब्दाच्या पुढें करावयास सांगितलेला क्यच् आश्चर्य या अर्थी करावा.

भाण्डशब्दाच्या पुढें करावयास सांगितलेला णिङ्‌प्रत्यय राशीकरण या अर्थी करावा.

चीवरशब्दाच्या पुढें करावयास सांगितलेला णिङ्‌प्रत्यय अर्जन किंवा परिधान या अर्थी करावा.

पुच्छशब्दाच्या पुढें करावयास सांगितलेला णिङ्‌प्रत्यय उभारणें किंवा विविध अथवा विरुद्ध असें उत्क्षेपण अगर इतस्ततः क्षेपण या अर्थी करावा.

क्यच् वगैरे प्रत्ययांच्या अर्थाचा उल्लेख करण्याचा काय उपयोग ?

क्यच् वगैरे प्रत्यय शेवटीं असलेल्या समुदायाला क्रियावाचकत्व प्राप्त व्हावें हा उप-

---

वस्यति गुरून्, चित्रीयते.

२. नमस्यति ही वृत्ति असल्यामुळें त्यांतील नमस्‌शब्दाला अर्थ नाहीं असें गृहीत धरलें आहे.

३. पूजन करणें या क्रियेचें देव हें कर्म असल्यामुळें त्याहून प्राप्त झालेली द्वितीया ही कारकविभक्ति होय.

**वचनाः क्यजादय इति यदयं सनाद्यन्ता धातवः [३.१.३२] इति धातुसंज्ञां शास्ति। कथं कृत्वा ज्ञापकम्। धातुसंज्ञावचन एतत्प्रयोजनं धातोः [३.१.९१] इति तव्यदादीनामुत्पत्तिर्यथा स्यात्। यदि चात्र क्रियावचनता न स्याद्धातुसंज्ञावचनमनर्थकं स्यात्। सत्यामपि धातुसंज्ञायां तव्यदादयो न स्युः। किं कारणम्। साधने तव्यदादयो विधीयन्ते साधनं च क्रियायाः। क्रियाभावात्साधनाभावः। साधनाभावात्सत्यामपि धातुसंज्ञायां तव्यदादयो न स्युः। पश्यति त्वाचार्यः क्रियावचनाः क्यजादय इति ततः सनाद्यन्ता धातव इति धातुसंज्ञां शास्ति॥ ननु चेदं प्रयोजनं स्यात्परसाधन उत्पत्तिं वक्ष्यामीति। न परसाधन उत्पत्त्या भवितव्यम्। किं कारणम्। साधनमिति संबन्धिशब्दोऽयम्। संबन्धिशब्दाश्च पुनरेवमात्मका यदुत संबन्धिनमाक्षिपन्ति। तद्यथा। मातरि वर्तितव्यं पितरि शुश्रूषितव्यमिति। न चोच्यते स्वस्यां मातरि स्वस्मिन्वा पितरीति संबन्धाच्चैतद्गम्यते या यस्य माता यश्च यस्य पितेति। एवमिहापि संबन्धादेतद्गन्तव्यं यस्य धातोर्यत्साधनमिति॥ अथवा धातव**

---

योग होय.

हा उपयोग संभवत नाहीं. कारण क्यजादिप्रत्ययान्त हे क्रियावाचक आहेत असें आचार्यांचा व्यवहारच ज्ञापन करीत आहे, ज्यापेक्षां हे आचार्य पाणिनि 'सनाद्यन्ता धातवः' (३।१।३२) यानें सनादिप्रत्ययान्त शब्दांना धातुसंज्ञेचें विधान करीत आहेत.

हें ज्ञापक कसें बरें जुळतें?

असें जुळते की धातुसंज्ञा सांगण्याचें प्रयोजन हें आहे की धातूहून करावयास सांगितलेले तव्य वगैरे प्रत्यय क्यजादिप्रत्ययान्ताहून व्हावेत; पण जर क्यजादि प्रत्ययान्तांना क्रियावाचकत्वच नसेल तर धातुसंज्ञा सांगितलेली व्यर्थ होईल; कारण धातुसंज्ञा झाली तरी देखील तव्य वगैरे प्रत्ययांची उत्पत्ति होणारच नाहीं.

काय कारण?

कर्म वगैरे कारकार्थी तव्य वगैरे प्रत्यय सांगितले आहेत. आणि कारक तर क्रियेमुळेंच असतें. तेव्हां क्रिया नसली तर कारक नसणारच. आणि कारक नसलें तर धातुसंज्ञा झाली तरी देखील तव्य वगैरे प्रत्यय होणार नाहींतच. तेव्हां क्यजादिप्रत्ययान्त हे क्रियावाचक आहेत असें असें आचार्य खात्रीनें समजत असलेच पाहिजेत. म्हणूनच क्यजादिप्रत्ययान्तांना 'सनाद्यन्ता धातवः' (३।१।३२) असें सूत्र करून धातुसंज्ञा सांगत आहेत.

पण क्यजादिप्रत्ययान्तांना स्वतः क्रियावाचकत्व नसलें तरी त्यांना धातुसंज्ञा सांगण्याचा उपयोग असा संभवतो की दुसऱ्या कोणत्या तरी क्रियेचें कारक मनांत धरून त्या अर्थी तव्य वगैरे प्रत्यय त्या क्यजादिप्रत्ययान्ताहून करतां येतील.

अशा रीतीनें धातुसंज्ञेचा उपयोग मुळींच करतां येणार नाहीं.

काय कारण?

कारण असें की साधन (म्ह. कारक) हा संबंधी शब्द आहे, आणि संबंधी शब्दांचा तर स्वभाव असा आहे की दुसऱ्या कोणाशीं तरी त्यांचा संबंध आहे असें त्या शब्दांपासून नियमानें मनांत येतें; जसें:–'आईला अनुसरून वागावें', 'बापाची सेवा करावी', असें सांगितलें असतां आपल्या आईबापाची असें तेथें सांगावें लागत नाहीं. कारण आईबाप हे संबंधी शब्द असल्यामुळें त्या संबंधी शब्दांच्या जोरावर अनुकरणाऱ्याचीच आई व सेवा करणाऱ्याचाच बाप असें समजलें जातें. त्याप्रमाणें येथेंही संबंधी शब्दाच्या जोरावर असें

एव क्यजादयः । न चैव ह्यर्था आदिश्यन्ते क्रियावचनता च गम्यते । कः खल्वपि पचादीनां क्रियावचनत्वे यत्नं करोति । येनैव खल्वपि हेतुना पचादयः क्रियावचनास्तेनैव क्यजादयोऽपि । एवमर्थं खल्वाचार्यश्चित्रयति । क्वचिदर्थानादिशति क्वचिन्न ॥ एवमप्यर्थादेशनं कर्तव्यं कथमिमेऽबुधा बुध्येरन्निति ॥ अथवा शक्यमर्थादेशनमकर्तुम् । कथम् । करण इति वर्तते करणं च करोतेः करोतिश्च क्रियासामान्ये वर्तते ॥

[पुच्छभाण्डचीवराण्णिङ् ॥ ३ । १ । २० ॥]

मुण्डमिश्रश्लक्ष्णलवणव्रतवस्त्रहलकलकृततूस्तेभ्यो णिच् ॥ ३ । १ । २१ ॥

इमौ हलिकली स्त इकारान्तौ । अस्ति हलशब्दः कलशब्दश्चाकारान्तः । कयोरिदं ग्रहणम् । याविकारान्तौ तयोरत्वं निपात्यते । किं प्रयोजनम् ।

---

स्पष्टच समजतें की ज्या धातूचें जें साधन म्ह. कारक त्या अर्थी धातूहून प्रत्यय होतात.

अथवा क्यच् वगैरे प्रत्यय हे स्वभावतःच विशेष क्रिया दाखविणारे असल्यामुळें तेथें प्रत्ययान्ताला धातु म्हणण्याला कांहींच हरकत नाहीं. जरी त्यांचा विशेष क्रिया हा अर्थ प्रत्यक्ष सांगितला नाहीं तरी प्रयोगामध्यें त्या त्या प्रत्ययान्तापासून ती ती विशेष क्रिया गम्यमान होत आहे. शिवाय असें पहा की पच् वगैरे धातु हे क्रियावाचक आहेत हे सिद्ध करण्याकरितां कोणीं प्रयत्न केला आहे काय ? तेव्हां ज्या कारणावरून पच् वगैरे क्रियावाचक म्हणून समजले जातात त्याच कारणावरून क्यजादिप्रत्ययान्तही क्रियावाचक म्हणून समजले जातील. ही गोष्ट लोकांच्या ध्यानीं यावी म्हणूनच कीं काय आचार्यांनीं धातूंचा अर्थ सांगण्याच्या कामीं विचित्रपणा स्वीकारला आहे. तो असा की कांहीं ठिकाणीं अर्थाचा उल्लेख केला आहे आणि कांहीं ठिकाणीं नाहीं.

असें जरी आहे तरी येथें अर्थाचा निर्देश केलाच पाहिजे. कारण त्यावांचून हे अज्ञानी लोक क्यजादिप्रत्ययान्ताचे क्रियावाचित्व कसें बरें जाणू शकतील ?

अथवा 'नमसः पूजायाम्' इत्यादि क्यच् वगैरे प्रत्ययांच्या अर्थांचा निर्देश न करणें शक्य आहे.

तें कसें ?

'शब्दवैरकलहा०' (३।१।१६१) येथून 'करणे' या पदाची अनुवृत्ति येत आहे. करणे हा करोतिधातूचा अर्थ. तो करोतिधातु हा सामान्यक्रियावाचक आहे.

(सू.२१) हलि आणि कलि हे दोन शब्द इकारान्त आहेत आणि हल, कल, असे अकारान्तही आहेत. त्यांपैकीं सूत्रांतील हलकलशब्दानें कोणाचें ग्रहण करावयाचें ?

इकारान्त हलि आणि कलि या शब्दांचें ग्रहण करून त्यांतील इकाराला अकारादेशाचें निपातन केलें आहे.

असें करण्याचा काय उपयोग ?

---

४. सामान्यक्रिया ही विशेष क्रियेवांचून अस्तित्वांत येत नसल्यामुळें विशेष क्रियेची प्रतीति त्या त्या धातूंपासून सहजच होईल.

१. पुच्छ, भाण्ड आणि चीवर या शब्दांहून क्रियाविशेष या अर्थी णिङ्प्रत्यय होतो; उदा०--पुच्छमुदस्यति उत्पुच्छयते, भाण्डानि समाचिनोति संभाण्डयते, चीवराण्यर्जयति संचीवरयते.

१. मुण्ड, मिश्र, श्लक्ष्ण, लवण, व्रत, वस्त्र, हल, कल, कृत आणि तूस्त या शब्दांहून कृधातूच्या अर्थी णिच्प्रत्यय होतो; उदा०—मुण्डं करोति मुण्डयति.

**हलिकल्योरत्वनिपातनं सन्वद्भाव-प्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

हलिकल्योरत्वनिपातनं क्रियते सन्वद्भावो मा भूदिति। अजहलत् अचकलत्॥ नैतदस्ति प्रयोजनम्। इकारलोपे कृतेऽग्लोपिनां नेति प्रतिषेधो भविष्यति। वृद्धौ कृतायां लोपस्तन्नाग्लोप्यङ्गं भवति॥ इदमिह संप्रधार्यम्। वृद्धिः क्रियतामग्लोप इति किमत्र कर्तव्यम्। परत्वाद्वृद्धिः। नित्यो लोपः। कृतायामपि वृद्धौ प्राप्नोत्यकृतायामपि प्राप्नोति। अनित्यो लोपः। अन्यस्य कृतायां वृद्धौ प्राप्नोत्यन्यस्याकृतायां शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति। वृद्धिरप्यनित्या। अन्यस्य कृते लोपे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति। उभयोरनित्ययोः परत्वाद्वृद्धिः। वृद्धौ कृतायां लोपस्तन्नाग्लोप्यङ्गं भवति॥ अत्वे पुनः सति वृद्धिः क्रियतां लोप इति यद्यपि परत्वाद्वृद्धिर्वृद्धौ कृतायामप्यगेव लुप्यते। तस्मात्सुष्ठूच्यते हलिकल्योरत्वनिपातनं सन्वद्भावप्रतिषेधार्थमिति॥

---

(वा.१) अजहलत्, अचकलत्, येथें सन्वद्भावाचा अनग्लोपे (७।४।९३) हा निषेध व्हावा यासाठीं हलि, कलि, या शब्दांच्या इकाराला अकारादेशांचें निपातन केलें आहे.[२]

अकारादेश करण्याचा हा उपयोग संभवत नाहीं. कारण हलिकलिशब्दांतील इकाराला अकारादेश न करतां लोप केला तरीही अकाचाच लोप होत असल्यामुळें सन्वद्भाव होणार नाहीं.

पण इकाराला वृद्धि केल्यानंतर लोप झाला तर तो लोप अकाचा होत नाहीं.

आतां येथें हा विचार करावा की प्रथमतः वृद्धि (७।२।११५) करावी किंवा टिलोप (६।४।५५) करावा.

मग यांत काय बरें करावें?

पर असल्यामुळें वृद्धि अगोदर करावी.

पण वृद्धि केली तरीही लोप येऊं शकतो, आणि वृद्धि न केली तरीही येऊं शकतो, म्हणून लोप नित्य आहे ना?

त्याचप्रमाणें टिलोप केला असतांही वृद्धि प्राप्त होते आणि टिलोप केला नसतांही प्राप्त होते म्हणून वृद्धिही नित्य आहेच. शिवाय लोप अनित्य आहे. कारण वृद्धि केली असतां ऐकाराचा लोप प्राप्त होतो आणि वृद्धि केली नसतां इकाराचा लोप प्राप्त होतो. अशा रीतीनें 'भिन्न भिन्न शब्दांचे स्थानीं प्राप्त होणारा विधि अनित्य होय' अशी परिभाषा आहे.

पण तशी वृद्धिही अनित्यच आहे. कारण लोप केला असतां उपधाभूत अकाराला वृद्धि प्राप्त होते व लोप केला नसतां इकाराला वृद्धि प्राप्त होते. अशा रीतीनें भिन्न भिन्न शब्दाचे स्थानीं प्राप्त झालेला विधि अनित्य समजला जातो.

तेव्हां अनित्य अशा या दोन विधींमध्यें परत्वास्तव प्रथमतः वृद्धि होईल. आणि वृद्धि केल्यानंतर मागून लोप झाला म्हणजे तें अंग अग्लोपि होऊं शकत नाहीं.

आणि इकाराचे स्थानीं अकारादेश केला म्हणजे मात्र वृद्धि करावी किंवा लोप करावा असा विचार उत्पन्न झाला असतां जरी परत्वास्तव प्रथमतः वृद्धि झाली तरीही अकाचाच लोप होतो. एकंदरींत सन्वद्भावाच्या प्रतिषेधाकरितां हलि आणि कलि या शब्दांतील इकाराला अकारादेशाचें निपातन केलें आहे असें जें म्हटलें आहे तें बरोबर आहे.

---

२. हल व कल या शब्दांचीं अजहलत्, अचकलत्, हीं रूपें होतीलच. तरी पण हलि, कलि, या शब्दांचीं अजीहलत्, अचीकलत्, अशीं भलतींच रूप होतील; तीं न व्हावींत याकरितां येथें अकारादेशाच

## धातोरेकाचो हलादेः क्रियासमभिहारे यङ् ॥ ३ । १ । २२ ॥

समभिहार इति कोऽयं शब्दः । समभिपूर्वाद्धरतेर्भावसाधनो घञ् । समभिहरणं समभिहारः । तद्यथा । पुष्पाभिहारः फलाभिहारः इति ॥ विषम उपन्यासः । बह्वयो हि ता सुमनसस्तत्र युक्तः समभिहारः । इह पुनरेका क्रिया ॥ यद्यप्येका सामान्यक्रियावयवक्रियास्तु बह्वयः । अधिश्रयणोदकासेचनतण्डुलावपनैधोपकर्षणक्रियाः । ताः कश्चित्कार्त्स्न्येन करोति कश्चिदकार्त्स्न्येन । यः कार्त्स्न्येन करोति स उच्यते पापच्यत इति । पुनः पुनर्वा पचति पापच्यत इति ॥

अथ धातुग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । प्राटति भृशमिति ॥ अत उत्तरं पठति ।

### यङ्विधौ धातुग्रहण उक्तम् ॥ १ ॥

किमुक्तम् । तत्र तावदुक्तं कर्मग्रहणात्सन्विधौ धातुग्रहणानर्थक्यं सोपसर्गे कर्मेति चेत्कर्मविशेषकत्वादुपसर्गस्यानुपसर्गं कर्म सोपसर्गस्य हि कर्मत्वे धात्वधिकारेऽपि सनोऽविधानमकर्मत्वादिति । एवमिहापि क्रियासमभिहारग्रहणाद्यङ्विधौ धातुग्रहणानर्थक्यं सोपसर्गः क्रियासमभिहार इति चेत्क्रियासमभिहारविशेषकत्वादुप-

---

(सू २२) समभिहार म्हणजें काय ?

सम्, अभि, हे दोन उपसर्ग मागें असतां हृधातूहून भावे घञ्प्रत्यय करून समभिहार हा शब्द साधला आहे. तेव्हां समभिहरणं समभिहारः, म्ह. अनेक पदार्थ एका ठिकाणीं गोळा करणें, असा अर्थ सिद्ध होतो; जसें:— पुष्पाभिहारः, उत्पलाभिहारः, मालाभिहारः, फलाभिहारः.

हीं जीं पुष्पाभिहारः वगैरे उदाहरणें दाखविलीं त्यांत वैषम्य आहे. कारण पुष्पें वगैरे पदार्थ बहुत आहेत. म्हणून तेथें गोळा करणें हा अर्थ जुळतो. आणि येथें तर क्रिया ही एकच आहे. तेव्हां तेथे समभिहार कसा असूं शकणार ?

जरी क्रिया एक आहे तरी पण त्या एका सामान्य क्रियेमध्यें पोटक्रिया बहुत आहेत; जसें:— पचन करणें ह्या एका सामान्य क्रियेमध्यें चुलीवर भांडें ठेवणें, त्यांत पाणी घालणें, तांदूळ वैरणें, लाकडें सारणें, वगैरे पोटक्रिया अनेक आहेत. त्या क्रिया कोणी सर्वांशानें करतो, कोणी कांहीं अंशानें करतो. त्यांत जो त्या क्रिया सर्वांशानें करतो त्या ठिकाणीं पापच्यते असा प्रयोग होतो. किंवा वारंवार पचनक्रिया करीत असेल तर त्या ठिकाणींही पापच्यते असा प्रयोग होतो.

आतां येथें धातोः हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

प्राटति भृशम् येथें 'प्र अट्' एवढ्या समुदायाहून यङ्प्रत्यय न व्हावा म्हणून घातला आहे. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतातः—

(वा.१) यङ्विधायक सूत्रांतील धातुग्रहणाविषयीं काय सांगावयाचें तें मागेंच (३।१।७) सांगितलें आहे.

तें काय सांगितलें आहे ?

तेथें असें सांगितलें आहे की कर्मग्रहणात् इत्यादि (३।१।७, वा. १,२,३). त्याप्रमाणें येथेंही ह्या यङ्प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'क्रियासमभिहार' असें म्हटलें असल्यामुळें धातोः हा शब्द व्यर्थ होतो. क्रियासमभिहार हा अर्थ गम्यमान अस-

---

निपातन केलें पाहिजे.

१. क्रियासमभिहार हा अर्थ गम्यमान असतांना एकाच् आणि हलादि अशा धातूंहून यङ्प्रत्यय होतो; उदा०—पुनः पुनः अतिशयेन वा पचति पापच्यते, भृशं ज्वलति जाज्वल्यते.

सर्गेस्यानुपसर्गः क्रियासमभिहारः सोपसर्गस्य हि क्रियासमभिहारत्वे धात्वधिकारेऽपि यङोऽविधानमक्रियासमभिहारत्वादिति ॥

अथैकाज्झलादिग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । जागर्ति भृशम् । ईक्षते भृशम् ॥

**एकाज्झलादिग्रहणे च ॥ २ ॥**

एकाज्झलादिग्रहणे चोक्तम् । किमुक्तम् । तत्र तावदुक्तं कर्मसमानकर्तृकग्रहणानर्थक्यं चेच्छाभिधाने प्रत्ययविधानादकर्मणो ह्यसमानकर्तृकाद्वानभिधानमिति। इहाप्येकाज्झलादिग्रहणानर्थक्यं क्रियासमभिहारे यङ्वचनादनेकाचोऽहलादेश्चानभिधानमिति ॥ तच्चावश्यमनभिधानमाश्रयितव्यम् । क्रियमाणेऽपि ह्येकाज्झलादिग्रहणे यत्रैकाचो हलादेश्चोत्पद्यमानेन यङर्थस्याभिधानं न भवति न भवति तत्रोत्पत्तिः । तद्यथा । भृशं शोभते । भृशं रोचते । यत्र चानेकाचोऽहलादेश्चोत्पद्यमानेन यङर्थस्याभिधानं भवति भवति तत्रोत्पत्तिः । तद्यथा । अटाट्यते

---

तांना यङ्प्रत्यय होतो, असें मोघम म्हटलें तरी तेवढ्यानें धातूहूनच यङ्प्रत्ययाची उत्पत्ति होईल. पण क्रियासमभिहार हा अर्थ प्राटति भृशम् येथें 'प्र अट्' ह्या उपसर्ग आणि धातु यांच्या समुदायापासून प्रतीत होत असल्यामुळें क्रियासमभिहारवाचकत्व त्या समुदायाला येतें, असें म्हणणें असेल तर तें क्रियासमभिहारवाचकत्व धातूलाच असून उपसर्ग हा नुसता त्या अर्थाला दुरून दाखविणारा आहे. तेव्हां केवळ धातुच क्रियासमभिहार या अर्थाचा असल्यामुळें त्याहूनच यङ्प्रत्यय होईल. उपसर्ग जवळ असला तरी क्रियासमभिहार हा अर्थ केवळ धातूचाच आहे असें अवश्य मानलेंच पाहिजे. उपसर्ग आणि धातु मिळून जो समुदाय तो क्रियासमभिहार या अर्थाचा वाचक आहे असें जो समजतो त्याच्या मतीं सूत्रामध्यें धातोः हा शब्द घातला तरी देखील उपसर्ग असेल तेथें उपसर्ग सोडून नुसत्या धातूहून यङ्प्रत्यय करतां येणार नाहीं. कारण केवळ धातूला क्रियासमभिहार हा अर्थ नाहीं.

आतां येथें एकाचः आणि हलादेः हे शब्द कशाकरितां घातले आहेत ?

भृशं जागर्ति, भृशमीक्षते, येथें अनेकाच् जागृधातूहून आणि अजादि ईक्षधातूहून यङ्प्रत्यय न व्हावा म्हणून घातले आहेत.

(वा.२) एकाच् आणि हलादि या शब्दांविषयीं जें कांहीं सांगावयाचें तें मागें सांगितलेंच आहे.

तेथें काय सांगितलें आहे ?

तेथें असें सांगितलें आहे की कर्मसमान० इत्यादि (३।१।७ वा.६,७). त्याप्रमाणें येथेंही सूत्रांतील एकाचः आणि हलादेः हे शब्द व्यर्थ आहेत. कारण क्रियासमभिहार हा अर्थ गम्यमान असतांना यङ्प्रत्यय सांगितला आहे. आणि जो धातु एकाच् नव्हे आणि हलादि नव्हे अशा धातूच्या पुढील यङ्प्रत्ययानें क्रियासमभिहार या अर्थाचें प्रतिपादन केलें जात नाहीं, म्हणून अनभिधानामुळें यङ्प्रत्यय त्याहून होत नाहीं.

तें अनभिधान तर अवश्य स्वीकारलेंच पाहिजे. कारण एकाज्हलादिग्रहण केलें तरी देखील जेथें एकाच् असून हलादि असलेल्या अशा धातूहून उत्पन्न झालेल्या यङ्प्रत्ययानें क्रियासमभिहार या अर्थाचें अभिधान होत नाहीं तेथें यङ्प्रत्यय होत नाहीं; जसें:- भृशं रोचते, भृशं शोभते; आणि जेथें अनेकाच् किंवा अजादि अशा धातूहून उत्पन्न झालेल्या यङ्प्रत्ययानें क्रियासमभिहार या अर्थाचें अभिधान केलें

अरार्यते अशाश्यते सोसूच्यते सोसूत्र्यते मोमूत्र्यते ॥

**ऊर्णोतेश्चोपसंख्यानम् ॥ ३ ॥**

ऊर्णोतेश्चोपसंख्यानं कर्तव्यम्। प्रोर्णोनूयते ॥ अत्यल्पमिदमुच्यत ऊर्णोतेरिति।

**सूचिसूत्रिमूत्र्यट्यर्त्यश्यूर्णुग्रहणं यङ्विधौ ।**

**अनेकाजहलाद्यर्थम् ।**

सूचिसूत्रिमूत्र्यट्यर्त्यश्यूर्णोतीनां ग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । यङ्विधावनेकाजहलाद्यर्थम् । सोसूच्यते सोसूत्र्यते मोमूत्र्यते अटाट्यते अरार्यते अशाश्यते प्रोर्णोनूयते ॥ ऊर्णोतेर्न वक्तव्यम् । वाच्य ऊर्णोर्णुवद्भावो यङ्प्रसिद्धिः प्रयोजनम् ।

आमश्च प्रतिषेधार्थमेकाचश्चेडुपग्रहात् ॥

**क्रियासमभिहारे यङो विप्रतिषेधेन लोड्विधानम् ॥ ४ ॥**

क्रियासमभिहारे लोड् भवति यङो विप्रतिषेधेन । क्रियासमभिहारे यङ् भवतीत्यस्यावकाशः । धातुर्य एकाज्झलादिः क्रियासमभिहारे वर्ततेऽधातुसंबन्धः । लोलूयते । लोटोऽवकाशः । धातुर्योऽनेकाजहलादिः क्रियासमभिहारे वर्तते धातुसंबन्धः । स भवाञ्जागृहि जागृहीत्येवायं जागर्ति । स भवानीहस्वेहस्वेत्येवायमीहते । धातुर्य एकाज्झलादिः क्रिया-

---

जातें तेथें यङ्प्रत्यय होतोच; जसें:— अटाट्यते, अरार्यते, अशाश्यते, सोसूच्यते, सोसूत्र्यते, मोमूत्र्यते.

(वा.३) ऊर्णुधातूहून यङ्प्रत्यय होतो असें वचन करावें;जसें:— प्रोर्णोनूयते.

'ऊर्णुधातूहून' हें म्हणणें अगदींच अपुरें आहे. सूच, सूत्र, मूत्र, अट् , ऋ, अश् आणि ऊर्णु या धातूंचें यङ्प्रत्यय सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें ग्रहण करावें.

काय उपयोग ?

अनेकाच् किंवा अजादि अशा ह्या धातूंहून यङ् व्हावा हा उपयोग आहे; जसें:— सोसूच्यते, सोसूत्र्यते, मोमूत्र्यते, अटाट्यते, अरार्यते, प्रोर्णोनूयते. यांपैकीं ऊर्णुधातूहून यङ्प्रत्ययाचा विधि करावयास नको.

ऊर्णुधातु हा णुधातूप्रमाणें समजावा. त्यामुळें ऊर्णु हा धातु एकाच् समजून त्याहून यङ्प्रत्यय होतो, आणि इजादि असल्यामुळें आम्प्रत्यय (३।१।३६), तसाच अनेकाच् असल्यामुळें आम्प्रत्यय (३।१।३५ भा. वा.) जो प्राप्त होतो तो होत नाहीं. तसेंच एकाच् समजून इडागमाचा निषेध (७।२।११) होतो.

(वा.४) क्रियासमभिहार हा अर्थ गम्यमान असतांना विप्रतिषेधानें यङ्प्रत्ययापेक्षां परत्वास्तव लोट्प्रत्यय (३।४।२) होतो. जो धातु एकाच् हलादि असून त्या ठिकाणीं क्रियासमभिहार अर्थ गम्यमान आहे, पण दुसऱ्या धातूच्या अर्थाशीं संबंध मात्र नाहीं, अशा ठिकाणीं क्रियासमभिहारार्थी यङ् होतो याला अवकाश आहे; जसें:— लोलूयते, पोपूयते. क्रियासमभिहारार्थी लोट् होतो याला अवकाश ज्या ठिकाणीं क्रियासमभिहार गम्यमान आहे आणि दुसऱ्या धातूच्या अर्थाशीं संबंधही आहे, पण धातु मात्र अनेकाच् किंवा अजादि आहे, त्या ठिकाणीं आहे; जसः— स भवान् जागृहि जागृहीत्येवायं जागर्ति, स भवान् ईहस्व ईहस्वेत्येवायमीहते. आणि ज्याठिकाणीं धातु एकाच् हलादि आहे व तेथें क्रियासमभिहार हा अर्थ गम्यमान होत आहे आणि दुसऱ्या धातूच्या अर्थाशीं संबंधही विवक्षित आहे तेथें उभयतांची प्राप्ति येते; जसें:— स भवान् लुनीहि लुनीहीत्येवायं लुनाति. त्यांत विप्रतिषेधानें यङापेक्षां परत्वास्तव लोट्प्रत्यय होतो.

समभिहारे वर्तते धातुसंबन्धश्च तस्मादुभयं प्राप्नोति । स भवाल्लुँनीहि लुनीहीत्येवायं लुनाति । लोड् भवति विप्रतिषेधेन ॥ न तर्हीदानीमिदं भवति स भवाल्लोँलूयस्व लोलूयस्वेत्येवायं लोलूयत इति । भवति च ।

**न वा नानार्थत्वात्कर्तृकर्मणोर्हि लविधानं क्रियाविशेषे स्वार्थे यङ् ॥ ५ ॥**

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । नानार्थत्वात् । का नानार्थता । कर्तृकर्मणोर्हि लविधानम् । कर्तृकर्मणोर्हि लो विधीयते क्रियाविशेषे स्वार्थे यङ् । तत्रान्तरङ्गत्वाद्यङा भवितव्यम् ॥ न तर्हीदानीमिदं भवति स भवाल्लुँनीहि लुनीहीत्येवायं लुनाति । भवति च । विभाषा यङ् यदा न यङ् तदा लोट् ॥

**उत्तरयोर्विग्रहेण विशेषासंप्रत्ययान्नित्यग्रहणानर्थक्यम् ॥ ६ ॥**

उत्तरयोर्योगयोर्विग्रहेण विशेषासंप्रत्ययान्नित्यग्रहणमनर्थकम् । न हि कुटिलं क्रामतीति चङ्क्रम्यत इति गम्यते ॥ अथैतेभ्यः क्रियासमभिहारे यङा भवितव्यम् ।

**क्रियासमभिहारे च नैतेभ्यः ॥ ७ ॥**

क्रियासमभिहारे च नैतेभ्यो यङा भवितव्यम् । भृशं जपति ब्राह्मणः भृशं समिधो दहतीत्येव ॥

**[नित्यं[1] कौटिल्ये गतौ ॥३।१।२३॥]**

**[लुपसदचरजपजभदहदश-**

---

तर मग आतां स भवान् लोलूयस्व लोलूयस्वेत्येवायं लोलूयते असें होत नाहीं काय ?

तसें होतें.

(वा.५) अथवा येथें या विप्रतिषेधाचा उपयोग होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की यङ् आणि लोट् या उभयतांचा अर्थ भिन्न भिन्न आहे.

त्या उभयतांच्या अर्थांमध्यें काय भेद आहे ?

कर्ता किंवा कर्म या अर्थी लोट्प्रत्ययाचें विधान केलें आहे आणि क्रियासमभिहार या स्वार्थी यङ्प्रत्ययाचें विधान केलें आहे. तेव्हां कर्तृकर्मरूप बाह्यार्थाची अपेक्षा असल्यामुळें क्रियासमभिहारार्थक लोट्प्रत्यय बहिरंग आहे, आणि क्रियासमभिहार हा स्वार्थच असल्यामुळें यङ्प्रत्यय अंतरंग आहे. तेव्हां अंतरंगत्वास्तव यङ्प्रत्यय व्हावा.

तर मग आतां लुनीहि लुनीहीत्येवायं लुनाति असा प्रयोग होत नाहींच काय ?

तसा प्रयोग होतो. कारण यङ्प्रत्यय विकल्पानें होत असल्यामुळें जेव्हां यङ्प्रत्यय होत नाहीं तेव्हां लोट्प्रत्यय होण्यास हरकत नाहीं.

(वा.६) नित्यं कौटिल्ये॰ आणि 'लुपसदचर॰' या पुढील दोन सूत्रांमध्यें नित्यग्रहणाचा उपयोग नाहीं. कारण चङ्क्रम्यते या वृत्तीपासून जो कांहीं विशेष अर्थ मनांत येतो[2] तो विग्रहवाक्यापासून मनांत येत नाहीं.

आतां त्या दोन सूत्रांमध्यें निर्दिष्ट केलेल्या धातूंहून क्रियासमभिहार या अर्थी यङ्प्रत्यय व्हावा असें दिसतें.

(वा.७) क्रियासमभिहार हा अर्थ गम्यमान असतांना या धातूंहून यङ्प्रत्यय होत नाहीं; जसें:—भृशं जपति ब्राह्मणः, भृशं समिधो दहति,

---

२. चङ्क्रम्यते या वृत्तीचा अर्थ 'वेडेंवाकडें चालतो' असा आहे. तो अर्थ कुटिलं क्रामति या वाक्यापासून मनांत येत नाहीं. वेड्यावाकड्या मार्गानें जातो असा अर्थ त्या वाक्यापासून मनांत येतो.

१. गत्यर्थक धातूहून कौटिल्यच अर्थ गम्यमान असतांना यङ्प्रत्यय नित्य होतो; उदा०—चङ्क्रम्यते.

१. लुप्, सद्, चर, जप, जभ, दह, दश,

**गृभ्यो भावगर्हायाम्॥३।१।२४॥]**

**सत्यापपाशरूपवीणातूलश्लोकसेनालोमत्वचवर्मवर्णचूर्णचुरादिभ्यो णिच् ॥ ३ । १ । २५ ॥**

सत्यापेति किं निपात्यते ।

**सत्यस्य कृञ्यापुक् च ॥ १ ॥**

सत्यस्य कृञ्यापुक् च निपात्यते णिच्च । सत्यं करोति सत्यापयति ॥ अत्यल्पमिदमुच्यते ।

**णिविधावर्थवेदसत्यानामापुक्च ॥२॥**

णिविधावर्थवेदसत्यानामापुक् चेति वक्तव्यम् । अर्थापयति वेदापयति सत्यापयति ॥ यद्यापुक्क्रियते टिलोपः प्राप्नोति । एवं तर्हि पुक्करिष्यते । एवमपि टिलोपः प्राप्नोति । एवं तर्ह्याक्करिष्यते । एवमपि टिलोपः प्राप्नोति । एवं तर्ह्यक्करिष्यते । एवमप्यनाकारान्तत्वात्पुग्न प्राप्नोति । एवं तर्ह्यापुट्करिष्यते ॥ अथवा पुनरस्त्वा-

---

असें वाक्यच राहतें.

(सू.२५) सत्याप् येथें काय निपातन केलें आहे ?

(वा.१) सत्यशब्दाहून करोति या अर्थी णिच्प्रत्यय आणि सत्यशब्दाला आपुगागम निपातनानें केला आहे; जसें:– सत्यं करोति सत्यापयति.

हें विधान अगदींच अपुरें आहे.

(वा.२) अर्थ, वेद आणि सत्य या शब्दांहून करोति या अर्थी णिच्प्रत्यय व या शब्दांना आपुगागम होतो असें वचन करावें; जसें:– अर्थापयति, वेदापयति, सत्यापयति.

जर आपुगागम केला तर त्या आगमाचा टिलोप[2] प्राप्त होत आहे.

असें आहे तर पुगागम करण्यांत येईल.

तरीही टिलोप प्राप्त होतोच.

तर मग आगागम करण्यांत येईल[3].

तरीही टिलोप प्राप्त होतोच.

तर मग अगागम करण्यांत येईल.

तरीही आकारान्त नसल्यामुळें पुगागम (७।३।३६) येऊं शकत नाहीं[4] असा दोष येतोच[5].

असें आहे तर आपुडागम करण्यांत येईल[6].

किंवा आपुगागमच असूं दे.

---

आणि गृ या धातूंहून त्या त्या क्रियेची गर्हा गम्यमान असतांना यङ्प्रत्यय नित्य होतो; उदा०– लोलुप्यते, सासद्यते.

१. सत्याप्, पाश, रूप, वीणा, तूल, श्लोक, सेना, लोम, त्वच, वर्म, वर्ण, चूर्ण आणि चुरादि गणांतील धातु यांहून क्रमानें करण किंवा आचक्षण, विमोचन, दर्शन, उपगान, अनुकोषण, उपस्तवन, अभियान, अनुमार्जन, ग्रहण, संनहन, ग्रहण, अवध्वंसन आणि स्वार्थ या अर्थी णिच्प्रत्यय होतो; उदा०- सत्यं करोति सत्यापयति, पाशं विमुञ्चति विपाशयति.

२. इष्ठवद्भावामुळें टेः (६।४।१५५) या सूत्रानें टिलोप प्राप्त होतो.

३. सत्यशब्दाला अगागम केल्यानंतर अतो गुणे (६।१।९७) यानें पररूप केलें असतां अचो ञ्णिति (७।२।११५) यानें वृद्धि आणि नंतर पुगागम (७।३।३५) करावयाचा.

४. जर येथें वृद्धि होईल तर अगागमविधान व्यर्थ होईल. कारण अगागमविधान केल्यावांचूनही वृद्धि होत आहे. तेव्हां त्याचे जोरावर वृद्धीचा बाधक होईल, असा आशय आहे.

५. मूळांतील दुसरा पाठ व त्याचें भाषांतरः– एवं तर्ह्यट्करिष्यते। एवमपि अनाकारान्तत्वात्पुग्न प्राप्नोति। असें आहे तर मग णिप्रत्ययाला अडागम करण्यांत येईल. तरीही आकारान्त अङ्ग नसल्यामुळें पुगागम येऊं शकत नाहीं. कारण णिच्प्रत्ययाचा आद्यावयव आडागम झाल्यामुळें तो आकार अंगाचा अवयव नव्हे.

६. आपुडागम णिच्प्रत्ययाचा आद्यावयव झाल्यामुळें मागील अकाराचा टिलोप केला असतां सत्यापयति इत्यादि उदाहरण साधतें.

पुगेव । ननु चोक्तं टिलोपः प्राप्नोतीति । आपुग्वचनसामर्थ्यान्न भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु पुगेव । ननु चोक्तमेवमपि टिलोपः प्राप्नोतीति । पुग्वचनसामर्थ्यान्न भविष्यति ॥ अथवा पुनरस्त्वागेव । ननु चोक्तमेवमपि टिलोपः प्राप्नोतीति । आग्वचनान्न भविष्यति ॥

## हेतुमति च ॥ ३ । १ । २६ ॥

कथमिदं विज्ञायते । हेतुमत्यभिधेये णिज्भवतीति । आहोस्विद्धेतुमति यो धातुर्वर्तत इति ॥ युक्तं पुनरिदं विचारयितुम् । नन्वनेनासंदिग्धेन प्रत्ययार्थविशेषणेन भवितव्यं यावता हेतुमतीत्युच्यते । यदि हि प्रकृत्यर्थविशेषणं स्याद्धेतुमत इत्येवं ब्रूयात् ॥ नैतदस्ति । भवन्तीह हि विषयसप्तम्योऽपि । तद्यथा । प्रमाणे यत्प्रातिपदिकं वर्तते स्त्रियां यत्प्रातिपदिकं वर्तत इति । एवमिहापि हेतुमत्यभिधेये णिज्भवति हेतुमति यो धातुर्वर्तत इति जायते विचारणा ॥ अत उत्तरं पठति ।

**हेतुमतीति कारकोपादानं प्रत्ययार्थपरिग्रहार्थं यथा तनूकरणे तक्षः ॥१॥**

हेतुमतीति कारकमुपादीयते । किं प्रयोजनम् । प्रत्ययार्थपरिग्रहार्थम् । एवं

---

पण त्याचा टिलोप प्राप्त होतो असें म्हटलें आहे ना ?

आपुगागमाचें विधान केल्याचे जोरावर टिलोप होणार नाहीं.

किंवा पुगागमच असूं दे.

पण त्याचा टिलोप प्राप्त होतो असें म्हटलें आहे ना ?

पुगागमाचें विधान केल्याचे जोरावर टिलोप होणार नाहीं.

किंवा आगागमच असूं दे.

पण त्याचाही टिलोप प्राप्त होतो असें म्हटलें आहे ना ?

आगागमाचें विधान केल्याचे जोरावर त्याचा टिलोप होणार नाहीं.

(सू.२६) हेतुमान् म्हणजे प्रयोजकावरील व्यापार. तो जो व्यापार त्या अर्थी णिच्प्रत्यय होतो असा येथें अर्थ समजावयाचा, किंवा त्या व्यापार या अर्थाचा जो धातु त्याहून णिच्प्रत्यय होतो असा अर्थ समजावयाचा ?

पण हा विचार मनांत येणें तरी योग्य आहे काय ? कारण हेतुमति हें णिच्प्रत्ययाचेंच विशेषण होय असें निःसंशय कळतें; कारण हेतुमति असा सप्तमीनिर्देश केला आहे. जर हेतुमति हें धातूचें विशेषण असें अभिप्रेत असेल तर हेतुमतः असा पंचमीनेंच निर्देश आचार्यांनीं केला असता.

हेतुमति हें णिच्प्रत्ययाचेंच विशेषण आहे याविषयीं सप्तमीनिर्देश साधक होऊं शकत नाहीं. कारण शास्त्रामध्यें विषयसप्तमीही असूं शकतें; जसें:– प्रमाण या अर्थी जें प्रातिपदिक (५।२।३७) किंवा स्त्रीत्व या अर्थी जें प्रातिपदिक (४।१।३); त्याप्रमाणें प्रयोजकावरील व्यापार या अर्थी णिच्प्रत्यय होतो, किंवा त्या व्यापार या अर्थाचा जो धातु त्याहून णिच् होतो, असा विचार मनांत येऊं शकतो. हें मनांत आणून वार्तिककार लिहितातः—

(वा.१) हेतुमति या शब्दानें एक विशेष

---

१. कर्त्याचा जो प्रयोजक तो हेतु होय. त्या हेतूचा जो प्रेरणाव्यापार त्या अर्थी धातूहून णिच्प्रत्यय होतो; उदा०–देवदत्तः तण्डुलं पचति, यज्ञदत्तः देवदत्तेन तण्डुलं पाचयति. हेतु म्ह. प्रयोजक (१।४।५५) तो आहे आश्रय ज्याचा असा जो, त्याचा व्यापार, त्या अर्थी हेतुशब्दाहून मतुप्प्रत्यय केला आहे.

२. हेतुमति या विशेषणाचा संबंध णिच्प्रत्ययाकडे करावयाचा किंवा धातूकडे करावयाचा असा संशय येतो.

सति प्रत्ययार्थः सुपरिगृहीतो भवति। यथा तनूकरणे तक्षः [३.१.७६] इति तनूकरणमुपादीयते ॥ यदि तर्हि तद्वत्प्रकृत्यर्थविशेषणं भवति। प्रकृत्यर्थविशेषणं हि तत्तत्र विज्ञायते। तनूकरणक्रियायां तक्ष इति ॥ अस्तु प्रकृत्यर्थविशेषणम्। को दोषः। इह ह्युक्तः करोति प्रेषितः करोतीति णिच्प्राप्नोति। प्रत्ययार्थविशेषणे पुनः सति नैष दोषः। स्वशब्देनोक्तत्वान्न भविष्यति ॥ प्रकृत्यर्थविशेषणेऽपि सति नैष दोषः। यत्र नान्तरेण शब्दमर्थस्य गतिर्भवति तत्र शब्दः प्रयुज्यते। यत्र ह्यन्तरेणापि शब्दमर्थस्य गतिर्भवति न तत्र शब्दः प्रयुज्यते ॥ इह तर्हि पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेनेत्युभयोः कर्त्रोर्लेनाभिधानं प्राप्नोति। प्रत्ययार्थविशेषणे पुनः सति न दोषः। प्रधानकर्तरि लादयो भवन्तीति प्रधानकर्ता लेनाभिधी-

---

प्रकारची क्रिया[3] दाखविली आहे.

त्याचा काय उपयोग ?

त्याचा उपयोग असा की या सूत्रानें सांगितलेल्या प्रत्ययाचा अर्थ सहज समजला जातो; जसें:– तनूकरणे तक्षः (३।१।७६) या सूत्रामध्यें तनूकरण या शब्दानें एक विशेष प्रकारची क्रिया दाखविली आहे, तसेंच हें होय.

आतां जर 'तनूकरणे' याप्रमाणें हेतुमति हा क्रियेचा निर्देश समजावयाचा तर मग तसें हें प्रकृतीचें विशेषण होईल. तनूकरण या अर्थाचा जो तक्षधातु असें तेथें तें प्रकृतीचें विशेषण आहे.

तर मग हेतुमति हेंही प्रकृत्यर्थाचें विशेषण असूं दे. कोठें दोष येतो ?

उक्तः[4] करोति, प्रेषितः करोति, येथें णिच्-प्रत्यय प्राप्त होतो असा दोष येतो. आणि 'हेतुमति' हें प्रत्ययार्थाचें विशेषण गृहीत धरलें तर हा दोष येत नाहीं. कारण उक्त, प्रेषित, या शब्दांनीं तो व्यापार उक्त झाला असल्यामुळें पुनः त्या अर्थी णिच्प्रत्यय होणार नाहीं.

हेतुमति हें प्रकृतीचें विशेषण केलें असतांही उक्तः करोति येथे दोष येत नाहीं. कारण जेथें शब्दाचा प्रयोग केल्यावांचून त्याच्या अर्थाची प्रतीतिच होत नाहीं तेथें त्या अर्थी शब्दाचा प्रयोग केला जातो आणि जेथें शब्दाचा प्रयोग केल्यावांचूनही त्याच्या अर्थाची प्रतीति होते तेथें त्या अर्थी शब्दाचा प्रयोग केला जात नाहीं.

तर मग पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेन येथें णिजन्तापुढील लकारानें प्रयोज्य आणि प्रयोजक या उभयतांही कर्त्यांचें प्रतिपादन केलें जाईल असा दोष[5] येतो.

आणि हेतुमति हें प्रत्ययाचें विशेषण गृहीत

---

३. करोति-उत्पादयति कर्तृकर्मादिव्यपदेशान् इति कारकम् अशा व्युत्पत्तीनें येथें वार्तिकांतील कारकशब्दाचा क्रिया हा अर्थ आहे.

४. उक्तः करोति या वाक्यापासून देवदत्तानें कांहीं काम करावयास सांगितलेला मैत्र तें काम करतो असा अर्थ मनांत येतो. अर्थात् प्रयोजक देवदत्ताच्या व्यापाराची प्रतीति स्पष्ट होते, म्हणून येथें णिच्प्रत्यय होऊं लागेल.

५. धातूचा अर्थ जी क्रिया तिचा कर्ता या अर्थी जर हे येथें प्रेरणा या अर्थाच्या धातूहून णिच्प्रत्यय होतो असा अर्थ घेतला तर पाचयति येथें पच्-धातूचा पाक करणें हा मूळचा अर्थ असून त्याविषयीं प्रेरणा करणें हाही अधिक अर्थ तेथें त्या धातूचा आहे असें समजलें पाहिजे. पुढील णिच्प्रत्यय तर स्वार्थींच होणार आहे. तेव्हां त्याच्यापुढें कर्ता या अर्थी केलेल्या लकारानें दोन्ही क्रियांचें कर्ते दाखविले जातील. तेव्हां प्रयोज्यकर्ता जो यज्ञदत्त तोही लकारानेंच उक्त होत असल्यामुळें त्याहून तृतीया

यते यश्चात्राप्रधानं सिद्धा तत्र कर्तरीत्येव तृतीया ॥ इह च गमितो ग्रामं देवदत्तो यज्ञदत्तेनेत्यव्यतिरिक्तो गत्यर्थ इति कृत्वा गत्यर्थानां क्तः कर्तरीति कर्तरि क्तः प्राप्नोति । इह च व्यतिभेदयन्ते व्यतिच्छेदयन्त इत्यव्यतिरिक्तो हिंसार्थ इति कृत्वा न गतिहिंसार्थेभ्यः [१.३.१५] इति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि प्रत्ययार्थविशेषणम् । यदि प्रत्ययार्थविशेषणं पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेनेति प्रयोज्ये कर्तरि कर्मसंज्ञा प्राप्नोति । भवति हि तस्य तस्मिन्नीप्सा । इह च ग्रामं गमयति ग्रामाय गमयतीति व्यतिरिक्तो गत्यर्थ इति कृत्वा गत्यर्थकर्मणि द्वितीयाचतुर्थ्यौ न प्राप्नुतः । इह च एधो दकस्योपस्कारयतीति व्यतिरिक्तः करोत्यर्थ इति कृत्वा

धरलें तर मात्र हा दोष येत नाहीं. कारण प्रधान कर्ता या अर्थी लादिक होतात. म्हणून लकारानें प्रधान कर्त्याचेंच प्रतिपादन केलें जातें. तेव्हां येथें जो अप्रधान असा प्रयोज्य कर्ता आहे त्याहून कर्ता या अर्थी तृतीया 'कर्तृकरणयोः०' (२।३।१८) यानें सिद्ध होत आहे.

तसेंच हेतुमति हें प्रकृत्यर्थाचें विशेषण गृहीत धरलें तर गमितो ग्रामं देवदत्तो यज्ञदत्तेन येथें गति हा अर्थ गमि ह्या णिप्रत्ययान्त धातूचाही पूर्वीप्रमाणेंच कायम राहत असल्यामुळें[६] गत्यर्थक धातूहून कर्ता या अर्थी सांगितलेला (३।४।७२) क्तप्रत्यय गमि ह्या णिच्प्रत्ययान्त धातूहून प्राप्त होतो.[७]

तसेंच व्यतिभेदयन्ते, व्यतिच्छेदयन्ते, येथें हिंसार्थ हा णिच्प्रत्ययान्त धातूचा कायमच मानतां येत असल्यामुळें 'न गतिहिंसार्थेभ्यः' (१।३।१५) यानें आत्मनेपदाचा निषेध होऊं लागेल.

तर मग हें प्रत्ययार्थाचें विशेषण असूं दे.

पण जर हेतुमति हें प्रत्ययार्थाचें विशेषण गृहीत धरलें तर पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेन येथें यज्ञदत्त ह्या प्रयोज्य कर्त्याला कर्मसंज्ञा प्राप्त होते. कारण प्रयोजक जो देवदत्त त्याला प्रेरणा ह्या स्वतःच्या क्रियेनें प्रयोज्य कर्ता यज्ञदत्त हा ईप्सित आहे.

तसेंच ग्रामं गमयति, ग्रामाय गमयति, येथें गमि या णिच्प्रत्ययान्त धातूचा गति हा अर्थ नसल्यामुळें आणि गमनक्रिया ही आपल्या साधनापासून अलग होत असल्यामुळें 'गत्यर्थकर्मणि' (२।३।१२) या सूत्रानें सांगितलेल्या द्वितीया आणि चतुर्थी या विभक्ति प्राप्त होऊं शकत नाहींत. तसेंच एधो दकस्योपस्कारयति येथें कारि या णिच्प्रत्ययान्त धातूचा गुणाधान करणें हा अर्थ नसल्यामुळें[१०] 'कृञः प्रतियत्ने' (२।३।५३) या

६. कारण प्रेरणार्थक धातूहून णिच्प्रत्यय होतो असा अर्थ घेतला तर णिच्प्रत्ययाचा अर्थ सांगितला नसल्यामुळें तो स्वार्थीच होतो असें मानलें पाहिजे आणि गम्‌धातूचा गमन अर्थ कायम असून प्रेरणा हा अधिक अर्थ आहे. तात्पर्य, ज्या अर्थाचा गम्‌धातु त्याच अर्थाचा गमिधातु होणार म्हणून गमि हा धातुही गत्यर्थक आहे असें म्हणतां येतें.

७. प्रयोज्यकर्ता जो देवदत्त त्या अर्थी क्तप्रत्यय इष्ट आहे. पण यज्ञदत्त हा जो प्रयोजक कर्ता त्या अर्थी क्तप्रत्यय होऊन गमितो ग्रामं देवदत्तं यज्ञदत्तः असा अनिष्ट प्रयोग प्राप्त होतो.

८. व्यतिभेदयन्ते येथें प्रेरणा करणें ह्या प्रयोजक व्यापाराचा व्यतीहार विवक्षित आहे, म्हणून येथें 'कर्तरि कर्मव्यतिहारे' (१।३।१४) यानें आत्मनेपद केलें आहे.

९. गमि या णिप्रत्ययान्त धातूचा जो अर्थ गमन करण्याची प्रेरणा करणें त्यामध्यें प्रेरणा ही क्रिया मुख्य असल्यामुळें गमनक्रियेच्या ग्राम, रथ, वगैरे कारकांचा शब्दतः अन्वय प्रेरणेकडे होणार आहे. आर्थिक अन्वय गमनक्रियेकडे असला तरी तो विभक्तीच्या उत्पत्तीला कारणीभूत होणार नाहीं.

१०. कारण गुणाधान करणें हा अर्थ उप-उप-

कृञः प्रतियत्ने [२.३.५३] इति षष्ठी न प्राप्नोति । इह च भेदिका देवदत्तस्य यज्ञदत्तस्य काष्ठानामिति प्रयोज्ये कर्तरि षष्ठी न प्राप्नोति । इह च अभिषावयति परिषावयतीति व्यतिरिक्तः सुनोत्यर्थ इति कृत्वोपसर्गात्सुनोत्यादीनामिति षत्वं न प्राप्नोति ॥ नैष दोषः । यत्तावदुच्यते पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेनेति प्रयोज्ये कर्तरि कर्मसंज्ञा प्राप्नोतीति गतिबुद्धिप्रत्यवसानार्थशब्दकर्माकर्मकाणामणी त्येतन्नियमार्थं भविष्यति । एतेषामेवाण्यन्तानां यः कर्ता स णौ कर्मसंज्ञो भवति नान्येषामिति ॥ यदप्युच्यत इह च ग्रामं गमयति ग्रामाय गमयतीति व्यतिरिक्तो गत्यर्थ इति कृत्वा गत्यर्थकर्मणि द्वितीयाचतुर्थ्यौ न प्राप्नुत इति नासावेवं प्रेष्यते गच्छ

सूत्रानें सांगितलेली षष्ठी प्राप्त होऊं शकत नाहीं.

तसेंच 'भेदिका देवदत्तस्य यज्ञदत्तस्य काष्ठानाम्' येथें 'कर्तृकर्मणोः' (२।३।६५) या सूत्रानें ज्या धातूहून कृत्प्रत्यय केला त्या धातूहून करावयास सांगितलेली षष्ठी प्रयोज्य कर्त्यापुढें प्राप्त होऊं शकत नाहीं.[११]

तसेंच अभिषावयति, परिषावयति, येथें सु-धातूचा अर्थ सावि या णिच्प्रत्ययान्त धातूच्या अर्थापेक्षां निराळा असून तो आभिमुख्य या उपसर्गाच्या अर्थाशीं शब्दतः असंबद्ध असा प्रतीत होत असल्यामुळें 'उपसर्गात्सुनोति०' (८।३।६५) यानें षत्व प्राप्त होऊं शकत नाहीं.[१२]

हेतुमति हें प्रत्ययार्थाचें विशेषण गृहीत धरलें असतांही हे दोष येत नाहींत. जें म्हटलें की पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेन येथें प्रयोज्य कर्ता जो यज्ञदत्त त्याला कर्मसंज्ञा प्राप्त होते, त्यावर उत्तरः—

'गतिबुद्धिप्रत्यवसानार्थ०' (१।४।५१) हें सूत्र नियामक होईल. तो नियम असाः— णिच्प्रत्ययरहित अशा धातूंच्या कर्त्याला ण्यन्तावस्थेमध्यें कर्मसंज्ञा करणें झाल्यास गत्यर्थक, बुद्ध्यर्थक, प्रत्ययवसानार्थक, शब्दकर्मक आणि अकर्मक या धातूंच्याच कर्त्याला कर्मसंज्ञा करावी. अर्थात् यांहून भिन्न धातूंच्या कर्त्याला ण्यन्तावस्थेमध्यें कर्मसंज्ञा करूं नये. त्यामुळें पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेन येथें प्रयोज्यकर्त्याला कर्मसंज्ञा होणार नाहीं.

आणखीही ग्रामं गमयति, ग्रामाय गमयति, येथें गमि ह्या णिच्प्रत्ययान्त धातूचा गति हा अर्थ नसल्यामुळें त्या णिच्प्रत्ययान्त धातूच्या ग्राम या कर्मवाचकाहून 'गत्यर्थकर्मणि द्वितीया०' (२।३।१२) या सूत्रानें गत्यर्थक धातूच्या कर्मवाचकापुढें करावयास सांगितलेली द्वितीया व चतुर्थी या विभक्ति प्राप्त होऊं शकत नाहींत असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तरः—

---

सर्गपूर्वक कृधातूचा आहे. णिच्प्रत्ययान्त धातूचा नव्हे.

११. भेदिका येथें णिजन्तभिद्धातूहून ण्वुल्प्रत्यय (३।३।१०८, वा.१) झाला आहे. 'कर्तृकर्मणोः' या सूत्रानें कृत्प्रत्यय ज्या धातूहून केला असेल त्या धातूनें दाखविलेल्या क्रियेच्या कर्त्याहून षष्ठी सांगितली आहे. येथें भेदि या धातूहून कृत्प्रत्यय केला असल्यामुळें त्याच्या कर्त्याहून षष्ठी होईल. भिद्धातूच्या कर्त्याहून होणार नाहीं. यज्ञ-

असा या उदाहरणाचा अर्थ आहे.

१२. अभिषावयति येथें उपसर्ग हा सावि या ण्यन्त धातूच्या क्रियेनें युक्त आहे, म्हणून तो ण्यन्त धातूचाच उपसर्ग म्हटला जातो आणि 'उपसर्गात्सुनोति०' या सूत्राचा अर्थ तर सुनोतिधातूचा जो उपसर्ग असा आहे. हेतुमति हें प्रकृत्यर्थाचें विशेषण गृहीत धरलें तर प्रेरणा हा अर्थ सुनोतिधातूचाच वाच्य असल्यामुळें त्याच्याकडे संबंध पावलेला जो उपसर्ग तो सुनोतिधातूचा होत असल्या-

ग्राममिति। कथं तर्हि। साधनविशिष्टामसौ क्रियां प्रेष्यते ग्रामं गच्छ ग्रामाय गच्छेति॥ यदप्युच्यत इह च एधो दकस्योपस्कारयतीति व्यतिरिक्तः करोत्यर्थ इति कृत्वा कृञः प्रतियत्न इति षष्ठी न प्राप्नोतीति नासावेवं प्रेष्यत उपस्कुरुष्वैधो दकस्येति। कथं तर्हि। साधनविशिष्टामसौ क्रियां प्रेष्यत एधो दकस्योपस्कुरुष्वेति॥ यदप्युच्यत इह च भेदिका देवदत्तस्य यज्ञदत्तस्य काष्ठानामिति प्रयोज्ये कर्तरि षष्ठी न प्राप्नोतीत्युक्तं तत्र कृद्ग्रहणस्य प्रयोजनं कर्तृभूतपूर्वमात्रेऽपि षष्ठी यथा स्यादिति॥ यदप्युच्यत इह च अभिषावयति परिषावयतीति व्यतिरिक्तः सुनोत्यर्थ इति कृत्वोपसर्गात्सुनोत्यादीनामिति षत्वं न प्राप्नोतीति नासावेवं प्रेष्यते सुन्वभीति। कथं तर्हि। उपसर्गविशिष्टामसौ क्रियां प्रेष्यतेऽभिषुण्विति॥

देवदत्तानें यज्ञदत्ताला 'जा' एवढीच प्रेरणा गांवासंबंधानें केली असें समजूं नये.

तर मग कशी प्रेरणा केली ?

'गांवाला जा' अशी कर्मानें युक्त विशिष्ट क्रियेची प्रेरणा केली जाते. तेव्हां गम्धातूचें ग्राम हें कर्म पूर्वीप्रमाणें कायमच राहत असल्यामुळें ग्रामं, ग्रामाय, अशा दोन्ही विभक्ति होतील.

आणखीही जें एधो दकस्योपस्कारयति येथें कारि ह्या णिच्प्रत्ययान्त धातूचा गुणाधान करणें हा अर्थ नसल्यामुळें त्या णिच्प्रत्ययान्त धातूच्या दक या कर्माहून त्याला शेषत्वानें विवक्षा केली तरी 'कृञः प्रतियत्ने' (२।३।५३) या सूत्रानें कृञ्धातूच्या शेषत्वानें विवक्षित असलेल्या कर्मवाचकापुढें करावयास सांगितलेली षष्ठी प्राप्त होऊं शकत नाहीं, असें म्हटलें त्यावर उत्तरः—

प्रयोजकानें प्रयोज्याला 'संस्कार कर' एवढीच प्रेरणा एध व दक या साधनासंबंधानें केली असें समजूं नये.

तर मग येथें कशी प्रेरणा केली आहे ?

'इन्धनानें पाणी तापीव' अशी साधनानें युक्त अशा विशिष्ट क्रियेची म्हणजे जीमध्यें एध, दक, हीं साधनें गोवलीं आहेत अशा उपस्करणक्रियेची प्रेरणा केली जात आहे.[१३]

आणखीही जें 'भेदिका देवदत्तस्य यज्ञदत्तस्य काष्ठानाम्' येथें 'कर्तृकर्मणोः कृति' या सूत्रानें सांगितलेली षष्ठी यज्ञदत्त ह्या प्रयोज्य कर्त्याहून प्राप्त होऊं शकत नाहीं, असें म्हटलें त्यावर उत्तरः—

'कर्तृकर्मणोः कृति' येथील कृद्ग्रहणाचा उपयोग असा सांगितला (भाग २, पृष्ठ ४५२ पं. ४) आहे की सांप्रतकालीं मुख्य क्रियेचा कर्ता नसला तरी जो पूर्वी मुख्य क्रियेचा होता अशा कर्तृवाचकाहूनही षष्ठी करावी.

आणखीही जें अभिषावयति, परिषावयति, येथें सुधातूचा अर्थ सावि या णिच्प्रत्ययान्त धातूच्या अर्थापेक्षां निराळा असून तो आभिमुख्य या उपसर्गाच्या अर्थाशीं असंबद्ध आहे म्हणून 'उपसर्गात्सुनोति०' (८।३।६५) यानें षत्व येऊं शकत नाहीं, असें म्हटलें त्यावर उत्तरः—

प्रयोजकानें प्रयोज्याला केवळ अभिषव करण्याची प्रेरणा आभिमुख्यानें केली असें समजूं नये.

तर मग येथें कशी प्रेरणा केली आहे ?

'आभिमुख्यानें अभिषव कर' अशी उपसर्गार्थानें युक्त विशिष्ट क्रियेची प्रेरणा केली[१४] अडचण नाहीं.

१३. तेव्हां एध, दक, या साधनांचा संबंध प्रेरणेशीं आर्थिक असला तरी उप-उपसर्गपूर्वक कृधातूच्या संस्कार करणें या अर्थाशीं पूर्वीप्रमाणें संबंध शब्दतःच कायम राहतो. म्हणून षष्ठी होण्यास

१४. तेव्हां अभि हा सुधातूचाच उपसर्ग पूर्वीप्रमाणें कायम राहत असल्यामुळें षत्व होण्यास हरकत नाहीं.

युक्तं पुनरिदं विचारयितुम् । नन्वनेनासंदिग्धेन प्रत्ययार्थविशेषणेन भवितव्यं यावता व्यक्तमर्थान्तरं गम्यते पचति पाचयतीति च । बाढं युक्तम् । इह पचेः कः प्रधानार्थः ।यासौ तण्डुलानां विक्लित्तिः। अथेदानीं तदभिसंधिपूर्वकं प्रेषणमध्येषणं वा युक्तं यत्सर्वः पच्यर्थः स्यात् ॥

अथ हेतुमतीति को मत्वर्थः । हेतुः कर्तास्य हेतुमान् हेतुमतीति ।

**हेतुनिर्देशश्च निमित्तमात्रं भिक्षादिषु दर्शनात् ॥ २ ॥**

हेतुनिर्देशश्च निमित्तमात्रं द्रष्टव्यम् । यावद्ब्रूयान्निमित्तं कारणमिति तावद्धेतुरिति । किं प्रयोजनम् । भिक्षादिषु दर्शनात् । भिक्षादिषु हि णिज्दृश्यते । भिक्षा वासयन्ति । कारीषोऽग्निरध्यापयतीति ॥ किं पुनः कारणं पारिभाषिके हेतौ न सिध्यति । एवं मन्यते चेतना-

---

आहे.

पण हेतुमति हें प्रकृत्यर्थाचें विशेषण किंवा प्रत्ययार्थाचें विशेषण असा विचार करणें योग्य आहे काय ? कारण पचति येथें दुसऱ्यानें प्रेरणा केली या अर्थाची प्रतीति होत नाहीं, आणि पाचयति येथ त्या अर्थाची प्रतीति होते. असा निरनिराळा अर्थ मनांत येत असल्यामुळें त्यावरून हेतुमति हें प्रत्ययार्थाचेंच विशेषण निःसंशय स्पष्ट होत आहे.

हेतुमति हें प्रकृत्यर्थाचें विशेषण किंवा प्रत्ययार्थाचें विशेषण याबद्दल येथें विचार करणें खात्रीनें योग्य आहे. कारण असें पहा की पचति येथें पच्धातूपासून मुख्यत्वानें कोणता बरें अर्थ मनांत येतो? तर तण्डुलाचें शिजणें हा अर्थ मुख्यत्वानें मनांत येतो. तर मग धातूचा तो मुख्यार्थ मनांत ठेवून त्याच्याकरितां केलें जाणारें जें प्रेषण किंवा अध्येषण वगैरे हा सर्व पच्धातूचा अर्थ समजणें योग्यच होणार आहे.[१५]

आतां हेतुमति येथें मतुप्प्रत्ययाचा अर्थ काय समजावयाचा[१६] ?

हेतुः कर्ता अस्ति अस्य स हेतुमान् तस्मिन् हेतुमति असा त्याचा विग्रह आहे.

(वा.२) हेतु हा शब्द कोणत्याही प्रकारचें निमित्त या अर्थाचा आहे. म्हणजे निमित्त, कारण, हे शब्द उच्चारले असतां त्यांपासून जो अर्थ मनांत येतो त्याच अर्थाचा[१७] हेतु हा हा शब्द आहे.

हें कशावरून ?

अशावरून की भिक्षा वासयन्ति, कारीषोऽग्निरध्यापयति, येथें भिक्षा, कारीषाग्नि, हे पदार्थही हेतु आहेत असें समजून णिच्प्रत्यय केलेला दृष्टीस पडतो यावरून.

पण हेतुशब्दाचा 'कर्त्याचा प्रयोजक' (१।४।५५) हा पारिभाषिक अर्थ गृहीत धरला असतां वरील उदाहरणांमध्यें णिच्प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

येथें वार्तिककार असें समजतात की कर्त्याचा प्रयोजक असतो तो चेतनच असतो. प्रेषणा, अध्येषणा, ही दोन्ही प्रकारची प्रेरणा चेतनच

---

१५. विक्लित्ति म्हणजे शिजणें त्याला उत्पन्न करणारा जो व्यापार तो पच्धातूचा अर्थ होय. तेव्हां चूल पेटविणें, भांडें ठेवणें, त्यांत पाणी घालणें, इत्यादि व्यापार जसे विक्लित्त्यनुकूल म्हणून पच्धातूचेच अर्थ समजले जातात तसे प्रेषण, अध्येषण, हे व्यापारही विक्लित्तीला अनुकूल असल्यामुळें ते पच्धातूचेच अर्थ आहेत असें मानण्याला हरकत दिसत नाहीं. प्रेषण आणि अध्येषण हे दोन्ही प्रेरणेचेच प्रकार आहेत. हाताखालच्या माणसाला आज्ञा करणें याला करणें याला प्रेषणा म्हणतात, आणि वडील माणसांना प्रार्थना करणें याला अध्येषण म्हणतात.

१६. हेतुशब्दाचा काय अर्थ मनांत धरून हा मतुप्प्रत्यय केला आहे, असा अभिप्राय आहे.

१७. हेतुशब्दाचा जो अर्थ आचार्यांनीं सांगितला (१।४।५५) आहे तो येथें घ्यावयाचा नाहीं.

वत एतद्भवति प्रेषणमध्येषणं चेति भिक्षाश्चाचेतनाः । नैष दोषः । नावश्यं स एव वासं प्रयोजयति य आह्योष्यतामिति तूष्णीमप्यासीनो यस्तत्समर्थान्याचरति सोऽपि वासं प्रयोजयति । भिक्षाश्चापि प्रचुरा व्यञ्जनवत्यो लभ्यमाना वासं प्रयोजयन्ति । तथा कारीषोऽग्निर्निवात एकान्ते सुप्रज्वलितोऽध्ययनं प्रयोजयति ॥

इह कश्चित्कंचिदाह पृच्छतु मा भवान् अनुयुङ्क्तां मा भवानिति । अत्र णिच्कस्मान्न भवति । अकर्तृत्वात् । न ह्यसौ संप्रति पृच्छति । तूष्णीमास्ते । किं च भो वर्तमानकालाया एव क्रियायाः कर्त्रा भवितव्यं न भूतभविष्यत्कालायाः । भूतभविष्यत्कालाया अपि भवितव्यम् । अभिसंबन्धस्तत्र क्रियत इमां क्रियामकार्षीत् इमां क्रियां करिष्यतीति । इह पुनर्न कश्चिदभिसंबन्धः क्रियते न चासौ संप्रति पृच्छति तूष्णीमास्ते । यदि तर्हि कर्ता

---

करूं शकतो. आणि प्रकृत स्थलीं तर भिक्षा, कारीषाग्नि हे तर अचेतन आहेत.

हा दोष येत नाहीं. कारण जो 'येथें रहा' असें प्रत्यक्ष सांगतो तोच त्या राहण्याला प्रयोजक होतो असा कांहीं नियम नाहीं. तर जो कांहीं एक न बोलतां गप्प बसूनही राहण्याला अनुकूल असें आचरण करतो तोही त्या राहण्याचा प्रयोजक होतो. भिक्षा देखील पुष्कळ आणि चटणी, भाजी, इत्यादि पदार्थांनीं युक्त अशी मिळत असेल तर ती देखील तेथें राहण्याला प्रयोजक होणारच.[१८] तसेंच वातरहित अशा एकान्त प्रदेशीं उत्कृष्ट प्रज्वलित केलेला रानशेणीचा अग्नि हा थंडीमुळें होणारी व अध्ययनाला प्रतिबंधक अशा तऱ्हेची पीडा दूर करून अध्ययनाला अनुकूल होतो.

आतां ज्या ठिकाणीं एक दुसऱ्याला 'पृच्छतु[१९] मा भवान्, अनुयुङ्क्तां मा भवान्', असें म्हणेल त्या ठिकाणीं णिच्प्रत्यय कां होत नाहीं ?

येथें प्रयोज्य हा कर्ता नाहीं म्हणून होत नाहीं.[२०] कारण विचारणारा हा त्या वेळीं विचारीत नव्हता, गप्पच बसला होता.

मग काय वर्तमानकालींच जो क्रियेचा आधार तो कर्ता होतो, भूतकालीं किंवा भविष्यत्कालीं जो क्रियेचा आधार तो कर्ता होऊं शकत नाही, असें म्हणणें आहे काय ?

असें नाहीं. भूतकालच्या किंवा भविष्यत्कालच्या क्रियेच्या आधारालाही कर्ता म्हणतां येतें. कारण यानें क्रिया केली, हाही क्रिया करील, असा तेथें त्याचा क्रियेशीं संबंध मनांत येतो. आणि येथें पहावें तर हा ज्या अर्थी 'तूं विचार' असें दुसऱ्याला म्हणत आहे त्या अर्थी त्या दुसऱ्या मनुष्याचा विचारणें या क्रियेशीं संबंध दिसत नाहीं. शिवाय 'विचार' असें ज्याला म्हणतो तो त्या वेळीं विचारीत नव्हता व पुढेंही विचारणार नव्हता, तर गप्पच बसणार होता, असें स्पष्टच दिसतें.

पण जर अशा रीतीनें तो दुसरा मनुष्य

---

१८. तात्पर्य, कर्त्याला जो प्रयोजक तो चेतनच असतो असा नियम नाहीं. तेव्हां हेतुशब्दाचा अर्थ पारिभाषिक (१।४।५५) घेतला तरी भिक्षा, अग्नि, यांना हेतु म्हणण्यास हरकत नाही.

१९. तूं मला विचार, तूं मला प्रश्न कर, असा अर्थ आहे. येथें प्रश्न करण्याबद्दल प्रेरणा आहे म्हणून प्रच्छ आणि अनुउपसर्गपूर्वक युज्धातु यांहून णिच्प्रत्यय होऊं लागेल.

२०. हेतूनें प्रेरणा केली असेल तर त्या प्रेरणा या अर्थी णिच्प्रत्यय प्रकृतसूत्रानें सांगितला आहे, व कर्त्याला जो प्रयोजक त्याला हेतुसंज्ञा (१।४।५४) होते आणि पृच्छतु मा भवान् येथें ज्याला 'प्रश्न कर' अशी प्रेरणा केली आहे तो मुळीं कर्ताच नव्हे. म्हणून त्याला प्रेरणा करणाऱ्याला हेतुसंज्ञा नाहीं. तेव्हां ही प्रेरणा हेतूनें केलेली नसल्यामुळें णिच्प्रत्यय होत नाहीं.

नास्ति कथं तर्हि कर्तृप्रत्ययेन लोटाभिधीयते । अथ कथमस्मिन्नपृच्छत्ययं प्रच्छिर्वर्तते । अभिसंबन्धस्तत्र क्रियत इमां क्रियां कुर्विति । कर्त्रापि तर्ह्यभिसंबन्धः क्रियते । कथम् । कर्ता चास्याः क्रियाया भवेति । एवं न च कर्ता कर्तृप्रत्ययेन च लोटाभिधीयते ॥ अथापि कथंचित्कर्ता स्यात् । एवमपि न दोषः । लोटोक्तत्वात्प्रेषणस्य णिज्न भविष्यति । विधीयन्ते ह्येतेष्वर्थेषु प्रैषादिषु लोडादयः । यत्र च द्वितीयः प्रयोज्योऽर्थो भवति भवति तत्र णिच् । तद्यथा । आसय शाययेति ॥

कृष्यादिषु चानुत्पत्तिः । कृष्यादिषु चानुत्पत्तिर्वक्तव्या। एकान्ते तूष्णीमासीन उच्यते पञ्चभिर्हलैः कृषतीति । तत्र भवितव्यं पञ्चभिर्हलैः कर्षयतीति ॥

**कृष्यादिषु चानुत्पत्तिर्नानाक्रियाणां कृष्यर्थत्वात् ॥ ३ ॥**

कृष्यादिषु चानुत्पत्तिः सिद्धा । कुतः। नानाक्रियाणां कृष्यर्थत्वात् । नानाक्रियाः कृषेरर्थाः । नावश्यं कृषिर्विलेखन एव वर्तते । किं तर्हि । प्रतिविधानेऽपि वर्तते । यदसौ भक्तबीजबलीवर्दैः प्रतिविधानं करोति स कृष्यर्थः । आतश्च प्रतिविधाने

कर्ता होत नाहीं तर पृच्छतु येथें कर्ता या अर्थी केलेल्या लोट्प्रत्ययानें त्या कर्त्याचें प्रतिपादन कसें बरें केलें जातें ? जर तो दुसरा मनुष्य प्रश्न न करतां गप्पच बसला आहे तर तेथें प्रच्छ्धातूचा प्रयोग तरी कसा बरें होतो?

असा होतो की सांगणाऱ्यानें 'प्रश्न कर' असें सांगण्यांत त्या दुसऱ्या मनुष्याचा प्रश्न करणें या क्रियेशीं संबंध कल्पिला आहे.

तर मग त्या क्रियेचा कर्त्याशींही पुढें होणारा संबंध 'ह्या क्रियेचा कर्ता हो,' असा त्यानें मनांत आणिलाच आहे.

तसा मनांत आणिला तरी तो येथें विधेय असल्यामुळें कर्ता या अर्थी केलेल्या लोट्प्रत्ययानें तसला कर्ता दाखविला जाणार[21] नाहीं.

आतां ज्याला प्रेरणा केली आहे त्याला कसें तरी संभावना वगैरे घेऊन कर्ता म्हटलें तरीही दोष नाहीं. कारण प्रेरणा हा अर्थ येथें लोट्प्रत्ययानेंच उक्त झाला आहे. म्हणून णिच्प्रत्यय होणार नाहीं. प्रेष वगैरे जे अर्थ त्या अर्थी लोट् वगैरे प्रत्यय सांगितले आहेत (३।३।१६३).

जेथें एक दुसऱ्याला 'अमुक क्रिया कर' अशी प्रथमतःच प्रेरणा करतो तेथें लिङ्, लोट्, तव्य, वगैरे प्रत्यय होतात. आणि तोच प्रेरणा करणारा दुसऱ्यांदा त्याच क्रियेसंबंधानें कोणाकडूनही नियोजिला जातो तेव्हां तेथें णिच्प्रत्यय होतो; जसें:– आसय[22], शायय.

कृष् वगैरे धातूंच्या पुढें णिच्प्रत्यय होत नाहीं असें वचन करावें. एकान्तस्थलीं स्वस्थ बसलेल्याला उद्देशून 'पञ्चभिर्हलैः कृषति'[23] असा प्रयोग केला जातो, तेथें पञ्चभिर्हलैः कर्षयति असा णिच्प्रत्ययाचा प्रयोग प्राप्त होतो.

(वा. ३) कृष् वगैरे धातूंच्या पुढें णिच्प्रत्यय उत्पन्न होत नाहीं ही गोष्ट सिद्ध होते.

ती कशी ?

अशी की कृष्धातूचा अर्थ एकच नाहीं, अनेक क्रिया आहेत. कृष्धातु नांगरणें या एकाच अर्थाचा आहे असें नाहीं, तर प्रति-

२१. 'कर्ता हो', असें येथें सांगितलें आहे. तेव्हां तें कर्तृत्व त्या वाक्यानें पुढें उत्पन्न होणारें असल्यामुळें अगोदरच त्या वाक्यांत त्या कर्त्याला दाखविणारा लोट्प्रत्यय होणार नाहीं; तात्पर्य, 'कर्ता हो' ही प्रेरणा अकर्त्यालाच संभवते, कर्त्याला संभवत नाहीं. त्यामुळें त्या अकर्त्याच्या प्रयोजकाला हेतुसंज्ञा नाही, म्हणून णिच्प्रत्यय होत नाही.

२२. येथें 'बैस, नीज' असें सांगणाऱ्या मनुष्याला तिसराच कोणी त्याची योजना 'बशीव, निजीव', असें सांगून करीत आहे.

२३. पांच नांगरांनीं दुसऱ्याकडून जमीन नांगरवितो, असा त्याचा अर्थ आहे.

वर्तते यदहरेवासौ न प्रतिविधत्ते तदहरेव तत्कर्म न प्रवर्तते ॥

यज्यादिषु चाविपर्यासः। यज्यादिषु चाविपर्यासो वक्तव्यः। पुष्पमित्रो यजते याजका याजयन्तीति। तत्र भवितव्यं पुष्पमित्रो याजयते याजका यजन्तीति ॥

**यज्यादिषु चाविपर्यासो नानाक्रियाणां यज्यर्थत्वात् ॥ ४ ॥**

यज्यादिषु चाविपर्यासः सिद्धः। कुतः। नानाक्रियाणां यज्यर्थत्वात्। नानाक्रिया यजेरर्थाः। नावश्यं यजिर्हविष्प्रक्षेपण एव वर्तते। किं तर्हि। त्यागेऽपि वर्तते। अहो यजत इत्युच्यते यः सुष्ठु त्यागं करोति। तं च पुष्पमित्रः करोति याजकाः प्रयोजयन्ति ॥

**तत्करोतीत्युपसंख्यानं सूत्रयत्याद्यर्थम् ॥ ५ ॥**

तत्करोतीत्युपसंख्यानं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्। सूत्रयत्याद्यर्थम्। सूत्रं करोति सूत्रयति ॥ इह व्याकरणस्य सूत्रं करोति व्याकरणं सूत्रयतीति वाक्ये षष्ठ्युत्पन्ने च प्रत्यये द्वितीया। केनैतदेवं भवति। योऽसौ सूत्रव्याकरणयोरभिसंबन्धः स उत्पन्ने प्रत्यये निवर्ततेऽस्ति

---

विधान[24] या अर्थीही आहे. भाताचे बीं, बैल, वगैरे नांगरण्याच्या साधनांची जुळवाजुळव करणें हा येथें कृष्‌धातूचा अर्थ होय. शिवाय ज्या दिवशीं हा नांगरण्याची साधनसामग्री जुळवून देत नाहीं त्या दिवशीं शेत नांगरलें जात नाहीं. यावरूनही प्रतिविधान या अर्थी कृष्‌धातु आहे असें सिद्ध होतें.

यज् वगैरे धातूंच्या पुढील णिच्‌प्रत्ययाची फिरवाफिरव होत नाहीं, असें वचन करावें; जसें:— पुष्पमित्रो यजते, याजका याजयन्ति, असा प्रयोग होतो. पण तेथें पुष्पमित्रो याजयते, याजका यजन्ति, असा णिच्‌प्रत्ययाचा प्रयोग वस्तुत: प्राप्त होत आहे.[25]

(वा.४) यज् वगैरे धातूंच्या पुढील णिच्‌प्रत्ययाची फिरवाफिरव करावयास नको.

कां बरें ?

यज्‌धातूचा अर्थ अनेक क्रिया आहेत. यज्‌धातु हा केवळ हविष्प्रक्षेपें[26] याच अर्थाचा आहे असें नाहीं, तर त्यागें[27] या अर्थाचाही आहे; जसें:— जो भरपूर व आदरपूर्वक दान करतो त्याला उद्देशून 'अहो यजते', फार सुरेख रीतीनें त्याग करीत आहे, असें म्हटलें जातें. तो त्याग तर येथें पुष्पमित्र करीत आहे, आणि याजक हे त्याला तसें करण्याविषयीं प्रवृत्त करीत आहेत.

(वा.५) तें करणें या अर्थी णिच्‌प्रत्यय होतो असें वचन करावें.

कशाकरितां ?

सूत्रं करोति सूत्रयति, मूत्रं करोति मूत्रयति, इत्यादि प्रयोग सिद्ध होण्याकरितां.

आतां येथें व्याकरणस्य सूत्रं करोति या वाक्यार्थाचे ऐवजीं वृत्ति केली असतां व्याकरणं सूत्रयति असा प्रयोग होतो. तेथें वाक्यामध्यें व्याकरणशब्दापुढें षष्ठी होते आणि वृत्तीमध्यें व्याकरणशब्दापुढें द्वितीया होते, हा असा फरक कशामुळें बरें होतो ?

व्याकरणशब्द सूत्रसमुदाय या अर्थाचा आहे, आणि सूत्रशब्द त्या व्याकरणांतील एक सूत्ररूपी अवयव या अर्थाचा आहे; म्हणून वाक्यामध्यें त्यांचा संबंध दाखविणारी षष्ठी होते, तें सरळच आहे. आतां णिच्‌प्रत्यय करून वृत्ति केली असतां व्याकरण आणि सूत्र यांचा

---

२४. दुसऱ्याला उपयोग होईल असें वागणें किंवा दुसऱ्याला तसें सांगणें याला प्रतिविधान म्हणतात.

२५. कारण याजक म्हणजे ऋत्विज हे प्रत्यक्ष यज्ञ करीत असतात, आणि पुष्पमित्र हा यजमान स्वस्थ बसून त्या ऋत्विजांकडून यजन करवितो.

२६. तूप, तीळ, वगैरे हविर्द्रव्यें अग्नीमध्यें मंत्रोच्चारपूर्वक टाकणें.

२७. कांहीं द्रव्यांतील आपली मालकी सोडणें

च करोतेरर्थाकरणेन सामर्थ्यमिति कृत्वा द्वितीया भविष्यति ॥

**आख्यानात्कृतस्तदाचष्ट इति कृल्लुक्प्रकृतिप्रत्यापत्तिः प्रकृतिवच्च कारकम् ॥ ६ ॥**

आख्यानात्कृदन्ताण्णिज्वक्तव्यस्तदाचष्ट इत्येतस्मिन्नर्थे । कृल्लुक्प्रकृतिप्रत्यापत्तिः प्रकृतिवच्च कारकं भवतीति वक्तव्यम् । कंसवधमाचष्टे कंसं घातयति । बलिबन्धमाचष्टे बलिं बन्धयति ॥

**आख्यानाच्च प्रतिषेधः ॥ ७ ॥**

आख्यानशब्दाच्च प्रतिषेधो वक्तव्यः । आख्यानमाचष्ट इति ॥

किं पुनर्यान्येतानि संज्ञाभूतान्याख्यानानि तत उत्पत्त्या भवितव्यमाहोस्वित्क्रियान्वाख्यानमात्रात् । किं चातः । यदि संज्ञाभूतेभ्य इह न प्राप्नोति राजागमनमाचष्टे राजानमागमयतीति । अथ क्रियान्वाख्यानमात्रान्न दोषो भवति । यथा न दोषस्तथास्तु ॥

**दृश्यर्थायां च प्रवृत्तौ ॥ ८ ॥**

दृश्यर्थायां च प्रवृत्तौ कृदन्ताण्णिज्व-

---

संबंध निवृत्त होतो.[२८] आणि व्याकरणाचा सूत्र करणें या क्रियेशीं संबंध होत असल्यामुळें त्याहून द्वितीया होते व व्याकरणाबरोबर करोतीचें स्वान्वययोग्यत्वरूप सामर्थ्य असल्यामुळें व्याकरणशब्दापुढें वृत्तीमध्यें द्वितीया होते.

(वा.६) आख्यानवाचक जो कृत्प्रत्ययान्त शब्द त्याहून तें आख्यान सांगतो या अर्थी णिच् होतो, कृत्प्रत्ययाचा लुक् होतो, कृत्प्रत्ययाच्या मागील भागाला मूळचें स्वरूप प्राप्त होतें, आणि त्यामुळें प्रकृतीप्रमाणें कारकें होतात, असें वचन करावें; जसें:– कंसवध[२९]माचष्टे कंसं घातयति; बलिबन्धमाचष्टे बलिं बन्धयति.

(वा.७) आख्यान या शब्दाहून णिच्प्रत्यय होत नाहीं असें वचन करावें; जसें:– आख्यानमाचष्टे, असें वाक्यच राहतें, वृत्ति होत नाहीं.

आतां आख्यानवाचक कृत्प्रत्ययान्ताहून णिच्प्रत्यय येथें सांगितला आहे. येथें आख्यान म्हणजे लोकप्रसिद्ध आख्यानें घेऊन तेवढ्याहूनच णिच्प्रत्यय करावयाचा किंवा तो कृत्प्रत्ययान्त शब्द कोणाचीही कोणतीही क्रिया दाखविणारा चालेल ?

यांत काय बरें फरक होणार आहे ?

जर प्रसिद्ध आख्यानवाचक शब्द घेतले तर राजागमनमाचष्टे राजानमागमयति, येथें णिच्प्रत्यय होणार नाहीं.

आतां कोणाच्याही कोणत्याही क्रियेला दाखविणारा शब्द घेतला तर मात्र हा दोष येत नाहीं.

तर मग ज्या तऱ्हेनें दोष येणार नाहीं तीच तऱ्हा असूं दे.

(वा.८) प्रत्यक्ष पाहण्यासाठीं प्रवृत्ति होत असेल तर कृत्प्रत्ययान्त शब्दाहून कथन करतो या अर्थी णिच्प्रत्यय करावा, कृत्प्रत्ययाचा लुक्, कृत्प्रत्ययाच्या मागील

---

२८. सूत्रशब्दाहून णिच्प्रत्यय करून तयार झालेल्या सूत्रि या वृत्तीपासून एकार्थीभावानें 'सूत्र करणें' या अर्थाची प्रतीति होते. तेव्हां त्या अर्थांतील सूत्र या एकादेशाकडे दुसऱ्या कोणाचाही संबंध होत नाहीं.

२९. कंसवध हें एक आख्यान आहे हें प्रसिद्धच आहे. हन्धातूहून भावे घञ्प्रत्यय आणि हन्धातूला वधआदेश (२।३।७६) झाला आहे, कंसशब्दाचा वधशब्दाबरोबर षष्ठीतत्पुरुष झाला आहे. कंस हें हन्धातूचें कर्म आहे, म्हणून त्याहून कर्मणि षष्ठी (२।३।६५) झाली आहे. कंसवधशब्दाहून तें आख्यान सांगतो या अर्थी णिच्प्रत्यय, घञ्प्रत्ययाचा लुक्, वध् या मागील भागाला हन् या मूळ स्वरूपाची प्राप्ति आणि त्याचे कर्म कंस हें द्वितीयान्त झालें. त्या हन् याला वृद्धि (७।२।११६), नकाराला तकार (७।३।३२), आणि हकाराला घकार (७।३।५४) झाला आहे.

क्तव्यस्तदाचष्ट इत्येतस्मिन्नर्थे । कृल्लुक्प्रकृतिप्रत्यापत्तिः प्रकृतिवच्च कारकं भवतीति । मृगरमणमाचष्टे मृगान्रमयतीति । दृश्यर्थायामिति किमर्थम् । यदा हि ग्रामे मृगरमणमाचष्टे मृगरमणमाचष्ट इत्येव तदा भवतीति ॥

## आङ्लोपश्च कालात्यन्तसंयोगे मर्यादायाम् ॥ ९ ॥

कालात्यन्तसंयोगे मर्यादायां कृदन्ताण्णिज्वक्तव्यस्तदाचष्ट इत्येतस्मिन्नर्थ आङ्लोपश्च । कृल्लुक्प्रकृतिप्रत्यापत्तिः प्रकृतिवच्च कारकं भवतीति । आरात्रिविवासमाचष्टे रात्रिं विवासयतीति ॥

## चित्रीकरणे प्रापि ॥ १० ॥

चित्रीकरणे प्राप्यर्थे कृदन्ताण्णिज्वक्तव्यः । कृल्लुक्प्रकृतिप्रत्यापत्तिः प्रकृतिवच्च कारकं भवतीति । उज्जयिन्याः प्रस्थितो माहिष्मत्यां सूर्योद्गमनं संभावयते सूर्यमुद्गमयतीति ॥

## नक्षत्रयोगे ज्ञि ॥ ११ ॥

नक्षत्रयोगे जानात्यर्थे कृदन्ताण्णिज्वक्तव्यः । कृल्लुक्प्रकृतिप्रत्यापत्तिः प्रकृतिवच्च कारकं भवतीति । पुष्ययोगं जानाति पुष्येण योजयति । मघाभिर्योजयतीति ॥

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम् ।

## न वा सामान्यकृतत्वाद्धेतुतो ह्यविशिष्टम् ॥ १२ ॥

---

भागाला पूर्वस्वरूपप्राप्ति आणि त्या पूर्वस्वरूपाप्रमाणें कारक होतें, असें वचन करावें; जसें:– मृगरमणमाचष्टे मृगान् रमयति.

प्रत्यक्ष पाहण्यासाठीं असें कशाकरितां म्हटलें आहे ?

जेव्हां गांवामध्यें 'मृगरमणमाचष्टे', आनंदानें मृग बागडतात, असें सांगतो तेथें ग्रामे मृगरमणमाचष्टे असें वाक्यच राहतें.

(वा.९) मर्यादित कालाचा अत्यन्तसंयोग गम्यमान असतांना आङ्उपसर्गपूर्वक कृत्प्रत्ययान्ताहून कथन करतो या अर्थी णिच्प्रत्यय होतो, आङाचा लोप, कृत्प्रत्ययाचा लुक्, मागील भागाला मूळस्वरूपाची प्राप्ति, आणि त्या मूळस्वरूपाप्रमाणें कारक होतें असें वचन करावें; जसें:–आरात्रिविवासमाचष्टे रात्रिं विवासयति.

(वा.१०) आश्चर्य गम्यमान असतांना प्राप्नोति या अर्थी णिच्, कृत्प्रत्ययाचा लुक्, मागील भागाला मूळस्वरूपाची प्राप्ति, आणि त्या मूळस्वरूपाप्रमाणें कारक होतें, असें वचन करावें; जसें:–उज्जयिन्याः प्रस्थितो माहिष्मत्यां सूर्योद्गमनं संभावयते सूर्यमुद्गमयति.

(वा.११) नक्षत्रयोग या अर्थाला दाखविणाऱ्या कृत्प्रत्ययान्त शब्दाहून जाणतो या अर्थी णिच्प्रत्यय करावा, कृत्प्रत्ययाचा लुक्, मागील भागाला मूळस्वरूपाची प्राप्ति, आणि त्या मूळस्वरूपाप्रमाणें कारक होतें, असें वचन करावें; जसें:– पुष्ययोगं जानाति पुष्येण योजयति; मघाभिर्योजयति.

एकंदरींत आख्यानात्कृतः (वा.६) या वचनाला आरंभ करून 'नक्षत्रयोगे ज्ञि' ह्या वचनापर्यंत बरींचशीं वचनें करावयास पाहिजेत असें दिसतें.

(वा.१२) हीं वचनें करावयास नकोत.

---

३०. अरण्यामध्यें अमुक ठिकाणीं मृगांचा कळप आनंदानें बागडतो असें सांगतो. तेव्हां अरण्यामध्यें हरिणांच्या कळपाचा संभव असल्यामुळें तें पाहण्यासाठीं लोकांची प्रवृत्ति होण्याचा संभव असतो.

३१. आरात्रिविवासम् हा अव्ययीभाव (२।१।१३) आहे. रात्र संपेपर्यंत गोष्टी सांगतो असा याचा अर्थ आहे.

३२. संध्याकाळीं उज्जयिनीहून पायीं निघालेला मनुष्य सकाळपर्यंत महेश्वराला जाईल असें म्हणतो, हें आश्चर्य आहे. कारण त्यांमध्यें अंतर तीस कोसांपेक्षां जास्त आहे. सूर्योद्गमनं प्राप्नोति असें येथें विग्रहवाक्य आहे.

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । सामान्यकृतत्वात् । सामान्येनैवात्र णिज्भविष्यति हेतुमतीति । किं कारणम् । हेतुतो ह्यविशिष्टम् । हेतुतो ह्यविशिष्टमेतद्भवति । तुल्या हि हेतुता देवदत्ते चादित्ये च ॥ न सिध्यति । स्वतन्त्रप्रयोजको हेतुसंज्ञो भवतीत्युच्यते न चासावादित्यं प्रयोजयति ॥

**स्वतन्त्रप्रयोजकत्वादप्रयोजक इति चेन्मुक्तसंशयेन तुल्यम् ॥ १३ ॥**

यं भवान्स्वतन्त्रप्रयोजकं मुक्तसंशयं न्याय्यं मन्यते पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेनेति तेनैतत्तुल्यम् । कथम् ।

**प्रवृत्तिर्ह्युभयत्रानपेक्ष्य ॥ १४ ॥**

प्रवृत्तिर्ह्युभयत्रानपेक्ष्यैव किंचिद्भवति देवदत्ते चादित्ये च । नेह कश्चित्परोऽनुग्रहीतव्य इति प्रवर्तते । सर्व इमे स्वभूत्यर्थं प्रवर्तन्ते । ये तावदेते गुरुशुश्रूषवो नाम तेऽपि स्वभूत्यर्थमेव प्रवर्तन्ते पारलौकिकं च नो भविष्यतीह च नः प्रीतो गुरुरध्यापयिष्यतीति । तथा यदेतद्दासकर्मकरं नामैतेऽपि स्वभूत्यर्थमेव प्रवर्तन्ते भक्तं चेलं च लप्स्यामहे परिभाषाश्च न नो भविष्यन्तीति । तथा य एते शिल्पिनो नाम तेऽपि स्वभूत्यर्थमेव प्रवर्तन्ते वेतनं च लप्स्यामहे मित्राणि च

---

काय कारण ?

हेतुमति च या सामान्य सूत्रानेंच तेथें णिच् प्रत्यय होईल.

काय कारण ?

कारण असें की इतर ठिकाणीं जसा प्रयोजक हेतु असतो तसाच तेथें आहे. यज्ञदत्तेन पाचयति येथें जसा यज्ञदत्ताला देवदत्त हा निराळा दुसरा प्रयोजक आहे त्याप्रमाणें सूर्यमुद्गमयति येथें सूर्यालाही निराळा दुसरा प्रयोजक आहे.

तरी पण सूर्यमुद्गमयति येथें 'हेतुमति च' यानें णिच् होऊं शकत नाहीं. कारण स्वतन्त्र म्ह. कर्ता त्याचा जो प्रयोजक त्याला हेतु असें म्हणतात, आणि हा उज्जयिनीपासून निघालेला मनुष्य तर सूर्याला प्रवृत्त करीत नाहीं.

(वा.१३) कर्त्याच्या प्रयोजकाला हेतु म्हणतात आणि उज्जयिनीपासून निघालेला मनुष्य तर आदित्याचा प्रयोजक होऊं शकत नाहीं, असें म्हणणें असेल तर पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेन येथें ज्या देवदत्ताला कर्त्याचा प्रयोजक म्हणून निःसंशय हेतु समजतोस त्यासारखेंच हें उदाहरण आहे.

तें कसें बरें ?

(वा.१४) देवदत्ताचे ठिकाणीं पचनक्रियेची प्रवृत्ति आणि आदित्याचे ठिकाणीं उद्गमनक्रियेची प्रवृत्ति, ही उभयतांचे ठिकाणीं असलेली क्रियाप्रवृत्ति कोणाही दुसऱ्याला उद्देशून झालेली नाहीं. कारण या जगामध्यें कोणीही केवळ दुसऱ्यावर उपकार करावा या हेतूनें प्रवृत्त होत नाहीं, तर अन्ततो गत्वा विचार केला असतां सर्व लोक आपापल्या कल्याणासाठींच प्रवृत्त होतात. जे हे अनन्यभावानें गुरुशुश्रूषा करणारे शिष्य तेही गुरुशुश्रूषेपासून होणारें पुण्य परलोकीं उपयोगीं पडेल आणि या लोकामध्येंही सेवेनें खूष झालेला गुरु मोकळ्या मनानें सर्व विद्या शिकवील, या हेतूनेंच प्रवृत्त होतात. तसेंच जे हे चाकरी करणारे सेवक ते सुद्धा अन्नवस्त्र मिळावें आणि बोलणीं मिळूं नयेत या हेतूनेंच म्हणजे स्वकल्याणासाठींच बिनचूक व वेळच्या वेळीं नौकरी बजावतात. त्याप्रमाणें जे हे कलाकुसरीचीं कामें करणारे लोक ते देखील आपल्याला योग्य वेतन मिळावें आणि मालकाची मर्जी संपादन केली म्हणजे पुनः जरूर पडल्यास तें काम आपल्याकडेच येईल या हेतूनेंच म्हणजे स्वकल्याणासाठींच चोख आणि काळ-

नो भविष्यन्तीति ॥ एवमेतेषु सर्वेषु स्वभूत्यर्थं प्रवर्तमानेषु

**कुर्वतः प्रयोजक इति चेत्तुल्यम् ॥१५॥**

यदि कश्चित्कुर्वतः प्रयोजको नाम भवति तेनैतत्तुल्यम् ॥ यदि तर्हि सर्व इमे स्वभूत्यर्थं प्रवर्तन्ते कः प्रयोज्यार्थः। यदभिप्रायेषु सज्जन्ते। ईदृशौ वध्रौ कुरु। ईदृशौ पुटकौ कुरु। आदित्यश्चास्याभिप्राये सज्जते। एष तस्याभिप्राय उज्जयिन्याः प्रस्थितो माहिष्मत्यां सूर्योद्गमनं संभावयेयेति तं चास्याभिप्रायमादित्यो निर्वर्तयति ॥ भवेदिह वर्तमानकालता युक्ता स्यात् उज्जयिन्याः प्रस्थितो माहिष्मत्यां सूर्योद्गमनं संभावयते सूर्यमुद्गमयतीति तत्रस्थस्य हि तस्यादित्य उदेति। इह तु कथं वर्तमानकालता कंसं घातयति बलिं बन्धयतीति चिरहते कंसे चिरबद्धे च बलौ। अत्रापि युक्ता। कथम्। ये तावदेते शोभनिका नामैते प्रत्यक्षं कंसं घातयन्ति प्रत्यक्षं च बलिं बन्धयन्तीति। चित्रेषु कथम्। चित्रेष्वप्युद्गुर्णा निपतिताश्च प्रहारा दृश्यन्ते

---

कळीनें कलाकुसरीचीं कामें करतात.

(वा.१५) याप्रमाणें सर्व लोक आपापल्या कल्याणासाठींच प्रवृत्त होत असतांही जर तेथें कर्त्याचा प्रयोजक आहे तर त्याप्रमाणेंच सूर्यमुद्गमयति येथेंही सूर्याचा प्रयोजक आहे असें म्हणतां येतें.

पण जर हे सगळेच लोक आपापल्या कल्याणासाठींच प्रवृत्त होत आहेत तर मग त्यांना तेथें प्रयोजक कशाला पाहिजे?

अशाकरतां पाहिजे की अमुक प्रकारचे वध्रे[33] कर व अमुक प्रकारचे पुटक कर असें प्रयोजकानें सांगितलें असतां त्याच्या इच्छेप्रमाणें ते पदार्थ घडविण्याविषयीं तो आसक्त होतो. आदित्यही माहिष्मतीला जाणाऱ्याच्या अभिप्रायाप्रमाणें नियत वेळीं उदयाला येत आहे. त्याचा अभिप्राय असा आहे की उज्जयिनीहून आतां निघालों की मला माहिष्मतीमध्यें सूर्योदय होईल. आणि याप्रमाणें निघालेला माहिष्मतीमध्यें येऊन पोचतो त्या सुमारास सूर्योदय झाल्यामुळें त्याचा तो अभिप्राय सूर्यानें घडवून आणिला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां 'उज्जयिन्याः प्रस्थितो माहिष्मत्यां सूर्योद्गमनं संभावयते सूर्यमुद्गमयति' या उदाहरणामध्यें वर्तमानकालबोधक प्रत्यय केला तो योग्य आहे. कारण हा मनुष्य माहिष्मतीमध्यें पोचतो तों तेथें प्रत्यक्षच सूर्य उगवतो. पण कंसं घातयति, बलिं बन्धयति, येथें कंसाला मारून किंवा बलीला बंधन करून पुष्कळ दिवस होऊन गेले असल्यामुळें वर्तमानकालबोधक प्रत्यय तेथें कसा बरें योग्य होईल?

येथेंही वर्तमानकालबोधक प्रत्यय योग्य आहे.

तो कसा?

असा की हे नाटक करणारे लोक प्रेक्षक लोकसमुदायापुढें प्रत्यक्षच कृष्णाकडून[34] कंसाला मारवितात आणि तसेंच बलिराजाचें बंधन करवितात.

तरी पण चित्रें पाहतांना कंसं घातयति असे वर्तमानकालचे प्रयोग कसे होतात?

चित्रामध्यें देखील कृष्णानें शस्त्र घेऊन हात उगारलेले, तसेच कंसाच्या अंगावर प्रहार केलेले, दृष्टीस पडतातच.

तरी देखील पुराण वगैरेंमध्यें जेव्हां पुराणिक लोक ती गोष्ट वाचतात तेव्हां वर्तमानकालचे प्रयोग कसे होतात? कारण तेथें फक्त

---

[33]. वध्र म्हणजे एक प्रकारचा बळकट दोर. पुटक म्ह. पानपुडा.

[34]. आतां येथें कृष्ण, कंस, हे जरी नट आहेत तरी वर्तमानकालबोधक प्रत्यय होईल. तात्पर्य, नाटक पाहतांना कंसं घातयति, बलिं बन्धयति, असे वर्तमानकालचे प्रयोग करण्यास हरकत नाहीं.

कंसकर्षण्यश्च। ग्रन्थिकेषु कथं यत्र शब्दगडुमात्रं लक्ष्यते। तेऽपि हि तेषामुत्पत्तिप्रभृत्या विनाशादृद्धीर्व्याचक्षाणाः सतो बुद्धिविषयान्प्रकाशयन्ति। आतश्च सतो व्यामिश्रा हि दृश्यन्ते। केचित्कंसभक्ता भवन्ति केचिद्वासुदेवभक्ताः। वर्णान्यत्वं खल्वपि पुष्यन्ति। केचिद्रक्तमुखा भवन्ति केचित्कालमुखाः। त्रैकाल्यं खल्वपि लोके लक्ष्यते। गच्छ हन्यते कंसः। गच्छ घानिष्यते कंसः। किं गतेन हतः कंस इति॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य प्रथमे पादे द्वितीयमाह्निकम्॥

---

शब्दच उचारले जातात.

कृष्ण, कंस, इत्यादिकांचा उत्पत्तीपासून विनाशापर्यंतचा वृत्तान्त वर्णन करणारे ते लोक देखील श्रोत्यांना ज्ञान देऊन त्यांच्या बुद्धीमध्यें कल्पित रूपानें असलेल्या कृष्ण, कंस, वगैरे विषयांना प्रकाशित करतात.[३५] कल्पित विषय मनामध्यें असतात म्हणूनच श्रोत्यांचें अन्तःकरणही तदाकार बनून गेलेलें असतें; म्हणूनच ते श्रोते भिन्न[३६] भिन्न मताचे दृष्टीस पडतात. म्हणजे आपआपल्या मनोवृत्तींप्रमाणें कोणी कंसाचे पक्षपाती असतात, तर कोणी भगवन्ताचे कैवारी दिसतात. एवढेंच नव्हे तर कंसाचें हनन केलें असतां कंसभक्तांचें मुख सुकलेलें दिसून येतें, आणि क्रोधानें लाल झालेलें मुख भगवन्ताच्या भक्तांचें दिसूं लागतें.[३७] तसेंच ह्या मानसिक कृष्ण, कंस, वगैरेंच्या अस्तित्वाला अनुसरूनच लोकांमध्यें तिन्ही कालचे प्रयोग झालेले दृष्टीस पडतात. कोणी म्हणतात की 'चला पुराणाला, आतांच श्रीकृष्ण कंसाला मारीत आहेत'. कोणी म्हणतात की 'आजच कंस मरणार आहे'. तर कोणी म्हणतात कीं 'आतां काय पुराणाला जाऊन करायचें आहे ! कंस तर मेलाच'.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें.

---

३५. तात्पर्य, चित्रें दाखविल्याप्रमाणेंच तेथें समजावें.

३६. मनामध्यें कल्पित विषय नसतील तर नुसत्या ऐकण्यानें असा निरनिराळा परिणाम होणार नाहीं.

३७. तात्पर्य, ते कल्पित कृष्ण, कंस, वगैरे विषय त्या वेळीं अस्तित्वांत आहेत म्हणून वर्तमानकालबोधक प्रत्यय करण्यास हरकत नाहीं.

**कण्ड्वादिभ्यो यक् ॥३।१।२७॥**

किमर्थः ककारः । गुणवृद्धिप्रतिषेधार्थः । क्ङितीति गुणवृद्धिप्रतिषेधो यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सार्वधातुकार्धधातुकयोरङ्गस्य गुण उच्यते धातोश्च विहितः प्रत्ययः शेष आर्धधातुकसंज्ञां लभते न चायं धातोर्विधीयते । कण्ड्वादीनि हि प्रातिपदिकानि ॥

**कण्ड्वादिभ्यो वावचनम् ॥ १ ॥**

कण्ड्वादिभ्यो वेति वक्तव्यम् ॥

**अवचने हि नित्यप्रत्ययत्वम् ॥ २ ॥**

अक्रियमाणे हि वावचने नित्यः प्रत्ययविधिः प्रसज्येत ॥ तत्र को दोषः ।

**तत्र धातुविधितुक्प्रतिषेधः ॥ ३ ॥**

तत्र धातुविधेस्तुकश्च प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् । कण्ड्वौ कण्ड्वः । अचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ [६.४.७७] इत्युवङादेशः प्रसज्येत । इह च कण्ड्वा कण्ड्वे नोङ्धात्वोः [६.१.१७५] इति प्रतिषेधः प्रसज्येत ॥ तुक्च प्रतिषेद्धव्यः। वल्गुः मन्तुरिति । ह्रस्वस्य पिति कृति तुक्प्राप्नोति ॥

**ह्रस्वयलोपौ च ॥ ४ ॥**

ह्रस्वयलोपौ च वक्तव्यौ स्याताम् ।

---

(सू.२७) यक्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक ककार कशाकरितां जोडला आहे ?

क्ङिति च (१।१।५) यानें गुणवृद्धींचा प्रतिषेध व्हावा यासाठीं ककार जोडला आहे.

ककार जोडण्याचा हा उपयोग नाहीं. कारण सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना अंगाला गुण (७।३।८४) सांगितला आहे व धातूहून विहित आणि तिङ्शित्भिन्न जो प्रत्यय त्याला आर्धधातुकसंज्ञा (३।४।११४) होते. आणि हा प्रकृत यक्प्रत्यय तर धातूहून सांगितला नाहीं. कारण कण्डू वगैरे हीं प्रातिपदिकें आहेत.[२]

(वा.१) कण्डू वगैरे शब्दांहून सांगितलेला हा यक्प्रत्यय विकल्पानें होतो असें वचन करावें.

(वा.२) यक्प्रत्ययाच्या विकल्पाबद्दल वचन केलें नाहीं तर कण्डू वगैरे शब्दांहून यक्प्रत्यय नित्य होईल.

तसें झालें असतां काय दोष ?

(वा.३) तसें झालें असतां धातुला होणारी उवङ् वगैरे कार्यें आणि तुगागम यांच्या निषेधादाखल वचन केलें पाहिजे; जसें:- कण्ड्वौ कण्ड्वः. येथें 'अचि श्नु०' (६।४।७७) यानें उवङादेश होऊं लागेल. तसेंच कण्ड्वा कण्ड्वे येथें 'नोङ्धात्वोः' (६।१।१७५) यानें विभक्तीला उदात्ताचा (६।१।१७४) निषेध होऊं लागेल. तसेंच तुगागमाचाही निषेध केला पाहिजे; जसें:- वल्गुः, मन्तुः येथें 'ह्रस्वस्य पिति०' (६।१।७१) यानें तुगागम प्राप्त होतो.

(वा.४) शिवाय ऱ्हस्व आणि यलोप यांचें ही विधान करावें लागेल. ऱ्हस्वाचें उदा०:- वल्गुः, मन्तुः.

---

१. कण्डूञ् इत्यादिक जे धातु त्यांच्यापुढें स्वार्थी यक्प्रत्यय होतो; उदा०- कण्डूयति कण्डूयते. कण्डू वगैरे हीं प्रातिपदिकेंही आहेत. त्यांहून यक्प्रत्यय होत नाहीं. कण्डूः कण्ड्वौ कण्ड्वः. धातु नसल्यामुळें उवङ् (६।४।७७) होत नाहीं.

२. कण्डू वगैरे हे धातु व प्रातिपदिकें अशीं दोन्ही प्रकारचीं आहेत. तरी येथें पूर्वपक्षी तीं नुसतीं प्रातिपदिकेंच आहेत असें गृहीत धरून चालला आहे.

३. कण्डू वगैरे प्रातिपदिकांहून नित्य यक्प्रत्यय होत असल्यामुळें त्यांहून प्रथमा, द्वितीया, वगैरे विभक्ति होणार नाहींत. जेव्हां यक्प्रत्यय करून त्याच्यापुढें क्विप् (३।३।१०८, वा.९) हा प्रत्यय करावा तेव्हां त्याच्यापुढें प्रथमा, द्वितीया, वगैरे विभक्ति होतील तसे औ व जस् (४।१।१२) हे प्रत्यय करून कण्ड्वौ कण्ड्वः हे प्रयोग साधावेत तर तेथें उवङादेश प्राप्त होतो.

वल्गुः मन्तुरिति । किमर्थमिदं न ह्रस्व एवायमन्तरङ्गत्वात् । अकृधकार इति दीर्घत्वं प्राप्नोति ॥ यलोपः । यलोपश्च वक्तव्यः । कण्डूः वल्गुः मन्तुरिति । किमर्थमिदं न वलीत्येव सिद्धम् । वलीत्युच्यते न चात्र वलादिं पश्यामः । ननु च क्विब्वलादिः । क्विब्लोपे कृते वलाद्यभावान्न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । क्विब्लोपः क्रियतां वलि लोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्क्विब्लोपः । नित्यः खल्वपि क्विब्लोपः । कृतेऽपि यलोपे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । नित्यत्वात्परत्वाच्च क्विब्लोपे कृते वलाद्यभावान्न प्राप्नोति । एवं तर्हि प्रत्ययलक्षणेन भविष्यति । वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् ॥

अथ क्रियमाणेऽपि वावचने यदा यगन्तात्क्विप्तदैते दोषाः कस्मान्न भवन्ति । नैतेभ्यस्तदा क्विब्द्रक्ष्यते । किं कारणम् । अन्येभ्योऽपि दृश्यते [३.२.१७८] इत्युच्यते न चैतेभ्यस्तदा क्विब्दृश्यते । यथैव तर्हि क्रियमाणे वावचनेऽन्येभ्यो-

---

पण ऱ्हस्वाचें विधान कशाकरितां ? त्याची जरूरी भासत नाहीं. कारण वल्गु आणि मन्तु हीं प्रातिपदिकें मुळांतच ऱ्हस्व आहेत.

जरी ऱ्हस्व आहेत तरी यक्प्रत्यय केला की लगेंच 'अकृत्सार्व०' (७।४।२५) यानें दीर्घ प्राप्त होत आहे. तो केला असतां दीर्घाचें श्रवण होईल. यासाठीं ऱ्हस्वाचें विधान केलें पाहिजे. तसेंच यलोपाचेंही विधान केलें पाहिजे. कारण कण्डूः, वल्गुः, मन्तुः, या प्रातिपदिकांहून यक्प्रत्यय करून त्याच्यापुढें क्विप्प्रत्यय केला असतां अकाराचा लोप (६।४।४८) होईल, पण यकाराचा लोप झाला पाहिजे.

पण हें प्रकृत यलोपवचन कशाकरितां पाहिजे ? तें करावयास नको. कारण 'लोपो व्योः' (६।१।६६) यानेंच यलोप साधत आहे.

पण 'लोपो व्योः' येथें वलि असें म्हटलें आहे. आणि येथें तर वल् दृष्टीस पडत नाहीं.

असें कां म्हणतां ? क्विप् हाच वलादिप्रत्यय आहे ना ?

आहे खरा, पण त्या क्विपाचा लोप (६।१।६७) केल्यानंतर वलादि प्रत्यय नसल्यामुळें 'लोपो व्योः' यानें यलोप येऊं शकत नाहीं.

पण येथें अगोदर असा विचार करावा की क्विब्लोप प्रथम करावा कीं वलिलोप करावा.

मग या उभयतांमध्यें येथें प्रथमतः काय बरें करावें ?

पर असल्यामुळें क्विब्लोप प्रथम करावा. शिवाय क्विब्लोप हा नित्यही आहे. कारण यलोप केला किंवा न केला तरी प्राप्त होत आहे. तेव्हां परत्वास्तव आणि नित्यत्वास्तव प्रथमतः क्विब्लोप केला असतां वल् पुढें नसल्यामुळें वलिलोप येऊं शकत नाहीं.

असें आहे तर क्विप्प्रत्ययाचा लोप झाल्यानंतरही प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) वलिलोप होईल.

असें म्हणता येत नाहीं. कारण 'वर्णाश्रयकार्य कर्तव्य असतां प्रत्ययलक्षण होत नाहीं,' या परिभाषेनें प्रत्ययलक्षणाचा निषेध केला आहे.

पण असें आहे तर प्रकृत सूत्रामध्यें वाशब्द घातला तरी देखील जेव्हां यक्प्रत्यय करून पुढें क्विप्प्रत्यय केला तेव्हां हे दोष कां बरें येत नाहींत ?

तेव्हां कण्ड्वादि यगन्ताच्या पुढें क्विप्प्रत्ययच उत्पन्न होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की अन्येभ्योऽपि दृश्यते (३।२।१७८), म्हणजे पूर्वसूत्रोक्ताखेरीज इतर धातूंहूनही क्विप्प्रत्यय दृष्टीस पडतो, असें म्हटलें आहे. आणि या यक्प्रत्ययान्त धातूंच्या

ऽपि दृश्यत इत्येवमत्र क्विब भवत्येवम-क्रियमाणेऽपि न भविष्यति । अवश्य-मेतेभ्यस्तदा क्विवेषितव्यः । किं प्रयोज-नम् । एतानि रूपाणि यथा स्युरिति ॥

तर्त्तर्हि वावचनं कर्तव्यम् । न कर्त-व्यम् । उभयं कण्ड्वादीनि धातवश्चैव प्रातिपदिकानि च । आतश्चोभयं कण्डू-यतीति क्रियां कुर्वाणे प्रयुज्यतेऽस्ति मे कण्डूरिति वेदनामात्रस्य सांनिध्ये ॥

अपर आह ।

धातुप्रकरणाद्धातुः कस्य चासञ्जना-दपि ।

आह चायमिमं दीर्घं मन्ये धातु-र्विभाषितः ॥

**[गुपूधूपविच्छिपणिपनिभ्य आयः ॥ ३ । १ । २८ ॥**

**ऋतेरीयङ् ॥३।१।२९॥]**

**कमेर्णिङ् ॥ ३ । १ । ३० ॥**

किमर्थोऽयं णकारः । वृद्ध्यर्थः । ञ्णितीति वृद्धिर्यथा स्यात् । क्रियमाणे-

---

पुढें तर क्विप्प्रत्यय दृष्टीस पडत नाहीं.

तर मग यक्प्रत्ययाच्या विकल्पाबद्दल वचन केलें असतांही 'अन्येभ्योऽपि दृश्यते' असें म्हटलें असल्यामुळें ज्याप्रमाणें कण्ड्वादि यगन्ताहून क्विप्प्रत्यय होत नाहीं त्याप्रमाणें यक्प्रत्ययाच्या विकल्पाबद्दल वचन केलें नस-तांही कण्ड्वादि यगन्ताहून क्विप्प्रत्यय होणार नाहीं.

पण कण्ड्वादि यगन्ताहून क्विप्प्रत्यय होतो असें अवश्य गृहीत धरलेंच पाहिजे.

काय उपयोग ?

कण्डूः, मन्तुः, वल्गुः, इत्यादि प्रयोग सिद्ध होणें हा उपयोग होय.

तर मग एकंदरींत यक्प्रत्ययाच्या विकल्पा-बद्दल वचन केलें पाहिजे.

यक्प्रत्ययाच्या विकल्पाबद्दल वचन करण्या-ची जरूर नाहीं. कारण कण्ड्वादिशब्द धातु-संज्ञक आणि प्रातिपदिकसंज्ञक असे दोन्हीही प्रकारचे आहेत. खर्जनरूप क्रिया करणाऱ्याला उद्देशून 'कण्डूयति' असा प्रयोग केला जातो, आणि शरीरामध्यें उत्पन्न झालेल्या केवळ वेद-नाला उद्देशून 'अस्ति मे कण्डूः' असा प्रयोग केला जातो. या दोन्ही प्रकारच्या व्यवहारांवरून कण्वादिगणांतील शब्द धातु आणि प्रातिपदिक अशा दोन्ही स्वरूपांचे आहेत असें ठरतें.

अन्य कोणी एक वैयाकरण म्हणतो की कण्ड्वादिकांहून यक्प्रत्यय सांगणारें हें प्रकृत सूत्र 'धातोः' या अधिकारामध्यें पठित असल्यामुळें आणि यक्प्रत्ययाला इत्संज्ञक ककार जोडल्यामुळेंही कण्ड्वादिक हे धातु होत आणि कण्डू असा दीर्घान्ताचा ज्यापेक्षा पाठ करीत आहे त्यापेक्षां कण्ड्वादिकांचें धातुत्व वैकल्पिकें आहे, म्ह. प्रातिपदिक-संज्ञकही आहेत, असें सिद्ध होतें.

(सू.३०) णिङ् या प्रत्ययामध्यें इत्संज्ञक णकार कशाकरितां जोडला आहे ?

ञकारेत्संज्ञक किंवा णकारेइत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली वृद्धि (७।२। ११६) व्हावी म्हणून णकार जोडला आहे.

पण णकार जोडला तरी देखील वृद्धि

---

४. कण्ड्वादिकांचे धातुत्व कायमचें असेल तर यक्प्रत्यय केला असतां 'अकृत्सार्वधातु०' यानेंच दीर्घ साधत असल्यामुळे कण्डू असा दीर्घान्त पाठ व्यर्थ होईल.

१. गुप्, धूप्, विच्छ्, पण् आणि पन् या धातूं-हून स्वार्थी आयप्रत्यय होतो; उदा०- गोपायति, धूपायति.

१. ऋत् हा धातु सौत्र आहे. त्याहून स्वार्थी ईयङ्प्रत्यय होतो; उदा०- ऋतीयते ऋतीयेते ऋतीयन्ते.

१. कम्धातूहून स्वार्थी णिङ्प्रत्यय होतो; उदा०- कामयते.

ऽपि वै णकारे वृद्धिर्न प्राप्नोति । किं कारणम् । क्ङिति च [१.१.५] इति प्रतिषेधात् । णित्करणसामर्थ्याद्भविष्यति ॥ अत उत्तरं पठति ।

**णिङि णित्करणस्य सावकाशत्वाद्वृद्धिप्रतिषेधप्रसङ्गः ॥ १ ॥**

णिङि णित्करणं सावकाशम् । कोऽवकाशः । सामान्यग्रहणार्थो णकारः । क्व सामान्यग्रहणार्थेनार्थः । णेरनिटि [६.४.५१] इति । णिङि णित्करणस्य सावकाशत्वाद्वृद्धेः प्रतिषेधः प्राप्नोति ॥ ङित्करणमपि तर्हि सावकाशम् । कोऽवकाशः । सामान्यग्रहणाविघातार्थो ङकारः । क्व सामान्यग्रहणाविघातार्थेनार्थः । अत्रैव । शक्योऽत्र सामान्यग्रहणाविघातार्थोऽन्योऽनुबन्ध आसङ्क्तुम् । तत्र ङकारानुरोधाद्वृद्धिप्रतिषेधः प्राप्नोति । अवश्यमत्रात्मनेपदार्थो ङकारोऽनुबन्ध आसङ्क्तव्यो ङित इत्यात्मनेपदं यथा स्यात् । एवमप्युभयोः

---

होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें की 'क्ङिति च' (१।१।५) या सूत्रानें वृद्धीचा निषेध केला आहे.

इत् नांवाचा णकार जोडल्याचे जोरावर येथें निषेधाला मागें सारून वृद्धि होईल. हें मनांत आणून वार्तिककार लिहितात :

(वा.१) णिङ्प्रत्ययामध्यें जो इत्संज्ञक णकार जोडला आहे त्याचा अन्यत्र उपयोग आहे ?

तो उपयोग कोणता ?

णि या सामान्य शब्दाखालीं णिच् आणि णिङ् या उभयतांचें ग्रहण व्हावें हा उपयोग होय.

णि या सामान्य शब्दानें णिच् आणि णिङ् या दोघांचें ग्रहण कोठें बरें होतें ?

णेरनिटि (६।४।५१) येथें. तेव्हां णिङ्प्रत्ययामध्यें जोडलेला इत्नांवाचा णकार अन्यत्र उपयोगीं पडत असल्यामुळें तो प्रत्यय पुढें असतांना वृद्धीचा निषेध प्राप्त होतो.

णिङ्प्रत्ययामध्यें जो इत्संज्ञक ङकार जोडला आहे त्याचाही अन्यत्र उपयोग आहे.

तो उपयोग कोणता ?

णि या शब्दाखालीं णिच्प्रत्ययाप्रमाणें णिङ्प्रत्ययाचाही संग्रह व्हावा, त्यांत व्यत्यय येऊं नये, यासाठीं णिङ्प्रत्ययामध्यें ङकार जोडला आहे.[४]

णि या शब्दानें णिङ्प्रत्ययाचाही संग्रह कोठें बरें होत आहे ?

'णेरनिटि' येथेंच.

पण येथें णि या शब्दानें णिङ्प्रत्ययाचाही संग्रह होण्यांत व्यत्यय येऊं नये याकरितां ङकारच नको आहे. दुसरा कोणताही वर्ण इत्संज्ञक जोडला तरी चालेल.

असें असतां ज्यापेक्षां ङकार जोडला आहे त्यापेक्षां त्याच्या जोरावर वृद्धीचा निषेध प्राप्त होतो, असें म्हणतां येत नाहीं. कारण कामयते येथें णिङ्प्रत्ययान्ताच्या पुढें 'अनुदात्तङितः' (१।३।१२) यानें आत्मनेपद होण्यासाठीं ह्या णिङ्प्रत्ययाला ङकारच हा

---

२. आणि त्यामुळें वृद्धि कमजोराची होत असल्यामुळें.

३. तेव्हां त्या ङकारामुळें येणारा वृद्धीचा निषेधही कमजोराचाच होत आहे.

४. जर येथें णिङ्प्रत्ययाला ङकार लावला नाहीं तर 'णेरनिटि' (६।४।५१) या सूत्रामध्यें णि या शब्दानें या णिप्रत्ययाचेंच ग्रहण होईल. णिच्प्रत्ययाचें ग्रहण होणार नाहीं. कारण एका इत्संज्ञकाचें सूत्रामध्यें उच्चारण केलें असेल तर तेथें तेवढ्याच इत्संज्ञकाच्या प्रत्ययाचें ग्रहण होतें. तो इत्संज्ञक असून दुसरा इत्संज्ञक ज्याला जोडला असेल त्याचें ग्रहण होत नाहीं, अशी परिभाषा आहे.

सावकाशयोः प्रतिषेधबलीयस्त्वात्प्रतिषेधः प्राप्नोति ॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न कमेर्वृद्धिप्रतिषेधो भवतीति यदयं न कम्यमिचमामिति मित्संज्ञायाः प्रतिषेधं शास्ति ।

**मित्प्रतिषेधस्य चार्थवत्त्वात् ॥ २ ॥**

मित्प्रतिषेधस्य चार्थवत्त्वात्प्रतिषेधः प्राप्नोति । अर्थवान्मित्प्रतिषेधः । कोऽर्थः। णिङन्तस्य णिचि या वृद्धिस्तस्या ह्रस्वत्वं मा भूदिति । नन्वेतस्या अपि क्ङिति चेति प्रतिषेधेन भवितव्यम् । न भवितव्यम् । उक्तमेतत्क्ङिति प्रतिषेधे तन्निमित्तग्रहणमिति ॥ एवं तर्हि न णिङन्तस्य णिचि या वृद्धिस्तस्या ह्रस्वत्वं प्राप्नोति । किं कारणम् । णिङा व्यवहितत्वात् । लोपे कृते नास्ति व्यवधानम्। स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव ॥ णिङ्येव तर्हि मा भूदिति । णिङि च न प्राप्नोति ।

---

अवश्य जोडला पाहिजे.[५]

याप्रमाणें णकार आणि ङकार या दोघांचाही उपयोग अन्यत्र होत असल्यामुळें वृद्धि आणि प्रतिषेध हे दोन्ही कमजोराचे झाले तरी निषेध हा स्वभावतःच प्रबल असल्यामुळें येथें निषेध प्राप्त होतो.

असें आहे तर ज्यापेक्षां हे पाणिनिआचार्य 'न कम्यमिचमाम्' (धातुपाठ ८१७) या गणसूत्रानें कम्धातूला मित्संज्ञेचा निषेध करीत[६] आहेत त्यापेक्षां कम्धातूला वृद्धीचा निषेध प्राप्त होत नाहीं असें सुचवीत आहेत.

(वा. २) कम्धातूला केलेल्या मित्संज्ञानिषेधाचा अन्यत्र उपयोग असल्यामुळें वृद्धीचा निषेध प्राप्त होत आहे.

मित्संज्ञानिषेधाचा उपयोग तो कोणता ?

णिङ्प्रत्ययान्ताच्या पुढें णिच्प्रत्यय केला असतां त्या णिच्प्रत्ययामुळें झालेल्या वृद्धीला ऱ्हस्व न व्हावा हा मित्संज्ञेच्या निषेधाचा उपयोग होय.

पण येथें णिच्प्रत्ययामुळें प्राप्त होणाऱ्याही वृद्धीचा 'क्ङिति च' यानें निषेध होईलच.

त्या णिच्प्रत्ययामुळें प्राप्त होणाऱ्या वृद्धीचा 'क्ङिति च' यानें निषेध होत नाहीं. कारण 'क्ङितिप्रतिषेधे तन्निमित्तग्रहणमुपधारोरवीत्यर्थम्' (१।४।५, वा.१२) असें सांगितलें आहे.

तरी पण मित्संज्ञेचा निषेध व्यर्थ होत आहेच. कारण णिङ्प्रत्ययान्ताला णिच्प्रत्ययामुळें केलेल्या वृद्धीला 'मितां ह्रस्वः' यानें ऱ्हस्व येऊंच शकत नाहीं.[७]

काय कारण ?

कारण असें की णिङ्प्रत्ययानें मध्यें व्यवधान येत आहे. णिङ्प्रत्ययाचा 'णेरनिटि' (६।४।५१) यानें लोप केला असतां व्यवधान होणार नाहीं.

तरी देखील स्थानिवद्भावानें (१।१।५७) व्यवधान होत आहेच.

तर मग णिङ्प्रत्ययामुळें 'मितां ऱ्हस्वः' यानें ह्रस्व न व्हावा यासाठीं कम्धातूला मित्संज्ञेच्या निषेधाचा उपयोग होतो, असें म्हणावें तर णिच्प्रत्ययामुळें झालेल्या वृद्धीला

---

५. तात्पर्य, वृद्धीचा निषेधही येथें कमजोराचाच आहे.

६. कामयते येथे वृद्धि केल्यानंतर मितां ह्रस्वः (६।४।९२) यानें ह्रस्व न व्हावा यासाठीं कम्धातूला मित्संज्ञेचा निषेध केला आहे. पण जर तेथें 'क्ङिति च' यानें वृद्धीचाच निषेध झाला तर मग वृद्धि केल्यानंतर ह्रस्व न होण्यासाठी केलेल्या मित्संज्ञानिषेधाचा काय उपयोग ? अर्थात् मित्संज्ञानिषेध व्यर्थ होत आहे.

७. तेव्हां किद्ङित्प्रत्ययांच्या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या गुणवृद्धीचाच त्यानें निषेध होत असल्यामुळें येथें निषेधाची प्राप्ति येत नाही. तेव्हां ती वृद्धि झाल्यानंतर ह्रस्व (६।४।९२) होऊं नये याकरितां 'न कम्यमिचमाम्' हा मित्संज्ञेचा निषेध उपयोगी

किं कारणम् । असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इति ॥ नैव वा पुनर्णिङन्तस्य णिचि वृद्धिः प्राप्नोति । किं कारणम् । णिङा व्यवहितत्वात् । लोपे कृते नास्ति व्यवधानम् । स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव ॥ इदं तर्हि प्रयोजनं यत्तच्चिण्णमुलोर्दीर्घोऽन्यतरस्याम् [६.४.९३] इति दीर्घत्वं तत्कमेर्णिङि मा भूदिति । किं पुनः कारणं तत्र दीर्घोऽन्यतरस्यामित्युच्यते न ह्रस्वोऽन्यतरस्यामित्येवोच्येत । यथाप्राप्तं चापि कमेर्ह्रस्वत्वमेव । तत्रायमप्यर्थो ह्रस्वग्रहणं न कर्तव्यं भवति प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । मितां ह्रस्वः [९२] इति । का रूपसिद्धिः अशमि अशामि शमं शमम् शामं शामम् । वृद्ध्या सिद्धम् । न सिध्यति । नोदात्तोपदेशस्य मान्तस्यानाचमेः [७.३.३४] इति वृद्धिप्रतिषेधः प्राप्नोति । चिण्कृतोः

---

णिङ्प्रत्ययामुळें ह्रस्व येऊंच शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की ती वृद्धि बहिरंग असल्यामुळें अंतरंग ह्रस्व कर्तव्य असतांना बहिरंग अशा त्या झालेल्या वृद्धीला असिद्धत्व आहे.

किंवा णिङ्प्रत्ययान्ताच्या पुढें णिच् केला असतां त्या णिच्प्रत्ययामुळें वृद्धि (७।२।११६) येऊंच शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की णिङ्प्रत्ययानें व्यवधान होत आहे.

पण 'णेरनिटि' (६।४।५१) यानें णिङ्प्रत्ययाचा लोप केला असतां व्यवधान नाहीं.

तरी पण 'अचः परस्मिन्०' (१।१।५७) या स्थानिवद्भावानें व्यवधान आहेच.

तर मग 'चिण्णमुलोर्दीर्घोऽन्य०' (६।४।९३) यानें सांगितलेला मित्संज्ञकाच्या उपधेला दीर्घ तो णिङ् पुढें असतांना न व्हावा हा कम्धातूला सांगितलेल्या मित्संज्ञेच्या निषेधाचा उपयोग समजावा.

पण येथें अगोदर असा विचार उत्पन्न होतो की 'चिण्णमुलोः०' यानें विकल्पानें दीर्घाचें विधान जें केलें आहे याच काय बरें कारण ?

तसें करूं नये. तर 'ह्रस्वोऽन्यतरस्याम्' असेंच म्हणून विकल्पानें ह्रस्वाचेंच विधान करावें. कारण पूर्वसूत्रानें ह्रस्वच प्राप्त होत आहे. शिवाय ह्रस्व विकल्पाचें विधान करण्यांत असा एक फायदा होत आहे की 'चिण्णमुलोः०' येथें ह्रस्वशब्द घालावा लागत नाहीं. कारण पूर्वसूत्रामध्यें असलेला ह्रस्वशब्द येथें अनुवृत्त होईल.

तो ऱ्हस्वशब्द पूर्वी कोठेंसा आहे ?

'मितां ह्रस्वः' (६।४।९२) येथेंच आहे.

पण ऱ्हस्वाचा विकल्प केला तर अशमि, अशामि, शमंशमम्, शामंशामम्, या उदाहरणांची सिद्धि कशी बरें होते ?

ह्रस्वाभावपक्षीं पूर्वी वृद्धि केलेली कायम असल्यामुळें हीं उदाहरणें साधतात.

हीं उदाहरणें सिद्ध होऊं शकत नाहींत. कारण 'नोदात्तोपदेशस्य मान्तस्या०' (७।३।३४) यानें वृद्धीचा निषेध प्राप्त होत आहे.

---

पडतो. व्यर्थ होत नाहीं.

८. अर्थात् वृद्धि केल्यानंतर ऱ्हस्व न व्हावा यासाठीं कम्धातूला सांगितलेला मित्संज्ञानिषेध अगदींच फोल ठरत आहे.

९. शम्धातूहून णिच्, कर्मणि लुङ्, त, च्लि, चिण्, तप्रत्ययाचा लुक् (६।४।१०४), णिज्निमित्तक उपधावृद्धि, 'मितां ह्रस्वः' यानें ह्रस्व नित्य प्राप्त असतां त्याचा 'चिण्णमुलोरन्यतरस्याम्' यानें विकल्प केला. तेव्हां एकदा ह्रस्व आणि एकदा ह्रस्वाभावपक्षीं वृद्धि कायम आहेच. मिळून ह्रस्वविकल्पाचें विधान केल्यानें हीं उदाहरणें साधतात. शमंशमम् शामंशामम् येथें ण्यंताहून णमुल्(३।४।२२),नित्यवीप्सयोः

स प्रतिषेधो न णिचि ॥ इदं तर्हि । अजनि अजानि जनं जनम् जानं जानम् । जनिवध्योश्च [३५] इति वृद्धिप्रतिषेधः प्राप्नोति । सोऽपि चिण्कृतोरेव ॥ णिज्व्यवहितेषु तर्हि यङ्लोपे चोपसंख्यानं कर्तव्यं स्यात् । शमयन्तं प्रयोजितवान् अशमि अशामि शमं शमम् शामं शामम् । शंशमयतेः अशंशमि अशंशामि शंशमं शंशमम् शंशामं शंशामम् । किं पुनः कारणं न सिध्यति । चिण्णमुल्परे णौ मितामङ्गानां ह्रस्वो भवतीत्युच्यते यश्चात्र णिश्चिण्णमुल्परो न तस्मिन्मिदङ्गं यस्मिंश्च मिदङ्गं नासौ णिश्चिण्णमुल्परः । णिलोपे तर्हि कृते चिण्णमुल्परः । स्थानिवद्भावान्न चिण्णमुल्परः ॥ अथ दीर्घोऽन्यतरस्यामित्युच्यमाने यावता स्थानिवद्भावः कथमेवैतत्सिध्यति । एतदिदानीं दीर्घग्रहणस्य प्रयोजनं दीर्घविधिं प्रत्यजादेशो न स्थानिवदिति स्थानिवद्भावप्रतिषेधः सिद्धो भवति ॥ यदा खल्वप्यायादय

---

हा दोष येत नाहीं. कारण तो निषेध चिण् किंवा कृत् हे प्रत्यय पुढें असतांना सांगितला आहे. णिच् पुढें असतांना सांगितलेला नाहीं.

तर अजनि अजानि, जनंजनम् जानंजानम् येथें जनिवध्योश्च (७।३।३५) यानें वृद्धीचा निषेध प्राप्त होत आहे.

तोही निषेध चिण् किंवा कृत्प्रत्यय पुढें असतांनाच सागितला आहे, णिच् पुढें असतांना होणार नाहीं.

तर मग णिच्प्रत्ययान्ताहून दुसरा णिच्प्रत्यय करून पुढें चिण्प्रत्यय किंवा कृत्प्रत्यय केला असतांना, तसेंच यङ्लोप झाला असतांना, तेथें पाक्षिकवृद्धि होण्यासाठीं अपूर्ववचन करावें लागेल; जसें:— शमयन्तं प्रयोजितवान्, अशमि अशामि, शमंशमं शामंशामम्. तसेंच शंशम्य या यङ्प्रत्ययान्त धातूहून णिच्प्रत्यय करून पुढें चिण् किंवा णमुल्, अशंशमि अशंशामि, शंशमंशंशमम् शंशामंशंशामम्.

पण पाक्षिकवृद्धिविधानाबद्दल अपूर्ववचन केल्यावांचून वरील उदाहरणें कां बरें सिद्ध होऊं शकत नाहींत ?

चिण् पुढें असलेला किंवा णमुल् पुढें असलेला असा णिच्प्रत्यय पुढें असतांना मागील मित् नांवाच्या अंगाला ह्रस्व होतो असें सांगितलें जात आहे. तेव्हां वरील उदाहरणांमध्यें दोन णिच्प्रत्यय असल्यामुळें ज्या दुसऱ्या णिच्प्रत्ययाच्या पुढें चिण् किंवा णमुल् आहे त्या णिच्प्रत्ययाच्या अगदीं जवळ मागें मित् नांवाचें अंग नाहीं, आणि ज्या पहिल्या णिच्प्रत्ययाच्या मागें अगदीं जवळ मित् नावाचें अंग आहे त्या णिच्प्रत्ययाच्या पुढें अगदीं जवळ चिण् किंवा णमुल् नाहीं.

तर मग णिलोप केला असतां मित् नांवाच्या अंगाच्या अगदीं जवळ पुढें चिण् किंवा णमुल् हा प्रत्यय आहे ना ?

स्थानिवद्भावानें (१।१।५७) पूर्वस्थिति कायमच आहे.

आतां 'चिण्णमुलोर्दीर्घोऽन्य०' यानें विकल्पानें दीर्घाचें विधान केलें तरी देखील स्थानिवद्भाव आहेच. तेव्हां हीं उदाहरणें कशीं बरें साधतात ?

हाच तर दीर्घ सांगण्याचा येथें उपयोग आहे की दीर्घविधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं (१।१।५८) हा स्थानिवद्भावाचा निषेध सिद्ध होतो.[11]

'आयादय आर्धधातुके वा' या पुढील सूत्रानें

---

(८।१।४) यानें द्वित्व झालें आहे.

१०. आणि येथें तर धातूहून अगोदर णिच्प्रत्ययच केला आहे. तात्पर्य, कम्धातूला मित्संज्ञेच्या

निषेधाचा उपयोग नाही.

११. दोन्हीही णिलोपांना स्थानिवद्भावाचा निषेध झाला तरी आभीयासिद्धत्वानें (६।४।२२)

आर्धधातुके वा भवन्ति तदा णिचि णिङ् नास्ति तदर्थं च मित्प्रतिषेधः स्यात् ॥ तस्मात्प्रतिषेधः प्राप्नोति ॥

उक्तं वा ॥ ३ ॥

किमुक्तम् । तद्धितकाम्योरिक्प्रकरणादिति ॥

## आयादय आर्धधातुके वा ॥ ३ । १ । ३१ ॥

कथमिदं विज्ञायते । आयादिभ्यो यदार्धधातुकं तस्मिन्नवस्थिते वायादीनां निवृत्तिर्भवतीति । आहोस्विदायादिप्रकृतेर्यदार्धधातुकं तस्मिन्नवस्थिते वायादीनामुत्पत्तिर्भवतीति । किं गतमेतदियता सूत्रेणाहोस्विदन्यतरस्मिन्पक्षे भूयः सूत्रं कर्तव्यम् । गतमित्याह । कथम् । यदा तावदायादिभ्यो यदार्धधातुकं तस्मिन्न-

---

आय, ईयङ् आणि णिङ् या प्रत्ययांचा विकल्प सांगितला असल्यामुळें जेव्हां णिङ्प्रत्यय केला नाहीं तेव्हां कम्धातूच्या पुढें व णिच्प्रत्याच्या मागें णिङ् नसल्यामुळें तेथें णिच्निमित्तक वृद्धि झाली असतां ह्रस्व न होण्यासाठीं कम्धातूला मित्संज्ञेचा निषेध सफल होईल. एकंदरींत णिङ्प्रत्यय केला असता 'क्ङिति च' यानें वृद्धीचा निषेध प्राप्त होतो.

(वा.३) अथवा मागें सांगितलेंच आहे.

काय सांगितलें आहे ?

तद्धितकाम्योरिक्प्रकरणात् (१।१।५,वा.४) असें सांगितलें आहे. तेव्हां इकाला सांगितलेल्या गुणवृद्धींचाच तो निषेध आहे. आणि कामयते येथें होणारी वृद्धि (७।२।११६) तर इकाला सांगितलेली नाहीं.[१२]

(सू.३१) आय, ईयङ् आणि णिङ् यांच्या पुढें आर्धधातुक प्रत्यय आला असतां गुप् वगैरे धातूंहून केलेल्या आय वगैरे प्रत्ययांची विकल्पानें निवृत्ति होते, असा प्रकृत सूत्राचा अर्थ समजावयाचा किंवा गुप् वगैरे धातूंच्या पुढें आर्धधातुक प्रत्यय केल्यानंतर मध्यें आय वगैरे प्रत्ययांची विकल्पानें उत्पत्ति करावयाची, असा अर्थ समजावयाचा ?

पण आहे एवढ्याच सूत्रावरून या दोन्ही तऱ्हा लब्ध होतात काय किंवा एखाद्या तऱ्हेच्या वेळीं प्रकृत सूत्रात काहीं भर घालावी लागते ?

आहे एवढ्याच सूत्रावरून ह्या दोन्ही तऱ्हा लब्ध होऊ शकतात.

त्या कशा ?

जेव्हां आय वगैरेंच्या पुढें आर्धधातुक प्रत्यय आला असतां पूर्वी केलेल्या आय वगैरे

---

दुसऱ्या णिच्प्रत्ययाचा लोप असिद्ध होत असल्यामुळें क्विप् किंवा णमुल् या प्रत्ययाच्या मागील णिच्प्रत्ययाच्या मागें मित्संज्ञक अंगाची अवस्थिति घडल्यानें सदरील उदाहरणें साधतां येतात. पहिल्या णिच्प्रत्ययाचा लोप समानाश्रय नसल्यामुळें दीर्घाच्या दृष्टीनें तो आभीय असिद्ध होत नाहीं.

१२. तेव्हां कामयते येथे वृद्धीचा निषेध येत नसल्यामुळें वृद्धि होण्याकरितां ह्या णिङ्प्रत्ययाला णकार केला आहे असें सिद्ध होतें.

१. येथें आर्धधातुके ही विषयसप्तमी आहे. तेव्हां आर्धधातुक प्रत्यय करावयाचा असें मनांत धरलें असतां तेथें तो आर्धधातुक प्रत्यय करण्याचे पूर्वींच आय्, ईयङ् आणि णिङ् हे प्रत्यय त्या त्या धातूंच्या पुढें विकल्पानें करावेत; उदा०- गोप्ता गोपायिता, अर्तिता ऋतीयिता, कमिता कामयिता. येथें आर्धधातुके ही विषयसप्तमी मानण्याचा उपयोग असा की गुप्धातूपासून भाववाचक नाम क्तिन् (३।३।९४) हा प्रत्यय होऊन गुप्तिः असें होतें. तो क्तिन्प्रत्यय करण्याचे पूर्वींच एकदा आयप्रत्यय होतो. तेव्हां प्रत्ययान्त झाल्यामुळें क्तिन्प्रत्ययाचा बाध करून अप्रत्यय (३।३।१०२) होऊन स्त्रीलिंगी टाप् (४।१।४) प्रत्यय होऊन गोपाया असें दुसरें रूप होतें. विषयसप्तमी घेतली नाहीं तर गोपाया हे रूप साधणार नाहींच. शिवाय क्तिन्प्रत्यय केल्यानंतर एकदा आयप्रत्यय झाला तर गोपायतिः असें भलतेंच रूप होऊं लागेल. गुप्तिः हें मात्र

वस्थिते वायादीनां निवृत्तिर्भवतीति तदाविशेषेण सर्वमायादिप्रकरणमनुक्रम्यायादय आर्धधातुके वेत्युच्यते । यदाप्यायादिप्रकृतेर्यदार्धधातुकं तस्मिन्नवस्थिते वायादीनामुत्पत्तिर्भवतीति तदैकं वाक्यं तच्चेदं च । गुपूधूपविच्छिपणिपनिभ्य आयः [२८] आर्धधातुके वा । ऋतेरीयङ् [२९] आर्धधातुके वा । कमेर्णिङ् [३०] आर्धधातुके वेति ॥ कश्चात्र विशेषः ।

**आयादिभ्यो यदार्धधातुकमायादिप्रकृतेर्यदार्धधातुकमिति चोभयथानिष्टप्रसङ्गः ॥ १ ॥**

आयादिभ्यो यदार्धधातुकमायादिप्रकृतेर्यदार्धधातुकमिति चोभयथानिष्टं प्राप्नोति ॥ यदि विज्ञायत आयादिभ्यो यदार्धधातुकं तस्मिन्नवस्थिते वायादीनां निवृत्तिर्भवतीति गुप्तिः जुगोपति चेष्टं न सिध्यति । इदं चानिष्टं प्राप्नोति गोपांचकार गोपेति च । इदं तावदिष्टं सिद्धं

---

प्रत्ययांची विकल्पानें निवृत्ति करावयाची ही तऱ्हा गृहीत धरण्यांत येते तेव्हां 'गुपूधूपविच्छिपणिपनिभ्य आयः' इत्यादिक तीन सूत्रांनीं या प्रकृत सूत्राची अपेक्षा न धरतां मोघमच गुप् वगैरे धातूंहून आय वगैरे प्रत्ययांचें विधान करून नंतर या प्रकृत सूत्रानें आर्धधातुक पुढें असतां आय वगैरे प्रत्ययांचा विकल्प[2] होतों असें सांगावयाचें आहे. आतां जेव्हां गुप् वगैरे धातूंच्या पुढें आर्धधातुक प्रत्यय करून नंतर मध्यें आय वगैरे प्रत्यय करावयाचे ही तऱ्हा गृहीत धरण्यांत येते तेव्हां 'गुपूधूप०' इत्यादि तीन सूत्राची प्रत्येकीं या प्रकृत सूत्राबरोबर एकवाक्यता करावयाची ती अशीः– गुप् वगैरे धातूंहून सर्वत्र आयप्रत्यय होतो; फक्त जेथें आर्धधातुक प्रत्यय असेल तेथें तो आर्धधातुकप्रत्यय केल्यानंतर तो पुढें असतांना मध्यें आयप्रत्यय विकल्पानें होतो. तसेंच ऋत् धातूंहून सर्वत्र ईयङ्प्रत्यय होतो; फक्त जेथें आर्धधातुक प्रत्यय असेल तेथें तो आर्धधातुक प्रत्यय केल्यानंतर तो पुढें असतांना मध्यें ईयङ्प्रत्यय विकल्पानें होतो. तसेंच कम् धातूहून सर्वत्र णिङ्प्रत्यय होतो; फक्त जेथें आर्धधातुक प्रत्यय असेल तेथें तो आर्धधातुक प्रत्यय केल्यानंतर तो पुढें असतांना मध्यें णिङ्प्रत्यय विकल्पानें होतो.

या दोन तऱ्हात काय फरक ?

(वा.१) आयादिकांच्या पुढें आर्धधातुक प्रत्यय आला असतां, किंवा आयादिकांच्या गुप् वगैरे प्रकृतींच्या पुढें आर्धधातुक आला असतां, यांपैकीं कोणतीही तऱ्हा गृहीत धरली तरी अनिष्ट प्रसंग ओढवतो. तो असाः– जर 'आयादिकांच्या पुढें आर्धधातुक प्रत्यय आला असतां आयादिकांची विकल्पानें निवृत्ति करावयाची' असें समजलें तर गुप्तिः आणि जुगोप हीं इष्ट दोन उदाहरणें सिद्ध होऊं शकत नाहींत[3],

---

दोन्ही वेळां साधत आहे.

२. आय् वगैरे प्रत्यय केल्यानंतर मागून त्यांचा विकल्प करावयाचा म्हणजे अर्थात् त्यांची एकदा निवृत्ति करावयाची.

३. कारण गुप्धातूहून आयप्रत्यय करून पुढें क्तिन्प्रत्यय करून प्रकृतसूत्रानें एकदा आयप्रत्ययाची निवृत्ति करून गुप्तिः हा शब्द साधावयाचा, परंतु आयप्रत्यय झाल्यानंतर अप्रत्ययानें बाध होत असल्यामुळें क्तिन्प्रत्यय होणार नाहीं. तेव्हां गुप्तिः हें साधत नाहींच. पण अप्रत्यय करून एकदा आयप्रत्ययाची निवृत्ति केली म्हणजे गोपा असें भलतेंच रूप होऊं लागेल. तसेंच जुगोप येथें गुप्धातूहून आयप्रत्यय करून पुढें लिट्प्रत्यय करून प्रकृत सूत्रानें एकदा आयप्रत्ययाची निवृत्ति करून जुगोप हें उदाहरण साधावयाचें, परंतु आयप्रत्यय झाल्यानंतर लिट्प्रत्यय केला की आम्प्रत्यय (३।१।३५) होऊं लागेल, तेव्हां जुगोप हें साधत नाहींच, पण आम्प्रत्यय करून एकदा आयप्रत्ययाची निवृत्ति

भवति गोपायांचकार गोपायेति ॥ अथ विज्ञायत आयादिप्रकृतेर्यदार्धधातुकं तस्मिन्नवस्थिते वायादीनामुत्पत्तिर्भवतीति गुप्तिः जुगोपेति चेष्टं सिद्धं भवति । इदं चानिष्टं न प्राप्नोति गोपांचकार गोपेति । इदं त्विष्टं न सिध्यति गोपायांचकार गोपायेति ॥ इदं तावदिष्टं सिध्यति गोपायांचकारेति । कथम् । अस्त्वत्रायादिप्रकृतेर्यदार्धधातुकं लिट् तस्मिन्नवस्थिते वायादय आम्मध्ये पतिष्यति यथा विकरणास्तद्वत् ॥ इदं तर्हीष्टं न सिध्यति गोपायेति ॥

## सिद्धं तु सार्वधातुके नित्यवचनादनाश्रित्य वाविधानम् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । अविशेषेणायादीनां वाविधिमुक्त्वा सार्वधातुके नित्यमिति वक्ष्यामि ॥

## स्यादिबलीयस्त्वं तु विप्रतिषेधेन तुल्यनिमित्तत्वात् ॥ ३ ॥

स्यादिभिस्त्वायादीनां बाधनं प्राप्नोति

---

आणि गोपांचकार, गोपा, हें अनिष्ट उदाहरणद्वय गळीं पडतें. आतां गोपायाचकार आणि गोपाया हीं इष्ट दोन उदाहरणें मात्र साधत आहेत.

'आयादिकांच्या ज्या प्रकृति गुप् वगैरे त्यांच्या पुढे आर्धधातुक प्रत्यय अगोदर करून नंतर मध्यें आयादिकांची विकल्पानें उत्पत्ति करावयाची' असें समजण्यांत आलें तर गुप्तिः आणि जुगोप हें इष्ट उदाहरणद्वय साधतें. आणि गोपांचकार व गोपा हीं दोन अनिष्ट उदाहरणें गळीं पडत नाहींत हें खरें, पण गोपायांचकार आणि गोपाया हीं दोन इष्ट उदाहरणें सिद्ध होऊं शकत नाहींत.

पण यांपैकीं गोपायांचकार हें इष्ट उदाहरण सिद्ध होऊं शकतें.

तें कसें ?

गुप्धातूहून लिट्प्रत्यय केला असतां तो लिट्प्रत्ययच आर्धधातुक असल्यामुळे आयप्रत्यय होईल. नंतर आयप्रत्ययाच्या पुढें व लिटाच्या मागे अर्थात् उभयतांच्या मध्यें आम्प्रत्यय उत्पन्न होईल. ज्याप्रमाणें प्रकृति आणि प्रत्यय या उभयतांच्या मध्यें शप् वगैरे विकरणें उत्पन्न होतात त्याप्रमाणें.

अशा रीतीनें गोपायांचकार हें उदाहरण साधतां आलें तरी गोपाया हें इष्ट उदाहरण साधत नाहीं हा दोष उरतोच.

(वा.२) गोपाया हें उदाहरण सिद्ध होऊं शकतें.

तें कसें ?

असें की कांही एक निमित्त म्हणून गृहीत न धरतां गुप् वगैरे धातूंच्या पुढें आयप्रत्यय नित्य होतो असें विधान करावें.

(वा.३) स्य, तास्, वगैरे प्रत्ययांकडून आयादिकांचा बाध होईल.

---

केली म्हणजे गोपांचकार असें भलतेंच रूप होऊं लागेल.

४. भाष्यकारांनीं येथें दोन पक्ष मांडले आहेतः- १ आर्धधातुक प्रत्यय पुढें असतां पूर्वसूत्रानें होऊन गेलेल्या आयप्रत्ययाची विकल्पानें निवृत्ति, आणि २ आर्धधातुक प्रत्यय पुढें ठेवला असतां आय प्रत्ययाची विकल्पानें प्रवृत्ति. पहिल्या पक्षीं इष्ट असलेलीं गुप्तिः आणि जुगोप हीं रूपें साधत नाहींत व त्याऐवजीं गोपा आणि गोपांचकार हीं भलतींच रूपें साधतात. कारण प्रत्यय होण्याचे अगोदरच आयप्रत्ययान्त गोपाय असें अंग तयार होतें व त्या अंगापुढें क्तिन्प्रत्ययाचे ऐवजीं अ प्रत्यय करावा लागतो व लिटाचे पूर्वीं आम् करावा लागतो आणि अ प्रत्यय व आम् केल्यानंतर आयप्रत्ययाचा लोप झाल्यावर गोपा व गोपांचकार ही रूपें होतात. आयप्रत्ययाचा लोप केला नाहीं तर गोपाया व गोपायांचकार हीं इष्ट रूपें होतातच. दुसऱ्या पक्षीं गुप्धातूपुढें क्तिन् व लिट् ठेवल्यानंतर आयप्रत्ययाची प्रवृत्ति विकल्पानें होते. आय केला नाहीं तर गुप्तिः व जुगोप हीं इष्ट रूपें साधतात; पण आय केल्यावर गोपाय व गोपायांचकार हीं उदाहरणें न साधतां त्याऐवजीं गोपायतिः व जुगोपाय अशीं भलतीं रूपें होऊं लागतात.

विप्रतिषेधेन। किं कारणम्। तुल्यनिमित्तत्वात्। तुल्यं हि निमित्तं स्यादीनामायादीनां च। स्यादीनामावकाशः। करिष्यति हरिष्यति। आयादीनामवकाशः। गोपायति धूपायति। इहोभयं प्राप्नोति। गोपायिष्यति धूपायिष्यतीति। परत्वात्स्यादयः प्राप्नुवन्ति॥

**न वायादिविधानस्यानवकाशत्वात्॥ ४॥**

न वैष दोषः। किं कारणम्। आयादिविधानस्यानवकाशत्वात्। अनवकाशा आयादय उच्यन्ते च ते वचनाद्भविष्यन्ति। ननु चेदानीमेवावकाशः प्रक्लृप्तो गोपायति धूपायतीति। अत्रापि शप्स्यादिर्भवति। यद्यप्यत्रापि शप्स्यादिर्भवति न त्वत्रास्ति विशेषः सति वा शप्यसति वा। अन्यदिदानीमेतद्यदुच्यते नास्ति विशेष इति यत्तु तदुक्तमायादीनां स्यादिभिरव्याप्तोऽवकाश इति स नास्त्यवकाशः। अवश्यं खल्वप्यत्र शप्स्यादिरेषितव्यः। किं कारणम्। गोपायन्ती धूपायन्तीति शप्श्यनोर्नित्यम् [७.१.८१] इति नुम्यथा स्यादिति॥ यदि तर्ह्यनवकाशा आयादय आयादिभिः स्यादीनां बाधनं प्राप्नोति। यथा पुनरयं सूत्रभेदेन परिहारो यदि पुनः शपि नित्यमित्युच्येत।

---

काय कारण ?

कारण असें की गोपायिष्यति इत्यादि स्थलीं स्यादिप्रत्ययांचें आणि आयादिप्रत्ययांचें निमित्त एकच आहे. आयादिप्रत्ययांची प्राप्ति नसतां स्यादिप्रत्यय झाल्याचें उदाहरणः– करिष्यति, हरिष्यति; व स्यादिकांची प्राप्ति नसतां आयादिक प्रत्यय झाल्याचें उदाहरणः– गोपायति, धूपायति. आणि गोपायिष्यति, धूपायिष्यति, येथें उभयताची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें परत्वास्तव आय वगैरे प्रत्ययांचा स्य, तास्, वगैरे प्रत्यय बाध करतील.

(वा.४) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की आय, ईयङ्, णिङ्, हे प्रत्यय अनवकाश आहेत. आणि असें असून सांगितले आहेत. तेव्हां विधान केल्याचे जोरावर ते होतील.

पण स्यादिकांची प्राप्ति नसतांना आय वगैरे प्रत्ययांना अवकाश गोपायति, धूपायति, हा दाखविला आहे ना ?

तेथेंही स्यादिकांपैकी शप्प्रत्यय प्राप्त होत आहेच.

पण जरी येथे स्यादिकांपैकीं शप् प्राप्त होत आहे तरी तो शप्प्रत्यय करण्यात किंवा न करण्यांत गोपायति या उदाहरणामध्यें कांहीं फरकच होत नाहीं

फरक होत नाहीं तर न होऊं दे. ही गोष्ट निराळी पण जेथें स्यादिकांची प्राप्ति नाहीं असें आयादिकाना स्थळ मिळतें असें जें म्हटलें तें संभवत नाहींच. शिवाय गोपायति इत्यादि स्थलीं स्यादिकांपैकीं शप्प्रत्यय होतो असें गृहीत धरलेंच पाहिजे.

काय कारण ?

कारण असें की गोपायन्ती, धूपायन्ती, येथें 'शप्श्यनोर्नित्यम्' (७।१।८१) यानें नुमागम नित्य झाला पाहिजे.

मग आतां जर आयादिक हे अनवकाश आहेत तर ते आय वगैरे प्रत्यय स्यादिकांचा बाध करूं लागतील.

आतां 'गोपाया' या दोषाचा परिहार 'सार्वधातुके नित्यम्' असा सूत्रभेद करून केला, मग एवींतेवीं सूत्रभेदच करावयाचा तर 'आय वगैरे प्रत्यय हे स्यादिप्रत्ययांचा बाध करतील' हा तरी दोष काय म्हणून घ्यावा ?

सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥

यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमायादिभ्यो यदार्धधातुकमायादिप्रकृतेर्यदार्धधातुकमिति चोभयथानिष्टप्रसङ्ग इति । नैष दोषः । आर्धधातुक इति नैषा परसप्तमी । का तर्हि । विषयसप्तमी । आर्धधातुकविषय इति । तत्रार्धधातुकविषय आयादिप्रकृतेरायादिषु कृतेषु यो यतः प्रत्ययः प्राप्नोति स ततो भविष्यति ॥

## सनाद्यन्ता धातवः ॥३।१।३२॥

अन्तग्रहणं किमर्थं न सनादयो धातव इत्येवोच्येत । केनेदानीं तदन्तानां भविष्यति । तदन्तविधिना ॥ अत उत्तरं पठति ।

### सनादिष्वन्तग्रहण उक्तम् ॥ १ ॥

किमुक्तम् । पदसंज्ञायामन्तवचनमन्यत्र संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तविधिप्रतिषेधार्थमिति । इदं चापि प्रत्ययग्रहणमयं चापि संज्ञाविधिः ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते न भूवादयो

---

'शपि नित्यम्' असें सूत्र केलें म्हणजे तोही दोष जातो.

तर मग एकंदरींत येथें मूळसूत्रांत बदल करावयाचा कीं काय ?

तर मग आहे तसेंच मूळ सूत्र असूं दे.

पण मूळचें सूत्र कायम ठेवलें तर 'आयादिकांच्या पुढें किंवा आयादिकाच्या प्रकृतीच्या पुढें आर्धधातुक प्रत्यय आला असतां, यांपैकीं कोणतीही तऱ्हा गृहीत धरली तरी अनिष्ट प्रसंग हा ओढवतोच' असें म्हटलें आहे ना ?

हा अनिष्ट प्रसंग ओढवत नाहीं. कारण 'आर्धधातुके' ही 'आर्धधातुक पुढें असतां' अशा अर्थाची परसप्तमी नव्हे.

तर कोणत्या अर्थाची ही सप्तमी आहे ?

'आर्धधातुकाचा विषय असतां' अशा अर्थाची ही विषयसप्तमी आहे. तेव्हां आर्धधातुक प्रत्यय करावयाचा असतां तो करण्याच्या अगोदरच विकल्पानें आयादिकांची उत्पत्ति केली असतां त्या आयादिकांच्या पुढें जो प्रत्यय प्राप्त होत असेल तो त्याच्या पुढें होईल.

(सू. ३२) येथें सनादि या शब्दापुढें अन्त-शब्द कशाकरितां घातला आहे? तो घालावयास नको. तर 'सनादयो धातवः' असेंच सूत्र करावें.

तर मग आतां चिकीर्ष, पुत्रीय, पुत्रकाम्य, या समुदायाला धातुसंज्ञा कशी होईल ?

येन विधिस्तदन्तस्य (१।१।७२) या सूत्रानें तदन्तविधि झाला म्हणजे चिकीर्ष वगैरे शब्दाना धातुसंज्ञा होईल, हें मनात आणून वार्तिककार म्हणतातः—

(वा. १) सनादि या शब्दांपुढील अन्त-शब्दाविषयीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलेंच आहे ?

असें सांगितलें की पदसंज्ञा सांगणाऱ्या 'सुप्तिङन्तम्' (१।१।१४) या सूत्रामध्यें घातलेला अन्तशब्द असें सुचवितो की इतर ठिकाणीं शास्त्रांतील संज्ञेचें उद्देश्य म्हणून धरलेल्या प्रत्ययानें तदन्ताचें ग्रहण होत नाहीं (१।१।१४, वा. ११) आणि प्रकृत सनादयः येथें सन् हें प्रत्ययग्रहण आहे, आणि हा संज्ञाविधिही आहे.[२]

---

५. विषय सप्तमी घेतली असतां प्रत्यक्ष क्तिन् किंवा लिट्प्रत्यय करण्याचे पूर्वींच आयप्रत्यय होतो व गोपाय अंग तयार होतें व त्याचे पुढें गोपाय असें प्रत्ययान्त अनेकाच् अंग असल्यामुळें क्तिन्प्रत्यय न होतां अ प्रत्यय होतो व लिटाचे पूर्वीं आम् होतो आणि त्यामुळें गोपायतिः व जुगोपाय अशीं भलतीं रूपें होण्याचा प्रसंग टळतो, व गोपाया व गोपायांचकार अशीच इष्ट रूपें दुसऱ्या पक्षींही साधलीं जातात.

१. सन्, क्यच्, काम्यच्, क्यङ्, क्यष्, आचारक्विप्, णिच्, यङ्, यक्, आय, ईयङ् आणि णिङ् या बारांपकीं प्रत्यय ज्या शब्दामध्यें शेवटीं दिसतो त्या शब्दाला धातुसंज्ञा होते; उदा० चिकीर्षति, पुत्रीयति.

२. तेव्हां येथें अन्त शब्द घातल्यामुळें चिकीर्ष या समुदायाला धातुसंज्ञा होऊन त्याच्यापुढें तिङ-

धातवः [१.३.१] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । पाठेन धातुसंज्ञा क्रियते न चेमे तत्र पठ्यन्ते । कथं तर्ह्यन्येषामपठ्यमानानां धातुसंज्ञा भवति । अस्तेर्भूः ब्रुवो वचिः चक्षिङः ख्याञ् [२.४.५२; ५३;५४] इति । यद्यप्येते तत्र न पठ्यन्ते प्रकृतयस्त्वेषां तत्र पठ्यन्ते तत्र स्थानिवद्भावात्सिद्धम् । इमेऽपि तर्हि यद्यपि तत्र न पठ्यन्ते येषां त्वर्थे आदिश्यन्ते ते तत्र पठ्यन्ते तत्र स्थानिवद्भावात्सिद्धम् ।। न सिध्यति । आदेशः स्थानिवद्भवतीत्युच्यते न चेम आदेशाः । इमेऽप्यादेशाः । कथम् । आदिश्यते यः स आदेश इमे चाप्यादिश्यन्ते ।। एवमपि षष्ठीनिर्दिष्टस्यादेशाः स्थानिवद्भवन्तीत्युच्यते न चेमे षष्ठीनिर्दिष्टस्यादेशाः । षष्ठीग्रहणं निवर्तिष्यते । यदि निवर्ततेऽपवाद उत्सर्गकृतं प्राप्नोति ।

---

पण हें सूत्रच मुळीं कशाकरितां केलें आहे ? तें करूं नये. कारण भूवादयः (१।३।१) यानेंच चिकीर्ष वगैरे समुदायाला धातुसंज्ञा होईल.

चिकीर्ष इत्यादि समुदायाला 'भूवादयः' यानें धातुसंज्ञा होणार नाहीं. कारण भू, एध, वगैरे ते ते शब्द धातुपाठामध्यें उच्चारून त्यांना धातुसंज्ञा सांगितली आहे. आणि त्या धातुपाठामध्यें तर सनाद्यन्त शब्दांचा पाठ नाहीं.

तर मग धातुपाठामध्यें पठित नसलेल्या अशा अस्तेर्भूः, ब्रुवो वचिः, चक्षिङः ख्याञ्, या सूत्रांनीं सांगितलेल्या भू, वच् आणि ख्या या आदेशांना धातुसंज्ञा कशी प्राप्त होते ?

जरी हे आदेश धातुपाठामध्यें नाहींत तथापि या आदेशांचे स्थानी अस्, ब्रू, चक्ष्, हे धातुपाठामध्यें पठित आहेत. तेव्हां स्थानिवद्भावानें (१।१।५६) भू इत्यादि आदेशांना धातुसंज्ञा होते.

तर मग जरी सन्, क्यच्, वगैरेंचा धातुपाठामध्यें पाठ नाहीं तरी देखील इच्छा करणें, आचरण करणें, वगैरे जे त्या सन् वगैरे प्रत्यांचे अर्थ आहेत त्या अर्थांच्या इष्, चर, वगैरे धातूंचा धातुपाठामध्यें पाठ असल्यामुळें त्या सन् वगैरे प्रत्ययांना स्थानिवद्भावानें धातुसंज्ञा होईल.

सन् वगैरे प्रत्यय हे जरी इष्, चर, वगैरे धातूंच्या अर्थीं सांगितले आहेत तरी त्यांना स्थानिवद्भावानें धातुसंज्ञा होणें शक्य नाहीं. कारण आदेश हा आपल्या स्थानीसारखा समजावा असें म्हटलें आहे आणि सन्, क्यच्, काम्यच्, वगैरे हे तर इष्, चर, वगैरे धातूंचे आदेश नव्हेत.

सन्, क्यच्, वगैरे हेही आदेशच आहेत.

ते कसे ?

असे की आदिश्यतेऽसौ आदेशः. म्हणजे जो ज्याच्या अर्थीं सांगितला जातो तो त्याचा आदेश होय. आणि सन् वगैरे प्रत्यय तर इष्, चर, वगैरे धातूंच्या अर्थीं सांगितले आहेत.

तरी पण अमक्याचे स्थानीं असे षष्ठी उच्चारून सांगितलेले जे आदेश त्यांनाच स्थानिवद्भाव होतो. आणि हे सन् वगैरे तर षष्ठी उच्चारून सांगितलेले नव्हेत.

तर मग स्थानिवत्सूत्रामध्यें षष्ठीपदाची अनुवृत्ति आणिली नाहीं म्हणजे काम भागेल.[३]

जर स्थानिवत्सूत्रामध्यें षष्ठीपदाची अनुवृत्ति नसेल तर स्थानिवद्भावानें अपवादाला उत्सर्गाचें कार्य होऊं लागेल, जसें:— गां ददातीति गोदा. येथें गोशब्द उपपद असतांना दाधातूच्या पुढें 'कर्मण्यण्' या सूत्रानें उत्सर्गभूत अण्प्रत्यय प्राप्त झाला असतां 'आतोऽनुपसर्गे कः' ३।

---

प्रत्यय होतात.

३. कारण स्थानिवत्सूत्रामध्यें षष्ठी स्थानेयोगा (१।१।४९) या सूत्रांतील षष्ठीशब्दाची अनुवृत्ति आहे.

कर्मण्यण् [३.२.१] आतोऽनुपसर्गे कः [३] इति केऽप्यण्कृतं प्राप्नोति । नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नापवाद उत्सर्गकृतं भवतीति यदयं श्यनादीन्कांश्चिच्छितः करोति । श्नम् श्ना श्नुरिति ॥

**स्यतासी लृलुटोः ॥३।१।३३॥**[1]

इमे विकरणाः पठ्यन्ते तत्र न ज्ञायते क उत्सर्गः कोऽपवाद इति । तत्र वक्तव्यमयमुत्सर्गोऽयमपवाद इति । इमे ब्रूमो यगुत्सर्गोऽपवादः शबादिः स्यादयश्च ॥

यद्येवमपवादाविप्रतिषेधाच्छबादिबाधनम् ॥ अपवादविप्रतिषेधाच्छबादिभिः स्यादीनां बाधनं प्राप्नोति । शबादीनामवकाशः । पचति यजति । स्यादीनामवकाशः । पक्ष्यते यक्ष्यते । इहोभयं प्राप्नोति । पक्ष्यति यक्ष्यति । परत्वाच्छबादयः प्राप्नुवन्ति ॥

अपवादो नामानेकलक्षणप्रसङ्गः ॥ अपवादो नाम भवति यत्रानेकलक्षणप्रसङ्गः । तत्र भावकर्मणोर्यग्विधीयते

---

सूत्रानें अण्प्रत्ययाचा अपवाद जो कप्रत्यय तो केला आहे. तेव्हां तेथें अण्प्रत्ययामुळें होणारा जो ङीप्प्रत्यय (४।१।१५) तो स्थानिवद्भावानें कप्रत्ययन्ताहून होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां हे आचार्य श्यन्, श्नम्, श्ना, वगैरे कांहीं विकरणांमध्यें इत्संज्ञक शकार जोडीत आहेत त्यापेक्षां अपवादाचे ठिकाणीं उत्सर्गाचे कार्य करावयाचें नाहीं, असें सुचवीत आहेत.

(सू.३३) हे जे विकरण म्हणून प्रत्यय सांगितले आहेत त्या विकरणांमध्यें उत्सर्ग कोण आणि अपवाद कोण याचा कांहीं उलगडा होत नाहीं. करितां अमुक एक विकरण उत्सर्ग आहे आणि अमुक एक अपवाद आहे असा खुलासा करावा.

येथें आम्ही असा खुलासा करितों की यक् हा विकरण उत्सर्ग आणि शप् वगैरे व स्य वगैरे हे अपवाद होत.

जर यक् हा उत्सर्ग व शप् वगैरे आणि स्य वगैरे हे त्याचे अपवाद आहेत तर–

अपवादांमध्यें परस्पर विप्रतिषेध असल्यामुळें शप् वगैरे प्रत्यय हे स्य वगैरेंचा बाध करतील. शप् वगैरेंना पचति, पठति, येथें अवकाश आहे. व स्य वगैरेंना पक्ष्यते या कर्मणिप्रयोगामध्यें अवकाश आहे. आणि पक्ष्यति या कर्तरिप्रयोगामध्यें उभयतांचीही प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव शप् वगैरे होऊं लागतील.

जेथें एका उदाहरणामध्यें अनेक शास्त्रांची प्राप्ति येत असेल तेथें एक दुसऱ्याचा अपवाद होतो. आणि प्रकृत स्थलीं 'सार्वधातुके यक्' यानें भावकर्मार्थक सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यक्प्रत्ययाचें विधान केलें आहे. आणि कर्त्रर्थक सार्वधातुक पुढें

---

४. शप्प्रत्ययाचे (३।१।६८) श्यन् वगैरे प्रत्यय अपवाद आहेत. आणि त्या शप्प्रत्ययाला इत्संज्ञक शकार आहेच.

१. लृ आणि लुट् हे प्रत्यय पुढें असतांना धातूच्या पुढें क्रमानें स्य आणि तासि असे प्रत्यय होतात; उदा०–करिष्यति, अकरिष्यत, कर्ता. लृ या शब्दानें लृट् आणि लृङ् या दोन्ही प्रत्ययांचें ग्रहण होतें.

२. अमुक अर्थी असें न सांगतां नुसतेंच धातु आणि पुढील प्रत्यय या दोहोंच्यामध्यें सांगितलेले जे प्रत्यय त्यांना विकरणप्रत्यय म्हणतात.

३. सार्वधातुके यक् (३।१।६७) येथें भावकर्मणोः या शब्दाची अनुवृत्ति गृहीत धरली नाही, त्यामुळें कर्तरि, कर्मणि आणि भावे अशा तिन्ही प्रयोगांमध्यें यक्प्रत्ययाची प्राप्ति येते, आणि शप्, श्यन्, वगैरे प्रत्ययांची फक्त कर्तरिप्रयोगांतच प्राप्ति येते. तसेंच कोणताही सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यक्प्रत्यय प्राप्त होतो आणि स्य वगैरे प्रत्यय हे फक्त लृ वगैरे प्रत्यय पुढें असतांनाच प्राप्त होतात, म्हणून ते अपवाद आहेत.

४. सार्वधातुके यक् या सूत्रामध्यें भावकर्मग्रह-

**कर्तरि शप्कः प्रसङ्गो यद्भावकर्मणोर्यकं कर्तरि शबादयो बाधेरन् ॥ एवं तर्हि यक्शपावुत्सर्गावपवादाः श्यनादयः स्यादयश्च ॥**

**अपवादविप्रतिषेधाच्छ्यनादिबाधनम् ॥ अपवादविप्रतिषेधाच्छ्यनादिभिः स्यादीनां बाधनं प्राप्नोति । श्यनादीनामवकाशः । दीव्यति सीव्यति । स्यादीनामवकाशः । पक्ष्यति यक्ष्यति । इहोभयं प्राप्नोति । देविष्यति सेविष्यति । परत्वाच्छ्यनादयः प्राप्नुवन्ति ॥ नैष दोषः । शबादेशाः श्यनादयः करिष्यन्ते शप्च स्यादिभिर्बाध्यते तत्र दिवादिभ्यः स्यादिविषये शबेव नास्ति कुतः श्यनादयः । तत्तर्हि शपो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । कर्तरि शप् [३.१.६८] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । दिवादिभ्य इत्येषा पञ्चमी शबिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [१.१.६७] इति । प्रत्ययविधिरयं न च प्रत्ययविधौ पञ्चम्यः प्रकल्पिका भवन्ति । नायं प्रत्ययविधिः । विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते ॥ अथवानुवृत्तिः करि-**

असतांना शप्प्रत्ययाचें विधान केलें आहे. तेथें भावकर्मार्थक पुढें असतांना विहित अशा यक्प्रत्ययाचा कर्त्रर्थक पुढें असतांना विहित अशा शबादिकांनीं बाध करण्याचा कसा बरें प्रसंग येतो ?[5]

तर मग यक् व शप् हे दोन्ही उत्सर्ग आणि श्यन्नादिक व स्यादिक हे अपवाद होत.

आणि त्या अपवादांमध्यें परस्पर विप्रतिषेध असल्यामुळें श्यन् वगैरे प्रत्यय स्यादिकांचा बाध करूं लागतील. दीव्यति, सीव्यति, येथें श्यन् वगैरेंना अवकाश आहे व स्यादिकांना पक्ष्यति, यक्ष्यति, येथें अवकाश आहे. आणि देविष्यति, सेविष्यति, येथें उभयतांचीही प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव श्यन्नादिक होऊं लागतील.

हा दोष येत नाहीं. कारण श्यन्नादिक विकरण हे शप्प्रत्ययाचे आदेश म्हणून करण्यांत येतील. आणि देविष्यति इत्यादि स्थलीं तर शप्प्रत्ययाचा स्य, तासि, वगैरे स्यादिकांकडून बाध होतो. तेव्हां स्यादिकांचा विषय असतां दिवादि धातूंच्या पुढें शप्प्रत्ययच होऊं शकत नाहीं. मग त्या शप्प्रत्ययाचे ठिकाणीं करावयास सांगितलेले श्यन् वगैरे कोठून बरें येऊं शकतील ?

तर मग 'दिवादिभ्यः श्यन्' या सूत्रामध्यें 'शप्' असें म्हटलें पाहिजे, शपः असें म्हणावयास नको; कारण मागून अनुवृत्त होईल.

मागे कोठें बरें शब्ग्रहण केलें आहे ?

कर्तरि शप् येथें.

पण तें शब्ग्रहण तेथें प्रथमाविभक्ति लावून उच्चारलें आहे. आणि येथें तर षष्ठीविभक्ती लावून उच्चारलेल्या अशा शप्पदाचा उपयोग आहे.

हा दोष येत नाहीं. कारण दिवादिभ्यः ही पंचमीविभक्ति 'तस्मादित्युत्तरस्य' (१।१।६७) या परिभाषेच्या साहाय्यानें शप्पदांतील प्रथमाविभक्तीला षष्ठीचें रूप देऊं शकेल.

'दिवादिभ्यः श्यन्' हा प्रत्ययविधि आहे, आणि प्रत्ययविधीमध्यें तर पंचमीविभक्ति ही दुसऱ्या पदामध्यें षष्ठीची कल्पना करण्यास समर्थ नाहीं.

दिवादिभ्यः श्यन् येथें शप्प्रत्ययाचा विधि नाहीं. शप्प्रत्यय हा पूर्वीच सांगितला आहे. येथें फक्त त्याची अनुवृत्ति आहे.

अथवा अनुवृत्ति करून पुनः विधान केलें

णाची अनुवृत्ति आहे.

५. तात्पर्य, यक्प्रत्ययाच्या अपवादांपैकीं शबादिक हे स्यादिकांचा बाध करतील अशी यक्प्रत्ययाच्या अपवादामध्यें शप्प्रत्ययाची गणना केली ती बरोबर नाहीं.

ष्यते । सार्वधातुके यक् [३.१.६७] स्यतासी लृलुटोः च्लि लुङि च्लेः सिज्भवति । कर्तरि शप् [६८] स्यतासी लृलुटोः च्लि लुङि च्लेः सिज्भवति । दिवादिभ्यः श्यन् [६९] स्यतासी लृलुटोः च्लि लुङि च्लेः सिज्भवति ॥ अथवान्तरङ्गाः स्यादयः । कान्तरङ्गता । लावस्थायामेव स्यादयः सार्वधातुके श्यनादयः ॥

## सिब्बहुलं लेटि ॥ ३ । १ । ३४ ॥

### सिबुत्सर्गश्छन्दसि ॥ १ ॥

सिबुत्सर्गश्छन्दसि कर्तव्यः ॥

### सनाद्यन्ते नेषत्वाद्यर्थः ॥ २ ॥

सनाद्यन्ते च कर्तव्यः । किं प्रयोजनम् । नेषत्वाद्यर्थः । इन्द्रो नस्तेन नेषतु गा वो नेष्टात् ॥

---

म्हणजे स्यादि प्रत्ययांचा बाध होईल ही शंकाच उरत नाहीं. ती अनुवृत्ति अशीः— सार्वधातुके यक् येथें स्यतासी लृलुटोः, च्लि लुङि, च्लेः सिच्, ह्या पदांची अनुवृत्ति केली असतां भावकर्मवाचक सार्वधातुक पुढें असतांना धातूहून यक्प्रत्यय होतो, आणि तेथेंच लृ किंवा लुट् पुढें असतांना धातूहून स्य आणि तास् असे क्रमानें प्रत्यय होतात; आणि लुङ् पुढें असतांना धातूहून च्लिप्रत्यय होतो, आणि त्या च्लिप्रत्ययाचे स्थानीं सिच्आदेश होतो.

असेंच 'कर्तरि शप्' येथें ही अनुवृत्ति करून कर्त्रर्थक सार्वधातुक पुढें असतांना धातूहून शप्प्रत्यय होतो. आणि तेथेंच लृ किंवा लुट् पुढें असतांना क्रमानें स्य आणि तास् हे प्रत्यय होतात. लुङ् पुढें असतांना च्लिप्रत्यय होतो आणि त्या च्लिप्रत्ययाचे स्थानीं सिच्आदेश होतो, असा अर्थ करावा. तसेंच दिवादिभ्यः श्यन् येथें असें समजावें की कर्ता या अर्थाचा सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना क्रमानें स्य किंवा तास् हे प्रत्यय होतात, लुङ् पुढें असतांना च्लिप्रत्यय होतो आणि त्या च्लिप्रत्ययाचे स्थानीं सिच्आदेश होतो.

किंवा स्य, तासि आणि च्लि हे अंतरंग असल्यामुळें शप्, श्यन्, वगैरेपेक्षां अगोदरच होतात.

त्या स्यादिकांना अंतरंगत्व कसें ?

असें की लकारावस्थेमध्येंच म्हणजे लकाराचे स्थानीं तिङ्आदेश करण्याचे पूर्वीच स्यादिक प्रवृत्त होतात[६].

(सू.३४, वा.१) कांहीं एक परनिमित्त गृहीत न धरतां धातूच्या पुढें सिप्प्रत्यय होतो असें सिप्प्रत्ययाचें सामान्य विधान वैदिक प्रयोगांविषयीं करावें.

(वा.२) व तो सिप्प्रत्यय सन्, क्यच्, इत्यादि प्रत्ययांमध्यें सांगावा.

काय प्रयोजन ?

नेषतु, नेष्टात्, इत्यादि वेदांतील रूपें सिद्ध होणें हा उपयोग होय; जसेंः— इन्द्रो नस्तेन

---

६. तेव्हां लकाराचे स्थानीं तिङ्आदेश करण्यापूर्वीच स्य वगैरेंची प्राप्ति येत असल्यामुळें ते अंतरंग आहेत, आणि म्हणूनच त्या वेळीच ते स्य वगैरे होतील. नंतर तिङ्आदेश केल्यानतर ते सार्वधातुक प्रत्यय पुढें असताना शप्, श्यन्, वगैरे होणारे आहेत; तेव्हां स्यादिप्रत्ययांचा बाध होईल, ही शकाच राहन नाहीं.

१. धातूच्या पुढें बाहुल्येंकरून सिप्प्रत्यय होतो, लेट्प्रत्यय पुढें असतांना; उदा०—जोषिषत्, तारिषत् जुपधातूच्यापुढे लिडर्थे लेट् (३।४।७) यानें लेट्, त्याचे स्थानी व्यत्ययानें परस्मैपद, प्रथमपुरुषैकवचनाचा तिप्, 'इतश्च लोपः०' (३।४।९७) यानें तिप्रत्ययांतील इकाराचा लोप, मध्यें सिप्, त्याला इडागम, 'लेटोऽडाटौ' यानें तिप्रत्ययाला अडागम, लघूपधगुण आणि षत्व झालें आहे. तारिषत् हें तॄधातूचें रूप आहे. 'सिब्बहुलं णिद्वक्तव्यः' या येथील वार्तिकानें सिप्प्रत्ययाला णित्व सांगितलें असल्यामुळें 'अचो ञ्णिति' यानें वृद्धि झाली आहे.

**प्रकृत्यन्तरत्वात्सिद्धम् ॥ ३ ॥**

प्रकृत्यन्तरत्वात्सिद्धमेतत् । प्रकृत्यन्तरं नेषतिः ॥

**नेषतु नेष्टादिति दर्शनात् ॥ ४ ॥**

नेषतु नेष्टादिति दृश्यते ॥

अथ किमर्थः पकारः । स्वरार्थः । अनुदात्तौ सुप्पितौ [३.१.४] इत्येष स्वरो यथा स्यात् ॥

**पित्करणानर्थक्यं चानच्कत्वात् ॥५॥**

पित्करणं चानर्थकम् । किं कारणम् । अनच्कत्वात् । अनच्कोऽयं तत्र नार्थः स्वरार्थेन पकारेणानुबन्धेन ॥ इटि कृते साच्को भविष्यति ।

**इटोऽनुदात्तार्थमिति चेदागमानुदात्तत्वात्सिद्धम् ॥ ६ ॥**

आगमानुदात्तत्वेनेटोऽनुदात्तत्वं भविष्यति ॥ एवं तर्हि सबयं: कर्तव्यः । किं प्रयोजनम् । यदवयासिसीष्ठाः ।

---

नेषतु[२], गा वो नेष्टात्.

(वा.३) नेषतु, नेष्टात्, हीं उदाहरणें सिप् असा सामान्य प्रत्यय केल्यावांचूनही साधतां येतात.

तीं कशीं ?

स्वतन्त्र नेषृधातु धातुपाठामध्यें पठित आहेच. त्या धातूची नेषतु, नेष्टात्, इत्यादि रूपें होतील.

(वा.४) कारण नेषतु, नेष्टात्, हीं उदाहरणें[३] दृष्टीस पडतात.

आतां सिप्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक पकार कशाकरितां जोडला आहे ?

'अनुदात्तौ सुप्पितौ' (३।१।३) यानें सांगितलेला अनुदात्तस्वर सिप्प्रत्ययाला व्हावा यासाठीं पकार जोडला आहे.

(वा.५) सिप्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक पकार जोडला आहे तो विफल आहे.

काय कारण ?

कारण असें की सिप्प्रत्ययामध्यें अच् नाहीं. तेव्हां अनुदात्तस्वर व्हावयासाठीं जोडलेल्या इत्संज्ञक पकाराचा उपयोग होऊं शकत नाहीं.

पण सिप्प्रत्ययाला इडागम केला असतां त्यामध्यें अच् येत आहे.

(वा.६)सिप्प्रत्ययाला केलेल्या इडागमाला अनुदात्तस्वर होण्यासाठीं पकारानुबन्ध उपयुक्त आहे असें म्हणणें असेल तर 'आगमा अनुदात्ताः' या वचनानेंच त्याला अनुदात्त स्वर होईल.

तर मग आतां सिप् हा सप् असा करण्यांत यावा.

सप् असा प्रत्यय करण्याचा काय उपयोग ?

यदवयासिसीष्ठाः[४] येथें 'एकाच उपदेशे०' (७।२।१०) यानें इडागमाचा प्रतिषेध न

---

२. नीधातूच्यापुढे सिप्प्रत्यय, गुण, नेस् याला 'सनाद्यन्ता०'यानें धातुसंज्ञा, लोट्, तिप्, शप्, झाला आहे. नेष्टात् येथें तातङ् आणि छांदसत्वास्तव व्यत्ययानें शपाचा लुक् झाला आहे. येथें लेट्प्रत्यय पुढें नसल्यामुळें सूत्रानें सिप्प्रत्यय होणार नाहीं, म्हणून वार्तिक केलें आहे.

३. तेव्हां जीं हीं उदाहरणें वेदामध्यें दृष्टीस पडतात तीं नेष्धातूचीं होत आहेत. जर नीस् या प्रत्ययान्त धातूहून आम्प्रत्यय (३।१।३५) किंवा अप्रत्यय (३।३।१०२) केलेलें उदाहरण वेदामध्यें दृष्टीस पडलें असतें तर मात्र त्याकरितां स्वतंत्र सिप्प्रत्यय सांगितला पाहिजे होता, पण तसें उदाहरण वेदामध्यें दिसत नाही.

४. अवउपसर्गपूर्वक या धातूचेपुढें सप्, नंतर 'यास' या सप्प्रत्ययान्त धातूहून आशीर्लिङ्, त्याचे स्थानीं थास्, त्याला सीयुट् व सुट्सप्प्रत्ययान्त धातु अनेकाच् असल्यामुळें 'एकाच उपदेशेऽनुदात्तात्' हा निषेध प्रवृत्त होत नाहीं. सबब लिङाला इडागम होतो, आणि सप्प्रत्ययाच्या अकाराचा लोप (६।४।४८) होऊन अवयासिसीष्ठाः असें उदाहरण तयार होतें. जर सिप्प्रत्यय केला तर सिप्प्रत्ययांतील इकार उच्चारणार्थ आहे असें गृहीत

एकाज्लक्षण इट्प्रतिषेधो मा भूदिति । क्वायमकारः श्रूयते । न क्वचिच्छ्रूयते लोपोऽस्य भविष्यत्यतो लोप आर्धधातुक इति । यदि न क्वचिच्छ्रूयते नार्थः स्वरार्थेन पकारेणानुबन्धेन ॥ एवमपि कर्तव्य एव । किं प्रयोजनम् । अनुदात्तस्य लोपो यथा स्यादुदात्तस्य मा भूदिति । किं च स्यात् । उदात्तनिवृत्तिस्वरः प्रसज्येत ॥

## सिब्बहुलं छन्दसि णित् ॥ ७ ॥

सिब्बहुलं छन्दसि णिद्वक्तव्यः । सविता धर्मं साविषत् । प्र ण आयूंषि तारिषत् ॥

## कास्प्रत्ययादाममन्त्रे लिटि ॥ ३ । १ । ३५ ॥

## कास्ग्रहणे चकास उपसंख्यानम् ॥ १ ॥

कास्ग्रहणे चकास उपसंख्यानं कर्तव्यम् । चकासांचकार ॥ न कर्तव्यम् । चकास्प्रत्ययादिति वक्ष्यामि । चकास्ग्रहणे कास उपसंख्यानं कर्तव्यम् । कासांचक्रे । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं कास्ग्रहणे चकास उपसंख्यानमिति । नैष दोषः । चका-

झाला पाहिजे.

पण सप्प्रत्ययांतील अकाराचें कोठें बरें श्रवण होतें ?

कोठेंही श्रवण होत नाहीं. वैदिक प्रयोगामध्यें त्या अकाराचा 'अतो लोपः' (६।४।४८) यानें आर्धधातुक पुढें असतांना सांगितलेला लोप होतो.

जर त्या अकाराचें कोठेंही श्रवण होत नाहीं तर अनुदात्तस्वर होण्याकरितां जोडलेल्या इत्संज्ञक पकाराचा उपयोग होत नाहीं.

तरी देखील इत्संज्ञक पकार जोडला पाहिजे.

काय प्रयोजन ?

अनुदात्त अशा त्या अकाराचा लोप व्हावा, उदात्त अशा त्या अकाराचा लोप न व्हावा, हें प्रयोजन होय.

उदात्त अशा त्या अकाराचा लोप झाला तर काय बिघडेल ?

उदात्त अशा त्या अकाराचा लोप झाला तर 'अनुदात्तस्य च यत्रोदात्तलोपः' (६।१।१६१) यानें पुढील इडागमाला उदात्त स्वर होऊं लागेल.

(वा.७) वेदामध्यें बहुतकरून हा सिप् प्रत्यय णकारेत्संज्ञकासारखा समजावा; जसें:— सविता धर्मं साविषत्, प्र ण आयूंषि तारिषत्.

(सू. ३५, वा. १) कास्प्रत्ययात् या सूत्रामध्यें चकास्धातूचेंही ग्रहण करावें; जसें:— चकासांचकार.

निराळें चकास्धातूचें ग्रहण करावयास नको. कारण 'चकास्प्रत्ययादाममन्त्रे लिटि' असेंच सूत्र करण्यांत येईल.

चकास्प्रत्ययात् असें सूत्र केलें तर कास्धातूहून आम् सांगितला पाहिजे; जसें:— कासांचक्रे. शिवाय मूळसूत्राचा विपर्यासही होतो.

तर मग मूळचें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण 'कास्प्रत्ययात्' या सूत्रामध्यें चकास्धातूचेंही ग्रहण करावें असें म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण चकास् या शब्दामध्यें कास्शब्द आहेच. तेव्हां 'कास्प्रत्ययात्'

---

धरलें पाहिजे. नाहीं तर इकाराचें श्रवण होईल. सिबन्तधातु एकाच् असल्यामुळें 'एकाच उपदेशे०' हा इडागमाचा निषेध प्रसक्त होईल.

५. षूधातूहून लेट्. परस्मैपद प्रथमपुरुषैकवचन तिप्. इकाराचा लोप (३।४।९६) सिप्, त्याला इडागमं, अडागम (३।४।९४). प्रकृत वार्तिकानें सिप्प्रत्ययाला णित्व असल्यामुळें णित्वास्तव वृद्धि

आवादेश झाला आहे. असेंच तारिषत् येथेंही समजावें.

१. लिट्प्रत्यय पुढें असतांना कास्धातु आणि प्रत्ययान्तधातु यांहून आम्प्रत्यय होतो, पण तो प्रयोग मंत्रांतील नसला पाहिजे; उदा०—कासांचक्रे, लोलूयांचक्रे.

स्शब्दे कास्शब्दोऽस्ति तत्र कास्प्रत्यया-दित्येव सिद्धम् । न सिध्यति । किं कारणम् । अर्थवतः कास्शब्दस्य ग्रहणं न च चकास्शब्दे कास्शब्दोऽर्थवान् ॥ एवं तर्हि कास्यनेकाच इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । चुलुम्पाद्यर्थम् । चुलुम्पांचकार दरिद्रांचकार ॥

## इजादेश्च गुरुमतोऽनृच्छः ॥ ३ । १ । ३६ ॥

### गुरुमत आम्विधाने लिण्निमित्तात्प्रतिषेधः ॥ १ ॥

गुरुमत आम्विधाने लिण्निमित्तात्प्रतिषेधो वक्तव्यः । इयेष उवोष । गुणे कृत इजादेश्च गुरुमतोऽनृच्छ इत्याम्प्राप्नोति ॥ गुरुमद्वचनमिदानीं किमर्थं स्यात् ।

### गुरुमद्वचनं किमर्थमिति चेण्णल्युत्तमे यजादिप्रतिषेधार्थम् ॥२॥

गुरुमद्वचनं किमर्थमिति चेण्णल्युत्तमे यजादीनां मा भूदिति । इयजाहम् । उवपाहम् ॥

### उपदेशवचनात्सिद्धम् ॥ ३ ॥

उपदेशे गुरुमत इति वक्तव्यम् ॥ यद्युपदेशग्रहणं क्रियत उच्छेराम्वक्तव्यः । व्युच्छांचकारेति ॥

### ऋच्छिप्रतिषेधो ज्ञापक उच्छेराम्भा-

---

या मूळच्या सूत्रपाठानेंच आम्प्रत्यय होईल.

मूळच्या सूत्रपाठानें चकास्धातूपुढें आम्प्रत्यय होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की सूत्रांतील कास्शब्दानें अर्थवान् अशा कास्शब्दाचें ग्रहण होत आहे. आणि चकास्शब्दातील कास्शब्द तर अर्थवान् नाहीं.

असें आहे तर 'कास्यनेकाचः' असें सूत्र करण्यांत यावें.

तसें करण्याचा काय उपयोग ?

चुलुम्प वगैरे अनेकाच् धातूंच्या पुढें आम्प्रत्यय होतो हा त्याचा उपयोग आहे; जसें:– चुलुम्पांचकार, दरिद्रांचकार.

**(सू.३६, वा.१)** गुरु वर्ण असलेल्या धातूहून हा जो आम्प्रत्यय सांगितला आहे त्या संबंधानें तो गुरु वर्ण लिट्प्रत्ययामुळें झालेला असेल तर तेथें आम्प्रत्ययाचा निषेध करण्यांत यावा; जसें:– इयेष, उवोष. येथें लिट्प्रत्ययाच्या निमित्तानें लघूपधगुण केला असतां इजादेश्च गुरुमतः यानें आम्प्रत्यय प्राप्त होत आहे.

पण जर येथेंही आम्प्रत्यय होईल तर मग इजादि धातूला गुरुमान् हें विशेषण दिल्याचा काय उपयोग ?

(वा.२) गुरुमान् हें विशेषण देण्याचा उपयोग काय, असें म्हणणें असेल तर यज्, वप्, वगैरे यजादि धातूंच्या पुढें उत्तमपुरुषी णल्प्रत्ययाला णित्त्वाच्या अभावपक्षीं वृद्धि होत नसून इयज अहम्, उवप अहम्, अशीं जीं रूपें होतात तेथें आम् न होणें हा त्या विशेषणाचा उपयोग होय.

(वा.३) 'उपदेशकालीं जो गुरुमान्' असें म्हणावें, म्हणजे इयेष, उवोष, वगैरे उदाहरणें साधतील.

पण उपदेशीं गुरुमान् असें म्हटलें तर उच्छांचकार येथें आम्प्रत्यय होण्याकरितां

---

१. आरंभीं इच्प्रत्याहारांतील वर्ण असून ज्यामध्यें गुरुवर्ण आहे अशा धातूहून आम्प्रत्यय होतो, लिट्प्रत्यय पुढें असतांना; मात्र तो धातु ऋच्छखेरीज करून असावा; उदा०—ईह चेष्टायाम्, इदि परमैश्वर्ये; ईहांचक्रे, इन्दांचकार.

२. ईषतुः ईषुः येथेंही सवर्ण दीर्घ केला असतां तो गुरुवर्ण होत असल्यामुळें आम्प्रत्यय होणारच. तेव्हां गुरुमान् हें विशेषण देण्यांत अर्थ नाहीं. तें तर दिलें आहे. त्या जोरावर मूळचा गुरुवर्ण ज्यामध्यें आहे अशाच इजादि धातूहून आम्प्रत्यय होईल. तेव्हां इयेष इत्यादि स्थळीं आम्प्रत्यय होणार नाहीं.

३. उछ् असें उपदेशकालीं उकार आणि छकार

वस्य ॥ ४ ॥

यदयमनृच्छ इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यस्तुम्निमित्ता यस्य गुरुमत्ता भवति तस्मादामिति ॥ स तर्हि ज्ञापकार्थ ऋच्छिप्रतिषेधो वक्तव्यः । ननु चावश्यं प्राप्त्यर्थोऽपि वक्तव्यः । नार्थः प्राप्त्यर्थेन । ऋच्छत्यृताम् [७.४.११] इत्यृच्छेर्लिटि गुणवचनं ज्ञापकं नच्र्छेर्लिट्याम्भवतीति । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्त्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम्। किम्। यत्तत् ऋच्छेर्लिटि गुणवचनं तत्तद् ... मेतत्स्यात् । कथं पुनर्ऋच्छेर्लिटि गुण उच्यमानोऽन्यार्थः शक्यो विज्ञातुम् । सामर्थ्यात् । ऋच्छिर्लिटि नास्तीति कृत्वा प्रकृत्यर्थं विज्ञायते । तद्यथा । तिष्ठतेरित् [७.४.५] जिघ्रतेर्वा [६] इति चङि तिष्ठतिजिघ्रती न स्त इति कृत्वा प्रकृत्यर्थं विज्ञायते ॥ किं पुनरर्तेर्लिटि गुणवचने प्रयोजनम् । आरतुः आरुः एतद्रूपं यथा स्यात् । किं पुनः कारणं न सिध्यति । द्विर्वचने कृते सवर्णदीर्घत्वे च यदि तावद्धातुग्रहणेन ग्रहणमॄकारान्तानां लिटि गुणो भवतीति गुणे कृते

---

वचन केलें पाहिजे.

(वा.४) ज्यापेक्षां हे आचार्य अनृच्छः असें पद घालून ऋच्छधातु वगळीत आहेत त्यापेक्षां तुगागम केल्यामुळें ज्या धातूमधील वर्ण गुरु होतो त्या इजादिधातूहून आम्प्रत्यय होतो असें ज्ञापन करीत आहेत.

तर मग तसें ज्ञापन करण्याकरितां अनृच्छः असें म्हटलें पाहिजे.

पण आम्प्रत्ययाचा निषेध होण्याकरितांही अनृच्छः असें म्हटलेंच पाहिजे ना !

त्या निषेधाकरितां अनृच्छः असें म्हणावयास नको. कारण ऋच्छत्यृताम् (७।४।११) या सूत्रानें लिट्प्रत्यय पुढें असतांना ऋच्छधातूला गुणाचें विधान केलें आहे. जर ऋच्छधातूहून आम् होईल तर गुणविधान व्यर्थ होईल. त्यावरून असें ज्ञापन होतें की ऋच्छधातूहून आम्प्रत्यय होत नाहीं.

पण ऋच्छतिग्रहण ज्ञापक होऊं शकत नाहीं. कारण ऋधातूला गुण होण्याकरिता ऋच्छतिग्रहण पाहिजे आहे.

पण ऋच्छतीला सांगितलेला गुण ऋधातूला होतो असें कसें म्हणतां येईल ?

लिट् पुढें असतांना ऋच्छ याला गुणाचें उदाहरण मिळत नाहीं म्हणून ऋच्छति या शब्दानें ऋच्छ याची प्रकृति जो ऋधातु त्याला हा गुण होईल; जसें तिष्ठतेरित्, जिघ्रतेर्वा (७।४।५,६), या सूत्रांनीं सांगितलेलें इत्त्व चङ्परक णिप्रत्यय पुढें असतांना तिष्ठति किंवा जिघ्रति मिळत नाहीं म्हणून तिष्ठति व जिघ्रति यांच्या मूळ प्रकृति ज्या स्था आणि घ्रा त्यांना होतें, तसेंच प्रकृतस्थलीं समजावें.

पण लिट् पुढें असताना ऋधातूला गुण करण्याचा काय बरें उपयोग ?

आरतुः, आरुः, अशीं रूपें साधावींत हाही उपयोग होय.

पण गुण केला नाहीं तर आरतुः, आरुः, हीं रूपें का बरें होणार नाहींत ?

ऋधातूला द्वित्व केलें असतां त्या दोन ऋकारांचे स्थानीं सवर्णदीर्घ होईल. तो सवर्णदीर्घानें झालेला दीर्घ ॠकार त्याचें धातुग्रहणानें ग्रहण होत असल्यामुळे जर ॠकारान्त धातूला गुण होईल तर रपर होऊन अरतुः,

---

हे दोनच वर्ण त्यामध्यें आहेत. तेव्हां उपदेशकालीं उकार लघुच आहे. नंतर मध्यें तुगागम (६।१।७३) होऊन त्याला चकार (८।४।४०) झाल्यानंतर उच्छ् असें होतें.

४. ऋच्छति ऋ ऋत् असा जो मध्यें ॠकाराचा प्रश्लेष आहे तो मनांत न घेतां हें लिहिलें आहे.

५. 'पाघ्राध्मा०' (७।३।७८) या सूत्रानें स्थाधातूला तिष्ठ आदेश होऊन तिष्ठति असें रूप होतें, व घ्रा धातूला जिघ्र आदेश होऊन जिघ्रति असें रूप होतें. तसेंच त्याच सूत्रानें ऋधातूला ऋच्छादेश

रपरत्वे च अरतुः अरुरित्येतद्रूपं प्रसज्येत। अथाभ्यासग्रहणेन ग्रहणमुरत्त्वं रपरत्वं हलादिशेषोऽत आदेः [७.४.७०] इति दीर्घत्वमातो लोप इटि च [६.४.६४] इत्याकारलोपः अतुः उरिति वचनमेव श्रूयेत। गुणे पुनः सति गुणे कृते रपरत्वे च द्विर्वचनं हलादिशेषोऽत आदेरिति दीर्घत्वं ततः सिद्धं भवति यथाटतुः आटुरिति॥ किं पुनः कारणं सवर्णदीर्घत्वं तावद्भवति न पुनरुरत्त्वम्। परत्वादुरत्त्वेन भवितव्यम्। अन्तरङ्गत्वात्। अन्तरङ्गं सवर्णदीर्घत्वं बहिरङ्गमुरत्त्वम्। कान्तरङ्गता। वर्णावाश्रित्य सवर्णदीर्घत्वमङ्गस्योरत्त्वम्। उरत्त्वमप्यन्तरङ्गम्। कथम्। वक्ष्यत्येतत्प्रागभ्यासविकारेभ्योऽङ्गाधिकार इति। उभयोरन्तरङ्गयोः परत्वादुरत्त्वम्। उरत्त्वे कृते रपरत्वं हलादिशेषोऽत आदेरिति दीर्घत्वं परस्य रूपस्य यणादेशः सिद्धं भवत्यारतुः आरुरिति॥ अथापि कथंचिदर्तेर्लिटि गुणेनार्थः स्यात्।

---

अरुः, अशीं रूपें होतील.

आतां जर त्या ऋकाराला पूर्वान्तवद्भावानें (६।१।८५) अभ्यास समजून उरत् (७।४।६६) यानें अत्त्व होईल तर तो अकार रपर (१।१।५१) होईल. नंतर हलादिः शेषः (७।४।६०), त्या रेफाचा लोप, 'अत आदेः' (७।४।७०) यानें दीर्घ आणि आतो लोप इटि च (६।४।६४) यानें आकारलोप केला असतां अतुः, उः, असें केवळ प्रत्ययाचें श्रवण होईल.

आणि 'ऋच्छत्यताम्' यानें ऋधातूला गुणाचें विधान केलें[६] असतां गुण रपर करून नंतर द्विर्वचन, हलादि शेष, आणि अत आदेः यानें दीर्घ केला असतां आरतुः, आरुः, अशीं रूपें सिद्ध होतात. आटतुः, आटुः, ह्या उदाहरणांप्रमाणेंच हें होय.

पण द्वित्व केल्यानंतर ऋ ऋ अतुस् या अवस्थेमध्यें पूर्वी सवर्णदीर्घ प्रवृत्त होतो आणि उरदत्त्व मात्र पूर्वी प्रवृत्त होत नाहीं, याचें काय बरें कारण? उलट पर असल्यामुळें उरदत्त्वच पूर्वी प्रवृत्त व्हावें.

पण अंतरंगत्वास्तव सवर्णदीर्घ अगोदर होईल. कारण सवर्णदीर्घ अंतरंग आहे आणि उरदत्त्व बहिरंग आहे.

सवर्णदीर्घ अंतरंग कसा?

असा की वर्णद्वयावर अवलंबून तो होणार आहे. म्हणून सवर्णदीर्घ अंतरंग आहे. आणि प्रकृतिप्रत्ययांवर अवलंबून उरदत्त्व आहे. म्हणून तें बहिरंग आहे.

पण उरदत्त्वही अंतरंगच आहे.

तें कसें?

असें की अभ्यासविकारापर्यंतच अंगाधिकार चालू राहतो,[८] असें 'अङ्गस्य' (६।४।१) या सूत्रावर सांगण्यांत येणार आहे. तेव्हां सवर्णदीर्घ आणि उरदत्त्व या उभयतां अंतरंगांमध्यें पर असल्यामुळें प्रथमतः उरदत्त्व होईल. आणि उरदत्त्व केल्यानंतर रपरत्व, हलादिः शेष, 'अत आदेः' यानें दीर्घ आणि उत्तरखंडाला यणादेश केला असतां आरतुः, आरुः, हीं उदाहरणें सिद्ध होतात.[७]

आतां ऋधातूला गुण सांगण्याचा कोण-

---

होऊन ऋच्छति असें रूप होतें.

६. तेव्हां 'उरत्' याला अंगाची जरूर नसल्यामुळें तेंही अंतरंगच होत आहे.

७. तात्पर्य, ऋधातूला गुण होण्याकरितां ऋच्छतिग्रहण करावयास नको.

८. अङ्गस्य हा अधिकार अभ्यासविकारांच्या पूर्वी संपतो, ह्या पक्षावर दोष देऊन सप्तमाध्याय संपेपर्यंत तो अधिकार चालू राहतो असा सिद्धान्त भाष्यकारांनीच तेथें (६।४।१,) केला आहे. तेव्हां उरत् येथें अङ्गस्य हा अधिकार येत असल्यामुळें सवर्णदीर्घापेक्षां तें बहिरंग होणार आहे. तेव्हां अंतरंग सवर्णदीर्घच अगोदर होऊन दोष येईल, म्हणून ऋधातूला गुण सांगितला पाहिजे.

एवमपि न दोषः । ऋच्छत्यृतामित्यृकारोऽप्यत्र निर्दिश्यते । कथम् । प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । ऋच्छति ऋ ॠताम् ऋच्छत्यृतामिति ॥ इहापि तर्हि प्राप्नोति चक्रतुः चक्रुरिति । संयोगादिग्रहणं नियमार्थं भविष्यति । संयोगादेरेवाकेवलस्य नान्यस्याकेवलस्येति ॥ तदेतदन्तरेणार्तेर्लिटि गुणवचनं रूपं सिद्धमन्तरेण चच्छिग्रहणमर्तेर्लिटि गुणः सिद्धः । स एषोऽनन्यार्थं ऋच्छिप्रतिषेधो वक्तव्य उच्छेर्वाम्वक्तव्यः ॥ उभयं न वक्तव्यम् । उपदेशग्रहणं न करिष्यते । कस्मान्न भवति इयेष उवोष ।

**उक्तं वा ॥ ५ ॥**

किमुक्तम् । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति ॥

**ऊर्णोतेश्चोपसंख्यानम् ॥ ६ ॥**

ऊर्णोतेश्चोपसंख्यानं कर्तव्यम् । प्रोर्णुनाव ॥ न वक्तव्यम् ।

---

त्याही तऱ्हेनें आरतुः येथें उपयोग आहे असें असलें तरी देखील ऋच्छतिग्रहणावांचून आरतुः हें साधेल; तेथें दोष येत नाहीं. कारण ऋच्छत्यृताम् येथें ऋच्छधातूपेक्षां निराळा ऋकाराचा निर्देश केलाच आहे.

तो कसा ?

असा की ऋच्छति ऋ ॠताम् ऋच्छत्यृताम् असा हा प्रश्लेषानें निर्देश केला आहे.

तर मग चक्रतुः, चक्रुः, येथेंही गुण होऊं लागेल.

ऋतश्च संयोगादेर्गुणः (७।४।१०) येथील संयोगादिग्रहण नियमार्थ होईल. तो नियम असाः—ज्याच्या मागें कांहीं व्यञ्जन आहे अशा ऋकाराला गुण करणें झाल्यास संयोग मागें असलेल्याच ऋकाराला गुण करावा. तेव्हां ऋच्छतिशब्द उच्चारून ऋधातूला गुणाचें विधान केल्याशिवाय रूप सिद्ध होतें. अर्थातच ऋच्छिग्रहण केल्याशिवायच लिट् पुढें असतां ऋधातूला गुण सिद्ध होतो. तेव्हां अनृच्छः याचा दुसरा उपयोग संभवत नसल्यामुळें तुगागमानें गुरुमान् झालेल्या इजादिधातूहून आम्प्रत्यय होतो, असें ज्ञापन करण्याकरितांच फक्त अनृच्छः असें म्हणावें; किंवा अनृच्छः असें न म्हणतां उच्छधातूहून आम्प्रत्यय होतो असें स्वतन्त्र वचन करावें.

या उभयतांपैकीं कांहींच म्हणावयाची आवश्यकता नाहीं. कारण गुरुमानाला 'उपदेशे' हें विशेषणच आम्ही लागू करूं इच्छीत नाहीं.

तर मग इयेष, उवोष, येथें आम्प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

(वा.५) अथवा सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

असें सांगितलें आहे की दोघांच्या संबंधावर अवलंबून झालेला विधि हा त्या संबंधाचा नाश करणाऱ्या विधीला मदत करू इच्छीत नाहीं.[११]

(वा.६) ऊर्णुञ्धातूहून आम्प्रत्ययाच्या निषेधादाखल वचन करण्यांत यावें; जसेंः— प्रोर्णुनाव.

---

९. तेव्हां ऋच्छतिग्रहण हे ऋच्छधातूला गुण होण्याकरितां केलें आहे असें ठरतें. त्या ऋच्छधातूहून लिट् पुढें असतांना प्रकृत सूत्रानें आम्प्रत्यय होइल, तर ऋच्छधातूला गुणाचें उदाहरण मिळणार नाही आणि ऋच्छतिग्रहण व्यर्थ होईल. तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तव ऋच्छधातूहून आम्प्रत्यय होत नाही ही गोष्ट सिद्ध होत असल्यामुळें त्याकरितां प्रकृत सूत्रामध्यें अनृच्छः असें म्हणावयास नको.

१०. उच्छ्धातु उपदेशीं गुरुमान् नाहीं तरी त्याहून आम्प्रत्यय होतो हें या ज्ञापनाचें फल होय.

११. इयेष येथें इष्धातु आणि पुढील णल्प्रत्यय या दोघांच्या संबंधानें झालला जो गुण (७।३।८६) तो इष्धातूला गुरुमान् बनवून जी आम्प्रत्ययाला मदत करणार ती तो गुण कधीं करणार नाहीं. कारण आम्प्रत्यय हा इष्धातु आणि पुढील प्रत्यय या दोघांच्यामध्यें शिरून त्यांच्या संबंधामध्ये बिघाड करणारा आहे. यालाच संनिपातपरिभाषा म्हणतात (भाग १, पृ. २४०, १।१।३९, वा. ३ पाहा)

वाच्य ऊर्णोर्णुवद्भावो यङ्प्रसिद्धिः प्रयोजनम् ।
आमश्च प्रतिषेधार्थमेकाचश्चेडुपग्रहात् ॥
अथवोकारोऽप्यत्र निर्दिश्यते । कथम् । अविभक्तिको निर्देशः। अनृच्छ उ अनृच्छो दयायासश्च [३.१.३७] इति ॥

[दयायासश्च ॥ ३ । १ । ३७ ॥]

## उषविदजागृभ्योऽन्यतरस्याम् ॥ ३ । १ । ३८ ॥

विदेराम्कित् ॥ १ ॥

विदेराम्किद्वक्तव्यः । विदांचकार ॥ न वक्तव्यः । विदिरकारान्तः । यद्यकारान्तो वेत्तीति गुणो न सिध्यति । लिट्संनियोगेन । एवमपि विवेदेति न सिध्यति । एवं तर्ह्याम्संनियोगेन ॥

भारद्वाजीयाः पठन्ति । विदेराम्किन्निपातनाद्वागुणत्वमिति ॥

## भीह्रीभृहुवां श्लुवच्च ॥ ३।१।३९॥

श्लुवदतिदेशे किं प्रयोजनम् ।

---

निषेधादाखल वचन करावयास नको; कारण वाच्यं[१२] इ०.

अथवा अनृच्छः येथें उकाराचाही निर्देश केलों[१३] आहे.

तो कसा ?

असा की 'अनृच्छो दयायासश्च' असा पुढील सूत्राशीं जुळून पाठ गृहीत धरला असतां 'अनृच्छो' असें विभक्तिरहित पद समजावें.

(सू.३८, वा.१) विद्धातूपुढील आम्‌प्रत्यय ककारेत्संज्ञकाप्रमाणें समजावा. त्यामुळें विदांचकार येथें विद्धातुला लघूपधगुण (७। ३।८६) होत नाहीं (१।१।५).

तसें करण्याची जरूर नाहीं. कारण विद्‌धातु अकारान्त आहे.

जर विदधातु अकारान्त आहे तर वेत्ति येथें लघूपधगुण होणार नाहीं.

तर लिट्प्रत्ययाच्या संनिधानानें विदधातु अकारान्त आहे.

तसें म्हटलें तरी देखील विवेद येथें गुण होणार नाहीं असा दोष येतोच.

असें आहे तर आम्प्रत्ययाच्या संनिधानानें विदधातु अकारान्त आहे असें आम्ही गृहीत धरतों. कारण भारद्वाज वैयाकरणांचे अनुयायी लोक असें म्हणतात की विदधातूपुढील आम्‌प्रत्यय कित् समजावा. अथवा आम्‌प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'विद' असें अकारान्ताचें निपातन समजावें. त्यामुळें विदांचकार येथें गुण होत नाहीं.

(सू.३९) श्लु झाला असतां जीं कार्यें होतात त्यांचा जो येथें अतिदेश केला आहे त्याचा

---

१२. याचा अर्थ मागें (३।१।२२ पृ.२९ पं.२०) पाहावा.

१३. ऋच्छ उ ऋच्छो, न ऋच्छो अनृच्छो असा समास आहे. तेव्हां ऋच्छधातु आणि उकारान्त आम्‌प्रत्यय होतो असा अर्थ होतो.

१. दय्, आय् आणि अस् या धातूंहून आम्‌प्रत्यय होतो, लिट् पुढें असतांना; उदा०—दयांचक्रे.

१. उष्, विद् आणि जागृ या तीन धातूंहून आम्‌प्रत्यय विकल्पानें होतो, लिट् पुढें असतांना; उदा०—ओषांचकार उवोष.

२. तेव्हां विद या अकारान्ताच्या उपधेला दकार आहे म्हणून गुण होत नाहीं. अकाराचा लोप झाल्यानंतरही त्याला स्थानिवद्भाव (१।१।५७) होणारच.

३. कारण ह्या सूत्रामध्यें विद असें अकारान्त निपातन केलें आहे आणि या सूत्रामध्यें तर लिटि अशी अनुवृत्ति आहे.

१. भी, ह्री, भृ आणि हु या चार धातूंहून विकल्पानें आम्‌प्रत्यय होतो, लिट् पुढें असतांना; आणि श्लु झाला असतां जें कार्य होतें तें कार्य आम्‌प्रत्यय पुढें असतांना करावें; जसें—बिभयांचकार, बिभाय; जिह्रयांचकार, जिह्राय; बिभरांचकार, बभार; जुहवांचकार, जुहाव. येथें श्लुवद्भावामुळ द्वित्व (६।१।१०) आणि भृधातूच्या अभ्यासाला

**श्लुवदतिदेशे प्रयोजनं द्वित्वेत्त्वे ॥१॥**
विभरांचकार ॥

**कृञ्चानुप्रयुज्यते लिटि ॥३।१।४०॥**

किमर्थमिदमुच्यते । अनुप्रयोगो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । आमन्तमव्यक्तपदार्थकं तेनापरिसमाप्तोऽर्थ इति कृत्वानुप्रयोगो भविष्यति ॥ अत उत्तरं पठति ।

**कृञोऽनुप्रयोगवचनमस्तिभूप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

कृञोऽनुप्रयोगवचनं क्रियतेऽस्तिभूप्रतिषेधार्थम् । अस्तिभुवोरनुप्रयोगो मा भूदिति ॥

**आत्मनेपदविध्यर्थं च ॥ २ ॥**

आमनेपदविध्यर्थं च कृञोऽनुप्रयोगवचनं क्रियते । आत्मनेपदं यथा स्यात् ॥ उच्यमानेऽप्येतस्मिन्नवश्यमात्मनेपदार्थो यत्नः कर्तव्यः ॥ अस्तिभूप्रतिषेधार्थेन चापि नार्थः ।

**इष्टः सर्वानुप्रयोगः ॥ ३ ॥**

सर्वेषामेव कृभ्वस्तीनामनुप्रयोग इष्यते । किमिष्यत एवाहोस्वित्प्राप्नोत्यपि ।

---

काय उपयोग ?

(वा.१) द्वित्व आणि इत्त्व होणें हा उपयोग होय; जसें:– विभरांचकार.

(सू.४०) हें सूत्र कशासाठीं केलें आहे ?

लिट् पुढें असलेल्या अशा कृधातूचा आम्प्रत्ययान्ताच्या पुढें प्रयोग व्हावा यासाठीं केलें आहे ?

हा या सूत्राचा उपयोग होऊं शकत नाहीं. कारण काल, कारक आणि संख्या वगैरे अर्थांची आम्प्रत्ययान्तापासून प्रतीति होत नाहीं. तर केवळ क्रियेचीच प्रतीति होते. तेव्हां अपुरा असलेला अर्थ भरून काढण्यासाठीं आपोआपच तेथें एखाद्या क्रियापदाचा प्रयोग होईल. हें मनांत आणून पुढें वार्तिककार लिहितात:—

(वा.१) कृधातूचा अनुप्रयोग करावा असें जें येथें सांगितलें आहे तें अस् आणि भू या धातूंचा अनुप्रयोग होऊं नये म्हणून सांगितलें आहे.[2]

(वा.२) तसेंच आत्मनेपदाच्या विधीकरितां कृधातूचा अनुप्रयोग येथें सांगितला[3] आहे, अशाकरितां की कांहीं ठिकाणीं आत्मनेपद झालें पाहिजे.

पण प्रकृत सूत्र केलें तरी देखील आत्मनेपद होण्याकरितां कांहीं तरी यत्न करावा लागणारेंच आहे.[4]

अस् आणि भू या धातूंचा अनुप्रयोग होऊं नये याकरितांही हें सूत्र करावयास नको आहे. कारण

(वा.३) कृ, भू आणि अस् या सर्वांचा अनुप्रयोग इष्टच आहे.

पण काय हो, या सर्वांचा अनुप्रयोग इष्ट

---

इत्व (७।४।७६) केलें आहे.

१. लिट्प्रत्यय पुढें केलेल्या अशा कृ, भू आणि अस् यांपैकी कोणत्याही धातूचा प्रयोग आम्प्रत्ययान्ताच्या पुढें करावा; उदा०—पाचयांचकार, पाचयांबभूव, पाचयामास.

२. कृधातूप्रमाणें अस् आणि भू हेही दोन धातु सामान्यक्रियावाची असल्यामुळें त्यांचाही अनुप्रयोग ओघानेंच प्राप्त होतो. त्याच्या निवृत्तीसाठीं म्हणजे नियमार्थ हें सूत्र आरंभिलें आहे.

३. अनुप्रयोग केलेल्या कृधातूहून आत्मनेपदाचें विधान (१।३।६३) केलें आहे. पण जर अनुप्रयोगच सांगितला नाहीं तर तें विधान करतां येणार नाही. याकरितां हा अनुप्रयोग सांगितला आहे.

४. तेव्हां अनुप्रयोग सांगितला तरी तेवढ्यानें कांहीं आत्मनेपद सिद्ध होत नाही. त्याकरितां निराळें सूत्र केलेंच पाहिजे. मग हें सूत्र कशाला ? अनुप्रयोग जरी सांगितला नाहीं तरी आम्प्रत्यय ज्या धातूहून केला असेल त्याचा ज्या कृधातूशीं अभेदानें अन्वय असेल त्याहून आत्मनेपद होतें असें तेथें म्हणतां येईल.

इष्यते च प्राप्नोति च । कथम् । कृञिति नैतद्धातुग्रहणम् । किं तर्हि । प्रत्याहारग्रहणम् । क संनिविष्टांना प्रत्याहारः । कृभ्वस्तियोग इत्यतः प्रभृत्या कृञो ञकारात् ॥

**सर्वानुप्रयोग इति चेदशिष्यमर्थाभावात् ॥ ४ ॥**

सर्वानुप्रयोग इति चेदशिष्यं कृञोऽनुप्रयोगवचनम् । किं कारणम् । अर्थाभावात् । आमन्तमव्यक्तपदार्थकं तेनापरिसमाप्तोऽर्थ इति कृत्वानुप्रयोगो भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनं कृभ्वस्तीनामेवानुप्रयोगो यथा स्यात्पचादीनां मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् ।

**अर्थाभावाच्चान्यस्य ॥ ५ ॥**

अर्थाभावाच्चान्यस्य सिद्धम् । कृभ्वस्तयः क्रियासामान्यवाचिनः क्रियाविशेषवाचिनः पचादयो न च सामान्यवाचिनोरेव विशेषवाचिनोरेव वा प्रयोगो भवति । तत्र विशेषवाचिन उत्पत्तिः सामान्यवाचिनोऽनुप्रयोक्ष्यन्ते ॥

**लिट्परार्थं वा ॥ ६ ॥**

लिट्परार्थं तर्हि कृञोऽनुप्रयोगवचनं क्रियते । लिट्परस्यैवानुप्रयोगो यथा स्यादन्यपरस्य मा भूदिति ॥ किंपरस्य पुनः

---

आहे एवढेंच, किंवा तो सूत्रानें सिद्धही होत आहे ?

इष्टही आहे, आणि तो या सूत्रानें सिद्धही होत आहे.

तो कसा ?

येथें कृञ् हें कृधातूचें ग्रहण नव्हे, तर प्रत्याहाराचें ग्रहण आहे.

कोठें उच्चारलेल्या या धातूंचा हा प्रत्याहार समजावयाचा ?

'कृभ्वस्तियोगे' (५।४।५०) या सूत्रांतील कृशब्दाला आरंभ करून 'कृञो द्वितीय०' (५।४।५८) या सूत्रांतील ञकारापर्यंत.

(वा.४) कृ, भू आणि अस् या सर्वांचा अनुप्रयोग इष्ट आहे तर कृधातूचाच अनुप्रयोग होण्याकरितां नियमार्थ हें सूत्र करावयास नको.

काय कारण ?

आमन्तापासून फक्त क्रियामात्राची प्रतीति होते. त्या क्रियेचे विशेष जे काल,साधन,संख्या, वगैरे अर्थ त्यांची प्रतीति होत नाहीं. तेव्हां तेथें वाक्याचा अर्थ अपुरा होत असल्यामुळें तो पुरा करण्यासाठीं अर्थातच अनुप्रयोग होईल.

तर मग कृ, भू आणि अस् याच धातूंचा अनुप्रयोग व्हावा व पच् वगैरे धातूंचा अनुप्रयोग होऊं नये यासाठीं म्ह. नियमार्थ प्रकृत सूत्र पाहिजे.

हेंही प्रयोजन होऊं शकत नाहीं.

(वा.५) अर्थ जमत नाहीं म्हणून हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें की कृ, भू आणि अस् हे धातु क्रियासामान्यवाची आहेत, व पच् वगैरे इतर धातु क्रियाविशेषवाची आहेत. आणि सामान्यक्रियावाचक अशा दोन धातूंचा तसाच विशेष क्रियावाचक अशा दोन धातूंचा एका वाक्यांत प्रयोग मुळींच संभवत नाहीं. तेव्हां येथें विशेषक्रियावाचक धातूहून आम्प्रत्यय होत आहे म्हणून अर्थातच सामान्यक्रियावाचक धातूंचा अनुप्रयोग होईल.

(वा.६) आम्प्रत्ययान्ताच्या पुढें कृ, भू, अस् यांचा अनुप्रयोग व्हावा, लट् वगैरे पुढें असलेल्या ह्या धातूंचा अनुप्रयोग होऊं नये, याकरितां हें सूत्र केलें आहे.

पण लिटाखेरीज कोणता प्रत्यय पुढें अस-

---

५. घटः पदार्थः येथें अभेदानें अन्वय संभवतो. घटः पटः येथें तो संभवत नाहीं. आणि वस्तु पदार्थः असे दोन सामान्य शब्द उच्चारले तर पुनरुक्ति होते त्यामुळें तसें उच्चारतां येत नाहीं.

प्राप्नोति । लट्परस्य । न लट्परस्यानुप्रयोगेण भूतकालो विशेषितः स्यात् ॥ निष्ठापरस्य तर्हि मा भूदिति । न निष्ठापरस्यानुप्रयोगेण पुरुषोपग्रहौ विशेषितौ स्याताम् ॥ लुङ्परस्य तर्हि मा भूत् । न लुङ्परस्यानुप्रयोगेणानद्यतनो भूतकालो विशेषितः स्यात् ॥ लङ्परस्य तर्हि मा भूत् । न लङ्परस्यानुप्रयोगेणानद्यतनः परोक्षः कालो विशेषितः स्यात् ॥ अयं तर्हि भूते परोक्षेऽनद्यतने लङ् विधीयते हशश्वतोर्लङ् च [३.२.११६] इति तत्परस्य मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । एकस्या आकृतेश्चरितः प्रयोगो द्वितीयस्यास्तृतीयस्याश्च न भवति । तद्यथा । गोषु स्वाम्यश्वेषु चेति । न च भवति गोषु चाश्वानां च स्वामीति ॥

---

लेल्यांचा अनुप्रयोग प्राप्त होत आहे ?

लट् पुढें केलेल्या अशा त्या धातूंचा अनुप्रयोग प्राप्त होतो.

पण लट्परक अशा त्या धातूंच्या अनुप्रयोगानें भूतकालाशीं संबंध संभवत नाहीं ना![६]

तर मग निष्ठाप्रत्यय पुढें केलेल्या त्या धातूंचा अनुप्रयोग न व्हावा एतदर्थ हें सूत्र आरंभिलें आहे.

पण निष्ठाप्रत्यय पुढें केलेल्या कृ, भू, अस्, यांचा अनुप्रयोग केला तर त्यानें प्रथम, मध्यम व उत्तम या पुरुषांतील आणि परस्मैपद, आत्मनेपद, ह्यांतील विशेष दाखविला जाणार नाहीं.[७]

तर मग लुङ्प्रत्यय पुढें केलेल्या अशा त्या धातूंचा अनुप्रयोग न व्हावा यासाठीं हें सूत्र केलें आहे.

पण लुङ् पुढें केलेल्या कृ, भू, अस्, यांचा अनुप्रयोग केला तर त्यानें सामान्य भूतकाल दाखविला जाईल, पण अनद्यतन भूतकाल दाखविला जाणार नाहीं.

तर मग लङ्प्रत्यय पुढें केलेल्या त्या धातूंचा अनुप्रयोग न व्हावा यासाठीं हें अनुप्रयोगवचन केलें आहे.

पण लङ् पुढें केलेल्या कृ, भू, अस्, यांचा अनुप्रयोग केला तर अनद्यतन भूतकाल दाखविला जाईल, पण परोक्षपणा दाखविला जाणार नाहीं.

तर मग 'हशश्वतोर्लङ् च' (३।२।११६) या सूत्रानें परोक्षानद्यतनभूतकालीं लङ्प्रत्ययाचें विधान केलें आहे. तेव्हां तसा लङ्प्रत्यय पुढें केलेल्या त्या धातूंचा अनुप्रयोग न व्हावा यासाठीं हें सूत्र केलें आहे.

हेंही अनुप्रयोग सांगण्याचें प्रयोजन होऊं शकत नाहीं. कारण 'जो अर्थ दाखविण्यासाठीं प्रथमतः ज्या एका आकाराचा शब्द उपयोगांत आणिला जातो तेथें तोच अर्थ पुनः दाखविणें झाल्यास त्यासाठीं दुसऱ्या आकाराचा शब्द उपयोगांत आणावयाचा नाहीं', असा न्याय आहे; जसें:— गोषु स्वामी अश्वेषु च, असेंच वाक्य होतें;

---

६. कारण लट्प्रत्यय वर्तमानकालीं सांगितला आहे, आणि लिट्प्रत्यय भूतकालीं सांगितला आहे. आणि येथें तर आम्प्रत्यय ज्या धातूहून केला त्या धातूहून लिट्प्रत्यय अगोदरच केला आहे.

७. अनुप्रयोग केला नाहीं तर वाक्याचा अर्थ अपुरा राहील, म्हणून तो पुरा करण्याकरितां वक्ता अनुप्रयोग करण्यास प्रवृत्त होतो. तेव्हां त्याच्या मनामध्यें जो काल, जो पुरुष, जी संख्या, परगामी किंवा कर्तृगामी यांपैकीं जें फल विवक्षित असेल तें सर्व स्पष्ट प्रतीत होण्यासारखाच तो अनुप्रयोग करील. कृत या निष्ठाप्रत्यय पुढें केलेल्या कृधातूचा अनुप्रयोग केला तर त्यापासून प्रथम, मध्यम, वगैरे विशेष मनांत येत नाहींत. आणि परस्मैपद, आत्मनेपद, ही फोड निष्ठाप्रत्ययापासून होत नसल्यामुळें क्रियाफल कर्तृगामी आहे किंवा परगामी आहे याची फोड होणार नाहीं. याजयांचक्रे असा प्रयोग यजमान कर्ता असेल तर होतो, आणि दुसरा कोणी प्रयोजक कर्ता असेल तर याजयांचकार असा प्रयोग होतो.

**अर्थसमाप्तेर्वानुप्रयोगो न स्यात् ॥७॥**

अर्थसमाप्तेस्तर्ह्यनुप्रयोगो न स्यात्। आमन्तेन परिसमाप्तोऽर्थ इति कृत्वानुप्रयोगो न स्यात् ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम्। इदानीमेव ह्युक्तमामन्तमव्यक्तपदार्थकं तेनापरिसमाप्तोऽर्थ इति कृत्वानुप्रयोगो भविष्यतीति ॥

**विपर्यासनिवृत्त्यर्थं वा ॥८॥**

विपर्यासनिवृत्त्यर्थं तर्हि कृञोऽनुप्रयोगवचनं क्रियते। ईहांचक्रे। चक्र ईहामिति मा भूत ॥

**व्यवहितनिवृत्त्यर्थं च ॥९॥**

व्यवहितनिवृत्त्यर्थं च कृञोऽनुप्रयोगवचनं क्रियते। अन्वेव चानुप्रयोगो यथा स्यात्। ईहांचक्रे। व्यवहितस्य मा भूत। ईहां देवदत्तश्चक्र इति ॥

**[ विदांकुर्वन्त्वित्यन्यतरस्याम् ॥ ३ । १ । ४१ ॥ ]**

**[ अभ्युत्सादयांप्रजनयांचिकयांरमयामकःपावयांक्रियाद्विदाम-**

गोषु अश्वानां च स्वामी असें होत नाहीं.

(वा.७) तर मग आमूप्रत्ययान्त शब्दापासून अर्थाची पूर्तता होत असल्यामुळें मुळीं अनुप्रयोगच होणार नाहीं. म्हणून हें अनुप्रयोगवचन आरंभिलें आहे असें समजावें.

पण हेंही प्रयोजन नाहीं. कारण आतां नुकतेंच मागें सांगितलें की आमूप्रत्ययान्त शब्दापासून काल, कारक, वगैरे विशेष अर्थाची प्रतीति होत नाहीं. तेव्हां अपुरा असलेला अर्थ पुरा होण्यासाठीं आपोआपच अनुप्रयोग होईल.

(वा.८) तर मग आमूप्रत्ययान्ताच्या पुढेंच कृ, भू, अस्, यांचा अनुप्रयोग व्हावा, त्याच्यापूर्वीं होऊं नये, यासाठीं हें सूत्र आरंभिलें आहे; जसें:— ईहांचक्रे; याच्या उलट चक्रे ईहाम् असें न झालें पाहिजे.

(वा.९) शिवाय आमन्ताच्या पुढें, पण अव्यवहितच, अनुप्रयोग व्हावा यासाठीं हें अनुप्रयोगवचन आरंभिलें आहे, असें समजावें; जसें:— ईहां देवदत्तश्चक्रे असा व्यवहित-

८. स्वामिन्‌शब्दाचा योग असतांना षष्ठी किंवा सप्तमी होते (२।३।३९); उदा०—गवां स्वामी, गोषु स्वामी. आतां जेव्हां गो आणि अश्व यांचा स्वामी असें सांगावयाचें आहे तेव्हां गवामश्वानां च स्वामी किंवा गोषु अश्वेषु च स्वामी असें होईल. पण गो या पहिल्या शब्दाहून जी विभक्ति केली तीच दुसऱ्या, व तिसऱ्या शब्दांहून केली पाहिजे. म्हणून 'गवामश्वेषु च स्वामी' किंवा 'गोषु अश्वानां च स्वामी' असें वाक्य होत नाहीं. तेव्हां येथें आम्प्रत्यय ज्याहून केला त्याहून पूर्वीं लिट्प्रत्यय केला असल्यामुळें लिटाचाच प्रयोग पुढें होईल. ह किंवा शश्वत् हीं अव्ययें लावून सुद्धां लङ् अनुप्रयोगांत करतां येणार नाहीं.

१. लोट्प्रत्यय पुढें असतांना विद्धातूहून आम्प्रत्यय होतो, लघूपधगुण होत नाहीं. धातूहून केलेल्या लोट्प्रत्ययाचा लुक् होतो आणि आमन्ताच्या पुढें लोट् पुढें केलेला जो कृधातु त्याचा अनुप्रयोग होतो; उदा०—विदांकरोतु.

१. वेदामध्यें हीं निपातनें विकल्पानें केलीं आहेत. अभ्युत्सादयामकः येथें अभि, उत्, हे दोन उपसर्ग असतांना सद्धातूहून णिच्प्रत्यय करून पुढें लुङ्प्रत्यय केला असतां आम्प्रत्यय होतो, लुङाचा लुक् होतो आणि पुढें अकः असा अनुप्रयोग केला आहे. अकः हें कृधातूचें लुङ्प्रथमपुरुषीं एकवचनी क्रियापद आहे. तेथें च्लिप्रत्ययाचा लुक् (२।४।८०) झाला आहे. एकदा अभ्युदसीषदत् असें होतें. प्रजनयामकः या निपातनामध्यें प्रउपसर्गपूर्वक जन्धातूहून णिच्प्रत्यय करून पुढें आम्प्रत्यय केला आहे. एकदा प्राजीजनत् असें होतें. चिकयामकः या निपातनामध्यें चिधातूहून आम्प्रत्यय, धातूला द्वित्व आणि उत्तरखण्डांतील चकाराला ककार झाला आहे. एकदा अचैषीत् असें होतें. रमयामकः या निपातनामध्यें रम्धातूहून णिच्प्रत्यय करून पुढें आम्प्रत्यय केला आहे. एकदा अरीरमत् असें होतें. पावयांक्रियात् या निपातनामध्यें पूधातूहून णिच्प्रत्यय करून पुढें लिङ्-

क्रन्मिति च्छन्दसि ॥ ३ । १ । ४२ ॥]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरण- महाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य प्रथमे पादे तृतीयमाह्निकम् ।

---

प्रयोग न झाला पाहिजे.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील तिसरें आह्निक समाप्त झालें.

---

प्रत्यय करून आम्प्रत्यय केला आहे. लिङाचा लुक्, पुढें क्रियात् या क्रियापदाचा अनुप्रयोग केला आहे. एकदा पाव्यात् असें होतें. विदामक्रन् या निपातनामध्यें विद्धातूहून लुङ्प्रत्यय करून मध्यें आम्प्रत्यय करून लुङाचा लुक् केला आहे. पुढें अक्रन् असा अनुप्रयोग केला आहे. अक्रन् हें कृधातूचें लुङ्प्रथमपुरुषीं बहुवचनीं क्रियापद आहे. एकदा अवेदिषुः असें होतें.

## च्लि लुङि ॥ ३ । १ । ४३ ॥

क्वायं च्लिः श्रूयते । न क्वचिच्छ्रूयत एतस्य सिजादय आदेशा उच्यन्ते । यदि न क्वचिच्छ्रूयते किमर्थस्तर्हि च्लिरुत्सर्गः क्रियते न सिजुत्सर्ग एव कर्तव्यः । तस्य क्सादयोऽपवादा भविष्यन्ति ॥ अथ उत्तरं पठति ।

### च्ल्युत्सर्गः सामान्यग्रहणार्थः ॥ १ ॥

च्लिरुत्सर्गः क्रियते सामान्यग्रहणार्थः। क्व सामान्यग्रहणार्थेनार्थः । मन्त्रे घसह्वरणशवृदहाद्वृच्कृगमिजनिभ्यो लेः [२.४.८०] इति । तत्रावरतस्त्रयाणां ग्रहणं कर्तव्यं स्यात् । चङ्ङोः सिच इति ॥

### क्सविधाने चानिड्वचने च्लिसंप्रत्ययार्थः ॥ २ ॥

क्सविधाने चानिड्वचने च्लिसंप्रत्ययार्थश्च्लिरुत्सर्गः क्रियते । च्लेरनिटः क्सः सिद्धो भवति ॥

### घस्लभावे च ॥ ३ ॥

घस्लभावे च च्लावेव कृत लृदित

(सू.४३) या च्लिप्रत्ययाचें उदाहरणांमध्यें कोठें बरें श्रवण होतें ?

याला पुढील सूत्रांनीं सिच्, क्स, वगैरे आदेश सांगितले असल्यामुळें च्लिप्रत्ययाचें कोठेंही श्रवण होत नाहीं.

जर या च्लिप्रत्ययाचें कोठेंही श्रवण होत नाहीं तर सर्वसाधारण आदेशांचा स्थानी म्हणून च्लिप्रत्यय कशाकरितां उभा केला आहे? तसा करूं नये. तर सिच्प्रत्ययच सर्वसाधारण सांगावा. तो उत्सर्ग होईल, आणि त्या सिचाचे क्स, चङ्, अङ् आणि चिण् हे अपवाद होतील.

हें मनांत आणून वार्तिककार लिहितातः—

(वा.१) एका शब्दाखालीं अनेक शब्दांचा संग्रह व्हावा याकरितां च्लि हा प्रत्यय सर्वसाधारण उत्सर्ग केला आहे.

असा एका शब्दाखालीं अनेक शब्दांचा संग्रह कोठें बरें झाला आहे ?

मन्त्रे घसह्वरणशवृदहाद्वृच्कृगमिजनिभ्यो लेः (२।४।८०) येथें. जर च्लिप्रत्ययाचें धातुमात्राहून विधान न केलें तर लेः या शब्दाच्या ऐवजीं कमींत कमीं चङ्, अङ् आणि सिच् हे तीन शब्द घालावे लागले असते.

(वा.२) क्सादेश सांगणाऱ्या 'शल इगुपधा०' (३।१।४५) या सूत्रांतील अनिटः या पदापासून इडागम न झालेला प्रत्यय अशा या अर्थाचा बोध होतो. त्या अर्थानें अनिटः हें च्लिप्रत्ययाला विशेषण बरोबर जुळतें. यासाठीं च्लिप्रत्ययाचें सामान्यतः विधान केलें आहे. त्यामुळें अनिट् अशा च्लिप्रत्ययाचे स्थानीं क्सादेश सिद्ध होतो.

(वा.३) लुङामध्यें आर्धधातुक प्रत्यय पुढें असतां अद् धातूचे स्थानीं घस्लआदेश केल्या-

---

१. धातूहून च्लिप्रत्यय होतो, लुङ् पुढें असतांना. या च्लिप्रत्ययाचे स्थानीं पुढील सूत्रांनीं सिच् वगैरे आदेश होतात.

२. 'मन्त्रे घस०' या सूत्रानें मंत्रामध्यें घस्, ह्वृ, णश्, वृ, दह, आकारान्त धातु, वृच्, कृ, गम्, आणि जन् या धातूंपुढील च्लिप्रत्ययाचा लुक् सांगितला आहे. च्लिप्रत्ययाचाच लुक् झाला म्हणजे अर्थातच कोणताही आदेश त्याला होत नाहीं. सिजादेश सर्वच ठिकाणीं प्राप्त होत आहे. धा या आकारान्त धातूहून चङ् (३।१।४९) प्राप्त होतो. तसेंच घस्, णश्, गम्, या धातूंहून अङ्प्रत्यय (३।१।५५) प्राप्त होतो. जर च्लिप्रत्ययाचें धातुमात्राहून विधान केलें नसतें तर सिच्, चङ् व अङ् या तीन प्रत्ययांचा लुक् होण्यासाठीं 'मन्त्रे घस०' या सूत्रांतील लेः या पदाचे ऐवजीं तीन प्रत्ययांचें ग्रहण करावें लागलें असतें. तें काम लेः या एका शब्दानें भागवितां येतें.

इत्यङ् सिद्धो भवति ॥

अथ च्लिश्चित्करणं किमर्थम् ।

**च्लेश्चित्करणं विशेषणार्थम् ॥ ४ ॥**

च्लेश्चित्करणं क्रियते विशेषणार्थम् । क विशेषणार्थेनार्थः । च्लेः सिच् [३.१.४४] इति । लेः सिजित्युच्यमाने लिङ्लिटोरपि प्रसज्येत ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । लुङीत्युच्यते न च लुङि लिङ्लिटौ स्तः ॥

अथेदित्करणं किमर्थम् ।

**इदित्करणं सामान्यग्रहणार्थम् ॥ ५ ॥**

इदित्करणं क्रियते सामान्यग्रहणार्थम् । क सामान्यग्रहणार्थेनार्थः । मन्त्रे घसह्वरणशवृदहाद्वृच्कृगमिजनिभ्यो लेरिति । आमः [२.४.८१] इति च ॥ इकारे चेदानीं सामान्यग्रहणार्थे क्रियमाणेऽवश्यं सामान्यग्रहणाविघातार्थश्चकारः कर्तव्यः । क सामान्यग्रहणाविघातार्थेनार्थश्चकारेण । अत्रैव ॥

---

नंतर लृदित्त्वास्तव च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङ् सिद्ध[३] होतो.

आतां या च्लिप्रत्ययामध्यें इत्संज्ञक चकार कशाकरतां जोडला आहे ?

(वा.४) च्लिप्रत्ययामध्यें इत्संज्ञक चकार जोडला आहे तो 'ज्याचा चकार इत्संज्ञक आहे' असें विशेषण लागण्याकरितां जोडला आहे.

असें विशेषण लाविल्याचा कोठें बरें उपयोग होतो ?

'च्लेः सिच्' या पुढील सूत्रामध्येंच उपयोग होतो. जर लेः सिच् असें म्हटलें तर लिङ् किंवा लिट् यांनाही सिच् आदेश होऊं लागेल.

हा उपयोग येऊं शकत नाहीं, कारण येथें लुङि या पदाची अनुवृत्ति आहे, आणि लुङ् पुढें असतांना त्याच्या मागें लिङ् किंवा लिट् केव्हांही येऊं शकत नाहीं.

आता च्लि या प्रत्ययामध्यें इत्संज्ञक इकार कशाकरितां जोडला आहे ?

(वा.५) लि या शब्दानें लिट् वगैरेप्रमाणें च्लिप्रत्ययही घेतां यावा यासाठीं च्लिप्रत्ययामध्यें इकार जोडला आहे.

असा उपयोग कोठें बरें होऊं शकतो ?

'मन्त्रे घसह्वरणशवृदहाद्वृच्कृगमिजनिभ्यो लेः' या सूत्राच्या पुढील 'आमः' (२।४।८१) येथें[४].

आतां च्लि आणि लिट् या दोघांचेंही लिशब्दानें ग्रहण होण्यासाठीं च्लिप्रत्ययामध्यें इकाराची जोड दिली असतां 'लि'शब्दानें त्या दोघांचें ग्रहण करतांना अडथळा न यावा म्हणून च्लिप्रत्ययामध्यें इकाराप्रमाणें चकाराचीही जोड अवश्य दिली पाहिजे.

असें अडथळा न येतां लिशब्दानें दोघांचें ग्रहण कोठें बरें होतें ?

येथेंच[५].

आतां[६] जें म्हटलें आहे की च्लिप्रत्यय सर्वसाधारण सांगून त्याला सिच् वगैरे आदेश

---

३. लुङ् पुढें असलेलें जें आर्धधातुक तें पुढें असतांना अद्धातूला घस्लृ असा आदेश (२।४।३७) सांगितला आहे. जर च्लिप्रत्यय सांगितला नाहीं तर सिच्प्रत्यय करून त्या निमित्तानें घस्लृआदेश करावा लागेल. नंतर सिच्प्रत्यय पूर्वीं होऊन गेला असल्यामुळें अङ्प्रत्यय करतां येणार नाहीं.

४. 'मन्त्रे घसह्वर०' या सूत्रांतून लेः या पदाची अनुवृत्ति आमः यापुढील सूत्रामध्यें होते. 'मन्त्रे घस०' या सूत्रानें सांगितलेला लुक् च्लिप्रत्ययाचा होतो, व आमः या सूत्रानें सांगितलेला लुक् लिट्प्रत्ययाचा होतो. तेव्हां लेः या पदानें च्लि व लिट् या उभयतांचेंही ग्रहण होतें.

५. च्लिप्रत्ययामध्यें चकाराची जोड न दिली तर त्या एकट्याचेंच लिशब्दानें ग्रहण होईल, लिटाचें ग्रहण होणार नाहीं. कारण त्याला टकार जास्त आहे. आणि येथें चकार जोडला म्हणजे दोन्हीकडे सारखाच एक इत्संज्ञक जास्त असल्यामुळें लिशब्दानें दोघांचेंही ग्रहण होतें.

६. येथून च्लिप्रत्ययाचें खंडन करीत आहेत.

यत्तावदुच्यते च्ल्युत्सर्गः सामान्यग्रहणार्थ इति क्रियमाणेऽपि वै च्ल्युत्सर्गे तान्येव त्रीणि ग्रहणानि भवन्ति। च्लि लुङि च्लेः सिच् लेरिति ॥ यदेतल्लेरिति तत्परार्थं भविष्यति। कथम्। यदेतद्गातिस्थाघुपाभूभ्यः सिचः परस्मैपदेषु [२.४.७७] इत्यत्र सिचो ग्रहणमेतल्लेरिति वक्ष्यामि ॥ यदि लेरित्युच्यते धेटश्चातुःशब्द्यं प्राप्नोति। अदधत् अधात् अधासीत्। अदधादित्यपि प्राप्नोति ॥ न चङो लुकि द्विर्वचनेन भवितव्यम्। किं कारणम्। चङि [६.१.११] इत्युच्यते न चात्र चङं पश्यामः। प्रत्ययलक्षणेन। न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणप्रतिषेधः ॥ बहुवचने तर्हि चातुःशब्द्यं प्राप्नोति। अदधन् अधुः अधासिषुः। अधानित्यपि प्राप्नोति ॥

---

होतात असें सांगितलें असल्यामुळे लेः या एका पदानें भागतें, नाहीं तर लेः या एका शब्दाच्या ऐवजीं सिच्, चङ् आणि अङ् असे तीन शब्द घालावे लागतील. पण च्लिप्रत्यय सांगितला तरी तीन शब्द घालावे लागतातच. एक प्रकृत सूत्रामध्यें च्लिशब्द, दुसरा पुढील सूत्रामध्यें च्लेः हा शब्द, आणि तिसरा 'मन्त्रे घस०' या सूत्रामध्यें लेः हा शब्द. तेव्हां सर्वसाधारण च्लिप्रत्यय सांगण्यांत लाघव येत नाहीं.

तरी पण 'मन्त्रे घसह्वर०' (२।४।८०) या सूत्रामध्यें जो 'लेः' हा शब्द घातला आहे त्यामुळें दुसऱ्या एका सूत्रामध्यें एक शब्द कमी करण्यांत येईल.

तो कसा ?

'गातिस्थाघुपा०' (२।४।७७) या सूत्रामध्यें 'सिचः' असा जो शब्द घातला आहे त्याच्या ऐवजीं लेः हा शब्द घालून तोच 'मन्त्रे घस०' या सूत्रामध्यें अनुवृत्त आणावा म्हणजे लाघव होईल.

आतां जर 'गातिस्था०' या सूत्रामध्यें सिचः याच्या ऐवजीं लेः हा शब्द घातला तर धेट्धातूचीं लुङाच्या प्रथमपुरुषाच्या एकवचनाचीं अदधत्, अधात्, अधासीत् आणि अदधात् अशीं चार रूपें होऊं लागतील.

पण चङ्प्रत्ययाचा लुक् केला असतां त्या चङामुळें द्विर्वचन होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की द्विर्वचनविधीचे (६।१।११) ठिकाणीं 'चङि' असें म्हटलें आहे, आणि येथें तर लुक् झाल्यामुळें चङ् पुढें नाहीं.

पण प्रत्ययलक्षणानें चङ् पुढें आहे ना ?

न लुमता तस्मिन् (१।१।६३) असा प्रत्ययलक्षणाचा निषेध आहे.

तर मग त्या धेट्धातूचीं लुङांतील प्रथमपुरुषी बहुवचनाचीं अदधन्, अधुः, अधासिषुः आणि अधान् अशीं चार रूपें होऊं लागतील.

हा दोष येत नाहीं. कारण चङाचा लुक् स्थानिवद्भावानें (१।१।५६) च्लि आहे असें समजून त्याचा एकदा लुक् होऊन अदधात् असें चवथें रूप होऊं लागेल.

---

७. मागील टीप २ पहावी.

८. धेट् पाने या धातूच्या एकाराला आत्व (६।४।४५) केल्यानंतर पुढें लुङ्, च्लि, चङ् (३।१।४९), व आकाराचा लोप होऊन अदधत् असें रूप होतें. चङ् विकल्पानें सांगितला असल्यामुळें एकदा सिच्, त्याचा लुक् (२।४।७८) होऊन अधात् असें रूप होते. लुक् विकल्पानें सांगितला असल्यामुळें एकदा अधासीत् असें रूप होतें. आतां लेः असें म्हणून च्लीचाच लुक् सांगितला तर चङ् हा

९. तेव्हां चङ्प्रत्ययाचा लुक् झाला तरी अधात् असेंच रूप होणार आहे. चवथें रूप होत नाहीं म्हणून दोष नाहीं.

१०. चङ्प्रत्ययाचा लुक् झाला त्या वेळीं अधात् असेंच चवथें रूप होऊं लागेल, कारण तेथें जुसादेश होणार नाहीं.

नैष दोषः। आतः [३.४.११०] इति जुस्भावो भविष्यति ॥ न सिध्यति। सिज्ग्रहणं तत्रानुवर्तते ॥ सिज्ग्रहणं निवर्तिष्यते ॥ यदि निवर्तते अभूवन्निति प्रत्ययलक्षणेन जुस्भावः प्राप्नोति ॥ एवं तर्हि लुक्सिजपवादो विज्ञास्यते ॥ यदि लुक्सिजपवादो विज्ञायते मा हि दाताम् मा हि धातामित्यत्रादिः सिचोऽन्यतरस्याम् [६.१.१८७] इत्येष स्वरो न प्राप्नोति। तस्मान्नैतच्छक्यं वक्तुं लुक्सिजपवाद इति। न चेदुच्यते अभूवन्निति प्रत्ययलक्षणेन जुस्भावः प्राप्नोति। तस्मादात इत्यत्र सिज्ग्रहणमनुवर्त्यं तस्मिंश्चानुवर्तमाने धेटश्चातुःशब्द्यं प्राप्नोति। तस्माद्गातिस्थाघुपाभूभ्यः सिचः परस्मैपदेष्वित्यत्र सिचो ग्रहणं कर्तव्यं तस्मिंश्च क्रियमाणे तान्येव त्रीणि ग्रहणानि भवन्ति च्लि लुङि च्लेः सिच् लेरिति ॥

---

केला असतां 'आतः' (३।४।१०) यानें जुसादेश होईल.

जुसादेश होणार नाहीं. कारण तेथें 'सिजभ्यस्त०' येथून सिच् या पदाची अनुवृत्ति आहे.[११]

आतां 'आतः' या सूत्रामध्यें सिज्ग्रहणाची अनुवृत्ति[१२] करूं नये म्हणजे झालें.

पण तसें केलें तर अभूवन् येथें प्रत्ययलक्षणानें 'सिजभ्यस्त०' यानें जुस् होऊं लागेल.[१३]

तर मग आतां 'गातिस्था०' यानें सांगितलेला च्लिप्रत्ययाचा लुक् हा सिच्प्रत्ययाचा अपवाद समजण्यांत[१४] येईल.

जर लुक् हा सिच्प्रत्ययाचा अपवाद होईल तर मा हि धाताम् येथें 'आदिः सिचोऽन्यतरस्याम् (६।१।१८७) यानें आद्युदात्तस्वर प्राप्त होत नाहीं. तेव्हां लुक् हा सिच्प्रत्ययाचा अपवाद आहे असें म्हणणें शक्य नाहीं. आणि लुक् हा सिच्प्रत्ययाचा अपवाद आहे असें जर म्हणतां आलें नाहीं तर अभूवन् येथें प्रत्ययलक्षणानें जुसादेश होऊं लागेल हा दोष येतो, म्हणून 'आतः' हें सूत्र नियमार्थ होण्याकरितां तेथ सिचः या पदाची अनुवृत्ति केली पाहिजे. तें सिच्ग्रहण अनुवृत्त[१५] केलें म्हणजे धेट्धातूच्या लुङाच्या बहुवचनामध्यें चवथें अधात् असें अधिक उदाहरण प्रसक्त होतें. यासाठीं 'गातिस्था०' या सूत्रामध्यें सिचः हा शब्द घातला पाहिजे. आणि तो सिचः हा शब्द 'गातिस्था०' या सूत्रामध्यें घातला असतां 'मन्त्रे घस०' या सूत्रामध्यें लेः असा शब्द ठेवलाच पाहिजे. तेव्हां तो एक शब्द, 'च्लि लुङि' येथील च्लिशब्द, आणि 'च्लेः सिच्' येथील च्लेः हा शब्द असे तीन शब्द ठेवावे लागणार.[१६]

---

११. सिज्ग्रहणाची अनुवृत्ति आहे म्हणूनच आतः हें सूत्र नियमार्थ होतें. तो नियम असा की सिचाचा लुक् झाला असतां जर 'सिजभ्यस्त०' (३।४।२०९) यानें जुसादेश होईल तर फक्त आकारान्त धातु असेल तरच होतो. त्यामुळें अभूवन् येथें जुस् होत नाहीं.

१२. सिज्ग्रहणाची अनुवृत्ति नसली तर आतः हें सूत्र अधुः येथें चङ्प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर जुसादेश करण्याकरितां विध्यर्थच होईल.

१३. कारण आतां 'आतः' हें सूत्र नियमार्थ म्हणता येत नाहीं.

१४. तेव्हां अभवन् येथें सिजादेश करण्याचे पूर्वींच लुक् झाला म्हणजे 'सिजभ्यस्त' यानें जुस् होत नाहीं.

१५. अनुवृत्ति केली म्हणजे आतः हें सूत्र नियमार्थ होऊन अभूवन् येथील दोष जाईल, पण अधात् असें भलतेंच चवथें रूप होऊं लागेल, हा दोष येतोच.

१६. तेव्हां च्लिप्रत्यय न सांगतां सिच्प्रत्यय सांगून क्स वगैरे त्याचे अपवाद मानले असतां 'मन्त्रे घस०' या सूत्रामध्यें लेः या एका पदाचे ऐवजीं सिच्, चङ् आणि अङ् अशीं तीन पदें

यदप्युच्यते क्सविधाने चानिड्वचने च्लिसंप्रत्ययार्थ इति धातुमेवात्रानिट्त्वेन विशेषयिष्यामः। धातोरनिट इति। कथं पुनर्धातुर्नामानिट् स्यात्। धातुरेवानिट्। कथम्। अनिमित्तं वा इटोऽनिट्। न वा तस्मादिडस्ति सोऽयमनिडिति ॥ अथ धातौ विशेष्यमाणे क्व योऽनिडिति विशेषयिष्यसि। किं चातः। यदि विज्ञायते निष्ठायामनिट इति भूयिष्ठेभ्यः प्राप्नोति। भूयिष्ठा हि शलन्ता इगुपधा निष्ठायामनिटः। अथ विज्ञायते लिटि योऽनिडिति न कुतश्चित्प्राप्नोति। सर्वे हि शलन्ता इगुपधा लिटि सेटः ॥ किं पुनः कारणं धातौ विशेषयिष्यमाण एतयोर्विशेषयोर्विशेषयिष्यते न पुनर्यत्र सामान्येनेटो विधिप्रतिषेधौ। क्व सामान्येन। वलादावार्धधातुके ॥

आतां क्सादेश सांगणाऱ्या सूत्रांतील 'अनिटः' हें पद इडागम न झालेला प्रत्यय या अर्थानें च्लिप्रत्ययाला बरोबर जमतें, यासाठीं च्लिप्रत्ययाचें सामान्यतः विधान केलें आहे' असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तरः– तेथील अनिटः हें धातूलाच विशेषण देतां येईल. म्हणजे 'अनिट् असा जो धातु' असा अर्थ होईल.

पण धातु आणि अनिट् हें म्हणणें कसें बरें संभवेल[१७] ?

धातूला अनिट् म्हणतां येतेंच.

तें कसें ?

असें की जो धातु इडागमाला निमित्त होत नाहीं तो धातु अनिट् होय. किंवा ज्या धातूच्या पुढील प्रत्ययाला इडागम होत नाहीं त्या धातूला अनिट् असें म्हणतां येतें.

आतां अनिटः हें धातूला विशेषण दिलें असतां तशी स्थिति कोणता प्रत्यय पुढें असतांना पहावयाची ?

निष्ठाप्रत्यय पुढें असतांना कोणीही धातु जर अनिट् समजण्यांत येईल तर शलन्त असून इगुपध अशा पुष्कळच धातूंहून क्सप्रत्यय होऊं लागेल. कारण इगुपध शलन्त असून निष्ठाप्रत्यय केला असतां इडागम होत नाहीं असे पुष्कळसे धातु दृष्टीस पडतात[१८].

आतां अनिट् म्हणजे लिट्प्रत्यय पुढें असतांना अनिट् असें समजावें तर इगुपध असून शलन्त अशा कोणत्याच धातूहून क्सप्रत्यय प्राप्त होऊं शकत नाहीं. कारण इगुपध असून शलन्त अशा सगळ्याच धातूंना लिटामध्यें इडागम होत असतो[१९].

पण अनिटः हें धातूला विशेषण दिलें असतां तशी परिस्थिति निष्ठा आणि लिट् याच प्रत्ययांमध्यें कां म्हणून पहावयाची ? सामान्यतः इडागम आणि त्याचा निषेध जो सांगितला आहे त्यामुळें कां पाहत नाहीं ?

तसा सामान्यतः इडागमाचा विधि कोठें बरें आहे ?

---

गोविलीं तरी कांही गौरव होत नाहीं असें सिद्ध होतें.

१७. च्लिप्रत्ययाचे स्थानी क्सादेश सांगितला तेव्हां अधुक्षत् येथें दुह्धातूहून लुङ् करून मध्यें च्लिप्रत्यय झाल्यानंतर 'एकाच उपदेशे०' (७।२।१०) यानें च्लिप्रत्ययाला इडागम होत नाहीं, म्हणून च्लिप्रत्ययाला अनिट् म्हणतां येतें. आतां जर च्लिप्रत्यय सांगितला नाहीं तर क्सप्रत्यय करण्याचे वेळीं इडागमाची प्राप्ति नाहीं आणि त्याचा निषेधही प्राप्त होत नाहीं. तेव्हां तेथें धातु अनिट् आहे असें म्हणतां येत नाही. म्हणून हा प्रश्न उत्पन्न होत आहे,

१८. कारण निष्ठाप्रत्ययाला इडागम होत नाहीं असें सांगणारीं सूत्रें पुष्कळच (७।२।१४ ते ७।२।३३) आहेत; तेव्हां इष्धातूहूनही क्सप्रत्यय होऊं लागेल. इष्धातूहून निष्ठाप्रत्यय केला असतां इष्टः असें रूप होतें, इडागम होत नाहीं.

१९. कारण क्रसृभृ० (७।२।१३) या नियमानें लिटामध्यें इडागमाचा निषेध होत नसतो.

यदप्युच्यते घस्लभावे चेत्यार्धधातुकीयाः सामान्येन भवन्त्यनवस्थितेषु प्रत्ययेषु। तत्रार्धधातुकसामान्ये घस्लभावे कृत लृदित इत्यङ् भविष्यति ॥

**च्लेः सिच् ॥ ३ । १ । ४४ ॥**

किमर्थश्चकारः। विशेषणार्थः। क्व विशेषणार्थेनार्थः। सिचि वृद्धिः परस्मैपदेषु [७.२.१] इति। सौ वृद्धिरित्युच्यमाने अग्निः वायुरित्यत्रापि प्रसज्येत। नैतदस्ति प्रयोजनम्। परस्मैपदेष्वित्युच्यते न चात्र परस्मैपदं पश्यामः॥ स्वरार्थस्तर्हि। चितोऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात्। एतदपि नास्ति प्रयोजनम्। अनच्कोऽयं तत्र नार्थः स्वरार्थेन चकारेणानुबन्धेन। इटि कृते साच्को भविष्यति। तत्र प्रत्ययाद्युदात्तत्वेनेट उदात्तत्वं भविष्यति। न सिध्यति। आगमा अनुदात्ता भवन्तीत्यनुदात्तत्वं प्राप्नोति॥ अथ उत्तरं

---

वलादि आर्धधातुक केला असतां (७।२।३५) सांगितला आहे.

आणखीही जें घस्लआदेशासंबंधानें (वा.३) म्हटलें आहे त्यावर उत्तरः— आर्धधातुकाधिकारामध्यें सांगितलेले आदेश वगैरे हे आर्धधातुक प्रत्यय करावयाचा, इतकें मनांत आल्याबरोबर तो प्रत्यय करण्याचे पूर्वीच करावयाचे असतात. तेव्हा अद्धातूच्या पुढें लुङ् केला असतां सिच्प्रत्यय करावयाचा मनांत आल्याबरोबर तो करण्यापूर्वीच घस्लादेश होईल. आणि तो केल्यानंतर सिच्प्रत्ययाचा बाध करून लृदित्त्वास्तव अङ् करतां येईल. तेव्हां च्लिप्रत्ययाचें सामान्यविधान करण्याची जरूर नाहीं.

(सू.४४) सिच् या आदेशामध्यें इत्संज्ञक चकार कशाकरितां जोडला आहे ?

'सि' या शब्दाला तो चकार विशेषण म्हणून लावतां यावा याकरितां जोडला आहे.

असें विशेषण देण्यांत कोठें बरें उपयोग होत आहे ?

सिचि वृद्धिः परस्मैपदेषु (७।२।१) येथें. आतां येथें चकार न लावतां सौ वृद्धिः एवढेंच म्हटलें तर अग्निः, वायुः, येथेंही सुप्रत्यय पुढें असल्यामुळें वृद्धि होऊं लागेल.[३]

चकार लावण्याचें हें प्रयोजन होऊं शकत नाहीं. कारण सिचि वृद्धिः येथें परस्मैपद पुढें असतांना असें म्हटलें आहे, आणि अग्निः, वायुः, येथें तर परस्मैपद पुढें दृष्टीस पडत नाहीं.

तर मग चकारेत्संज्ञकाचा अन्त उदात्त होतो अशा अर्थाचा 'चितः' (६।१।१६३) या सूत्रानें अन्तोदात्तस्वर व्हावा म्हणून सिच्प्रत्ययामध्यें चकार जोडला आहे.

हाही चकाराचा उपयोग संभवत नाहीं. कारण सिच्प्रत्ययांतील इकार हा उच्चारणार्थ असल्यामुळें त्यामध्यें अच् एकही नाहीं. म्हणून स्वराकरितां इत्संज्ञक चकार जोडण्याचा उपयोग होत नाहीं.

पण इडागम केला असतां सिच्प्रत्ययामध्यें अच् संभवतो.

पण तेथें प्रत्ययस्वरानें (३।१।३) इडागमाला उदात्त होईल.

प्रत्ययस्वरानें इडागमाला उदात्त होऊं

---

२०. तसाच सामान्यतः इडागमाचा निषेधही (७।२।१०) सांगितला आहे. तात्पर्य, या रीतीनें अनिटः हें विशेषण धातूला देतां येतें. एकंदरीत च्लिप्रत्यय सांगितला नाही तरी हरकत नाहीं.

१. च्लिप्रत्ययाचे स्थानी सिच् असा आदेश होतो; उदा०-अकार्षीत्.

२. त्यामुळें सिच् असा प्रत्यय ज्या ठिकाणी निमित्त धरला असेल तेथें चकारेत्संज्ञक सिप्रत्यय असा अर्थ होतो.

३. कारण सौ असें सप्तमीचें एकवचन सि आणि सु या दोघांचेंही सारखेंच होतें.

पठति ।

**सिचश्चित्करणानर्थक्यं स्थानिवत्त्वात् ॥ १ ॥**

सिचश्चित्करणमनर्थकम् । किं कारणम् । स्थानिवत्त्वात् । चितोऽयमादेशः स्थानिवद्भावाच्चिद्भविष्यति ॥

**अर्थवत्तु चित्करणसामर्थ्याद्धीट उदात्तत्वम् ॥ २ ॥**

नैष दोषः । अर्थवत्तु सिचश्चित्करणम् । कोऽर्थः । चित्करणसामर्थ्याद्धीट उदात्तत्वं भविष्यति । नाप्राप्ते प्रत्ययस्वर आगमानुदात्तत्वमारभ्यते । तद्यथैव प्रत्ययस्वरं बाधत एवं स्थानिवद्भावादपि या प्राप्तिस्तामपि बाधेत ॥

**तस्माच्चित्करणम् ॥ ३ ॥**

तस्माच्चकारः कर्तव्यः ॥

अथेदित्करणं किमर्थम् ।

**इदित्करणं नकारलोपाभावार्थम् ॥४॥**

इदित्करणं क्रियते नकारलोपो मा भूदिति । अमंस्त अमंस्थाः । अनिदितां हल उपधायाः क्ङिति [६.४.२४] इति ॥

**न वा हन्तेः सिचः कित्करणं ज्ञापकं नकारलोपाभावस्य ॥ ५ ॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति । किं कारणम् ।

---

शकत नाहीं. कारण 'आगमाना अनुदात्तस्वर होतो' या वचनानें त्याला अनुदात्तस्वर प्राप्त होत आहे. यानंतर वार्तिककार म्हणतातः—

(वा.१) सिच्प्रत्ययामध्यें जो इत्संज्ञक चकार जोडला आहे तो निष्फळ आहे.

काय कारण ?

कारण असें की चकारेत्संज्ञक अशा च्लिप्रत्ययाचे स्थानीं हा आदेश होत आहे. तेव्हां स्थानिवद्भावानें सिच् हा चित् समजला जाईल.

(वा.२) सिच्प्रत्ययाचा चकार निष्फल आहे, हा दोष येत नाहीं. कारण त्या चित्करणाचा उपयोग आहे.

तो उपयोग कोणता ?

सिच्प्रत्ययांतील चित्करणाच्या जोरावर इडागमाला उदात्तस्वर होईल. कारण प्रत्ययस्वर नाप्राप्त असतां 'आगमा अनुदात्ताः' हें वचन आरंभिलें आहे. तेव्हां तें जसें प्रत्ययस्वराचा बाध करतें तसें स्थानिवद्भावानें आलेल्या उदात्तस्वराचाही बाध करील.

(वा.३) तेव्हां आगमाला प्राप्त झालेल्या अनुदात्तस्वराचा बाध करून इडागमाला उदात्तस्वर होण्यासाठीं सिच्प्रत्ययामध्यें चकार जोडला पाहिजे.[4]

आतां सिच्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक इकार कशाकरितां जोडला आहे ?

(वा.४) अमंस्त, अमंस्थाः,[5] येथें 'अनिदितां हलः' (६।४।२४) यानें नकाराचा लोप प्राप्त होतो तो नकारलोप न व्हावा यासाठीं सिच्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक इकार जोडला आहे.

(वा.५) सिच्प्रत्ययांत इत्संज्ञक इकार जोडण्याचें हें फल होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की ज्यापेक्षां हा आचार्य 'हनः सिच्' (१।२।१४) या सूत्रानें हन्धातूपुढील सिच्प्रत्ययाला कित्त्वाचें अनुशासन करीत[6] आहे त्यापेक्षां 'सिच्प्रत्ययान्ताच्या उपधा-

---

४. तेव्हां इडागमाला उदात्त होण्याकरितां सिचप्रत्ययाला चकार जोडला पाहिजे असें सिद्ध झालें.

५. मन्धातूहून लङ्, त्याचे स्थानीं त किंवा थास् हा आदेश, मध्यें च्लिप्रत्यय, त्याचे स्थानीं सिच्. अडागम झाला आहे.

६. आहत या क्रियापदामध्यें हन्धातूहून लुङ्, आत्मनेपद (१।३।२८), प्रथमपुरुषी एकवचनी तप्रत्यय, मध्यें च्लिप्रत्यय, त्याला सिजादेश झाला आहे. तो सिच् कित् समजला म्हणून 'अनुदात्तोपदेश०' (६।४।३७) यानें नकाराचा लोप होतो. जर तप्रत्ययाच्या निमित्तानें आहन्स् या अंगांतील उपधानकाराचा लोप झाला तरी रूप साधत असल्यामुळें 'हनः सिच्' हें सूत्र व्यर्थ होतें.

यदयं हनः सिच् [१.२.१४] इति हन्तेः सिचः कित्त्वं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न सिजन्तस्य नकारलोपो भवतीति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । सिच्येव नलोपो यथा स्यात्परस्मिन्निमित्ते मा भूदिति । कः पुनरत्र विशेषः सिचि वा नलोपे सति परस्मिन्वा निमित्ते । अयमस्ति विशेषः । सिचि नलोपे सति नलोपस्यासिद्धत्वादकारलोपो न भवति । परस्मिन्पुनर्निमित्ते नलोपे सत्यकारलोपः प्राप्नोति । समानाश्रयमसिद्धं व्याश्रयं चेदम् ॥ ननु च परस्मिन्नपि निमित्ते नलोपे सत्यकारलोपो न भवति । कथम् । असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इति । तदेतद्धन्तेः सिचः कित्करणं ज्ञापकमेव न सिजन्तस्य नलोपो भवतीति ॥

## इदित्त्वाद्वा स्थानिवत्त्वात् ॥ ६ ॥

अथाप्यनेनेदितार्थः स्यादिदितोऽयमादेशः स्थानिवद्भावादिदिद्भविष्यति ॥

नकाराचा लोप होत नाहीं', असें सुचवीत आहे.

हें ज्ञापक होऊं शकत नाहीं. कारण हन्‌धातूपुढील सिच्प्रत्ययाला कित्त्व सांगण्याचा निराळाच उपयोग आहे.

तो कोणता ?

आहत येथें सिच्प्रत्ययामुळेंच 'अनुदात्तोपदेश०' (६।४।३७) यानें नकाराचा लोप व्हावा आणि सिच्प्रत्यया पुढील तप्रत्ययाच्या निमित्तानें 'अनिदितां०' (६।४।२४) यानें नकाराचा लोप न व्हावा हा उपयोग होय.

पण सिच्प्रत्यय निमित्त धरून नकाराचा लोप झाला काय आणि तप्रत्यय निमित्त धरून नकाराचा लोप झाला काय, यांत काय बरें फरक आहे ?

यांत असा फरक आहे की सिच्प्रत्यय निमित्त धरून नकाराचा लोप केला असतां तो नलोप 'असिद्धवदत्राऽऽभात्' (६।४।२२) यानें असिद्ध असल्यामुळें 'अतो लोपः' (६।४।४८) यानें सिचाच्या मागील अकाराचा लोप होत नाहीं. आणि सिच्प्रत्ययापुढील तप्रत्यय निमित्त धरून नकाराचा लोप केला असतां अकाराचा लोप होऊं लागेल. कारण 'आभीय शास्त्र कर्तव्य असतांना समानाश्रय असें जें पूर्वी झालेलें आभीय शास्त्र तेंच असिद्ध होतें' असें सांगितलें आहे. अर्थात् त्या दोन्ही शास्त्राचें भिन्न निमित्त असेल तर तें झालेलें शास्त्र सिद्धच समजलें जाणार आहे. आणि प्रकृत स्थलीं 'अनिदिताम्०' यानें नकाराचा लोप केला तर त्या शास्त्राचें निमित्त अतो लोपः याच्या निमित्तापेक्षां निराळें आहे.

पण सिच्प्रत्ययाच्या पुढील तप्रत्यय निमित्त धरून नकाराचा लोप केला तरी देखील अतोलोप होत नाहीं.

तो लोप कां बरें होत नाहीं ?

अंतरंग अतोलोप कर्तव्य असताना बहिरंग असा झालेला नकारलोप असिद्ध आहे.

तेव्हां हन्‌धातूपुढील सिच्प्रत्ययाला सांगितलेलें कित्त्व 'सिच्प्रत्ययान्ताच्या उपधानकाराचा लोप होत नाहीं' याविषयीं ज्ञापक होणारच आहे.

(वा.६) आतां सिच्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक इकार जोडण्यांत कांहीं उपयोग आहे, असें गृहीत धरलें तरी देखील सिच्प्रत्ययांतील इकार नकोच आहे. कारण श्लिप्रत्ययामध्यें इकार इत्संज्ञक आहे. तेव्हां त्याचे स्थानीं असा त्याचा अर्थ आहे. त्यामुळेंही येथें लोप होणार नाहीं.

७. कारण नलोपाचें निमित्त तप्रत्यय आणि अतो लोपः याचें निमित्त सिच्.

८. शिवाय आर्धधातुक प्रत्ययाच्या उपदेशकालीं जेथें अकारान्त असेल तेथेंच अकाराचा लोप होतो

९. तात्पर्य, सिच्प्रत्ययांतील इकाराचा कांहीं उपयोग होत नाहीं असें सिद्ध झालें.

**स्पृशमृशकृषतृपदृपः सिज्वा ॥ ७ ॥**

स्पृशमृशकृषतृपदृपः सिज्वेति वक्तव्यम्॥ स्पृश । अस्पृक्षत् अस्प्राक्षीत् । स्पृश ॥ मृश । अमृक्षत् अम्राक्षीत् । मृश ॥ कृष । अकृक्षत् अक्राक्षीत् । कृष ॥ तृप । अतृपत् अत्राप्सीत् । तृप ॥ दृप । अदृपत् अद्राप्सीत् ॥ किं प्रयोजनम् । सिज्यथा स्यात् । अथ क्सः सिद्धः । सिद्धः शल इगुपधादनिटः [३.१.४५] इति ॥

सिजपि सिद्धः । कथम् । च्लेश्चित्करणं प्रत्याख्यायते तत्र च्लावेव झलक्षणेऽमागमे कृते विहतनिमित्तत्वात्क्सो न भविष्यति ॥ यद्येवमन्त्यस्य सिजादयः प्राप्नुवन्ति ।

सिद्धं तु सिचो यादित्वात् ॥ सिद्धमेतत् । कथम् । यादिः सिच्करिष्यते सोऽनेकाल्शित्सर्वस्य [१.१.५५] इति सर्वादेशो भविष्यति । किं न श्रूयते यकारः । लुप्तनिर्दिष्टो यकारः ॥ चङ्क्सोः कथम् ।

---

होणारा हा सिजादेश स्थानिवद्भावानें (१।१।५६) इकारेत्संज्ञक समजला जाईलच.

(वा.७) स्पृश्, मृश्, कृष्, तृप्, दृप्, या धातूंच्या पुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं सिजादेश विकल्पानें होतो असें वचन करावें; जसें:— अस्पृक्षत् अस्प्राक्षीत्, अमृक्षत् अम्राक्षीत्, अकृक्षत् अक्राक्षीत्, अतृपत् अत्राप्सीत्, अदृपत् अद्राप्सीत्.

पण हें वचन करण्याचें काय बरें प्रयोजन[10] ?

एकदा सिच् झाला पाहिजे हें प्रयोजन होय.

पण एकदा क्सादेश होऊं शकतो काय ?

होय; होऊं शकतो.

तो कसा ?

'शल इगुपधादनिटः क्सः' (३।१।३५) या सूत्रानेंच सिद्ध होतो.

तर मग या वचनावांचून सिचूही एकदा सिद्ध होतो.

तो कसा ?

असा की च्लिप्रत्ययांतील चकाराला इत्संज्ञा करण्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. तेव्हां तो चकार श्रवणार्थच होत असल्यामुळें च्लि हा प्रत्यय झलादि होतो. म्हणून त्या निमित्तानें 'अनुदात्तस्य चर्दुपधस्या०' (६।१।५९) यानें अमागम केला असतां उपधेला इक् राहत नसल्यामुळें क्सप्रत्ययाची प्राप्ति नाहीं. म्हणून सिच् होईल[11], आणि अमागमाच्या अभावपक्षीं क्स होईल.

पण जर च्लिप्रत्ययांतील चकार राहत असेल तर त्या सर्वांचे स्थानीं सिच् वगैरे आदेश न होतां अंत्य लकाराचे स्थानीं (१।१।५२) होऊं लागतील.

ही गोष्ट साधत आहे.

ती कशी ?

अशी की सिजादेश हा यकारादि म्ह. य्सिच् असा आहे. तेव्हां तो अनेकाल् असल्यामुळें सर्वादेश (१।१।५५) होईल.

जर सिच् हा प्रत्यय यकारादि आहे तर मग सूत्रामध्यें सिच्पदाच्या आरंभीं तो यकार कां बरें ऐकूं येत नाहीं ?

त्या यकाराचा 'लोपो व्योः' (६।१।६६) यानें लोप झाला आहे, सबब ऐकूं येत नाहीं[12].

चङ् आणि अङ् हे दोन आदेश अंत्याला कां बरें होत नाहींत ?

---

[10]. अस्पृक्षत्, अस्प्राक्षीत्, अशीं जीं स्पृश् वगैरे प्रत्येक धातूचीं दोन रूपें एकामध्यें क्स आणि एकामध्यें सिच् करून दाखविलीं त्यांपैकीं या वार्तिकानें कोणतें रूप साधतें, असा या प्रश्नाचा अभिप्राय आहे.

[11]. आणि अमागम विकल्पानें सांगितला असल्यामुळें एकदा अमागम केला नाहीं त्या वेळीं क्स होईल. तेव्हां वार्तिक नको असें सिद्ध झालें.

[12]. उदाहरणामध्येंही असाच सकाराचा लोप होतो असें समजावें.

चङङोः प्रश्लिष्टनिर्देशात्सिद्धम्॥ चङङोरपि प्रश्लिष्टनिर्देशोऽयम्। च अङ् चङ्। अ अङ् अङ्। सोऽनेकाल्शित्सर्वस्येति सर्वादेशो भविष्यति॥ चिणः कथम्।

चिणोऽनित्त्वात्॥ चिणोऽनित्त्वात्सिद्धम्। किमिदमनित्त्वादिति। अन्त्यस्यायं स्थाने भवन्न प्रत्ययः स्यात्। असत्यां प्रत्ययसंज्ञायामित्संज्ञा न। असत्यामित्संज्ञायां लोपो न। असति लोपेऽनेकाल्। यदानेकाल्तदा सर्वादेशः। यदा सर्वादेशस्तदा प्रत्ययः। यदा प्रत्ययस्तदेत्संज्ञा। यदेत्संज्ञा तदा लोपः॥

एवं च तत्र वार्तिककारस्य निर्णयः सप्रयोजनं चित्करणमिति। अपि च त्रैशब्द्यं न प्रकल्पते। अस्पृक्षत् अस्प्राक्षीत्। अस्पार्क्षीदिति न सिध्यति। सिचि पुनः

---

चङ् आणि अङ् हेही सर्वादेश होतील. कारण चङ् आणि अङ् या शब्दांचा प्रश्लेषानें निर्देश केला आहे. तो असाः—च-अङ् आणि अ-अङ् येथें संधि करून चङ्, अङ्, असे शब्द उच्चारले आहेत[13]. तेव्हां चङ् आणि अङ् हे आदेश वस्तुतः अ- अ असे दोन वर्णांचे असल्यामुळें 'अनेकाल्०' (१।१।५५) या परिभाषेनें सर्व च्लिप्रत्ययाचे स्थानीं होतील.

तरी पण चिण् हा आदेश सर्व च्लिप्रत्ययाचे स्थानीं कसा होतो ?

चिण् हा आदेश करतांना त्यांतील चकाराला इत्संज्ञा होत नसल्यामुळें चिण् हा सर्वादेश होईल.

इत्संज्ञा होत नाहीं असें कसें बरें म्हणतां येतें ?

च्लिप्रत्ययांतील शेवटच्या लकाराचे स्थानीं चिणादेश झाला तर त्याला प्रत्ययसंज्ञा होत नाहीं. प्रत्ययसंज्ञा नसल्यामुळें चकाराला इत्संज्ञा (१।३।७) होणार नाहीं. इत्संज्ञा न झाल्यामुळें त्याचा लोप (१।३।९) होणार नाहीं. आणि लोप न झाल्यामुळें चिणादेश अनेकाल् आहेच. आतां अनेकाल् समजून सर्वादेश होईल. सर्वादेश झाला असतां त्याला प्रत्ययसंज्ञा होईल. प्रत्ययसंज्ञा झाल्यानंतर इत्संज्ञा होईल. इत्संज्ञा झाल्यानंतर लोप होईल[14].

परंतु पूर्वसूत्रामध्यें वार्तिककारांचा (वा.४) निर्णय असा आहे की त्या च्लिप्रत्ययाच्या चकाराला इत्संज्ञेचा उपयोग आहे. तेव्हां स्पृशमृश० हें वार्तिक पाहिजे[15].

शिवाय अस्पृक्षत्, अस्प्राक्षीत्, हीं दोन रूपें साधलीं तरी अस्पार्क्षीत् हें तिसरें रूप साधत नाहीं[16]. आणि या वार्तिकानें सिजादेशाचें

---

१३. उदाहरणामध्येंही असाच संधि (६।१।९७) होऊन एक अकार होत आहे.

१४. तेव्हां मागून जरी चिण् हा एकाल् होत असला तरी आदेश करतांना अनेकाल् असल्यामुळें सर्वादेश सिद्ध होत आहे. तात्पर्य, च्लिप्रत्ययांतील चकाराला इत्संज्ञा नाहीं असें मानलें तरी दोष येत नसल्यामुळें तो च्लिप्रत्यय झलादि म्हणून अमागम (६।१।५९) विकल्पानें होऊन अस्पृक्षत् व अस्प्राक्षीत् हीं दोन रूपें सिद्ध होतील. 'तेव्हां स्पृशमृश०' हें वार्तिक नको असें होतें.

१५. तेव्हां च्लिप्रत्यय झलादि नसल्यामुळें अमागम होणार नाहीं आणि सिच्प्रत्ययाचा बाध करून नित्य क्सप्रत्यय होईल; म्हणून सिच् विकल्पानें सांगण्याकरितां 'स्पृशमृश०' हें वार्तिक पाहिजे.

१६. च्लिप्रत्ययांतील चकाराला इत्संज्ञा होत नाहीं असें गृहीत धरलें असतां च्लिप्रत्यय झलादि समजून अमागम होईल आणि त्यामुळें इगुपध हें क्सप्रत्ययाचें निमित्त नष्ट होत असल्यामुळें क्सप्रत्यय न होतां सिच्प्रत्यय होऊन अस्प्राक्षीत् हें उदाहरण साधतें. त्या अमागमाचा विकल्प असल्यामुळें त्याच्या अभावपक्षीं क्सादेश झाला असतां अस्पृक्षत् हेंहीं उदाहरण साधतें, पण अस्पार्क्षीत् हें तिसरें उदाहरण साधत नाहीं.

सति बिभाषा सिच् । सिच्यपि झलक्षणोऽमागमो विभाषा ॥ यस्य खल्वप्यमा निमित्तं न विहन्यते स स्यादेव ॥ तस्मात्सुष्ठूच्यते स्पृशमृशकृषतृपदृपः सिज्वेति ॥

## शल इगुपधादनिटः क्सः ॥ ३ । १ । ४५ ॥

### क्सविधान इगुपधाभावश्च्लेर्गुणनिमित्तत्वात् ॥ १ ॥

क्सविधान इगुपधस्याभावः । किं कारणम् । च्लेर्गुणनिमित्तत्वात् । च्लिर्गुणनिमित्तं तत्र च्लावेव गुणे कृत इगुपधादिति क्सो न प्राप्नोति ॥

### न वा क्सस्यानवकाशत्वादपवादो गुणस्य ॥ २ ॥

न वैष दोषः । किं कारणम् । क्सस्यानवकाशत्वात् । अनवकाशः क्सो गुणं बाधिष्यते ॥

### अनिड्वचनमविशेषणं च्लेर्नित्यादिष्टत्वात् ॥ ३ ॥

अनिड्वचनमविशेषणम् । किं कारणम् । च्लेर्नित्यादिष्टत्वात् । नित्यादिष्टश्च्लिर्न कचिच्छ्रूयते तत्र च्लेरनिट इति क्सो न प्राप्नोति ॥

### न वा क्सस्य सिजपवादत्वात्तस्य चानिडाश्रयत्वादनिटि प्रसिद्धे क्सविधिः ॥ ४ ॥

न वैष दोषः । किं कारणम् । क्सस्य सिजपवादत्वात् । सिजपवादः क्सः स

---

विधान केलें असतां तो सिच् विकल्पानें होत आहे. आणि सिच् केला त्या वेळींही तो सिच् झलादि असल्यामुळें त्याच्या निमित्तानें अमागम विकल्पानें होत आहे. आणि त्या सिजादेशाचा विकल्प असल्यामुळें त्याच्या अभावपक्षीं क्सप्रत्ययाचें निमित्त इगुपध हें नष्ट होत नसल्यामुळें तो होणारच. तात्पर्य, स्पृशमृशकृष० हें पाक्षिक सिजादेशविधानासाठीं वार्तिक केलें तें बरोबर आहे.

(सू.४५, वा.१) हा क्सप्रत्यय कर्तव्य असतांना धातूच्या उपधेला इक् नसल्यामुळें क्सप्रत्यय होणार नाहीं.

(वा.२) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

च्लिप्रत्ययाच्या निमित्तानें लघूपधगुण पूर्वी केला असतां क्सादेश निरवकाश होत असल्यामुळें तो गुणाचा बाध करून पूर्वी होईल.

(वा.३) अनिटः असें जें च्लिप्रत्ययाला विशेषण दिलें आहे तें लागू पडत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की च्लिप्रत्यय केला की लगेंच त्याला सिजादेश सर्व ठिकाणीं कायमचाच होत असल्यामुळें त्याचें कोठेंही श्रवण होत नाहीं. तेव्हां इडागम न झालेला असा च्लिप्रत्यय केव्हांच पाहतां येत नसल्यामुळें[2] त्या च्लिप्रत्ययाला क्सादेश प्राप्त होऊं शकत नाहीं.

(वा.४) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की सिजादेशाचा अपवाद क्सादेश आहे व त्या अपवादाकरितांच च्लिप्रत्यय अनिट् आहे कीं नाहीं तें पहावयाचें आहे आणि अपवादाच्या विषयामध्यें तर उत्सर्ग प्रवृत्त होऊं शकत नाहीं. कारण

---

१. ज्याचा उपान्त्य वर्ण इक् असून अन्त्य वर्ण शल् आहे अशा धातूच्या पुढील इडागम न होणाऱ्या च्लिप्रत्ययाचे स्थानीं क्स असा आदेश होतो; उदा०—अलिक्षत्, अधुक्षत.

२. च्लि हा प्रत्यय येथें अनिट् आहे किंवा सेट् आहे हें ठरल्यानंतर क्सप्रत्यय होणार. परंतु च्लिप्रत्यय केल्याबरोबर अंतरंगत्वास्तव सिजादेश झाला म्हणजे च्लिप्रत्ययच नाहीं. मग तो सेट् आहे कीं अनिट् आहे हें पाहणें दूरच राहतें.

चानिडाश्रयः। न चापवादविषय उत्सर्गोऽभिनिविशते। पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः। प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते। तन्न तावदत्र कदाचित्सिज्भवत्यपवादं क्सं प्रतीक्षते। क्सस्य सिजपवादत्वात्तस्य चानिडाश्रयत्वादनिट्त्वं प्रसिद्धम्। अनिटि प्रसिद्धे क्सविधिः। अनिटि प्रसिद्धे क्सो भविष्यति॥ सिजिदानीं क्व भविष्यति।

## शेषे सिज्विधानम्॥ ५॥

शेषे सिज्विधानं भविष्यति। अकोषीत् अमोषीदिति॥

## श्लिष आलिङ्गने॥ ३। १। ४६॥

किमर्थमिदमुच्यते। नियमार्थम्। श्लिष आलिङ्गन एव क्सो यथा स्यात्। इह मा भूत्। उपाश्लिषज्जतु च काष्ठं च। समाश्लिषद्ब्राह्मणकुलमिति॥ अत उत्तरं पठति।

## श्लिष आलिङ्गने नियमानुपपत्तिर्विधेयभावात्॥ १॥

श्लिष आलिङ्गने नियमस्यानुपपत्तिः। किं कारणम्। विधेयभावात्। कैमर्थक्यान्नियमो भवति। विधेयं नास्तीति कृत्वा। इह चास्ति विधेयम्। किम्। पुषादिपाठादङ् प्राप्तस्तद्बाधनार्थः क्सो विधेयः। तत्रापूर्वो विधिरस्तु नियमो वेत्यपूर्व एव विधिः स्यान्न नियमः॥ किं च स्याद्यद्ययं नियमो न स्यात्। आत्मनेपदेष्वालिङ्गने चानालि-

---

'प्रथमतः अपवाद प्रवृत्त होतात, आणि मागून उत्सर्ग प्रवृत्त होतात.' तेव्हां अपवादाचा विषय वगळूनच उत्सर्ग प्रवृत्त होत असतो. म्हणून येथे सिजादेश केव्हाही पूर्वी प्रवृत्त होणार नाहीं, तर आपला अपवाद जो क्सादेश त्याची मार्गप्रतीक्षा करीत बसतो. तेव्हां क्सादेश सिजादेशाचा अपवाद असल्यामुळें आणि त्या अपवादाकरितांच अनिट् असा च्लिप्रत्यय येथें आहे कीं नाहीं तें पहावयाचें असल्यामुळ अनिट् च्लि प्रसिद्ध आहे. तेव्हा तो अनिट् च्लि प्रसिद्ध असल्यामुळें त्याला क्सादेश होईल.

तर मग आतां सिजादेश कोठें बरें होईल?

(वा.५) जेथें अनिट् च्लि पहावयास मिळत नसेल तेथें सिजादेश होईल; जसेः– अकोषीत्, अमोषीत्.

(सू.४६) हें सूत्र कशाकरितां केलें आहे?

नियमासाठीं हें सूत्र आरंभिलें आहे. म्हणजे आलिङ्गन हा अर्थ गम्यमान असेल तरच श्लिष्धातूहून क्सादेश व्हावा, इतर ठिकाणीं होऊं नये; जसेंः– उपाश्लिषज्जतुकाष्ठम्, समाश्लिषद् ब्राह्मणकुलम्. हें मनांत आणून वार्तिककार लिहितात—

(वा.१) आलिङ्गन अर्थ गम्यमान असतांनाच श्लिष्धातूहून क्स होतो असा जो नियम दाखविला तो जुळत नाहीं.

काय कारण?

कारण असें की शास्त्राला वैयर्थ्य येत असेल तर तेथें नियम होत असतो. तें वैयर्थ्य विधेय नसल्यामुळें येतें. आणि येथें तर विधेय आहे.

तें काय?

तें हें की पुषादिगणामध्यें श्लिष्धातूचा पाठ असल्यामुळें अङ् (३।१।५५) प्राप्त आहे. त्याच्या बाधासाठीं क्सप्रत्यय येथे सांगितला पाहिजे.

आतां अपूर्वविधि करावा, किंवा नियम करावा, असा विचार प्राप्त झाला असतां अपूर्वविधिच होईल; नियम होणार नाहीं.

पण जर हा नियम होणार नाहीं म्हणजे

---

१. श्लिष्धातूचा आलिंगन हाच अर्थ असतांना त्या पुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं क्सादेश होतो; उदा०–आश्लिक्षत् कन्याम्.

ङ्गने च क्सः प्रसज्येत। यथैव च क्सोऽङं बाधत एवं चिणमपि बाधेत। उपाश्लेषि कन्या देवदत्तेनेति ॥

## सिद्धं तु श्लिष आलिङ्गनेऽचिण्विषये ॥ २ ॥

सिद्धमेतत्। कथम्। श्लिष आलिङ्गनेऽचिण्विषये क्सो भवतीति वक्तव्यम् ॥

## अङ्विधाने च श्लिषोऽनालिङ्गने ॥३॥

अङ्विधाने च श्लिषोऽनालिङ्गन इति वक्तव्यम् ॥ सिध्यति। सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु। ननु चोक्तं श्लिष आलिङ्गने नियमानुपपत्तिर्विधेयभावादिति। नैष दोषः।

## योगविभागात्सिद्धम् ॥४॥

योगविभागः करिष्यते। श्लिषः। श्लिषः क्सो भवति। किमर्थमिदम्। पुषादिपाठादङ् प्राप्नोति तद्बाधनार्थम् ॥ तत आलिङ्गने। आलिङ्गने च श्लिषः क्सो भवति।

---

अपूर्वविधिच झाला तर काय होईल?

आत्मनेपदामध्यें आलिङ्गन अर्थ असतांना किंवा नसतांना दोन्ही ठिकाणीं श्लिष्धातूहून क्सप्रत्यय होऊं लागेल. शिवाय हा क्सादेश जसा पुषाद्यङाचा बाध करतो तसा उपाश्लेषि कन्या देवदत्तेन येथें चिणाचाही बाध करूं लागेल.

(वा.२) उपाश्लेषि हें साधेल.

तें कसें?

असें की चिण्प्रत्ययाचा विषय नसतांना आणि आलिङ्गन हा अर्थ गम्यमान असतांना श्लिष्धातूहून क्स होतो असें सूत्र करावें.[२]

(वा.३) आणि अङ्प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें आलिङ्गन अर्थ गम्यमान नसतांना श्लिष्धातूहून अङ् होतो असें वचन करावें.

अशा रीतीनें सर्व साधेल हें खरें, पण मूळ सूत्रांत बदल होतो ना?

तर मग मूळचें जसें सूत्र आहे तसेंच तें असूं दे.

पण पुषादिगणामध्यें श्लिष्धातूचा पाठ असल्यामुळें झालेल्या अङाच्या बाधासाठीं येथें क्सप्रत्ययाचें विधान होणार आहे, नियम होणार नाहीं, असा पूर्वी दोष दाखविला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण

(वा.४) योगविभाग करण्यांत येईल. तो असाः– 'श्लिषः' असें एक सूत्र होय.

श्लिष्धातूपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं क्सादेश होतो.

कशासाठीं हें क्सादेशाचें विधान केलें आहे?

पुषादिगणामध्यें श्लिष्धातूचा पाठ असल्यामुळें प्राप्त झालेल्या अङादेशाच्या बाधासाठीं क्सादेशाचें विधान केलें आहे. त्यानंतर 'आलिङ्गने' हें दुसरें सूत्र होय. आलिङ्गन हा अर्थ गम्यमान असतांना श्लिष्धातूपुढील अनिट् अशा च्लिप्रत्ययाचे स्थानीं क्सादेश होतो.

श्लिषः या सूत्रानें अङ्प्रत्ययाचा बाध करून क्सादेशाचें विधान केलें असतां पुनरपि हें क्सादेशाचें विधान कशाकरितां केलें जात आहे?

---

२. अङ्प्रकरणामध्यें श्लिषोऽनालिङ्गने असें म्हटलें असल्यामुळें आणि येथें अचिण्विषये असें म्हटल असल्यामुळे हें सूत्र नियमार्थ होतें. 'अङ् किंवा चिण्यांचा बाध होण्याकरितां विध्यर्थ होईल' अशी शंका राहत नाही. आलिंगन याच अर्थाला दाखविणाऱ्या श्लिष्धातूहून क्स होतो. तेव्हां समाश्लेषि येथें 'शल इगुपधात्०'यानें प्राप्त झालेल्या क्सचा अपवादास्तव बाध करून चिण् झाल्यामुळें हें रूप साधतें. अश्लिक्षत, कर्मणि लुङ्, प्रत्यासत्तौ श्लिषिः, असें असतां येथें नियमामुळें क्स होत नाहीं, सिच् होतो. क्स झाला असता तर अश्लिक्षन्त असें अन्तादेशघटित रूप झालें असतें.

इदमिदानीं किमर्थम्। नियमार्थम्। श्लिश आलिङ्गन एव। क्व मा भूत्। उपाश्लिषज्जतु च काष्ठं च। समाश्लिषद्ब्राह्मणकुलमिति ॥ यदप्युच्यते यथैव क्सोऽङं बाधत एवं चिणमपि बाधेतेति पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्ते नोत्तरानित्येवं क्सोऽङं बाधिष्यते चिणं न बाधिष्यते। अथवा तत्र वक्ष्यति चिण्ग्रहणस्य प्रयोजनं चिणेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति ॥

[ न दृशः[1] ॥ ३ । १ । ४७ ॥ ]

## णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ्[1] ॥ ३ । १ । ४८ ॥

णिश्रिद्रुस्रुषु कमेरुपसंख्यानम् ॥ १ ॥

णिश्रिद्रुस्रुषु कमेरुपसंख्यानं कर्तव्यम् ॥

नाकमिष्टसुखं यान्ति सुयुक्तैर्बडवारथैः।
अथ पत्काषिणो यान्ति येऽचीकमत-

---

क्सादेशाच्या नियमाकरितां केलें आहे. तो नियम असा:- श्लिष्धातूहून पुढील अनिट् अशा च्लिप्रत्ययाचे स्थानीं क्सादेश करणें झाल्यास आलिंगन हा अर्थ गम्यमान असेल तरच करावा, एरवीं करूं नये.

ह्या नियमानें कोठें बरें क्सादेश न झाला पाहिजे ?

उपाश्लिषज्जतु च काष्ठं च, समाश्लिषद्ब्राह्मणकुलम्, येथें.

आतां श्लिषः या सूत्रानें सांगितलेला क्सादेश जसा अङादेशाचा बाध करतो तसा तो चिणाचाही बाध करील असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तरः- 'पूर्वी पठित असलेले अपवाद हे आपल्यापुढील जवळच्याच विधीचा बाध करतात, त्याच्यापेक्षां दूर असलेल्या विधींचा बाध करीत नाहींत', या परिभाषेनें क्सादेश (३।१।४६) हा अङादेशाचाच (३।१।५५) बाध करील, व त्याच्यापुढील चिणादेशाचा (३।१।६५) बाध करणार नाहीं.

किंवा 'चिण् ते पदः' येथून चिण् या पदाची अनुवृत्ति येत असतां पुनः 'चिण्भावकर्मणोः' येथें केलेल्या चिण्ग्रहणाचा उपयोग असा की भावकर्मवाचक तशब्द पुढें असतां चिण्च व्हावा. त्यावांचून तेथें जें दुसरें कांहीं प्राप्त होत असेल तें न व्हावें, असें 'चिण्भावकर्मणोः' या सूत्रावर सांगणार आहे. तेव्हां क्सादेश चिणाचा बाध करणार नाहीं.

(सू.४८,वा.१) णि, श्रि, द्रु, स्रु, यांच्यामध्यें कम्धातूचें ग्रहण करावें; जसें:- अचकमत[2].

कम्धातूचें लुङामध्यें रूप कसें होतें, असें विचारलें असतां ज्या वैयाकरणांनीं 'अचकमत' असें उत्तर दिलें ते घोड्या जोडलेल्या अशा चांगल्या रथांत बसून यथेच्छ सुखानें स्वर्गाला जातात, आणि अचीकमत असें म्हणणारे पायीं जातात. आतां ज्यांनीं सूत्र न आठवल्यामुळें 'अकमिष्ट' असें उत्तर दिलें त्यांचें अकमिष्ट असेंच नांव पडलें. तेव्हां त्या अकमिष्टवैयाकरणांना मात्र घोड्या जोडलेल्या चांगल्या रथांतून मुळींच जातां येत नाहीं.

---

१. दृश्धातूपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं क्सादेश करूं नये. 'इरितो वा' यानें विकल्पानें अङ् सांगितला असल्यामुळें एकदा सिच् होतो; उदा०— अदर्शत्, अद्राक्षीत्.

१. णिप्रत्ययान्त आणि श्रि, द्रु, स्रु, या धातूंपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानी चङ् असा आदेश होतो, कर्तरिप्रयोगामध्यें लुङ्प्रत्यय पुढें असतांना; उदा०—अचीकरत्, अशिश्रियत्, अदुद्रुवत्, असुस्रुवत्.

२. कम्धातूहून सांगितलेला णिङ्प्रत्यय (३।१।३०) केला त्या वेळीं णिप्रत्ययान्त असल्यामुळें प्रकृत सूत्रानें चङ् होऊन सन्वद्भाव (७।४।९३) होऊन अचीकमत असें रूप होतें; तेव्हां तो णिङ् होत नाही (३।१।३१). तेव्हां या वार्तिकानें चङ् होऊन अचकमत असं रूप होतें.

भाषिण इति ॥

**कर्मकर्तरि च ॥ २ ॥**

कर्मकर्तरि चोपसंख्यानं कर्तव्यम् । कारयति कटं देवदत्तः । अचीकरत कटः स्वयमेव । उच्छ्रययति कटं देवदत्तः । उदशिश्रियत कटः स्वयमेव ॥

**न वा कर्मण्यविधानात्कर्तृत्वाच्च कर्मकर्तुः सिद्धम् ॥ ३ ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । कर्मण्यविधानात् । न हि कश्चित्कर्मणि विधीयते यश्चङं बाधेत । कर्तृत्वाच्च कर्मकर्तुः सिद्धम् । अस्ति च कर्मकर्तरि कर्तृत्वमिति कृत्वा चङ् भविष्यति । ननु चायं कर्मणि विधीयते चिण्भावकर्मणोः [३.१.६६] इति । प्रतिषिध्येते तत्र यक्चिणौ । यक्चिणोः प्रतिषेधे हेतुमण्णिश्रिब्रूञामुप-

---

(वा.२) कर्मच कर्ता केला असतांही ण्यन्त धातूपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं चङादेश होतो असें वचन करावें; जसें:– कारयति कटं देवदत्तः, अचीकरत कटः स्वयमेव; उच्छ्रयति कटं देवदत्तः, उदशिश्रियत कटः स्वयमेव.

(वा.३) कर्मकर्तरि चङ् होण्यासाठीं वचन करावयास नको. कारण कर्त्याला कर्मवद्भाव (३।१।८७) सांगितला असला तरी तेथें चङ्-प्रत्ययाचा बाध करणारा कोणीच सांगितला नाहीं. आणि जरी तो लुङ् कर्मकर्ता या अर्थाला दाखवितो तरी तो कर्ता या अर्थाला दाखवीत आहेच. म्हणून कर्त्रर्थक लुङ् पुढें असतांना सांगितलेला चङादेश कर्मकर्तरिही सिद्ध होतो.

पण कर्मार्थक लुङामध्यें 'चिण्भावकर्मणोः' (३।१।६६) यानें चिण् सांगितला आहे ना ? अर्थात् तो चङादेशाचा बाध करील.

हेतुमणिप्रत्ययान्त श्रि आणि ब्रूञ् या

---

३. फल आणि त्या फलाला उत्पन्न करणारा व्यापार असा अर्थ प्रत्येक धातूचा असतो; उदा०– पच्धातूचा अर्थ विक्लित्त्यनुकूल व्यापार असा आहे. विक्लित्ति म्हणजे शिजणें हें व्यापाराचें फल होय. तें कर्मावर म्ह. येथें तडुलावर आहे. चूल पेटवणें, लाकडें सारणें, भांडें ठेवणें, पाणी घालणें, तांदूळ वैरणें, पळी फिरविणें, भांडें उतरणें, हा सर्व व्यापार देवदत्ताश्रित आहे. पेट घेणें हा व्यापार लाकडें या करणावर आहे. तांदूळ धारण करणें हा व्यापार भांडें या अधिकरणावर आहे. शिजाळूपणा म्ह. शिजण्याची शक्ति हा व्यापार तांदूळ या कर्मावर आहे.त्यावर फल आहेच.आतां या व्यापारांपैकीं ज्यावरील व्यापार म्हणून प्रयोग करणाऱ्यानें पच्धातूचा अर्थ मनांत धरला असेल तो त्या प्रयोगामध्यें कर्ता असतो; जसें:-देवदत्तः तण्डुलं पचति, काष्ठानि तण्डुलं पचन्ति,स्थाली तण्डुलं पचति, तण्डुलः पच्यते. कर्मावरील हा व्यापार धातूचा अर्थ घेतला तर धातु अकर्मक होतो. यालाच कर्मकर्तरिप्रयोग म्हणतात. असे प्रयोग करण्यांत प्रयोग करणाराचा असा हेतु असतो की जेव्हां हीं लाकडें दमाने जळणारीं अशीं चांगलीं आहेत की एकदा चुलीला लाविलीं म्हणजे पुढें कांहीं पहावयास नको, थोड्या वेळानें भाताचें भांडें खालीं उतरावें, अशा रीतीनें लाकडांचा चांगलेपणा दाखवावयाचा असतो तेव्हां काष्ठानि तण्डुलं पचन्ति असा प्रयोग होतो. तसेंच हें भांडें असें कांहीं बेताचें आहे की एकदा त्यांत तांदूळ वैरले की पुढें कांही पाहावयास नको, थोड्या वेळानें भाताचें भांडें खालीं उतरावें, अशा रीतीनें भांड्याचा चांगलेपणा दाखवावयाचा असतो तेव्हां स्थाली तण्डुलं पचति असा प्रयोग होतो. तसेंच हे तांदूळ असे कांहीं उत्तम शिजाळू आहेत की एकदा वैरले की पुढें कांहीं पहावें लागत नाहीं, असा तांदुळाचा चांगलेपणा दाखवावयाचा असेल तेव्हां तण्डुलः पच्यते असा प्रयोग होतो. तांदूळ शिजतो असे लोकांमध्यें म्हणतातच. कसाही प्रयोग केला तरी इतर सर्व साधनें लागणारच; पण तीं फक्त नांवाला आहेत असें प्रयोग करणाऱ्याचें मनांत दाखवावयाचें असतें. देवदत्तः भृत्यं कटं कारयति' म्ह. देवदत्त हा चाकराकडून कट तयार करवितो, असा मूळ प्रयोग आहे. त्यांत देवदत्त आणि भृत्य या दोघांचीही अविवक्षा करून अचीकरत कटः स्वयमेव, म्ह. कट हा स्वतःच तयार होतो, असा

संख्यानमिति ॥ यस्तर्ह्यहेतुमण्णिच् । उद्पुपुच्छत गौः स्वयमेव । अत्रापि यथा भारद्वाजीयाः पठन्ति तथा भवितव्यं प्रतिषेधेन। यक्चिणोः प्रतिषेधे णिश्रन्थिग्रन्थिब्रूञात्मनेपदाकर्मकाणामुपसंख्यानमिति ॥

[विभाषा धेट्श्व्योः ॥३।१।४९॥

गुपेश्छन्दसि ॥ ३ । १ । ५० ॥

नोनयतिध्वनयत्येलयत्यर्दयतिभ्यः ॥ ३ । १ । ५१ ॥]

अस्यतिवक्तिख्यातिभ्योऽङ्

॥ ३ । १ । ५२ ॥

अस्यतिग्रहणं किमर्थम् ।

अस्यतिग्रहणमात्मनेपदार्थम् ॥ १ ॥

अस्यतिग्रहणमात्मनेपदार्थं द्रष्टव्यम् । किमुच्यत आत्मनेपदार्थमिति न पुनः परस्मैपदार्थमपि स्यात् । पुषादित्वात् । पुषादिपाठात्परस्मैपदेष्वङ् भविष्यति ॥

कर्मकर्तरि च ॥ २ ॥

कर्मकर्तरि चोपसंख्यानं कर्तव्यम् । पर्यास्थेतां कुण्डले स्वयमेव ॥ अत्रापि न

---

धातूंच्या कर्मकर्तरि प्रयोगामध्यें यक् व चिण् होत नाहींत (३।१।८९,वा.१), असा तेथें यक् आणि चिण् यांचा निषेध केला आहे.

तर मग जो हेतुमत् णिच् नव्हे तेथें म्हणजे उदपुपुच्छत गौः स्वयमेव या कर्मकर्तरि प्रयोगामध्यें चङादेशाचा चिणादेश बाध करील.

तेथेंही भारद्वाजवैयाकरणांनीं पठित असलेल्या वचनाला अनुसरून चिणादेशाचा निषेध होतच आहे. तें त्यांचें वचन असें आहेः– णिप्रत्ययान्त श्रन्थि, ग्रन्थि, ब्रू आणि आत्मनेपदी अकर्मक या धातूंच्या कर्मकर्तरि प्रयोगामध्यें यक् आणि चिण् होत नाहींत (३।१।८९, वा.१).

(सू.५२) येथें अस्धातूचें ग्रहण कशाकरितां केलें आहे ?

(वा.१) लुङाचे स्थानीं आत्मनेपद केलें असतां अङ् होण्यासाठीं अस्धातूचें ग्रहण केलें आहे.

पण आत्मनेपद पुढें असतांना असें हें काय म्हणतां ? परस्मैपद पुढें असतांना अङ् होण्यासाठीं अस्धातूचें ग्रहण करावयास नको काय ?

पुषादिगणामध्यें ह्या धातूचा पाठ असल्यामुळें परस्मैपद पुढें असतां अङ् (३।१।५५) होईल.

(वा.२) कर्मकर्तरि प्रयोगामध्यें अस्धातू-

---

त्याचा अर्थ आहे.

४. गौः उत्पुच्छयते, म्ह. गाय वर शेपूट करते, येथें णिङ्प्रत्यय (३।१।२०) झाला आहे. नंतर प्रयोजकाची विवक्षा केली, पण णिच्प्रत्यय (३।१।२६) मात्र केला नाहीं. तेव्हां देवदत्तः गाम् उत्पुच्छयते असा सकर्मक प्रयोग झाला. पुढें देवदत्ताची अविवक्षा करून गो हाच कर्ता समजून कर्मकर्तरि प्रयोग गौः उत्पुच्छयते, गौः उदपुपुच्छत, असा होतो.

१. (४९) धेट् पाने हा धाधातु आणि श्विधातु यांच्या पुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं विकल्पानें चङादेश होतो; उदा०–अदधत. चङ् होत नाहीं तेव्हां सिच् होतो, त्याचा विकल्पानें लुक् (२।४।७८) करून अधात् होतें. लुक् होत नाहीं तेव्हां इट् आणि सगागम (७।२।७३) होऊन अधासीत् होतें. श्विहून अशिश्वियत. चङ् होत नाहीं तेव्हां विकल्पानें अङ् होऊन (३।१।५८) अश्वत; अङ् होत नाहीं तेव्हां सिच् होऊन वृद्धि होत नाहीं म्हणून (७।२।५) अश्वयीत.

(५०) गुपधातूपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं चङादेश विकल्पानें होतो, वेदामध्यें; उदा०– गृहानजूगुपतम्.

(५१) ऊन, ध्वन, इल आणि अर्द या धातूंहून णिच्प्रत्यय करून त्याच्या पुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं चङादेश करूं नये, वेदामध्यें; उदा०–मा त्वा यतो जरितुः काममूनयीः.

१. दिवादिगणांतील अस्धातु, वच्धातु आणि ख्याधातु यांच्यापुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङादेश होतो, कर्तरिप्रयोगामध्यें; उदा०–पर्यास्थत.

वा कर्मण्यविधानात्कर्तृत्वाच्च कर्मकर्तुः सिद्धमित्येव ॥

[[1]लिपिसिचिह्वश्च ॥ ३ । १ । ५३ ॥
आत्मनेपदेष्वन्यतरस्याम् ॥ ३ । १ । ५४ ॥
पुषादिद्युताद्यॢदितः परस्मैपदेषु ॥ ३ । १ । ५५ ॥
सर्तिशास्त्यर्तिभ्यश्च ॥३।१।५६॥
इरितो वा ॥ ३ । १ । ५७ ॥]

[1]जॄस्तम्भुम्रुचुम्लुचुग्रुचुग्लुचुग्लुञ्चुश्विभ्यश्च ॥ ३ । १ । ५८ ॥

इदं ग्लुचिग्रहणं ग्लुञ्चिग्रहणं च क्रियते । अन्यतरच्छक्यमकर्तुम् । कथम् । यदि तावद्ग्लुचिग्रहणं क्रियते ग्लुञ्चिग्रहणं न करिष्यते । तेनैव सिद्धं न्यग्लुचत् न्यग्लोचीत् । इदमिदानीं ग्लुञ्चे रूपं न्यग्लुञ्चीत् ॥ अथ ग्लुञ्चिग्रहणं क्रियते ग्लुचिग्रहणं न करिष्यते । तेनैव सिद्धं न्यग्लुचत् न्यग्लुञ्चीत् । इदमिदानीं ग्लुचे रूपं न्यग्लोचीदिति ॥

[[1]कृमृदृरुहिभ्यश्छन्दसि ॥ ३ । १ । ५९ ॥]

[1]चिण् ते पदः ॥ ३ । १ । ६० ॥

अयं तशब्दोऽस्त्येवात्मनेपदमस्ति परस्मैपदमस्त्येकवचनमस्ति बहुवचनम् ।

---

पुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङादेश होतो, असें वचन करावें; जसें:- पर्यास्थेतां कुण्डले स्वयमेव. 'न वा कर्मण्यविधानात्कर्तृत्वाच्च कर्मकर्तुः सिद्धम्'(वा.३) असें जें पूर्वसूत्रामध्यें सांगितलें आहे तें सर्व येथेंही बोलतां येतेंच.

(सू.५८) येथें ग्लुचि आणि ग्लुञ्चि असे दोन धातु घातले आहेत त्यांपैकीं एक कोणता तरी धातु घालावयास नको. जर ग्लुञ्चिधातु घातला नाहीं व एक ग्लुचिधातुच घातला तर त्यानेंच न्यग्लुचत्, न्यग्लोचीत्, हीं दोन उदाहरणें साधतात, आणि तिसरें ग्लुञ्चिधातूचें न्यग्लुञ्चीत् हें साधेल. आता ग्लुचिधातु घातला नाहीं व एक ग्लुञ्चिधातुच घातला तर त्यानेंच न्यग्लुचत्, न्यग्लुञ्चीत्, हीं दोन उदाहरणें साधतात. आणि आतां ग्लुचिधातूचें न्यग्लोचीत् हें तिसरें उदाहरणही साधतें.

(सू.६०)हा तशब्द आत्मनेपदीं प्रथमपुरुषीं एकवचनी आहे. आणि परस्मैपदीं मध्यमपुरुषीं बहुवचनी (३।४।१०१) आहे. तेव्हां सूत्रांतील तशब्दानें कोणता तशब्द घ्यावयाचा ?

पदधातूच्या पुढें जो असूं शकतो तो

---

१. (५३,५४) लिप्, सिच् आणि ह्वेञ् या धातूंपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङादेश विकल्पेंकरून होतो, आत्मनेपद पुढें असतांना; उदा०—अलिपत अलिप्त, असिचत असिक्त, अह्वत अह्वास्त.

(५५) दिवादिगणांतील पुषधातूपासून पुढील धातु द्युत्धातू-(७४१)पासून कृपू-(७६२)पर्यंत धातु आणि लृकारेत्संज्ञक धातु यांच्यापुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङादेश होतो, परस्मैपद पुढें असतांना; उदा०—अपुषत्, अद्युतत्, अगमत्.

(५६) सृ, शासु आणि ऋ या धातूंपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङादेश होतो; उदा०- असरत्, अशिषत्, आरत्.

(५७) ज्या धातूंतील इर हा शब्द इत्संज्ञक आहे त्या धातूंपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङादेश जो होतो तो विकल्पानें होतो, परस्मैपद पुढें असतांना; उदा०—अभिदत्, अभैत्सीत्; भिदिर् असा मूळ धातु.

१. जॄ, स्तम्भु, म्रुचु, म्लुचु, ग्रुचु, ग्लुचु, ग्लुञ्चु आणि श्वि या धातूंपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङादेश विकल्पानें होतो; उदा० अजरत् अजारीत्.

१. कृ, मृ, दृ, आणि रुह् या धातूंपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं अङादेश होतो वेदामध्यें; जसें— इदं तेभ्योऽकरन्नमः.

१. पद्धातुपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं चिणादेश होतो, आत्मनेपदीं प्रथमपुरुषीं एकवचनी तशब्द पुढें असतांना; उदा०—उदपादि सस्यम्.

कस्येदं ग्रहणम् । यः पदेरस्ति । कश्च पदेरस्ति । पदिरयमात्मनेपदी ॥

[[1]दीपजनबुधपूरितायिप्यायिभ्योऽन्यतरस्याम् ॥ ३ । १ । ६१॥

अचः कर्मकर्तरि ॥ ३ । १ । ६२ ॥

दुहश्च ॥ ३। १ । ६३ ॥

न रुधः ॥ ३ । १ । ६४ ॥

तपोऽनुतापे च ॥ ३ । १ । ६५ ॥]

[1]चिण्भावकर्मणोः ॥ ३ । १ । ६६ ॥

चिणिति वर्तमाने पुनश्चिण्ग्रहणं किमर्थम् । नेत्येवं तदभूद्विध्यर्थमिदम् ॥ अथवा वेत्येवं तदभून्नित्यार्थमिदम् ॥ अथवा चिणिति वर्तमाने पुनश्चिण्ग्रहणस्यैतत्प्रयोजनं चिणेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा [2]भूदिति ॥

[1]सार्वधातुके यक् ॥ ३ । १ । ६७ ॥

इह पश्यामः कर्मणि द्विवचनबहुवचनान्युदाह्रियन्ते । पच्येते ओदनौ पच्यन्त

---

तशब्द येथें घ्यावयाचा.

पद्धातूपुढें कोणता वर्ण तशब्द असूं शकतो ?

पद्धातु हा आत्मनेपदी आहे.

(सू.६६) चिण्ते पदः (३।१।६०) या सूत्रांतून चिण् या पदाची अनुवृत्ति येत असतां पुनः येथें चिण् हें पद कशाकरितां घातलें आहे ?

तें चिण्पद 'न रुधः' (३।१।६४) येथें निषेधाशीं संबंध झालेलें आहे. म्हणून येथें विधानासाठीं पुनः चिण् हें पद घातलें आहे.

किंवा तें चिण्पद 'दीपजनबुध०' (३।१।६१) येथें विकल्पाशीं संबंध पावलेलें आहे. म्हणून येथें नित्य चिण् होण्याकरितां पुनः चिण्पद घातलें आहे.

अथवा चिण्पदाची अनुवृत्ति येत असतां पुनः येथें चिण्पद घातलें त्याचा उपयोग असा की भावे आणि कर्मणि या प्रयोगांमध्यें तशब्द पुढें असतां च्लिप्रत्ययाचे स्थानीं चिण्च व्हावा, तेथें दुसरें जें कांहीं प्राप्त होत असेल तें न व्हावें.

(सू.६७) कर्मणिप्रयोगामध्यें पच्येते ओदनौ, पच्यन्ते ओदनाः, अशीं द्विवचनी किंवा बहुवचनी उदाहरणें दिसतात; आणि भावे-

---

१. (६१) दीप्, जन्, बुध्, पुर, ताय् आणि प्याय् या धातूंपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं विकल्पानें चिणादेश होतो, आत्मनेपदी एकवचनी तशब्द पुढें असतांना; उदा०— अदीपि अदीपिष्ट, अजनि अजनिष्ट, अबोधि अबुद्ध, अपूरि अपूरिष्ट, अतायि अतायिष्ट, अप्यायि अप्यायिष्ट.

(६२) कर्मकर्तरिप्रयोगामध्यें अजन्त धातूपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं चिणादेश विकल्पानें होतो, तशब्द पुढें असतांना; उदा०— अकारि किंवा अकृत कटः स्वयमेव, अलावि किंवा अलविष्ट केदारः स्वयमेव.

(६३) कर्मकर्तरिप्रयोगामध्यें दुह्धातूपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं चिणादेश विकल्पानें होतो, तशब्द पुढें असतांना; उदा०-अदोहि किंवा अदुग्ध गौः स्वयमेव.

(६४) कर्मकर्तरिप्रयोगामध्यें रुध्धातूच्या पुढील च्लिप्रत्ययाचे स्थानी चिणादेश होत नाहीं, तशब्द पुढें असतांना; उदा०-अन्ववारुद्ध गौः स्वयमेव.

(६५) कर्मकर्तरि प्रयोगामध्यें किंवा अनुताप हा अर्थ गम्यमान असतांना तप्धातूपुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं चिणादेश करूं नये, तशब्द पुढें असतांना; उदा०-अतप्त.

१. भावेप्रयोगामध्यें किंवा कर्मणिप्रयोगामध्यें धातूच्या पुढील च्लिप्रत्ययाचे स्थानीं चिणादेश होतो, तशब्द पुढें असतांना; उदा०-अशायि भवता, अकारि कटो देवदत्तेन.

२. सूत्र ३।१।४६ वरील भाष्य (भाग १, पृ० १२१) पहा.

१. भावे व कर्मणि या प्रयोगांमध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूहून यक् असा मध्यें विकरणप्रत्यय होतो; उदा०-आस्यते भवता, गम्यते ग्रामः.

ओदना इति। भावे पुनरेकवचनमेव। आस्यते भवता आस्यते भवद्भ्याम् आस्यते भवद्भिरिति । केनैतदेवं भवति ॥ कर्मानेकं तस्यानेकत्वाद्द्विवचनबहुवचनानि भवन्ति। भावः पुनरेक एव ॥ कथं तर्हीह द्विवचनबहुवचनानि भवन्ति । पाकौ पाका इति । आश्रयभेदात् । यदसौ द्रव्यं श्रितो भवति भावस्तस्य भेदाद्द्विवचनबहुवचनानि भवन्ति । इहापि तर्हि यावन्तस्ते तां क्रियां कुर्वन्ति सर्वे ते तस्या आश्रया भवन्ति तद्भेदाद्द्विवचनबहुवचनानि प्राप्नुवन्ति ॥ एवं तर्हीदं तावदयं प्रष्टव्यः किमभिसमीक्ष्यैतत्प्रयुज्यते पाकौ पाका इति। यदि तावत्पाकविशेषानभिसमीक्ष्य यश्चौदनस्य पाको यश्च गुडस्य यश्च तिलानां बहवस्ते शब्दाः सरूपाश्च तत्र युक्तं बहुवचनमेकशेषश्च। तिङभिहिते चापि तदा भावे बहुवचनं श्रूयते । तद्यथा । उष्ट्रासिका आस्यन्ते । हतशायिकाः शय्यन्त इति ॥ अथ कालविशेषानभिसमीक्ष्य

प्रयोगामध्यें मात्र द्विवचन किंवा बहुवचन दिसत नाहीं; तर आस्यते भवता, आस्यते भवद्भ्याम्, आस्यते भवद्भिः, असें फक्त एकवचनच दिसतें; हें असें कशामुळें बरें होतें ?

कर्मे (ओदन वगैरे) हीं अनेक आहेत. तेव्हां त्या कर्मांच्या अनेकत्वामुळें कर्मणिप्रयोगामध्यें द्विवचनें किंवा बहुवचनें होतात, आणि भाव हा मात्र एकच आहे.

तर मग भावेप्रत्यय केला असतां पाकौ, पाकाः, येथें द्विवचनबहुवचनें कशीं बरें होतात ?

पाक हा भाव ज्या द्रव्यांचा आश्रय करतो त्या ओदन, गूळ, तीळ, वगैरे द्रव्यांच्या अनेकत्वामुळें तेथें द्विवचनबहुवचनें होतात.

तर मग आस्यते भवद्भ्याम्, आस्यते भवद्भिः, इत्यादि भावेप्रयोगांमध्येंही जितके ती क्रिया करीत आहेत ते सर्व त्या क्रियेचे आश्रय होत आहेत. तेव्हां त्या आश्रयांच्या भेदामुळें द्विवचनबहुवचनें प्राप्त होत आहेत.

तर मग आतां आम्ही तुला असें विचारतों की पाकौ, पाकाः, येथें द्विवचन आणि बहुवचन यांचा जो प्रयोग केला जातो तो मनामध्यें काय हेतु धरून केला जातो ? जर निरनिराळया तऱ्हेचे पाक म्हणजे ओदनाचा पाक, गुडाचा पाक आणि तिळांचा पाक असे विशेष प्रकारचे पाक मनांत धरले असतील तर त्या नाना तऱ्हेच्या अर्थांना दाखविणारे पाकशब्द बहुत असून सरूप असल्यामुळें तेथें एकशेष (१।२।६४) करून पुढें बहुवचन करून पाकाः असा प्रयोग करणें योग्यच आहे. तिङ्प्रत्ययानें दाखविलेले भाव तसे विशेष प्रकारचे असतील तर तेथेंही बहुवचन झालेलें दिसतें; जसें:– उष्ट्रासिका[२] आस्यन्ते, हतशायिकाः शय्यन्ते.

आतां भिन्न कालीं केलेले पाक म्हणजे

---

२. आस्यते बालकैः असा भावेप्रयोग होतो. तेथेंच त्या बालकांमध्यें एकाचें उपवेशन म्ह. बसणें दुसऱ्यासारखें नाहीं, जसें अनेक उंट निरनिराळया तऱ्हेनें बसतात त्याप्रमाणें त्या बालकांनीं निरनिराळया प्रकारचीं उपवेशनें आहेत, ह्या अर्थी बालकैः उष्ट्रासिकाः आस्यन्ते असा भावेप्रयोग बहुवचनी क्रियापदाचा होतो. आस्धातूपासून ण्वुल् (३।३।१०८ वा. १) केला म्हणजे त्याचें भाववाचक स्त्रीलिंगी नाम आसिका असें होतें. उष्ट्रासिकांचा उपमानोपमेयभावसंबंधानें आस्यन्ते यांतील आस्धातूच्या अर्थावर अन्वय आहे. 'उंटाप्रमाणें बालकांचीं अनेक प्रकारचीं उपवेशनें' असा अर्थ आहे. हतशायिकाः शय्यन्ते भूकम्पे नरैः येथेंही असेंच समजावें. मेलेले प्राणी जसें अस्ताव्यस्त पडलेले निजलेले असतात तसें भूकंप झाला असतां तेथील लोकांचीं वाटेल तशीं निजणीं असतात, असा त्याचा अर्थ आहे.

ाद्यतनः पाको यश्च ह्यस्तनो यश्च ानस्तेऽपि बह्वः शब्दाः सरूपाश्च युक्तं बहुवचनमेकशेषश्च । तिङभि- चापि तदा भावेऽसारूप्यादेकशेषो नवति। आसि आस्यते आसिष्यते ॥ त खल्वपि विशेषः कृदभिहितस्य ास्य तिङभिहितस्य च । कृदभिहितो ो द्रव्यवद्भवति । किमिदं द्रव्यव- ि । द्रव्यं क्रियया समवायं गच्छति। समवायम् । द्रव्यं क्रियाभिनिर्वृत्तौ ानत्वमुपैति। तद्वच्चास्य भावस्य कृद-भिहितस्य भवति । पाको वर्तत इति । क्रियावन्न भवति । किमिदं क्रियावदिति । क्रिया क्रियया समवायं न गच्छति । पचति पठतीति । तद्वच्चास्य कृदभिहितस्य न भवति । पाको वर्तत इति ॥ अस्ति खल्वपि विशेषः कृदभिहितस्य भावस्य तिङभिहितस्य च । तिङभिहितेन भावेन कालपुरुषोपग्रहा अभिव्यज्यन्ते कृदभिहि- तेन पुनर्न व्यज्यन्ते ॥ अस्ति खल्वपि विशेषः कृदभिहितस्य भावस्य तिङभिहि- तस्य च । तिङभिहितो भावः कर्त्रा सं-

---

ाचा पाक, कालचा पाक आणि उद्यांचा असे विशेष प्रकारचे पाक मनांत धरले तील तर त्या भिन्न भिन्न पाकांना दाख- ारे पाकशब्द बहुत असून सरूप अस- ुळें तेथें एकशेष करून पुढें बहुवचन न पाकाः असा प्रयोग करणें योग्यच होत . आतां त्या भिन्न भिन्न कालाच्या भावाला ाविणारीं तिङन्तें सरूप नसल्यामुळें एक- मात्र होत नाहीं; जसें, आसि[१], आस्यते, सेष्यते.

शिवाय तिङ्प्रत्ययानें दाखविलेला भाव गे कृत्प्रत्ययानें दाखविलेला भाव या यतांमध्यें फरकही आहे. तो फरक असाः— प्रत्ययानें दाखविलेल्या भावाचा घट- दि प्रसिद्ध द्रव्यांप्रमाणें बोध होतो.

द्रव्यासारखा म्हणजे काय ?

घटपटादि प्रसिद्ध द्रव्य हें क्रियेशीं संबंध तें.

तो संबंध कोणता ?

घटादि द्रव्य हें क्रियेच्या उत्पत्तीचें साधन ाजे कर्ता, कर्म, वगैरे होतें त्याप्रमाणें कृत्-प्रत्ययानें दाखविलेला भाव हा कर्ता, कर्म, वगैरे साधन होतो; जसें:— पाको वर्तते. कृत्प्रत्ययानें दाखविलेला भाव हा धातूनें दाखविलेल्या क्रियेसारखा असत नाहीं.

क्रियेसारखा असत नाहीं म्हणजे काय ?

क्रिया ही क्रियेशीं संबंध पावूं शकत नाहीं; जसें:— पचति, पठति. तसें कृत्प्रत्ययानें दाख- विलेल्या भावाला दुसऱ्या क्रियेचें कर्तृत्व येऊं शकत नाहीं असें नाहीं, तर कर्तृत्व येतेंच; जसें:— पाको वर्तते.

आणखीही कृत्प्रत्ययानें दाखविलेला भाव आणि तिङ्प्रत्ययानें दाखविलेला भाव या उभ- यतांमध्यें दुसरा फरक आहे, तो असा :— तिङ्- प्रत्ययानें दाखविलेल्या भावाचा भूत, भविष्य, वगैरे काल, प्रथम, मध्यम, वगैरे पुरुष आणि उपग्रह[४] हे व्यक्त होतात. आणि कृत्प्रत्ययानें दाखविलेल्या भावाचे हे व्यक्त होत नाहींत.

आणखीही तिङ्प्रत्ययानें दाखविलेला भाव व कृत्प्रत्ययानें दाखविलेला भाव यांमध्यें फरक आहे, तो असाः— तिङ्प्रत्ययानें दाखविलेल्या भावाशीं कर्त्याचा संबंध होतो, आणि कृत्प्रत्य-

---

१. आसि हें आस्धातूचें भूतकालीं भावे लुङ् प्रथमपुरुषी एकवचनी क्रियापद आहे. आस्यते हें ानकालीं लटाचें क्रियापद आहे, आणि आसि- हें भविष्यकालीं लटाचें क्रियापद आहे.

४. उपग्रह म्हणजे परस्मैपदी आणि आत्मनपदी प्रत्यय. त्यावरून क्रियेचें मुख्य फल कर्त्याला प्राप्त होणारें आहे किंवा दुसऱ्याला प्राप्त होणारें आहे हें व्यक्त होतें (१।३।७२).

प्रयुज्यते कृदभिहितः पुनर्न संप्रयुज्यते ॥ यावता किंचित्सामान्यं कश्चिच्च विशेषो युक्तं यदयमपि विशेषः स्याल्लिङ्गकृतः संख्याकृतश्चेति ॥

इदं विचार्यते भावकर्मकर्तारः सार्वधातुकार्था वा स्युर्विकरणार्था वेति । कथं च सार्वधातुकार्थाः स्युः कथं वा विकरणार्थाः । भावकर्मवाचिनि सार्वधातुके यग्भवति कर्तृवाचिनि सार्वधातुके शब्भवतीति सार्वधातुकार्थाः । भावकर्मणोर्यग्भवति सार्वधातुके कर्तरि शब्भवति सार्वधातुक इति विकरणार्थाः ॥ कश्चात्र विशेषः ।

**भावकर्मकर्तारः सार्वधातुकार्थाश्चेदेकद्विबहुषु नियमानुपपत्तिरतदर्थत्वात् ॥ १ ॥**

भावकर्मकर्तारः सार्वधातुकार्थाश्चेदेकद्विबहुषु नियमस्यानुपपत्तिः । किं कारणम् । अतदर्थत्वात् । न हि तदानीमेकत्वादय एव विभक्त्यर्थाः । किं तर्हि । भावकर्मकर्तारोऽपि ॥ सन्तु तर्हि विकरणार्थाः ।

---

यानें दाखविलेल्या भावाशीं कर्त्याचा संबंध होत नाहीं.

शिवाय काहीं सामान्य आणि त्यांत कांही विशेष अशी स्थिति सर्वत्रच असतें. तर मग येथेंही तिङ्प्रत्ययानें दाखविलेला भाव आणि कृत्प्रत्ययानें दाखविलेला भाव हे दोन्ही सामान्यतः भाव आहेत, तरी त्यामध्यें कृत्प्रत्ययानें दाखविलेल्या भावांशीं लिंगाचा आणि संख्येचा संबंध असणें हाही फरक योग्य आहे.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो की भाव, कर्म आणि कर्ता हे पुढील सार्वधातुक प्रत्ययांचे अर्थ आहेत किंवा मध्यें होणाऱ्या यक्, शप्, वगैरे विकरणांचे अर्थ आहेत?

कसें बरें ते सार्वधातुकाचे अर्थ होऊं शकतात आणि कसें ते विकरणांचे अर्थ होऊं शकतात?

भाव किंवा कर्म या अर्थाला दाखविणारा सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूहून यक् प्रत्यय होतो. तसेंच कर्ता या अर्थाला दाखविणारा सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूहून शप्प्रत्यय होतो. असा सार्वधातुके यक् या प्रकृत सूत्राचा आणि कर्तरि शप् या पुढील सूत्राचा अर्थ गृहीत धरला असतां भाव, कर्म आणि कर्ता हे सार्वधातुकाचे अर्थ ठरतात. आणि सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूहून भाव किंवा कर्म या अर्थी यक्प्रत्यय होतो. तसेंच सार्वधातुकप्रत्यय पुढें असतांना धातूहून कर्ता या अर्थी शप्प्रत्यय होतो, असा या दोन सूत्रांचा अर्थ गृहीत धरला असतां भाव, कर्म आणि कर्ता हे विकरणाचे अर्थ ठरतात.

या दोन पक्षांमध्यें फरक काय?

(वा.१) भाव, कर्म आणि कर्ता हे सार्वधातुकाचे अर्थ आहेत असें गृहीत धरले तर एकत्व या अर्थीच एकवचन होतें; द्वित्व या अर्थीच द्विवचन होतें; (१।४।२२) तसेंच बहुत्व या अर्थीच बहुवचन (१।४।२१) होतें; हे नियम जुळून येत नाहींत.

काय कारण?

कारण असें की या वेळीं एकत्व, द्वित्व आणि बहुत्व एवढेच अर्थ त्या एकवचन वगैरेंचे असत नाहींत, तर भाव, कर्म आणि कर्ता हेही त्यांचे अर्थ आहेत.[६]

तर मग भाव, कर्म आणि कर्ता हे विकरणांचे अर्थ आहेत हा पक्ष असूं दे.

---

५. देवदत्तस्य पाकः येथें देवदत्त या कर्त्याचा संबंध धात्वर्थक्रियेशीं झाला आहे, कृत्प्रत्ययार्थ जो भाव त्याच्याशीं नाहीं. भावेप्रयोगामध्यें तिङ्प्रत्ययापासून जी क्रियेची प्रतीति ती धातूपासून जशी क्रियेची प्रतीति होते तशीच होते.

६. आणि नियमाप्रमाणें तर एकत्व वगैरेच फक्त अर्थ त्या त्या प्रत्ययाचे असले पाहिजेत; कर्ता, कर्म, वगैरे दुसरा कोणताही अर्थ असतां कामा नये.

**विकरणार्था इति चेत्कृताभिहिते विकरणाभावः ॥ २ ॥**

विकरणार्था इति चेत्कृताभिहिते विकरणो न प्राप्नोति। धारयः पारय इति॥ किमुच्यते कृताभिहित इति न लेनाप्यभिधानं भवति। अशक्यं लेनाभिधानमाश्रयितुम्। पक्षान्तरमिदमास्थितं भावकर्मकर्तारः सार्वधातुकार्था वा स्युर्विकरणार्था वेति यदि च लेनाप्यभिधानं स्यान्नेदं पक्षान्तरं स्यात्। कथमशक्यं यदा भवानेवाह लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः [३.४.६९] इति। एवं वक्ष्यामि लः कर्मणो भावाच्चाकर्मकेभ्य इति। यस्मिंस्तर्हि ले विकरणा न श्रूयन्ते कस्तत्र भावकर्मकर्तॄनभिधास्यति। क्व च न श्रूयन्ते। य एते लुग्विकरणाः श्लुविकरणाश्च। अत्राप्युक्ते कर्तृत्वे लुग्भविष्यति। यस्मिंस्तर्हि ले विकरणा नैवोत्पद्यन्ते कस्तत्र भावकर्मकर्तॄनभिधास्यति। क्व च नैवोत्पद्यन्ते। लिङ्लिटोः। तस्मान्नेत-

---

(वा.२) भाव, कर्म आणि कर्ता हे विकरणांचे अर्थ होत असें गृहीत धरलें तर कृत्प्रत्ययानें कर्ता उक्त होत असेल तेथें विकरण होणार नाहीं; जसें:– धारयः, पारयः.

हा आक्षेप कृत्प्रत्यय स्थलींच घेण्यांत आला आहे हें काय ?

तेवढ्याच ठिकाणीं घेऊं नये. कारण क्रियापदांमध्येंही लकार हा कर्ता, कर्म वगैरे अर्थ दाखवीत आहेच.

लकार हा कर्ता, कर्म, वगैरे अर्थ दाखवितो असें आतां म्हणतांच येणार नाहीं. कारण भाव, कर्म, कर्ता, हे सार्वधातुक प्रत्ययांचे अर्थ आहेत किंवा विकरणप्रत्ययांचे अर्थ आहेत, ह्या दोन पक्षांपैकीं दुसरा पक्ष घेऊन बोलणें चालू झालें आहे. त्यांत जर कर्ता, कर्म, वगैरे अर्थ लकारानें उक्त होतात, असें म्हणाल तर हें मुळीं पक्षान्तरच होत नाहीं.

पण हें पक्षान्तर उभें करणें कसें बरें अशक्य आहे ?

ज्यापेक्षां 'लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः' म्ह. लकार हे कर्म किंवा कर्ता या अर्थी होतात असें तूंच आतां दाखविलें आहेस म्हणून अशक्य आहे.

'लः कर्मणि च भावे' येथें 'लः कर्मणो भावाच्चाकर्मकेभ्यः' असें म्हणून कर्म, कर्ता, वगैरे अर्थांचा जो विकरण त्याच्या पुढें लकार असतात, असा अर्थ समजतां येईल.

पण आतां ज्या क्रियापदामध्यें लकार पुढें असताना त्याच्या मागें विकरण दिसत नाहीं तेथें भाव, कर्म आणि कर्ता या अर्थांना कोण बरें दाखवील ?

कोठें बरें विकरण दिसत नाहींत ?

ज्यांच्या पुढील विकरणांचा (२।४।७२) लुक् किंवा श्लु (२।४।७५) होतो तेथें.

येथेंही कर्ता हा अर्थ दाखविल्यानंतर त्या विकरणाचा लुक् व श्लु होईल.

तर मग ज्या लकारामध्यें मुळीं विकरणप्रत्यय होतच नाहींत तेथें कोण बरें भाव, कर्म आणि कर्ता या अर्थांना दाखवील ?

कोठें बरें मुळीं विकरणप्रत्यय होतच नाहींत ?

आशीर्लिङ् आणि लिट् या लकारांमध्यें. तेव्हां लकारानें कर्ता वगैरे अर्थांचें अभिधान

---

७ धारि आणि पारि या णिप्रत्ययान्त धातूंना 'अनुपसर्गाल्लिम्प०' (३।१।१३८) यानें शप्रत्यय. तो कर्तरि कृत् (३।४।६७) यानें कर्ता या अर्थी केला आहे. मध्यें शप्, गुण, अयादेश होऊन धारयः, पारयः, अशीं रूपें होतात. येथें 'श' या कृत्प्रत्ययानें कर्ता हा अर्थ उक्त होत असल्यामुळें पुनः त्या अर्थी शप् हा विकरणप्रत्यय होणार नाहीं.

८. तेव्हां लकारानें कर्ता हा अर्थ उक्त होत असल्यामुळें पचति, पठति, येथें त्या अर्थी पुनः शप्प्रत्यय होणार नाहीं.

९. विकरण केल्यानंतर त्याचा लुक् झाला तरी त्याच्या अर्थाचा लोप झाला नसल्यामुळें कर्ता हा

च्छक्यं वक्तुं न लेनाप्यभिधानं भवतीति। भवति चेदभिहिते विकरणाभाव इत्येव॥ एवं तर्हीदं स्यात्। यदा भावकर्मणोर्लस्तदा कर्तरि विकरणा यदा कर्तरि लस्तदा भावकर्मणोर्विकरणाः॥ इदमस्य यद्येव स्वाभाविकमथापि वाचानिकं प्रकृतिप्रत्ययौ प्रत्ययार्थं सह ब्रूत इति न चास्ति संभवो यदेकस्याः प्रकृतेर्द्वयोर्नानार्थयोर्युगपदनुसहायीभावः स्यात्। एवं च कृत्वैकपक्षीभूतमेवेदं भवति सार्वधातुकार्था एवेति॥ ननु चोक्तं भावकर्मकर्तारः सार्वधातुकार्थाश्चेदेकद्विबहुषु नियमानुपपत्तिरतदर्थत्वादिति। नैष दोषः।

**सुपां कर्मादयोऽप्यर्थाः संख्या चैव तथा तिङाम्।**

सुपां तिङां च संख्या चैवार्थः कर्मादयश्च॥

**प्रसिद्धो नियमस्तत्र**

प्रसिद्धस्तत्र नियमः।

**नियमः प्रकृतेषु वा॥**

अथवा प्रकृतानर्थानपेक्ष्य नियमः के च प्रकृताः। एकत्वादयः। एकस्मि-

---

होत नाहीं असें म्हणणें अशक्य आहे.

आणि जर लकारानें कर्ता वगैरे अर्थांचें अभिधान होतें तर लकारानें अभिहित झालेल्या कर्ता या अर्थी विकरण प्राप्त होऊं शकत नाहीं, हा दोष कायम आहेच.

असें आहे तर जेव्हां भाव किंवा कर्म या अर्थी लकार करण्यांत येईल तेव्हां कर्ता या अर्थी विकरण करावेत, आणि जेव्हां कर्ता या अर्थी लकार करण्यांत येईल तेव्हां भाव किंवा कर्म या अर्थी विकरण समजावेत.[10]

आतां 'प्रकृति आणि प्रत्यय हे दोन्ही मिळून कांहीं विशेष अर्थ दाखवितात,' ही गोष्ट स्वाभाविक असो किंवा शास्त्रसिद्ध असो. पण प्रत्यय जर भिन्न भिन्न अर्थांचे दोन असतील तर तेथें एकाच प्रकृतीला त्या दोन्ही प्रत्ययांना मिळून एक विशेष अर्थ कसा बरें दाखविता येईल? अर्थात् तसा संभव नाहीं. तेव्हां भाव, कर्म आणि कर्ता हे सार्वधातुकाचेच अर्थ होत असा एकच पक्ष ठरतो.

पण भाव, कर्म आणि कर्ता हे सार्वधातुकाचे अर्थ म्हटले तर एकत्व या अर्थीच एकवचन करावें अशा प्रकारचे एकवचन, द्विवचन आणि बहुवचन या विषयींचे नियम जुळून येत नाहींत. कारण एकत्व, द्वित्व, वगैरे फक्त संख्या च अर्थ त्या प्रत्ययांचा आहे असें या पक्षीं म्हणतां येत नाहीं, असा पूर्वी दोष दाखविला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण

कर्म वगैरे हे अर्थ सुप्प्रत्ययांचे आहेत. तसेंच संख्याही त्या सुप्प्रत्ययांचा अर्थ आहे. तसेंच तिङ्प्रत्ययांचेही ते दोन्ही अर्थ आहेत.

तेव्हां 'एकत्व या अर्थी एकवचनच करावें द्विवचन वगैरे करूं नये' असा अर्थनियम[11] तेथें प्रसिद्धच आहे.

अथवा प्रकृत अर्थांना अनुलक्षूनच नियम[12] होतो.

ते प्रकृत अर्थ कोणते?

एकत्व, द्वित्व आणि बहुत्व हे होत. तेव्ह

---

अर्थ तेथेंही मनांत येईलच.

१०. तेव्हां कृत्प्रत्ययानें कर्ता हा अर्थ उक्त होत असल्यामुळें त्या अर्थी पुनः शविकरण होणार नाही, हा दोष येत नाहीं.

११. असा अर्थनियम घेतला म्हणजे एकवचनप्रत्ययाचा अर्थ एकत्वसंख्या हा असून दुसरा आणखी कर्ता, कर्म, वगैरे कांहीं असला तरी त्याचं या नियमानें व्यावृत्ति होत नाही.

१२. एकत्व या अर्थीच एकवचन होतें अस प्रत्ययनियम घेतला तरी 'एकत्व या अर्थीच' य म्हणण्यानें एकत्वासारख्या अशा द्वित्वबहुत्वसंख्ये चीच व्यावृत्ति त्या नियमानें होईल. कर्ता, कर्म य

ऽवैकवचनं न द्वयोर्न बहुषु । द्वयोरेव द्विवचनं नैकस्मिन्न बहुषु । बहुष्वेव बहुवचनं नैकस्मिन्न द्वयोरिति ॥

**भावकर्मणोर्यग्विधाने कर्मकर्तर्युपसंख्यानम् ॥ ३ ॥**

भावकर्मणोर्यग्विधाने कर्मकर्तर्युपसंख्यानं कर्तव्यम् । पच्यते स्वयमेव । पठ्यते स्वयमेव ॥ किं पुनः कारणं न सिध्यति ।

**विप्रतिषेधाद्धि शपो बलीयस्त्वम् ॥४॥**

विप्रतिषेधाद्धि शपो बलीयस्त्वं प्राप्नोति । शपोऽवकाशः । पचति पठति । यकोऽवकाशः । पच्यत ओदनो देवदत्तेन । पठ्यते विद्या देवदत्तेन । इहोभयं प्राप्नोति । पच्यते स्वयमेव । पठ्यते स्वयमेव । परत्वाच्छप्प्राप्नोति ॥

**योगविभागात्सिद्धम् ॥५॥**

योगविभागः करिष्यते । चिण्भावकर्मणोः । सार्वधातुके यग्भावकर्मणोः । ततः कर्तरि । कर्तरि च यग्भवति भाव-

सजातीयांचा नियम करावयाचा अशी मर्यादा असल्यामुळें 'एक हीच संख्या दाखवावयाची असतां एकवचन करावें, म्हणजे दोन किंवा बहुत ही संख्या दाखवावयाची असतां एकवचन करूं नये.' दोन हीच संख्या दाखवावयाची असता द्विवचन घालावें, एक किंवा बहुत ही संख्या दाखवावयाची असतां द्विवचन घालूं नये.'

तसेंच बहुत हीच संख्या दाखवावयाची असतां बहुवचन करावें, एक किंवा दोन ही संख्या दाखवावयाची असतां बहुवचन करूं नये.

(वा.३) येथें भावे आणि कर्मणि या प्रयोगांमध्यें यक्प्रत्ययाचें विधान केलें आहे तेथें [१३]कर्मकर्तरिप्रयोगामध्येंही यक् होतो, असें वचन करावें; जसें– पच्यते ओदनः स्वयमेव, पठ्यते विद्या स्वयमेव.

पण काय बरें कारण कर्मकर्तरिप्रयोगामध्यें यक्प्रत्यय होणार नाहीं ?

(वा.४) विप्रतिषेधानें यक्प्रत्ययापेक्षा शप् प्रत्यय बलवान आहे. शप्प्रत्ययाला पचति-पठति, येथें अवकाश आहे. आणि यक्प्रत्ययाला 'पच्यते ओदनो देवदत्तेन' या कर्मणि प्रयोगामध्यें अवकाश आहे. असें असून 'पच्यते ओदनः स्वयमेव' या कर्मकर्तरिप्रयोगामध्यें उभयतांची[१४] प्राप्ति आली असतां परत्वास्तव शप्प्रत्यय प्राप्त होतो.

(वा.५) योगविभाग करण्यांत येईल. तो असा– 'चिण्भावकर्मणोः' 'सार्वधातुके यक्' (३।१।६६।६७) हीं दोन सूत्रें मूळांतच ओळीनें आहेत. त्यांत 'भावकर्मणोः' या पदाची 'सार्वधातुके यक्' येथें अनुवृत्ति आहेच. त्याचे पुढें 'कर्तरि' एवढेंच एक सूत्र समजावें. येथेंही 'भावकर्मणोः' या पदांची अनुवृत्ति आहे. तेव्हां सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूहून यक्प्रत्यय होतो, पण तो सार्वधातुक प्रत्यय कर्ता या अर्थाचा असून आणखी भाव किंवा कर्म या अर्थाचा असला पाहिजे [१५]असा अर्थ

---

विजातीय अर्थाची व्यावृत्ति होत नाहीं.

१३. कर्मकर्तरिप्रयोगासंबंधानें मागें (३।१।४८ टीप ३) पहा.

१४. कर्मकर्तरिप्रयोगामध्यें कर्त्याचे ठिकाणी कर्मवत् (३।१।८७) असा अतिदेश केला असल्यामुळें येथे यक्प्रत्ययाची प्राप्ति येत आहे.

१५. कर्मकर्तरिप्रयोग हा वस्तुतः कर्तरिप्रयोगच आहे. पच्यते यांतील त या सार्वधातुक प्रत्ययाचा कर्ता हाच अर्थ आहे. त्या ओदन ह्या कर्त्याला कर्मवद्भाव (३।१।८७) होत असल्यामुळें त्याच तप्रत्ययाचा अर्थ कर्म आहे असेंही म्हणतां येतें. तेव्हां पच्यते ओदनः येथें सार्वधातुके यक् या सूत्रानें कर्मवद्भावामुळे प्राप्त झालेल्या यक्प्रत्ययाचा परत्वास्तव बाध करून जो पुढील 'शप्' या सूत्रानें शप् प्राप्त होतो त्याचाही अनवकाशत्वास्तव बाध करून 'कर्तरि' या पहिल्या सूत्रानें यक्प्रत्यय होतो.

कर्मणोः ॥

यथैव तर्हि कर्मणि कर्तरि यग्भवत्येवं भावे कर्तरि प्राप्नोति । एति जीवन्तमानन्दः । नास्य किंचिद्रुजति रोग इति ॥ द्वितीयो योगविभागः करिष्यते । चिण्भावे । ततः कर्मणि । कर्मणि च चिण्भवतीति । ततः सार्वधातुके यग्भवति भावे च कर्मणि च । ततः कर्तरि । कर्तरि च यग्भवति । कर्मणीत्यनुवर्तते भाव इति निवृत्तम् । ततः शप् । शप्च भवति कर्तरीत्येव । कर्मणीत्यपि निवृत्तम् ॥ एवमप्युपसंख्यानं कर्तव्यं विप्रतिषेधाद्धि श्यनो बलीयस्त्वं प्राप्नोति । श्यनोऽवकाशः । दीव्यति सीव्यति । यकोऽवकाशः । पच्यत ओदनो देवदत्तेन । पठ्यते विद्या देवदत्तेन । इहोभयं प्राप्नोति । दीव्यते स्वयमेव । सीव्यते स्वयमेव । परत्वाच्छ्यन्प्राप्नोति ॥ ननु चैतदपि योगविभागादेव सिद्धम् । न सिध्यति । अनन्तरा या प्राप्तिः सा योगविभागेन शक्या बाधितुम् । कुत

---

होतो.

तर मग जसा कर्म आणि कर्ता या दोन्ही अर्थांचा सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यक्प्रत्यय होतो, तसा भाव आणि कर्ता या दोन्ही अर्थांचा सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांनाही यक्प्रत्यय होऊं लागेल; जसें– एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि'[१६], 'नास्य किंचिद्रुजति रोगः'.

तर मग आणखी दुसरा योगविभाग करण्यांत येईल. तो असाः– 'चिण् भावे' असें एक सूत्र करून त्याचे पुढें कर्मणि' असें दुसरें सूत्र करावें[१७]. त्याचा अर्थः– कर्मवाचक असाही तशब्द पुढें असतांना चिण् होतो. त्याचे पुढें 'सार्वधातुके यक्' हें सूत्र होय. त्याचा अर्थः– भाव किंवा कर्म या अर्थाला दाखविणारा सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यक्प्रत्यय होतो. त्याचें पुढें 'कर्तरि' एवढेंच सूत्र होय. येथें कर्मणि या पदाची अनुवृत्ति आहे आणि भावे या पदाची अनुवृत्ति नाहीं. तेव्हां त्याचा कर्तृवाचक सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना शप्प्रत्यय होतो असा पूर्वीप्रमाणेंच अर्थ आहे.

तरीही कर्मकर्तरिप्रयोगामध्यें यक्प्रत्ययाचें उपसंख्यान केलें पाहिजेच. कारण विप्रतिषेध असल्यामुळें यक्प्रत्ययापेक्षां श्यन्प्रत्यय बलवान् आहे. श्यन्प्रत्ययाला दीव्यति, सीव्यति, या ठिकाणीं अवकाश आहे. आणि यक्प्रत्ययाला पच्यते ओदनो देवदत्तेन, पठ्यते विद्या देवदत्तेन, येथें अवकाश आहे. आणि दीव्यते स्वयमेव, सीव्यते स्वयमेव, येथें उभयतांची प्राप्ति येत आहे. तेव्हां परत्वास्तव श्यन्प्रत्यय प्राप्त होतो.

पण हेंही उदाहरण वरील योगविभागानेंच साधतें[१८] आहे.

साधत नाहीं. कारण योगविभागानें सांगितलेला यक्प्रत्यय हा जवळ असलेल्या शप्-

---

१६. येथें आनंद व रोग ही भाववाचक नामें आहेत. आणि आनंद हाच एति याचा कर्ता आहे. आणि रोग हा रुजति या क्रियेचा कर्ता आहे. तेव्हां येथें भाव हाच कर्ता असल्यामुळें एति आणि रुजति या क्रियापदांतील ति हा सार्वधातुक प्रत्यय कर्ता या अर्थाचा असून भाव या अर्थाचा आहे असें म्हणतां येतें.

१७. कर्मणि असें निराळें सूत्र केलें म्हणजे 'कर्तरि' या सूत्रामध्यें भावे याची अनुवृत्ति न करतां फक्त कर्मणि याचीच अनुवृत्ति करतां येते. तेव्हां कर्ता या अर्थाला दाखवून आणखी भाव या अर्थाला दाखविणारा सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यक्प्रत्ययाचें विधानच नसल्यामुळें एति, रुजति, या उदाहरणांमध्यें यक् होत नाही.

१८. कर्तरि या सूत्रानें यक्प्रत्यय मुद्दाम सांगितला आहे त्यामुळें तो जसा शप्प्रत्ययाचा बाध करतो तसा श्यन्प्रत्ययाचाही करील.

एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति । परा प्राप्तिरप्रतिषिद्धा तया प्राप्नोति । ननु चेयं प्राप्तिः परां प्राप्तिं बाधेत । नोत्सहते प्रतिषिद्धा सती बाधितुम् ॥ एवं तर्हि शबादेशाः श्यनादयः करिष्यन्ते शप्च यका बाध्यते तत्र दिवादिभ्यो यग्विषये शबेव नास्ति कुतः श्यनादयः । तत्तर्हि शपो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । कर्तरि शप् [३.१.६८] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । दिवादिभ्य इत्येषा पञ्चमी शबिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [३.१.६८] इति । प्रत्ययविधिरयं न च प्रत्ययविधौ पञ्चम्यः प्रकल्पिका भवन्ति । नायं प्रत्ययविधिः । विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते ॥

अथवा

**भावकर्मणोरित्यननुवृत्त्यैव सिद्धे सत्यनुवृत्तिर्यको भावाय ।**

---

प्रत्ययाचाच फक्त बाध करील.

हें कशावरून ?

'विधि किंवा निषेध हे आपल्या जवळच्याचेच होतात असा नियम आहे. तेव्हां यक्प्रत्ययाला श्यन्प्रत्यय हा शप्प्रत्ययापेक्षां जरा दूर असल्यामुळें त्याला शप्प्रत्ययाप्रमाणें श्यन्प्रत्ययाचा निषेध करतां येत नाहीं. सबब श्यन्प्रत्यय प्राप्त होतो.

पण योगविभागानें मुद्दाम सांगितलेला यक्प्रत्यय हा पर अशाही श्यन्प्रत्ययाचा बाध करील.

असें म्हणतां येत नाहीं. कारण यक्प्रत्यय हा परत्वास्तव श्यन्प्रत्ययानें बाधित होत असल्यामुळें त्या ठिकाणीं तो श्यन्प्रत्ययाला मागें सारण्याविषयीं धजणार नाहीं.

असें आहे तर श्यन्, श्नु, वगैरे विकरणप्रत्यय हे शप्प्रत्ययाचे आदेश म्हणून सांगतां येतील. तेव्हां कर्तरि या योगविभागानें सांगितलेल्या यक्प्रत्ययानें शप्प्रत्ययाचा तर बाध होतच आहे. तेव्हां दिवादि गणांतील धातूंच्या पुढें कर्मकर्तरि प्रयोगामध्यें यक्प्रत्यय करण्याचे वेळीं शप्प्रत्ययच होत नाहीं. मग त्या शप्प्रत्ययाचें स्थानीं करावयास सांगितलेले श्यन् वगैरे कोठून बरें प्राप्त होतील ?

तर मग 'दिवादिभ्यः श्यन्' (३।१।६९) इत्यादि सूत्रांमध्यें श्यन् वगैरेंचा स्थानी म्हणून शप्प्रत्ययाचें ग्रहण केलें पाहिजे.

शप्प्रत्ययाचें ग्रहण करावयास नको. मागून अनुवृत्त आणतां येईल.

मागें कोठें बरें शप्प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे ?

कर्तरि शप् (३।१।६८) या सूत्रामध्यें.

पण तेथें ते प्रथमा विभक्ति लावून उच्चारलें आहे. आणि येथें तर षष्ठी विभक्ति लावून शप्ग्रहण केलें आहे ?

तर मग दिवादिभ्यः ही पंचमी तस्मादित्युत्तरस्य (१।१।६७) या परिभाषेच्या साहाय्यानें 'शप्' येथील प्रथमेला षष्ठीची कल्पना करील.

पण 'दिवादिभ्यः' यानें प्रत्ययाचें विधान केलें आहे ना ? आणि प्रत्ययविधायक सूत्रांतील पंचमी तर प्रथमान्त पदाला षष्ठ्यन्त बनवूं शकत नाहीं.

येथें कांहीं शप्प्रत्ययाचें विधान केलें नाहीं. तर तो पूर्वीच सांगितला आहे. फक्त येथें अनुवृत्ति करावयाची आहे. अथवा—

'सार्वधातुके यक्' या सूत्रामध्यें 'भावकर्मणोः' या पदाची अनुवृत्ति न करतांच सर्व

---

१९. भावकर्मणोः याची अनुवृत्ति न करतां मोघमच सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यक्प्रत्यय सांगितला तरी तो भावेप्रयोगामध्यें आणि कर्मणि प्रयोगामध्येंच होईल, कारण कर्तरि प्रयोगामध्यें

इह सार्वधातुके यगित्यन्तरेण भावकर्मणोरित्यनुवृत्तिं सिद्धम् । सोऽयमेवं सिद्धे सति यद्भावकर्मणोरित्यनुवर्तयति तस्यैतत्प्रयोजनं कर्मकर्तर्यपि यथा स्यात् ॥

**कर्तरीति च योगविभागः श्यनः पूर्वविप्रतिषेधावचनाय ॥**

कर्तरीति योगविभागः कर्तव्यः श्यनः पूर्वविप्रतिषेधं मा वोचमिति ॥

अथवा कर्मवद्भाववचनसामर्थ्याद्यग्भविष्यति । अस्त्यन्यत्कर्मवद्भाववचने प्रयोजनम् । किम् । आत्मनेपदं यथा स्यात् । वचनादात्मनेपदं भविष्यति । चिण्तर्हि यथा स्यात् । चिणपि वचनाद्भविष्यति । चिण्वद्भावस्तर्हि यथा स्यात् । नैकं प्रयोजनं योगारम्भं प्रयोजयति । तत्र कर्मवद्भाववचनसामर्थ्याद्यग्भविष्यति ॥

अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवति

---

साधतें[19] आहे. असें असतां भावकर्मणोः या पदाची अनुवृत्ति हा अधिक यत्न केल्याचे जोरावर कर्मकर्तरि प्रयोगामध्येंही शप् वगैरे प्रत्ययांचा बाध करून यक्प्रत्ययच होईल.

या वेळींही 'कर्तरि' हा योगविभाग केला पाहिजेच[20]. त्यामुळें 'यक् हा पूर्वविप्रतिषेधानें श्यन्प्रत्ययाचा बाध करतो' असें वचन करावें लागणार नाहीं.

अथवा कर्मकर्तरि प्रयोगामध्यें कर्त्याला कर्मवद्भाव (३।१।८७) सांगितल्याचे जोरावर शप्, श्यन्, वगैरेंचा बाध करून तेथें यक्प्रत्यय[21] होईल.

कर्मवद्भाव सांगण्याचें दुसरें प्रयोजन आहे ना ?

तें कोणतें ?

आत्मनेपद व्हावें हें कर्मवद्भाव सांगण्याचें प्रयोजन[22] आहे.

तेवढ्यापुरतें वचनावरून काम भागेल[23].

तर मग चिणादेश व्हावा हें कर्मवद्भावाचें प्रयोजन आहे.

चिण्ही तेवढ्यापुरत्या वचनावरूनेंच[24] होईल.

तर मग चिण्वद्भाव (६।४।६२) होणें हें कर्मवद्भावाचें प्रयोजन आहे असें म्हणणें असेल तर तेंही बरोबर नाहीं. कारण एकच उदाहरण कांहीं सामान्य सूत्र करण्याला कारणीभूत होत नाहीं. असें असतां ज्यापेक्षां स्वतंत्र सामान्य सूत्र करून कर्मवद्भाव सांगितला आहे त्या जोरावर कर्मकर्तरि प्रयोगामध्यें यक्प्रत्यय होईल[25].

---

शप्, श्यन् वगैरे प्रत्यय यक्प्रत्ययाचा बाध करतील.

२०. नाहीं तर भावकर्मणोः या अनुवृत्तीमुळें जो बाध होणार तो जवळच्या शप्प्रत्ययाचाच होईल आणि श्यन् वगैरेंचा बाध होणार नाहीं. तेव्हां त्यांच्या बाधाकरितां पूर्वविप्रतिषेधवचन करावें लागेल. आणि योगविभाग केला म्हणजे त्याच्या जोरावर दूरच्या श्यन् वगैरेंचाही बाध सिद्ध होतो म्हणून पूर्वविप्रतिषेधवचन करण्याची पाळी येत नाहीं.

२१. पच्यते ओदनः इत्यादि कर्मकर्तरि प्रयोगामध्यें जो यक्प्रत्यय होतो तो कर्मवद्भावामुळेंच होतो. त्या यक्प्रत्ययाचा जर शप्, श्यन्, वगैरेंनी बाध होईल तर कर्मवद्भाव व्यर्थ होणार आहे.

२२. पच्यते ओदनः स्वयमेव येथें आत्मनेपद कर्मवद्भावामुळेंच झालें आहे.

२३. कर्तरि कर्मव्यतिहारे (१।३।१४)या सूत्रामध्यें योगविभाग करावा म्हणजे 'कर्तरि' एवढेंच निराळें सूत्र करावें. तेथें मागून (१।३।१३) कर्मपदाची अनुवृत्ति आणावी. तेव्हां कर्माचा कर्ता झाला असेल तर तेथें आत्मनेपद होतें असा त्याचा अर्थ होईल.

२४. चिण् भावकर्मणोः (३।१।६६) येथें मागून (३।१।६०) चिण् या पदाची अनुवृत्ति येत असतांना मुद्दाम जें पुनः चिण्ग्रहण केलें आहे त्या अधिक यत्नाच्या जोरावर कर्मकर्तरि प्रयोगामध्यें चिण् होतो अशी कल्पना होईल. तेव्हां कर्मवद्भाव सांगितला नाहीं तरी 'अपाचि ओदनः स्वयमेव' येथें चिण् होईल.

कर्मकर्तरि यगिति यदयं न दुहस्नुनमां यक्चिणौ [३.१.८९] इति यक्चिणोः प्रतिषेधं शास्ति ॥

[**कर्तरि शप् ॥ ३ । १ । ६८ ॥**
**दिवादिभ्यः श्यन् ॥ ३ । १ । ६९ ॥**
**वा भ्राशभ्लाशभ्रमुक्रमुक्लमुत्रसित्रुटिलषः ॥ ३ । १ । ७० ॥**]
**यसोऽनुपसर्गात् ॥ ३ । १ । ७१ ॥**

अनुपसर्गादिति किमर्थम् । आयस्यति प्रयस्यति ॥ अनुपसर्गादिति शक्यमकर्तुम् । कथमायस्यति प्रयस्यति । संयसश्च [३.१.७२] इत्येतन्नियमार्थं भविष्यति । संपूर्वादेव यसो नान्यपूर्वादिति ॥

[**संयसश्च ॥ ३ । १ । ७२ ॥**
**स्वादिभ्यः श्नुः ॥ ३ । १ । ७३ ॥**
**श्रुवः शृ च ॥ ३ । १ । ७४ ॥**
**अक्षोऽन्यतरस्याम् ॥३।१।७५॥**
**तनूकरणे तक्षः ॥ ३ । १ । ७६ ॥**

किंवा ज्यापेक्षां आचार्य 'न दुहस्नुनमां यक्चिणौ' (३।१।८९) या सूत्रानें कर्मकर्तरि प्रयोगामध्यें यक् आणि चिण् यांचा निषेध करीत आहेत त्यापेक्षां कर्मकर्तरि प्रयोगामध्यें यक् होतो असें ते सुचवीत आहेत.

(सू.७१) येथें अनुपसर्गात् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

आयस्यति प्रयस्यति.

अनुपसर्गात् हा शब्द सूत्रांत घातला नाहीं तरी चालेल.

तर मग आयस्यति प्रयस्यति हें कसें ?

या सूत्राचे पुढें 'संयसश्च' असें सूत्र आहे. तें नियमार्थ होईल. तो नियम असा– उपसर्गसहित अशा यस्धातूहून वैकल्पिक श्यन् करणें झाल्यास सम् हा उपसर्ग असेल तरच करावा. सम्उपसर्गाशिवाय अन्य उपसर्ग

२५. कर्मवत्कर्मणा तुल्यक्रियः (३।१।८७) असें सामान्य सूत्र करून त्यानें जो कर्मकर्तरिप्रयोगामध्यें कर्मवद्भाव सांगितला त्याचा उपयोग जर एकटा चिण्वद्भाव(६।४।६२)च असता तर कर्मवद्भाव न सांगतां त्या चिण्वद्भावाच्या सूत्रापुढे 'कर्मणा तुल्यक्रिये कर्तरि' असें चिण्वद्भाव सांगणारेंच सूत्र केलें असतें. तेव्हां ज्या अर्थी सामान्य सूत्र करून कर्मवद्भाव सांगितला आहे त्या अर्थी त्या कर्मवद्भावाचा चिण्वद्भावाशिवाय दुसराही उपयोग आहे असें सिद्ध होतें. तो दुसरा उपयोग म्हणजे यक्प्रत्यय होणें हा होय.

१ (६८). कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूहून शप्प्रत्यय होतो; उदा०— भवति, पचति.

(६९). कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना दिवादिगणांतील धातूंच्या पुढें श्यन्प्रत्यय होतो; उदा०— दीव्यति, युध्यते.

(७०). कर्तरिप्रयोगामध्यें भ्राश्, भ्लाश्, भ्रम्, क्रम्, क्लम्, त्रस्, त्रुट्, आणि लष् या धातूंहून श्यन्प्रत्यय विकल्पानें होतो, सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना; उदा० भ्राश्यते भ्राशते, लष्यति लषति,

१. दिवादि गणांतील यस्धातूच्या मागें उपसर्ग नसतांना त्याहून श्यन्प्रत्यय विकल्पानें होतो, कर्तरि प्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना; उदा०– यस्यति यसति.

२. येथें श्यन्प्रत्ययाचा विकल्प झाला तर एकदा शप्प्रत्यय होऊन वेगळी रूपें होऊं लागतील.

१ (७२). ज्याच्या मागें सम् हा उपसर्ग आहे अशा यस्धातूहून श्यन्प्रत्यय विकल्पानें होतो; उदा०– संयस्यति, संयसति.

(७३). कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना स्वादिगणांतील धातूंहून श्नुप्रत्यय होतो; उदा०– सुनोति.

(७४). कर्तरि प्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना श्रुधातूहून श्नुप्रत्यय होतो आणि श्रुधातूला 'शृ' असा आदेश होतो; उदा०– शृणोति शृणुतः शृण्वन्ति.

(७५). कर्तरि प्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना अक्षधातूहून श्नुप्रत्यय विकल्पानें होतो; उदा०– अक्ष्णोति अक्षति.

(७६). कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना तासणें या अर्थाला दाखविणाऱ्या तक्ष-

**तुदादिभ्यः शः ॥ ३ । १ । ७७ ॥]**

**रुधादिभ्यः श्नम् ॥ ३ । १ । ७८ ॥**

किमर्थः शकारः । सार्वधातुकार्थः । शित्सार्वधातुकमिति सार्वधातुकसंज्ञा सार्वधातुकमपिदिति ङित्त्वं क्ङितीति गुणप्रतिषेधो यथा स्यात् । भिनत्ति छिनत्तीति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सार्वधातुकार्धधातुकयोरङ्गस्य गुण उच्यते यस्माच्च प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गसंज्ञं भवति । यस्माच्चात्र प्रत्ययविधिर्न तत्प्रत्यये परतो यच्च प्रत्यये परतो न तस्मात्प्रत्ययविधिः ॥ इदं तर्हि प्रयोजनमार्धधातुकसंज्ञा मा भूदिति । किं च स्यात् । वलादिलक्षण इट् प्रसज्येत ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । वलादेरार्धधातुकस्याङ्गस्येडुच्यते यस्माच्च प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गसंज्ञं भवति यस्माच्चात्र प्रत्ययविधिर्न तत्प्रत्यये परतो यच्च प्रत्यये परतो न तस्मात्प्रत्ययविधिः ॥ अत उत्तरं पठति ।

**श्नमि शित्करणं प्वादिह्रस्वार्थम् ॥१॥**

श्नमि शित्करणं क्रियते प्वादीनां

मागें असतां वैकल्पिक श्यन् करूं नये.

(सू.७८) या श्नम्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक शकार कशाकरितां जोडला आहे ?

सार्वधातुक संज्ञा होण्यासाठीं शकार जोडला आहे. म्ह. 'तिङ्शित्०' (३।४।११३) यानें सार्वधातुकसंज्ञा व 'सार्वधातुकमपित्' (१।२।४) यानें त्या सार्वधातुकाला ङित्त्व; आणि ङित्त्व असल्यामुळें भिनत्ति, छिनत्ति, येथें 'क्ङिति च' (१।१।५) यानें गुणनिषेध झाला पाहिजे.

हा शकार जोडण्याचा उपयोग संभवत नाहीं. कारण सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना अङ्गाला गुण (७।३।८४) सांगितला आहे. आणि ज्या प्रकृतीहून प्रत्यय सांगितला असेल ती प्रकृति आरंभीं असलेल्या समुदायाला तो प्रत्यय पुढें असतांना अंगसंज्ञा होते. प्रकृतस्थलीं भिनत्ति येथें ज्या भिद् या प्रकृतीहून श्नम्प्रत्यय केला आहे ती भिद् ही प्रकृति त्या प्रत्ययाच्या मागें नाहीं, व जो भि एवढा भाग त्या प्रत्ययाच्या मागें आहे त्याहून श्नम्प्रत्यय केला नाहीं.[२]

तर मग आर्धधातुक संज्ञा न व्हावी हा श्नम्प्रत्ययामध्यें शकार जोडण्याचा उपयोग समजावा.

पण श्नम्प्रत्ययाला आर्धधातुक संज्ञा झाली तर काय बिघडेल ?

भिनत्ति येथें 'आर्धधातुकस्येड्वलादेः' (७।२।३५) यानें इडागम होऊं लागेल.

हाही उपयोग संभवत नाहीं. कारण अंगसंज्ञेला कारणीभूत अशा वलादि आर्धधातुकाला इडागम सांगितला आहे, आणि ज्या प्रकृतीहून प्रत्यय केला असेल ती प्रकृति आरंभीं असलेल्या समुदायाला तो प्रत्यय पुढें असतांना अंगसंज्ञा होत असते. प्रकृत स्थळीं ज्या प्रकृतीहून श्नम्प्रत्यय केला आहे ती प्रकृति त्या श्नम्प्रत्ययाच्या मागें नाहीं, आणि त्या प्रत्ययाचे मागें जो त्या प्रकृतीपैकीं भाग आहे त्याहून प्रत्यय केला नाहीं; हें मनांत आणून वार्तिककार लिहितातः—

(वा.१) श्नम्प्रत्ययामध्यें इत्संज्ञक शकार

---

धातूहून श्नुप्रत्यय विकल्पानें होतो; उदा०— तक्ष्णोति तक्षति वा काष्ठम्.

(७७). कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना तुदादि गणांतील धातूहून शप्रत्यय होतो; उदा०— तुदति.

१. कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुकप्रत्यय पुढें असतांना रुधादि गणांतील धातूहून श्नम्प्रत्यय होतो; उदा०— रुणद्धि.

२. तात्पर्य, भि या भागाला अंगसंज्ञा नसल्यामुळें गुणाची प्राप्तिच येत नाहीं. हा श्नम् प्रत्ययाचा मकार इत्संज्ञक असल्यामुळें भिद्धातूमधील इकाराच्या पुढें (१।१।४७) न हा प्रत्यय होतो.

शिति ह्रस्वत्वं यथा स्यात् । पृणती मृणतीति ॥

**न वा धात्वन्यत्वात् ॥ २ ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । धात्वन्यत्वात् । धात्वन्तरम् । पृणिमृणी ॥ यत्तर्हि न धात्वन्तरम् । यत्र भूम्यां वृणसे । नैष श्नम् । श्न एतद्ध्रस्वत्वम् । यदि श्नो ह्रस्वत्वं स्वरो न सिध्यति । वृणसे । अदुपदेशाल्लसार्वधातुकमनुदात्तं भवतीत्येष स्वरो न प्राप्नोति । तस्माच्श्नमेषः । यदि श्नम् श्नसोरल्लोपः [६.४.१११] इति लोपः प्राप्नोति । उपधाया इति वर्तते-ऽनुपधात्वान्न भविष्यति । न स शक्य उपधाया इति विज्ञातुम् । इह हि दोषः स्यात् । अङ्क्तः अञ्जन्ति । तस्माच्श्न एव ह्रस्वत्वम् । स्वरः कथम् ।

**बहुलं पित्सार्वधातुकं छन्दसि ॥ ३ ॥**

सार्वधातुकस्य बहुलं छन्दसि पित्त्वं वक्तव्यम् । पितश्चापित्त्वं दृश्यतेऽपितश्च पित्त्वम् । पितस्तावदपित्त्वम् । मातरं

---

जोडला आहे तो शित्प्रत्यय पुढें असतांना पू वगैरे धातूंना सांगितलेला ह्रस्व (७।३।८०) व्हावा यासाठीं जोडला आहे; जसेंः— पृणति, मृणति.

(वा.२) श्नम्प्रत्ययामध्यें शकार जोडावयास नको.

काय कारण ?

कारण असें की पृण आणि मृण असे जे स्वतंत्र धातु तुदादि गणांत पठित आहेत त्या धातूंची पृणति, मृणति, हीं रूपें आहेत.

तर जेथें धात्वन्तर संभवत नाहीं तेथें ह्रस्व होण्यासाठीं शकार जोडला पाहिजे; जसेंः— यत्र भूम्यां वृणसे.

वृणसे येथें श्नम्प्रत्ययच केलेला नाहीं. तर श्नाप्रत्ययाला छान्दसत्वास्तव ऱ्हस्व केला आहे.

जर वृणसे येथें श्नाप्रत्ययाला ऱ्हस्व केला आहे तर उपदेशीं ऱ्हस्व अकारान्त नसल्यामुळें त्याच्यापुढील लसार्वधातुकाला सांगितलेला अनुदात्त स्वर (६।१।१८६) होणार नाहीं. म्हणून वृणसे येथें श्नम्च केला आहे असें गृहीत धरलें पाहिजे.

आतां जर वृणसे येथें श्नम्प्रत्यय केला आहे तर 'श्नसोरल्लोपः' (६।४।१११) यानें त्यांतील ऱ्हस्व अकाराचा लोप होऊं लागेल.

'ऊदुपधाया गोहः' (६।४।८९) येथून उपधायाः या पदाची अनुवृत्ति तेथें येत आहे. तेव्हां वृणसे येथील श्नम्प्रत्ययाचा अकार उपधा नसल्यामुळे त्याचा लोप होणार नाहीं.

पण श्नसोरल्लोपः येथें उपधापदाची अनुवृत्ति गृहीत धरणें शक्य नाहीं. कारण अङ्क्तः, अञ्जन्ति, येथें श्नम्प्रत्ययाचा अकार उपधा नसल्यामुळें त्याचा लोप होणार नाहीं, असा दोष येईल. तेव्हां वृणसे येथें श्नाप्रत्ययालाच ऱ्हस्व केला आहे असें गृहीत धरलें पाहिजे.

तर मग आतां वृणसे येथें लसार्वधातुकाला अनुदात्त स्वर कसा ?

(वा.३) सार्वधातुकप्रत्ययाला वेदामध्यें बाहुल्येंकरून पित्त्व सांगावें. कारण पित्प्रत्ययालाही अपित्त्व दिसतें आणि अपित्प्रत्ययालाही पित्त्व दिसतें. ह्या दोन्ही गोष्टी साधल्या पाहिजेत. पैकीं पित्प्रत्ययाला अपित्त्व

---

३. पॄ पालनपूरणयोः, मॄ हिंसायाम्, या क्र्यादिगणांतील धातूंहून व्यत्ययानें श्नम्प्रत्यय करून पृणति, मृणति, हीं रूपें साधली आहेत.

४. वृणधातु तुदादि गणामध्यें जरी पठित आहे तरी पण तो परस्मैपदी आहे. प्रकृत उदाहरणामध्यें आत्मनेपद केलें आहे. तेव्हां वॄञ् वरणे या क्र्यादिगणांतील धातूचेंच हें उदाहरण दिलें आहे. तेथें व्यत्ययानें श्नम् केला आहे.

५. येथें मिप् या पित्सार्वधातुकाला अपित्त्व गृहीत धरल्यामुळें ङित्त्व (१।२।४) समजून 'ई हल्यघोः' (६।४।११३) यानें श्नाप्रत्ययाला ईत्व केलें आहे.

प्रमिणीमि जनित्रीम् । अपितः पित्त्वम् । शृणोत ग्रावाणः ॥ तर्त्ताहि ह्रस्वत्वं वक्तव्यम् । अवश्यं छन्दसि ह्रस्वत्वं वक्तव्यम् उपगायन्तु मां पत्नयो गर्भिणयो युवतय इत्येवमर्थम् ॥

विशेषणार्थस्तर्हि । क विशेषणार्थेनार्थः । श्नान्नलोपः [६.४.२३] इति । नान्नलोप इत्युच्यमाने यज्ञानाम् यत्नानामित्यत्रापि प्रसज्येत । दीर्घत्वे कृते न भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । दीर्घत्वं क्रियतां नलोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वान्नलोपः स्यात् । तस्माच्छकारः कर्तव्यः ॥ अथ क्रियमाणे शकार इह कस्मान्न भवति । विश्नानाम् प्रश्नानामिति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥

## तनादिकृञ्भ्य उः ॥ ३ । १ । ७९ ॥

अथ किमर्थं करोतेः पृथग्ग्रहणं क्रियते

---

असल्याचें उदाहरणः– मातरं प्रमिणीमि जनित्रीम्. मूळचा अपित् असून त्याला पित्त्व असल्याचें उदाहरणः– शृणोत ग्रावाणः.

तर मग श्नाप्रत्ययाला ऱ्हस्व होण्यादाखल वचन केलें पाहिजे.

'उपगायन्तु पत्नयो गर्भिणयो युवतयः' येथें पत्नी आणि गर्भिणी या शब्दांना ऱ्हस्व केलेला दृष्टीस पडत असल्यामुळें वेदामध्यें ऱ्हस्वाचें विधायक वचन अवश्य गृहीत धरलेंच पाहिजे (७।३।१०७). अर्थात् त्याच वचनानें वृणसे येथें ऱ्हस्व होण्याचा संभव असल्यामुळें 'श्नाप्रत्ययाला ऱ्हस्व होतो' असें निराळें वचन करावयास नको.

तर मग नप्रत्ययाला शकारेत्संज्ञक असें विशेषण लागू पडावें म्हणून श्नप्रत्ययामध्यें शकार जोडला पाहिजे.

पण असें विशेषण लागू केल्याचा कोठें उपयोग होतो ?

'श्नान्नलोपः' (६।४।२३) येथें.

आतां जर शकार काढून टाकून 'नान्नलोपः' असें म्हटलें तर यज्ञानाम्, यत्नानाम्, येथेंही नङ्प्रत्ययापुढील नुडागमाच्या नकाराचा लोप होऊं लागेल.

यत्नानाम् येथें प्रथमतः 'नामि' (६।४।३) या सूत्रानें दीर्घ केला असतां नशब्दच नसल्यामुळें लोप होणार नाहीं असें म्हणणें असेल तर येथें असा विचार करावा की प्रथमतः दीर्घ करावा किंवा 'नान्नलोपः' यानें नलोप करावा.

मग यांत काय बरें करावें ?

परत्वास्तव प्रथमतः नलोप होईल म्हणून नान्नलोपः येथें शकार जोडला पाहिजे.

आतां शकार जोडून श्नान्नलोपः असें म्हटलें तरीही विश्नानाम्, प्रश्नानाम्, येथें कां बरें नलोप होत नाहीं ?

'लाक्षणिक व प्रतिपदोक्त यांमध्यें प्रतिपदोक्तांचेंच ग्रहण करावें', अशी परिभाषा असल्यामुळें श्नशब्दानें प्रतिपदोक्त श्नमच घ्यावयाचा. म्हणून विश्नानाम् येथें होत नाहीं.

(सू.७९) कृञ्धातु तनादि गणामध्येंच

---

६. येथें अपित् अशा तप्रत्ययाला पित्त्व गृहीत धरल्यामुळें ङित्त्व होत नाहीं; म्हणून अंगाला गुण केला आहे. तात्पर्य, वृणसे येथें श्नाप्रत्यय केला आहे असें गृहीत धरलें असतां जरी 'तास्यनुदात्तेन ङिददुपदेशात्' हा अनुदात्त स्वर प्राप्त होऊं शकत नाहीं, तरी पण अपित् अशा 'से' प्रत्ययाला पित्त्व गृहीत धरलें असतां 'अनुदात्तौ सुप्पितौ' यानेंच सेप्रत्ययाला अनुदात्त स्वर प्राप्त होतो.

७. विश्न, प्रश्न, या शब्दांतील शकार धातूचा आहे, आणि न हा प्रत्यय (३।३।९०) आहे. हे दोन्ही मिळून बनलेला श्न हा येथें लाक्षणिक समजला जातो.

१. कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना तनादिगणांतील धातु आणि कृञ्धातु यांहून उप्रत्यय होतो; उ० तनोति.

न तनादिभ्य इत्येवोच्येत । अन्यानि तनोत्यादिकार्याणि मा भूवन्निति । कानि । अनुनासिकलोपादीनि । दैवरक्ताः किंशुकाः । अनुनासिकाभावादेवानुनासिकलोपो न भविष्यति ॥ इदं तर्हि तनादिकार्यं मा भूत्तनादिभ्यस्तथासोः [२.४.७९] इति । ननु च भवत्येवात्र ह्रस्वादङ्गात् [८.२.२७] इति । तेनैव यथा स्यादनेन मा भूदिति । कश्चात्र विशेषस्तेन वा सत्यनेन वा । तेन सति सिज्लोपस्यासिद्धत्वाच्चिण्वद्भावः सिद्धो भवति । अनेन पुनः सति चिण्वद्भावो न स्यात् । अनेनापि सति चिण्वद्भावः सिद्धः । कथम् । विभाषा लुक् । यदा न लुक्तदा तेन लोपः । तत्र सिज्लोपस्यासिद्धत्वाच्चिण्वद्भावः सिद्धो भवति ॥

तनादित्वात्कृञः सिद्धं सिज्लोपे च
न दुष्यति ।
चिण्वद्भावेऽत्र दोषः स्यात्सोऽपि प्रोक्तो
विभाषया ॥

**धिन्विकृण्व्योर च ॥ ३ । १ । ८० ॥**

कायमकारः श्रूयते । न कचिच्छ्रूयते

आहे. तेव्हां येथें त्याचें निराळें ग्रहण कशाकरितां केलें आहे? अर्थात् निराळें ग्रहण करावयास नको. 'तनादिभ्यः उः' एवढेंच सूत्र करावें.

असें म्हणूं नये. कारण तनादिभ्य उः असें म्हटलें असतां ज्याप्रमाणें कृधातूला उप्रत्यय लागू पडतो त्याप्रमाणें दुसरींही तनादिगणप्रयुक्त कार्यें कृधातूला लागू होतील तीं न व्हावींत यासाठीं कृधातूचें निराळें ग्रहण केलें आहे.

दुसरीं तनादिगणप्रयुक्त कार्यें तीं कोणतीं?

अनुनासिकलोप (६।४।३७) वगैरे कार्यें होत; जसें:— पळस स्वभावतःच लाल असतात, तसें स्वभावतःच कांहीं धातु अनुनासिकानें युक्त असतात. तेव्हां कृधातूमध्यें अनुनासिक वर्ण मुळांतच नसल्यामुळें अनुनासिकलोपाची प्राप्तिच संभवत नाहीं.

तर 'तनादिभ्यस्तथासोः' (२।४।७९) हें तनादिगणप्रयुक्त कार्य कृधातूला लागू न व्हावें यासाठीं कृधातूचें पृथक् ग्रहण केलें पाहिजे.

अहो पण अकृत, अकृथाः, येथें 'ह्रस्वादङ्गात्' (८।२।२७) यानें सिच्प्रत्ययाचा लोप होतच आहे ना?

त्यानें जो होत आहे तो तसा त्यानेंच झाला पाहिजे यानें होऊं नये.

पण वरील उदाहरणामध्यें 'ह्रस्वादङ्गात्' यानें लोप झाला काय आणि 'तनादिभ्यः' यानें झाला काय, यांत काय फरक आहे?

यांत असा फरक आहे कीं 'ह्रस्वादङ्गात्' यानें सिचाचा लोप व्हावयाचा असतां त्या सिज्लोपाला असिद्धत्व (८।२।१) असल्यामुळें 'स्यसिच्०' (६।४।६२) यानें चिण्वद्भाव होऊं शकतो. आणि तनादिभ्यः यानें सिचाचा लुक् व्हावयाचा असला तर तो सिद्ध असल्यामुळें चिण्वद्भाव होणार नाहीं.

'तनादिभ्यः' यानेंही सिचाचा लुक् केला तरी चिण्वद्भाव होतो.

तो कसा?

असा की तो लुक् वैकल्पिक आहे. तेव्हां ज्या वेळीं सिज्लुक् करावयाचा नाहीं तेव्हां सिज्लोप प्राप्त होईल. तेथें सिज्लोपाला असिद्धत्व असल्यामुळें विकल्पानें चिण्वद्भाव होईल.

(सू.८०) या सूत्रानें सांगितलेल्या अकारा-

२. म्हणजे कृधातूला तनादिगणप्रयुक्त कार्य लागू नये असें सुचविण्यासाठीं कृधातूचें पार्थक्यानें ग्रहण केलें आहे.

३. या सूत्रानें तनादिगणांतील धातूंच्या पुढील सिच्प्रत्ययाचा लुक् सांगितला आहे.

४. कर्मणिप्रयोगामध्यें कृधातूचें लुङ्, मध्यमपुरुष, एकवचनाचें रूप अकृथाः असें होतें. तेथें एकदा चिण्वद्भाव होऊन अकारिषाः असेंही दुसरें रूप होत असतें.

१. कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें

लोपोऽस्य भवत्यतो लोप आर्धधातुक इति। यदि न क्वचिच्छ्रूयते किमर्थमत्वमुच्यते नलोप एवोच्येत। नैवं शक्यम्। लोपे हि सति गुणः प्रसज्येत। अत्वे पुनः सत्यकारलोपस्य स्थानिवद्भावाद्गुणो न भवति॥ ननु च लोपेऽपि सति न धातुलोप आर्धधातुके [१.१.४] इति प्रतिषेधो भविष्यति। आर्धधातुकनिमित्ते लोपे स प्रतिषेधो न चैष आर्धधातुकनिमित्तो लोपः। अपि च प्रत्याख्यायते स योगः। तस्मिन्प्रत्याख्याते गुण स्यादेव। तस्मादत्वं वक्तव्यम्॥

अथ किमर्थं नुमनुषक्तयोर्ग्रहणं क्रिय न धिविकृण्व्योरित्येवोच्येत। धिविकृण्व्यो रित्युच्यमानेऽत्वे कृतेऽनिष्टे देशे नुम्प्रस ज्येत। इदमिह संप्रधार्यम्। अत्वं क्रि यतां नुमिति किमत्र कर्तव्यम्। परत्वा न्नुमागमः। अन्तरङ्गमत्वम्। कान्त रङ्गता। प्रत्ययोत्पत्तिसंनियोगेनात्वमुच्य उत्पन्ने प्रत्यये प्रकृतिप्रत्ययावाश्रित्याङ्गस

---

देशाचें कोठें बरें श्रवण होतें?

कोठेंही या अकाराचें श्रवण होत नाहीं. कारण 'अतो लोपः' (६।४।४८) यानें आर्धधातुक उप्रत्यय पुढें असल्यामुळें या अकाराचा लोप होतो.

जर कोठेंही या अकाराचें श्रवण होत नाहीं तर कशाकरितां या अकाराचें विधान केलें आहे? अर्थात् अकाराचें विधान नको. तर वकाराचा लोपच सांगावा.

धिन्विकृण्व्योर्लोपः असें म्हणणें शक्य नाहीं. कारण लोपाचें विधान केलें असतां लघूपधगुण (७।३।८६) होऊं लागेल. आणि अकाराचें विधान केलें असतां त्याचा जरी लोप होतो तरी पण त्या लोपाला स्थानिवद्भाव (१।१।५७) झाल्यामुळें लघूपधगुण होणार नाहीं.

पण लोपाचें विधान केलें तरी देखील 'न धातुलोपे०' (१।१।४) यानें गुणाचा निषेध होईल.

आर्धधातुकाच्या निमित्तानें लोप झाला असतां तो निषेध प्रवृत्त होतो.

आणि हा प्रकृतलोप तर उप्रत्ययाबरोबर सांगितला असल्यामुळें आर्धधातुकनिमित्तक नव्हे. शिवाय 'न धातुलोप०' या सूत्राचें प्रत्याख्यान केलें जात आहे. तेव्हां लोपा विधान केलें असतां गुण हा होईलच. एकं रीत 'अ च' असें अकारादेशाचेंच विधा केले पाहिजे.

आतां धिन्व् आणि कृण्व् असें नुमाग (७।१।५८) सहिताचें ग्रहण कां बरें केलें आहे धिविकृण्व्योः असेंच कां म्हटलें नाहीं?

धिविकृण्व्योः असा निर्देश केला अस पूर्वीच अकारादेश होईल. आणि त्यानंत होणारा नुमागम अनिष्ट प्रदेशीं म्ह. त अकारादेशाच्या पुढें करावा लागेल.

पण येथें अगोदर असा विचार करा की प्रथमतः नुमागम करावा किंवा अकार देश करावा.

मग काय बरें पूर्वी करावें?

पर असल्यामुळें प्रथमतः नुमागम करावा.

पण नुमागमापेक्षां अकारादेश हा अंतरं आहे.

तो अकारादेश अंतरंग कसा?

उप्रत्ययाच्या बरोबरच अकारादेशा विधान केलें आहे, आणि उप्रत्ययाची उत्प झाल्यानंतर त्या प्रकृतिप्रत्ययांचा आध घेऊन अंगसंज्ञा झाल्यानंतर नुमागम प्रा होत आहे.

---

असतांना धिन्व् आणि कृण्व् या दोन धातूंहून उप्रत्यय होतो आणि या धातूंच्या वकाराला अकारादेश होतो; उदा०— धिनोति, कृणोति.

नुमागमः । नुमप्यन्तरङ्गः । कथम् । वक्ष्यत्येतन्नुम्विधावुपदेशिवद्वचनं प्रत्ययविध्यर्थमिति । उभयोरन्तरङ्गयोः परत्वान्नुमागमः । तस्माद्धिविकृण्व्योरिति वक्तव्यम् ॥

[क्र्यादिभ्यः श्ना ॥ ३ । १ । ८१ ॥

स्तम्भुस्तुम्भुस्कम्भुस्कुम्भुस्कुञ्भ्यः श्नुश्च ॥ ३ । १ । ८२ ॥]

हलः श्नः शानज्झौ ॥ ३ । १ । ८३ ॥

किमर्थः शकारः । शित्सार्वधातुकमिति सार्वधातुकसंज्ञा सार्वधातुकमपिदिति ङित्त्वं ङितीति प्रतिषेधो यथा स्यात् । कुषाण पुषाणेति ॥ अत उत्तरं पठति ।

**श्नाविकारस्य शित्करणानर्थक्यं स्थानिवत्त्वात् ॥ १ ॥**

श्नाविकारस्य शित्करणमनर्थकम् । किं कारणम् । स्थानिवत्त्वात् । शितोऽयमादेशः स्थानिवद्भावाच्छिद्भविष्यति ॥

**अर्थवत्तु ज्ञापकं सार्वधातुकादेशेऽनुबन्धास्थानिवत्त्वस्य ॥ २ ॥**

अर्थवत्तु श्नाविकारस्य शित्करणम् । कोऽर्थः । ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्यः सार्वधातुकादेशेऽनुबन्धा न स्थानिवद्भवन्तीति ॥ किमेतस्य

---

नुमागमही अंतरंगच आहे.

तो कसा ?

असा की नुम्विधावुपदेशिवद्वचनं प्रत्ययविध्यर्थम् (७।१।५८, वा.१) असें पुढें सांगणार आहे. तेव्हां उपदेशकालींच नुमागमाची प्राप्ति येत असल्यामुळें तोही अंतरंगच आहे. त्या दोन अंतरंगशास्त्रांमध्यें परत्वास्तव नुमागम अगोदर होईल. तेव्हां 'धिविकृण्व्योः' असें नुमागमरहित सूत्र पठन करावें.

कांहीं हरकत नाहीं.

(सू.८३) शानच् या आदेशामध्यें इत्संज्ञक शकार कशाकरितां जोडला आहे ?

'तिङ्शित्०' (३।४।११३) यानें त्या आदेशाला सार्वधातुक संज्ञा होऊन नंतर 'सार्वधातुकमपित्' (१।२।४) यानें त्या सार्वधातुकाला ङित्त्व आणि त्या ङित्त्वामुळें 'क्ङिति च' (१।१।५) यानें अंगाला प्राप्त असलेल्या गुणाचा (७।३।८६) निषेध व्हावा यासाठीं शकार जोडला आहे; उदा०– कुषाण[2], पुषाण.

हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात–

(वा.१) श्नाविकरणाचा आदेश जो शानच् त्यांतील शकाराचा उपयोग होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की शित् अशा श्नाप्रत्ययाचे ठिकाणीं शानच् आदेश सांगितला असल्यामुळें स्थानिवद्भावानें (१।१।५६) तो शित् समजला जाईल.

(वा.२) शानच् आदेशांतील शकाराचा उपयोग आहे.

तो कोणता ?

कांहीं एका विशिष्ट गोष्टीचें ज्ञापन करणें हाच उपयोग होय.

तें काय ज्ञापन करण्यांत येत आहे ?

सार्वधातुकाचे स्थानीं होणाऱ्या आदेशांना स्थानिवद्भावानें स्थानीसारखे इत्संज्ञक समजूं नयेत, असें आचार्य ज्ञापन करीत आहेत.

---

१. कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना क्र्यादिगणांतील धातूहून श्नाप्रत्यय होतो; उदा०– क्रीणाति क्रीणीते.

१. कर्तरिप्रयोगामध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना स्तम्भ् वगैरे सूत्रपठित चार धातु आणि स्कुञ्धातु यांहून श्नुप्रत्यय किंवा श्नाप्रत्यय होतो; उदा०– स्तभ्नोति स्तभ्नाति.

१. व्यंजनापुढील श्नाप्रत्ययाला शानच् असा आदेश होतो, हिप्रत्यय पुढें असतांना; उदा०– गृहाण.

२. कुष् व पुष् या धातूंहून लोट्, सिप्, हिआदेश, मध्यें श्नाविकरण, त्याचे स्थानीं प्रकृत सूत्रानें शानजादेश, आणि पुढील हिप्रत्ययाचा लुक् (६।४।१०५) झाला आहे.

ज्ञापने प्रयोजनम् ।

## प्रयोजनं हितातङोरपित्त्वम् ॥ ३ ॥

हेः पित्त्वं न प्रतिषेध्यम् । पितोऽयमादेशः स्थानिवद्भावात्पित्स्यात् । सार्वधातुकादेशेऽनुबन्धा न स्थानिवद्भवन्तीति नायं पिद्भविष्यति ॥ तातङि च ङकारो नोच्चार्यो भवति । पितोऽयमादेशः स्थानिवद्भावात्पित्स्यात् । सार्वधातुकादेशेऽनुबन्धा न स्थानिवद्भवन्तीति नायं पिद्भविष्यति ॥

## तबादिषु चाङित्त्वम् ॥ ४ ॥

तबादिषु चाङित्त्वं प्रयोजनम् शृणोत ग्रावाणः । ङित इम आदेश स्थानिवद्भावान्ङितः स्युः । सार्वधातुक देशेऽनुबन्धा न स्थानिवद्भवन्तीति ने ङितो भवन्ति ॥

## तस्य दोषो मिप आदेशे पिदभावः ॥ ५ ॥

तस्यैतस्य लक्षणस्य दोषो मिप अ देशे पितोऽभावः । अचिनवम् असु

---

या ज्ञापनाचा काय उपयोग ?

(वा.३) 'सेर्ह्यपिच्च' (३।४।८७) या सूत्रानें हिआदेश सांगून त्याला जो पित्त्वाचा निषेध केला आहे तो करावयास नको. कारण पित् अशा सिप्प्रत्ययाचा हा हिआदेश आहे. तो स्थानिवद्भावानें पित् समजला जाईल. परंतु सार्वधातुकाच्या आदेशांना स्थानिवद्भावानें स्थानीसारखे इत्संज्ञक समजूं नयेत असें सांगितल्यामुळें हा 'हि'आदेश पित् होणारच नाहीं. तेव्हां 'सेर्ह्यपिच्च' या सूत्रामध्यें 'अपित्' हा शब्द घालावयास नको. तसेंच तातङ् या आदेशामध्यें इत्संज्ञक ङकार जोडावयास नको. कारण पित्[3] अशा 'तु' शब्दाचा हा तातङ्-आदेश आहे. तो स्थानिवद्भानें पित् समजला जाईल. पण सार्वधातुकाच्या आदेशांना स्थानिवद्भावानें स्थानीसारखे इत्संज्ञक समजूं नयेत असें सांगितलें असल्यामुळें तातङ् हा पित् समजला जाणार नाहीं.[4]

(वा.४) 'तप्तनप्तनथनाश्च' (७।१।४५) सूत्रानें सांगितलेले जे तप्, तनप्, वगैरे आदे त्यांचे ठिकाणीं ङित्त्वाचा प्रतिषेध करावय नको; जसें– 'शृणोत[5] ग्रावाणः'. ङित् असा मध्यमपुरुषीं बहुवचनीं तप्रत्यय त्याचे स्थानीं तप् वगैरे आदेश सांगितले आहेत म्हणून स्थानिवद्भावानें ङित् समजले जाण्याचा सं आहे. पण सार्वधातुकाच्या आदेशांना स्था वद्भावानें स्थानीसारखे इत्संज्ञक समजावया नाहींत, असें सांगितलें असल्यामुळें हे त वगैरे आदेश ङित् होणार नाहींतच.

(वा.५) मिप्प्रत्ययाचे ठिकाणीं केले आदेश स्थानिवद्भावानें पित् समजला जा तो तसा समजला जाणार नाहीं, असा या ज्ञा नावर दोष येत आहे; उदा०– अचिनव[6] अकरवम्. येथें मिप्प्रत्ययाचे स्थानीं केले

---

३. तिप् यांतील इकाराला उकार (३।४।८६) होऊन तो तु असा होतो म्हणून त्याला पित् असें म्हटलें आहे. हिआदेश (३।४।८७) अपित् असल्यामुळें त्याचे स्थानीं होणारा तातङादेश स्थानिवद्भावानें पित् होण्याचा मुळींच संभव नाहीं.

४. तेव्हां सार्वधातुकमपित् या सूत्रानेंच तातङ् हा ङित् समजला जाईल, म्हणून तातङ् यांतील ङकार नको.

५. श्रु श्रवणे, लोट्, मध्यम पुरुष, बहुवचन, थप्रत्यय, 'श्रुवः शृ च', शृ आदेश व श्नुप्रत्यय (३।१।७४), थप्रत्ययाचे ठिकाणीं तआदेश (३।४।१० त्या तआदेशाचे ठिकाणीं 'तप्तनप्तनथनाश्च' ( १।४५) यानें तप्आदेश, त्यामुळें नुप्रत्ययाला ग होऊन शृणोत असें रूप होतें. तप् हा आदेश f असल्यामुळें ङित्वाचा (१।२।४) प्रतिषेध होत आ

६. चिधातूहून लङ्, मिप्, श्नु, अडागम, मिप स्थानीं अमादेश, त्यामुळें नुप्रत्ययाला गुण, अव देश होऊन अचिनवम् असें रूप होतें. अकर येथें कृधातूहून उप्रत्यय विकरण झाला आहे.

वम् अकरवम् । पितोऽयमादेशः स्थानिवद्भावात्पिद्भवति । सार्वधातुकादेशेऽनुबन्धा न स्थानिवद्भवन्तीति नायं पित्स्यात् ॥ अत्यल्पमिदमुच्यते मिप आदेश इति । तिप्सिब्मिपामादेशा इति वक्तव्यम् । वेद वेत्थ ॥

विदेर्वसोः शित्त्वम् ॥ ६ ॥

विदेरुत्तरस्य वसोः शित्त्वं वक्तव्यम् । शितोऽयमादेशः स्थानिवद्भावाच्छिद्भवति । सार्वधातुकादेशेऽनुबन्धा न स्थानिवद्भवन्तीति नायं शित्स्यात् ॥

कित्करणाद्वा सिद्धम् ॥ ७ ॥

अथवावश्यमत्र सामान्यग्रहणाविघातार्थः ककारोऽनुबन्धः कर्तव्यः । क सामान्यग्रहणाविघातार्थेनार्थः । वसोः संप्रसारणम् [६.४.१३१] इति । तेनैव यत्नेन गुणो न भविष्यति ॥

अस्य ज्ञापकस्य सन्ति दोषाः सन्ति प्रयोजनानि । समा दोषा भूयांसो वा । तस्मान्नार्थोऽनेन ज्ञापकेन । कथं यानि

---

अमादेश (३।४।१०१) स्थानिवद्भावानें पित् समजला जातो. पण सार्वधातुकाच्या आदेशांना स्थानिवद्भावानें स्थानीसारखे इत्संज्ञक समजावयाचे नाहींत, असें ज्ञापन केलें असल्यामुळें हा अमादेश पित् होणार नाहीं.

ज्ञापनावर दोष दाखवितांना 'मिप आदेशे' असें म्हटलें आहे तें अगदींच अपुरें आहे. तेथें तिप् , सिप् , मिप् ,यांचे आदेश असें म्हटलें पाहिजे; उदा०– वेद, वेत्थ.

(वा.६) विद्धातूपुढील शतृप्रत्ययाचे ठिकाणीं केलेल्या वसुआदेशाला शित्त्वाचें विधान करावें. शकारेत्संज्ञक अशा शतृप्रत्ययाचे ठिकाणीं हा वसुआदेश केला असल्यामुळें स्थानिवद्भावानें तो शित् होण्याचा संभव आहे. पण सार्वधातुकाच्या आदेशांना स्थानिवद्भावानें स्थानीसारखे इत्संज्ञक समजूं नयेत, असें सांगितलें असल्यामुळें हा वसुआदेश शित् होणार नाहीं, म्हणून त्याला शित्त्व सांगितलें पाहिजे.

(वा.७) किंवा वसु या शब्दापासून क्वसु आणि वसु या उभयतांचेंही ग्रहण झालें पाहिजे, म्हणून वसुप्रत्ययाला इत्संज्ञक ककार अवश्य जोडला पाहिजे.

वसुशब्दापासून क्वसु आणि वसु या उभयतांचें ग्रहण झाल्याचा कोठें उपयोग आहे ? 'वसोः संप्रसारणम्' येथें. तेव्हां ककार जोडण्याच्या प्रयत्नानेंच विद्वान् इत्यादि स्थलीं गुणाचा प्रतिषेधही होईल.

आतां या ज्ञापनावर दोषही आहेत आणि त्याचे उपयोगही आहेत. त्यांत जितके उपयोग तितकेच दोष असतील किंबहुना जास्तही असतील. एकंदरींत दोषग्रस्त असल्यामुळें या ज्ञापन करण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

तर मग या ज्ञापनाचे जे उपयोग दाख-

---

७. पित् झाला नाहीं तर ङित् (१।२।४) होईल आणि गुणाचा निषेध (१।१।५) होईल.

८. विद्धातूहून लट्, तिप् आणि सिप्आदेश, त्यांना क्रमानें णल् आणि थल् हे आदेश (३।४।८३) व लघूपधगुण होऊन वेद, वेत्थ, अशीं रूपें होतात. येथें णल्, थल्, हे आदेश ज्ञापनामुळें पित् समजले नाहींत तर ङित् समजले जातील. आणि गुणाचा निषेध (१।१।५) होईल.

९. वसुप्रत्ययाला शित्त्वाचें विधान केलें असतां त्याला सार्वधातुक संज्ञा होते व त्यामुळें तो ङित् (१।२।४) समजला जाऊन गुणाचा निषेध होऊन विद्वस् असा शब्द सिद्ध होतो.

१०. वसोः संप्रसारणम् (६।४।१३१) येथील वसुशब्दानें क्वसु आणि वसु या दोन्ही प्रत्ययांचें ग्रहण झाल्यामुळें तस्थुषः आणि विदुषः या दोन्ही उदाहरणांमध्यें संप्रसारण सिद्ध होतें. ह्या वसुप्रत्ययाला ककार जोडला नाहीं तर सूत्रांतील वसोः ह्या शब्दानें ह्या वसुप्रत्ययाचेंच ग्रहण होईल आणि क्वसुप्रत्ययाला ककार जोडला असल्यामुळें त्याचें ग्रहण होणार नाहीं, व तस्थुषः इत्यादि क्वसुप्रत्ययान्त स्थलीं संप्र-

प्रयोजनानि। तानि क्रियन्ते न्यास एव॥ एवमपि भवेत्पित्करणसामर्थ्यात्पित्कृतं स्यान्ङित्करणसामर्थ्यान्ङित्कृतम्। यत्तु खलु पिति ङित्कृतं प्राप्नोति ङिति च पित्कृतं केन तन्न स्यात्। तस्माद्वक्तव्यं पिन्न ङिद्भवतीति ङिच्च न पिद्भवतीति॥ न वक्तव्यम्। एवं वक्ष्यामि। सार्वधातुकं ङिद्भवति पिन्न। एवं तावत्पितो ङित्त्वं प्रतिषिद्धम्। ततोऽसंयोगाल्लिट्किद्भवतीति ङिच्च पिन्न भवति। एवं ङितः पित्त्वं प्रतिषिद्धम्॥

## छन्दसि शायजपि ॥३।१।८४॥

## शायच्छन्दसि सर्वत्र ॥ १ ॥

शायच्छन्दसि सर्वत्रेति वक्तव्यम्। क सर्वत्र। हौ चाहौ च। किं प्रयोजनम्। मही अस्कभायत् यो अस्कभायत्

---

विले आहेत त्यांची काय वाट ?

त्याची वाट सूत्रामध्यें केलेलीच[११] आहे.

तरीही जेथें पित्करण केलें असेल तेथें त्याच्या जोरावर पिताचें कार्य होईल. आणि जेथें ङित्करण केलें असेल तेथें त्याच्या जोरावर ङिताचें कार्य होईल.

पण पित्प्रत्ययाचे ठिकाणीं जें ङित्त्वप्रयुक्तकार्य[१२] प्राप्त होतें आणि ङित्प्रत्ययाचे ठिकाणीं जें पित्त्वप्रयुक्तकार्य प्राप्त होतें तें काय कारणामुळें होणार नाहीं ? अर्थात् होऊं लागेलच. म्हणून 'जो पकारेत्संज्ञक तो ङकारेत्संज्ञक समजूं नये आणि जो ङकारेत्संज्ञक तो पकारेत्संज्ञय समजूं नये', असे वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण 'सार्वधातुकमपित्' (१।२।४) या सूत्रामध्यें 'सार्वधातुकम्' असा योगविभाग करावा. सार्वधातुक प्रत्यय ङित् समजावा असा त्याचा अर्थ होय. अपित्[१३] याचा अर्थ पित् हा ङित् होत नाहीं असा होय. अशा रीतीनें पकारेत्संज्ञकाला ङित्त्वाचा प्रतिषेध सिद्ध झाला. त्याच्यापुढें 'असंयोगाल्लिट्कित्' हें सूत्र आहेच. अपित् याचा दुसरा अर्थ असा होतो की ङित् हा पित् होत नाहीं. अशा रीतीनें ङकारेत्संज्ञकाला पित्त्वाचा निषेध होतो.

(सू.८४, वा.१) वेदामध्यें सर्व ठिकाणीं श्नाप्रत्ययाचे ठिकाणीं शायच् आदेश होतो, असें वचन करावें.

सर्व ठिकाणीं म्हणजे कोठें ?

हिप्रत्यय पुढें असतांना किंवा नसतांनाही.

हिप्रत्यय पुढें नसतांनाही असें म्हणण्याचा काय उपयोग ?

'मही अस्कभायत्[२], यो अस्कभायत्, उद्गृ-

---

सारण होणार नाही.

११. सेर्ह्यपिच्च येथें अपित् असें सूत्रकारांनींच म्हटलें आहे. तसाच तातङ् याला ङकार आणि तप्, तनप् यांना पकार सूत्रकारांनींच जोडला आहे.

१२. अवेत् येथें लङाचे स्थानीं केलेल्या तिप्प्रत्ययाला पकार जोडल्याचे जोरावर पित्त्वावर अवलंबून असलेला अनुदात्त स्वर होवो. पण स्थानिवद्भावानें तिबादेशाला ङित्त्व असल्यामुळें गुणनिषेध प्राप्त होतो. तसेंच भूतात् येथें तिपाचे स्थानी केलेल्या तातङ्आदेशाला पित्त्व असल्यामुळें अनुदात्त स्वर (३।१।३) आणि 'ब्रुव ईट्' (७।३।९३) यानें ईडागम हे होऊं लागतील.

१३. अपित् हा प्रसज्यप्रतिषेध आहे. त्यामुळें न, पित्, अशी दोन पदें धरतां येतात. ङित् या पदाची अनुवृत्ति आहे. पित् आणि ङित् यांपैकीं उद्देश्य अमुकच घ्यावे याविषयीं प्रमाण नसल्यामुळें पाळीपाळीनें दोन्ही उद्देश्य धरून दोन निरनिराळे वाक्यार्थ होतात. त्याची अशी व्यवस्था समजावी : एखाद्या प्रत्ययाला तिप्, सिप् असा प्रत्यक्ष पकार लावला असेल किंवा पित् होतो (३।४।९२) असें म्हटलें तेथें तो प्रत्यय स्थानिवद्भावानें ङित् होत नाहीं. याच्या उलट ज्या प्रत्ययाला तातङ् असा प्रत्यक्ष ङकार लावला असेल तो स्थानिवद्भावानें पित् होत नाहीं.

१. वेदामध्यें व्यंजनापुढील श्नाप्रत्ययाचे स्थानीं शायच्ही आदेश होतो; उदा०—गृभाय जिह्वया मधु.

२. स्कम्भ या सौत्रधातूहून लङ्, तिप्, श्ना, त्याला शायच्, अट्; असेंच ग्रह्धातु, लोट्, मध्यमपुरुष बहु-

उद्गृभायत उन्मथायतेत्यर्थम् ॥

**व्यत्ययो बहुलम् ॥ ३ । १ । ८५ ॥**

योगविभागः कर्तव्यः । व्यत्ययो भवति स्यादीनामिति । आण्डा शुष्णस्य भेदति । भिनत्तीति प्राप्ते । स च न मरति । म्रियत इति प्राप्ते ॥ ततो बहुलम् । बहुलं छन्दसि विषये सर्वे विधयो भवन्तीति । सुपां व्यत्ययः । तिङां व्यत्ययः । वर्णव्यत्ययः । लिङ्गव्यत्ययः । कालव्यत्ययः । पुरुषव्यत्ययः । आत्मनेपदव्यत्ययः । परस्मैपदव्यत्यय इति ॥ सुपां व्यत्ययः । युक्ता मातासीद्धुरि दक्षिणायाः । दक्षिणायामिति प्राप्ते ॥ तिङां व्यत्ययः । चषालं ये अश्वयूपाय तक्षति । तक्षन्तीति प्राप्ते ॥ वर्णव्यत्ययः । त्रिष्टुभौजः शुभितमुग्रवीरम् । शुधितमिति प्राप्ते ॥ लिङ्गव्यत्ययः । मधोर्गृह्णाति । मधोस्तृप्ता इवासते । मधुन इति प्राप्ते ॥ कालव्यत्ययः । श्वोऽग्नीनाधास्यमानेन । श्वः सोमेन यक्ष्यमाणेन । आधाता यष्टेत्येवं प्राप्ते ॥ पुरुषव्यत्ययः । अधा स वीरैर्दशभिर्वियूयाः । वियूयादिति प्राप्ते ॥ आत्मनेपदव्यत्ययः । ब्रह्मचारिणमिच्छते । इच्छतीति प्राप्ते ॥ परस्मैपदव्यत्ययः ।

---

भायत, उन्मथायत, वगैरे ठिकाणीं शायच् आदेश होणें हा उपयोग होय.

(सू.८५) ह्या सूत्राचा विभाग करावा. 'व्यत्ययः' हें पहिलें सूत्र होय. वेदामध्यें स्य वगैरे विकरणप्रत्ययांचा व्यत्यय होतो; जसें:—'आण्डा शुष्मस्य भेदति' येथें भिनत्ति असा श्नम्प्रत्यय प्राप्त झाला होता. तसेंच स च न मरति येथें म्रियते असें प्राप्त झालें होतें. नंतर 'बहुलम्' असें दुसरें सूत्र होय. वेदामध्यें सर्वच विधि बाहुल्येंकरून होतात. तेव्हां वेदामध्यें सुप्प्रत्ययांचा व्यत्यय होतो, तिङ्प्रत्ययांचा व्यत्यय होतो, वर्णांचा व्यत्यय होतो, लिंगाचा व्यत्यय होतो, पुरुषाचा व्यत्यय होतो, कालाचा व्यत्यय होतो, आत्मनेपदाचा व्यत्यय होतो, आणि परस्मैपदाचा व्यत्यय होतो. उदा०— युक्ता मातासीद्धुरि दक्षिणायाः येथें सुप्प्रत्ययाचा व्यत्यय झाला आहे. दक्षिणस्याम् अशी सप्तमी घालावयाची ती व्यत्ययानें तिच्या ऐवजीं षष्ठीच घातली आहे. चषालं ये अश्वयूपाय तक्षति येथें तिङ्प्रत्ययाचा व्यत्यय झाला आहे. तक्षन्ति असें बहुवचन घालावयाचें तें व्यत्ययानें एकवचन घातलें आहे. त्रिष्टुभौजः शुभितमुग्रवीरम् येथें वर्णाचा व्यत्यय झाला आहे. शुभितम् हा शुध्धातूच्या धकाराच्या ऐवजीं भकार घातला आहे. मधोस्तृप्ता इवासते येथें लिङ्गाचा व्यत्यय केला आहे. मधुनः असें नपुंसकलिंग घालावयाचें असतां मधोः असें पुंल्लिंग घातलें आहे. अधा स वीरैर्दशभिर्वियूयाः. येथें पुरुषाचा व्यत्यय आहे. वियूयात् असा प्रथमपुरुष घालावयाचा तो वियूयाः असा मध्यमपुरुष घातला आहे. श्वोऽग्नीनाधास्यमानेन, श्वः सोमेन यक्ष्यमाणेन, येथें कालाचा व्यत्यय झाला आहे. आधाता, यष्टा, असा अनद्यतन भविष्यकाळीं लुट्प्रत्यय घालावयाचा तो सामान्य भविष्यकाळीं लृट्प्रत्यय घातला आहे. ब्रह्मचारिणमिच्छते येथें आत्मनेपदाचा व्यत्यय झाला आहे. इच्छति असें परस्मैपद घालावयाचें तें इच्छते असें

---

वचन थप्रत्ययाचे ठिकाणीं त आदेश, श्ना, शायच्. हृग्रहोर्भः० (८।२।३२, वा.१) यानें हकाराचे स्थानीं भकारादेश झाला आहे.

१. वेदामध्यें बाहुल्येंकरून विकरणांचा व्यत्यय होतो, म्हणजे ज्या गणाचा जो विकरणप्रत्यय तो न होतां तेथें दुसऱ्याचें गणाचा विकरण होतें, व क्वचित् स्थलीं दोन किंवा तीनही विकरण होतात; उदा०:— आण्डा शुष्मस्य भेदति, इन्द्रो वस्तेन नेषतु, इन्द्रेण युजा तरुषेम वृत्रम्. भेदति येथें श्नम्विकरण प्राप्त असतां शप् केला आहे. नेषतु येथें सिप् आणि शप् असे दोन विकरण केले आहेत. तरुषेम येथें उ, सिप् आणि शप् असे तीन विकरण केले आहेत.

प्रतीपमन्य ऊर्मिर्युध्यति । युध्यत इति प्राप्ते ॥

सुप्तिङुपग्रहलिङ्गनराणां कालहल्‌चस्वरकर्तृयङां च ।
व्यत्ययमिच्छति शास्त्रकृदेषां सोऽपि च सिध्यति बाहुलकेन ॥

**लिङ्याशिष्यङ् ॥ ३ । १ । ८६ ॥**

अयमाशिष्यङ्विधीयते । तस्य किं प्रयोजनम् ।

**आशिष्यङः प्रयोजनं स्थागागमिवचिविदयः ॥ १ ॥**

स्था । उपस्थेयं वृषभं तुग्रियाणाम् । स्था ॥ गा । अञ्जसा सत्यमुपगेयम् । गा ॥ गमि । यज्ञेन प्रतिष्ठां गमेयम् । गमि ॥ वचि । मन्त्रं वोचेमाग्नये । वचि ॥ विदि । विदेयमेनां मनसि प्रविष्टाम् ॥

शकिरुहोश्चेति वक्तव्यम् । शकेम त्वा समिधम् । अस्त्रवन्तीमारुहेमा स्वस्तये ॥

**दृशेरग्पितरं च दृशेयं मातरं च ॥२॥**

दृशेरग्वक्तव्यः पितरं च दृशेयं मातरं च दृशेयमित्येवमर्थम् ॥

इह उपस्थेयामेत्याडपि वक्तव्यो न ह्यङैव सिध्यति ॥ न वक्तव्यः । सार्वधातुकत्वात्सलोप आर्धधातुकत्वादेत्वं तत्रोभयलिङ्गत्वात्सिद्धम् ॥

इति व्या. म. अ. ३. पा. १. आ. ४.

---

आत्मनेपद घातलें आहे. प्रतीपमन्य ऊर्मिर्युध्यति येथें परस्मैपदाचा व्यत्यय झाला आहे. युध्यते असें आत्मनेपद घालावयाचें असतां युध्यति असें परस्मैपद घातलें आहे.

सुप्प्रत्यय, तिङ्प्रत्यय, परस्मैपद, आत्मनेपद, लिंग, पुरुष, काल, हल् व अच् हे वर्ण, उदात्त वगैरे स्वर, कारक आणि यक्प्रत्ययांतील (३।१।२७) यशब्दापासून पुढील सूत्रांतील ङकारापर्यंत जो यङ्प्रत्याहार त्यांतील प्रत्यय इतक्यांचा व्यत्यय होतो तो शास्त्रकाराला इष्ट आहे. तो बहुलग्रहणानें साधतो.

(सू.८६) ह्या सूत्रानें आशीर्लिङ् पुढें असतांना जो अङ् सांगितला आहे त्याचा काय उपयोग ?

(वा.१) आशीर्लिङ् पुढें असतांना सांगितलेल्या ह्या अङाचा उपयोग स्था, गा, गम्, वच् आणि विद् या धातूंचे ठिकाणीं होतो. स्थाधातूचें उदाहरणः– उपस्थेयं वृषभं तुग्रियाणाम्. गाधातूचें उदा०ः– अञ्जसा सत्यमुपगेयम्. गम्धातूचें उदाहरणः– यज्ञेन प्रतिष्ठां गमेयम्. वच्धातूचें उदा०ः–मन्त्रं वोचेमाग्नये. विद्धातूचें उदा०ः– विदेयमेनां मनसि प्रविष्टाम्. शक् आणि रुह् या धातूंहूनही अङ्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०ः– शकेम त्वा समिधम्, अस्त्रवन्तीमारुहेमा स्वस्तये.

(वा.२) दृश्धातूहून आशीर्लिङ् पुढें असतांना अक् असा विकरणप्रत्यय होतो असें म्हणावें. कारण पितरं च दृशेयम् मातरं च दृशेयम् हीं उदाहरणें साधलीं पाहिजेत.

आता उपस्थेयाम या क्रियापदामध्यें मप्रत्ययाला आडागम होतो असेंही म्हटलें पाहिजे. कारण नुसता विकरण अङ्प्रत्यय करून येथें भागत नाहीं.

आडागम सांगावयास नको. कारण उपस्थेयाम या क्रियापदामध्यें तिङ्प्रत्ययाला सार्वधातुकसंज्ञा असल्यामुळें सकाराचा लोप (७।२।७९) करावा आणि आर्धधातुकसंज्ञा असल्यामुळें एत्व (६।४।६७) करावें. तेव्हां येथें दोन्ही संज्ञांचीं चिन्हें दृष्टीस पडतात, म्हणून दोन्ही संज्ञा केल्या असतां हें उदाहरण सिद्ध होत आहे.

येथें व्या. म. च्या ३ अध्यायांतील १ ल्या पादांतील चौथें आन्हिक समाप्त झालें.

---

१. वेदामध्यें आशीर्लिङ् पुढें असतांना धातूहून विकरण अङ्प्रत्यय होतो; उदा०– उपस्थेयम्. येथें अङ्प्रत्ययामुळें मागील आकाराचा लोप (६।४।६४) एकाच प्रत्ययाला निरनिराळ्या कार्याकरितां दोन्ही संज्ञा (३।४।११७) सांगितल्या आहेत. तात्पर्य, उपस्थेयाम येथें आडागम तर सांगावयास नकोच, पण

## कर्मवत्कर्मणा तुल्यक्रियः ॥ ३ । १ । ८७ ॥

वत्करणं किमर्थम् । स्वाश्रयमपि यथा स्यात् । भिद्यते कुशूलेनेति । अकर्मकाणां भावे लो भवतीति भावे लो यथा स्यात् ॥ कर्मणेति किमर्थम् । करणाधिकरणाभ्यां तुल्यक्रियः कर्ता यः स कर्मवन्मा भूत् । साध्वसिश्छिनत्ति । साधु स्थाली पचति ॥ तुल्यक्रिय इति किमर्थम् । पचत्योदनं देवदत्तः । तुल्यक्रिय इत्यप्युच्यमानेऽत्र प्राप्नोति । अत्रापि हि कर्मणा तुल्यक्रियः कर्ता । न तुल्यक्रियग्रहणेन समानक्रिय-

---

(सू.८७) ह्या सूत्रामध्यें कर्मवत् असा कर्मशब्दापुढें वत्प्रत्यय कशाकरितां उच्चारला आहे ?

कर्त्याचें स्वतःवर अवलंबून असलेलें जें कार्य तेंही झालें पाहिजे; उदा०— भिद्यते कुशूलेन. येथें भिद्धातु हा अकर्मक समजून भाव या अर्थी लकार झाला पाहिजे. म्हणजे भावेप्रयोग करतां आला पाहिजे.

आतां येथें कर्मणा असें कशाकरितां म्हटलें आहे ?

करण किंवा अधिकरण यांची जी क्रिया तीच क्रिया असलेला जो कर्ता त्याला कर्मवद्भाव न झाला पाहिजे; उदा०— साध्वसिश्छिनत्ति, साधु स्थाली पचति.

आतां येथें तुल्यक्रियः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

'पचत्योदनं देवदत्तः' येथें देवदत्त या कर्त्याला कर्मवद्भाव न झाला पाहिजे.

पण तुल्यक्रियः असे म्हटलें तरी येथें कर्मवद्भाव प्राप्त होत आहे. कारण येथें कर्माच्या क्रियेशीं कर्त्याची क्रिया तुल्य आहेच.

दोघांची क्रिया समान पाहिजे असा तुल्य-

---

१. कर्मावर असणारी जी क्रिया तीच क्रिया ज्याची आहे असा जो कर्ता तो कर्माप्रमाणें समजावा; उदा० पच्यते तण्डुलः. येथें देवदत्त हा कर्ता आहे आणि तण्डुल हें कर्म आहे. त्या तंडुलावर जी कांहीं क्रिया आहे तीच क्रिया ज्याची आहे असा कर्ता म्ह. अर्थात् तंडुलच कर्ता असला पाहिजे. कारण तंडुलाची क्रिया तंडुलामध्येंच असणार. तेव्हां देवदत्त या कर्त्याची अविवक्षा करून तडुलच जेव्हां कर्त्याच्या ऐवजीं गृहीत धरला असेल तेव्हां तो धातु अकर्मक होतो. त्याचा अकर्मक कर्तरिप्रयोग 'पच्यते तण्डुलः' असा होतो. येथें तसा जो कर्माचा झालेला कर्ता तो प्रकृत सूत्रानें कर्माप्रमाणें समजला म्हणजे पच्यते येथील लकार जो तंडुल या कर्त्याचा वाचक आहे तो कर्माचाही वाचक आहे असें म्हणतां येते. म्हणून कर्मणिप्रयोगासारखीं कार्यें यक् (३।१।६७), आत्मनेपद (१।३।१३), चिण् (३।१।६६) आणि चिण्वद्भाव (६।४।४२) हीं ह्या कर्मकर्तरिप्रयोगांत होतात. जसा तंडुल हा कर्ता झाला म्हणून धातु अकर्मक होत असल्यामुळें पच्यते तण्डुलः हा अकर्मक कर्तरिप्रयोग होतो तसा त्याचा पच्यते तण्डुलेन असा भावेप्रयोगही होतो.

२. वत्शब्द न उच्चारला तर कर्ता हा कर्मच समजावा असा सूत्राचा अर्थ होईल. तेव्हां कर्म असल्यामुळें धातु अकर्मक आहे असें म्हणतां येणार नाहीं. कर्ता हा वस्तुतः कर्ता असला तरी कर्ता समजून कांही कार्य करतां येत नाहीं, आणि वत् हा शब्द उच्चारला म्हणजे कर्ता हा कर्मासारखा समजावा असा अर्थ होतो. तेव्हां कर्ता ही गोष्ट न सोडतां कर्माप्रमाणें समजून कार्यें होतील आणि कर्ता गृहीत धरून धातु अकर्मक समजून भावेप्रयोग होईल. कर्त्याहून तृतीया होऊन तण्डुलेन पच्यते असें होईल.

३. असि म्ह. तरवार; ती इतकी उत्तम आहे की स्पर्श झाली की दोन तुकडे झालेच. कर्ता असला पाहिजे हे खरे, तरी पण तो नुसता नाममात्र आहे अशी विवक्षा असतांना असि हाच कर्ता घेऊन 'असिश्छिनत्ति काष्ठम्' असा सकर्मक कर्तरिप्रयोग होतो. येथें कर्मवद्भाव झाला तर 'छिद्यते' असा प्रयोग होऊं लागेल. मागें (३।१।४८ टीप ३) पहा.

४. कारण ज्या क्रियेचें ओदन हें कर्म आहे त्याच क्रियेचा देवदत्त हा कर्ता आहे.

त्वमभिसंबध्यते। किं तर्हि। यस्मिन्कर्मणि कर्तृभूतेऽपि तद्वत्क्रिया लक्ष्यते यथा कर्मणि स कर्मणा तुल्यक्रियः कर्ता कर्मवद्भवतीति ॥

**कर्मवदकर्मकस्य कर्ता ॥ १ ॥**

अकर्मकस्य कर्ता कर्मवद्भवतीति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। सकर्मकस्य कर्ता कर्मवन्मा भूदिति। भिद्यमानः कुशूलः पात्राणि भिनत्ति ॥ तथा

**कर्म दृष्टश्चेत्समानधातौ ॥ २ ॥**

कर्म दृष्टश्चेत्समानधाताविति वक्तव्यम्। इह मा भूत्। पचत्योदनं देवदत्तः। राध्यत्योदनः स्वयमेव ॥ तथा

**कर्मस्थभावकानां कर्मस्थक्रियाणां च ॥ ३ ॥**

कर्मस्थभावकानां कर्मस्थक्रियाणां वा

---

क्रिय या शब्दाचा अर्थ नाहीं. तर कर्म असा जो पदार्थ तो कर्ता या रूपानें विवक्षित असतां कर्मावस्थेंत असतांना जशी त्यामध्यें क्रिया होती तशीच येथ क्रिया त्यामध्यें कर्ता या अवस्थेंतही दाखविण्याची असेल तर तो कर्ता तेथें कर्माशीं तुल्यक्रिय समजला जातो व त्यालाच कर्मवद्भाव होतो.

(वा.१) अकर्मक धातु असेल तरच कर्त्याला कर्मवद्भाव होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

सकर्मक धातु असेल तर कर्त्याला कर्मवद्भाव होऊं नये हा उपयोग होय; जसेः— भिद्यमानः कुशूलः पात्राणि भिनत्ति. तसेंच

(वा.२) ज्या धातूच्या कर्त्याला कर्मवद्भाव करावयाचा तो कर्ता त्याच धातूचा कर्म अशा रूपानें दृष्ट असला पाहिजे असें म्हणावें. पचत्योदनं देवदत्तः, राध्यत्योदनः स्वयमेव, येथें कर्मवद्भाव न झाला पाहिजे.

(वा.३) कर्मस्थभावक किंवा कर्मस्थक्रियक धातु असेल तरच त्याच्या कर्त्याला कर्मव-

---

५. कर्माला कर्त्याची विवक्षा केल्यानंतरही जर तो धातु दुसऱ्या निराळ्या कर्मामुळें सकर्मक असेल तर तेथें कर्मवद्भाव होत नाहीं. कुशूल म्हणजे कणिंग. ती स्वतः भिद्यमान होत असतांना आंतील पात्रांचा भेद करते असा या उदाहरणाचा अर्थ आहे.

६. भात स्वतःच सिद्ध होतो असा या उदाहरणाचा अर्थ आहे. पचत्योदनम् यांतील पच्धातूचें जें कर्म तेंच येथें कर्ता आहे. पण तो कर्ता राध्धातूचा आहे. तो ओदन हा कर्ता 'राध्धातूचें कर्म' अशा रूपानें दृष्ट नाहीं.

७. धातूचा अर्थ व्यापार असतो, आणि कर्ताच तो व्यापार करीत असतो. ज्या ठिकाणी तो व्यापार करीत असतांना त्या व्यापारामुळें कर्त्याचें चलनवलन होत असेल तेथें त्या धातूला 'कर्तृस्थक्रियक' म्हणतात. त्या ठिकाणच्या कर्त्याच्या व्यापाराला क्रिया असें म्हटलें आहे. आणि चलनवलन होत नसेल तर त्या धातूला कर्तृस्थभावक म्हणतात. त्या ठिकाणच्या कर्त्याच्या व्यापाराला भाव असें म्हटलें आहे. हे कर्तृस्थक्रियक आणि कर्तृस्थभावक धातु सकर्मक धातूंमध्येंही असतात आणि अकर्मक धातूंमध्येंही असतात. कर्मस्थभावक आणि कर्मस्थक्रियक धातु मात्र सकर्मक धातूंमध्येंच संभवतात. कर्त्याच्या व्यापारामुळें कर्माच्या स्वरूपांत किंवा आकारांत कांहीं फरक दृष्टीस पडत असेल तर तेथें त्या धातूला कर्मस्थक्रियक किंवा कर्मस्थभावक म्हणतात. इतर ठिकाणीच कर्तृस्थभावक किंवा कर्तृस्थक्रियक म्हणतात. बालम् आसयति म्ह. बसवितो, शाययति म्ह. निजवितो, येथें कर्त्याच्या व्यापारानें मुलाच्या आकारांत फरक दिसतो, परंतु मुलाच्या हालचालीचा बसविण्याच्या कामीं किंवा निजविण्याच्या कामीं उपयोग होत नाही. म्हणून तेथें कर्मस्थभावक म्हणतात. गाम् अवरुणद्धि येथें बांधल्यामुळें गाईच्या आकारांत फरक दिसतो आणि बांधण्याच्या कामी गाईच्या हालचालीचा उपयोगही होतो, म्हणून तेथें धातूला कर्मस्थक्रियक म्हणतात. कटं करोति येथें असेंच आहे. कट नवीन उत्पन्नच होत असल्यामुळें स्वरूपांत फरक आहेच. आणि कामट्या लवचिक असल्यामुळें त्यांची हालचालही त्या कामीं उपयोगीं पडत आहे. चिन्तयति, मन्त्रयते, येथें चिन्ता करतांना किंवा मसलत करतांना कर्त्यांच्या हालचालीचा कांहीं उपयोग नाहीं, म्हणून तेथें धातूला

कर्ता कर्मवद्भवतीति वक्तव्यम्। कर्तृस्थभावकानां कर्तृस्थक्रियाणां वा कर्ता कर्मवन्मा भूदिति ॥

यत्तावदुच्यतेऽकर्मकस्य कर्ता कर्मवद्भवतीति वक्तव्यमिति न वक्तव्यम्। वक्ष्यत्येतत्सकर्मकाणां प्रतिषेधोऽन्योऽन्यमाश्लिष्यत इति ॥ यदप्युच्यते कर्म दृष्टश्चेत्समानधाताविति वक्तव्यमिति न वक्तव्यम्। धातोरिति वर्तते। धातोः कर्मणः कर्तुरयं कर्मवद्भावोऽतिदिश्यते। तत्र संबन्धादेतद्गन्तव्यं यस्य धातोर्यत्कर्म तस्य चेत्कर्ता स्यादिति। तद्यथा। धातोः कर्मण्यणभवतीति। तत्र संबन्धादेतद्गम्यते यस्य धातोर्यत्कर्मेति। इह मा भूत्। आहर कुम्भं करोति कटमिति ॥ यदप्युच्यते कर्मस्थभावकानां कर्मस्थक्रियाणां वा कर्ता कर्मवद्भवतीति वक्तव्यं कर्तृस्थभावकानां कर्तृस्थक्रियाणां वा कर्ता कर्मवन्मा भूदिति न वक्तव्यम्। कर्मस्थया क्रिययायं कर्तारमुपमिमीते न च कर्तृस्थभावकानां कर्तृस्थक्रियाणां वा कर्मणि क्रियायाः प्रवृत्तिरस्ति ॥

---

र्भाव होतो असें म्हणावें. कारण कर्तृस्थभावक आणि कर्तृस्थक्रियक अशा धातूंच्या कर्त्याला कर्मवद्भाव न झाला पाहिजे. आसयति देवदत्तम्, शाययति देवदत्तम्, स्थापयति देवदत्तम्, या प्रयोगांतील धातु कर्मस्थभावक आहेत. गामवरुणद्धि, करोति कटम्, या प्रयोगांतील धातु कर्मस्थक्रियक आहेत. चिन्तयति, मन्त्रयते, हे धातु कर्तृस्थभावक होत आणि गच्छति, धावति, हसति, हे धातु कर्तृकक्रियक होत.

आतां अकर्मक धातु असेल तरच कर्त्याला कर्मवद्भाव होतो (वा.१) असें जें म्हटलें आहे तें म्हणावयास नको. कारण 'सकर्मकाणां प्रतिषेधोऽन्योन्यमाश्लिष्यतः' (वा.११) असें पुढें वार्तिककार सांगणारच आहेत.

तसेंच ज्या धातूच्या कर्त्याला कर्मवद्भाव करावयाचा तो कर्ता त्याच धातूचा कर्म अशा रूपानें दृष्ट असला पाहिजे (वा.२) असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको. धातोः अशी येथें मागून (३।१।२२) अनुवृत्ति आहे. तेव्हां धातूचें जें कर्म तद्रूपी कर्त्याला हा कर्मवद्भाव सांगितला आहे. तेव्हां त्यांच्या संबंधावरून असें सहजच मनांत येतें की ज्या धातूचें जें कर्म त्याच धातूचा तो कर्ता झाला असेल तरच कर्मवद्भाव होतो; जसें– कर्म उपपद असतांना धातूहून अण्प्रत्यय होतो (३।२।१) असें म्हटलें असतां तेथें धातु आणि कर्म यांचा संबंध असल्यामुळें ज्या धातूचें जें कर्म तें कर्म उपपद असताना त्याच धातूहून अण्प्रत्यय होतो. म्हणून 'आहर कुम्भम् करोति कटम्' येथें अण्प्रत्यय होत नाहीं.

तसेंच कर्मस्थभावक किंवा कर्मस्थक्रियक धातु असेल तरच त्याच्या कर्त्याला कर्मवद्भाव होतो (वा.३). कारण 'कर्तृस्थभावक आणि कर्तृस्थक्रियक अशा धातूंच्या कर्त्याला कर्मवद्भाव न झाला पाहिजे,' असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको. कारण जें कर्म आपल्यावरील क्रियेच्या योगानें कर्त्यासारखें क्रियाश्रय होत असल्यामुळें कर्ता असें म्हटलें जातें तशा कर्त्याला येथें कर्मवद्भाव सांगितला आहे. आणि कर्तृस्थभावक किंवा कर्तृस्थक्रियक धातूंच्या कर्मामध्यें तर क्रियेची काहींच प्रवृत्ति

---

कर्तृस्थभावक म्हणतात. गच्छति, धावति, हसति, येथें गमन वगैरे करतांना कर्त्याच्या हालचालीचा उपयोग होतो म्हणून तेथें धातूला कर्तृस्थक्रियक म्हणतात.

८. येथें कुम्भम् हें कर्म उपपद असतांना कृधातूहून अण्प्रत्यय करावयाचा आहे, परंतु होत नाहीं; कारण कुम्भम् हें कर्म कृधातूचें नाहीं, आहर याचें तें कर्म आहे.

किं पुनः कर्मकर्तरि कर्माश्रयमेव भवत्याहोस्वित्कर्त्राश्रयमपि । किं चातः । यदि कर्माश्रयमेव चङ्शप्कृद्विधयो न सिध्यति । चङ् । अचीकरत कटः स्वयमेव । शप् । नमते दण्डः स्वयमेव । कृद्विधिः । भिदुरं काष्ठं स्वयमेव ॥ अथ कर्त्राश्रयमपि सिद्धमेतद्भवति । किं तर्हीति ।

**आत्मनेपदशबादिविधिप्रतिषेधः ॥४॥**

आत्मनेपदं विधेयं शबादीनां च प्रतिषेधो वक्तव्यः ॥ उभयं क्रियते न्यास एव ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

**कर्मकर्तरि कर्तृत्वं स्वातन्त्र्यस्य विवक्षितत्वात् ॥५॥**

कर्मकर्तरि कर्तृत्वमस्ति । कुतः । स्वातन्त्र्यस्य विवक्षितत्वात् । स्वातन्त्र्येणैवात्र कर्ता विवक्षितः ॥ किं पुनः सतः

झालेली दिसत नाहीं.

पण काय हो, कर्मकर्तरिप्रयोगामध्यें कर्त्याला कर्मवद्भाव झाला असेल तेथें तें कर्म समजून प्राप्त झालेलें जें कार्य तेंच तेवढें होतें किंवा तेथें कर्ता समजून आलेलें कार्यही होतें.

या दोहोंमध्यें काय बरें फरक होत आहे?

जर कर्म समजून प्राप्त झालेलें जें कार्य तेवढेंच करावयाचें असेल तर चङ्, शप् आणि कृत्प्रत्यय हे सिद्ध होणार नाहींत. 'अचीकरत कटः स्वयमेव' येथें चङ्प्रत्यय होणार नाहीं. 'नमते दण्डः स्वयमेव' येथें शप्प्रत्यय होणार नाहीं. आणि 'भिदुरं काष्ठं स्वयमेव' येथें कृत्-प्रत्यय होणार नाहीं.

आतां कर्मवद्भाव झाला असला तरी तेथें कर्ता समजून प्राप्त झालेलेंही कार्य होतें असें म्हटलें म्हणजे मात्र हीं उदाहरणें सिद्ध होतात.

मग पुढें काय म्हणणें आहे?

(वा.४) कर्मकर्तरिप्रयोगामध्यें कर्ता समजून कार्यें जर करावयाचीं तर कांहीं ठिकाणीं कर्मकर्तरिप्रयोगामध्यें आत्मनेपदाचें विधान केलें पाहिजे, आणि शप् वगैरेंचा निषेध केला पाहिजे.

पण ह्या दोन्ही गोष्टी मुळांत केल्या आहेतच.

आतां हा कर्मवद्भावच मुळीं कशाकरितां बरें सांगितला आहे?

(वा.५) कर्मकर्तरिप्रयोगामध्यें तण्डुल वगैरेंना कर्तृत्वच आहे.

कशावरून?

स्वातन्त्र्य गृहीत धरूनच तो कर्ता आहे अशी विवक्षा करतां येते.

पण काय हो, त्या तंदुळ वगैरेंना जी

९. अचीकरत कटः स्वयमेव या कर्मकर्तरिप्रयोगामध्यें कट हा जो कर्ता त्याच अर्थी अचीकरत येथें लुङ्प्रत्यय केला आहे म्हणून तो कर्तृवाचक आहे. तेथें त्या कर्त्याला कर्मवद्भाव झाल्यामुळें अर्थातच त्या लुङ्प्रत्ययाला कर्मवाचक असें म्हणतां येतें. आतां जर कर्तृवाचक समजून कार्य करावयाचें नसेल तर कर्तृवाचक लुङ् पुढें असतांना सांगितलेला चङ्-प्रत्यय (३।१।४८) होणार नाहीं. तसाच नमते दण्डः स्वयमेव येथें कर्तरि शप्प्रत्यय (३।१।६८) होणार नाहीं. आणि भिदुरं काष्ठं स्वयमेव यांत काष्ठ हा कर्ता समजून त्या अर्थी कुरच् (३।२।१६२) प्रत्यय होणार नाहीं.

१०. मागें (१।३।७८, वा. ४) पहा. तसेंच (३।१।६७, वा. ३-४-५) पहा.

११. तेव्हां तंदुल वगैरेंना जर स्वतंत्रता दाखवावयाची नाहीं तर त्या वेळीं ते दुसऱ्याला ईप्सित असें मुळींच मनांत आणतां येत नसल्यामुळें त्यामुळें त्या वेळीं त्याला कर्मसंज्ञेचें नांवच काढतां येत नाहीं. म्हणून त्याला कर्मवद्भाव सांगितला आहे.

**स्वातन्त्र्यस्य विवक्षाहोस्विद्विवक्षामात्रम्। सत इत्याह। कथं ज्ञायते। इह भिद्यते कुशूलेनेति न चान्यः कर्ता दृश्यते क्रिया चोपलभ्यते। किं च भो विग्रहवतैव क्रियायाः कर्त्रा भवितव्यं न पुनर्वातातपकाला अपि कर्तारः स्युः। भवेत्सिद्धं यदि वातातपकालानामन्यतमः कर्ता स्यात्। यस्तु खलु निवाते निरभिवर्षेऽचिरकालकृतः कुशूलः स्वयमेव भिद्यते तस्य नान्यः कर्ता भवत्यन्यदतः कुशूलात्॥ यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुं यत्रान्यः कर्ता नास्तीह तु कथं न स्यात्** लूयते केदारः स्वयमेवेति यत्रासौ देवदत्तो दात्रहस्तः समन्ततो विपरिपतन्दृश्यते। अत्रापि यासौ सुकरता नाम तस्या नान्यः कर्ता भवत्यन्यदतः केदारात्॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति।

**तत्र लान्तस्य कर्मवदनुदेशः॥ ६॥**

तत्र लान्तस्य कर्मवदनुदेशः कर्तव्यः। लान्तस्य कर्ता कर्मवद्भवतीति वक्तव्यम्॥

**इतरथा हि कृत्यक्तखलर्थेषु प्रतिषेधः॥ ७॥**

अक्रियमाणे हि लग्रहणे कृत्यक्तखल-

स्वातंत्र्याची विवक्षा येथें करावयाची ती त्यांना खरेंच स्वातन्त्र्य आहे त्याची किंवा आपली नांवाला विवक्षा करावयाची.

खऱ्या स्वातंत्र्याचीच विवक्षा आहे असें म्हणतों.

कशावरून हें समजतें?

अशावरून समजतें की भिद्यते कुशूलेन म्ह. कणिंग मोडते असा प्रयोग होतो. त्या वाक्यामध्यें कुशूलाशिवाय दुसरा कोणीही कर्ता दिसत नाहीं. आणि कणिंग मोडते तेव्हां मोडणारा कोणी दिसतही नाहीं.

पण काय हो, दिसत नाहीं असं जें म्हणतां तें काय क्रियेचा कर्ता हा कोणी मूर्त्तिमान् असाच असला पाहिजे; वारा, ऊन, काल, हे देखील कर्ते होत नाहींत काय?

होय. तेही कर्ते होतील. पण वाऱ्यानें, उन्हानें किंवा बराच काल झाल्यानें मोडली असेल तर. पण ज्या ठिकाणीं वारा बिलकूल नाहीं, ऊन नाहीं, पाऊस नाहीं, अशा ठिकाणीं नुकतीच तयार केलेली कणिंग जर स्वतः आपोआपच मोडून पडली तर त्या ठिकाणीं त्या कणिंगेशिवाय दुसरा कोण बरें कर्ता असेल? कोणीच नाहीं.

आतां जेथें दुसरा कर्ता मुळींच दिसत नाहीं अशा कांहीं ठिकाणीं तुम्हाला असं जरी बोलतां येतें तरी लूयते केदारः स्वयमेव, म्ह. शेत हें स्वतःच कापलें जातें, येथें त्या शेताला कापण्याच्या कामीं स्वातंत्र्य कसें दाखवाल? कीं ज्या ठिकाणीं हातांत शस्त्र घेतलेला हा देवदत्त शेताच्या सभोंवतीं हिंडताना प्रत्यक्ष दिसत आहे.

तेथें देखील त्या शेताच्या अंगीं जें सौकर्य[१२] आहे त्या कामीं तेथें शेतावाचून दुसरा कोणीही कर्ता नाहीं.

हा ह्या कर्मवद्भावाचा उपयोग खरा.

मग पुढें आतां तुमचें काय म्हणणें आहे?

(वा.६) धातूहून लकार केला असेल तरच तेथें त्या धातूच्या कर्त्याला कर्मवद्भाव होतो असें म्हणावें.

(वा.७) लग्रहण केलें नाहीं तर कृत्यप्रत्यय, क्तप्रत्यय आणि खल्प्रत्ययाच्या अर्थी होणारे प्रत्यय हे कर्मवद्भावानें होऊं लागतील त्यांचा

१२. कापण्याला अत्यंत सुलभ जावें असे जे मऊपणा, हलकेपणा, वगैरे धर्म ते धारण करण्याचे कामी त्या शेताला पूर्ण स्वातन्त्र्य आहे. तात्पर्य, कर्तरिप्रयोगामध्यें कर्त्याला परतंत्रता विवक्षित नसल्यामुळें कर्मसंज्ञा होण्याचा संभव नसल्यामुळें कर्मवद्भाव सांगितला आहे.

र्थेषु प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् ॥ कृत्य। भेत्तव्यः कुशूल इति कर्म। स यदा स्वातन्त्र्येण विवक्षितस्तदास्य कर्मवद्भावः स्यात्। तस्य प्रतिषेधो वक्तव्यस्तस्मिन्प्रतिषिद्धेऽकर्मकाणां भावे कृत्या भवन्तीति भावे यथा स्यात्। भेत्तव्यं कुशूलेनेति। कृत्य॥ क्त। भिन्नः कुशूल इति कर्म। स यदा स्वातन्त्र्येण विवक्षितस्तदास्य कर्मवद्भावः स्यात्। तस्य प्रतिषेधो वक्तव्यस्तस्मिन्प्रतिषिद्धेऽकर्मकाणां भावे क्तो भवतीति भावे क्तो यथा स्यात्। भिन्नं कुशूलेनेति। क्त॥ खलर्थः। ईषद्भेदः कुशूल इति कर्म। स यदा स्वातन्त्र्येण विवक्षितस्तदास्य कर्मवद्भावः स्यात्। तस्य प्रतिषेधो वक्तव्यस्तस्मिन्प्रतिषिद्धेऽकर्मकाणां भावे खलभवतीति भावे यथा स्यात्। ईषद्भेदं कुशूलेनेति॥ तर्हि लग्रहणं कर्तव्यम्। न कर्तव्यम्। क्रियते न्यास एव। लिङ्याशिष्यङ् [३.१.८६] इति द्विलकारको निर्देशः॥

**सिद्धं तु प्राकृतकर्मत्वात् ॥ ८ ॥**

सिद्धमेतत्। कथम्। प्राकृतकर्मत्वात्। प्राकृतमेवैतत्कर्म यथा कटं करोति शकटं करोतीति॥ कथं पुनर्ज्ञायते प्राकृतमेवैतत्कर्मेति।

**आत्मसंयोगे कर्मकर्तुः कर्मदर्शनात् ॥ ९ ॥**

आत्मसंयोगे कर्मकर्तुः कर्म दृश्यते।

निषेध सांगावा लागेल. कृत्यप्रत्ययाचें उदाहरण भिद्धातूहून कर्मणि तव्यप्रत्यय केला असतांना 'भेत्तव्यः कुशूलो देवदत्तेन असा' प्रयोग होतो. तेथें देवदत्ताची अविवक्षा करून कुशूलाला स्वातंत्र्याची विवक्षा केली असतांना त्या कुशूल या कर्त्याला कर्मवद्भाव होऊं लागेल, त्याचा निषेध सांगावा लागेल. तो निषेध केला असतां अकर्मक धातूहून भावे क्तप्रत्यय होतो तो भावे क्तप्रत्यय करून भिन्नं कुशूलेन असा प्रयोग झाला पाहिजे. तसेंच खलर्थप्रत्ययाचें उदाहरण—ईषत्शब्द उपपद असतांना भिद्धातूहून कर्मणि खल्प्रत्यय (३।३।१२६) केला असतांना ईषद्भेदः कुशूलो देवदत्तेन असा प्रयोग होतो. तेथें देवदत्ताची अविवक्षा करून कुशूलाला स्वातंत्र्याची विवक्षा केली असतां त्या कुशूल या कर्त्याला कर्मवद्भाव होऊं लागेल त्याचा निषेध सांगावा लागेल. तो निषेध केला असतां अकर्मक धातूहून भावे खल्प्रत्यय होतो तो भावे खल्प्रत्यय करून ईषद्भेदं कुशूलेन असा प्रयोग झाला पाहिजे.

तर मग हे प्रयोग साधण्याकरितां लग्रहण केलें पाहिजे.

करावयास नको. लकाराचा निर्देश मुळांत केलेलाच आहे. पूर्वसूत्रामध्यें व्यत्ययो बहुलं लिङ्याशिष्यङ् असा लिङ्शब्दाच्या मागें आणखी एक लकार आचार्यांनीं उच्चारला[१३] आहे.

(वा.८) कर्मवद्भाव सांगितला नाही तरी हीं उदाहरणें सिद्ध होत आहेत.

तीं कशीं ?

अशीं की कुशूल, तंदुल, ह्या पदार्थांना स्वातंत्र्याची विवक्षा करून कर्तृत्व मानलें तरी त्यांना मूळचें स्वाभाविक कर्मत्व आहेच; जसें— कटं करोति, शकटं करोति, येथें कट, शकट, यांना कर्मत्व आहे तसें हें होय.

पण हें स्वाभाविकच कर्म आहे असें येथें कसें बरें समजावें ?

(वा.९) आपला आपल्याशीं संबंध अस-

१३. त्या लकाराचा तेथें कांहीं उपयोग नाही. त्याची अनुवृत्ति प्रकृत सूत्रांत करून त्याचा येथें कर्त्याकडे संबंध केला असतां लकाराचा वाच्य जो कर्ता त्याला कर्मवद्भाव होतो म्हणून कर्तरिक्रियापदाचा प्रयोग असतांनाच हें सूत्र प्रवृत्त होतें.

क । हन्त्यात्मानम् हन्यत आत्मनेति ॥ विषम उपन्यासः । हन्त्यात्मानमिति कर्म दृश्यते कर्ता न दृश्यते । आत्मना हन्यत इति कर्ता दृश्यते कर्म न दृश्यते ॥

**पदलोपश्च ॥ १० ॥**

पदलोपश्चात्र द्रष्टव्यः । हन्त्यात्मानमात्मा । आत्मना हन्यत आत्मेति ॥ कः पुनरात्मानं हन्ति को वात्मना हन्यते । द्वावात्मानावन्तरात्मा शरीरात्मा च । अन्तरात्मा तत्कर्म करोति येन शरीरात्मा सुखदुःखे अनुभवति । शरीरात्मा तत्कर्म करोति येनान्तरात्मा सुखदुःखे अनुभवति ॥

**सकर्मकाणां प्रतिषेधोऽन्योऽन्यमाश्लिष्यत इति ॥ ११ ॥**

सकर्मकाणां प्रतिषेधो वक्तव्यः । किं प्रयोजनम् । अन्योऽन्यमाश्लिष्यतः । अन्योऽन्यं संस्पृशतः । अन्योऽन्यं गृह्णीत इति ॥

**तपेर्वा सकर्मकस्य वचनं नियमार्थम् ॥ १२ ॥**

तपेर्वा सकर्मकस्य वचनं नियमार्थं

---

तांना कर्म करणाऱ्यालाही कर्मत्व दृष्टीस पडतें.

तें कोठें ?

हन्ति आत्मानम्, आत्मना हन्यते, या प्रयोगांमध्यें पहा.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण हन्ति आत्मानम् या प्रयोगामध्यें फक्त कर्मच दिसत आहे, कर्ता दिसत नाहीं. तसेंच 'आत्मना हन्यते' या प्रयोगामध्यें फक्त कर्ताच दिसत आहे, कर्म दिसत नाहीं.

(वा.१०) ह्या प्रयोगामध्यें पदाचा लोप झाला आहे म्ह० दुसरें पद असून फक्त उच्चारलें गेलें नाहीं. तें असें:– हन्ति आत्मानमात्मा; आत्मना हन्यते आत्मा.

तरी पण येथें आत्म्याला मारतो कोण व आत्म्याकडून कोण मारला जातो हें सांगा पाहूं.

आत्मे दोन आहेत. एक शरीरात्मा आणि दुसरा अन्तरात्मा. त्यांपैकीं अन्तरात्मा तसें कर्म करतो की ज्याच्या योगानें शरीरात्म्याला सुखदुःखें होतात.आणि ह्याच्या उलटही एखादे वेळीं शरीरात्मा तसें कर्म करतो कीं ज्याच्या योगानें अंतरात्म्याला सुखदुःखें होतात[१४].

(वा.११) सकर्मक धातूच्या कर्त्याला कर्मवद्भाव होत नाहीं असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

[१५]अन्योन्यमाश्लिष्यतः, अन्योन्यं संस्पृशतः, अन्योन्यं गृह्णीतः, येथें कर्मवद्भाव न झाला पाहिजे.

(वा.१२) अथवा सकर्मक तप्‌धातूच्या कर्त्याला जो कर्मवद्भाव सांगितला आहे तो नियमार्थ[१६] होईल. तो नियम असा की 'सकर्मक

---

१४. तात्पर्य, जसा आत्म्याचा औपाधिक भेद घेतां आला तसा येथें घेतां येत नसल्यामुळें येथें कर्मवद्भाव सांगितला पाहिजे असें सिद्ध झालें.

१५. येथें आलिंगन करणें वगैरे क्रियांचे जे चैत्र व मैत्र हे दोन कर्ते तेच एकमेकांला आलिंगन करीत असल्यामुळें कर्म आहेत. तेव्हां येथें अविवक्षा न करतांनाच कर्माशीं तुल्यक्रिय कर्ता होत आहे.

१६. ह्या प्रकृत सूत्राच्या पुढें 'तपस्तपःकर्मकस्यैव' असें सूत्र आहे. तप्यते तपस्तापसः या सकर्मक कर्तरिप्रयोगामध्यें त्यानें कर्मवद्भाव होतो. परंतु तेथें प्रकृत सूत्रानें कर्मवद्भाव सिद्ध आहे. कारण शरीराला कष्ट देणें हा व्यापार जो तापस या कर्त्याचा आहे तोच तप या कर्माचा आहे. म्हणून येथें कर्त्याची अविवक्षा करून जी कर्माला स्वातन्त्र्याची विवक्षा करावयाची ती केल्याशिवायच येथें कर्ता कर्माशीं तुल्यक्रिय होतो. तेव्हां तें सूत्र नियमार्थ होतें. तो नियम तप्‌धातूपुरताच. म्हणजे तप्‌धातूच्या कर्त्याला जर कर्मवद्भाव होईल तर त्या तप्‌धातूचें कर्म तप असेल तरच होतो. असा झाला तर अन्योन्यमाश्लिष्यतः येथें कर्मवद्भाव न होण्याकरितां 'सकर्मकाणां प्रतिषेधः' (वा.११) हें वार्तिक ठेवावें लागेल. तेव्हां याचा असा अभिप्राय समजावा की पुढील सूत्रामध्यें

भविष्यति । तपेरेव सकर्मकस्य नान्यस्य सकर्मकस्येति ॥ तस्य तर्ह्यन्यकर्मकस्यापि प्राप्नोति । उत्तपति सुवर्णं सुवर्णकारः । उत्तप्यमानं सुवर्णं सुवर्णकारमुत्तपति ।

**तस्य च तपःकर्मकस्यैव ॥ १३ ॥**

तस्य च तपःकर्मकस्यैव कर्ता कर्मवद्भवति नान्यकर्मकस्येति । किमिदं तप इति । तपेरयमौणादिकोऽस्कारो भावसाधनः । कः प्रकृत्यर्थः कः प्रत्ययार्थः । स एव संतापः । कथं पुनः स एव नाम प्रत्ययार्थः स्यात्स एव प्रकृत्यर्थः । सामान्यतपेरवयवतपिः कर्म भवति । तद्यथा । स एतान्पोषानपुष्यद्गोपोषमश्वपोषं रैपोषमिति सामान्यपुषेरवयवपुषिः कर्म भवति । एवमिहापि सामान्यतपेरवयवतपिः कर्म भवति ॥

**दुहिपच्योर्बहुलं सकर्मकयोः ॥ १४ ॥**

दुहिपच्योः सकर्मकयोः कर्ता बहुलं कर्मवद्भवतीति वक्तव्यम् । दुग्धे गौः पयः तस्मादुदुम्बरः सलोहितं फलं पच्यते ।

---

धातूच्या कर्त्याला जर कर्मवद्भाव होय तर फक्त तप्‌धातूच्याच कर्त्याला होय, इतर सकर्मक धातूच्या कर्त्याला कर्मवद्भाव होत नाहीं.

तर मग तप्‌धातूचें कर्म तपाशिवाय दुसरें असलें तरी तेथेंही त्याच्या कर्त्याला कर्मवद्भाव होऊं लागेल; उदा०— उत्तपत्ति सुवर्णं सुवर्णकारः, सोनारानें तापविलेलें सोनें सोनाराला संतप्त करतेंच.[17]

(वा.१३) त्या तप्‌धातूचेंही कर्म तप असेल तरच त्याच्या कर्त्याला कर्मवद्भाव होतो. इतर कर्म असेल तर तेथें त्या तप्‌धातूच्या कर्त्याला कर्मवद्भाव होत नाहीं.

आतां तप्‌धातूचें कर्म म्हणून जें तप म्हणतात तो काय पदार्थ आहे ?

तप्‌धातूहून औणादिक भावे अस्‌प्रत्यय (४।१८८) केला आहे. तेव्हां तपस् या शब्दाचा अर्थ संताप आहे.

तर मग त्या तप या कर्मार्थीं तप्‌धातूहून लकार करून जो तप्यते तपः असा कर्मणि प्रयोग होतो तेथें तप् या धातूचा अर्थ काय आणि त्याच्या पुढें केलेल्या कर्मणि लकाराचा अर्थ काय ?

दोघांचाही संताप हाच अर्थ आहे.

पण तोच प्रकृतीचा अर्थ आणि तोच प्रत्ययाचा अर्थ कसा बरें संभवेल ?

सामान्य संताप हा प्रकृतीचा अर्थ आहे आणि त्याचें कर्म जो विशेष संताप हा प्रत्ययाचा अर्थ आहे; जसें— स एतान् पोषान् अपुष्यत्, गोपोषम्, अश्वपोषम्, रैपोषम्, म्ह. गाई पोसणें, घोडे पोसणें, द्रव्य संभाळणें, असें अनेक प्रकारचें पोषण तो करता झाला. येथें सामान्य पोषणक्रियेचें त्यांतील पोषणविशेष हे कर्म होतात. तसे येथें सामान्य संतापाचे उपवास वगैरे विशेष संताप हे कर्म होतील.

(वा.१४) सकर्मक असे जे दुह् आणि पच् हे धातु त्यांच्या कर्त्याला कर्मवद्भाव बाहुल्येंकरून होतो असें म्हणावें; उदा०—दुग्धे[18] गौः पयः स्वयमेव, तस्मादुदुम्बरः सलोहितं फलं

---

योगविभाग करावा. 'तपः' एवढेंच पहिलें सूत्र होय व तें नियमार्थ होतें. तो नियम असा की सकर्मक धातूच्या कर्त्याला जर कर्मवद्भाव होईल तर तप्‌धातूच्याच कर्त्याला होतो. ह्या नियमानें अन्योन्यमाश्लिष्यतः येथें कर्मवद्भावाचा निषेध सिद्ध होतो. 'तपःकर्मकस्यैव' हें दुसरें सूत्र होय. तेंही नियमार्थच होतें. तो नियम तप्‌धातूपुरताच पूर्वी सांगितलेल्याप्रमाणें समजावा.

१७. तेव्हां संतप्त करणें हा व्यापार सोनार आणि सोनें या दोघांचाही एकच असल्यामुळें कर्त्याची अविवक्षा केल्याशिवायच कर्ता हा कर्माशीं तुल्यक्रिय येथें आहे हें सिद्ध होतें.

१८. येथें कर्मवद्भावामुळें आत्मनेपद झालें आहे. यक्‌प्रत्ययाचा निषेध (३।१।८९) च आहे. दुह्‌धातु द्विकर्मक आहे. त्यांपैकीं गो या कर्माला स्वातंत्र्याची विवक्षा केली असल्यामुळें गो हा कर्ता कर्माशीं तुल्य-

बहुलवचनं किमर्थम् । परस्मैपदार्थम् । यद्येवं नार्थो बहुलवचनेन । न हि परस्मैपदमिष्यते ॥

## सृजियुज्योः श्यंस्तु ॥ १५ ॥

सृजियुज्योः सकर्मकयोः कर्ता बहुलं कर्मवद्भवतीति वक्तव्यम् । श्यंस्तु भवति ॥ सृजेः श्रद्धोपपन्ने कर्तरि कर्मवद्भावो वाच्यश्चिणात्मनेपदार्थः । सृज्यते मालाम् । असर्जि मालाम् ॥ युजेस्तु न्याय्ये कर्मकर्तरि यकोऽभावाय । युज्यते ब्रह्मचारी योगम् ॥

## करणेन तुल्यक्रियः कर्ता बहुलम् ॥ १६ ॥

करणेन तुल्यक्रियः कर्ता बहुलं कर्मवद्भवतीति वक्तव्यम् । परिवारयन्ति कण्टकैर्वृक्षम् । परिवारयन्ते कण्टका वृक्षमिति ॥

## स्रवत्यादीनां प्रतिषेधः ॥ १७ ॥

स्रवत्यादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । स्रवति कुण्डिकोदकम् । स्रवति कुण्डि-

---

पच्यते.

येथें बहुलशब्द कशाकरितां घातला आहे?

एखादे वेळीं आत्मनेपद न होतां परस्मैपद होण्याकरितां घातला आहे.

असेंच जर असेल तर येथें बहुलशब्दाचा कांहींच उपयोग नाहीं. कर्मवद्भाव झाला असतां ह्या धातूहून परस्मैपद कोठेंच इष्ट नाहीं.

(वा.१५) सकर्मक जे सृज् आणि युज् हे धातु त्यांच्या कर्त्याला बाहुल्येंकरून [१९] कर्मवद्भाव होतो. परंतु तेथें यक् न करतां श्यन् प्रत्यय करावा. त्यांतसुद्धां सृज्धातूचा कर्ता श्रद्धालु असेल तरच कर्मवद्भाव होतो असें म्हणावें. येथें कर्मवद्भावाचा उपयोग चिण् आणि आत्मनेपद होणें हा स[२०]मजावा; उदा०— सृज्यते मालाम्, असर्जि मालाम्, आणि युज्धातूचा कर्ता कर्माशीं तुल्यक्रिय असल्यामुळें न्यायानेंच त्याला कर्मवद्भाव प्राप्त होत आहे. तेथें फक्त यक् न होण्याकरितां हें वचन केलें आहे; उदा०— यु[२१]ज्यते ब्रह्मचारी योगम्.

(वा.१६) कर[२२]णावर असणारी जी क्रिया तीच क्रिया ज्याची आहे अशा कर्त्याला बाहुल्येंकरून कर्मवद्भाव होतो असें म्हणावें. परिवारयति कण्टकैर्वृक्षः ही पूर्वावस्था होय. येथें कण्टकच कर्ता झाला म्हणजे परि[२३]वारयन्ते कण्टकाः वृक्षम् असा प्रयोग होतो.

(वा.१७) स्रु वगैरे धातूंच्या कर्त्याला कर्मवद्भाव होत नाहीं असें म्हणावें. स्रवति कुण्डिका उदकम् ही पूर्वावस्था होय. उदक या कर्माला कर्तृत्वविवक्षा केली असतां 'स्रवति

---

क्रिय झाला आहे. तरी पण दोन कर्मांपैकीं पय हें कर्म कायम असल्यामुळें धातु सकर्मक आहे. म्हणून कर्मवद्भावाचा निषेध (वा. ११) प्राप्त झाला आहे म्हणून हें वचन केलें आहे.

१९. कर्माशीं तुल्यक्रिय कर्ता नसला तरी साध्या कर्तरिप्रयोगामध्येंच सृज्धातूच्या कर्त्याला हा कर्मवद्भाव होतो.

२०. कर्मवद्भावामुळें यक्, आत्मनेपद, चिण् आणि चिण्वदिट् अशीं चार कार्यें होत असतात. त्यांपैकीं यक् होत नाहीं. कारण येथें मुद्दाम श्यन् सांगितला आहे. आणि चिण्वदिट् (६।४।६२) हा या धातूंना मुळीं सांगितलाच नाहीं. तेव्हां अर्थात् आत्मनेपद आणि चिण् हीं दोनच कार्यें कर्मवद्भावाचीं येथें शिल्लक राहतात. श्यन्प्रत्यय करण्याचा उपयोग आद्युदात्तस्वर (६।१।१९७) होतो.

२१. योगः ब्रह्मचारिणं युनक्ति म्हणजे योग हा ब्रह्मचाऱ्याशीं संबंध पावतो ही पूर्वावस्था होय. तेथें ब्रह्मचाऱ्याला स्वातंत्र्याची विवक्षा करून तो कर्ता आणि योग हें कर्म केलें आहे. संबंध दोहोंचा एकच असल्यामुळें येथें कर्ता कर्माशीं तुल्यक्रिय होत आहे.

२२. करणाला स्वातंत्र्याची विवक्षा करून मूळचें करणच कर्ता अशा रूपानें विवक्षित आहे.

२३. येथें कर्मवद्भावामुळें आत्मनेपद झालें आहे.

काया उदकम् । स्रवन्ति वलीकान्युदकम् । स्रवति वलीकेभ्य उदकमिति ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । तुल्यक्रिय इत्युच्यते क्रियान्तरं चात्र गम्यते । इह तावत्स्रवति कुण्डिकोदकमिति विसृजतीति गम्यते । स्रवति कुण्डिकाया उदकमिति निष्क्रामतीति गम्यते । स्रवन्ति वलीकान्युदकमिति विसृजन्तीति गम्यते । स्रवति वलीकेभ्य उदकमिति पततीति गम्यते ॥

## भूषाकर्मकिरतिसनां चान्यत्रात्मनेपदात् ॥ १८ ॥

भूषाकर्मकिरतिसनां च प्रतिषेधो वक्तव्योऽन्यत्रात्मनेपदात् । भूषयते कन्या स्वयमेव ॥ अबुभूषत कन्या स्वयमेव । मण्डयते कन्या स्वयमेव । अममण्डत कन्या स्वयमेव ॥ किरति । अवकिरते हस्ती स्वयमेव । अवाकीर्ष्ट हस्ती स्वयमेव ॥ सन् । चिकीर्षते कटः स्वयमेव । अचिकीर्षिष्ट कटः स्वयमेव ॥

## [तपस्तपःकर्मकस्यैव ॥३।१।८८॥][1]

## न दुहस्नुनमां यक्चिणौ ॥ ३ । १ । ८९ ॥

## यक्चिणोः प्रतिषेधे हेतुमण्णिश्रिब्रूञामुपसंख्यानम् ॥ १ ॥

यक्चिणोः प्रतिषेधे हेतुमण्णिश्रिब्रू-

कुण्डिकाया उदकम्' असा प्रयोग होतो. तसेंच 'स्रवन्ति वलीकान्युदकम्' ही पूर्वावस्था होय. उदक या कर्माला कर्तृत्वविवक्षा केली असतां 'स्रवति वलीकेभ्य उदकम्' असा प्रयोग होतो.

तर मग हा कर्मवद्भावाचा निषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण तुल्यक्रियः असें सूत्रांत म्हटलें आहे. आणि येथें उदक हें मूळचें कर्म असून आतां कर्ता झालें आहे, इतकेंच. पण त्या दोन्ही अवस्थांमध्यें क्रिया निरनिराळी होत आहे. असें पहा की 'स्रवति कुण्डिका उदकम्' येथें सोडते असा अर्थ गम्यमान होतो. आणि 'स्रवति कुण्डिकाया उदकम्' येथें निघते असा अर्थ गम्य होतो. तसेंच स्रवन्ति वलीकान्युदकम् येथें सोडतात असा अर्थ गम्यमान होतो आणि स्रवति वलीकेभ्य उदकम्[24] येथें पडतें असा अर्थ गम्यमान होतो.

(वा.१८) भूषण करणें या अर्थाचे धातु, कृ, गृ[26], वगैरे धातु आणि सन्प्रत्ययान्त धातु यांच्या कर्माशीं तुल्यक्रिय जो कर्ता त्याला कर्मवद्भावानें फक्त आत्मनेपद करावें, इतर कांहीं करूं नये; उदा०:– भूषयते[25] कन्या स्वयमेव, अबुभूषत कन्या स्वयमेव; मण्डयते कन्या स्वयमेव, अमण्डयत कन्या स्वयमेव. कृ[26] वगैरे धातूंचें उदाहरण:– अवकिरते हस्ती स्वयमेव, अवाकीर्ष्ट हस्ती स्वयमेव; गिरते ग्रासः स्वयमेव, अगीर्ष्ट ग्रासः स्वयमेव. सन्प्रत्ययान्त धातूचें उदाहरण:– चिकीर्षते कटः स्वयमेव, अचिकीर्षिष्ट कटः स्वयमेव.

(सू.८९, वा.१) हा जो दुह् वगैरे धातूंना यक् आणि चिण् यांचा निषेध केला आहे तसाच हेतुमण्णि म्ह. प्रयोजक व्यापार या अर्थी केलेला जो णिच्प्रत्यय तदन्त धातु आणि ब्रूधातु यांनाही यक् आणि चिण् यांचा निषेध सांगावा. णिप्रत्ययान्त धातूचें उदा०:–

---

२४. वळचणींतून पाणी पडतें असा अर्थ आहे.

२५. येथें यक् झाला नाहीं. आणि अबुभूषत येथें चिण् व चिण्वदिट् हे झाले नाहींत.

१. तप्धातूच्या कर्त्याला जर कर्मवद्भाव होईल तर त्या तप्धातूचें तपश्चर्या हें कर्म असेल तरच होतो; उदा०:– तप्यते तपस्तापसः.

१. दुह्, स्नु आणि नम् या धातूंच्या कर्मकर्त्याला कर्मवद्भावानें प्राप्त झालेले जे यक् आणि चिण् ते होत नाहीत; उदा०:– दुग्धे गौः स्वयमेव. दुह्धातूला चिणाचा निषेध केला तरी दुहश्च (३।१। ६३) या सूत्रानें विकल्पानें चिण् होतोच; उदा०:– अदुग्ध अदोहि वा गौः स्वयमेव.

ण्यामुपसंख्यानं कर्तव्यम् । णि । कारयते कटः स्वयमेव । अचीकरत कटः स्वयमेव । णि ॥ श्रि । उच्छ्रयते दण्डः स्वयमेव । उदशिश्रियत दण्डः स्वयमेव । श्रि ॥ ब्रूञ् । ब्रूते कथा स्वयमेव । अवोचत कथा स्वयमेव ॥

भारद्वाजीयाः पठन्ति । यक्चिणोः प्रतिषेधे णिश्रन्थिग्रन्थिब्रूञात्मनेपदाकर्मकाणामुपसंख्यानमिति ॥

## कुषिरजोः प्राचां श्यन्परस्मैपदं च ॥ ३ । १ । ९० ॥

### कुषिरजोः श्यन्विधाने सार्वधातुकवचनम् ॥ १ ॥

कुषिरजोः श्यन्विधाने सार्वधातुकग्रहणं कर्तव्यम् ॥

### अवचने हि लिङ्लिटोः प्रतिषेधः ॥ २ ॥

अक्रियमाणे हि सार्वधातुकग्रहणे लिङ्लिटोः प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् । चुकुषे पादः स्वयमेव । ररञ्जे वस्त्रं स्वयमेव । कोषिषीष्ट पादः स्वयमेव । रङ्क्षीष्ट वस्त्रं स्वयमेव ॥ क्रियमाणेऽपि सार्वधातुकग्रहण इह प्राप्नोति । कतीह कुष्णानाः पादाः ॥ श्यना च स्यादीनां बाधनं प्राप्नोति । कोषिष्यते पादः स्वयमेव । रङ्क्ष्यते वस्त्रं स्वयमेव । अकोषि पादः स्वयमेव । अरञ्जि वस्त्रं स्वयमेव ॥

---

कारयते कटः स्वयमेव, अचीकरत कटः स्वयमेव. श्रिधातूचें उदा०:—उच्छ्रयते दण्डः स्वयमेव, उदशिश्रियत दण्डः स्वयमेव. ब्रूञ्धातूचें उदा०:— ब्रूते कथा स्वयमेव, अवोचत कथा स्वयमेव.

येथें भारद्वाजीय वैयाकरण असें म्हणतात की— हा जो दुह् वगैरे धातूंना यक् आणि चिण् यांचा निषेध केला आहे तसाच णिप्रत्ययान्त धातु, श्रन्थि ग्रन्थि, ब्रूञ् आणि आत्मनेपदी अकर्मक धातु, यांच्याही कर्मकर्त्याला कर्मवद्भाव झाला असतां यक् आणि चिण् होत नाहींत.

(सू.९०, वा.१) कुष् आणि रञ्ज् या धातूंहून जो हा कर्मकर्तरिप्रयोगामध्यें श्यन्प्रत्यय सांगितला आहे तो सार्वधातुक प्रत्यय पुढें असेल तरच होतो असें म्हणावें.

(वा.२) सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना असें म्हटलें नाहीं तर आशीर्लिङ् आणि लिट् यांमध्येंही श्यन्प्रत्यय होऊं लागेल त्याचा निषेध करावा लागेल; उदा०— चुकुषे पादः स्वयमेव, ररञ्जे वस्त्रं स्वयमेव, कोषिषीष्ट पादः स्वयमेव, रङ्क्षीष्ट पादः स्वयमेव.

पण सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना असें म्हटलें तरी कतीह कुष्णानाः पादाः येथेंही श्यन्प्रत्यय होऊं लागेल. तसेंच ह्या मुद्दाम सांगितलेल्या श्यन्प्रत्ययानें स्य वगैरे विकरण प्रत्ययांचा बाध होऊं लागेल; उदा०— कोषिष्यते पादः स्वयमेव, अकोषि पादः स्वयमेव; अर्थ आहे.

२. भारद्वाजीयांच्या पाठामध्यें हेतुमण्णि असा शब्द नसल्यामुळें 'उत्पुच्छयते गौः स्वयमेव' येथें णिङ्प्रत्यय (३।१।२०) केला असला तरी तेथें कर्मकर्तरिप्रयोगामध्यें यक्प्रत्ययाचा निषेध होतो.

१. कुष् आणि रञ्ज् या धातूंच्या कर्मकर्त्याला कर्मवद्भावानें जो यक् प्राप्त होतो तो तेथें न करतां श्यन्प्रत्यय आणि परस्मैपद विकल्पानें होते; उदा०:— कुष्यति पादः स्वयमेव, रज्यति वस्त्रं स्वयमेव. पाय स्वतःच चुरला जातो, वस्त्र हें स्वतःच रंगतें, असा

२. येथें पाद या कर्माला कर्तृत्व विवक्षा केली असतां त्याच कर्ता या अर्थी चानश्प्रत्यय (३।२।१२९) झाला आहे. चानश् हा प्रत्यय शित् असल्यामुळें त्याला सार्वधातुक संज्ञा (३।४।११३) आहे.

३. लट् व लुङ् यांचे स्थानी केलेला तप्रत्यय सार्वधातुक पुढें असल्यामुळें स्यप्रत्यय आणि चिण्प्रत्यय यांचा बाध करून प्रकृतसूत्रानें श्यन्प्रत्यय होऊं लागेल.

यत्तावदुच्यते सार्वधातुकग्रहणं कर्तव्यमिति न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । सार्वधातुके यक् [६७] इति । यदि तदनुवर्तते पूर्वस्मिन्योगे किं समुच्चयः । ले च सार्वधातुके चेति । आहोस्विल्लग्रहणं सार्वधातुकविशेषणम् । किं चातः । यदि समुच्चयः कतीह भिन्दानाः कुशूला इत्यत्रापि प्राप्नोति । अथ लग्रहणं सार्वधातुकविशेषणं लिङ्लिटोर्न सिध्यति । बिभिदे कुशूलः स्वयमेव । भित्सीष्ट कुशूलः स्वयमेवेति ॥

अस्तु लग्रहणं सार्वधातुकविशेषणम् । ननु चोक्तं लिङ्लिटोर्न सिध्यतीति । लिङ्लिड्ग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । कास्प्रत्ययादाममन्त्रे लिटि [३५] लिङ्याशिष्यङ् [८६] इति । एवं च कृत्वा सोऽप्यदोषो भवति यदुक्तं कतीह कुष्णानाः पादा इति प्राप्नोतीति । अत्रापि लविशिष्टं सार्वधातुकग्रहणमनुवर्तते ॥

यदप्युच्यते श्यना च स्यादीनां बाधनं प्राप्नोतीति यक्प्रतिषेधसंबन्धेन श्यनं वक्ष्यामि । न दुहस्नुनमां यक्चिणौ [८९] ।

---

रङ्क्ष्यते वस्त्रं स्वयमेव, अरञ्जि वस्त्रं स्वयमेव.

आतां येथें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना असें म्हणावें म्हणून जें म्हटलें आहे तें म्हणावयास नको. कारण मागून अनुवृत्त येत आहे.

मागें कोठें बरें सार्वधातुक ग्रहण केलें आहे ?

'सार्वधातुके यक्' (३।१।६७) येथें आहे.

पण तें जर प्रकृत सूत्रांत अनुवृत्त येत असेल तर 'कर्मवत्कर्मणा०' या पूर्वसूत्रामध्यें त्याचा संबंध झालाच पाहिजे. तेव्हां तेथें जें लग्रहण आहे. त्याचा आणि या सार्वधातुकाचा समुच्चय करावयाचा म्हणजे लकार पुढें असतांनाही कर्मवद्भाव होतो आणि सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांनाही कर्मवद्भाव होतो. अथवा लकाराचे स्थानीं केलेला सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना असें लकार हें सार्वधातुक प्रत्ययाचें विशेषण करावयाचें. या दोहोंमध्यें फरक काय बरें होणार आहे ?

फरक असा की जर समुच्चयपक्ष घेतला तर कतीह भिन्दानाः कुशूलाः येथें लकार नसल्यामुळे कर्मवद्भाव होत नसतो. तो आतां होऊं लागेल. आतां लग्रहण हें सार्वधातुकग्रहणाचें विशेषण केलें तर आशीर्लिङ् आणि लिट् येथें मुळीं कर्मवद्भावच होणार नाहीं; जसें– [४] बिभिदे कुशूलः स्वयमेव; भित्सीष्ट कुशूलः स्वयमेव.

तर मग लग्रहण हें सार्वधातुकांचें विशेषणच असूं दे.

पण तसें केलें असतां आशीर्लिङ् आणि लिट् यांमध्यें कर्मवद्भाव होणार नाहीं, असा दोष दाखविला आहे ना ?

त्याकरितां लिङ् व लिट् यांचीही मागून अनुवृत्ति करावी म्हणजे झालें.

मागें कोठें बरें लिङि आणि लिटि हे शब्द आहेत ?

कास्प्रत्ययादाममन्त्रे लिटि (३।१।३५) आणि लिङ्याशिष्यङ् (३।१।८६) येथें आहेत. आणि असा हा विशेषणपक्ष घेतला म्हणजे कतीह कुष्णानाः पादाः येथें कर्मवद्भाव होईल असा जो दोष पूर्वी दाखविला होता तोही या विशेषणपक्षानें येत नाहीं. येथेंही सार्वधातुकग्रहणाची जी अनुवृत्ति होते ती लकाराचे स्थानीं झालेले जे सार्वधातुक अशी विशेषणविशिष्टाचीच येत आहे.

आतां ह्या श्यन्प्रत्ययानें स्य वगैरे प्रत्ययांचा बाध होईल असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तर असें की प्रकृत सूत्रामध्यें यकाचा निषेध सांगून त्या निषेधाच्या संनियोगानें

---

४. आशीर्लिङ् आणि लिट् येथें कर्मवद्भावामुळेंच आत्मनेपद होत आहे.

ततः कुषिरजोः प्राचां यक्चिणौ न भवतः। ततः श्यन्परस्मैपदं चेति॥ यथैव तर्हि यको विषये श्यन्भवत्येवं चिणोऽपि विषये प्राप्नोति। अकोषि पादः स्वयमेव। अरञ्जि वस्त्रं स्वयमेवेति॥ एवं तर्हि द्वितीयो योगविभागः करिष्यते। न दुहस्नुनमां चिण्भवति। ततो यक्। यक् च न भवति दुहस्नुनमाम्। ततः कुषिरजोः प्राचां यन्न भवति। ततः श्यन्परस्मैपदं च॥ अथवानुवृत्तिः करिष्यते। स्यतासी ललुटोः [३३] च्लि लुङि [४३] च्लेः सिज्भवति। कर्तरि शप् [६८] स्यतासी ललुटोः च्लि लुङि च्लेः सिज्भवतीति। दिवादिभ्यः श्यन् [६९] स्यतासी ललुटोः च्लि लुङि च्लेः सिज्भवतीति। कुषिरजोः प्राचां श्यन्परस्मैपदं च स्यतासी ललुटोः च्लि लुङि च्लेः सिज्भवतीति॥ अथवान्तरङ्गाः स्यादयः। कान्तरङ्गता। लकारावस्थायामेव स्यादयः सार्वधातुके श्यन्॥

## धातोः॥ ३। १। ९१॥

आ कुतोऽयं धात्वधिकारः। किं

श्यन्प्रत्यय सांगतां येईल. तें असें:– न दुहस्नुनमां यक्चिणौ या सूत्राच्या पुढें 'कुषिरजोः प्राचाम्' एवढेंच सूत्र करून कर्मकर्तरिप्रयोगांमध्यें कुष् आणि रज् या धातूंहून यक् व चिण् होत नाहींत असा अर्थ करावा. त्याच्यापुढें 'श्यन् परस्मैपदं च' असें श्यन् आणि परस्मैपद सांगणारें दुसरें सूत्र होय[5].

तर मग जसा यक्प्रत्ययाच्या विषयांत श्यन् होतो तसा चिणाच्या विषयांतही श्यन्प्रत्यय होऊं लागेल; उदा०:– अकोषि पादः स्वयमेव, अरञ्जि पादः स्वयमेव.

तर मग आणखी एक दुसरा योगविभाग 'न दुहस्नुनमां यक्चिणौ' या सूत्रामध्यें करतां येईल. तो असा:– 'न दुहस्नुनमां चिण्' हें पहिलें सूत्र फक्त चिण्प्रत्ययाचा निषेध सांगणारें होय. त्याच्यापुढें यक् असें दुसरें सूत्र दुह्, स्नु आणि नम् या धातूंना फक्त यक्प्रत्ययाचाच निषेध सांगणारें आहे. तेव्हां त्याच्यापुढील 'कुषिरजोः प्राचाम्' हेंही सूत्र कुष् व रज् या धातूंसंबंधानें फक्त यक्प्रत्ययाचाच निषेध सांगणारें होईल. तेव्हां अर्थात्च त्याच्यापुढील 'श्यन् परस्मैपदं च' हें सूत्र यक्प्रत्यय प्राप्त होईल तेथें त्याचा निषेध करून श्यन्प्रत्यय सांगतें. अथवा स्य, तास्, च्लि, सिच्, यांची येथें अनुवृत्ति करून पुनः विधान केलें म्हणजे श्यन्प्रत्ययानें त्यांचा बाध होण्याची शंकाच येणार नाहीं. स्यतासी ललुटोः (३।१।३३) याची अनुवृत्ति च्लि लुङि (३।१।४३) च्लेः सिच् (३।१।४४)येथें आहे. वाक्यार्थ स्वतंत्र प्रत्येकाचे आहेत. पुढें कर्तरि शप् (३।१।६८) येथें स्यतासी ललुटोः च्लि लुङि च्लेः सिच् यांची अनुवृत्ति आहेच. पुढें दिवादिभ्यः श्यन् (३।१।६९) येथें स्यतासी ललुटोः च्लि लुङि च्लेः सिच् यांची अनुवृत्ति आहेच. तसेंच कुषिरजोः प्राचां श्यन् परस्मैपदं च या प्रकृत सूत्रामध्येंही स्यतासी ललुटोः च्लिलुङि च्लेः सिच् यांची अनुवृत्ति आहेच.

अथवा स्य वगैरे प्रत्यय हे अंतरंग असल्यामुळें अगोदरच होतील.

ते अंतरंग कसे?

लकार अवस्थेंतच त्यांची प्राप्ति येते म्हणून ते अंतरंग होत. आणि लकाराला आदेश झाल्यानंतर सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना श्यन् वगैरेंची प्राप्ति येते म्हणून ते बहिरंग होत.

(सू.९१) धातोः हा अधिकार कोठपर्यंत आहे. लकाराला (३।४।७७) आदेश सांगण्या-

५. तेव्हां 'कुषिरजोः प्राचाम्०' या पहिल्या सूत्रानें जेथें यक् व चिण् यांचा निषेध होतो तेथेंच पुढील सूत्रानें श्यन् व परस्मैपद होतें.

१. हें अधिकारसूत्र आहे. येथून पुढें प्रत्येक

प्राग्लादेशात्। आहोस्विदा तृतीयाध्यायपरिसमाप्तेः।

**धात्वधिकारः प्राग्लादेशात् ॥ १ ॥**

प्राग्लादेशाद्धात्वधिकारः ॥

**लादेशे हि व्यवहितत्वादप्रसिद्धिः ॥ २ ॥**

अनुवर्तमाने हि लादेशे धात्वधिकारे व्यवहितत्वादप्रसिद्धिः स्यात् ॥ किं च स्यात्।

**आद्ये योगे न व्यवाये तिङः स्युः**

आद्ये योगे विकरणैर्व्यवहितत्वात्तिङो न स्युः। पचति पठतीति ॥ इदमिह संप्रधार्यम्। विकरणाः क्रियन्तामादेशा इति किमत्र कर्तव्यम्। परत्वादादेशाः। नित्या विकरणाः। कृतेष्वप्यादेशेषु प्राप्नुवन्त्यकृतेष्वपि प्राप्नुवन्ति। नित्यत्वाद्विकरणेषु कृतेषु विकरणैर्व्यवहितत्वादादेशा न प्राप्नुवन्ति। अनवकाशास्तर्ह्यादेशाः। सावकाशा आदेशाः। कोऽवकाशः। य एते लुग्विकरणाः श्लुविकरणाश्च लिङ्लिटौ च ॥

**न स्यादेत्वं टेष्टितां यद्विधत्ते।**

यच्च टित्संज्ञानामेत्वं विधत्ते तच्च विकरणैर्व्यवहितत्वान्न स्यात् ॥

---

पूर्वीच संपतो किंवा तिसरा अध्याय संपेपर्यंत चालू राहणार आहे?

(वा.१) धातोः हा अधिकार लकाराला आदेश सांगण्यापूर्वीच संपतो.

(वा.२) लकाराला आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें जर धातोः हा अधिकार चालू राहील तर मध्यें विकरणप्रत्ययांनीं व्यवधान येत असल्यामुळें धातूच्या पुढें अव्यवहित लकार च कोठें दृष्टीस पडणार नाहीं.

मग तसें झालें तर काय होईल?

पहिल्याच सूत्रामध्यें लकाराचे स्थानीं सांगितलेले तिङादेश विकरणप्रत्ययांनीं व्यवधान येत असल्यामुळें होणार नाहींत; उदा०—पचति, पठति.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो की विकरणप्रत्यय अगोदर करावेत किंवा लकाराचे स्थानीं आदेश अगोदर करावेत.

मग यांत अगोदर काय बरें करावें?

परत्वास्तव विकरणप्रत्ययांचा बाध करून तिङादेश अगोदर करावेत.

पण विकरणप्रत्यय नित्य आहेत ना. कारण तिङादेश केल्यानंतरही ते प्राप्त होत आहेत आणि त्यांच्या पूर्वीही प्राप्त होत आहेत. तेव्हां नित्यत्वास्तव पूर्वी विकरणप्रत्यय केल्यानंतर त्या विकरणप्रत्ययांनीं व्यवधान येत असल्यामुळें तिङादेश प्राप्त होत नाहींत.

पण तिङादेश हे अनवकाश आहेत ना?

कां बरें? त्या आदेशांना तर अवकाश आहे.

तो कोठें बरें अवकाश आहे?

ज्या धातूच्या पुढील विकरणप्रत्ययाचा लुक् होतो किंवा श्लु होतो असे धातु असतील तेथें अवकाश आहे. तसाच आशीर्लिङ् किंवा लिट्प्रत्यय केला असेल तेथें अवकाश आहे.

तसेंच टित् लकारांच्या आदेशांतील टिसंज्ञक भागाला जें एत्व (३।४।७९) सांगितलें आहे तेंही तेथें धातोः हा अधिकार आला तर विकरणांनीं व्यवधान होत असल्यामुळें होणार नाहीं.

---

सूत्रांत धातोः या पदाचा संबंध होतो.

२. पच् वगैरे धातूंहून लट्प्रत्यय केल्याबरोबर शप्, श्यन्, स्य वगैरे विकरणप्रत्यय होणार आहेत. लकार कर्ता या अर्थी केला (३।४।६९) आहे. आणि कर्ता या अर्थाचा प्रत्यय पुढें असतांना 'कर्तरि शप्' (३।१।६८) इत्यादि सूत्रांनीं शप्, श्यन् वगैरे विकरणप्रत्यय सांगितले आहेत. तेथें सार्वधातुके ही विषयसप्तमी मनांत घेतली आहे. स्य, तासि हे विकरणप्रत्यय तर लृ, लुट् पुढें असतांनाच सांगितले आहेत. तेव्हां तेही लकार केल्याबरोबरच होणार आहेत.

**एशः शित्त्वं**

एकारश्च शित्कर्तव्यः। किं प्रयोजनम्। शित्सर्वस्येति सर्वादेशो यथा स्यात्। अक्रियमाणे हि शकारे तस्मादित्युत्तरस्यादेः परस्य [१.१.६७; ५४] इति तकारस्यैत्त्वे कृते द्वयोरेकारयोः श्रवणं प्रसज्येत। निवृत्ते पुनर्लादेशे धात्वधिकारेऽलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्येकारस्यैकारवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वान्तरेणापि शकारं सर्वादेशो भविष्यति ॥

**यच्च लोटो विधत्ते**

**तच्च विकरणैर्व्यवहितत्वान्न स्यात्।**

किं पुनस्तत्। लोटो लङ्वत् एरुः सेर्ह्यपिच्च वा छन्दसि [३.४.८५-८८] इति ॥

**यच्चाप्युक्तं लङ्लिङोस्तच्च न स्यात् ॥**

किं पुनस्तत्। नित्यं ङितः इतश्च तस्थस्थमिपां ताम्तम्तामः लिङः सीयुट् यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च [९९-१०३] इति॥ तस्मात्प्राग्लादेशाद्धात्वधिकारः ॥

यदि प्राग्लादेशाद्धात्वधिकारोऽकारः शित्कर्तव्यः। किं प्रयोजनम्। शित्सर्व-

---

लिटामध्यें तप्रत्ययाचे स्थानीं सांगितलेला एकारादेश (३।४।८१) शित् केला पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा की शिदादेश सर्वांचे स्थानीं होतो (१।१।५५) या परिभाषेनें तो एकारादेश 'त' या सर्वांचे स्थानीं झाला पाहिजे. जर त्याला इत्संज्ञक शकार जोडला नाहीं तर धातोः या पंचमीमुळें 'तस्मादित्युत्तरस्य' (१।१।६७) आणि आदेः परस्य (१।१।५४) या दोन परिभाषांच्या योगानें तप्रत्ययांतील आदि असलेल्या तकाराला एकारादेश होईल आणि पुढील अकाराला एत्व(३।४।७९) होऊन दोन एकारांचें श्रवण होऊं लागेल.

आतां लकाराच्या आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें धातोः हा अधिकार आला नाहीं म्हणजे मात्र 'कोणताही आदेश अंत्याला होतो' (१।१।५२) या सामान्य परिभाषेनें एत्वानें झालेल्या एकारालाच एकार होईल आणि तसा होण्यांत कांहींच उपयोग नाहीं म्हणून सामर्थ्यास्तव शित् केला नाहीं तरी सर्वाला होईल.

तसेंच त्याच्यापुढें हीं जीं कार्यें लोटाला सांगितलीं आहेत तींही तेथें धातोः हा अधिकार आला तर विकरणप्रत्ययांनीं व्यवधान येत असल्यामुळे होणार नाहींत[3].

तीं कार्ये कोणतीं ?

लोटो लङ्वत्, एरुः, सेर्ह्यपिच, वा छन्दसि (३।४।८५-८८), हीं तीं कार्यें होत.

तसेच त्याच्यापुढें हीं जीं कार्यें लङ् आणि लिङ् यांना सांगितलीं आहेत तींही तेथें धातोः हा अधिकार आला तर विकरणप्रत्ययांनीं व्यवधान येत असल्यामुळं होणार नाहींत.

तीं कार्यें कोणतीं ?

नित्यं ङितः, इतश्च, तस्थस्थमिपां तांतंतामः, लिङः सीयुट्, यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च (३।४।९९-१०३), हीं तीं कार्यें होत. तेव्हां लादेशांच्या पूर्वीच धातोः हा अधिकार संपतो असें मानलें पाहिजे.

पण जर लादेशांच्या पूर्वी धातोः हा अधिकार संपत असेल तर 'अ' या आदेशाला (३।४।८२) इत्संज्ञक शकार जोडला पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा की शिदादेश सर्वांचे स्थानीं होतो (१।१।५५) या परिभाषेनें तो

---

३. तात्पर्य, ज्या ठिकाणीं विकरणप्रत्ययाची प्राप्ति येते तेथें त्यांनीं व्यवधान असल्यामुळे तिङादेश होणार नाहींत हा दोष धातोः हा अधिकार 'तिप्तस्०' या सूत्रामध्यें येईल तर कायम राहतो.

स्येति सर्वादेशो यथा स्यात् । अनुवर्तमाने पुनर्लादेशे धात्वधिकारे तस्मादित्युत्तरस्यादेः परस्येति थकारस्यात्वे कृते द्वयोरकारयोः पररूपेण सिद्धं रूपं स्यात् पेच यूयम् चक्र यूयमिति । ननु च निवृत्तेऽपि लादेशे धात्वधिकारेऽलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यकारस्याकारवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वान्तरेणापि शकारं सर्वादेशो भविष्यति । अस्त्यन्यदकारस्याकारवचने प्रयोजनम् । किम् । वक्ष्यत्येतदकारस्याकारवचनं समसंख्यार्थमिति ॥ आर्धधातुकसंज्ञायां धातुग्रहणं कर्तव्यं धातोः परस्यार्धधातुकसंज्ञा यथा स्यात् । इह मा भूत् वृक्षत्वम् वृक्षतेति ॥ तस्माल्लादेशे धात्वधिकारोऽनुवर्त्यः ॥

ननु चोक्तमाद्ये योगे न व्यवाये तिङः स्युरिति । नैष दोषः । आनुपूर्व्यात्सिद्धमेतत् । नात्राकृतेष्वादेशेषु विकरणाः प्राप्नुवन्ति । किं कारणम् । सार्वधातुके विकरणा उच्यन्ते न चाकृतेष्वादेशेषु सार्वधातुकत्वं भवति । ये तर्हि नैतस्मिन्विशेषे विधीयन्ते । के पुनस्ते । स्यादयः ।

---

अकारादेश 'थ' या सर्वाचे स्थानीं झाला पाहिजे. आतां लादेशामध्यें धातोः हा अधिकार चालू राहील तर मात्र 'तस्मादित्युत्तरस्य' आणि 'आदेः परस्य' या दोन परिभाषांच्या योगानें थप्रत्ययांतील आदिथकाराला अकार आदेश करून दोन अकारांना पररूप (६।१।९७) केलें म्हणजे यूयं पेच, यूयं चक्र, हीं क्रियापदें सिद्ध होतात.

पण लादेशामध्यें धातोः हा अधिकार आला नाहीं तरी 'कोणताही आदेश अंत्याला होतो' या सामान्य परिभाषेनें अकारालाच अकार होईल, आणि तसा होण्यांत कांहींच उपयोग नाहीं, म्हणून सामर्थ्यास्तव शित् केला नाहीं तरी सर्वाला होईल.

पण अकारालाच अकार झाला तरी त्याचा दुसरा उपयोग आहेच.

तो कोणता ?

अकारवचनं समसंख्यार्थम् (३।४।८२, वा.४) असा त्याचा उपयोग पुढें सांगण्यांत येणार आहे. तसेंच लादेशाच्या पूर्वी धातोः हा अधिकार संपला तर आर्धधातुक संज्ञा सांगणाऱ्या शास्त्रामध्यें (३।४।११४) धातुग्रहण केलें पाहिजे. कारण धातूहून सांगितलेल्याच प्रत्ययाला आर्धधातुक संज्ञा झाली पाहिजे. वृक्षत्वम्, वृक्षता, येथें त्व आणि तल् (५।१।११९) या प्रत्ययांना आर्धधातुक संज्ञा न झाली पाहिजे. तेव्हां एकंदरींत लादेशांमध्यें, म्ह. तिसरा अध्याय संपेपर्यंत, धातोः हा अधिकार आणला पाहिजे.

परंतु 'तिप्तस्झि०' (३।४।७८) या सूत्रानें सांगितलेले लादेश विकरणप्रत्ययांनीं व्यवधान होत असल्यामुळें होणार नाहींत असा दोष त्या पक्षावर दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं हें ओघानेंच सिद्ध होत आहे. कारण येथें लादेश केले नाहींत तोंपर्यंत विकरणप्रत्ययांची प्राप्तिच येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की शप्, श्यन्, वगैरे विकरणप्रत्यय हे सार्वधातुक पुढें असतांनाच सांगितले आहेत. आणि लादेश तिङ् करण्याच्या पूर्वी सार्वधातुकसंज्ञेची (३।४।११३) प्राप्तिच येत नाहीं.

तर मग ज्या विकरणप्रत्ययांना सार्वधातुक प्रत्ययाची जरूर नाहीं त्या विकरणांनीं व्यवधान होणारच ना ?

असे विकरणप्रत्यय कोणते बरें आहेत ?

स्य वगैरे (३।१।३३) विकरण तसे आहेत.

तेथेंही दोष नाहीं. कारण धातोः हें लका-

---

४. सार्वधातुके ही परसप्तमीच घेणें न्याय्य आहे. विषयसप्तमी घेण्याला येथें कांहीं प्रमाण नाहीं.

तत्रापि विहितविशेषणं धातुग्रहणम् । धातोर्विहितस्य लस्येति ॥ यद्येवं विन्दतीति णलादयः प्राप्नुवन्ति । धातुनात्र विहितं विशेषयिष्यामो विदिना चानन्तर्यम् । धातोर्विहितस्य लस्य विदेरनन्तरस्येति ॥ इह तर्हि अजक्षिष्यन् अजागरिष्यन्नित्यभ्यस्ताज्झेर्जुस्भवतीति जुस्भावः प्राप्नोति । अत्रापि धातुना विहितं विशेषयिष्यामोऽभ्यस्तेनानन्तर्यम् । धातोर्विहितस्याभ्यस्तादनन्तरस्येति ॥ आतः [३.४.११०] इत्यत्र कथं विशेषयिष्यसि । यदि तावद्धातुग्रहणं विहितविशेषणमाकारग्रहणमानन्तर्यविशेषणम् अलुनन्नित्यत्रापि प्राप्नोति । अथाकारग्रहणं विहितविशेषणं धातुग्रहणमानन्तर्यविशेषणम् अपिबन्नित्यत्रापि प्राप्नोति । अस्तु तर्हि धातुग्रहणं विहितविशेषणमाकारग्रहणमानन्तर्यविशेषणम् । ननु चोक्तमलुनन्नित्यत्रापि प्राप्नोतीति । नैष दोषः । लोपे कृते न भविष्यति । नात्र लोपः प्राप्नोति । किं कारणम् । ईत्वेन बाध्यते । नात्रेत्वं प्राप्नोति । किं कारणम् । अन्तिभावेन बाध्यते ।

---

रांचें विहितविशेषण केलें म्हणजे धातूहून विहित लकार त्याचे स्थानीं तिङादेश होतात असा अर्थ होईल.

जर विहितविशेषण केलें तर 'विदो लटो वा' (३।४।८३) येथेंही विहितविशेषणच होईल आणि विन्दति येथें श-(३।१।७७)प्रत्ययानें व्यवधान असेल तरी तिपाला णलादेश होऊं लागेल. धातोः हें विहितविशेषण होईल पण विदः हें विहितविशेषण नव्हे. तेव्हां विद्धातूच्या जवळच लकार असला पाहिजे. म्हणजे धातूहून विहित आणि विद्धातूच्या जवळचा जो लकार असा अर्थ होईल.[५]

तर मग सिजभ्यस्तविदिभ्यः (३।४।१०९) येथें विहितविशेषण झालें तर अजक्षिष्यन्, अजागरिष्यन्, येथें अभ्यस्ताहून विहित झिप्रत्ययाला जुसादेश होऊं लागेल.

तेथेंही धातोः हें विहितविशेषण होईल, पण 'सिजभ्यस्तविदिभ्यः' हें विहितविशेषण नव्हे. तेव्हां धातूहून विहित आणि अभ्यस्ताहून पर जो झिप्रत्यय त्याला जुस् होतो असा अर्थ होतो.

आतां 'आतः' (३।४।११०) येथें कसें विशेषण करावयाचें? जर धातोः हें झिप्रत्ययाचें विहितविशेषण आणि आतः हें आनंतर्यविशेषण असेल तर अलुनन्[६], अपुनन्, येथेंही आतः यानें जुसादेश होऊं लागेल. आतां आतः हें विहितविशेषण आणि धातोः हें आनंतर्यविशेषण असेल तर अपिबन्[७], अजिघ्रन्, येथेंही जुसादेश होऊं लागेल.

तर मग आतां धातोः हेंच विहितविशेषण आणि आतः हें आनंतर्यविशेषण असूं दे. पण तसें केलें असतां अलुनन्, अपुनन्, येथें जुसादेश होऊं लागेल असा दोष येतो ना?

हा दोष येत नाहीं. कारण आकाराचा लोप (६।४।११२) केल्यानंतर जुसादेशाची प्राप्ति नाहीं.

पण येथें लोपाची प्राप्ति नाहीं ना?

काय कारण?

कारण असें की तेथें ईत्वानें (६।४।११३) लोपाचा बाध होत आहे.

पण येथें ईत्वाची प्राप्ति येत नाहीं ना?

काय कारण?

---

५. अदादिगणांतील विद्धातुच येथें घ्यावयाचा आहे. कारण तेथेंच शप्प्रत्ययाचा लुक् होत असल्यामुळें विकरणानें व्यवधान येत नाहीं. पण विहित विशेषण केलें तर तुदादिगणांतील विद्धातुही तेथें घेतां येईल.

६. श्नाप्रत्ययाच्या आकाराच्या पुढें अव्यवहित झिप्रत्यय आहे.

७. येथें पा, घ्रा, या आकारान्त धातूंहून विहित झिप्रत्यय आहे.

नात्रान्तिभावः प्राप्नोति । किं कारणम् । जुस्भावेन बाध्यते । नात्र जुस्भावः प्राप्नोति । किं कारणम् । लोपेन बाध्यते । लोप ईत्वेनेत्वमन्तिभावेनान्तिभावो जुस्भावेन जुस्भावो लोपेनेति चक्रकमव्यवस्था प्रसज्येत । नास्ति चक्रकप्रसङ्गः । न ह्यव्यवस्थाकारिणा शास्त्रेण भवितव्यम् । शास्त्रेण नाम व्यवस्थाकारिणा भवितव्यम् । न चात्र हलादिना मुहूर्तमपि शक्यमवस्थातुम् । तावत्येवान्तिभावेन भवितव्यम् । अन्तिभावे कृते लोपः । लोपेन व्यवस्था भविष्यति ॥ यदप्युच्यत एशः शित्त्वमिति । क्रियते न्यास एव ॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि ।

**प्रयोजनं प्रातिपदिकप्रतिषेधः ॥३॥**

प्रातिपदिकप्रतिषेधः प्रयोजनम् । धातोस्तव्यदादयो यथा स्युः प्रातिपदिकान्मा भूवन्निति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । साधने तव्यदादयो विधीयन्ते साधनं च क्रियायाः । क्रियाभावात्साधनाभावः । साधनाभावादसत्यपि धात्वधिकारे प्रातिपदिकात्तव्यदादयो न भविष्यन्ति ॥

कारण असें की तेथें अन्तादेशानें (७।१।३) ईत्वाचा बाध होत आहे.

पण येथें अन्तिआदेशाची प्राप्ति येत नाहीं ना ?

काय कारण ?

कारण असें की जुसादेशानें (३।४।११०) अन्तिआदेशाचा बाध होत आहे.

पण येथें जुसादेशाची प्राप्ति येत नाहीं ना ?

काय कारण ?

कारण असें की आकाराच्या लोपानें (६।४।११२) जुसादेशाचा बाध होत आहे.

तर मग आता येथें लोपाचा बाध ईत्वानें होत आहे, ईत्वाचा बाध अन्तादेशानें होत आहे, अन्तादेशाचा बाध जुसादेशानें होत आहे, आणि जुसादेशाचा बाध लोपानें होत आहे, असें हें एकसारखें चक्रक चालू राहून अव्यवस्थाच होत आहे.

येथें चक्रक येत नाहीं. शास्त्र कांहीं अव्यवस्था करणारें नव्हे. शास्त्रच जर तें आहे तर त्यानें व्यवस्था झालीच पाहिजे. ती व्यवस्था अशी की येथें झि हा प्रत्यय हलादि अशा अवस्थेत क्षणभरही राहणें शक्य नाहीं.

झि असें मनांत आलें की लगेच त्याला अन्तादेश होणारच. तो अन्तादेश केल्यानंतर आकाराचा लोप होईल. आणि तो लोप केल्या नंतर सर्व व्यवस्था नीट होईल.

आतां लादेशामध्यें धातोः हा अधिकार चालू राहील तर एश् असा इत्संज्ञक शकार जोडून आदेश सांगितला पाहिजे असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तर असें की तेथें (३।४।८१) शकार जोडलाच आहे.

आतां धातोः या अधिकाराचे उपयोग कोणते बरें आहेत ?

(वा.३) तव्यत् (३।१।९६) वगैरे प्रत्यय धातूहूनच झाले पाहिजेत, प्रातिपदिकाहून होऊं नयेत, अशा रीतीनें तेथें प्रातिपदिकाचा निषेध होणें हा धातोः या अधिकाराचा उपयोग होय.

धातोः या अधिकाराचा हा उपयोग येत नाहीं. कारण तव्यत् वगैरे प्रत्यय कर्ता, कर्म, वगैरे कारक या अर्थी सांगितले आहेत. आणि कारक हें तर क्रियेमुळेंच होत असतें. तेव्हां प्रातिपदिकाला क्रिया हा अर्थ मुख्यत्वानें नसल्यामुळें त्या प्रातिपदिकार्थाचा क्रियाकारक भावसंबंधानें कारकाशीं अन्वय संभवत नाहीं. म्हणून धातोः हा अधिकार नसला तरी प्रातिपदिकाहून तव्यत् वगैरे प्रत्यय होणार नाहींत.

८. अन्तादेश केला म्हणजे प्रत्यय हलादि नसल्यामुळें ईत्वाची प्राप्ति येत नाही.

९. उपदेशिवद्वचनानें (७।१।२, वा.१) उपदेशींच अन्तादेश होणार आहे.

**स्वपादिषु ॥ ४ ॥**

स्वपादिषु तर्हि प्रयोजनम् । स्वपिति । सुपतीति मा भूत् ॥

**अङ्गसंज्ञा च ॥ ५ ॥**

अङ्गसंज्ञा च प्रयोजनम् । यस्मात्प्रत्ययविधिस्तदादिप्रत्ययेऽङ्गम् [१.४.१३] इति धातोरङ्गसंज्ञा सिद्धा भवति ॥

**कृत्संज्ञा च ॥ ६ ॥**

कृत्संज्ञा च प्रयोजनम् । धातुविहितस्य प्रत्ययस्य कृत्संज्ञा सिद्धा भवति ॥

**उपपदसंज्ञा च ॥ ७ ॥**

उपपदसंज्ञा च प्रयोजनम् । तत्रैतस्मिन्धात्वधिकारे सप्तमीनिर्दिष्टमुपपदसंज्ञं भवतीत्युपपदसंज्ञा सिद्धा भवति ॥

कृदुपपदसंज्ञे तावन्न प्रयोजयतः। अधिकारादप्येते सिद्धे ॥ स्वपादिषु तर्ह्यङ्गसंज्ञा च प्रयोजनम् ॥

**धातुग्रहणमनर्थकं यङ्विधौ धात्वधिकारात् ॥ ८ ॥**

धातुग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । यङ्विधौ धात्वधिकारात् । यङ्विधौ धातुग्रहणं प्रकृतमनुवर्तते ॥ तच्चावश्यमनुवर्त्यम् ।

**अनधिकारे ह्यङ्गसंज्ञाभावः ॥ ९ ॥**

---

(वा.४) तर मग स्वप् वगैरे धातूंहूनच लकार वगैरे प्रत्यय व्हावेत, त्याच अर्थाच्या सुप्[१०] वगैरे अपभ्रंशाहून होऊं नयेत, हा धातोः या अधिकाराचा उपयोग होय. स्वपिति असा प्रयोग व्हावा, सुपति असा होऊं नये.

(वा.५) अंगसंज्ञा होणें हें धातोः या अधिकाराचें प्रयोजन होय. यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम् (१।४।१३) ह्या सूत्रानें धातूहून प्रत्ययाचें विधान केलें म्हणून धातूला[११] अंगसंज्ञा सिद्ध होते.

(वा.६) तसेंच धातूहून केलेल्या प्रत्ययाला सांगितलेली (३।१।९२) कृत्संज्ञा होते, हाही धातोः या अधिकाराचा उपयोग होय.

(वा.७) उपपदसंज्ञा होणें हाही या अधिकाराचा उपयोग होय. कारण या धातोः अधिकारामधील सूत्रांमध्यें आचार्यांनीं सप्तमीविभक्तीनें ज्याचा निर्देश केला असेल त्याला पुढील सूत्रानें उपपदसंज्ञा सांगितली आहे. ती उपपदसंज्ञा सिद्ध होते.

कृत्संज्ञा आणि उपपदसंज्ञा यांच्याकरितां धातोः हा अधिकार करावयास नको. कारण तत्रोपपदं सप्तमीस्थम् आणि कृदतिङ् या दोन सूत्रांचाच अधिकार पुढील प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें केला म्हणजे काम भागेल.

तर मग सुप् इत्यादि अपभ्रंशांहून प्रत्यय होऊं नयेत आणि धातूलाच अंगसंज्ञा व्हावी हे धातोः या अधिकाराचे उपयोग समजावेत.

(वा.८) तरी पण धातोः हा अधिकार येथें करावयास नको. कारण यङ्प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें (३।१।२२) धातोः असें पद घातलेंच आहे. तेंच येथून पुढेंही अनुवृत्त होईल आणि त्या धातुग्रहणाची तर तेथून पुढें अनुवृत्ति चालू झाली आहे असें अवश्य मानलेंच पाहिजे.

(वा ९) त्या धातुग्रहणाची अनुवृत्ति पुढें चालू नसेल तर करिष्यति, हरिष्यति, येथे अंग-

---

१०. स्वप्धातूचा अर्थ जो निजणें ही क्रिया तोच अर्थ सुप् या अपभ्रंशाचा आहे. पण त्याचा धातुपाठामध्यें पाठ नसल्यामुळें त्याला धातुसंज्ञा होत नाही.

११. धातूला अंगसंज्ञा झाली म्हणून प्राकरोत् येथे अंगाला सांगितलेला अडागम (६।४।७१) धातूच्याच मागें होतो, उपसर्गाच्या मागें होत नाही.

अनधिकारे हि सत्यङ्गसंज्ञाया अभावः स्यात् । करिष्यति हरिष्यतीति ॥ यदि तदनुवर्तते चूर्णेचुरादिभ्यो णिज्भवति धातोश्चेति धातुमात्राण्णिच्प्राप्नोति ।

**हेतुमद्वचनं तु ज्ञापकमन्यत्राभावस्य ॥ १० ॥**

यदयं हेतुमति च [३.१.२६] इत्याह तज्ज्ञापयत्याचार्यो न धातुमात्राण्णिज्भवतीति ॥ इह तर्हि कण्ड्वादिभ्यो यग्भवति धातोश्चेति धातुमात्राद्यक्प्राप्नोति ।

**कण्ड्वादिषु च व्यपदेशिवद्वचनात् ॥ ११ ॥**

यदयं कण्ड्वादिभ्यो यग्भवतीत्याह तज्ज्ञापयत्याचार्यो न धातुमात्राद्यग्भवतीति ॥ अथवा कण्ड्वादीनेव धातुग्रहणे नाभिसंभन्त्स्यामः । कण्ड्वादिभ्यो धातुभ्य इति ॥

## तत्रोपपदं सप्तमीस्थम् ॥ ३।१।९२ ॥

स्थग्रहणं किमर्थम् । तत्रोपपदं सप्तमीतीयत्युच्यमाने यत्रैव सप्तमी श्रूयते

---

संज्ञा होणार नाहीं.[१२]

पण त्या धातुग्रहणाची अनुवृत्ति पुढें चालू असेल तर 'सत्यापपाश०' (३।१।२५) येथेंही त्याचा संबंध होईल, आणि सत्य वगैरे शब्दांहून णिच्प्रत्यय होतो आणि धातूहून णिच्प्रत्यय होतो असा अर्थ होऊन वाटेल त्या धातूहून णिच्प्रत्यय होऊं लागेल.

(वा.१०) ज्या अर्थी आचार्य हेतुमति च (३।१।२६) या त्याच्यापुढील सूत्रानें धातूहून णिच्प्रत्ययाचें विधान करतात त्या अर्थी ते असें सुचवितात की 'सत्याप०' या पूर्वसूत्रानें वाटेल त्या धातूहून णिच्प्रत्यय होत नाहीं.[१३]

तर मग कण्ड्वादिभ्यो यक् (३।१।२७) येथें त्या धातुग्रहणाचा संबंध होईल आणि कण्डू वगैरेंहून यक्प्रत्यय होतो आणि धातूहून यक् प्रत्यय होतो असा अर्थ होऊन वाटेल त्या धातूहून यक्प्रत्यय होऊं लागेल.

(वा.११) भू, एध, वगैरे जे मुख्य धातु त्यांसारखेच कण्डू वगैरे आहेत. तेव्हां वाटेल त्या धातूहून यक्प्रत्यय सांगितला तर तो कण्डू वगैरेंहून होईलच असें असतां ज्या अर्थी आचार्य कण्डू वगैरेंहून निराळें यक्प्रत्ययाचें विधान करतात त्या अर्थी ते असें सुचवितात की वाटेल त्या धातूहून यक्प्रत्यय होत नाहीं. अथवा अनुवृत्त आलेल्या धातुग्रहणाचा कण्डू वगैरेंकडेसच संबंध करावा. म्हणजे कण्डू वगैरे जे धातु त्याहून यक्प्रत्यय होतो असा अर्थ होईल.

(सू.९२) येथें स्थ हा शब्द कशाकरितां उच्चारला आहे ?

'तत्रोपपदं सप्तमी' एवढेंच सूत्र केलें तर उदाहरणामध्यें ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष सप्तमी

---

१२. कारण स्यतासी लृलुटोः (३।१।३३) येथें धातुग्रहणाची अनुवृत्ति नसेल तर धातूहून स्य वगैरे प्रत्ययांचें विधान केलें असें होत नाही.

१३. तेव्हां सत्याप० या सूत्रामध्यें अनुवृत्त आलेल्या धातोः याचा संबंध चुरादिकांकडे करावा.

१. या धातोः-अधिकारामध्यें धातूहून प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रांतील जे कर्मणि (३।२।१) वगैरे सप्तम्यन्त पद त्याच्या अर्थाचें वाचक जें पद तें त्या सूत्रानें सांगितलेला प्रत्यय धातूहून कर्तव्य असतांना धातूच्याजवळ असेल तर त्याला उपपद अशी संज्ञा होते; उदा०:– कुम्भं करोतीति कुम्भकारः. येथें कुम्भशब्द उपपद असतांना कृधातूहून 'कर्मण्यण्' या सूत्रानें अण्प्रत्यय होतो. तेथें कुम्भशब्दाला उपपदसंज्ञा प्रकृत सूत्रानें होते. सूत्रामध्यें कर्मणि हें सप्तम्यन्त पद आहे, त्याचा अर्थ कर्म. येथें कुम्भ हेंच कर्म आहे. तेव्हां त्या कर्माचा वाचक शब्द येथें कुम्भ हा आहे. त्याला उपपदसंज्ञा झाली म्हणून 'उपपदमतिङ्' (२।२।१९) या सूत्रानें समास झाला आहे.

तत्रैव स्यात् । स्तम्बेरमः कर्णेजपः । यत्र वैतेन शब्देन निर्देशः क्रियते । सप्तम्यां जनेर्डः [३.२.९७] इति । इह न स्यात् । कुम्भकारः नगरकारः । स्थग्रहणे पुनः क्रियमाणे यत्र च सप्तमी श्रूयते यत्र च न श्रूयते यत्र चैतेन शब्देन निर्देशः क्रियते यत्र चान्येन सप्तमीस्थमात्रे सिद्धं भवति ॥ अथ तत्रग्रहणं किमर्थम् ।

**तत्रग्रहणं विषयार्थम् ॥ १ ॥**

विषयः प्रतिनिर्दिश्यते । तत्रैतस्मिन्धात्वधिकारे यत्सप्तमीनिर्दिष्टं तदुपपदसंज्ञं भवतीत्युपपदसंज्ञा सिद्धा भवति ॥

**उपपदसंज्ञायां समर्थवचनम् ॥ २ ॥**

उपपदसंज्ञायां समर्थग्रहणं कर्तव्यम् । समर्थमुपपदं प्रत्ययस्येति वक्तव्यम् । इह मा भूत् । आहर कुम्भं करोति कटमिति ॥ क्रियमाणे चापि समर्थग्रहणे महान्तं कुम्भं करोतीत्यत्रापि प्राप्नोति । न वा भवितव्यं महाकुम्भकार इति । भवितव्यं यदैतद्वाक्यं भवति महान्कुम्भो महाकुम्भः महाकुम्भं करोतीति महाकुम्भकारः । यदा त्वेतद्वाक्यं भवति महान्तं कुम्भं करोतीति तदा न भवितव्यं तदा च प्राप्नोति । तदा मा भूदिति ॥ यत्तावदुच्यते समर्थग्रहणं कर्तव्यमिति । न कर्तव्यम् । धातोरिति वर्तते । धातोः कर्मण्यण्भवति । तत्र संबन्धादेत-

---

दृष्टीस पडेल तेथेंच त्या सप्तमीला उपपदसंज्ञा होईल; उदा०— स्तम्बेरमः, कर्णेजपः. अथवा सप्तमी हा शब्दच प्रत्यक्ष ज्या सूत्रामध्यें उच्चारला असेल तेथेंच उपपदसंज्ञा होईल; उदा०:—'सप्तम्यां जनेर्डः' (३।२।९७) आणि कुम्भकारः, नगरकारः, येथें कुम्भ, नगर, या शब्दांना उपपदसंज्ञा होणार नाहीं. आतां येथें स्थ हा शब्द घातला म्हणजे मात्र ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष सप्तमी दृष्टीस पडते किंवा ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष सप्तमी दृष्टीस पडत नाहीं, तसेंच सप्तमी हा शब्दच प्रत्यक्ष ज्या सूत्रामध्यें उच्चारला असेल किंवा दुसरा कोणताही शब्द सप्तम्यन्त उच्चारला असेल अशा सर्व ठिकाणीं उपपदसंज्ञा सिद्ध होते.

आतां ह्या सूत्रामध्यें तत्र हा शब्द कशा करितां घातला आहे ?

(वा.१) तत्र हा शब्द या सूत्राचा विषय दाखविण्याकरितां घातला आहे. म्हणजे त्या ह्या धातोः- अधिकारामध्यें जें पद सप्तमीविभक्तीनें निर्दिष्ट असेल तें उपपदसंज्ञक होतें असा अर्थ होऊन उपपदसंज्ञा सिद्ध होते.

(वा.२) ह्या उपपदसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें समर्थम् असें म्हटलें पाहिजे. धातूहून प्रत्यय कर्तव्य असतांना त्याच्याशीं अन्वित असलेलें जें पद तेंच उपपदसंज्ञक होतें. कारण आहर कुम्भम्, करोति कटम्, येथें करोति याच्याशीं अन्वित नसलेल्या कुम्भशब्दाला उपपदसंज्ञा न झाली पाहिजे.

आतां येथें समर्थशब्द घातला तरी महान्तं कुम्भं करोति येथें उपपदसंज्ञा प्राप्त होतेच.

मग काय महाकुम्भकारः असा प्रयोग होत नाहीं कीं काय ?

होतो. पण जेव्हां महान् कुम्भः महाकुम्भः, महाकुम्भं करोतीति महाकुम्भकारः, असा विग्रह विवक्षित असेल तेव्हा. आणि जेव्हां महान्तं कुम्भं करोतीति असा विग्रह विवक्षित असेल तेव्हां महाकुम्भकारः असा प्रयोग होत नाहीं.

पण त्या वेळीं तो प्राप्त होत आहे आणि तो तर नको आहे.

आतां येथें समर्थम् असें म्हटलें पाहिजे असें जें म्हटलें आहे तेंच मुळीं नको आहे. कारण धातोः असें तेथें अनुवृत्त आहेच. तेव्हां कर्मवाचक शब्द असतांना धातूहून अण्प्रत्यय होतो असें म्हटलें असतां स्वाभाविक संबंधामुळें असेंच मनांत येतें कीं ज्या धातूचें जें

कुम्भं यस्य धातोर्यत्कर्मेति ॥ यदप्युच्यते किमर्थमुभे चापि समर्थग्रहणे महान्तं कुम्भं करोतीत्यत्रापि प्राप्नोतीति । उपपदमिति महतीयं संज्ञा क्रियते संज्ञा च नाम यतो न लघीयः । कुत एतत् । लघ्वर्थं हि संज्ञाकरणम् । तत्र महत्याः संज्ञायाः करण एतत्प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत । उपोच्चारि पदमुपपदमिति । यच्चात्रो-पोच्चारि न तत्पदं यच्च पदं न तदुपोच्चारि । यावता चेदानीं पदगन्धोऽस्ति पदविधिरयं भवति । पदविधिश्च समर्थानां भवति । तत्रासामर्थ्यान्न भविष्यति ॥

अथ च्व्यन्त उपपदे किमणा भवितव्यम् । अकुम्भं कुम्भं करोति कुम्भीकरोति मृदमिति । न भवितव्यम् । किं कारणम् । प्रकृतिविवक्षायां च्विर्विधीयते । तत्सापेक्षम् । सापेक्षं चासमर्थं भवति ॥ न तर्हीदानीमिदं भवति इच्छाम्यहं काशकटीका-

कर्म तें उपपद असतांना त्या धातूहून अण्-प्रत्यय होतो.[२]

तसेंच आणखीही जें म्हटलें आहे की येथें समर्थशब्द घातला तरी महान्तं कुम्भं करोति येथें उपपदसंज्ञा प्राप्त होते. त्याचें उत्तर असें की येथें उपपद ही मोठी संज्ञा केली आहे. आणि संज्ञाशब्द तर इतका लहान असला पाहिजे की ज्यापेक्षां लहान शब्द दुसरा कोणी मिळणार नाहीं.

असें कशावरून ?

अशावरून की संज्ञा ही लाघवाकरितांच करावयाची असते. तेव्हां येथें जी उपपद ही चार अक्षरांची मोठी संज्ञा केली आहे ती तशी करण्यांत कांहीं तरी आचार्यांच्या मनांत निराळा उद्देश असला पाहिजे. तो असा की उपपद ही संज्ञा अन्वर्थ समजावयाची आहे. त्यामुळें जवळ उच्चारलेलें जें पद तेंच उपपद-संज्ञक होतें. आणि महान्तं कुम्भं करोति येथें पहावें तर जें कर्म म्हणून विवक्षित असें धातूच्याजवळ उच्चारलें आहे तें 'महान्तं कुम्भम्' हें पद नव्हे.[३] आणि जें पद आहे तें कर्म म्हणून जवळ उच्चारलेलें नव्हे.

शिवाय या अन्वर्थसंज्ञेमुळें कर्मण्यण् या विधीला थोडा तरी पदाचा संबंध जर पोचतो तर हा पदविधि होत आहे. आणि पदविधि हा समर्थ अशाच पदासंबधानें होत असतो (२।१।१). तेव्हां महान्तं कुम्भं करोति येथें कुम्भम् हें जरी पद आहे तरी सामर्थ्य नसल्यामुळें[४] अण्प्रत्यय होत नाहीं.

आतां कर्मवाचक उपपद हें जर च्विप्रत्य-यान्त असेल तर तेथें अण्प्रत्यय व्हावा काय ? उदा०:– अकुम्भं कुम्भं करोति कुम्भीकरोति मृदम्.[५]

अशा ठिकाणीं अण्प्रत्यय होऊं नये.

काय कारण ?

कारण असें की प्रकृतीची विवक्षा असतांना विकृतिवाचकाहून च्विप्रत्यय (५।४।५०) सांगितला आहे. तेव्हां अर्थातच तेथें त्या प्रकृतीचा विकृतीशीं संबंध असल्यामुळें च्वि-प्रत्ययान्त कर्म हें सापेक्ष होतें. आणि सापेक्ष असेल तें असमर्थ समजलें जातें.

तर मग आतां इच्छाम्यहं काशकटीकारम्

२. तेव्हां आहर कुम्भम् करोति कटम् येथें कुम्भ हें कर्म कृधातूचें नसल्यामुळें अण्प्रत्यय होत नाहीं. तेव्हां समर्थग्रहण करण्याची जरूर नाही.

३. पदसंज्ञा (१।४।१४) ही दोन पदांना मिळून कधीही होत नसते.

४. कुम्भाला महत् हें विशेषण असल्यामुळें कुम्भ हें सापेक्ष होतें. त्यामुळें विशेषण सोडून नुसत्या कुम्भाचा करोति याकडे संबंध होऊं शकत नाहीं. सापेक्ष हें असमर्थ समजलें जातें.

५. मृद् ही प्रकृति आहे. आणि त्या प्रकृतीचा संबंध कुम्भ या विकृतीशी असल्यामुळें कुम्भ हें पद येथें सापेक्ष होणार आहे. आणि म्हणूनच तें असमर्थ समजलें जातें.

रमिति । इष्टमेवैतद्गोनर्दीयस्य ॥

**निमित्तोपादानं च ॥ ३ ॥**

निमित्तोपादानं च कर्तव्यम् । निमित्तमुपपदं प्रत्ययस्येति वक्तव्यम् ॥

**अनुपादाने ह्यनुपपदे प्रत्ययप्रसङ्गः ॥ ४ ॥**

अक्रियमाणे हि निमित्तोपादानेऽनुपपदेऽपि प्रत्ययः प्रसज्येत ॥ निर्देश इदानीं किमर्थः स्यात् ।

**निर्देशः संज्ञाकरणार्थः ॥ ५ ॥**

यदोपपदे प्रत्ययस्तदोपपदसंज्ञां वक्ष्यामीति ॥ तत्तर्हि निमित्तोपादानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् ।

**तत्रवचनमुपपदसंनियोगार्थम् ॥ ६ ॥**

तत्रवचनं क्रियते तदुपपदसंनियोगार्थं भविष्यति । कर्मण्यणिवधीयते तत्र चेत्प्रत्ययो भवतीति । ननु चान्यत्तत्रग्रहणस्य प्रयोजनमुक्तम् । किम् । तत्रग्रहणं विषयार्थमिति । अधिकारादप्येतत्सिद्धम् ॥

**कृदतिङ् ॥ ३ । १ । ९३ ॥**

---

असा प्रयोग होत नाहीं काय?

वस्तुतः असे प्रयोग होऊं नयेत खरे, पण गोनर्दीयाला हा प्रयोग मात्र इष्ट आहे.

(वा.३) अण् वगैरे प्रत्ययांचें उपपद हें निमित्त आहे असें म्हणावें.

(वा.४) असे न म्हटले तर उपपद नसतांही प्रत्यय होऊं लागेल.

पण जर असें होईल तर कर्मणि वगैरे जें त्या त्या सूत्रामध्यें उच्चारलें आहे त्याचा काय उपयोग?

(वा.५) जेव्हां उपपद असतांना प्रत्यय होईल तेव्हां त्याला उपपदसंज्ञा होण्याकरितां कर्मणि वगैरे शब्दांचा उपयोग होईल.

तर मग उपपद हें त्या अण् वगैरे प्रत्ययांचें निमित्त आहे असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

(वा.६) प्रकृत सूत्रामध्यें जो तत्र असा शब्द घातला आहे त्यानेंच उपपद असतांनाच प्रत्यय होईल. कर्म असतांना अण्प्रत्यय होतो तो प्रत्यय तें उपपद असेल तरच होतो, असा त्या सूत्राचा अर्थ समजावा.

पण तत्र या शब्दाचा उपयोग पूर्वी निराळाच सांगितला आहे ना?

तो कोणता?

तत्र हा शब्द या सूत्राचा विषय दाखविण्याकरितां घातला आहे (वा.१) हा तो उपयोग होय.

तत्र हा शब्द नसला तरी ह्या सूत्राची पुढें अनुवृत्ति केली म्हणजे तें काम भागेल.

(सू.९३) येथें अतिङ् असें कशाकरितां म्हटलें आहे?

पचति, करोति, येथें तिप्रत्ययाला कृत्संज्ञा

---

६. येथें काश, म्ह. तृणविशेष, ही प्रकृति आहे. आणि कट ही विकृति आहे. अकटं कटं करोति अशी सामान्य विवक्षा करून च्विप्रत्यय करून तो कटीशब्द उपपद असतांना कृधातूहून अण्प्रत्यय करून कटीकार हा शब्द सिद्ध करावा. नंतर त्याच्याशी काशशब्दाचा षष्ठीतत्पुरुष करून काशकटीकार हा प्रयोग साधावा.

७. म्हणजे प्रकृत सूत्रानें उपपदसंज्ञा जेथें होईल तेथेंच अण्प्रत्यय होतो. असा प्रकृत सूत्राचा कर्मण्यण् वगैरेंशीं संबंध जोडावा. या संबंधामुळेंच कर्मणि याचा कर्मवाचक शब्द असा अर्थ घेऊन उपपदाकडे तो शब्द लावतां येतो.

८. या वेळीं कर्मवाचक शब्द असा कर्मणि याचा अर्थ घेण्याला प्रमाण नसल्यामुळें 'उपपदसंज्ञा करण्याचें चिन्ह' इतकाच कर्मणि या पदाचा उपयोग होईल. वाक्यार्थामध्यें कोणत्याही तऱ्हेनें त्याचा संबंध होणार नाही.

९. या धातोःअधिकारामध्यें सांगितलेल्या प्रत्ययांपैकी तिङ्प्रत्यय सोडून बाकीच्या प्रत्ययांना कृत् अशी संज्ञा होते; उदा०:-पक्ता, पाचकः, येथें प्रातिपदिकसंज्ञा (१।२।४६) होते.

अतिङिति किमर्थम् । पचति करोति ॥ अतिङिति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति पचति करोतीति । धातोः परस्य कृत्संज्ञा प्राक्च लादेशाद्धात्वधिकारः । एवमपि स्थानिवद्भावात्कृत्संज्ञा प्राप्नोति । अथातिङित्युच्यमाने यावता स्थानिवद्भावः कथमेवैतत्सिध्यति । प्रतिषेधवचनसामर्थ्यात् । अथवा तिङ्भाविनो लकारस्य कृत्संज्ञाप्रतिषेधः ॥ किं च स्याद्यद्यत्र कृत्संज्ञा स्यात् । कृत्प्रातिपदिकमिति प्रातिपदिकसंज्ञा स्यात्प्रातिपदिकादिति स्वाद्युत्पत्तिः प्रसज्येत । नैष दोषः । एकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते ते चात्र तिङोक्ता एकत्वादय इति कृत्त्वोक्तार्थत्वान्न भविष्यन्ति ॥ टाबादयस्तर्हि तिङन्तान्मा भूवन्निति । स्त्रियां टाबादयो विधीयन्ते न च तिङन्तस्य स्त्रीत्वेन योगोऽस्ति ॥ अणादयस्तर्हि तिङन्तान्मा भूवन्निति । अपत्यादिष्वर्थेष्वणादयो विधीयन्ते न च तिङन्तस्यापत्यादिभिर्योगोऽस्ति । अथापि कथंचिद्योगः स्यात् । एवमपि न दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न तिङन्तादणा-

---

होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

येथें अतिङ् असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

अतिङ् असें म्हटलें नाहीं तर पचति, करोति, येथें तिप्रत्ययाला कृत्संज्ञा कां बरें होत नाहीं?

धातूच्यापुढें करावयास सांगितलेल्या प्रत्ययाला कृत्संज्ञा होते. आणि धातोः हा अधिकार तर लादेशांच्या पूर्वींच संपत आहे.

तरी देखील लकाराला कृत्संज्ञा असल्यामुळें स्थानिवद्भावानें (१।१।५६) तिप्रत्ययाला कृत्संज्ञा होणारच.

मग आतां स्थानिवद्भावानें जर कृत्संज्ञा होणार तर मग अतिङ् असें म्हटलें तरी ती होणारच; मग तिप्रत्ययाला कृत्संज्ञेचा निषेध साधणार कसा?

अतिङ् असा निषेध केला त्याच्या जोरावर स्थानिवद्भावानेंही तिङाला कृत्संज्ञा होत नाहीं. अथवा ज्या ठिकाणीं लकाराला तिङादेश पुढें होणार आहेत त्या लकारालाच मुळीं कृत्संज्ञा होत नाहीं, असा अतिङ् याचा अर्थ समजावा.

पण तिङ्प्रत्ययाला कृत्संज्ञा झाली तर काय बरें होईल?

जर तिङ्प्रत्ययाला कृत्संज्ञा झाली तर कृत्प्रत्ययान्ताला सांगितलेली (१।२।४६) प्रातिपदिकसंज्ञा होऊं लागेल. आणि नंतर ङीप्रत्ययान्त, आप्प्रत्ययान्त आणि प्रातिपदिक यांहून सांगितलेले सुप्प्रत्यय (४।१।१,२) त्याहून होतील.

हा दोष येत नाहीं. कारण एकत्व, द्वित्व, वगैरे जी संख्या त्या अर्थीं सुप्प्रत्यय सांगितले (१।४।२१,२२) आहेत. आणि ती संख्या तर पचति, पठति, इत्यादि तिङन्तस्थलीं तिङ्प्रत्ययानेंच उक्त होत आहे. म्हणून त्या अर्थीं पुनः सुप्प्रत्यय होणार नाहींत.

तर मग तिङन्ताहून टाप् (४।१।४) वगैरे स्त्रीप्रत्यय होऊं लागतील ते न होण्याकरितां तिङ्प्रत्ययान्तांना प्रातिपादिकसंज्ञा न झाली पाहिजे.

पण टाप् वगैरे प्रत्यय स्त्रीत्व या अर्थीं सांगितले आहेत आणि तिङन्ताच्या म्ह. क्रियापदाच्या अर्थाचा तर स्त्रीत्वाशीं संबंध मुळींच नाहीं.

तर मग अण् (४।१।९२) वगैरे तद्धितप्रत्यय तिङन्ताहून न झाले पाहिजेत?

पण ते अण् वगैरे प्रत्यय अपत्य वगैरे अर्थीं सांगितले आहेत. आणि तिङन्ताच्या अर्थाचा तर अपत्य वगैरे अर्थाशीं संबंध मुळींच नाहीं. आतां कांहीं तद्धितप्रत्ययांच्या अर्थाचा संबंध संभवतो असें असलें तरीही दोष नाहीं. कारण ज्या अर्थीं आचार्य 'अति-

दयो भवन्तीति यदयं क्वचित्तद्धितविधौ तिङ्ग्रहणं करोति । अतिशायने तमबिष्ठनौ तिङश्च [५.३.५५;५६] इति ॥ इह तर्हि पचति पठतीति ह्रस्वस्य पिति कृति तुग्भवतीति तुक्प्राप्नोति । धातोरिति वर्तते॥ एवमपि चिकीर्षतीत्यत्र प्राप्नोति। अत्रापि शपा व्यवधानात् । एकादेशे कृते नास्ति व्यवधानम् । एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद्व्यवधानमेवेति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य प्रथमे पादे पञ्चममाह्निकम् ।

---

शायने तमबिष्ठनौ' (५।३।५५) याच्यापुढील अतिशय या अर्थी तद्धितप्रत्यय सांगणाऱ्या 'तिङश्च' (५।३।५६) या सूत्रामध्यें तिङन्ताहून तद्धितप्रत्यय होण्याकरितां तिङ्ग्रहण करीत आहेत त्या अर्थी ते असें सुचवितात कीं तिङन्ताहून अण् वगैरे तद्धितप्रत्यय होत नाहींत.

तर मग तिङ्प्रत्ययाला कृत्संज्ञा झाली तर दुसरा दोष असा येतो की पचति, पठति, येथें 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' (६।१।७१) या सूत्रानें शप्प्रत्ययाला तुगागम होऊं लागेल.

पण तेथें धातुग्रहणाची (६।१।६४) अनुवृत्ति आहे तेव्हां अर्थातच शप्प्रत्ययाला होणार नाहीं.

तरी पण चिकीर्षति येथें चिकीर्ष् या सन्प्रत्ययान्त धातूला तुगागम होऊं लागेल.

येथेंही मध्यें शप्प्रत्ययानें व्यवधान येत आहे.

तरी पण सन्प्रत्यय आणि शप्प्रत्यय यांचा एकादेश (६।१।९७) झाल्यानंतर व्यवधान येत नाही.

तरीही पूर्वाला विधि कर्तव्य असतांना त्या एकादेशाला स्थानिवद्भाव होत असल्यानें त्या स्थानिवद्भावानें (१।१।५६) व्यवधान कायम राहणारच.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील पांचवें आह्निक समाप्त झालें.

## वाऽसरूपोऽस्त्रियाम् ॥३।१।९४॥

कथमिदं विज्ञायते। स्त्रियामभिधेयायां वासरूपो न भवतीति। आहोस्वित्स्त्रीप्रत्ययेष्विति। किं चातः। यदि विज्ञायते स्त्रियामभिधेयायामिति लव्या लवितव्या अत्र वासरूपो न प्राप्नोति। अथ विज्ञायते स्त्रीप्रत्ययेष्विति व्यावक्रोशी व्यवक्रुष्टिरिति न सिध्यति॥ एवं तर्हि नैवं विज्ञायते स्त्रियामभिधेयायां नापि स्त्रीप्रत्ययेष्विति। कथं तर्हि। स्त्रीग्रहणं स्वरयिष्यते। तत्र स्वरितेनाधिकारगतिर्भवतीति स्त्रियामित्यधिकृत्य ये प्रत्यया विहितास्तेषां प्रतिषेधो विज्ञास्यते॥

किमर्थं पुनरिदमुच्यते।

**असरूपस्य वावचनमुत्सर्गस्य बाधकविषयेऽनिवृत्त्यर्थम्॥१॥**

असरूपस्य वावचनं क्रियत उत्सर्गस्य बाधकविषयेऽनिवृत्तिर्यथा स्यात्। तव्यत्त-

(सू.९४) येथें अस्त्रियाम् याचा अर्थ स्त्रीत्व गम्यमान असतांना असरूप अपवाद विकल्पानें बाध करीत नाहीं असा समजावयाचा किंवा स्त्रीत्वद्योतक प्रत्ययांमध्यें अपवाद विकल्पानें बाध करीत नाहीं असा समजावयाचा?

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे?

फरक असा की स्त्रीत्व गम्यमान असतांना असा अर्थ घेतला तर लव्या, लवितव्या, येथें यत्प्रत्यय हा असरूप अपवाद तव्यप्रत्ययाचा विकल्पानें बाध करणार नाहीं. आतां स्त्रीत्वद्योतक प्रत्ययामध्यें असा अर्थ घेतला तर व्यावक्रोशी, व्यावक्रुष्टिः, येथें णच् (३।३।४३) हा स्त्रीत्वद्योतक भावे सांगितलेला असरूप अपवादप्रत्यय क्तिन्प्रत्ययाचा विकल्पानें बाध करणार नाहीं.

तर मग आतां स्त्रीत्व गम्यमान असतांना असेंही म्हणत नाहीं आणि स्त्रीत्वद्योतक प्रत्ययामध्यें असेंही म्हणत नाहीं.

तर मग अस्त्रियाम् याचा अर्थ येथें कसा करणार?

येथें अस्त्रियाम् यांतील स्त्रीशब्द स्वरितानें युक्त असा आचार्यांनीं उच्चारला आहे. त्या स्वरितामुळें त्या स्त्रीपदापासून स्त्रियाम् (३।३।९४) हा अधिकार मनांत येतो. तेव्हां त्या स्त्रियाम् या अधिकारामध्यें जे प्रत्यय सांगितले आहेत त्यांतील अपवादप्रत्यय हे उत्सर्गप्रत्ययाचा विकल्पानें बाध करीत नाहींत असा हा निषेध समजला जातो.

बरें पण, हें सूत्रच मुळीं कशाकरितां केलें आहे?

(वा.१) असरूप अशा बाधक प्रत्ययाचा हा विकल्प सांगितला आहे. अशाकरितां की त्या बाधकाच्या विषयामध्यें बाध्य अशा सामान्य प्रत्ययाची निवृत्ति न झाली पाहिजे;

१. सामान्यतः सांगितलेला प्रत्यय उत्सर्ग होय. आणि त्यापेक्षां विशेष ठिकाणीं सांगितलेला प्रत्यय त्या उत्सर्गप्रत्ययाचा अपवाद होय. ह्या धातोः- अधिकारांतील ज्या अपवादप्रत्ययाचा आकार ज्या उत्सर्गप्रत्ययापेक्षां निराळ्या स्वरूपाचा आहे तो अपवादप्रत्यय त्या उत्सर्गप्रत्ययाचा विकल्पानें बाध करतो. स्त्रियाम् (३।३।९४) या अधिकारांतील प्रत्ययांना मात्र हा विकल्प लागू नाहीं; उदा० - विक्षिपः येथें ण्वुल् व तृच् (३।१।१३३) या उत्सर्गप्रत्ययांचा बाध करून कप्रत्यय (३।१।३५) होतो. पण तो विकल्पानें बाध करीत असल्यामुळें एकदा विक्षेपकः, विक्षेप्ता, असे ण्वुल् व तृच् हे प्रत्ययही होतात. तसेंच लव्यः येथें तव्यप्रत्ययाचा (३।१।९६) बाध करून यत्प्रत्यय (३।१।९७) होतो. तेथें एकदा लवितव्यः असा तव्यप्रत्ययही होतो. गोदः येथें गोउपपदपूर्वक दाधातूहून प्राप्त झालेल्या अण्प्रत्ययाचा (३।२।१) बाध करून कप्रत्यय (३।२।३) होतो. तेथें अण् आणि क या दोघांचाही आकार इत्संज्ञक वर्ण जाऊन फक्त अ असा सारखाच होतो म्हणून तेथें अण् होतच नाहीं. तसेंच चिकीर्षा येथें क्तिन्प्रत्ययाचा (३।३।९४) बाध करून अप्रत्यय (३।३।१०२) होतो. तेथेंही नित्यच बाध होतो. कारण ते

व्यानीयर उत्सर्गास्तेषामजन्ताद्यदपवादः। चेयम्। चेतव्यमित्यपि यथा स्यात्॥ नैतदस्ति प्रयोजनम्। अजन्ताद्यद्विधीयते हलन्ताण्ण्यद्विधीयत एतावन्तश्च धातवो यदुताजन्ता हलन्ताश्च। उच्यन्ते च तव्यदादयस्ते वचनाद्भविष्यन्ति॥ एवं तर्हि ण्वुल्तृचावुत्सर्गौ तयोः पचादिभ्योऽजपवादः। पचतीति पचः। पक्ता पाचक इत्यपि यथा स्यात्॥ एतदपि नास्ति प्रयोजनम्। वक्ष्यत्येतदजपि सर्वधातुभ्यो वक्तव्य इति॥ एवं तर्हि ण्वुल्तृजच उत्सर्गास्तेषामिगुपधात्कोऽपवादः। विक्षिपः विलिखः। विक्षेप्ता विक्षेपक इत्यपि यथा स्यात्॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति।

## तत्रोत्पत्तिवाप्रसङ्गो यथा तद्धिते॥ २॥

तत्रोत्पत्तिर्विभाषा प्राप्नोति यथा तद्धिते॥ अस्तु। यदा विक्षिपः विलिख इत्येतन्न तदा विक्षेप्ता विक्षेपक इत्येतद्भविष्यति॥ यद्येतल्लभ्येत कृतं स्यात्। तत्तु न लभ्यम्। किं कारणम्। यथा तद्धित इत्युच्यते तद्धितेषु च सर्वमेवोत्सर्गापवादं विभाषा। उत्पद्यते वा न वा॥

---

जसें— तव्यत्, तव्य आणि अनीयर् (३।१।९६) हे सामान्य प्रत्यय होत. अजन्त धातूहून सांगितलेला यत्प्रत्यय (३।१।९७) हा त्याचा अपवाद होय; उदा०— चेयम् येथें चेतव्यम् असेंही एकदा झालें पाहिजे.

हा या प्रकृत सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण अजन्त धातूहून यत्प्रत्यय सांगितला आहे व हलन्त धातूहून ण्यत्प्रत्यय (३।१।१२४) सांगितला आहे. आणि धातु तर अजन्त किंवा हलन्त असे दोनच प्रकारचे आहेत. त्या दोन ठिकाणीं जर ते अपवाद कायमचा बाध करतील तर तव्यत् वगैरे सामान्य प्रत्यय होणार तरी कोठें? आणि ते तर सांगितले आहेत. तेव्हां सामर्थ्यास्तव ते एकदा होतीलच. तर मग दुसरें उदाहरण घ्यावें. तें असें की ण्वुल्, तृच् (३।१।१३३), हे सामान्य प्रत्यय होत. पचादिगणांतील धातूहून सांगितलेला अच्प्रत्यय (३।१।१३४) हा त्यांचा अपवाद होय; उदा०— पचतीति पचः येथें पक्ता, पाचकः, असेंही एकदा झालें पाहिजे.

हाही या सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण तो अच्प्रत्यय हा सर्वच धातूहून होतो (३।१।१३४, वा.१) असें येथें सांगावयाचें आहे.

तर मग आतां प्रकृत सूत्राचें उदाहरण असें घ्यावें की ण्वुल्, तृच् (३।१।१३३) आणि अच् (३।१।१३४) हे सामान्य होत. इगुपधधातूहून सांगितलेला कप्रत्यय (३।१।१३५) हा त्याचा अपवाद होय; उदा०— विक्षिपः, विलिखः, येथें विक्षेप्ता, विक्षेपकः, अशींही रूपें एकदा झालीं पाहिजेत.

हा उपयोग आहे खरा, मग आतां पुढें काय तुमचें म्हणणें आहे?

(वा.२) त्या ठिकाणीं अपवादप्रत्ययाची उत्पत्तिच मुळीं विकल्पानें होऊं लागेल. तद्धितप्रत्ययाप्रमाणेंच हें होय.

असूं दे. तसेंच कां होईना?

विक्षिपः, विलिखः, असा कप्रत्यय होतो. तो जेव्हा होणार नाहीं तेव्हा ण्वुल्, तृच् हे प्रत्यय उत्पन्न होऊन विक्षेप्ता, विक्षेपकः, अशीं रूपें होतील.

असें जर होईल तर फारच चांगलें. पण असें होणें शक्य मात्र नाहीं.

काय कारण?

तें कारण दाखविण्याकरितांच तर 'यथा तद्धिते' असा तद्धितप्रत्ययाचा दृष्टान्त वार्तिक-

---

प्रत्यय स्त्रियाम् या अधिकारांतील आहेत.

**सिद्धं त्वसरूपस्य बाधकस्य वावचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । असरूपस्य बाधकस्य वावचनात् । असरूपो बाधको वा बाधको भवतीति वक्तव्यम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं तत्रोत्पत्तिवाप्रसङ्गो यथा तद्धित इति । नैष दोषः । अस्ति कारणं येन तद्धिते विभाषोत्पत्तिर्भवति । किं कारणम् । प्रकृतिस्तत्र प्रकृत्यर्थे वर्ततेऽन्येन शब्देन प्रत्ययार्थोऽभिधीयते । इह पुनर्न केवला प्रकृतिः प्रकृत्यर्थे वर्तते न चान्यः शब्दोऽस्ति यस्तमर्थमभिदधीतेति कृत्वानुत्पत्तिर्न भविष्यति ॥ अथवा समयः कृतो न केवला प्रकृतिः प्रयोक्तव्या न च केवलः प्रत्यय इति । एतस्मात्समयादनुत्पत्तिर्न भविष्यति। ननु च य एव तस्य समयस्य कर्ता स एवेदमप्याह । यद्यसौ तत्र प्रमाणमिहापि प्रमाणं भवितुमर्हति । प्रमाणमसौ तत्र चेह च । सामर्थ्यं त्विह द्रष्टव्यं शब्दानां प्रयोगे न चानुत्पत्तौ सामर्थ्यमस्ति । तेनानुत्पत्तिर्न भविष्यति । कथं

---

कारांनीं लिहिला आहे. तद्धितप्रत्ययांमध्यें उत्सर्ग, अपवाद, असे सगळेच प्रत्यय विकल्पानें होतात. म्हणजे एकदा उत्पन्न होतात आणि एकदा [२] कोणीच उत्पन्न होत नाहींत.

(वा.३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असरूप जो अपवाद तो बाधकविकल्पानें होतो असें म्हणावें. म्हणजे 'असरूपो वा बाधकोऽस्त्रियाम्' असें सूत्र करावें.

अशा रीतीनें सिद्ध होते खरें, पण सूत्रामध्यें फिरवाफिरव होते ना ?

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मूळचें सूत्र ठेवलें तर तद्धितप्रत्ययाप्रमाणें येथेंही अपवादप्रत्ययाची उत्पत्तिच मुळीं विकल्पानें होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. तद्धितप्रत्ययाची जी उत्पत्तिच विकल्पानें होते त्याचें कारण तेथें निराळेंच आहे.

तें कोणतें ?

तद्धितप्रत्यय होत नाहीं; त्या वेळीं प्रकृति ही आपला अर्थ दाखविण्याला पूर्णपणें समर्थ असते आणि प्रत्ययाचा अर्थ तसाच दुसऱ्यानें दाखविला जातो. आणि येथें प्रत्यय कोणीच केला नाहीं तर केवळ प्रकृति ही आपला अर्थ दाखविण्याला समर्थ नाहीं. बरें, दुसरा शब्दही तसा कोणीच नाहीं की जो त्या अर्थाला दाखवील. त्यामुळें तेथें प्रत्ययाची उत्पत्ति होत नाहीं असें मुळींच होत नाहीं. अथवा 'केवळ प्रकृतीचा प्रयोग करूं नये आणि केवळ प्रत्ययाचाही प्रयोग करूं नये' (३।१।२, वा.११) असा ठरावच केला आहे. त्या ठरावामुळें 'प्रत्यय कोणीच उत्पन्न होत नाहीं' असें होणार नाहीं.

पण तो ठराव ज्यानें केला तोच येथें विकल्प सांगत आहे. तेथें जर तो प्रमाण समजावयाचा तर येथेंही प्रमाण धरलाच पाहिजे.

सूत्रकार तेथें प्रमाण आहे, येथेंही आहे. पण येथें प्रयोग करतांना शब्दामध्यें सामर्थ्य आहे कीं नाहीं तें पाहिलें पाहिजे ना ? आणि प्रत्यय कोणीच केला नाहीं तर नुसत्या धातूमध्यें आपला अर्थ दाखविण्याचें सामर्थ्यच नाहीं; म्हणून 'कोणीच प्रत्यय उत्पन्न होत नाहीं' असें येथें कधींही होणार नाहीं.

तर मग तद्धितप्रत्यय कोणीच उत्पन्न

---

२. दक्षस्यापत्यं दाक्षिः येथें दक्षशब्दाहून अपत्य या अर्थी प्राप्त झालेल्या अण्प्रत्ययाचा (४।१।९२) बाध करून इञ्प्रत्यय (४।१।९५) होतो. पण जेव्हां तो होत नाहीं तेव्हां अण्ही होत नाहीं तर त्या वेळीं

तर्हि तद्धितेष्वनुत्पत्तौ सामर्थ्यं भवति । अन्येन प्रत्ययेन सामर्थ्यम् । केन । षष्ठ्या ॥ अथवा रूपवत्तामाश्रित्य वाविधिरुच्यते न चानुत्पत्ती रूपवती । तेनानुत्पत्तिर्न भविष्यति ॥ एवमपि कुत एतदपवादो विभाषा भविष्यति न पुनरुत्सर्ग इति । न चैवास्ति विशेषो यदपवादो विभाषा स्यादुत्सर्गो वा । अपि च सापेक्षोऽयं निर्देशः क्रियते वासरूप इति न चोत्सर्गवेलायां किंचिदपेक्ष्यमस्त्यपवादवेलायां पुनरुत्सर्गोऽपेक्ष्यते । तेन यो रूपवानन्यपूर्वको बाधकः प्राप्नोति स वा बाधको भविष्यति । कः पुनरसौ । अपवादः ॥ यदि यो रूपवानन्यपूर्वकः बाधकः प्राप्नोति स वा बाधको भवतीत्युच्यते क्विबादिषु समावेशो न प्राप्नोति । ग्रामणीः

---

झाला नसतां नुसत्या प्रकृतीमध्यें अर्थ दाखविण्याचें सामर्थ्य कसें बरें असतें ?

तेथें निराळ्याच एका प्रत्ययामुळें सामर्थ्य येतें.

कोणता बरें तो प्रत्यय ?

दक्षस्य हा षष्ठीप्रत्यय होय.

अथवा निराळ्या स्वरूपाचा जो प्रत्यय असेल तो एका पक्षीं होतो असें येथें एक प्रकारचें विशेष रूप धरून विकल्प सांगितला आहे. तेव्हां अर्थातच दुसऱ्या पक्षीं ज्याला कांहीं तरी वेगळें स्वरूप आहे असाच कोणी तरी करावयाचा मनांत येतो. तेव्हां मुळींच प्रत्यय न करण्याला कांहींच रूप नसल्यामुळें दुसऱ्या पक्षीं तसें करतां येत नाहीं.

तरी पण येथें अपवादप्रत्यय विकल्पानें होतो असेंच कशावरून ? उत्सर्गप्रत्यय विकल्पानें होतो असें कां म्हणूं नये ?

यांत कांहींच विशेष नाहीं. अपवाद विकल्पानें होतो म्हटलें काय किंवा उत्सर्ग विकल्पानें होतो म्हटलें काय. शिवाय निराळ्या स्वरूपाचा असा येथें सापेक्ष निर्देश केला आहे. आणि तो जर उत्सर्गाला लावला तर उत्सर्गप्रत्यय हा आरंभींच मनांत येत असल्यामुळें त्या वेळीं आकांक्षा आली असतां ती शांत करणारा दुसरा कोणीच तेथें उपस्थित झालेला नसतो. आतां अपवादप्रत्यय मनांत येतो त्या वेळीं मात्र आकांक्षा शांत करणारा उत्सर्गप्रत्यय पूर्वी मनांत आलेलाच असतो. तेव्हां एकंदरींत पूर्वी दुसरा मनांत येऊन मागून उपस्थित झालेला असा विशेष स्वरूपाचा जो बाधक प्रत्यय प्राप्त होतो तोच विकल्पानें बाधक होईल. असा कोणता प्रत्यय प्राप्त होतो म्हणाल तर तोच अपवाद होय.

पण जर मागून उपस्थित झालेला असा विशेष स्वरूपाचा जो बाधक प्रत्यय प्राप्त होतो तो विकल्पानें बाधक होतो असें म्हटलें तर क्विप् वगैरेंच्या उदाहरणांमध्यें उत्सर्गप्रत्यय अण् एकदा होतो तो होणार नाहीं; जसें— ग्रामणीः, ग्रामणायः. कारण ह्या क्विप् वगैरे

---

दक्षस्यापत्यम् असें वाक्यच राहते.

३. दक्षस्यापत्यम् या विग्रहवाक्यामध्यें इञ्प्रत्यय आणि अण्प्रत्यय कोणीच उत्पन्न झालेला नाहीं. तरी दक्षस्य या षष्ठीप्रत्ययामुळें 'नुसत्या प्रकृतीचा प्रयोग होत नाहीं' हा ठराव संभाळला जातो, व तेथें अर्थ दाखविण्याचें सामर्थ्यही असतें. येथें मात्र धातूहून तसा प्रत्यय कोणीच नाहीं की ज्या प्रत्ययाच्या योगानें कृत्प्रत्यय कोणीच केला नाहीं तरी विग्रहवाक्यामध्यें धातूमध्यें अर्थ दाखविण्याचें सामर्थ्य येईल व प्रयोगाला साधुत्व येईल.

४. निराळ्या स्वरूपाचा असें म्हटल्याबरोबर कोणापेक्षां निराळ्या स्वरूपाचा अशी आकांक्षा सहजच उत्पन्न होते. ती आकांक्षा 'पूर्वी जो उपस्थित झाला असेल त्यापेक्षां' अशीच निवृत्त होत असते. तेव्हां मागून उपस्थित होणाऱ्यालाच आकांक्षा उत्पन्न करणारें 'निराळ्या स्वरूपाचा' हें विशेषण लावणें योग्य होणार आहे.

५. क्विप्, क्विन्, वगैरे प्रत्ययांपैकी कांहींच भाग

प्रामणाय इति । न ह्येते रूपवन्तः । एतेऽपि रूपवन्तः । कस्यामवस्थायाम् । उपदेशावस्थायाम् ॥ यद्येवम् ।

**अनुबन्धभिन्नेषु विभाषाप्रसङ्गः ॥४॥**

अनुबन्धभिन्नेषु विभाषा प्राप्नोति । कर्मण्यण् [३.२.१] आतोऽनुपसर्गे कः [३] इति कविषयेऽणपि प्राप्नोति ॥

**सिद्धमनुबन्धस्यानेकान्तत्वात् ॥५॥**

सिद्धमेतत् । कथम् । अनुबन्धस्यानेकान्तत्वात् । अनेकान्ता अनुबन्धाः ॥

अथवा प्रयोगेऽसरूपाणां वाविधिर्न्याय्यः ।

**प्रयोगे चेल्लादेशेषु प्रतिषेधः ॥६॥**

प्रयोगे चेल्लादेशेषु प्रतिषेधो वक्तव्यः । ह्योऽपचदित्यत्र लुङपि प्राप्नोति । श्वः पक्तेत्यत्र लडपि प्राप्नोति ॥ नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न लादेशेषु वासरूपो भवतीति यदयं हशश्वतोर्लङ् च [३.२.११६] इत्याह । अथवा प्रयोगेऽसरूपाणां वाविधौ न सर्वमिष्टं संगृहीतमिति कृत्वा द्वितीयः प्रयोग उपास्यते ।

---

प्रत्ययांना कांहींच रूप नाहीं.

त्यांनाही रूप आहेच.

कोणत्या अवस्थेमध्यें ?

उपदेशावस्थेमध्यें त्यांनाही रूप आहे.

पण उपदेशावस्थेतील रूप पाहून हा विकल्प होतो असें असेल तर—

(वा.४) इत्संज्ञक वर्णामुळें जे प्रत्यय निरनिराळ्या स्वरूपाचे होत असतील त्यांमध्येंही अपवादप्रत्ययानें उत्सर्गप्रत्ययाचा बाध विकल्पानें होऊं लागेल; जसें:– कर्मण्यण् (३।२।१) हा अण्प्रत्यय उत्सर्ग होय. आणि त्याचा बाधक 'आतोऽनुपसर्गे कः (३।२।३) हा कप्रत्यय होय. तेव्हां गोदः या कप्रत्ययाच्या उदाहरणामध्यें एकदा अण्प्रत्यय होऊं लागेल.

(वा.५) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

अनुबन्धस्यानेकान्तत्वात्, म्हणजे इत्संज्ञक वर्ण हे अवयवच नव्हेत.

अथवा प्रयोगामध्यें दृष्टीस पडणारें रूप ज्यांचें निरनिराळ्या प्रकारचें आहे तेथेंच अपवादप्रत्यय विकल्पानें बाधक होतो हें म्हणणें न्याय्य होय.

(वा. ६) प्रत्ययांचें भिन्न भिन्न स्वरूप प्रयोगांमध्यें पहावयाचें असेल तर लादेशांमध्यें विकल्पानें बाध होऊं लागेल तो होत नाहीं असा निषेध केला पाहिजे; जसें:– ह्योऽपचत् म्ह. काल पाक करतां झाला. येथें अपवाद लङ्प्रत्ययाच्या (३।२।१११) विषयामध्यें लुङ्प्रत्यय(३।२।११०)ही प्राप्त होतो; जसें– श्वः पक्ता, म्ह. उद्यां पाक करील. येथें अपवाद लुट्प्रत्ययाच्या (३।३।१५) विषयामध्यें लट्प्रत्यय (३।३।१३) ही प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. कारण अपवाद लिट्प्रत्ययाच्या (३।२।११५) विषयामध्येंही एकदा लङ्प्रत्यय व्हावा म्हणून आचार्यांनीं ज्या अर्थी 'हशश्वतोर्लङ्च' (३।२।११६) असें सूत्र केलें आहे, त्या अर्थी त्यांनीं असें सूचित केलें जातें की लादेशाविषयीं वाऽसरूपो० हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं.

•अथवा लौकिक प्रयोगामध्यें भिन्नरूप असलेला अपवाद जर विकल्पानें बाधक

---

उरत नाहीं. तेव्हां त्यांना विशेष स्वरूप कांहीच नसल्यामुळें त्या क्विप्प्रत्ययानें (३।२।६१) अण्प्रत्ययाचा (३।२।१) विकल्पानें बाध होणार नाहीं.

६. जरीं लकार सर्व सारखेच आहेत तरी प्रयोगामध्यें दिसणारे जे त्यांचे आहेत ते निरनिराळ्या स्वरूपाचे असल्यामुळें बाध होऊ लागेल. ह्यः या अव्ययाचा 'काल' असा अर्थ आहे, तेव्हां अनद्यतनभूतकालाची विवक्षा आहे असें सिद्ध होतें. अनद्यतन म्ह. आज नव्हे. हा विषय अपवादलङ्प्रत्ययाचा आहे.

कोऽसौ । उपदेशो नाम । उपदेशे चैते सरूपाः ॥

ननु चोक्तमनुबन्धभिन्नेषु विभाषाप्रसङ्ग इति । परिहृतमेतत् । कथम् । सिद्धमनुबन्धस्यानेकान्तत्वादिति । अथैकान्ते दोष एव । एकान्ते च न दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानुबन्धकृतमसारूप्यं भवतीति यदयं ददातिदधात्योर्विभाषा शं शास्ति ॥ अथवासरूपो बाधको वा बाधको भवतीत्युच्यते । अपवादो नामानुबन्धभिन्नो वा भवति रूपान्यत्वेन वा । तेनानेनावश्यं किंचित्त्याज्यं किंचित्तु संग्रहीतव्यम् । तद्यदनुबन्धकृतमसारूप्यं तन्नाश्रयिष्यामो यत्तु रूपान्यत्वेनासारूप्यं तदाश्रयिष्यामः ॥ अथवासरूपो बाधको वा बाधको भवतीत्युच्यते सर्वश्चासरूपस्तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते । साधीयो योऽसरूप इति । कश्च साधीयः । यः प्रयोगे च प्राक्च प्रयोगात् ॥ अथवासरूपो बाधको वा बाधको भवतीत्युच्यते न चैवं कश्चिदपि सरूपः । त एवं विज्ञास्यामः क्वचिद्येऽसरूपा इति । अनुबन्धभिन्नाश्च

होईल तर सर्व इष्ट साधत नाहीं. म्हणून भिन्नरूपता पाहण्याकरितां दुसऱ्याच एकप्रकारच्या प्रयोगाचा अवलंब केला जातो. तो दुसऱ्या प्रकारचा प्रयोग कोणता म्हणाल तर उपदेश हा तो होय. आणि त्या औपदेशिक प्रयोगांमध्यें तर हे लकार सर्व सारख्याच स्वरूपाचे आहेत.

पण ज्यांचीं औपदेशिक प्रयोगांतील स्वरूपें इत्संज्ञकामुळें भिन्न भिन्न स्वरूपाचीं असतील तेथें अपवाद विकल्पानें बाधक होतील हा दोष येतोच.

ह्या दोषाचा परिहारही केलाच आहे की इत्संज्ञक वर्ण हे अवयवच नव्हेत.

आतां इत्संज्ञक वर्ण हे अवयवच आहेत असा पक्ष घेतला असतां हे दोषच येणार कीं काय?

अवयवपक्षींही हे दोष येत नाहींत. कारण ज्या अर्थी आचार्यांनीं णप्रत्ययाचा (३।१।१४१) अपवाद अशा शप्रत्ययाचे 'ददातिदधात्योर्विभाषा' (३।१।१३९) या सूत्रानें विकल्पानें विधान केलें आहे त्या अर्थी त्यानीं असें सुचविलें आहे की इत्संज्ञकामुळें झालेली भिन्नरूपता येथें ग्राह्य धरूं नये. अथवा भिन्न रूपाचा अपवाद हा विकल्पानें बाधक होतो असें येथें सांगितलें आहे. आणि अपवाद म्हणून जो कोणी असेल तो अनुबंधानें तरी भिन्न असणार किंवा निराळ्या रूपामुळें भिन्न असणारच. तेव्हां अर्थातच भिन्नरूपतेच्या या दोन कारणांपैकीं कोणतें तरी एक कारण सोडलें पाहिजे व एक घेतलें पाहिजे. तेव्हां इत्संज्ञकामुळें जी भिन्नरूपता ती येथें घेत नाहीं, आणि निराळ्या स्वरूपामुळें जी भिन्नरूपता ती घ्यावी म्हणजे झालें. अथवा भिन्नरूपाचा अपवाद हा विकल्पानें बाधक होतो असें येथें सांगितलें आहे आणि अपवाद म्हणून जो पहावा तो सर्व भिन्न रूपाचा आहेच. तेव्हां तेथें कांहीं तरी विशेष अर्थ घेतला पाहिजे. तो असा की जो अपवाद चांगल्या तऱ्हेनें भिन्न रूपाचा तो येथें घ्यावयाचा आहे.

चांगल्या तऱ्हेनें भिन्न रूपाचा म्हणजे कसा?

जो अपवाद सिद्ध प्रयोगामध्यें आणि पूर्वीही भिन्न रूपाचा आहे तोच चांगल्या तऱ्हेनें भिन्न रूपाचा समजावा. अथवा भिन्न रूपाचा अपवाद हा विकल्पानें बाधक होतो असे येथें सांगितलें आहे; आणि इत्संज्ञकामुळें देखील भिन्नरूपता होते असें घेतलें तर सारख्या रूपाचा अपवाद कोठेंही मिळणार नाहीं. म्हणून येथें असें समजतां येईल की कोठेंही जो सरूप असत नाहीं तोच येथें भिन्नरूपाचा

प्रयोगे सरूपाः ॥

अथ कथमिदं विज्ञायतेऽस्त्रियामिति। किं स्त्रियां न भवतीति। आहोस्वित्प्राक् स्त्रिया भवतीति। कश्चात्र विशेषः।

**स्त्रियां प्रतिषेधे क्तल्युट्तुमुन्खलर्थेषु विभाषाप्रसङ्गः ॥ ७ ॥**

स्त्रियां प्रतिषेधे क्तल्युट्तुमुन्खलर्थेषु विभाषा प्राप्नोति। क्त। हसितं छात्त्रस्य शोभनम्। घञपि प्राप्नोति। ल्युट्। हसनं छात्त्रस्य शोभनम्। घञपि प्राप्नोति। तुमुन्। इच्छति भोक्तुम्। लिङ्लोटावपि प्राप्नुतः। खलर्थः। ईषत्पानः सोमो भवता। खलपि प्राप्नोति॥ एवं तर्हि स्त्रियाः प्रागिति वक्ष्यामि।

**स्त्रियाः प्रागिति चेत्क्त्वायां वावचनम् ॥ ८ ॥**

स्त्रियाः प्रागिति चेत्क्त्वायां वावचनं कर्तव्यम्। आसित्वा भुङ्क्ते। आस्यते भोक्तुमित्यपि यथा स्यात्॥

**कालादिषु तुमुनि ॥ ९ ॥**

---

अपवाद समजावा. आणि इत्संज्ञकामुळें जो अपवाद भिन्न रूपाचा दिसतो तो प्रयोगामध्यें सरूपच दिसतो.

आतां येथें स्त्री या शब्दानें स्त्रियाम् (३।३।९४) हा अधिकार घ्यावयाचा असे पूर्वी सांगितलें आहे. तेव्हां फक्त त्या अधिकारामध्येंच हा अपवादाचा विकल्प लागू होत नाहीं किंवा त्या अधिकाराच्या पूर्वींच हा लागू होतो, म्हणजे त्या अधिकारामध्येंही नाहीं आणि त्याच्या पुढेंही नाहीं ?

या दोहोंमध्ये फरक काय ?

(वा.७) स्त्रियाम् या अधिकारामध्येंच फक्त हा अपवादाचा विकल्प लागू होत नाहीं असें घेतलें तर क्त, ल्युट्, तुमुन् आणि खल्प्रत्ययाच्या अर्थी सांगितलेले प्रत्यय यांपैकीं अपवाद हा विकल्पानें बाधक होईल. क्तप्रत्ययाचें उदाहरणः-हसितं छात्त्रस्य शोभनम्. येथें एकदा घञ्प्रत्ययही प्राप्त होतो. ल्युट्प्रत्ययाचें उदाहरणः- हसनं छात्त्रस्य शोभनम्. येथें एकदा घञ्प्रत्ययही प्राप्त होतो. तुमुन्प्रत्ययाचें उदाहरणः-- इच्छति भोक्तुम्. येथें एकदा लिङ् आणि लोट् हे प्रत्ययही प्राप्त होतात. खलर्थक प्रत्ययाचें उदाहरणः- ईषत्पानः सोमो भवता. येथें एकदा खल्प्रत्ययही प्राप्त होतो.

तर मग आतां स्त्रियाम् या अधिकाराच्या पूर्वींच हा विकल्प लागू होतो असा पक्ष घ्यावा.

(वा.८) स्त्रियाम् या अधिकाराच्या पूर्वींच हा विकल्प लागू होतो असें म्हटलें तर क्त्वाप्रत्यय हा विकल्पानें होतो असें म्हणावें लागेल; जसें:- आसित्वा भुङ्क्ते. येथें एकदा आस्यते भोक्तुम् असें झालें पाहिजे.

(वा.९) काल वगैरे उपपद असतांना जो

---

७. क्तप्रत्यय (३।३।११४), ल्युट्प्रत्यय (३।३।११५), तुमुन्प्रत्यय (३।३।१५८) आणि खलर्थक प्रत्यय (३।३।१२८) हे स्त्रियाम् (३।३।९४) या अधिकाराच्या पुढें आहेत. तो अधिकार आक्रोशे (३।३।११२) या सूत्रापर्यंत आहे. तेव्हां त्या क्तप्रत्ययाविषयीं विकल्प लागू झाला तर हसितम् येथें एकदा घञ् (३।३।१८) होईल. हसनम् येथें असेंच समजावें. इच्छति भोक्तुम् येथें लिङ् आणि लोट् (३।३।१५७) होतील. ईषत्पानः येथें एकदा खल्प्रत्यय (३।३।१२६) होऊं लागेल.

८. येथें जेवण्याकरतां बसतो असा अर्थ विवक्षित आहे. तेव्हां उपवेशनक्रिया ही भोजनक्रियेच्या पूर्वकाली आहे म्हणून आस्धातूहून क्त्वाप्रत्यय (३।४।२१) प्राप्त आहे; आणि उपवेशनक्रिया ही भोजनाकरितां असल्यामुळें क्रियार्थक क्रिया आहे; तद्वाचक आस्धातु उपपद असल्यामुळें भुज्धातूहून तुमुन्प्रत्यय (३।३।१०) प्राप्त आहे. तेथें क्त्वाप्रत्ययानें परत्वास्तव बाध प्राप्त होतो, आणि दोन्ही प्रकारचे प्रयोग इष्ट आहेत.

कालादिषु तुमुनि वावचनं कर्तव्यम् । कालो भोक्तुम् । कालो भोजनस्येत्यपि यथा स्यात् ॥

## अर्हे तृज्विधानम् ॥१०॥

अर्हे तृज्विधेयः । इमेऽर्हे कृत्या विधीयन्ते ते विशेषविहिताः सामान्यविहितं तृचं बाधेरन् ॥ नैष दोषः । भावकर्मणोः कृत्या विधीयन्ते कर्तरि तृच् कः प्रसङ्गो यद्भावकर्मणोः कृत्याः कर्तरि तृचं बाधेरन् ॥ एवं तर्ह्यर्हे कृत्यतृज्विधानम् । अर्हे कृत्यतृचो विधेयाः । अयमर्हे लिङ् विधीयते स विशेषविहितः सामान्यविहितान्कृत्यतृचो बाधेत ॥

## कृत्याः ॥ ३ । १ । ९५ ॥

## कृत्यसंज्ञायां प्राङ्ण्वुलवचनम् ॥१॥

कृत्यसंज्ञायां प्राङ् ण्वुल इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । ण्वुलः कृत्यसंज्ञा मा भूत् ॥

## अर्हे कृत्यतृज्वचनं तु ज्ञापकं प्राङ्ण्वुलवचनानर्थक्यस्य ॥२॥

यदयमर्हे कृत्यतृचश्च [३.३.१६९] इति तृज्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः प्राङ्

---

तुमुन्प्रत्यय (३।३।१६७) सांगितला आहे त्याचा विकल्प सांगितला पाहिजे; उदा०— कालो भोक्तुम्. येथें एकदा कालो भोजनस्य असा ल्युट्प्रत्ययाचाही (३।३।११४) प्रयोग झाला पाहिजे

(वा.१०) अर्ह म्ह. योग्य हा अर्थ गम्यमान असताना तृच्प्रत्ययाचें विधान केलें पाहिजे. नाहीं तर हे जे कृत्यप्रत्यय अर्ह अर्थ गम्यमान असतांना (३।३।१६९) सांगितले आहेत त्याचें तेथें विशेष विधान केलें असल्यामुळें ते सामान्यतः (३।१।१३३) सांगितलेल्या तृच्प्रत्ययाचा बाध करतील.

हा दोष येत नाहीं. कारण भाव किंवा कर्म या अर्थी कृत्यप्रत्यय (३।४।७०) सांगितले आहेत. आणि कर्ता या अर्थी तृच्प्रत्यय (३।४।६७) सांगितला आहे. तेव्हां भाव किंवा कर्म या अर्थी सांगितलेले कृत्यप्रत्यय कर्ता या अर्थी सांगितलेल्या तृच्प्रत्याचा बाध करतील ही गोष्ट घडेल तरी कशी ?

तर मग अर्ह हा अर्थ गम्यमान असतांना कृत्य आणि तृच् या दोन्ही प्रत्ययांचें विधान केलें पाहिजे असा येथें वार्तिककारांचा अभिप्राय समजावा. नाहीं तर अर्ह हा अर्थ गम्यमान असताना जो लिङ्प्रत्यय सांगितला आहे (३।३।१६९) त्याचें तेथें विशेष विधान केलें असल्यामुळें तो लिङ्प्रत्यय सामान्यतः सांगितलेल्या कृत्यप्रत्यय (३।१।९६-१३२) आणि तृच्प्रत्यय (३।१।१३३) यांचा बाध करील.

(सू.९५, वा.१) ही कृत्यसंज्ञा ण्वुल्(३।१।१३३)प्रत्ययाच्या पूर्वी सांगितलेल्या प्रत्ययांना होते असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

ण्वुल्प्रत्ययाला कृत्यसंज्ञा न झाली पाहिजे.

(वा.२) अर्हे कृत्यतृचश्च (३।३।१६९) या सूत्रामध्यें आचार्यांनीं ज्या अर्थी कृत्यशब्द घालून पुनः तृच्शब्द घातला आहे त्या अर्थी त्यांनीं असें सुचविलें आहे की ण्वुल्प्रत्ययाच्या पूर्वीच्या प्रत्ययाना कृत्संज्ञा होते.

---

९. अर्हे कृत्यतृचश्च (३।३।१६९) या सूत्रानें जें तृच्प्रत्ययाचें विधान केलें आहे, ते कायम ठेविलें पाहिजे. प्रकृत सूत्रानें काम भागणार नाही. त्या त्या सूत्रांनीं त्या त्या अर्थी सांगितलेले कृत्य, तृच् आणि लिङ् हे प्रत्यय अर्ह हा अर्थ अधिक गम्यमान असतांना करावेत असा अर्हे कृत्य० या सूत्राचा अर्थ आहे.

१. हें अधिकारसूत्र आहे. पुढील सूत्रांनीं (३।१।९६-१३२) सांगितलेल्या प्रत्ययांना कृत्य अशी संज्ञा होते.

२. जर ण्वुलप्रत्ययाला कृत्यसंज्ञा झाली तर तो भाव किंवा कर्म या अर्थी होईल (३।४।६९), कर्ता या अर्थी होणार नाहीं.

ण्वुलः कृत्यसंज्ञा भवतीति । एवमपि ण्वुलः कृत्यसंज्ञा प्राप्नोति । योगापेक्षं ज्ञापकम् ॥

## तव्यत्तव्यानीयरः ॥३।१।९६॥

### केलिमर उपसंख्यानम् ॥ १ ॥

केलिमर उपसंख्यानं कर्तव्यम् । पचेलिमा माषाः । पक्तव्याः । भिदेलिमाः सरलाः । भेत्तव्याः ॥

### वसेस्तव्यत्कर्तरि णिच्च ॥२॥

वसेस्तव्यत्कर्तरि वक्तव्यः । णिच्चासौ भवतीति वक्तव्यम् । वसतीति वास्तव्यः ॥

### तद्धितो वा ॥ ३ ॥

तद्धितो वा पुनरेष भविष्यति । वास्तुनि भवो वास्तव्यः ॥

## अचो यत् ॥३।१।९७॥

अज्ग्रहणं किमर्थम् । अजन्ताद्यथा स्याद्धलन्तान्मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । हलन्ताण्ण्यद्विधीयते स बाधको भविष्यति ॥ यथैव तर्हि ण्यद्यतं बाधत एवं तव्यदादीनपि बाधेत । अज्ग्रहणे पुनः क्रियमाणेऽजन्ताद्यद्विधीयते हलन्ताण्ण्यदेतावन्तश्च धातवो यदुताजन्ता हलन्ता-

---

तरी पण तृच्प्रत्ययाच्या पूर्वीच्या प्रत्ययांना कृत्यसंज्ञा होते असें ज्ञापक येऊन ण्वुल्प्रत्ययाला कृत्यसंज्ञा प्राप्त होत आहेच.

कृत्याः या अधिकाराचा संबंध ण्वुल्तृचौ या सूत्रामध्यें करावयाचा नाहीं असें ज्ञापक केलें असतां सर्व सिद्ध होतें.

(सू.९६, वा.१) केलिमर असाही प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०— पचेलिमा माषाः पक्तव्याः, भिदेलिमाः सरलाः भेत्तव्याः.

(वा.२) वस्धातूहून कर्ता या अर्थी तव्यत्प्रत्यय होतो आणि तो णित् होतो असें म्हणावें; उदा०— वसतीति वास्तव्यः.

(वा.३) अथवा वास्तव्य हा शब्द तद्धित प्रत्यय करून साधावा. वास्तुनि भवः वास्तव्यः.

(सू.९७) येथें अचः असे कशाकरितां म्हटलें आहे ?

अजन्त धातूहूनच यत्प्रत्यय झाला पाहिजे, हलन्त धातूहून न झाला पाहिजे, याकरितां म्हटलें आहे.

हा अचः याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण हलन्त धातूहून ण्यत्प्रत्यय (३।१।१२४) सांगितला आहे. तो ह्या यत्प्रत्ययाचा तेथें बाध करील.

पण जसा तो ण्यत्प्रत्यय ह्या यत्प्रत्ययाचा बाध करतो तसा पूर्वसूत्रानें सांगितलेल्या तव्यत् वगैरे प्रत्ययांचाही बाध करील. आणि येथें अचः असें म्हटलें म्हणजे मात्र तव्यत् वगैरे प्रत्ययांचा ण्यत्प्रत्ययानें बाध होत नाहीं. कारण अजन्त धातूहून हा यत्प्रत्यय सांगितला आहे व हलन्त धातूहून ण्यत्प्रत्यय सांगितला आहे. आणि धातु तर अजन्त किंवा हलन्त असे दोनच प्रकारचे आहेत. त्या दोन्ही ठिकाणीं दोन प्रत्ययानीं बाध केला तर तव्यत् वगैरे प्रत्ययांना उदाहरणच मिळ-

---

१. धातूहून तव्यत, तव्य आणि अनीयर् हे प्रत्यय होतात, आणि त्यांना कृत्यसंज्ञा होते; उदा०— कर्तव्यम्, करणीयम्, या प्रत्ययांतील तकार आणि रेफ हे इत्संज्ञक आहेत.

२. या प्रत्ययांतील ककार आणि रेफ हे दोन वर्ण इत्संज्ञक आहेत. तव्यप्रत्ययाचा जो अर्थ तोच या केलिमर्प्रत्ययाचा अर्थ आहे.

३. निवास करणें या अर्थाचा वस्धातु भ्वादिगणांत आहे. त्यांहून कर्ता या अर्थी तव्यत्प्रत्यय केला आहे. वास्तव्य म्ह. निवास करणारा.

४. कर्ता या अर्थी तव्यत्प्रत्यय करून जो वास्तव्यशब्द साधला तो तसा न साधतां वास्तुशब्दाहून वास्तूमध्यें असणारा या अर्थी यत्प्रत्यय (४।३।५४) करावा.

१. अजन्तधातूहून यत्प्रत्यय होतो; त्याला कृत्यसंज्ञा होते; उदा०—चेयम्, जयम्.

श्रोच्यन्ते च तव्यदादयस्ते वचनाद्भविष्यन्ति। नैतदस्ति प्रयोजनम्। वासरूपेण तव्यदादयो भविष्यन्ति॥ इदं तर्हि प्रयोजनमनजन्तभूतपूर्वमात्रादपि यथा स्यात्। लव्यम् पव्यम्। आर्धधातुकसामान्ये गुणे कृते यिप्रत्ययसामान्ये च वान्तादेशे कृते हलन्तादिति ण्यत्प्राप्नोति। तथा दित्स्यम् धित्स्यम् आर्धधातुकसामान्येऽकारलोपे कृते हलन्तादिति ण्यत्प्राप्नोति। अज्ग्रहणसामर्थ्याद्यदेव भवति॥

## यति जनेरुपसंख्यानम्॥ १॥

यति जनेरुपसंख्यानं कर्तव्यम्। जन्यं वत्सेन॥

अत्यल्पमिदमुच्यते। तकिशसिचतियतिजनीनामुपसंख्यानमिति वक्तव्यम्। तकि तक्यम्। शसि शस्यम्। चति चत्यम्। यति यत्यम्। जनि जन्यम्॥

## हनो वा वध च॥ २॥

हनो वा यद्वक्तव्यः। वध इत्ययं चादेशो वक्तव्यः। वध्यः घात्यः॥

## तद्धितो वा॥ ३॥

तद्धितो वा पुनरेष भविष्यति। वधमर्हति वध्यः॥ यदि तद्धितः समासो न प्राप्नोति। असिवध्यः मुसलवध्य इति। यति पुनः सति साधनं कृतेति वा पादहारकाद्यर्थमिति समासः सिद्धो भवति॥

---

णार नाहीं. आणि ते तर सांगितले आहेत. तेव्हां सामर्थ्यास्तव ते एकदा होतील.

हा उपयोग बरोबर नाहीं. कारण 'वासरूपो०' (३।१।९४) या परिभाषेनें ण्यत्प्रत्ययानें बाध झाला तरी विकल्पानें होईल. आणि एकदा तव्यत् वगैरे प्रत्यय होतीलच.

तर मग येथें अचः याचा उपयोग असा समजावा की यत्प्रत्यय करतांना अजन्त धातु नसला तरी जर तेथें तो धातु पूर्वी अजन्त असेल तर तेवढेंच मनात घेऊन यत्प्रत्यय करावा; उदा०— लव्यम्, पव्यम्.

येथें लू व पू या धातूंहून आर्धधातुक प्रत्यय करावयाचा आहे इतकेंच मनांत आणून जर गुण (७।३।८४) केला, तसाच यकारादि प्रत्यय करावयाचा आहे इतकेंच मनांत धरून जर अवादेश (६।१।७९) केला तर लव् पव् असा हलन्त धातु झाल्यामुळें हलन्त धातूहून सांगितलेला ण्यत्प्रत्यय (३।१।१२४) प्राप्त होतो. तसेंच दित्स्यम्, धित्स्यम्, येथें दित्स हा सन्प्रत्ययान्त धातु आणि धित्स हा सन्प्रत्ययान्त धातु यांहून आर्धधातुक प्रत्यय करावयाचा आहे इतकेंच मनांत धरून सन्प्रत्ययाच्या अकाराचा लोप (६।४।४८) केला असतां धातु हलन्त झाल्यामुळें हलन्त धातूहून सांगितलेला ण्यत्प्रत्यय प्राप्त होतो. परंतु येथें अचः असें म्हटलें आहे त्याच्या जोरावर हा धातु पूर्वी अजन्त होता हें मनात आणून यत्प्रत्ययच होतो.

(वा.१) जन्धातूहून यत्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०— जन्यं वत्सेन. हलन्त धातूपैकीं एकट्या जन्धातूहून यत्प्रत्यय सांगितला हें फारच कमी होत आहे, तर तक्, शस्, चत्, यत्, आणि जन् इतक्या धातूंहून यत्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० तक्यम्, शस्यम्, चत्यम्, यत्यम्, जन्यम्.

(वा.२) हन्धातूहून यत्प्रत्यय विकल्पानें होतो आणि त्याच्याबरोबर हन्धातुला वध आदेश होतो; उदा० वध्यः, व एकदा घात्यः असें होतें.

(३) अथवा वध्यः हें उदाहरण वधशब्दाहून तद्धितप्रत्यय (५।१।६६) करून साधतां येईल; वधमर्हति वध्यः.

पण जर हा वध्यशब्द तद्धितप्रत्ययान्त असेल तर असिवध्यः, मुसलवध्यः, येथें त्या वध्यशब्दाबरोबर असि, मुसल, या शब्दांचा समास होणार नाहीं. आणि यत् हा कृत्प्रत्यय

यदि पुनरसिवधशब्दादुत्पत्तिः स्यात्। असिवधमर्हतीति। नैवं शक्यम्। स्वरे हि दोषः स्यात्। असिवध्यः एवं स्वरः प्रसज्येत। असिवध्य इति चेष्यते ॥

[पोरदुपधात् ॥ ३ । १ । ९८ ॥

शकिसहोश्च ॥ ३ । १ । ९९ ॥]

गदमदचरयमश्चानुपसर्गे ॥ ३ । १ । १०० ॥

अनुपसर्गाच्चरेराङि चागुरौ ॥१॥

अनुपसर्गाच्चरेरित्यत्राङि चागुराविति वक्तव्यम्। आचर्यो देशः। अगुराविति किमर्थम्। आचार्य उपनयमानः ॥

[अवद्यपण्यवर्या गर्ह्यपणितव्यानिरोधेषु ॥ ३ । १ । १०१ ॥

वह्यं करणम् ॥ ३ । १ । १०२ ॥]

अर्यः स्वामिवैश्ययोः ॥ ३ । १ । १०३ ॥

स्वामिन्यन्तोदात्तत्वं च ॥१॥

स्वामिन्यन्तोदात्तत्वं च वक्तव्यम्। अर्यः स्वामी ॥

[उपसर्या काल्या प्रजने ॥ ३ । १ । १०४ ॥]

---

केला म्हणजे 'साधनं कृतेति वा पादहारकाद्यर्थम्' (२।१।३२,वा.२) यानें समास सिद्ध होतो.

आतां असिवधशब्दाहून तद्धितप्रत्यय करून असिवधमर्हति या अर्थी असिवध्यशब्द साधेल. पण तसें शक्य नाहीं. कारण तसें केलें तर स्वरामध्यें दोष येईल. असिवध्यः असें तद्धित यत्प्रत्ययामुळें स्वरित (६।१।१८५) होईल, आणि असिशब्दाचा कृत्प्रत्ययान्त वध्यशब्दाशीं समास केला म्हणजे असिवध्यः असा उत्तरपदाला प्रकृतिस्वरानें (६।२।१३९) आदि उदात्त होतो, व तोच इष्ट आहे.

(सू.१००, वा.१) हा जो उपसर्ग नसतांना चरधातूहून यत्प्रत्यय सांगितला आहे तो फक्त आङ् उपसर्ग असेल तरी होतो, पण तेथें गुरु हा अर्थ नसला पाहिजे; उदा०—आचर्यो देशः. येथें गुरु हा अर्थ नसतांना असें कशाकरितां म्हटलें आहे? उपनयन करणारा जो गुरु तो अर्थ असतांना आचार्य असाच शब्द होतो. तेथें ण्यत्प्रत्ययच होतो.

(सू १०३,वा.१) स्वामी हा अर्थ असतांना अर्यशब्दाचा अन्त उदात्त होतो; उदा०—अर्यः स्वामी.

---

१. पवर्गांतील वर्ण शेवटी असलेला आणि ऱ्हस्व अकार उपधेला असलेला जो धातु त्यांहून यत्प्रत्यय होतो; त्याला कृत्यसंज्ञा होते; उदा०-शप्यम्, लभ्यम्.

१. शक् आणि सह् या धातूंहून यत्प्रत्यय होतो; त्याला कृत्यसंज्ञा होते; उदा०-शक्यम्, सह्यम्.

१. गद्, मद्, चर् आणि यम् या धातूंहून यत्प्रत्यय होतो; त्याला कृत्यसंज्ञा होते, परंतु मागें उपसर्ग मुळींच नसला पाहिजे; उदा०-गद्यम्, मद्यम्, चर्यम्, यम्यम्.

१. नञ्पूर्वक वद्धातूहून यत्प्रत्यय करून अवद्य हा शब्द येथें निपातन केला जातो, पण तेथें निंद्य हा अर्थ गम्यमान असतांना; उदा०—अवद्यं पापम् : पाप हें न बोलण्याला योग्य आहे. विक्रेय पदार्थ असेल तर त्या अर्थी पण्य असें निपातन केलें जातें. वर्या म्ह वरण्याला योग्य;'त्या कामी कोणाला प्रतिबंध नाहीं' असा अर्थ गम्यमान असेल तर वर्या असें निपातन केलें जातें.

१. वहधातूहून करण या अर्थी यत्प्रत्यय करून वह्य असें निपातन केलें जातें; वह्यं शकटम् : कांहीं पदार्थ वाहून नेण्याचें साधन शकट आहे.

१. ऋधातूहून यत्प्रत्यय करून अर्य असा शब्द येथें निपातन केला आहे, पण त्या अर्यशब्दाचा अर्थ स्वामी किंवा वैश्य असला पाहिजे.

१. उप-उपसर्गपूर्वक सृधातूहून यत्प्रत्यय करून उपसर्या असें येथें निपातन केलें आहे. पण त्या उपसर्याशब्दाचा अर्थ प्रथमतः गर्भग्रहणाविषयीं जिचा योग्य काल प्राप्त झाला आहे असा असला पाहिजे; उदा०—उपसर्या गौः, उपसर्या वडवा.

**अजर्यं संगतम् ॥३।१।१०५॥**

**संगतमिति किं प्रत्युदाह्रियते । अजरः कम्बलः । अजरिता कम्बल इति । किं पुनः कारणं कर्तृसाधनः प्रत्युदाह्रियते न भावसाधनः प्रत्युदाहार्यः । एवं तर्हि**

**अजर्यं कर्तरि ॥ १ ॥**

**अजर्यं कर्तरीति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । गत्यर्थानां क्तः कर्तरि विधीयते तेन योगादजर्यं कर्तरि भविष्यति । गत्यर्थानां वै क्तः कर्मण्यपि विधीयते तेन योगादजर्यं कर्मण्यपि प्राप्नोति । जीर्यतिरकर्मकः । भावे तर्हि प्राप्नोति । संगतग्रहणमिदानीं किमर्थं स्यात् । कर्तृविशेषणं संगतग्रहणम् । संगतं चेत्कर्तृ भवतीति । तद्यथा । हृषेर्लोमसु [७.२.२९] इति लोमानि चेत्कर्तॄणि**

---

(सू.१०५) संगत अर्थ नसेल तेथें यत्प्रत्यय होत नाहीं, असें संगतम् याचें प्रत्युदाहरण कोणतें ?

अजरः कम्बलः, अजरिता कम्बलः, हें तसें प्रत्युदाहरण होय. जीर्ण न होणारा असा येथें अर्थ आहे.

पण ह्या उदाहरणांमध्यें अच् आणि तृच् हे प्रत्यय कर्तरि केलेले दिसतात. तेव्हां असें प्रत्युदाहरण का दिलें आहे ? तसें देऊ नये. तर भाव या अर्थी प्रत्यय करून प्रत्युदाहरण देणें योग्य आहे. असें आहे तर मग

(वा.१) कर्ता या अर्थी यत्प्रत्यय करूनच अजर्य असें येथें निपातन केलें आहे असें म्हणावें.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण ह्या सूत्रामधील संगतशब्दामध्यें गम्धातूहून क्तप्रत्यय कर्ता या अर्थी केला आहे. कारण गत्यर्थक धातूहून कर्तरि क्तप्रत्यय (३।४।७२) सांगितला आहे. तेव्हां त्या संगतशब्दाच्या संबंधानें अजर्यशब्दामध्यें कर्ता या अर्थीच यत्प्रत्ययाचें निपातन समजलें जाईल.

पण गत्यर्थक धातूहून कर्म या अर्थीही क्तप्रत्यय होतो ना ? तेव्हां त्याच्या संबंधानें अजर्यशब्दामध्यें कर्म या अर्थी प्रत्यय केला आहे असेंही समजतां येईल.

पण जृधातु अकर्मक असल्यामुळें कर्म या अर्थी यत्प्रत्यय केला आहे असें समजतां येत नाहीं.

तर मग भाव या अर्थी यत्प्रत्यय करून हें निपातन केलें आहे असें म्हणतां येईल.

पण भाव या अर्थी यत्प्रत्यय केला तर त्याच्याकडे संगतशब्दाचा संबंध कोणत्या अर्थानें होईल ?

कां बरें ? संगतग्रहण हें कर्त्याचें विशेषण होईल. म्हणजे संगत कर्ता असेल तर अजर्य हें निपातन समजावें असा अर्थ घेतां येईल; जसें हृषेर्लोमसु (७।२।२९) या सूत्रामध्यें लोम कर्ता असेल तर असा संबंध केला आहे तसाच येथेंही अर्थ होण्याचा संभव आहे.

---

१. नञ्पूर्वक जृधातूहून कर्ता या अर्थी यतप्रत्यय करून अजर्य असें निपातन केलें आहे. अजर्य म्ह. न जिरणारें (कधीं कमी न होणारें). पण तें अजर्य संगत असलें पाहिजे. संगत म्ह. साधु लोकांची मैत्री.

२. जृधातु अकर्मक आहे. त्याहून कृत्यप्रत्यय फक्त भावच होणार आहेत. तेव्हां संगत अर्थ नसेल तेथें भावे हा यत्प्रत्यय झाला नाहीं तर दुसरा कोणी तरी भावे प्रत्ययच होईल. तेव्हां तसेंच प्रत्युदाहरण दिलें पाहिजे.

३. तात्पर्य, येथें भावे यत्प्रत्ययाचें निपातन मानलें जाईल. कारण वाक्यार्थांत कांहीं अडचण येत नाहीं; म्हणून कर्ता या अर्थीच यत्प्रत्यय करून हें निपातन केलें आहे. हें समजण्याकरितां 'अजर्यं कर्तरि' हें वार्तिक पाहिजे असें सिद्ध झालें,

भवन्ति ॥

**वदः सुपि क्यप्च ॥३।१।१०६॥**

**वदः सुप्यनुपसर्गग्रहणम् ॥१॥**

वदः सुप्यनुपसर्गग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । प्रवाद्यम् अपवाद्यमिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अनुपसर्ग इति वर्तते । एवं तर्ह्यन्वाचष्टेऽनुपसर्ग इति वर्तत इति । नैतदन्वाख्येयमधिकारा अनुवर्तन्त इति । एष एव न्यायो यदुताधिकारा अनुवर्तेरन्निति ॥

**भुवो भावे ॥ ३ । १ । १०७ ॥**

भावग्रहणं किमर्थम् । कर्मणि मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनं भवतिरयमकर्मकः । अकर्मका अपि वै धातवः सोपसर्गाः सकर्मका भवन्ति तेन अनुभव्यमामन्त्रणमित्यत्रापि प्राप्नोति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । अनुपसर्ग इति वर्तते । उत्तरार्थं तर्हि भावग्रहणं कर्तव्यम् । हनस्त च [१०८] भावे यथा स्यात् । श्वहत्या वर्तते । क मा भूत् । श्वघात्यो वृषल इति ॥

**हनस्त च ॥ ३ । १ । १०८ ॥**

**हनस्तश्चित्स्त्रियां छन्दसि ॥१॥**

हनस्त चेत्यत्र चित्स्त्रियां छन्दसि वक्तव्यः । तां भ्रूणहत्यां निगृह्यानुचरणम् ।

---

(सू.१०६, वा.१) हा जो सुबन्त उपपद असतांना वद्धातूहून क्यप् आणि यत्प्रत्यय सांगितला आहे तो उपसर्ग नसतांनाच होतो असें म्हणावें. कारण प्रवाद्यम्, संवाद्यम्, येथें क्यप् आणि यत्प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण मागून (३।१।१००) अनुपसर्गे या पदाची अनुवृत्ति येतच आहे.

तर मग 'अनुपसर्गे याची येथें अनुवृत्ति आणावी' असाच या वार्तिकाचा अर्थ समजावा.

पण अधिकारांची पुढें अनुवृत्ति होते हें कांहीं सांगावें लागत नाहीं. अधिकारांची पुढें अनुवृत्ति होते ही सरळच गोष्ट आहे.

(सू.१०७) ह्या सूत्रामध्यें भावे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

कर्म या अर्थी हा क्यप्प्रत्यय होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

हा भावे याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण भूधातु हा अकर्मक आहे.

पण अकर्मक धातु असला तरी उपसर्ग लावला म्हणजे त्याचा अर्थ बदलून तो सकर्मक होतो. तेव्हां अनुभाव्यम् आमन्त्रणम् येथें कर्म या अर्थी क्यप्प्रत्यय होऊं लागेल.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण अनुपसर्गे या पदाची अनुवृत्ति येथें येत आहे.

तर मग पुढें अनुवृत्ति होण्याकरितां येथें भावे हा शब्द घातला पाहिजे.

'हनस्त च' या पुढील सूत्रानें हन्धातूहून भावे क्यप्प्रत्यय झाला पाहिजे; जसें– श्वहत्या वर्तते आणि श्वघात्यो वृषलः येथें कर्मणि ण्यत्प्रत्यय (३।१।१२४) होतो तेथें क्यप्प्रत्यय न झाला पाहिजे.

(सू.१०८,वा.१) हनस्त च यानें क्यप्प्रत्यय झाल्यानंतर तो शब्द वेदामध्यें जो स्त्रीलिंगी दृष्टीस पडतो तो चित् समजावा. त्यामुळें 'तां भ्रूणहत्या निगृह्यानुचरणम्' 'अस्यै त्वा भ्रूणह-

---

१. सुबन्त उपपद असतांना आणि उपसर्ग नसतांना वद्धातूहून क्यप्प्रत्यय होतो व त्याला कृत्यसंज्ञा होते; आणि एकदा यत्प्रत्ययही होतो; उदा०- ब्रह्मोद्यम्, ब्रह्मवद्यम्.

१. सुबन्त उपपद असतांना आणि उपसर्ग नसतांना भूधातूहून भावे क्यप्प्रत्यय होतो; उदा०–

ब्रह्मभूयं गतः; ब्रह्मत्वाप्रत पोचला असा अर्थ आहे.

१. सुबन्त उपपद असतांना आणि उपसर्ग नसतांना हन्धातूहून भावे क्यप्प्रत्यय होतो आणि हन्धातूच्या नकाराला तकारादेश होतो; उदा०– ब्रह्महत्या, अश्वहत्या. हा क्यप्प्रत्ययान्त शब्द लौकिक प्रयोगामध्यें स्वभावतः स्त्रीलिंगींच चालतो. वेदामध्यें

अस्यै त्वां भ्रूणहत्यायै चतुर्थं प्रतिगृह्णाण। स्त्रियामिति किमर्थम्। आघ्नते दस्युहत्याय। छन्दसीति किमर्थम्। दस्युहत्या श्वहत्या वर्तते॥

## एतिस्तुशास्वृदृजुषः क्यप्॥ ३। १। १०९॥

क्यबिति वर्तमाने पुनः क्यब्ग्रहणं किमर्थम्। क्यबेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति। किं चान्यत्प्राप्नोति। ण्यत्। ओरावश्यके ण्यतः स्तौतेः क्यप्पूर्वविप्रतिषिद्धमिति वक्ष्यति स पूर्वविप्रतिषेधो न पठितव्यो भवति। अथवा हनस्तश्चित्स्त्रियां छन्दसि चोदितः स न वक्तव्यो भवति॥

### क्यब्विधौ वृञ्ग्रहणम्॥१॥

क्यब्विधौ वृञ्ग्रहणं कर्तव्यम्। इह मा भूत् वार्या ऋत्विज इति॥

### अञ्जेश्चोपसंख्यानं संज्ञायाम्॥२॥

संज्ञायामञ्जेश्चोपसंख्यानं कर्तव्यम्। आज्यम्॥ यदि क्यब्वृद्धिर्न प्राप्नोति

---

त्यायै चतुर्थं प्रतिपद्यते' या वैदिक प्रयोगांमध्यें ह्या क्यप्प्रत्ययान्त शब्द अन्तोदात्त (६।१। १६३) होतो.

येथें स्त्रियाम् असें कशाकरितां म्हटलें आहे?

आघ्नते दस्युहत्याय ह्या वैदिक प्रयोगामध्यें दस्युहत्य या नपुंसकलिंगी शब्दाला अन्त उदात्त न झाला पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

आतां येथें छन्दसि असें कशाकरितां म्हटलें आहे?

श्वहत्या, दस्युहत्या, या लौकिक प्रयोगांमध्यें अन्त उदात्त होत नाहीं म्हणून म्हटलें आहे.

(सू.१०९) क्यप् असें अनुवृत्त येत असतांना पुनः येथें क्यब्ग्रहण कशाकरितां केलें आहे?

या धातूंहून क्यप्प्रत्ययच झाला पाहिजे, दुसरा कोणीही प्रत्यय या अर्थी प्राप्त झाला तरी तो न झाला पाहिजे.

पण येथें दुसरा कोणता प्रत्यय बरें प्राप्त होतो?

ण्यत्प्रत्यय प्राप्त होत आहे. तेव्हां तेथें 'ओरावश्यके ण्यतः स्तौतेः क्यप्पूर्वविप्रतिषिद्धम्' (३।१।१२५, वा.३) असें जें पूर्वविप्रतिषेधानें क्यप्प्रत्यय होण्याकरितां वचन केलें आहे तें करावयास नको. अथवा पूर्वसूत्रानें क्यप्प्रत्यय केला असतां त्याचा वेदामध्यें स्त्रीलिंगी प्रयोग असेल तेथें तो चित् समजावा असें जें वचन केलें आहे तें करावयास नको.

(वा.१) ह्या क्यप्प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्ये वृ या शब्दानें वृञ्धातूचेंच ग्रहण होतें असें म्हणावें. कारण वृङ्धातूहून ण्यत्प्रत्यय होऊन वार्याः ऋत्विजः असें झालें पाहिजे. तेथे क्यप्प्रत्यय न झाला पाहिजे.

(वा.२) संज्ञाशब्दामध्यें अञ्जधातूहून क्यप्प्रत्यय होतो असें म्हणावें; उ०—आज्यम्.

पण आज्य या शब्दामध्यें क्यप्प्रत्यय केला तर नकाराचा लोप (६।४।२४) होईल. पण वृद्धि (७।२।११६) होणार नाहीं. तेव्हां येथें ण्यत्प्रत्यय केला पाहिजे.

पण ण्यत्प्रत्यय केला तर उपधा-नकाराचा लोप होणार नाहीं, तेव्हां येथें क्यप्प्रत्ययच केला

---

कांहीं ठिकाणीं नपुंसकलिंगीही चालतो.

१. इण्, स्तु, शास्, वृ, दृ आणि जुष् या धातूंहून भावे किंवा कर्मणि क्यप्प्रत्यय होतो व त्याला कृत्यसंज्ञा होते; उदा०-इत्यः, स्तुत्यः, शिष्यः, वृत्यः, आदृत्यः, जुष्यः.

२. येथें जें पुनः क्यब्ग्रहण केलें आहे त्यावरून पूर्वीच्या क्यपामध्यें कांहीं तरी वैलक्षण्य आहे असें सूचित होते. तें वैलक्षण्य येथें लागू होऊं नये म्हणून मुद्दाम येथें पुनः क्यब्ग्रहण केलें आहे. तें वैलक्षण्य म्हणजे स्त्रीलिंगी वैदिक प्रयोगामध्यें तो क्यप्प्रत्यय चित समजणें हें होय.

तस्माण्ण्यद्दोषः । यदि ण्यदुपधालोपो न प्राप्नोति तस्मात्क्यबेषः । ननु चोक्तं वृद्धिर्न प्राप्नोतीति । आङ्पूर्वस्यैष प्रयोगो भविष्यति । यद्येवमवग्रहः प्राप्नोति । न लक्षणेन पदकारा अनुवर्त्याः । पदकारैर्नाम लक्षणमनुवर्त्यम् । यथालक्षणं पदं कर्तव्यम् ॥

**[ऋदुपधाच्चाक्लृपिचृतेः ॥ ३ । १ । ११० ॥]**

**ई च खनः ॥३।१।१११॥**

दीर्घोच्चारणं किमर्थं न इ च खन इत्येवोच्येत । का रूपसिद्धिः खेयम् । आद्गुणेन सिद्धम् । न सिध्यति । षत्वतुकोरसिद्ध एकादेश इत्येकादेशस्यासिद्धत्वात्तुक्प्रसज्येत । नैतदस्ति । पदान्तपदाद्योरेकादेशोऽसिद्धो न चैष पदान्तपदाद्योरेकादेशः । तस्मादि च खन इत्येव वक्तव्यम् ॥

**भृञोऽसंज्ञायाम् ॥३।१।११२॥**

असंज्ञायामिति किमर्थम् । भार्या ॥ भृञः संज्ञाप्रतिषेधे स्त्रियामप्रतिषेधो-

---

पाहिजे.

पण क्यप्प्रत्यय केला तर वृद्धि होणार नाहीं याची काय वाट ?

आङ्उपसर्ग मागे लावला म्हणजे आज्यम् हें रूप साधेल.

पण असें असेल तर पदकालीं अवग्रह होऊं लागेल ना ?

शास्त्रानें कांहीं पदकारांचें अनुसरण करावयाचें नाहीं. उलट पदकारांनींच शास्त्राप्रमाणें वागलें पाहिजे. तेव्हां शास्त्र संभाळून जसें करतां येईल तसेंच त्यांनीं करावें.

(सू.१११) येथें दीर्घ ई असें उच्चारण कशाकरितां केलें आहे ? तसें करूं नये. 'इ च खनः' असेंच सूत्र करावें.

पण तसें केलें तर खेयम् हें रूप कसें साधेल ?

कां बरें ? आद्गुणः (६।१।८७) यानें गुण केला म्हणजे साधेल.

तसें सिद्ध होणार नाहीं. कारण 'षत्वतुकोः०' (६।१।८६) या शास्त्रानें तो गुण एकादेश असिद्ध असल्यामुळें ऱ्हस्व इकाराला तुगागम (६।१।७१) होऊं लागेल

हा दोष येत नाहीं. कारण जो एकादेश मागील पदाचा शेवटचा वर्ण आणि पुढील पदाचा पहिला वर्ण अशा दोन वर्णांचे स्थानीं होतो तोच एकादेश त्या शास्त्रानें असिद्ध होतो. आणि खेयम् येथें तर एका पदाचा शेवटचा वर्ण आणि दुसऱ्या पदाचा पहिला वर्ण अशा दोन वर्णांचे स्थानीं झालेला एकादेश नाहीं. तेव्हां 'इ च खनः' असें येथें म्हटलें तरी चालेल.

(सू ११२) या सूत्रामध्यें असंज्ञायाम् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

भार्या या संज्ञाशब्दामध्यें क्यप्प्रत्यय होऊं नये याकरितां म्हटलें आहे.

---

३. मंत्रांतील पदें दाखवितांना आज्यम् हें पद 'आज्यमिति आऽअज्यम्' असें अवग्रह करून दाखवावें लागेल.

४. आज्यम् हें पद जर आङ्उपसर्ग लावूनच सिद्ध होत आहे तर पदें दाखवितांना पदकारांनीं अवग्रह करूनच हें पद दाखवावें.

१. ज्या धातूच्या उपधेला ऱ्हस्व ऋकार आहे अशा धातूहून क्यप्प्रत्यय होतो व त्याला कृत्यसंज्ञा होते. पण क्लृप् आणि चृत् ह्या दोन धातूंहून मात्र होत नाहीं; उदा०—वृत्यम्, वृध्यम्.

१. खन्धातूहून क्यप्प्रत्यय होतो. त्याला कृत्यसंज्ञा होते, आणि खन्धातूच्या नकाराला ईकारादेश होतो; उदा० खेयम्.

२. षत्वतुको० या सूत्रावरील वार्तिक (६।१।८६, वा.६) पहा.

१. भृञ्धातूहून क्यप्प्रत्यय होतो, परंतु तो संज्ञाशब्द नसला पाहिजे; उदा०—भृत्याः, कर्मकराः.

**ऽन्येन विहितत्वात् ॥ १ ॥**

भृञः संज्ञाप्रतिषेधे स्त्रियामप्रतिषेधः। अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः। किं कारणम्। अन्येन विहितत्वात्। अन्येन लक्षणेन स्त्रियां क्यब्विधीयते। संज्ञायां समजनिषदनिपतमनविदषुञ्शीङ्भृञिणः [३.३.९९] इति॥ प्रतिषेध इदानीं किमर्थः स्यात्।

**प्रतिषेधः किमर्थ इति चेदस्त्रीसंज्ञाप्रतिषेधार्थः ॥२॥**

प्रतिषेधः किमर्थ इति चेदस्त्रीसंज्ञास्ति तदर्थः प्रतिषेधः स्यात्। भार्या नाम क्षत्रियाः॥

**सिद्धं तु स्त्रियां संज्ञाप्रतिषेधात् ॥३॥**

सिद्धमेतत्। कथम्। स्त्रियां संज्ञाप्रतिषेधो वक्तव्यः। संज्ञायां समजनिषदनिपतमनविदषुञ्शीङ्भृञिणः। ततो न स्त्रियां भृञ इति। सिध्यति। सूत्रं तर्हि भिद्यते॥ यथान्यासमेवास्तु। ननु चोक्तं भृञः संज्ञाप्रतिषेधे स्त्रियामप्रतिषेधोऽन्येन विहितत्वादिति। नैष दोषः। भाव इति तत्रानुवर्तते कर्मसाधनश्चायम्। अथवा य एते संज्ञायां विधीयन्ते तेषु नैवं विज्ञायते संज्ञायामभिधेयायामिति। किं तर्हि। प्रत्ययान्तेन चेत्संज्ञा गम्यत इति॥

अपर आह।

---

(वा.१) संज्ञाशब्दामध्यें भृधातूहून क्यप्-प्रत्ययाचा जो प्रतिषेध केला आहे तो स्त्रीलिंगामध्यें अप्रतिषेधच होय. अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय.

काय कारण ?

कारण असें की 'संज्ञायां समजनिषदनिपतमनविदषुञ्शीङ्भृञिणः' (३।३।९९) या दुसऱ्या शास्त्रानें स्त्रीत्वविवक्षा असतांना क्यप्-प्रत्यय सांगितला आहे तो येथें प्राप्त होत आहेच.

मग येथें असंज्ञायाम् हा निषेध करण्याचें कारण काय ?

(वा.२) प्रतिषेध कशाकरितां असें म्हणणें असेल तर जो संज्ञाशब्द स्त्रीलिंगी नसेल तेथें त्या प्रतिषेधाचा उपयोग होईल; उदा०—भार्या नाम क्षत्रियाः.

तरी पण भार्या वधूः येथें 'संज्ञायां समज०' या सूत्रानें क्यप्प्रत्यय प्राप्त होत आहे त्याची वाट काय ?

(वा.३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

'संज्ञायां समज०' यानें सांगितलेल्या क्यप्-प्रत्ययाचा स्त्रीलिंगामध्यें निषेध सांगावा. तो असा:— 'संज्ञायां समजनिषदनिपतमनविदषुञ्शीङ्भृञिणः' या सूत्राच्या पुढें 'न स्त्रियां भृञः' असें म्हटलें म्हणजे तेथें दोष येणार नाहीं.

अशा रीतीनें सिद्ध होईल खरें, पण सूत्रांत बदल होतो ना ?

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मूळचेंच सूत्र ठेवलें तर आतांच सांगितलें आहे ना की "येथील असंज्ञायाम् हा प्रतिषेध अनर्थक आहे, कारण स्त्रीलिंगामध्यें संज्ञा असतांना 'संज्ञायां समज०' यानें क्यप्-प्रत्यय प्राप्त होत आहेच ?"

हा दोष येत नाहीं. कारण 'संज्ञायां समज०' या सूत्रामध्यें भावे अशी अनुवृत्ति आहे. आणि भार्या वधूः येथें भृधातूहून कर्मे या अर्थी प्रत्यय केला आहे. अथवा संज्ञा हें निमित्त धरून जे प्रत्यय सांगितले आहेत त्या ठिकाणीं संज्ञा असतांना इतकाच अर्थ समजूं नये, तर तो प्रत्यय करून सिद्ध झालेला शब्द जर संज्ञाशब्द असेल तर तेथें तो प्रत्यय करावा असा अर्थ आहे.

हीच गोष्ट दुसऱ्या वैयाकरणांनीं अशी लिहिली आहे:—

---

२. भार्या म्हणजे पोषण नव्हे, तर पोषण केली जाणारी स्त्री असा अर्थ आहे.

**संज्ञायां पुंसि दृष्टत्वान्न ते भार्या प्रसिध्यति ।**

संज्ञायां पुंसि दृष्टत्वात्तव भार्याशब्दो न सिध्यति ।

**स्त्रियां भावाधिकारोऽस्ति तेन भार्या प्रसिध्यति ॥१॥**

भाव इति तत्र वर्तते कर्मसाधनश्चायम् ॥

**अथवा बहुलं कृत्याः संज्ञायामिति तत्स्मृतम् ।**

अथवा कृत्यल्युटो बहुलम् [३.३.११३] इत्येवमत्रापि ण्यद्भविष्यति ॥

**यथा यत्यं यथा जन्यं यथा भित्तिस्तथैव सा ॥२॥**

**समश्च बहुलम् ॥४॥**

समश्च बहुलमुपसंख्यानं कर्तव्यम् । संभृत्या एव संभाराः । संभार्या एव संभाराः ॥

**[मृजेर्विभाषा ॥ ३ । १ । ११३ ॥]**

**राजसूयसूर्यमृषोद्यरुच्यकुप्यकृष्टपच्याव्यथ्याः ॥३।१।११४॥**

**सूर्यरुच्याव्यथ्याः कर्तरि ॥१॥**

सूर्य रुच्य अव्यथ्य इति कर्तरि निपात्यन्ते ॥ किं निपात्यते । सूर्यः ।

**सूसर्तिभ्यां सर्तेरुत्वं सुवतेर्वा रुडागमः ।**

---

येथील असंज्ञायाम् याचा उपयोग भार्याः क्षत्रियाः या ठिकाणीं पुंल्लिंगी संज्ञाशब्दामध्यें इष्ट आहे. म्हणून भार्या वधूः हें उदाहरण सिद्ध होत नाहीं. कारण येथें 'संज्ञायां समज०' यानें क्यप्प्रत्यय होऊं लागेल. स्त्रियाम् या अधिकारामध्यें 'संज्ञायां समज०' येथें भावे अशी अनुवृत्ति येते म्हणून भार्या वधूः या उदाहरणाची सिद्धि होते. कारण भार्या वधूः येथें कर्म या अर्थी प्रत्यय केला आहे. अथवा कृत्यप्रत्यय बाहुल्येंकरून होतात (३।३।११३) म्हणून भार्या वधूः येथें ण्यत्प्रत्यय होईल. संज्ञा असतांना सांगितलेला क्यप्प्रत्यय (३।३।९९) तेथें होत नाहीं. कारण क्यप्प्रत्ययान्त शब्द कोणाचीही संज्ञा नाहीं. जसें यत्यम्, जन्यम्, येथें अजन्त धातु नसतांनाही बाहुलकास्तव यत्प्रत्यय होतो, तसेंच जसें भित्तिः येथें अङ्प्रत्यय (३।३।१०४) प्राप्त असतांही तो न करतां क्तिन्प्रत्ययच होतो, तसेंच येथें समजावें.

(वा.४) सम् उपसर्ग असतांना भृधातूहून क्यप्प्रत्यय बाहुल्येंकरून होतो असें म्हणावें; उदा० संभृत्याः, संभार्याः.

(सू.११४,वा.१)सूर्य, रुच्य आणि अव्यथ्य या तीन शब्दामध्यें क्यप्प्रत्यय कर्ता या अर्थी होतो.

सूर्यशब्दामध्यें काय काय निपातन केलें आहे ?

सूधातु किंवा सुधातु याहून क्यप्प्रत्यय केला आहे. त्यांपैकीं सृधातूच्या ऋकाराला उकार आदेश आणि सूधातूच्या पुढील क्यप्प्रत्ययाला रुडागम होतो; सरतीति सूर्यः म्हणजे आकाशांतून गमन करणारा, किंवा

---

१. मृज्धातूहून क्यप्प्रत्यय विकल्पानें होतो व त्याला कृत्यसंज्ञा होते; उदा०– परिमृज्यः, परिमार्ग्यः.

१. राजसूय, सूर्य, मृषोद्य, रुच्य, कुप्य, कृष्टपच्य आणि अव्यथ्य हे सात शब्द क्यप्प्रत्ययान्त निपातन केले जातात. राजानें केला जाणारा तो राजसूययज्ञ. राजन्शब्द उपपद असतांना सुधातूहून कर्म या अर्थी क्यप्प्रत्यय केला आहे. राज्ञा सूयते इति राजसूयः किंवा राजा सूयते अत्रेति राजसूयः, म्ह. सोमराज कंडन केला जातो ज्या ठिकाणी असा यज्ञ. या वेळीं अधिकरण या अर्थीं क्यप्प्रत्यय केला आहे. मृषोद्यशब्दामध्यें मृषाशब्द उपपद असतांना वद्धातूहून कर्मणि क्यप्प्रत्यय केला आहे.

सरणाद्वा सुवति वा कर्मणीति सूर्यः। सूर्य॥ रुच्य। रोचतेऽसौ रुच्यः॥ न व्यथतेऽव्यथ्यः॥

## कुप्यं संज्ञायाम् ॥२॥

कुप्यं संज्ञायामिति वक्तव्यम्। गोप्यमन्यत्॥

## कृष्टपच्यस्यान्तोदात्तत्वं च कर्मकर्तरि च ॥३॥

कृष्टपच्यस्यान्तोदात्तत्वं च कर्मकर्तरि चेति वक्तव्यम्। कृष्टे पच्यन्ते स्वयमेव। कृष्टपच्याश्च मे। अकृष्टपच्याश्च मे। यो हि कृष्टे पक्तव्यः कृष्टपाक्यः स भवति॥

[भिद्योद्ध्यौ नदे ॥ ३। १। ११५॥

पुष्यसिध्यौ नक्षत्रे ॥३।१।११६॥

विपूयविनीयजित्या मुञ्जकल्कहलिषु ॥ ३। १। ११७॥]

## प्रत्यपिभ्यां ग्रहेः ॥३।१।११८॥

## प्रत्यपिभ्यां ग्रहेश्छन्दसि ॥१॥

प्रत्यपिभ्यां ग्रहेश्छन्दसीति वक्तव्यम्। मत्तस्य न प्रतिगृह्यमनृतं हि मत्तो वदति। तस्मान्नापिगृह्यम्। प्रतिग्राह्यम् अपिग्राह्यमित्येवान्यत्र॥

---

सुवतीति सूर्यः म्हणजे कर्म करण्याविषयीं लोकांना प्रेरणा करणारा. रोचते इति रुच्यः म्हणजे प्रदीप्त होणारा. न व्यथते इत्यव्यथ्यः म्हणजे व्यथित न होणारा.

(वा.२) कुप्य हा शब्द संज्ञा असतांनाच निपातन[2] केला जातो. संज्ञा नसेल तेथें गोप्य असें होतें.

(वा.३) कृष्टशब्द उपपद असतांना पच्धातूहून कर्मकर्तरि क्यप्प्रत्यय[3] होतो. आणि कृष्टपच्य यांतील शेवटचा अकार उदात्तही होतो असें म्हणावें. कृष्टे स्वयमेव पच्यन्ते कृष्टपच्याः, 'कृष्टपच्याश्च मे अकृष्टपच्याश्च मे'. शेत नांगरल्यानंतर तेथें इतरांनीं तयार केलेलें धान्य हा अर्थ विवक्षित असेल तर कृष्टपाक्य[4] असेंच म्हटलें जातें.

(सू.११८,वा.१) हा जो प्रति आणि अपि या उपसर्गांच्या पुढील ग्रहधातूहून क्यप्प्रत्यय सांगितला आहे तो वेदामध्येंच होतो असें म्हणावें; उदा०— मत्तस्य न प्रतिगृह्यम्, अनृतं हि मत्तो वदति, तस्मान्नापिगृह्यम्.

---

२. सोनें, रुपें, यांशिवाय इतर द्रव्यांची कुप्य अशी संज्ञा आहे गुप्धातूहून कर्मणि क्यप्प्रत्यय आणि गुप्धातूच्या गकाराला ककारादेश झाला आहे.

३. शेत नांगरलें असतांना जें धान्य अनायासानें तयार होतें तेथें 'तें स्वतःच तयार होतें' अशी विवक्षा तयार करून कर्मकर्तरि क्यप्प्रत्यय करतां येतो.

४. येथें पच्धातूहून ण्यत्प्रत्यय (३।१।१२४), वृद्धि (७।२।११६) आणि कुत्व (७।३।५२) झालें आहे.

१. भिद्य आणि उद्ध्य हे दोन शब्द नद या अर्थी निपातन केले जातात. भिद् व उज्झ् या धातूंहून कर्तरि क्यप्प्रत्यय होतो; उदा०-भिनत्ति कूलं भिद्यः, उज्झत्युदकम् उद्ध्यः. येथें धातूच्या झकाराला धकार झाला आहे.

१. पुष्य आणि सिध्य हे दोन शब्द नक्षत्र या अर्थी निपातन केले जातात. पुष् व सिध् या धातूंहून अधिकरण या अर्थी क्यप्प्रत्यय होतो पुष्यन्ति सिध्यन्ति अर्था अस्मिन् इति पुष्यः सिध्यः.

१. विपूय, विनीय आणि जित्य हे तीन शब्द मुञ्ज, कल्क आणि हलि या तीन अर्थी क्रमानें निपातन केले जातात. विउपसर्गपूर्वक पूधातु, विउपसर्गपूर्वक नीधातु आणि जिधातु यांहून कर्मणि क्यप्प्रत्यय होतो. विपूय म्ह. शोधन केलेला मुञ्ज म्ह. मोळ. विनीय म्ह. प्रयत्नानें काढलेला सारभाग; अथवा दूर करण्याला योग्य पातक असाही विनीयशब्दाचा अर्थ आहे. जित्य म्ह. प्रयत्नानें ओढला जाणारा मोठा नांगर.

१. प्रति आणि अपि या उपसर्गांच्या पुढील ग्रहधातूहून कर्मणि क्यप्प्रत्यय होतो; उदा०-प्रतिगृह्यम्, अपिगृह्यम्.

[पदास्वैरिबाह्यापक्ष्येषु च ॥ ३ । १ । ११९ ॥
विभाषा कृवृषोः ॥ ३ । १ । १२० ॥
युग्यं च पत्रे ॥ ३ । १ । १२१ ॥]
अमावस्यदन्यतरस्याम् ॥ ३ । १ । १२२ ॥

कस्यायमनुबन्धः । प्रधानस्य । यदि प्रधानस्य अमावस्या एवं स्वरः प्रसज्येत अमावस्या इति चेष्यते । तथामावास्याग्रहणेनामावस्याग्रहणं न प्राप्नोति ॥ एवं तर्हि निपातनस्य । यदि तर्हि निपातनान्यप्येवंजातीयकानि भवन्ति श्रोत्रियंश्छन्दोऽधीते [५.२.८४] इति व्यपवर्गाभावाञ्ञ्नितीत्याद्युदात्तत्वं न प्राप्नोति ॥ एवं तर्हि

लौकिक प्रयोगांमध्यें ण्यत्प्रत्यय होऊन प्रतिग्राह्यम्, अपिग्राह्यम्, अशींच रूपें होतात.

(सू.१२२) ह्या सूत्रामध्यें हा जो तकारानुबंध उच्चारला आहे तो कोणाचा, प्रत्ययाचा कीं निपातनाचा ?

प्रत्यय मुख्य असल्यामुळें त्याचाच आहे.

जर प्रत्ययाचा असेल तर अमावस्या असे स्वर होतील. आणि अमावस्या असे स्वर इष्ट आहेत. तसेंच अमावास्या (४।३।३०) या शब्दानें अमावस्याशब्दाचें ग्रहण होणार नाहीं.

तर मग हा तकार निपातनाचाच समजावा.

पण असें असेल तर अशा तऱ्हेचीं जीं निपातनें आहेत, उदा०- श्रोत्रियंश्छन्दोऽधीते (५।२।८४), तेथेंही उच्चारलेला नकार हा अनुबंध श्रोत्रिय या निपातनाचा समजला जाईल आणि व्यपवर्ग नसल्यामुळें ञ्नित्या-

१. ग्रह्धातूहून क्यप्प्रत्यय होतो. तो क्यप्प्रत्ययान्त शब्द पदाला लाविला असेल तर किंवा परतंत्र, बाहेर असणारी आणि तत्पक्षीय, या तीन अर्थांपैकीं कोणताही अर्थ त्या शब्दाचा असेल तर; उदा०-प्रगृह्यं पदम्, अवगृह्यं पदम्, गृह्यकाः शुकाः, ग्रामगृह्या सेना, आर्यगृह्योऽयं साधुः.

१. कृ आणि वृष् या धातूंहून विकल्पानें क्यप्प्रत्यय होतो; उदा०-कृत्यम् कार्यम्, वृष्यम् वर्ष्यम्.

१. वाहन हा अर्थ गम्यमान असतांना युग्य असा शब्द निपातन केला जातो. येथें युज्धातूहून क्यप्प्रत्यय आणि धातूच्या जकाराला गकार झाला आहे; उदा०-युग्यो गौः, युग्योऽश्वः.

१. अमावस्य असें ण्यत्प्रत्यय करून ऱ्हस्व करून एकदा निपातन केलें जातें आणि एकदा ऱ्हस्व होत नाहीं. अर्थातच त्या वेळीं वृद्धीनें (७।२।११६) झालेला आकार कायम राहून अमावास्या असें होतें. सूर्य व चन्द्र हे बरोबर असतात ज्या कालीं त्या कालाला म्ह. त्या तिथीला अमावास्या किंवा अमावस्या म्हणतात. अमाउपपदपूर्वक वस्धातूहून अधिकरण या अर्थीं ण्यत्प्रत्यय केला आहे.

२. ह्या प्रत्ययप्रकरणामध्यें तकार जर प्रत्ययाचा समजला तर या निपातनामध्यें यत् किंवा ण्यत् घेतला पाहिजे. यत्प्रत्यय घेतला तर तो निपातनामुळेंच केला पाहिजे. अर्थात् त्याचाच विकल्प होऊन एकदां ण्यत्प्रत्यय व वृद्धि होऊन अमावास्या असें दुसरें रूप साधेल. परंतु अमावस्याशब्दामध्यें वस्य याला आद्युदात्त (६।१।२१३) होऊं लागेल. तसेंच अमावास्या या शब्दाहून तत्र जातः या अर्थीं जो वुन्प्रत्यय (४।३।३०) सांगितला आहे तो अमावास्याशब्दाहून होणार नाही. कारण अमावास्याशब्दांतील आकाराला ऱ्हस्व होऊन अमावस्याशब्द सिद्ध झालेला नाहीं. आतां ण्यत्प्रत्यय घेतला तर तो ण्यत्प्रत्यय (३।१।१२४) व वृद्धि (७।२।११६) सहजच होतील. तेथें निपातनाच्या जोरावर आकाराला ऱ्हस्व होतो असें मानलें पाहिजे. अर्थात् त्याचाच विकल्प होऊन दोन रूपें होतील. दोन्ही रूपांमध्यें यत्प्रत्यय नसल्यामुळें आद्युदात्त होत नाहीं आणि अमावास्याशब्दामध्येंच आकाराला ऱ्हस्व होऊन अमावस्याशब्द सिद्ध होत असल्यामुळें एकदेशविकृतन्यायानें त्याहूनही वुन्प्रत्यय होईल.

३. अकारेत्संज्ञक किंवा नकारेत्संज्ञक प्रत्यय ज्याहून केला तदादि आणि तो प्रत्यय अंती असलेला जो समुदाय त्याला आद्युदात्त सांगितला आहे. जर श्रोत्रिय या निपातनाचा नकार इत्संज्ञक मानला तर त्या श्रोत्रिय यांतील कोणत्या प्रकृतीहून

अमावसोरहं ण्यतोर्निपातयाम्यवृद्धिताम् ॥
तथैकवृत्तिता तयोः स्वरश्च मे प्रसिध्यति ॥

**छन्दसि[1] निष्टर्क्यदेवहूयप्रणीयोन्नीयोच्छिष्यमर्यस्तर्याध्वर्यखन्यखान्यदेवयज्यापृच्छ्यप्रतिषीव्यब्रह्मवाद्यभाव्यस्ताव्योपचाय्यपृडानि ॥३।१।१२३॥**

निष्टर्क्य इति किं निपात्यते । निष्टर्क्ये कृतेराद्यन्तविपर्ययश्छन्दसि कृताद्यर्थः । यथा कृतेस्तर्कुः कसेः सिकता हिंसेः सिंहः ॥

अपर आह ।

**निष्टर्क्ये व्यत्ययं विद्यान्निसः षत्वं निपातनात् ।**
**ण्यदायादेश इत्येतावुपचाय्ये निपातितौ ॥१॥**

निष्टर्क्यं चिन्वीत पशुकामः ॥

**ण्यदेकस्माच्चतुर्भ्यः क्यप् चतुर्भ्यश्च यतो विधिः ।**
**ण्यदेकस्माद्यशब्दश्च द्वौ क्यपौ ण्यद्विधिश्चतुः ॥२॥**

ण्यदेकस्मात् । निष्टर्क्यः । चतुर्भ्यः क्यप् । देवहूयः प्रणीयः उन्नीयः उच्छि-

---

दिर्नित्यम् (६।१।१९७) ह्यानें आद्युदात्त होणार नाहीं.

तर मग आतां

अमा उपपदपूर्वक वस्धातूहून ण्यत्प्रत्यय करूनच दोन्ही निपातनें केलीं आहेत. फक्त त्या दोहोंपैकीं एकामध्यें अवृद्धि म्हणजे वृद्धि करूनही पुनः ह्रस्व होतो असें समजावें. असें समजलें असतां अमावस्या या शब्दाची जी तद्धितवृत्ति होते तीच अमावास्या या शब्दाचीही होते आणि दोन्ही ठिकाणीं इष्ट स्वर सिद्ध होतो.

(सू. १२३) निष्टर्क्य या शब्दामध्यें काय निपातन केलें आहे ?

निस्उपसर्गपूर्वक कृत्धातूहून ण्यत्प्रत्यय केल्यानंतर धातूच्या आदि व अन्त या दोन वर्णांचा वेदामध्यें विपर्यास होतो. असे विपर्यास कृत् वगैरे धातूंमधील आदिवर्ण बदलण्याकरितां मानावे लागतात; जसें:– कृत्धातूपासून तर्कुशब्द सिद्ध होतो, कस्धातूपासून सिकताशब्द सिद्ध होतो, हिंस्धातूपासून सिंहशब्द सिद्ध होतो.

ह्याच निपातनासंबंधानें कोणीं असें लिहिलें आहे:—

निष्टर्क्यशब्दामध्यें वर्णांचा व्यत्यय आणि निस्उपसर्गाच्या सकाराला षत्व यांचें वेदामध्यें निपातन केलें आहे; उदा०—निष्टर्क्यं चिन्वीत पशुकामः. उपचाय्य येथें ण्यत्प्रत्यय आणि आयादेश यांचें निपातन केलें आहे.

निष्टर्क्य या एका उदाहरणामध्यें ण्यत् प्रत्यय केला आहे. पुढें देवहूय, प्रणीय, उन्नीय आणि उच्छिष्य या चार उदाहरणांमध्यें देवउपपदपूर्वक ह्वाधातु, प्रउपसर्गपूर्वक नीधातु, उत्उपसर्गपूर्वक नीधातु आणि उत्उपसर्गपूर्वक शास्धातु ह्याहून क्यप्प्रत्यय केला आहे. पुढें मर्य, स्तर्या, ध्वर्य, आणि खन्य या चार ठिकाणीं मृ, स्तृ, ध्वृ, आणि खन् या चार धातूंहून यत्प्रत्यय केला आहे. पुढें खान्य या एका ठिकाणीं ण्यत्-

---

नकारेत्संज्ञक प्रत्यय केला हा व्यपवर्ग म्ह. पौर्वापर्यसंबंध सांगतां येणार नाहीं म्हणून आद्युदात्त होणार नाहीं.

१. निष्टर्क्य, देवहूय, प्रणीय, उन्नीय, उच्छिष्य, मर्य, स्तर्या, ध्वर्य, खन्य, खान्य, देवयज्या, आपृच्छ्य, प्रतिषीव्य, ब्रह्मवाद्य, भाव्य, स्ताव्य आणि उपचाय्यपृड हे सतरा शब्द वेदामध्यें निपातन केले जातात. स्तर्या आणि देवयज्या हे दोन स्त्रीलिंगीच निपातन केले आहेत.

ध्यः । चतुर्भ्यश्च यतो विधिः । मर्यः स्तर्या ध्वर्यः खन्यः । ण्यदेकस्मात् । खान्यः । यशब्दश्च । देवयज्या । द्वौ क्यपौ । आपृच्छ्यः प्रतिषीव्यः । ण्यद्विधिश्चतुः । ब्रह्मवाद्यः भाव्यः स्ताव्यः उपचाय्यपृडम् ॥ उपपूर्वाच्चिनोतेरायादेशो निपात्यते न हि ण्यतैव सिध्यति । हिरण्य इति च वक्तव्यम् । उपचेयपृडमेवान्यत्र ॥

## ॠहलोर्ण्यत् ॥३।१।१२४॥

### पाणौ सृजेर्ण्यद्विधिः ॥१॥

पाणौ सृजेर्ण्यद्विधेयः । पाणिसर्ग्या रज्जुः ॥

### समवपूर्वाच्च ॥ २ ॥

समवपूर्वाच्चेति वक्तव्यम् । समवसर्ग्यः ॥

### लपिदभिभ्यां च ॥ ३ ॥

लपिदभिभ्यां चेति वक्तव्यम् । अपलाप्यम् अवदाभ्यम् ॥

## ओरावश्यके ॥३।१।१२५॥

कथमिदं विज्ञायते । आवश्यक उपपदे । आहोस्विदावश्यके द्योत्य इति । कश्चात्र विशेषः ।

### आवश्यक उपपद इति चेद्द्योत्य उपसंख्यानम् ॥१॥

आवश्यक उपपद इति चेद्द्योत्य उपसंख्यानं कर्तव्यम् । लाव्यम् पाव्यम् ॥ अस्तु तर्हि द्योत्ये ।

---

प्रत्यय केला आहे. पुढें देवयज्या या एका ठिकाणीं देवउपपदपूर्वक यज्धातूहून यप्रत्यय केला आहे. पुढें आपृच्छ्य आणि प्रतिषीव्य या दोन ठिकाणीं आउपसर्गपूर्वक प्रच्छ्धातु आणि प्रतिउपसर्गपूर्वक सिव्धातु, यांहून क्यप्प्रत्यय केला आहे. पुढें चार ठिकाणीं ण्यत्प्रत्यय केला आहे. त्यांपैकीं ब्रह्मवाद्य, भाव्य आणि स्ताव्य येथें ब्रह्मउपपदपूर्वक वद्धातु, भूधातु आणि स्तुधातु यांहून केला आहे. उपचाय्यपृड येथें उपउपसर्गपूर्वक चिधातूहून ण्यत्प्रत्यय करून वृद्धि झाल्यानंतर आयादेश निपातनामुळेंच होतो. कारण नुसता ण्यत्प्रत्यय करून भागणार नाहीं. पृड्धातूहून कप्रत्यय (३।१।१३४) करून सिद्ध झालेला पृडशब्द पुढें असतांना, तसेंच हिरण्य अर्थ गम्यमान असतांना, असें म्हणावें. तो अर्थ गम्यमान नसेल तर उपचेयपृड असेंच रूप होतें.

(सू.१२४, वा.१) पाणिशब्द उपपद असतांना सृज्धातूहून क्यप् (३।१।११०) न करतां ण्यत्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० पाणिसर्ग्या रज्जुः, हातानें वळलेली दोरी.

(वा.२) सम् आणि अव हे दोन उपसर्ग मिळून उपपद असतांनाही सृज्धातूहून ण्यत्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०—समवसर्ग्या रज्जुः.

(वा.३) लप् आणि दभ् या धातूंहून यत्प्रत्यय (३।१।९८) न करतां ण्यत्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०-अपलाप्यम्, अवदाभ्यम्.

(सू.१२५) येथें आवश्यक शब्द उपपद असतांना किंवा आवश्यक अर्थ गम्यमान असतांना यांपैकीं कोणता अर्थ घ्यावयाचा आहे ?

या दोहोंमध्यें फरक काय बरें होतो ?

(वा.१) आवश्यक शब्द उपपद असतांना असें म्हटलें तर आवश्यक अर्थ गम्यमान असतांना ण्यत्प्रत्यय होतो असें म्हटलें पाहिजे; उदा०— लाव्यम्, पाव्यम्.

तर मग आवश्यक अर्थ गम्यमान अस-

---

१. ॠकारान्त धातु आणि हलन्त धातु यांहून ण्यत्प्रत्यय होतो व त्याला कृत्यसंज्ञा होते; उदा० धार्यम्, वाच्यम्.

१. आवश्यक हा अर्थ गम्यमान असतांना उकारान्त धातूहून ण्यत्प्रत्यय होतो; उदा० लाव्यम्, अवश्य छेदन करण्यास योग्य असा अर्थ आहे. अवश्यलाव्यम् असा अवश्यशब्दाचाही प्रयोग होतो.

**द्योत्य इति चेत्स्वरसमासानुपपत्तिः॥२**

द्योत्य इति चेत्स्वरसमासानुपपत्तिः। अवश्यलाव्यम् अवश्यपाव्यम्॥ नैष दोषः। मयूरव्यंसकादित्वात्समासो विस्पष्टादिवत्स्वरो भविष्यति॥

**ओरावश्यके ण्यतः स्तौतेः क्यप्पूर्वविप्रतिषिद्धम्॥३॥**

ओरावश्यके ण्यतः स्तौतेः क्यब्भवति पूर्वविप्रतिषेधेन। ओरावश्यके ण्यद्भवतीत्यस्यावकाशः। अवश्यलाव्यम् अवश्यपाव्यम्। क्यपोऽवकाशः। स्तुत्यः। इहोभयं प्राप्नोति। अवश्यस्तुत्यः। क्यब्भवति पूर्वविप्रतिषेधेन॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। उक्तं तत्र क्यबिति वर्तमाने पुनः क्यब्ग्रहणस्य प्रयोजनं क्यबेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति॥

**[आसुयुवपिरपिलपित्रपिचमश्च॥३।१।१२६॥]**

**आनाय्योऽनित्ये[१]॥३।१।१२७॥**

दक्षिणाग्नाविति वक्तव्यम्। आनेयोऽन्यः॥

---

तांना असाच अर्थ असूं दे.

(वा.२) आवश्यक अर्थ गम्यमान असतांना असें म्हटलें तर अवश्यलाव्यम्, अवश्यपाव्यम्, येथें अवश्य या शब्दाला उपपदसंज्ञा नसल्यामुळें स्वर (६।२।१३९) आणि समास (२।२।१९) होणार नाहींत.

हा दोष येत नाहीं. कारण 'मयूरव्यंसकादयश्च' (२।१।७२) यानें समास होईल आणि त्या गणामध्येंच निपातन केल्यामुळें उत्तरपदाला प्रकृतिस्वर होईल; जसें– विस्पष्टकटुकशब्दामध्यें मयूरव्यंसकादयश्च यानेंच समास होऊन पूर्वपदप्रकृतिस्वर होतो तसा येथें त्यानेंच समास करून उत्तरपदप्रकृतिस्वर होईल.

(वा.३) 'ओरावश्यके' यानें सांगितलेल्या ण्यत्प्रत्ययापेक्षां स्तुधातूहून सांगितलेला क्यप्प्रत्यय (३।१।१०९) पूर्वविप्रतिषेधानें होतो. ओरावश्यके या प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या ण्यत्प्रत्ययाला अवश्यलाव्यम्, अवश्यपाव्यम्, येथें अवकाश आहे. क्यप्प्रत्ययाला स्तुत्यः येथें अवकाश आहे आणि अवश्यस्तुत्यः येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें पूर्वविप्रतिषेधानें क्यप्प्रत्यय होतो.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण तेथें मागून क्यब्ग्रहणाची अनुवृत्ति येत असताना पुन्हा क्यब्ग्रहण जें केलें आहे त्याचा उपयोग तेथें असा सांगितला आहे की त्या धातूहून क्यप्प्रत्ययच झाला पाहिजे. काहीं ठिकाणीं दुसरा प्रत्यय प्राप्त झाला तरी तो न झाला पाहिजे.

(सू.१२७) दक्षिणाग्नि हा अर्थ असतांनाच हें निपातन समजावें. दुसरीकडून आणिला जाणारा इतर पदार्थ असेल तर तो जरी कायमचा नसला तरी तेथें आनेय असेंच होतें.

---

१. आउपसर्गपूर्वक सुधातु, यु, वप्, रप्, लप्, त्रप् आणि चम् या धातूंहून ण्यत्प्रत्यय होतो; उदा०– आसाव्यम्, याव्यम्, वगैरे.

१. आनाय्य असें निपातन केलें जातें. आउपसर्गपूर्वक नीधातूहून कर्मणि ण्यत्प्रत्यय आणि आदिवृद्धि (७।२।११५) झाल्यानंतर आयादेश निपातनामुळें होतो. परंतु तो जो आणिला जाणारा पदार्थ तो कायमचा नसला पाहिजे; उदा०– आनाय्यो दक्षिणाग्निः; तो गार्हपत्य अग्नीतून आणिला जातो आणि कायमचा नसतो; कारण तो नेहमीं प्रज्वलित नसतो.

**आनाय्योऽनित्य इति चेद्दक्षिणाग्नौ कृतं भवेत्।**
**एकयोनौ तु तं विद्यादानेयो ह्यन्यथा भवेत्॥**

**[प्रणाय्योऽसंमतौ ॥३।१।१२८॥]**

## पाय्यसांनाय्यनिकाय्यधाय्या मानहविर्निवाससामिधेनीषु ॥३।१।१२९॥

**पाय्यनिकाय्ययोः किं निपात्यते।**

**पाय्यनिकाय्ययोरादिपत्वकत्वनिपातनम् ॥१॥**

**पाय्यनिकाय्ययोरादिपत्वमादिकत्वं च निपात्यते। मेयम् निचेयमित्येवान्यत्र॥**

## क्रतौ कुण्डपाय्यसंचाय्यौ ॥३।१।१३०॥

**कुण्डपाय्ये यद्विधिः ॥१॥**

**कुण्डपाय्ये यद्विधेयः। कुण्डपाय्यः क्रतुः॥**

---

आनाय्योऽनित्ये एवढेंच म्हटलें तर घट, पट, वगैरे पदार्थ एखादे वेळीं आणिला असतां तेथेंही आनाय्यशब्दाचा प्रयोग होऊं लागेल. परंतु त्या शब्दाची दक्षिणाग्नि या अर्थीच रूढि असल्यामुळें इतर अर्थी प्रयोग होत नाहीं. त्यांत सुद्धां जो दक्षिणाग्नि आहवनीयाशीं एकयोनि आहे तोच घ्यावयाचा आहे. तसा जो दक्षिणाग्नि नाहीं त्या अर्थीही आनेय असेंच होतें.

(सू.१२९) येथें पाय्य आणि निकाय्य या शब्दांमध्यें काय निपातन केलें आहे ?

पाय्यशब्दामध्यें माधातूचा आदिवर्ण जो मकार त्याला पकार झाला आहे. तसेंच निकाय्यशब्दामध्यें निउपसर्गापुढील चिधातूच्या आदि चकाराला ककार झाला आहे. मान अर्थ नसेल तर पाय्य असें न होतां मेय असेंच होतें. तसेंच निवास अर्थ नसेल तर निकाय्य असें न होतां निचेय असेंच होतें.

(सू.१३०, वा.१) कुण्डपाय्यशब्दामध्यें यत्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०– कुण्ड-

---

२. आहवनीय अग्नीची जी योनि म्ह. मूलकारण गार्हपत्याग्नि त्यांतून आणलेला जो दक्षिणाग्नि तो आहवनीय अग्नीशी एकयोनि होतो. दक्षिणाग्नि हा वैश्यकुलांतूनही आणिला जातो. अशीं ज्या दक्षिणाग्नीचीं मूलकारणें इतर असतील त्या दक्षिणाग्नि या अर्थीं आनेय असेंच होतें.

१. प्रीतीला अयोग्य या अर्थी किंवा विरक्त या अर्थी प्रणाय्य असें निपातन केलें जातें. प्रउपसर्गपूर्वक नीधातूहून ण्यत्प्रत्यय आणि वृद्धि केल्यानंतर आयादेश निपातनामुळें केला जातो; उदा०– प्रणाय्यः चोरः; येथें चोर हा अप्रीतिकर आहे असा अर्थ आहे. प्रणाय्यः शिष्यः येथें विरक्त शिष्य असा अर्थ आहे.

१. पाय्य, सांनाय्य, निकाय्य आणि धाय्या ह्या चार शब्दांचे निपातन केलें आहे. त्यांचे अर्थ क्रमानें मान, हवि, निवास आणि समिधा ठेवतांना म्हटली जाणारी ऋचा हे असले पाहिजेत. पाय्य येथें माधातूहून करण या अर्थी ण्यत् आणि धातूच्या मकाराला पकार निपातनामुळें झाले आहेत. नतर युगागम (७।३।३३) झाला आहे. सांनाय्य येथें सम् उपसर्गपूर्वक नीधातूहून कर्मणि ण्यत्प्रत्यय, वृद्धि झाल्यानंतर आयादेश आणि सम् या उपसर्गांतील अकाराला दीर्घ हे निपातनामुळें झाले आहेत. निकाय्य येथें निउपसर्गक चिधातूहून अधिकरण या अर्थी ण्यत्प्रत्यय, वृद्धि झाल्यानंतर आयादेश आणि धातूच्या चकाराला ककार निपातनामुळें झाले आहेत. धाय्या येथें धाधातूहून कर्मणि ण्यत् निपातनामुळें होऊन युगागम झाला आहे.

१. कुण्डपाय्य आणि संचाय्य ह्या दोन शब्दांचें निपातन केलें आहे, क्रतु अर्थ असतांना. तृतीयान्त कुण्डशब्द उपपद असतांना पाधातूहून अधिकरण या अर्थी यत्प्रत्यय आणि निपातनामुळें युगागम झाला आहे. यत्प्रत्ययामुळें आद्युदात्त (६।१।२१३) स्वर होतो. संचाय्य येथें सम्उपसर्गपूर्वक चिधातूहून अधिकरण या अर्थी ण्यत्प्रत्यय आणि वृद्धि झाल्यानंतर आयादेश निपातनामुळें होतो.

**अग्नौ परिचाय्योपचाय्यसमूह्याः ॥३।१।१३१॥**

**समूह्य इत्यनर्थकं वचनं सामान्येन कृतत्वात् ॥१॥**

समूह्य इति वचनमनर्थकम्। किं कारणम्। सामान्येन कृतत्वात्। सामान्येनैवात्र ण्यद्भविष्यति। ऋहलोर्ण्यत् [३. १.१२४] इति॥ वह्यर्थं तर्हि निपातनं कर्तव्यम्। वहेर्ण्यद्यथा स्यात्।

**वह्यर्थमिति चेदूहेस्तदर्थत्वात्सिद्धम् ॥२॥**

ऊहिरपि वह्यर्थे वर्तते। कथं पुनरन्यो नामान्यस्यार्थे वर्तते। कथमूहिर्वह्यर्थे वर्तते। बह्वर्था अपि धातवो भवन्तीति॥ अस्ति पुनः क्वचिदन्यत्राप्यूहिर्वह्यर्थे वर्तते। अस्तीत्याह।

**ऊहिविग्रहाच्च ब्राह्मणे सिद्धम् ॥३॥**

ऊहिविग्रहाच्च ब्राह्मणे सिद्धमेतत्। समूह्यं चिन्वीत पशुकामः पशवो वै पुरीषं पशूनेवास्मै तत्समूहति॥

**चित्याग्निचित्ये च ॥३।१।१३२॥**

**अग्निचित्या भावेऽन्तोदात्तः ॥१॥**

अग्निचित्येति भावेऽन्तोदात्तो भवति। अग्निचयनमेवाग्निचित्या॥

**ण्वुल्तृचौ ॥३।१।१३३॥**

किमर्थश्चकारः। स्वरार्थः। चितोऽन्त

---

पाय्यः क्रतुः.

(सू.१३१, वा.१) येथें समूह्य हें निपातन निष्फल आहे. कारण येथें 'ऋहलोर्ण्यत्' (३। १।१२४) या सामान्य सूत्रानेंच ऊह्‌धातूहून ण्यत्प्रत्यय होत आहे.

तर मग वह्‌धातूहून ण्यत्प्रत्यय होऊन समूह्य हें रूप होण्याकरितां हें निपातन केलें पाहिजे.

(वा.२) वह्‌धातूपासून समूह्यशब्द सिद्ध होण्याकरितां निपातन पाहिजे असें असेल तर तेंही बरोबर नाहीं. कारण वह्‌धातूचा अर्थ ऊह्‌धातूला घेतला म्हणजे काम भागेल.

पण एका धातूचा अर्थ दुसऱ्या धातूला कसा बरें घेतां येईल? तेव्हां येथें ऊह्‌धातु वह्‌धातूच्या अर्थी कसा बरें घेतां येईल?

धातूचे अर्थ अनेक असतात म्हणून घेतां येईल.

पण असा कोठें ऊह्‌धातु वह्‌धातूच्या अर्थी दृष्ट आहे काय?

होय. आहे असें आम्ही म्हणतों.

(वा ३) ब्राह्मणग्रंथामध्यें समूह्यशब्दाचें निर्वचन ऊह्‌धातूनेंच केलें आहे; जसें:— समूह्यं चिन्वीत पशुकामः, पशवो वै पुरुषः, पशूनेवास्मै तत्समूहति.

(सू १३२, वा.१) अग्निचित्याशब्दामध्यें भाव या अर्थी प्रत्यय होतो. तो शब्द अन्तोदात्त आहे. अग्नीच्या चयनालाच अग्निचित्या म्हणतात.

(सू.१३३) येथें तृच्प्रत्ययाला चकार कशाकरितां लाविला आहे?

चितः (६।१।१६३) यानें सांगितलेला अन्तोदात्त स्वर तृच्प्रत्ययाला झाला पाहिजे.

---

१. परिचाय्य, उपचाय्य आणि समूह्य ह्या तिघांचें निपातन केलें आहे, अग्निस्थापन करतांना विशेष आकाराचे विटा वगैरेंनीं रचलेलें स्थल हा अर्थ गम्यमान असतांना. समूह्य येथें सम्‌उपसर्गपूर्वक वह्‌धातूहून ण्यत् हा प्रत्यय केला असतां धातूला संप्रसारण आणि दीर्घ निपातनामुळें होतात.

१. चित्य आणि अग्निचित्या ह्या दोन शब्दांचें निपातन केलें आहे. चित्यशब्दामध्यें चिधातूहून कर्मणि क्यप्प्रत्यय केला आहे. अग्निचित्याशब्दामध्यें अग्नि उपपद असतांना चिधातूहून भाव या अर्थी यप्रत्यय आणि तुगागम निपातनामुळें होतात.

१. धातूहून ण्वल् आणि तृच् हे प्रत्यय कर्ता या अर्थी होतात; उदा०— पाचकः, पक्ता.

उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात्। नैतदस्ति प्रयोजनम्। एकाजयं तत्र नार्थः स्वरार्थेन चकारेणानुबन्धेन। प्रत्ययस्वरेणैव सिद्धम्॥ विशेषणार्थस्तर्हि। क्व विशेषणार्थेनार्थः। अप्तृन्तृजिति। तृ इत्युच्यमाने मातरौ मातरः पितरौ पितरः अत्रापि प्रसज्येत। स्वसृनप्तृग्रहणं नियमार्थं भविष्यति। एतयोरेव योनिसंबन्धयोर्नान्येषां योनिसंबन्धानामिति॥ सामान्यग्रहणाविघातार्थस्तर्हि। क्व सामान्यग्रहणाविघातार्थेनार्थः। अत्रैव। यदेतत्तृन्तृचोर्ग्रहणमेतत्तृ इति वक्ष्यामि। यदि तृ इत्युच्यते मातरौ मातरः पितरौ पितरः अत्रापि प्रसज्येत। स्वसृनप्तृग्रहणं नियमार्थं भविष्यति। एतयोरेव योनिसंबन्धयोर्नान्येषां योनिसंबन्धानामिति॥

## ण्वुलि सकर्मकग्रहणम्॥१॥

ण्वुलि सकर्मकग्रहणं कर्तव्यम्। इह मा भूत्। आसिता शयितेति॥

## न वा धातुमात्राद्दर्शनाण्ण्वुलः॥२॥

न वा वक्तव्यम्। किं कारणम्। धातुमात्राण्ण्वुल्दृश्यते। इमेऽस्यासकाः। इमे-

---

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण हा तृच्प्रत्यय एकाच् आहे. तेव्हा येथें अन्तोदात्त होण्याकरितां चकार लावावयास नको. प्रत्ययस्वरानें (३।१।३) आद्युदात्त झाला तरी त्यालाच होणार आहे.

तर मग चकारेत्संज्ञक असें विशेषण लागण्याकरिता चकार जोडला आहे.

असा विशेषण लागण्याचा उपयोग कोठें बरें होतो?

'अप्तृन्तृच्०' (६।४।११) येथें होतो. जर तेथें तृच् असें न उच्चारतां तृ असेंच उच्चारलें तर मातरौ मातरः, पितरौ पितरः, येथेंही दीर्घ होऊं लागेल.

पण त्या सूत्रामध्यें जे स्वसृ[2], नप्तृ, हे शब्द उच्चारले आहेत ते नियमार्थ समजले जातील. तो नियम असा की योनिसंबंधवाचक शब्दांना जर दीर्घ होईल तर स्वसृ, नप्तृ, याच शब्दांना होतो; योनिसंबंधवाचक इतर शब्दांना, म्ह. मातृ, पितृ, यांना होत नाहीं.

तर मग तृशब्दानें तृन्, तृच्, या दोघांचेंही ग्रहण व्हावें, त्यात बिघाड होऊं नये, याकरितां चकार लावला आहे.

असें तृशब्दानें दोघांचें ग्रहण कोठें बरें होतें?

'अप्तृन्तृच्'० येथेंच. येथें तृन्, तृच्, या दोन शब्दांऐवजीं तृ असें म्हणता येईल.

पण तृ असें उच्चारलें तर मातरौ मातरः, पितरौ पितरः, येथेंही दीर्घ होऊं लागेल.

त्या सूत्रामध्यें जे स्वसृ, नप्तृ, हे शब्द उच्चारले आहेत ते नियमार्थ होतील. तो नियम असा की योनिसंबंधवाचक शब्दांना जर दीर्घ होईल तर स्वसृ, नप्तृ, याच शब्दांना होतो. योनिसंबंधवाचक इतर शब्दाना होत नाहीं.

तर मग 'तुश्छन्दसि' (५।३।५९), 'तुरिष्ठेमेयःसु' (६।४।१५४) या सूत्रामध्यें तृशब्दानें तृन् आणि तृच् या दोघांचें ग्रहण झालें पाहिजे, हा चकार लावण्याचा उपयोग होय.

(वा.१) ह्या प्रकृत सूत्रानें सांगितलेला ण्वुल्प्रत्यय सकर्मक धातूहूनच होतो असें म्हणावें. कारण आसिता, शयिता, येथें आस्, शी, या धातूंहून फक्त तृच्च झाला पाहिजे, ण्वुल् न झाला पाहिजे.

(वा.२) तसें म्हणावयास नको. कारण सर्व प्रकारच्या धातूंहून ण्वुल्प्रत्यय झालेला दृष्टीस पडतो; उदा०—इमे अस्य आसकाः, इमे अस्य शायकाः, उत्थिता आसका वैश्रवणस्य.

---

२. येथें जरी स्वसृ, नप्तृ, असे दोन शब्द उच्चारले आहेत तरी त्यांतील नप्तृ हा एकच शब्द नियमार्थ आहे असें समजावें. कारण तेथें तृप्रत्यय (उणा० २।९५) आहे. स्वसृशब्दामध्यें ऋप्रत्यय

ऽस्य शायकाः। उत्थिता आसका वैश्रवणस्येति ॥

## तृजादिषु वर्तमानकालोपादानमध्यायकवेदाध्यायाद्यर्थम् ॥३॥

तृजादिषु वर्तमानकालोपादानं कर्तव्यम्। किं कारणम्। अध्यायकवेदाध्यायाद्यर्थम्। अध्यायकः वेदाध्यायः। अधीतवत्यध्येष्यमाणे वा मा भूदिति ॥

## न वा कालमात्रे दर्शनादन्येषाम् ॥४

न वा वक्तव्यम्। किं कारणम्। कालमात्रे दर्शनादन्येषाम्। कालमात्रे ह्यन्येऽपि प्रत्यया दृश्यन्ते। चर्चापारः शमनीपारः॥

## नन्दिग्रहिपचादिभ्यो ल्युणिन्यचः ॥३।१।१३४॥

## अजपि सर्वधातुभ्यः ॥१॥

अजपि सर्वधातुभ्यो वक्तव्यः। इहापि यथा स्यात्। भवः शर्वः॥ न तर्हीदानीमिदं पचाद्यनुक्रमणं कर्तव्यम्। कर्तव्यं च। किं प्रयोजनम्।

## पचाद्यनुक्रमणमनुबन्धासञ्जनार्थमपवादबाधनार्थं च ॥२॥

अनुबन्धासञ्जनार्थं तावत्। नदट् नदी। चोरट् चोरी। अपवादबाधनार्थम्। जारभरा श्वपचेति ॥

---

(वा.३) तृच् वगैरे प्रत्यय हे वर्तमानकालीं होतात असं म्हणावें.

काय कारण ?

कारण असें की अध्यायक, वेदाध्याय, या शब्दांपासून वर्तमानकालीं वेदाध्ययन करणारा असा बोध झाला पाहिजे. भूतकालीं वेदाध्ययन केलेला किंवा भविष्यकालीं वेदाध्ययन करणारा या अर्थी अध्यायक, वेदाध्याय, या शब्दाचे प्रयोग होऊं नयेत.

(वा.४) तसें म्हणावयास नको.

काय कारण ?

कारण असें की इतर प्रत्यय कालसामान्य या अर्थी दृष्टीस पडतात; उदा०—चर्चापारः, शयनीपारः.

(सू.१३४, वा.१) ण्वुल्, तृच्, या प्रत्ययांप्रमाणें येथील अच्प्रत्यय देखील सर्व धातूंहून होतो असें म्हणावें. कारण भवः, सवः, येथेंही अच्प्रत्यय झाला पाहिजे.

तर मग आता गणपाठामध्यें पचादिगण घालावयास नको ना ?

तेथें तो घातला पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

(वा.२) काहीं शब्दांना अनुबंध लावण्याकरिता आणि काहीं शब्दामध्यें अपवादाचा बाध करून अच्प्रत्ययच व्हावा याकरितां पचादिगणाचा पाठ केला पाहिजे. त्यापैकीं अनुबंध लावल्याचें उदाहरणः—नदट्, चोरट्. येथें नद, चोर, या अच्प्रत्ययान्त शब्दांना टकारानुबंध लावल्यामुळें त्याहून स्त्रीलिंगी ङीप्प्रत्यय (४।१।१५) होऊन नदी, चोरी, असें होतें. अपवादाच्या बाधाचें उदाहरणः—जारभरा, श्वपचा.

---

(उणा० २।६) आहे; तृ प्रत्यय नाही.

३. वेदमधीते वेदाध्यायः येथें वेद हें कर्म उपपद असतांना अधिउपसर्गपूर्वक इङ्धातूहून अण्प्रत्यय (३।२।१) झाला आहे.

४. येथें कर्मण्यण् (३।२।१) यानें अण्प्रत्यय झाला आहे. येथें वर्तमानकालाचाच बोध होतो असें नाहीं.

१. नन्द्यादिक धातूहून कर्तरि ल्युप्रत्यय होतो, तसाच ग्रह्यादिक धातूहून णिनि प्रत्यय होतो, आणि पचादिक धातूहून अच्प्रत्यय होतो; उदा०—नन्दनः, ग्राही, पचः.

२. या शब्दांचा गणामध्यें पाठ केला आहे. त्याच्या जोरावर अपवाद अशा अण्प्रत्ययाचा (३।२।१) बाध करून अच्प्रत्यय होतो. म्हणून स्त्रीलिंगी ङीप्प्रत्यय (४।१।१५) झाला नाहीं.

**इगुपधज्ञाप्रीकिरः कः ॥३।१।१३५॥**

**इगुपधेभ्य उपसर्गे कविधिर्मेषाद्यर्थः ॥ १ ॥**

इगुपधेभ्य उपसर्गे को विधेयः । किं प्रयोजनम् । मेषाद्यर्थः । मेषः देवः सेवः ॥

**न वा बुधादीनां दर्शनादनुपसर्गेऽपि ॥ २ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । बुधादीनामनुपसर्गेऽपि को दृश्यते । बुधः भिदः युधः सिव इति ॥ कथं मेषः देवः सेव इति । पचादिषु पाठः करिष्यते ॥

**[आतश्चोपसर्गे ॥ ३ । १ ।१३६ ॥]**

**पाघ्राध्माधेट्दृशः शः ॥३।१।१३७॥**

**जिघ्रः संज्ञायां प्रतिषेधः ॥१॥**

जिघ्रः संज्ञायां प्रतिषेधो वक्तव्यः । व्याजिघ्रतीति व्याघ्रः ॥ इह केचिच्छस्यैव प्रतिषेधमाहुः केचिज्जिघ्रभावस्य । किं पुनरत्र न्याय्यम् । शस्यैव प्रतिषेधो न्याय्यः । जिघ्रभावे हि प्रतिषिद्धे केन श आकारलोपः स्यात् ॥

**अनुपसर्गाल्लिम्पविन्दधारिपारिवेद्युदेजिचेतिसातिसाहिभ्यश्च ॥३।१।१३८॥**

**अनुपसर्गान्नौ लिम्पेः ॥१॥**

अनुपसर्गान्नौ लिम्पेरिति वक्तव्यम् । निलिम्पा नाम देवाः ॥

---

(सू.१३५,वा.१) इक् वर्ण उपधेला असलेल्या धातूंहून हा जो कप्रत्यय सांगितला आहे तो उपसर्ग असतांनाच होतो असें म्हणावें. कारण मेष, देव, सेव, या उदाहरणांमध्यें कप्रत्यय न होतां अच्प्रत्यय झाला पाहिजे.

(वा.२) तसें म्हणावयास नको.

काय कारण ?

कारण असें की बुध वगैरे शब्दांमध्यें उपसर्ग नसतांही कप्रत्यय झालेला दृष्टीस पडतो; उदा०– बुधः, भिदः, युधः, सिवः.

तर मग मेष, देव, सेव, हे शब्द कसे साधावेत ?

त्या शब्दांचा पचादिगणामध्यें पाठ करावा (३।१।१३४, वा.२)

(सू.१३७, वा.१) हा शप्रत्यय संज्ञाशब्दामध्यें होत नाहीं असा प्रतिषेध करावा; उदा०– व्याजिघ्रतीति व्याघ्रः. ह्या वार्तिकानें शप्रत्ययाचाच प्रतिषेध होतो असें कांहीं लोक म्हणतात, आणि कांहीं लोक शप्रत्ययाचा प्रतिषेध न करतां फक्त जिघ्रआदेशाचाच (७।३।७८) प्रतिषेध होतो असें म्हणतात.

मग या दोन मतांमध्यें न्याय्य मत कोणतें ?

शप्रत्ययाचाच प्रतिषेध करणें न्याय्य होय. कारण जिघ्रआदेशाचाच फक्त प्रतिषेध केला तर शप्रत्यय होईल आणि तो झाला असतां व्याघ्रः येथें आकाराचा लोप कशानें बरें करतां येईल ?

(सू.१३८, वा.१) या सूत्रामध्यें उपसर्ग नसतांना असें जरी म्हटलें आहे तरी निउपसर्गपूर्वक लिम्पधातूहून शप्रत्यय होतो असें

---

१. इक् वर्ण उपधेला असलेले धातु आणि ज्ञा, प्री व कॄ हे धातु यांहून कर्तरि कप्रत्यय होतो; उदा० बुधः, ज्ञः, प्रियः, किरः.

१. उपसर्ग उपपद असतांना आकारान्त धातूहून कप्रत्यय होतो; उदा०– प्रस्थः, सुग्लः.

१. पा, घ्रा, ध्मा, धेट् आणि दृश् या धातूंहून शप्रत्यय होतो; उदा०– पिबः, जिघ्रः.

२. येथें पूर्वसूत्रानें कप्रत्यय होऊन आकाराचा लोप (६।४।६४) झाला आहे.

१. लिम्प् व विन्द् या धातूंहून आणि धारि, पारि, वेदि, उत्उपसर्गपूर्वक एजि, चेति, साति व साहि या सात णिच्प्रत्ययान्त धातूंहून कर्तरि शप्रत्यय होतो, उपसर्ग नसतांना; उदा०– लिम्पः, विन्दः, धारयः, पारयः.

**गवि च विन्देः संज्ञायाम् ॥२॥**

गवि चोपपदे विन्देः संज्ञायामुपसंख्यानं कर्तव्यम् । गोविन्द इति ॥ अत्यल्पमिदमुच्यते गवीति । गवादिष्विति वक्तव्यम् । गोविन्दः अरविन्दः ॥

**[ददातिदधात्योर्विभाषा ॥ ३ । १ । १३९ ॥]**

**ज्वलितिकसन्तेभ्यो णः ॥३।१।१४०॥**

**तनोतेर्ण उपसंख्यानम् ॥१॥**

तनोतेर्ण उपसंख्यानं कर्तव्यम् । अवतनोतीत्यवतानः ।

**[श्याद्व्यधास्रुसंस्रतीणवसावहृलिहश्लिषश्वसश्च ॥ ३ । १ । १४१ ॥ दुन्योरनुपसर्गे ॥ ३ । १ । १४२ ॥ विभाषा ग्रहः ॥ ३ । १ । १४३ ॥ गेहे कः ॥ ३ । १ । १४४ ॥]**

**शिल्पिनि ष्वुन् ॥३।१।१४५॥**

नृतिखनिरञ्जिभ्य इति वक्तव्यम् । इह मा भूत् । ह्रायक इति ॥

**[गस्थकन् ॥ ३ । १ । १४६ ॥ ण्युट् च ॥ ३ । १ । १४७ ॥ हश्च व्रीहिकालयोः ॥३।१।१४८॥]**

**प्रुसृल्वः समभिहारे वुन्**

---

म्हणावें; उदा०— निलिम्पा नाम देवाः.

(वा.२) संज्ञाशब्दामध्यें गोशब्द उपपद असतांना विन्द्धातूहून शप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० गोविन्दः येथें गवि असें जें वार्तिककारांनीं म्हटलें आहे तें फार थोडें आहे. तेथें गवादिषु असें म्हणावें. म्हणजे कांहीं इतर शब्द उपपद असतांनाही शप्रत्यय होईल. उदा० – गोविन्दः, अरविन्दः.

(सू.१४०, वा.१) तन्धातूहून णप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० अवतनोतीत्यवतानः.

(सू.१४५) हा ष्वुन्प्रत्यय नत्, खन् आणि रञ्ज् या धातूंहूनच होतो असें म्हणावें. कारण दायकः वगैरे इतर ठिकाणीं न झाला पाहिजे.

(सू.१४९, वा.१) प्रु, सृ आणि लू या

---

१. जुहोत्यादि गणांतील दा व धा या धातूंहून विकल्पानें शप्रत्यय होतो, उपसर्ग नसतांना; उदा०- ददः दायः, दधः धायः. शप्रत्यय होत नाहीं त्यावेळीं पुढील (३।१।१४१) सूत्रानें णप्रत्यय होतो.

१. ज्वल्धातूपासून कस्धातूपर्यंत जे धातु त्यांहून विकल्पानें णप्रत्यय होतो, उपसर्ग नसतांना. णप्रत्यय होत नाहीं तेव्हां अच्प्रत्यय (३।१।१३४) होतो; उदा०— ज्वालः ज्वलः.

१. श्यैधातु, आकारान्त धातु, व्यध्धातु, आउपसर्गपूर्वक स्रुधातु, सम्उपसर्गपूर्वक स्रुधातु, अतिउपसर्गपूर्वक इण्धातु, अवउपसर्गपूर्वक साधातु, अवउपसर्गपूर्वक हृधातु, लिह्धातु, श्लिष्धातु आणि श्वस्धातु यांहून णप्रत्यय होतो; उदा०— श्यायः, दायः, अवश्यायः.

१. उपसर्ग नसतांना दु आणि नी या धातूंहून णप्रत्यय होतो; उदा० – दुनोतीति दावः, नयतीति नायः.

१. ग्रह्धातूहून विकल्पानें णप्रत्यय होतो. गृह्णातीति ग्राहः, ज्योति या अर्थीं ग्रहः असेंच होतें.

१. गेह कर्ता असेल तर त्या कर्ता या अर्थीं ग्रह्धातूहून कप्रत्यय होतो; उदा०– गृह्णातीति गृहम्, वेश्म.

१. धातूहून कर्ता या अर्थीं ष्वुन्प्रत्यय होतो, पण तो कर्ता शिल्पी असला पाहिजे; उदा० – नर्तकः, नर्तकी.

१. गाधातूहून कर्ता या अर्थीं थकन्प्रत्यय होतो, पण तो कर्ता शिल्पी असला पाहिजे; उदा० गाथकः.

१. गाधातूहून कर्ता या अर्थीं ण्युट्प्रत्यय होतो, पण तो कर्ता शिल्पी असला पाहिजे. उदा०- गायनः.

१. हाधातूहून कर्ता या अर्थीं ण्युट्प्रत्यय होतो, पण तो कर्ता व्रीहि किंवा काल असला पाहिजे; उदा०– जहाति उदकमिति हायनो व्रीहिः, जहाति भावानिति हायनः संवत्सरः. येथें हा या शब्दानें हाक् आणि हाङ् या दोन्ही धातूंचें ग्रहण होतें.

१. प्रु, सृ आणि लू या धातूहून कर्ता या अर्थीं वुन्प्रत्यय होतो, पण तो कर्ता साधुकारी असला

॥३।१।१४९॥

## प्रुसृल्वः साधुकारिणि वुन्विधानम् ॥१॥

प्रुसृल्वः साधुकारिणि वुन्विधेयः। सकृदपि यः सुष्ठु करोति तत्र यथा स्याद्बहुशोऽपि यो दुष्ठु करोति तत्र मा भूदिति ॥

[आशिषि च ॥ ३ । १ । १५० ।]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य प्रथमे पादे षष्ठमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

धातूंहून जो हा वुन्प्रत्यय सांगितला आहे तो साधुकारी कर्ता असेल तरच होतो असें म्हणावें. जो एखादी तरी चांगली गोष्ट करतो तसला कर्ता असतांनाच हा वुन्प्रत्यय झाला पाहिजे. जो भलत्या गोष्टी करतो त्यानें त्या फार वेळां केल्या तरी त्या कर्ता या अर्थी वुन्प्रत्यय न झाला पाहिजे.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील सहावें आह्निक समाप्त झालें आणि पादही समाप्त झाला.

---

पाहिजे; उदा०—प्रवकः, सरकः, लवकः.

१. प्रार्थना हा अर्थ गम्यमान असतांना धातूहून कर्ता या अर्थी वुन्प्रत्यय होतो; उदा०—जीवतात् इति जीवकः, नन्दतात् इति नन्दकः.

## कर्मण्यण् ॥ ३ । २ । १ ॥

कर्मणि निर्वर्त्यमानविक्रियमाण इति वक्तव्यम् । इह मा भूत् । आदित्यं पश्यति । हिमवन्तं शृणोति । ग्रामं गच्छतीति ॥

### कर्मणि निर्वर्त्यमानविक्रियमाणे चेद्वेदाध्यायादीनामुपसंख्यानम् ॥१॥

कर्मणि निर्वर्त्यमानविक्रियमाण इति चेद्वेदाध्यायादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । वेदाध्यायः चर्चापारः शमनीपारः ॥

### यत्र च नियुक्तः ॥ २ ॥

यत्र च नियुक्तस्तत्र चोपसंख्यानं कर्तव्यम् । छत्त्रधारः द्वारपालः ॥

### हृग्रहिनीवहिभ्यश्च ॥३॥

हृग्रहिनीवहिभ्यश्चेति वक्तव्यम् । हृ । भारहारः । ग्रहि । कमण्डलुग्राहः । नी । उष्ट्रप्रणायः । वहि । भारवाहः ॥

### अपरिगणनं वा ॥ ४ ॥

न वार्थः परिगणनेन । कस्मान्न भवति आदित्यं पश्यति हिमवन्तं शृणोति ग्रामं गच्छतीति ।

### अनभिधानात् ॥ ५ ॥

अनभिधानादेव न भविष्यति ॥

### अकारादनुपपदात्कर्मोपपदो विप्रतिषेधेन ॥ ६ ॥

अकारादनुपपदात्कर्मोपपदो भवति विप्रतिषेधेन ॥ अनुपपदस्यावकाशः । पचतीति पचः । कर्मोपपदस्यावकाशः ।

---

(सू.१) निर्वर्त्य किंवा विकार्य कर्म असेलें तरच हा अण्प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण आदित्यं पश्यति, हिमवन्तं शृणोति, ग्रामं गच्छति, येथें अण्प्रत्यय न झाला पाहिजे.

(वा.१) निर्वर्त्य किंवा विकार्य कर्म असलें पाहिजे असें असेल तर वेदाध्याय वगैरे शब्दांमध्यें अण्प्रत्यय होतो असें कांहीं शब्दांचें परिगणन केलें पाहिजे; जसें- वेदाध्यायः, चर्चापारः, शयनीपारः.

(वा.२) ज्याची ज्या कामीं योजना केली आहे तो अर्थ गम्यमान असतांना अण्प्रत्यय होतो असें म्हणावें; जसें:–छत्त्रधारः, द्वारपालः.[3]

(वा.३) हृ, ग्रह्, नी आणि वह् या धातूंहून कर्म उपपद असतांना अण्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०– भारहारः, कमण्डलुग्राहः, उष्ट्रप्रणायः, भारवाहः.

(वा.४) अथवा अमुक ठिकाणींच हा अण्प्रत्यय होतो असें कांहींच म्हणूं नये.

पण तसें कांहीं न म्हणतां साधारण अण्प्रत्यय सांगितला तर आदित्यं पश्यति, हिमवन्तं शृणोति, ग्रामं गच्छति, येथें अण्प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

(वा.५) तेथें अण्प्रत्यय केलेले प्रयोग दृष्टीस पडत नाहींत म्हणून तेथें अण्प्रत्यय होत नाहीं.

(वा.६) उपपद निमित्त न धरतां सांगितलेला जो अकारप्रत्यय[4] त्यापेक्षां कर्म उपपद असतांना सांगितलेला प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. उपपद निमित्त न धरतां सांगितलेल्या

---

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना धातूहून कर्ता या अर्थी अण्प्रत्यय होतो; उदा०– कुम्भं करोतीति कुम्भकारः.

२. ओदनं पचति हें निर्वर्त्य कर्म होय. कारण पचनक्रियेनेच तो ओदन तयार होतो. तण्डुलं पचति हें विकार्य कर्म होय. कारण पचनक्रियेनें त्या तण्डुलाला विकार होतो. याशिवाय इतर कर्माला प्राप्य कर्म म्हणतात; जसें- ग्रामं गच्छति येथें गमनक्रियेनें ग्राम उत्पन्न होत नाही आणि त्या गमनक्रियेनें ग्रामाला कांहीं विकारही होत नाही.

३. छत्र, द्वार, हीं कर्में निर्वर्त्य व विकार्य नाहींत, म्हणून हें वार्तिक करावें लागलें. पुढील वार्तिकही त्याकरितांच केलें आहे.

४. अच् (३।१।१३४), क (३।१।१३५), श (३।१।१३७), ण (३।१।१४०), या चारी प्रत्ययांतील इत्संज्ञक जाऊन फक्त अकारच शिल्लक राहतो.

**कुम्भकारः नगरकारः। ओदनपाच उभयं प्राप्नोति। कर्मोपपदो भवति विप्रतिषेधेन॥ अनुपपदस्यावकाशः। विक्षिपः विलिखः। कर्मोपपदस्य स एव। काष्ठभेद उभयं प्राप्नोति। कर्मोपपदो भवति विप्रतिषेधेन॥ अनुपपदस्यावकाशः। जानातीति ज्ञः। कर्मोपपदस्य स एव। अर्थज्ञ उभयं प्राप्नोति। कर्मोपपदो भवति विप्रतिषेधेन। नैष युक्तो विप्रतिषेधः। अनुपपदस्तृतीयः। ण्वुल्तृजचः। तेषां णः। णस्य कः। स यथैव को णं बाधत एवं कर्मोपपदमपि बाधेत। कर्मोपपदोऽपि तृतीयः। ण्वुल्तृजचः। तेषामण्। अणः कः। उभयोस्तृतीययोर्युक्तो विप्रतिषेधः॥ अनुपपदस्यावकाशः। लिम्पतीति लिम्पः। कर्मोपपदस्य स एव। कुड्यलेप उभयं प्राप्नोति। कर्मोपपदो भवति विप्रतिषेधेन। नैष युक्तो विप्रति-**

अच्प्रत्ययाला पचतीति पचः येथें अवकाश आहे; व कर्म उपपद असतांना सांगितलेल्या अण्प्रत्ययाला कुम्भकारः, नगरकारः, येथें अवकाश आहे; आणि ओदनं पचतीति ओदनपाचः येथें दोघांची प्राप्ति येते. त्यांमध्यें कर्म उपपद असतांना सांगितलेला अण्प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. तसेंच, उपपद निमित्त न धरतां सांगितलेल्या कप्रत्ययाला विक्षिपः, विलिखः, येथें अवकाश आहे व कर्म उपपद असतांना सांगितलेल्या ह्या अण्प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; आणि काष्ठं भिनत्तीति काष्ठभेदः येथें दोघांची प्राप्ति येते. त्यांमध्यें कर्म उपपद असतांना सांगितलेला अण्प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. तसेंच उपपद निमित्त न धरतां सांगितलेल्या कप्रत्ययाला जानातीति ज्ञः येथें अवकाश आहे व कर्म उपपद असतांना सांगितलेल्या कप्रत्ययाला गोदः येथें अवकाश आहे; आणि अर्थं जानातीति अर्थज्ञः येथें दोघांची प्राप्ति येते. त्यांमध्यें कर्म उपपद असतांना सांगितलेला कप्रत्यय विप्रतिषेधानें होतो.

हा विप्रतिषेध बरोबर दिसत नाहीं. कारण उपपद निमित्त न धरतां सांगितलेला कप्रत्यय हा तिसरा आहे. म्हणजे आरंभीं ण्वुल्, तृच् आणि अच् हे सामान्यतः सांगितलेले प्रत्यय प्राप्त होतात, त्यांचा बाध करून दुसऱ्यांदा आकारान्त धातूहून सांगितलेला णप्रत्यय (३।१।१४१) प्राप्त होतो, त्याचा बाध करून तिसऱ्यादा कप्रत्यय (३।१।१३६) प्राप्त होतो. तेव्हां तो कप्रत्यय इतरांचा बाध करण्याकरतां मुद्दाम सांगितला असल्यामुळें जसा णप्रत्ययाचा बाध करतो तसा कर्म उपपद असतांना सांगितलेल्या कप्रत्ययाचाही (३।२।३) बाध करील.

पण त्या कप्रत्ययाप्रमाणेंच कर्म उपपद असतांना सांगितलेला कप्रत्ययही तिसराच आहे. आरंभीं ण्वुल्, तृच् आणि अच् हे सामान्यतः सांगितलेले प्रत्यय होतात, त्यांचा बाध करून दुसऱ्यांदा अण्प्रत्यय (३।२।१) प्राप्त होतो, त्याचा बाध करून तिसऱ्यांदा कप्रत्यय (३।२।३) प्राप्त होतो. तेव्हां दोन्ही कप्रत्यय तिसऱ्यांदाच प्राप्त होणारे मुद्दाम सांगितले असल्यामुळें त्यांच्यामध्यें विप्रतिषेध मानणें बरोबरच आहे. तसेंच विप्रतिषेधाचें आणखीही उदाहरण असें आहे की उपपद निमित्त न धरतां सांगितलेल्या शप्रत्ययाला लिम्पतीति लिम्पः येथें अवकाश आहे, व कर्म उपपद असतांना सांगितलेल्या अण्प्रत्ययाला कुम्भकारः येथें अवकाश पूर्वी दाखविलाच आहे आणि कुण्डलेपः येथें दोघांची प्राप्ति येते. तेव्हां तेथें कर्म उपपद असतांना सांगितलेला अण्प्रत्यय

५. हा कप्रत्यय (३।२।३) झाला म्हणजे उपपदसंज्ञा (३।१।९१) होऊन उपपदसमास (२।२।१९) वगैरे कार्यें होतात.

षेधः । अनुपपदस्तृतीयः । ण्वुल्तृजचः । तेषां कः । कस्य शः । स यथैव शः कं बाधत एवं कर्मोपपदमपि बाधेत । का तर्हि गतिः । मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन्बाधन्त इत्येवं शः कं बाधिष्यते कर्मोपदं न बाधिष्यते ॥ अनुपपदस्यावकाशः । सुग्लः सुम्लः । कर्मोपपदस्य स एव । वडवासंदाय उभयं प्राप्नोति । कर्मोपपदो भवति विप्रतिषेधेन । नैष युक्तो विप्रतिषेधः अनुपपदस्तृतीयः । ण्वुल्तृजचः । तेषां णः । णस्य कः । स यथैव को णं बाधत एवं कर्मोपपदमपि बाधेत । का तर्हि गतिः । पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इत्येवमयं को णं बाधिष्यते कर्मोपपदं न बाधिष्यते ॥

## शीलिकामिभक्ष्याचरिभ्यो णः पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं च ॥ ७ ॥

शीलिकामिभक्ष्याचरिभ्यो णो वक्त-

---

विप्रतिषेधानें होतो.

हा विप्रतिषेध बरोबर दिसत नाहीं. कारण उपपद निमित्त न धरतां सांगितलेला हा शप्रत्यय तिसरा आहे. आरंभीं ण्वुल्, तृच् आणि अच् हे सामान्यतः सांगितलेले प्रत्यय प्राप्त होतात, त्यांचा बाध करून इक् उपधेला असल्यामुळें कप्रत्यय दुसऱ्यांदा प्राप्त होतो, आणि त्याचा बाध करून तिसऱ्यांदा हा शप्रत्यय प्राप्त होतो. तेव्हां तो शप्रत्यय जसा कप्रत्ययाचा बाध करतो तसा कर्म उपपद असतांना सांगितलेल्या अण्प्रत्ययाचाही बाध करील.

तर मग आतां येथें उपाय तरी काय करावा बरें ?

उपाय असा की 'मध्यें पठित अपवाद हा पूर्वपठित विधीचाच बाध करतो; पुढें असलेल्या विधीचा बाध करीत नाहीं', या न्यायानें तो शप्रत्यय (३।१।१३८) कप्रत्ययाचाच (३।१।१३५) बाध करील. कर्म उपपद असतांना सांगितलेल्या पुढील अण्प्रत्ययाचा (३।२।१) बाध करीत नाहीं. तसेंच विप्रतिषेधाचें आणखी उदाहरण असें की उपपद निमित्त न धरतां सांगितलेल्या कप्रत्ययाला सुग्लः, सुम्लः, येथें अवकाश आहे व कर्म उपपद असतांना सांगितलेल्या अण्प्रत्ययाला कुम्भकारः येथें अवकाश आहे; आणि गोसंदायः, वडवासंदायः, येथें दोघांची प्राप्ति येते. तेव्हा तेथं कर्म उपपद असतांना सांगितलेला अण्प्रत्यय विप्रतिषेधानें होतो.

हा विप्रतिषेध बरोबर दिसत नाहीं. कारण उपपद निमित्त न धरतां सांगितलेला हा कप्रत्यय तिसरा आहे. आरंभीं ण्वुल्, तृच् आणि अच् हे सामान्यतः सांगितलेले प्रत्यय प्राप्त होतात. त्यांचा बाध करून णप्रत्यय दुसऱ्यांदा प्राप्त होतो. त्याचा बाध करून तिसऱ्यांदा कप्रत्यय प्राप्त होतो. तेव्हां तो कप्रत्यय जसा णप्रत्ययाचा बाध करतो तसा कर्म उपपद असतांना सांगितलेल्या अण्प्रत्ययाचाही बाध करील.

तर मग आतां येथें उपाय तरी काय करावा बरें ?

उपाय असा की 'पूर्वी पठित अपवाद हा जवळच्याच विधीचा बाध करतो, त्याच्यापेक्षा दूर असलेल्या विधीचा बाध करीत नाहीं', या न्यायानें तो कप्रत्यय (३।१।१३६) णप्रत्ययाचाच (३।१।१४१) बाध करील. कर्म उपपद असतांना सांगितलेल्या अण्प्रत्ययाचा (३।२।१) बाध करीत नाहीं.

(वा.७) शील्धातु, णिङ्प्रत्ययान्त कम् धातु, स्वार्थी णिच्प्रत्ययान्त भक्ष्धातु आणि आङ्उपसर्गपूर्वक चर्धातु यांहून णप्रत्यय होतो, कर्म उपपद असतांना, आणि पूर्वपदाला

---

६. अण्प्रत्यय होत नाहीं म्हणून मांसशीला येथें ङीप्प्रत्यय (४।१।१५) होत नाहीं.

व्यः पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं च वक्तव्यम् । शीलि । मांसशीलः मांसशीला । शीलि ॥ कामि । मांसकामः मांसकामा । कामि ॥ भक्षि । मांसभक्षः मांसभक्षा । भक्षि ॥ आचरि । कल्याणाचारः कल्याणाचारा ॥

ईक्षिक्षमिभ्यां च ॥ ८ ॥

ईक्षक्षमिभ्यां चेति वक्तव्यम् । सुखप्रतीक्षः सुखप्रतीक्षा । कल्याणक्षमः कल्याणक्षमा ॥

किमर्थमिदमुच्यते । पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं च वक्ष्यामीकारश्च मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । इह यो मांसं भक्षयति मांसं तस्य भक्षो भवति । योऽसौ भक्षयतेरच्तदन्तेन बहुव्रीहिः ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्कर्मोपपदं णं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः समानेऽर्थे केवलं विग्रहभेदाद्यत्र कर्मोपपदश्च प्राप्नोति बहुव्रीहिश्च कर्मोपपदस्तत्र भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । काण्डलावः । काण्डानि लावोऽस्येति बहुव्रीहिर्न भवति ॥ भवति तु बहुव्रीहिरपि । मांसे कामोऽस्य मांसकामो मांसकामक इति वा ॥

न त्वम्भोभिगमा ।

न त्विदं भवति अम्भोऽभिगमोऽस्या

---

प्रकृतिस्वर होतो, असें म्हणावें; उदा०— मांसशीलः मांसशीला, मांसकामः मांसकामा, मांसभक्षः मांसभक्षा, कल्याणाचारः कल्याणाचारा.

(वा.८) ईक्ष् आणि क्षम् या धातूंहूनही कर्म उपपद असतांना णप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०— सुखप्रतीक्षः सुखप्रतीक्षा, कल्याणप्रतीक्षः कल्याणप्रतीक्षा.

हें वार्तिक कशाकरितां केलें आहे ?

ह्या णप्रत्ययाबरोबर पूर्वपदाला प्रकृतिस्वर सांगावयाचा आहे, तो एक उपयोग होय, आणि ङीप्प्रत्यय (४।१।१५) न झाला पाहिजे, हा दुसरा उपयोग होय.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. जो मांसभक्षण करतो त्याचें मांस हें भक्ष होतेंच. तेव्हां मांस आहे भक्ष ज्याचें असा बहुव्रीहिसमास केला म्हणजे त्या मांसभक्षशब्दामध्यें पूर्वपदप्रकृतिस्वर (६।२।१) साधेल, आणि ङीप्ही होणार नाहीं. भक्ष हा शब्द भक्ष् धातूहून स्वार्थी णिच्प्रत्यय करून पुढें कर्मणि अच्प्रत्यय (३।३।५६) करून साधत आहे. तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांही जे आचार्य वार्तिककार कर्म उपपद असतांना णप्रत्ययाचें विधान करतात त्यावरून ते असें सुचवितात की सारखाच अर्थ असतांना फक्त निरनिराळ्या विग्रहामुळें ज्या ठिकाणीं कर्मोपपद घेऊन कृत्प्रत्यय प्राप्त होतो आणि बहुव्रीहिसमास प्राप्त होतो त्या ठिकाणीं कर्मोपपद घेऊन कृत्प्रत्ययच करावा, बहुव्रीहि करूं नये.

या ज्ञापकाचा काय उपयोग ?

काण्डलावः येथें काण्ड आहे लाव ज्याचा असा बहुव्रीहि होत नाहीं.

पण मांसाविषयीं आहे काम ज्याचा तो मांसकाम असा बहुव्रीहि होतच आहे. तेथेंच एकदा समासान्त कप्रत्यय करून मांसकामकः असाही प्रयोग होत आहे.

तरी पण अम्भस् म्ह. उदक आहे अभिगम म्ह. प्राप्य जिचें ती अम्भोभिगमा असा बहु-

---

७. काण्डं लुनातीति काण्डलावः असा उपपदसमासच होतो. नाही तर लाव्यते इति लावः असा लूधातूहून णिच्प्रत्यय करून कर्मणि अच्प्रत्यय (३।३।५६) करून सिद्ध झालेल्या लावशब्दाबरोबर बहुव्रीहि झाला असता. बहुव्रीहि झाला तर समासान्त कप्रत्यय (५।४।१५४) होऊं लागेल, आणि पूर्वपदप्रकृतिस्वर (६।२।१) होऊं लागेल.

८. तेव्हां ज्ञापकावर दोष येत असल्यामुळें ज्ञापक घेऊं नये. आतां वार्तिक मात्र पाहिजे. कारण अण्प्रत्यय होऊन ङीप् होऊन मांसभक्षी असा भलता

इति । किं तर्हि । अम्भोभिगामीत्येव भवति ॥ काण्डलावेऽपि च विग्रहाभावान्न ज्ञापकस्य प्रयोजनं भवतीति । नैषोऽस्ति विग्रहः काण्डानि लावोऽस्येति ॥

**अन्नादायेति च कृतां व्यत्ययश्छन्दसि ॥ ९ ॥**

अन्नादायेति च कृतां व्यत्ययश्छन्दसि द्रष्टव्यः । अन्नादायान्नपतये । य आहुतिमन्नादीं कृत्वा ॥

**[ह्वावामश्च ॥ ३ । २ । २ ॥]**

**आतोऽनुपसर्गे कः ॥ ३ । २ । ३ ॥**

**कविधौ सर्वत्र प्रसारणिभ्यो डः ॥ १ ॥**

कविधौ सर्वत्र प्रसारणिभ्यो डो वक्तव्यः । ब्रह्मज्यः । किमुच्यते सर्वत्रेति । अन्यत्रापि नावश्यमिहैव । कान्यत्र । आह्वः प्रह्व इति ॥

**के हि संप्रसारणप्रसङ्गः ॥ २ ॥**

के हि सति संप्रसारणं प्रसज्येत । संप्रसारणे कृते संप्रसारणपरपूर्वत्वे चोवङादेश आहुव इत्येतद्रूपं स्यात् ॥

---

व्रीहि होत नाहीं. तर उदकाकडे गमन करणारी स्त्री अशा अर्थाचा अम्भोभिगामी असा उपपद-समास होऊन ङीप्प्रत्ययान्त शब्द सिद्ध होतो.[९]

काण्डलाव असा बहुव्रीहि होत नाहीं, हाही ज्ञापकाचा उपयोग येत नाहीं. कारण लाव-शब्दाबँरोबर काण्ड आहेत लाव ज्याचे असा विग्रहच करतां येत नाहीं.[१०]

(वा.९) वेदामध्यें अन्नाद या शब्दामध्यें कृत्प्रत्ययाचा व्यत्यय होतो. म्हणजे अण्प्रत्यय न करतां अच्प्रत्यय होतो; उदा०— अन्नादा-[११]यान्नपतये य आहुतिमन्नादां[१२] कृत्वा.

(सू.३ वा.१) कप्रत्यय सांगणाऱ्या सर्वच सूत्रांमध्यें संप्रसारणयोग्य धातूंहून कप्रत्यय न करतां डप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०— ब्रह्म जिनातीति ब्रह्मज्यः.

येथें 'सर्वच सूत्रांमध्यें' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

येथेंच फक्त कप्रत्यय न होतां डप्रत्यय झाला पाहिजे असें नाहीं, तर इतर ठिकाणींही झाला पाहिजे.

इतर ठिकाणीं म्हणजे कोठें ?

आह्वः, प्रह्वः[२], येथें.

(वा.२) कप्रत्यय झाला तर संप्रसारण (६।१।१५) होऊं लागेल, आणि संप्रसारण केल्यानंतर पूर्वरूप होऊन उवङादेश होईल आणि आहुवः असें रूप होऊं लागेल.

तर मग तसा डप्रत्यय सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. आह्वः येथें संप्रसारण

---

प्रयोग न झाला पाहिजे.

९. येथें अनभिधानानें बहुव्रीहि होत नाही असें म्हटलें म्हणजे येथें ज्ञापकाचा उपयोग नाही.

१०. काण्ड हें छेद्य आहे त्या अर्थी लूधातूहून कर्मणि अप्प्रत्यय करून लवशब्द होईल. लूधातूहून णिच्प्रत्यय करून पुढें कर्मणि अच्प्रत्यय (३।३।५७) करून लावशब्द होतो, परंतु काण्डाशीं त्याचा अन्वय संभवत नाही.

११. येथें अच्प्रत्यय झाल्यामुळें 'अन्नादायेत्यन्न ऽअदाय' असा अवग्रह होतो.

१२. येथें अण्प्रत्यय न झाल्यामुळें ङीप्प्रत्यय

(४।१।१५) झाला नाहीं.

१. ह्वा, वा आणि मा ह्या तीन धातूंहून कर्म उपपद असतांना अण्प्रत्यय होतो; उदा. स्वर्गह्वायः, तन्तुवायः, धान्यमायः.

१ आकारान्त धातूंहून कर्म उपपद असतांना कप्रत्यय होतो, पूर्वी उपसर्ग मात्र नसला पाहिजे; उदा०— गोदः

२. येथें कप्रत्यय झाला असता तर संप्रसारण (६।१।१६) व पूर्वरूप (६।१।१०८) होऊन इयङ् (६।४।७७) होऊन भलतेंच रूप झालें असतें.

स तर्हि वक्तव्यः। न वक्तव्यः। अस्त्वत्र संप्रसारणम्। संप्रसारणे कृत आकारलोपः। तस्य स्थानिवद्भावादुवङादेशो न भविष्यति। पूर्वत्वे कृते प्राप्नोति॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम्। आकारलोपः क्रियतां पूर्वत्वमिति किमत्र कर्तव्यम्। परत्वादाकारलोपः। न सिध्यति। अन्तरङ्गत्वात्पूर्वत्वं प्राप्नोति। एवं तर्हि वार्णादाङ्गं बलीयो भवतीत्याकारलोपो भविष्यति॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम्। आकारलोपः क्रियतां संप्रसारणमिति किमत्र कर्तव्यम्। परत्वादाकारलोपः। नित्यं संप्रसारणम्। कृतेऽप्याकारलोपो प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति। आकारलोपोऽपि नित्यः। कृतेऽपि संप्रसारणे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति। अनित्य आकारलोपो न हि कृते संप्रसारणे प्राप्नोति। अन्तरङ्गं हि पूर्वत्वं बाधते। यस्य लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते न तदनित्यम्। न च संप्रसारणमेवाकारलोपस्य निमित्तं विहन्ति। अवश्यं लक्षणान्तरं पूर्वत्वं प्रतीक्ष्यम्। उभयोर्नित्ययोः परत्वादाकारलोपः। आकारलोपे कृते संप्रसारणम्। संप्रसारणे कृते यणादेशेन सिद्धं रूपम् आह्वः प्रह्व इति॥ एवमपि न सिध्यति। योऽनादिष्टादचः पूर्वस्तस्य

---

होऊं दे. संप्रसारण केल्यानंतर आकाराचा लोप (६।४।६४) करावा किंवा पूर्वरूप करावें असा प्रश्न उत्पन्न होतो.

मग या दोहोंमध्यें काय बरें अगोदर करावें?

परत्वास्तव आकाराचा लोप अगोदर केला म्हणजे रूप साधेल.

तशा रीतीनें साधत नाहीं. कारण फक्त दोन वर्णांच्या आश्रयानें प्राप्त झालेलें पूर्वरूप अंतरंग असल्यामुळें तें अगोदर होईल.

तर मग 'वर्णाला मानून प्राप्त होणाऱ्या कार्यापेक्षां अंगाला सांगितलेलें कार्य प्रबल आहे' या परिभाषेनें आकाराचा लोपच अगोदर होईल.

तर मग आतां येथें आकाराचा लोप करावा कीं संप्रसारण करावें हाच विचार प्रथमतः केला पाहिजे.

मग या दोहोंमध्यें काय बरें अगोदर करावें?

परत्वास्तव आकाराचा लोप अगोदर करावा.

पण संप्रसारण नित्य आहे ना? कारण आकाराचा लोप केला तरी त्याची प्राप्ति येते आणि न केलें तरी त्याची प्राप्ति येते.

आकाराचा लोपही पण नित्य आहे. कारण संप्रसारण केलें तरी त्याची प्राप्ति येते आणि न केलें तरी त्याची प्राप्ति येते.

आकाराचा लोप नित्य नाहीं. कारण संप्रसारण केल्यानंतर त्याची प्राप्ति येत नाहीं. कारण अंतरंगत्वास्तव पूर्वरूपानें त्याचा बाध होत आहे.

पण ज्या शास्त्राच्या निमित्ताचा विघात दुसऱ्या शास्त्रानें होतो तें अनित्य समजूं नये. येथें आकाराच्या लोपाची स्पर्धा संप्रसारणाबरोबर आहे. तें संप्रसारणच कांहीं आकाराच्या लोपाच्या निमित्ताचा विघात करीत नाहीं, तर त्या कामीं त्याला अवश्य पूर्वरूप या दुसऱ्या शास्त्राकडे पाहावें लागतें. तात्पर्य, आकाराचा लोप अनित्य नाहीं; आणि दोन्ही नित्य असल्यामुळें परत्वास्तव आकाराचा लोप होईल; आणि तो आकाराचा लोप केल्यानंतर संप्रसारण करून यणादेश झाला म्हणजे आह्वः, प्रह्वः, हीं रूपें सिद्ध होतील.

तरी देखील सिद्ध होणार नाहींत. कारण उवङ् होऊं लागेल. स्थानिवद्भाव (१।१।५७) मात्र होणार नाहीं. कारण ज्या आदेशाला

---

१. त्या आकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव (१।१।५७) झाला म्हणजे उवङ् होणार नाहीं, आणि यण् होईल.

विधिं प्रति स्थानिवद्भाव आदिष्टाच्चैषोऽचः पूर्वो भवति । एवं तर्ह्याकारलोपस्यासिद्धत्वादुवङादेशो न भविष्यति ॥ इहापि तर्ह्याकारलोपस्यासिद्धत्वादुवङादेशो न स्यात् जुहुवतुः जुहुवुरिति । अस्त्यत्र विशेषः । अकृतेऽत्रात्त्वे पूर्वत्वं भवति ॥ इदमिह संप्रधार्यम् । आत्त्वं क्रियतां पूर्वत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्पूर्वत्वम् । न सिध्यति । अन्तरङ्गत्वादात्त्वं प्राप्नोति ॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । आत्त्वं क्रियतां संप्रसारणमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादात्त्वम् । नित्यं संप्रसारणम् । कृतेऽप्यात्त्वे प्राप्नोत्यकृतेऽपि । आत्त्वमपि नित्यम् । कृतेऽपि संप्रसारणे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । अनित्यमात्त्वं न हि संप्रसारणे कृते प्राप्नोति । परत्वात्पूर्वत्वेन भवितव्यम् । यस्य लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते न तदनित्यम् । न च संप्रसारणमेवात्त्वस्य निमित्तं विहन्ति । अवश्यं लक्षणान्तरं पूर्वत्वं प्रतीक्ष्यम् । उभयोर्नित्ययोः परत्वादात्त्वमात्त्वे कृते संप्रसारणम् ॥ एवं तर्हि पूर्वत्वे

स्थानिवद्भाव करावयाचा त्या आदेशाचा स्थानी जो अच् त्याच्यापेक्षां पूर्वी असलेल्याला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो, आणि येथें उवङ् हें कार्य ज्याला करावयाचें तो उकार अजादेश जो लोप त्यापेक्षां पूर्वी आहे; त्या लोपाचा स्थानी जो आकार त्यापेक्षां पूर्वी नाहीं.[४]

तर मग आकाराचा लोप असिद्ध (६।४।२२) असल्यामुळें उवङादेश होत नाहीं.

तर मग जुहुवतुः,जुहुवुः,येथेंही आकाराचा लोप असिद्ध असल्यामुळें उवङ् होणार नाहीं.

आहः यापेक्षां जुहुवतुः येथें फरक आहे. तो असा की तेथें आत्त्व न करतां एकारालाच पूर्वरूप होत आहे[५].

पण येथें असा विचार उत्पन्न होतो की एकाराला आत्त्व (६।१।४५) अगोदर करावें कीं पूर्वरूप करावें (६।१।१०८)?

मग या दोहोंमध्यें काय बरें अगोदर करावें?

परत्वास्तव पूर्वरूप अगोदर केलें म्हणजे रूप साधेल.

पण तशा रीतीनें साधत नाहीं. कारण कांहीं एक निमित्त न धरतां सांगितल्यामुळें अंतरंग आत्त्व अगोदर होईल.

तर मग आता येथें आत्त्व करावें कीं संप्रसारण (६।१।१५) करावें हाच विचार प्रथमतः केला पाहिजे.

मग या दोहोंमध्यें काय बरें अगोदर करावें?

परत्वास्तव प्रथमतः आत्त्व करावें.

पण संप्रसारण नित्य आहे ना? कारण आत्त्व केलें तरी त्याची प्राप्ति येते आणि न केलें तरी त्याची प्राप्ति येते.

आत्त्वही पण नित्य आहे. कारण संप्रसारण केलें तरी त्याची प्राप्ति येते आणि न केलें तरी त्याची प्राप्ति येते.

आत्त्व नित्य नाहीं. कारण संप्रसारण केल्यानंतर त्याची प्राप्ति येत नाहीं. कारण परत्वास्तव पूर्वरूपानें त्याचा बाध होत आहे.

पण ज्या शास्त्राच्या निमित्ताचा विघात दुसऱ्या शास्त्रानें होतो तें अनित्य समजूं नये. येथें आत्त्वाची स्पर्धा संप्रसारणाबरोबर आहे. तें संप्रसारणच कांहीं आत्त्वाच्या निमित्ताचा विघात करीत नाहीं. त्या कामीं त्याला अवश्य पूर्वरूप या दुसऱ्या शास्त्राकडे पहावें लागतें. तात्पर्य, आत्त्व अनित्य नाहीं आणि दोन्ही अनित्य असल्यामुळें परत्वास्तव अगोदर आत्त्व होईल आणि आत्त्व केल्यानंतर संप्रसारण होईल[६].

४. कारण आकाराच्या लोपाच्या पूर्वी संप्रसारण झालें नाही.

५. तेव्हां आकाराचा लोपच नाहीं की जो असिद्ध समजून उवङ् दूर करतां येईल.

६. तात्पर्य, आहः यापेक्षां जुहुवतुः येथें आकारच नाहीं असा जो फरक दाखविला होता तो सिद्ध

योगविभागः करिष्यते । संप्रसारणात्परः पूर्वो भवति । तत एङः । एङश्च संप्रसारणात्पूर्वो भवति । किमर्थमिदम् । अकृत आत्त्वे पूर्वत्वं यथा स्यात् । ततः पदान्तादति । एङ इत्येव ॥ इहापि तर्ह्यकृत आत्त्वे पूर्वत्वं स्यात् आह्वः प्रह्व इति । अस्त्यत्र विशेषः । आकारान्तलक्षणः कविधिस्तेनानेनावश्यमात्त्वं प्रतीक्ष्यम् । लिट् पुनरविशेषेण धातुमात्राद्विधीयते ॥

नित्यं प्रसारणं ह्वो यण्वार्णादाङ्गं न पूर्वत्वम् ।
योऽनादिष्टादचः पूर्वस्तत्कार्ये स्थानिवत्त्वं हि ॥
प्रोवाच भगवान्कात्यस्तेनासिद्धिर्यणस्तु ते ।
आतः को लिण्नैङः पूर्वः सिद्ध आह्वस्तथा सति ॥

## सुपि स्थः ॥ ३ । २ । ४ ॥

## सुपि स्थो भावे च ॥ १ ॥

सुपि स्थ इत्यत्र भावे चेति वक्त-

---

तर मग आतां याकरितां पूर्वरूपशास्त्रामध्यें (६।१।१०९) योगविभाग करण्यांत येईल. तो असाः– संप्रसारणाहून अच् पुढें आला असतां पूर्वपरांचे स्थानीं पूर्वरूप एकादेश होतो (६।१।१०८). त्या सूत्राच्या पुढें 'एङः' एवढेंच सूत्र करावें. संप्रसारणाच्या पुढें एङ् आला असतां पूर्वपराचे स्थानीं पूर्वरूप एकादेश होतो, असा त्याचा अर्थ होय.

हें शास्त्र कशाकरितां केलें आहे ?

ज्या ठिकाणीं एङाला आत्त्व प्राप्त होतें तेथें आत्त्व करण्याचे पूर्वी एङ् या अवस्थेंतच पूर्वरूप झालें पाहिजे, म्हणून हें मुद्दाम निराळें सूत्र केलें आहे. त्याच्या पुढें 'पदान्तादति' हें दुसरें सूत्र होय. तेथें एङः या पदाची अनुवृत्ति आहे व पूर्वीप्रमाणें त्याचा अर्थ समजावा.

तर मग जुहुवतुः याप्रमाणें आह्वः, प्रह्वः, येथेंही आत्त्व न करतां एङवस्थेंतच पूर्वरूप होऊं लागेल.

पण आह्वः येथें फरक आहे. तो असा की येथें मुळीं कप्रत्ययच आकारान्त धातूहून सांगितला आहे. तेव्हां कप्रत्यय हा अवश्य आत्त्वाची वाट पाहणारच. जुहुवतुः येथें लिट् प्रत्यय मात्र तसा नाहीं. त्याला धातु एवढेंच निमित्त आहे.

आह्वः येथें ह्वेञ्धातूला नित्य संप्रसारण करून यण् होतो. वार्णकार्यापेक्षां आङ्गकार्य प्रबल असल्यामुळें पूर्वरूप होत नाहीं, तर आकाराचा लोपच होतो.

पण आकारलोपहि नित्य असल्यामुळें परत्वास्तव संप्रसारणाच्या अगोदर झाला तर त्याला स्थानिवद्भावही होणार नाहीं. कारण आदेश न झालेला म्हणजे स्थानी जो अच् त्याहून जो पूर्व त्याला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत असतो, म्हणून भगवान् कात्य ऋषींनीं डप्रत्यय सांगितला आहे. तरी पण आकारलोप असिद्ध असल्यामुळें उवङ् न होतां यण्च होईल. आकारान्त धातूहून कप्रत्यय सांगितला असल्यामुळें तेथें एङाला पूर्वरूप करतां येत नाहीं. लिट् तसा सांगितला नाहीं, म्हणून तेथें एङाला पूर्वरूप होतें आणि तसें झालें असतां जुहुवतुः हें सिद्ध होतें असें म्हणतात.

(सू.४,वा १) ह्या सूत्रामध्यें कर्ता या अर्थी सांगितलेला कप्रत्यय भाव या अर्थीही होतो, असें म्हणावें. कारण आखूत्थो वर्तते. श्येनोत्थः, समस्थः.

---

होत नाहीं.

१. सुप्प्रत्ययान्त उपपद असतांना स्थाधातूहून कर्तरि कप्रत्यय होतो; उदा०– समे तिष्ठतीति

२. आखु म्ह. मूषक, त्यांचें उत्थान, असा येथें अर्थ आहे.

व्यम् । इहापि यथा स्यात् । आखूत्थो वर्तते । श्येनोत्थः । शलभोत्थः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

**योगविभागात्सिद्धम् ॥ २ ॥**

योगविभागः करिष्यते । आतोऽनुपसर्गे को भवति । ततः सुपि । सुपि चातः को भवति । कच्छेन पिबति कच्छपः । कटाहेन पिबति कटाहपः । द्वाभ्यां पिबति द्विपः । ततः स्थः । स्थश्च को भवति सुपीति । किमर्थमिदम् । भावे यथा स्यात् । कुतो नु खल्वेतद्भावे भविष्यति न पुनः कर्मादिषु कारकेष्विति । योगविभागादयं कर्तुरपकृष्यते न चान्यस्मिन्नर्थ आदिश्यतेऽनिर्दिष्टार्थाश्च प्रत्ययाः स्वार्थे भवन्तीति स्वार्थे भविष्यति । तद्यथा । गुप्तिज्किद्भ्यः सन् [३.१.५] यावादिभ्यः कन् [५.४.२९] । सोऽसौ स्वार्थे भवन्भावे भविष्यति ॥

## तुन्दशोकयोः परिमृजापनुदोः ॥ ३ । २ । ५ ॥

**तुन्दशोकयोः परिमृजापनुदोरालस्यसुखाहरणयोः ॥ १ ॥**

तुन्दशोकयोः परिमृजापनुदोरित्यत्रालस्यसुखाहरणयोरिति वक्तव्यम् । तुन्दप-

---

शलभोत्थः, येथेंही कप्रत्यय झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

(वा.२) योगविभाग केला म्हणजे हें सिद्ध होईल. तो योगविभाग असाः– 'आतोऽनुपसर्गे कः' हें पूर्वीचें सूत्र आहे. त्याच्या पुढें 'सुपि' एवढेंच सूत्र करावें. सुबन्त[३] उपपद असतांना आकारान्त धातूहून कप्रत्यय होतो असा त्याचा अर्थ होय. कच्छेन पिबतीति कच्छपः, कटाहेन पिबतीति कटाहपः, द्वाभ्यां पिबतीति द्विपः, हीं त्याचीं उदाहरणें होत. त्यानंतर 'स्थः' असें दुसरें सूत्र होय. सुबन्त उपपद असतांना स्थाधातूहून कप्रत्यय होतो असा त्याचा अर्थ होय.

हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

भाव या अर्थी स्थाधातूहून कप्रत्यय झाला पाहिजे याकरितां केलें आहे.

पण काय हो, स्थः या सूत्रानें भाव या अर्थीच काय म्हणून कप्रत्यय होईल ? कर्म वगैरे जीं इतर कारकें त्या अर्थी कां होणार नाहीं ?

योगविभाग केल्यामुळें पूर्वसूत्रानें कर्ता या अर्थी सांगितलेल्या कप्रत्ययापेक्षां कांहीं तरी निराळ्या अर्थी ह्या सूत्रानें कप्रत्यय सांगितला आहे, असें तर ठरतेंच. आणि अमुक अर्थी कप्रत्यय होतो असें येथें कांहींच म्हटलें नाहीं. तेव्हां अर्थाचा निर्देश केला नसेल तर तेथें तो प्रत्यय स्वार्थी होतो; जसें 'गुप्तिज्किद्भ्यः सन्' (३।१।५), यावादिभ्यः कन् (५।४।२९). तेव्हां स्वार्थी होणारा हा कप्रत्यय भाव या अर्थीच होईल[४].

(सू.५, वा.१) हा जो तुन्द उपपद असतांना परिमृज् या धातूहून कप्रत्यय सांगितला आहे तो आलस्य अर्थ गम्यमान असेल तरच होतो, आणि शोक उपपद असतांना अपनुद् याहून सांगितलेला कप्रत्यय सुख देणें हा अर्थ गम्यमान असेल तरच होतो, असें म्हणावें[१];

---

३. येथें कर्मवाचकच उपपद पाहिजे असा आग्रह नाहीं.

४. कारण हा प्रत्यय धातूहून सांगितला आहे, आणि धातूचा स्वार्थ म्हणजे भावच होय.

१. कर्मवाचक तुन्दशब्द उपपद असतांना परिपूर्वक मृज्धातूहून आणि कर्मवाचक शोकशब्द उपपद असतांना अपउपसर्गपूर्वक नुद्धातूहून कर्ता या अर्थी कप्रत्यय होतो; उदा० तुन्दं परिमार्ष्टीति तुन्दपरिमृजः अलसः. तुन्द म्ह. जठर. आळशी बसल्यानें जठराची वृद्धि होते. शोकमपनुदतीति शोकापनुदः सुखदाता पुत्रादिः.

रिमृजोऽलसः। शोकापनुदः पुत्रो जातः। यो हि तुन्दं परिमार्ष्टि तुन्दपरिमार्जः स भवति। यश्च शोकमपनुदति शोकापनोदः स भवति॥

**कप्रकरणे मूलविभुजादिभ्य उपसंख्यानम् ॥२॥**

कप्रकरणे मूलविभुजादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम्। मूलविभुजो रथः। नखमुचानि धनूंषि। काकगुहास्तिलाः। सरसीरुहं कुमुदम्॥

**[प्रे[1] दाज्ञः ॥ ३।२।६॥**

**समि[1] ख्यः ॥ ३।२।७॥]**

**गापोष्टक्[1] ॥ ३।२।८॥**

**सुरासीध्वोः पिबतेः ॥ १ ॥**

सुरासीध्वोः पिबतेरिति वक्तव्यम्। इह मा भूत्। क्षीरपा ब्राह्मणीति। पिबतेरिति किमर्थम्। या हि सुरां पाति सुरापा सा भवति॥

**बहुलं तणि ॥२॥**

बहुलं तणीति वक्तव्यम्। किमिदं तणीति। संज्ञाछन्दसोर्ग्रहणम्। या ब्राह्मणी सुरापी भवति नैनां देवाः पतिलोकं नयन्ति। या ब्राह्मणी सुरापा भवति नैनां देवाः पतिलोकं नयन्ति॥

**हरतेरनुद्यमनेऽच्[1] ॥ ३।२।९॥**

**अच्प्रकरणे शक्तिलाङ्गलाङ्कुशयष्टितोमरघटघटीधनुःषु ग्रहेरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

अच्प्रकरणे शक्तिलाङ्गलाङ्कुशयष्टितोमरघटघटीधनुःषु ग्रहेरुपसंख्यानं कर्तव्यम्। शक्तिग्रहः। शक्ति॥ लाङ्गल। लाङ्गलग्रहः। लाङ्गल॥ अङ्कुश। अ-

---

उदा० तुन्दपरिमृजोऽलसः; शोकापनुदः पुत्रो जातः. तुन्दाचें परिमार्जन करणारा अलसाशिवाय दुसरा कोणी असेल तर तेथें तुन्दपरिमार्जः असा अण्प्रत्ययच होतो. तसेंच सुख न देतां वैराग्याच्या चार गोष्टी सांगून शोक दूर करणारा असेल तेथें शोकापनोदः असा अण्प्रत्ययच होतो.

(वा. २) मूलविभुज वगैरे शब्दांमध्यें कप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०– मूलानि विभुजति मूलविभुजः रथः, नखान् मुञ्चन्तीति नखमुचानि धनूंषि, काकेभ्यो गूहितव्याः काकगुहाः तिलाः, सरसीरुहम् कुमुदम्.

(सू.८,वा १) पाधातूहून हा जो टक्प्रत्यय सांगितला आहे तो सुरा किंवा शीधु हे कर्मवाचक शब्द मागें असतील तरच होतो असें म्हणावें. कारण क्षीरं पिबतीति क्षीरपा ब्राह्मणी येथें टक्प्रत्यय न झाला पाहिजे. तसेंच भ्वादिगणांतील पाधातूहूनच हा टक्प्रत्यय होतो असें म्हणावें. म्हणून सुरां पाति रक्षतीति सुरापा असेंच होतें.

(वा.२) बहुलं तणि असें म्हणावें.

तणि म्हणजे काय?

संज्ञाशब्द आणि वेद यांमध्यें असा तणि याचा अर्थ आहे. तेव्हां त्या ठिकाणीं हा टक्प्रत्यय बाहुल्येंकरून होतो; उदा०–या ब्राह्मणी सुरापी भवति नैनां देवाः पतिलोकं नयन्ति.

(सू ९,वा.१) शक्ति, लाङ्गल, अङ्कुश, यष्टि, तोमर, घट, घटी आणि धनुस् हे शब्द उपपद असतांना ग्रह्धातूहून अच्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०–शक्तिग्रहः, लाङ्गलग्रहः,

---

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना प्रउपसर्गपूर्वक दा आणि ज्ञा या धातूंहून कर्ता या अर्थी कप्रत्यय होतो; उदा० सर्वप्रदः, पथिप्रज्ञः.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना सम्उपसर्गपूर्वक ख्याधातूहून कर्ता या अर्थी कप्रत्यय होतो; उदा० गाः संचष्टे गोसंख्यः.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना आणि उपसर्ग नसतांना गा आणि पा या धातूंहून टक्प्रत्यय होतो; उदा० सामगः, सुरापः.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना हृधातूहून

ङ्कुशग्रहः । अङ्कुश ॥ यष्टि । यष्टिग्रहः । यष्टि ॥ तोमर । तोमरग्रहः । तोमर ॥ घट । घटग्रहः । घट ॥ घटी । घटीग्रहः । घटी ॥ धनुस् । धनुर्ग्रहः ॥

**सूत्रे च धार्यर्थे ॥२॥**

सूत्रे च धार्यर्थे ग्रहेरुपसंख्यानम् । सूत्रग्रहः । धार्यर्थे इति किमर्थम् । यो हि सूत्रं गृह्णाति सूत्रग्राहः स भवति ॥

**[ वयसि च ॥ ३ । २ । १० ॥**

**आङि ताच्छील्ये ॥ ३ । २ । ११ ॥**

**अर्हः ॥ ३।२।१२ ॥ ]**

**स्तम्बकर्णयो रमिजपोः ॥ ३ । २ । १३ ॥**

**स्तम्बकर्णयोर्हस्तिसूचकयोः ॥१॥**

स्तम्बकर्णयोरित्यत्र हस्तिसूचकयोरिति वक्तव्यम् । स्तम्बेरमो हस्ती । कर्णेजपः सूचकः । स्तम्बे रन्ता कर्णे जपितेत्येवान्यत्र ॥

**शमि धातोः संज्ञायाम् ॥ ३ । २ । १४ ॥**

धातुग्रहणं किमर्थम् ।

**शमि संज्ञायां धातुग्रहणं कृञो हेत्वादिषु टप्रतिषेधार्थम् ॥१॥**

शमि संज्ञायां धातुग्रहणं क्रियते कृञो हेत्वादिषु टो मा भूदिति । शमि संज्ञायां धातोरज्भवतीत्यस्यावकाशः । शंवदः

---

अङ्कुशग्रहः, यष्टिग्रहः, तोमरग्रहः, घटग्रहः, घटीग्रहः, धनुर्ग्रहः.

(वा.२) सूत्रशब्द उपपद असतांना धारण करणें या अर्थाच्या ग्रह्धातूहून अच्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०— सूत्रग्रहः.

येथें धारण करणें या अर्थाचा ग्रह्धातु असें कशाकरितां म्हटलें आहे ?

जो फक्त सूत्र जवळ घेतो त्या अर्थी सूत्रग्राहः असा अण्प्रत्ययच होतो.

(सू. १३) ह्या सूत्रामध्यें हस्ती हा अर्थ गम्यमान असतांना रम्धातूहून आणि सूचक हा अर्थ गम्यमान असतांना जप्धातूहून अच्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०— स्तम्बेरमो हस्ती, कर्णेजपः सूचकः. हस्ती आणि सूचक हे अर्थ नसतील तर स्तम्बे रन्ता, कर्णे जपिता, असा तृच्प्रत्ययच होतो.

(सू. १४) येथें धातोः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा. १) ह्या सूत्रामध्यें जें धातुग्रहण केलें आहे त्याचा उपयोग असा की ह्या अच्प्रत्ययाच्या विषयामध्यें हेतु वगैरे अर्थ गम्यमान असतांना कृधातूहून जो टप्रत्यय (३ । २ । २०) सांगितला आहे तो प्राप्त होतो, त्याच्या प्रतिषेधाकरितां, म्हणजे तो टप्रत्यय न होतां हा अच्प्रत्ययच होतो, हा होय. शम् उपपद असतांना संज्ञाशब्दामध्यें प्रकृत सूत्रानें सांगि-

---

अच्प्रत्यय होतो, परंतु उचलणें ह्या धातूचा अर्थ नसला पाहिजे; उदा०— अंशहरः, रिक्थहरः.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना हृधातूहून अच्प्रत्यय होतो, परंतु वय गम्यमान असतांना; उदा० कवचहरः कुमार. कवच उचलणारा कुमार असा अर्थ आहे. कवच उचलण्याइतकी शक्ति आल्यामुळें त्याचें वय गम्यमान होतें.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना आङ्उपसर्गपूर्वक हृधातूहून अच्प्रत्यय होतो, परंतु तेथें धातूपासून प्रतीत होणारी जी क्रिया ती कर्त्याची स्वभावसिद्ध असली पाहिजे; उदा० पुष्पाणि आहरतीति पुष्पाहारः; फलाहारः. स्वभावतःच फुलें, फळें, गोळा करणारा मनुष्य असा याचा अर्थ आहे.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना अर्ह्धातूहून कर्ता या अर्थी अच्प्रत्यय होतो; उदा० पूजार्हा ब्राह्मणी येथें अण्प्रत्यय न झाल्यामुळें ङीप्प्रत्यय (४।१।१५) झाला नाहीं.

१. सुबन्त स्तम्बशब्द उपपद असतांना रम्धातूहून आणि कर्णशब्द उपपद असतांना जप्धातूहून अच्प्रत्यय होतो; उदा० स्तम्बे रमते स्तम्बेरमो हस्ती; कर्णे जपः सूचकः, सूचक म्ह. चहाडखोर.

१. संज्ञाशब्दामध्यें शम् उपपद असतांना धातू-

शंभवः । टस्यावकाशः । श्राद्धकरः पिण्डकरः । शंकरा नाम परिव्राजिका शंकरा शकुनिका तच्छीला च तस्यामुभयं प्राप्नोति । परत्वाट्टः स्यात् । धातुग्रहणसामर्थ्यादजेव भवति ॥

कुणरवाडवस्त्वाह । नैषा शंकरा । शंगरैषा । गृणातिः शब्दकर्मा तस्यैष प्रयोगः ।

## अधिकरणे शेतेः ॥ ३ । २ । १५॥

### अधिकरणे शेतेः पार्श्वादिषूपसंख्यानम् ॥ १ ॥

अधिकरणे शेतेः पार्श्वादिषूपसंख्यानं कर्तव्यम् । पार्श्वशयः पृष्ठशयः उदरशयः ॥

### दिग्धसहपूर्वाच्च ॥ २ ॥

दिग्धसहपूर्वाच्चेति वक्तव्यम् । दिग्धसहशयः ॥

### उत्तानादिषु कर्तृषु ॥३॥

उत्तानादिषु कर्तृष्विति वक्तव्यम् । उत्तानशयः अवमूर्धशयः ॥

### गिरौ डश्छन्दसि ॥ ४ ॥

गिरावुपपदे छन्दसि डो वक्तव्यः । गिरौ शेते गिरिशः ॥

### तद्धितो वा ॥ ५ ॥

तद्धितो वा पुनरेष भविष्यति । गिरौ शेते गिरिश इति ॥

## चरेष्टः॥ ३ । २ । १६ ॥

---

तलेल्या अच्प्रत्ययाला शंभवः, शंवदः, येथें अवकाश आहे. तसेंच श्राद्धकरः, पिण्डकरः, येथें टप्रत्ययाला अवकाश[3] आहे. आणि शंकरा नांवाची एक सर्वत्याग केलेली बाई किंवा शंकरा नांवाची शकुन सांगणारी बाई आणि ती त्या स्वभावाची असेल तर तेथें ट आणि अच् या दोन्ही प्रत्ययांची प्राप्ति येते; तेव्हां तेथें परत्वास्तव टप्रत्यय होऊं लागेल. पण येथें मुद्दाम धातुग्रहण केल्यामुळें ह्याचा विषय् असेल तर हा अच्प्रत्ययच होतो.

कुणरवाडव वैयाकरण तर असें म्हणतो की शंकरा हें जें नांव आहे तो अपभ्रंश आहे. शगरा असेंच मूळ नांव आहे. असें कशावरून म्हणाल तर अशावरून की शब्द करणें हा अर्थ गृधातूचा आहे. तेव्हां त्याचाच हा प्रयोग आहे.

(सू. १५. वा. १) ह्या सूत्रामध्यें पार्श्व वगैरे शब्द उपपद असतांना शीधातूहून अच्प्रत्यय होतो असें म्हणावें, उदा० पार्श्वाभ्यां शेते पार्श्वशयः, पृष्ठशयः, उदरशयः.

(वा. २) दिग्धसह हा शब्द पूर्वी असतां शीधातूहून अच्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० दिग्धसहशयः[2].

(वा. ३) उत्तान वगैरे शब्द कर्तृवाचक उपपद असतांना शीधातूहून अच्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० उत्तानः शेते इति उत्तानशयः, अवमूर्धशयः.

(वा. ४) अधिकरणवाचक गिरिशब्द उपपद असतांना वेदामध्यें शीधातूहून डप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० गिरौ शेते गिरिशः.

(वा. ५) अथवा गिरिश हा शब्द तद्धितप्रत्यय करून साधावा. गिरीवर शयन करतो म्हणून गिरिः अस्य म्ह. गिरि ज्याचा आहे

---

हून अच्प्रत्यय होतो, उदा० शंकरः, शंभवः, शंवदः.

२. येथें तशा स्वभावाचा असा अर्थ विवक्षित नाहीं. म्हणून टप्रत्ययाची येथें प्राप्ति येत नाहीं.

३. येथें शम् उपपद नसल्यामुळें अच्प्रत्ययाची प्राप्ति येत नाहीं.

१. अधिकरणवाचक सुबन्तशब्द उपपद असतांना शीधातूहून कर्ता या अर्थी अच्प्रत्यय होतो; उदा० खे शेते खशयः.

२. दिग्धेन सह शेते दिग्धसहशयः. दिग्धसह हा समास 'मयूरव्यंसकादयश्च' (२।१।७२) यानें साधावा.

१. अधिकरणवाचक शब्द सुबन्त उपपद असतांना चर्धातूहून टप्रत्यय होतो; उदा० कुरुचरः

इह कस्मान्न भवति । कुरूंश्चरति । पञ्चालांश्चरतीति । अधिकरण इति वर्तते । ननु च कर्मणीत्यपि वर्तते तत्र कुत एतदधिकरणे भविष्यति न पुनः कर्मणीति ।

**चरेर्भिक्षाग्रहणं ज्ञापकं कर्मण्यप्रसङ्गस्य ॥ १ ॥**

यदयं भिक्षासेनादायेषु च [३.२.१७] इति चरेर्भिक्षाग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न भवति कर्मणीति ॥

**[भिक्षासेनादायेषु च ॥३।२।१७॥**

**पुरोऽग्रतोऽग्रेषु सर्तेः ॥३।२।१८॥**

**पूर्वे कर्तरि ॥३।२।१९॥**

**कृञो हेतुताच्छील्यानुलोम्येषु ॥३।२।२०॥]**

**दिवाविभानिशाप्रभाभास्कारान्तानन्तादिबहुनान्दीकिंलिपिलिबिबलिभक्तिकर्तृचित्रक्षेत्रसंख्याजङ्घाबाह्वहर्यत्तद्धनुररुःषु ॥ ३।२।२१ ॥**

**किंयत्तद्बहुषु कृञोऽज्विधानम् ॥१॥**

किंयत्तद्बहुषु कृञोऽज्विधानं कर्तव्यम् । किंकरा । किम् ॥ यद् । यत्करा ।

---

ह्या मत्वर्थी गिरिशब्दाहून शप्रत्यय (५।२।१००) करावा.

(सू. १६) कुरून् चरति, पञ्चालान् चरति, असा कर्मवाचक शब्द उपपद ठेवला तर हा टप्रत्यय कां होत नाहीं ?

अधिकरणे अशी अनुवृत्ति आहे. तेव्हां अधिकरणवाचकच शब्द उपपद ठेवला पाहिजे.

पण कर्मणि या पदाची ही अनुवृत्ति मागून येत आहे. मग येथें अधिकरणे याचाच संबंध होतो आणि कर्मणि याचा होत नाहीं, असें कशावरून ?

(वा. १) 'भिक्षासेनादायेषु च' या पुढील सूत्रामध्यें जें आचार्यांनीं भिक्षाग्रहण केलें आहे त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे की कर्मवाचक उपपद असतांना प्रकृतसूत्रानें टप्रत्यय होत नाहीं.

(सू.२१, वा.१) ह्या सूत्रांतील दिवा वगैरे शब्दांपैकीं किम्, यत्, तत् आणि बहु हे शब्द उपपद असतांना कृधातूहून अच्प्रत्यय होतो

---

कुरुचरी.

२. जर प्रकृतसूत्रानें कर्मवाचक शब्द उपपद असतांना टप्रत्यय होईल तर भिक्षां चरतीति भिक्षाचरः हें उदाहरण प्रकृतसूत्रानेंच सिद्ध होत असल्यामुळें पुढील सूत्रामध्यें भिक्षाग्रहण व्यर्थ होईल.

१. भिक्षा, सेना आणि आदाय हे शब्द उपपद असतांना सृधातूहून टप्रत्यय होतो; उदा० भिक्षां चरतीति भिक्षाचरः. येथें चरधातूचा अर्थ संचारपूर्वक मिळविणें असा आहे. सेनां चरतीति सेनाचरः येथें चरधातूचा अर्थ प्रवेश करणें असा आहे. आदायचरः येथें आदाय हें ल्यबन्त अव्यय आहे.

१. पुरस्, अग्रतस्, आणि अग्रे हे शब्द उपपद असतांना सृधातूहून टप्रत्यय होतो; उदा० पुरःसरः, अग्रतःसरः, अग्रेसरः

१. कर्तृवाचक पूर्वशब्द उपपद असतांना सृधातूहून टप्रत्यय होतो; उदा० पूर्वः सरतीति पूर्वसरः,

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना कृधातूहून टप्रत्यय होतो, परंतु तेथें धातूचा अर्थ जी क्रिया तिचें कारण दाखविलें असलें पाहिजे, किंवा कर्त्याचा तसा स्वभाव गम्यमान असला पाहिजे, किंवा अनुकूल वागणें हा अर्थ गम्यमान असला पाहिजे; उदा० यशस्करी विद्या; विद्या हें यशःप्राप्तीचें कारण आहे. श्राद्धकरः येथें कर्त्याचा श्राद्धकर्म करण्याचा स्वभाव प्रतीत होतो. वचनकरः येथें सांगितल्याबरोबर तसें करणारा असा अर्थ प्रतीत होतो.

१. दिवा, विभा, निशा, प्रभा, भास्, कार, अन्त, अनन्त, आदि, बहु, नान्दी, किम्, लिपि, लिबि, बलि, भक्ति, कर्तृ, चित्र, क्षेत्र, एक, द्वि, वगैरे संख्यावाचक शब्द, जङ्घा, बाहु, अहर्, यत्, तत्, धनुस् आणि अरुस् हें कर्मवाचक शब्द उपपद असतांना कृधातूहून टप्रत्यय होतो; उदा० दिवाकरः. दिवा हें अव्यय सप्तम्यर्थप्रधानें जरी आहे तरी वृत्तीमध्यें त्याचा अर्थ दिवस इतकाच लक्षणेनें समजावा; अथवा कर्मणि याचा दिवाशब्दाकडे संबंध

यद् ॥ तद् । तत्करा । तद् ॥ बहु । बहुकरा ॥

[कर्मणि भृतौ ॥ ३ । २ । २२ ॥
न शब्दश्लोककलहगाथावैरचाटुसूत्रमन्त्रपदेषु ॥ ३ । २ । २३ ॥]

स्तम्बशकृतोरिन् ॥३।२।२४॥

स्तम्बशकृतोर्व्रीहिवत्सयोः ॥ १ ॥

व्रीहिवत्सयोरिति वक्तव्यम् । स्तम्बकरिर्व्रीहिः । शकृत्करिर्वत्सः ॥

[हरतेर्दृतिनाथयोः पशौ ॥ ३ । २ । २५ ॥]

फलेग्रहिरात्मंभरिश्च ॥ ३।२।२६॥

आत्मंभरिरिति किं निपात्यते । आत्मनो मुम्भृञश्चेन्प्रत्ययः ॥ अत्यल्पमिदमुच्यते ।

भृञः कुक्ष्यात्मनोर्मुम्च ॥१॥

भृञः कुक्ष्यात्मनोर्मुम्चेति वक्तव्यम् । कुक्षिंभरिः । आत्मंभरिश्चरति यूथमसेवमानः ॥

[छन्दसि वनसनरक्षिमथाम् ॥ ३ । २ । २७ ॥]

एजेः खश् ॥ ३ ।२ । २८ ॥

खश्प्रकरणे वातशुनीतिलशर्धेष्वजधेट्तुदजहातिभ्यः ॥१॥

---

असें म्हणावें; उदा० किंकरा, यत्करा, तत्करा, बहुकरा.

(सू.२४, वा.१) स्तम्ब व शकृत् हे शब्द उपपद असतांना जो हा इन्प्रत्यय सांगितला आहे तो व्रीहि व वत्स हे अर्थ क्रमानें असतील तर होतो असें म्हणावें; उदा० स्तम्बकरिः व्रीहिः, शकृत्करिः वत्सः.

(सू.२६) आत्मंभरि येथें काय निपातन केलें आहे ?

आत्मन्शब्दाच्या नकाराचा लोप झाल्यानंतर त्याला मुमागम आणि भृधातूहून इन्प्रत्यय यांचें निपातन केलें आहे.

हें येथें आचार्यांनीं फार थोडें सांगितलें आहे.

(वा.१) कुक्षि व आत्मन् हे शब्द उपपद असतांना भृञ्धातूहून इन्प्रत्यय होतो आणि त्या उपपदांना मुमागम होतो असें म्हणावें; उदा० कुक्षिंभरिः; आत्मंभरिश्चरति यूथमसेवमानः.

(सू.२८, वा.१) या खश्प्रत्ययाच्या प्रक-

---

करूं नये. त्या वेळीं दिवा म्हणजे दिवसां लोकांना चेष्टायुक्त करणारा सूर्य असा अर्थ घ्यावा.

२. येथें अच्प्रत्यय झाल्यामुळें ङीप् (४।१।१५) न होतां टाप् (४।१।४) झाला आहे.

१. कर्मवाचक कर्मशब्द उपपद असतां कृधातूहून टप्रत्यय होतो, भृति अर्थ गम्यमान असतांना; उदा० कर्मकरो भृतकः. भृतक म्ह. पगारी नोकर. भृति म्ह. वेतन.

१. शब्द, श्लोक, कलह, गाथा, वैर, चाटु, सूत्र, मन्त्र आणि पद हे शब्द उपपद असतांना कृधातूहून टप्रत्यय होत नाहीं; उदा० शब्दकारः; येथें टप्रत्यय(३।२।२०) होत नाहीं, अण्प्रत्यय(३।२।१)-च होतो.

१. कर्मवाचक स्तम्ब व शकृत् हे शब्द उपपद असतांना कृधातूहून इन्प्रत्यय होतो; उदा० स्तम्बकरिः व्रीहिः. प्रत्ययाचा नकार इत्संज्ञक आहे.

१. कर्मवाचक दृति किंवा नाथ हे शब्द उपपद असतांना हृधातूहून इन्प्रत्यय होतो, परंतु पशु हा कर्ता असला पाहिजे; उदा० दृतिहरिः पशुः, नाथहरिः पशुः. दृति म्ह. चर्मपुट; नाथ म्ह. नासारज्जु.

१. फलेग्रहि आणि आत्मंभरि ह्या दोन शब्दांचें निपातन केलें आहे, उदा० फलेग्रहिः. निपातनामुळेंच फलशब्दाच्या शेवटच्या अकाराला एकार झाला आहे.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना वेदामध्यें वन्, सन्, रक्ष् आणि मथ् या चार धातूंहून इन्प्रत्यय होतो; उदा० ब्रह्मवनिं त्वा क्षत्रवनिम्, पथिरक्षी, हविर्मथीनाम्.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना णिच्प्रत्ययान्त धातूहून खश्प्रत्यय होतो; उदा० अङ्गम् एजयतीति अङ्गमेजयः. प्रत्ययाचा खकार इत्संज्ञक असल्यामुळें पूर्वपदाला मुमागम (६।३।६७) होतो. आणि शकार इत्संज्ञक असल्यामुळें मध्यें विकरण शप्

खश्प्रकरणे वातशुनीतिलशर्धेष्वजधेट्-तुदजहातिभ्य इति वक्तव्यम् । वातमजा मृगाः । वात ॥ शुनी । शुनिंधयः । शुनी ॥ तिल । तिलंतुदः । तिल ॥ शर्ध । शर्धंजहा माषाः ॥

नासिकास्तनयोर्ध्माधेटोः ३ । २ । २९ ॥

स्तने धेटः ॥१॥

स्तने धेट इति वक्तव्यम् । स्तनंधयः ॥ ततो

मुष्टौ ध्मश्च ॥ २ ॥

मुष्टौ ध्मश्च धेटश्चेति वक्तव्यम् । मुष्टिंधमः मुष्टिंधयः ॥

अत्यल्पमिदमुच्यते । नासिकानाडीमुष्टिघटीखारीष्विति वक्तव्यम् । नासिकंधमः नासिकंधयः । नासिका ॥ नाडी ॥ नाडिंधमः नाडिंधयः । नाडी ॥ मुष्टि । मुष्टिंधमः मुष्टिंधयः । मुष्टि ॥ घटी । घटिंधमः घटिंधयः । घटी ॥ खारी । खारिंधमः खारिंधयः ॥

[नाडीमुष्ट्योश्च ॥ ३ । २ । ३० ॥

उदिकूले रुजिवहोः ॥ ३ । २ । ३१ ॥

वहाभ्रे लिहः ॥ ३ । २ । ३२ ॥

परिमाणे पचः ॥ ३ । २ । ३३ ॥

मितनखे च ॥ ३ । २ । ३४ ॥

विध्वरुषोस्तुदः ॥ ३ । २ । ३५ ॥

---

रणामध्यें वातशब्द उपपद असतांना अज्-धातूहून, शुनीशब्द उपपद असतांना धेट्-धातूहून, तिलशब्द उपपद असतांना तुद्धातूहून आणि शर्धशब्द उपपद असतांना जहाति म्ह. हाधातु त्याहून, खश्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० वातमजा मृगाः, शुनिंधयः, तिलंतुदः, शर्धंजहा माषाः.

(सू.२९, वा.१) स्तनशब्द उपपद असतांना धेट्धातूहून खश्प्रत्यय होतो, असें निराळें सांगावें, उदा० स्तनंधयः. त्यानंतर

(वा. २) मुष्टिशब्द उपपद असतांना ध्मा आणि धेट् या दोन धातूंहून खश्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० मुष्टिंधमः, मुष्टिंधयः.

हें येथें आचार्यांनीं फार थोडें सांगितलें आहे. नासिका, नाडी, मुष्टि, घटी आणि खारी हे शब्द उपपद असतांना ध्मा आणि धेट् या दोन धातूंहून खश्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० नासिकंधमः नासिकंधयः; नाडिंधमः नाडिंधयः; मुष्टिंधमः मुष्टिंधयः; घटिंधमः घटिंधयः; खारिंधमः खारिंधयः.

---

प्रत्यय (३।१।६८) होतो.

२. येथें शुनीशब्दांतील ईकाराला ऱ्हस्व (६।३।६६) झाला आहे.

१. नासिकाशब्द उपपद असतांना ध्माधातूहून आणि स्तन शब्द उपपद असतांना धेट्धातूहून खश्प्रत्यय होतो; उदा० नासिकंधमः, स्तनंधयः.

१. (३०) नाडी आणि मुष्टि हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना ध्मा आणि धेट् या दोन धातूंहून खश्प्रत्यय होतो; उदा० नाडिंधमः नाडिंधयः, मुष्टिंधमः मुष्टिंधयः.

(३१) कर्मवाचक कूलशब्द उपपद असतांना उत्उपसर्गपूर्वक रुज् आणि वह् या धातूंहून खश्प्रत्यय होतो; उदा० कूलमुद्रुजः, कूलमुद्वहः.

(३२) वह किंवा अभ्र हें कर्मवाचक शब्द उपपद असतांना लिह्धातूहून खश्प्रत्यय होतो; उदा० वहंलिहः, अभ्रंलिहः.

(३३) कर्मवाचक प्रस्थ वगैरे परिमाणशब्द उपपद असतांना पच्धातूहून खश्प्रत्यय होतो; उदा० प्रस्थंपचः, प्रस्थंपचा स्थाली.

(३४) कर्मवाचक मित किंवा नख हें शब्द उपपद असतांना पच्धातूहून खश्प्रत्यय होतो; उदा० मितंपचा ब्राह्मणी, नखंपचा यवागूः.

(३५) कर्मवाचक विधु किंवा अरुस् हे शब्द उपपद असतांना तुद्धातूहून खश्प्रत्यय होतो; उदा० विधुंतुदः, अरुंतुदः.

**असूर्यललाटयोर्दृशितपोः ॥ ३ । २ । ३६ ॥**

**उग्रंपश्येरंमदपाणिंधमाश्च ॥ ३ । २ । ३७ ॥]**

**प्रियवशे वदः खच् ॥ ॥ ३ । २ । ३८ ॥**

**खच्प्रकरणे गमेःसुप्युपसंख्यानम् ॥ १ ॥**

खच्प्रकरणे गमेः सुप्युपसंख्यानं कर्तव्यम् । मितंगमः । मितंगमा हस्तिनी ॥

**विहायसो विह च ॥ २ ॥**

विहायसो विह इत्ययमादेशो वक्तव्यः खच्च । विहंगमः ॥

**खच्च डिद्वा ॥ ३ ॥**

खच्च डिद्वा वक्तव्यः । विहंगः ॥

**डे च ॥ ४ ॥**

डे च विहायसो विह इत्ययमादेशो वक्तव्यः । विहगः ॥

**[द्विषत्परयोस्तापेः ॥ ३ । २ । ३९ ॥**

**वाचि यमो व्रते ॥ ३ । २ । ४० ॥**

**पूःसर्वयोर्दारिसहोः ॥ ३ । २ । ४१ ॥**

**सर्वकूलाभ्रकरीषेषु कषः ॥ ३ । २ । ४२ ।**

**मेघर्तिभयेषु कृञः**

---

(सू. ३८, वा. १) या खच्प्रकरणामध्यें सुबन्तशब्द उपपद असतांना गम्धातूहून खच्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०— मितंगमो हस्ती; मितंगमा हस्तिनी.

(वा. २) विहायस्शब्दोपपदपूर्वक गम्धातूहून खच्प्रत्यय होतो आणि विहायस्शब्दाला विहादेश होतो; उदा० विहंगमः.

(वा. ३) हा खच्प्रत्यय एकदा डित् होतो असें म्हणावें; उदा०—विहंगः.

(वा. ४) विहायस्शब्दपूर्वक गम्धातूहून डप्रत्यय केला असतां विहायस्शब्दाला विहादेश होतो, असें म्हणावें; उदा०—विहंगः.

---

(३६) कर्मवाचक असूर्यशब्द उपपद असतांना दृश्धातूहून आणि ललाटशब्द उपपद असतांना तप्धातूहून खश्प्रत्यय होतो; उदा० सूर्यं न पश्यन्ति ताः असूर्यंपश्याः राजस्त्रियः; ललाटंतपः सूर्यः.

(३७) उग्रंपश्य, इरंमद आणि पाणिंधम हे तीन शब्द खश्प्रत्ययान्त निपातित केले आहेत.

१. प्रिय किंवा वश हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना वद्धातूहून खच्प्रत्यय होतो; उदा० प्रियंवदः, वशंवदः.

२. खच्प्रत्यय डित् समजला म्हणजे त्याच्या जोरावर गम् झाला भसंज्ञा नसतांही त्यातील अम् या टिभागाचा लोप (६।४।१४३) होतो.

३. येथें अन्येष्वपि दृश्यते (३।२।४८ भा. वा.) यानें डप्रत्यय झाला आहे.

१. (३९) कर्मवाचक द्विषत् किंवा पर हे शब्द उपपद असतांना तापि या णिच्प्रत्ययान्त तपधातूहून खच्प्रत्यय होतो; उदा० द्विषन्तं तापयतीति द्विषंतपः, परंतपः.

(४०) कर्मवाचक वाच्शब्द उपपद असतांना यम्धातूहून खच्प्रत्यय होतो, व्रत हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० वाचंयमः मौनव्रती. येथें पूर्वपदाला अमागम (६।३।६९) झाला आहे.

(४१) कर्मवाचक पुर् उपपद असतांना दारि या णिच्प्रत्ययान्त दृधातूहून आणि सर्वशब्द उपपद असतांना सह्धातूहून खच्प्रत्यय होतो; उदा० पुरं दारयतीति पुरंदरः; येथें पूर्वपदाला अमागम झाला आहे; सर्वंसहः.

(४२) सर्व, कूल, अभ्र आणि करीष हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना कष्धातूहून खच्प्रत्यय होतो; उदा० सर्वंकषः, कूलंकषा नदी, अभ्रंकषो वायुः, करीषंकषा वात्या.

(४३) मेघ, ऋति आणि भय हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना कृधातूहून खच्प्रत्यय होतो; उदा० मेघंकरः, ऋतिंकरः, भयंकरः.

३ । २ । ४३ ॥

**क्षेमप्रियमद्रेऽण् च ॥ ३ । २ । ४४।**

**आशिते भुवः करणभावयोः ॥ ३ । २ । ४५ ॥**

**संज्ञायां भृतॄवृजिधारिसहितपिदमः ॥ ३ । २ । ४६ ॥**

**गमश्च ॥ ३ । २ । ४७ ॥]**

**अन्तात्यन्ताध्वदूरपारसर्वानन्तेषु डः ॥ ३ । २ ॥ ४८ ॥**

**डप्रकरणे सर्वत्रपन्नयोरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

डप्रकरणे सर्वत्रपन्नयोरुपसंख्यान कर्तव्यम् । सर्वत्रगः पन्नगः ॥

**उरसो लोपश्च ॥ २ ॥**

उरसो लोपश्च वक्तव्यः । उरगः ॥

**सुदुरोरधिकरणे ॥ ३ ॥**

सुदुरोरधिकरणे डो वक्तव्यः। सुगः दुर्गः ॥

**निसो देशे ॥ ४ ॥**

निसो देशे डो वक्तव्यः । निर्गः ॥

अपर आह । डप्रकरणेऽन्येष्वपि दृश्यते ॥ अन्येष्वपि डो भवतीति वक्तव्यम् । ततः स्त्र्यगारगः । अश्नुते यावदन्नाय ग्रामगः। ध्वंसते गुरुतल्पगः ॥

**आशिषि हनः ॥ ३ । २ । ४९ ॥**

---

(सू. ४८, वा. १) ह्या डप्रत्ययाच्या प्रकरणामध्यें सर्वत्र किंवा पन्न हे शब्द उपपद असतांना गम्‌धातूहून डप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० सर्वत्रगः, पन्नगः

(वा. २) उरस्‌शब्द उपपद असतांना गम्‌धातूहून अधिकरण या अर्थी डप्रत्यय होतो आणि उरस्‌शब्दाच्या सकाराचा लोप होतो; उदा० उरसा गच्छतीत्युरगः.

(वा. ३) सु किंवा दुर् हे उपपद असतांना गम्‌धातूहून अधिकरण या अर्थी डप्रत्यय होतो; उदा० सुखानें जाता येतें ज्या ठिकाणीं त्या ठिकाणाला सुग म्हणतात. तसेंच दुःखानें जातां येतें ज्या ठिकाणीं त्याला दुर्ग म्हणतात.

(वा. ४) निस्‌शब्द उपपद असतांना गम्‌धातूहून डप्रत्यय होतो, देश अर्थ असतांना, असें म्हणावें; उदा० निर्गो देशः.

येथें दुसरा कोणी ऋषि असें म्हणतो की 'डप्रकरणे अन्येष्वपि दृश्यते'; ह्या डप्रत्ययाच्या प्रकरणामध्यें गृहीत धरलेल्या उपपदाशिवाय इतर शब्द उपपद असतांनाही गम्‌धातूहून डप्रत्यय दिसतो म्हणून तो सांगावा; उदा० तत्र स्त्र्यगारगः, अश्नुते यावदन्नाय ग्रामगः, ध्वंसते गुरुतल्पगः.

---

(४४). क्षेम, प्रिय आणि मद्र हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना कृधातूहून अण् आणि खच् हे प्रत्यय होतात; उदा० क्षेमकारः क्षेमंकरः, प्रियकारः प्रियंकरः, मद्रकारः मद्रंकरः.

(४५). सुबन्त आशित शब्द उपपद असतांना भूधातूहून करण या अर्थी किंवा भाव या अर्थी खच्प्रत्यय होतो; उदा० आशित म्ह. जेवविलेला होतो ज्याच्या योगानें अशा ओदन वगैरे पदार्थांना आशितंभव म्हणतात, किंवा आशितस्य भवनं आशितंभवः.

(४६). संज्ञाशब्दांमध्यें कर्मवाचक किंवा इतर सुबन्तशब्द उपपद असतांना भृ, तॄ, वृ, जि, धारि, सह्, तप् आणि दम् या धातूंहून खच्प्रत्यय होतो; उदा० विश्वंभरा, रथंतरम्, पतिंवरा, शत्रुंजयः, युगंधरः, शत्रुंसहः, शत्रुंतपः, अरिंदमः.

(४७). संज्ञाशब्दामध्यें सुबन्त शब्द उपपद असतांना गम्‌धातूहून खच्प्रत्यय होतो; उदा० सुतंगमः.

१. अन्त, अत्यन्त, अध्वन्, दूर, पार, सर्व आणि अनन्त हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना गम्‌धातूहून डप्रत्यय होतो; उदा० अन्त गच्छतीति अन्तगः; अत्यन्तगः.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना हन्‌धातूहून डप्रत्यय होतो, अप्राप्त अर्थाची प्रार्थना हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० शत्रुं वध्यात् शत्रुहः.

दारावाहनोऽणन्त्यस्य च टः संज्ञायाम् ॥ १ ॥

दारावुपपद आङ्पूर्वाद्धन्तेरण्वक्तव्योऽन्त्यस्य च टो वक्तव्यः। दार्वाघाटस्ते वनस्पतीनाम् ॥

चारौ वा ॥ २ ॥

चारावुपपद आङ्पूर्वाद्धन्तेरणवक्तव्योऽन्त्यस्य च टो वा वक्तव्यः। चार्वाघाटः चार्वाघातः ॥

कर्मणि समि च ॥ ३ ॥

कर्मण्युपपदे संपूर्वाद्धन्तेरणवक्तव्योऽन्त्यस्य च टो वा वक्तव्यः। वर्णसंघाटः वर्णसंघातः। पदसंघाटः पदसंघातः ॥

[अपे क्लेशतमसोः ॥ ३। २। ५० ॥

कुमारशीर्षयोर्णिनिः ॥ ३। २। ५१ ॥

लक्षणे जायापत्योष्टक् ॥३।२।५२॥

कथमिदं विज्ञायते। लक्षणे कर्तरीति। आहोस्विल्लक्षणवति कर्तरीति। किं चातः। यदि विज्ञायते लक्षणे कर्तरीति सिद्धं जायाघ्नस्तिलकालकः पतिघ्नी पाणिलेखेति जायाघ्नो ब्राह्मणः पतिघ्नी वृषलीति न सिध्यति। अथ विज्ञायते लक्षणवति

---

(सू. ४९, वा. १) संज्ञाशब्दांमध्यें दारु शब्द उपपद असतांना आ उपसर्गपूर्वक हन्-धातूहून अण्प्रत्यय होतो आणि हन्धातूच्या शेवटच्या नकाराला टकारादेश होतो असें म्हणावें; उदा० दार्वाघाटस्ते वनस्पतीनाम्.

(वा. २) चारुशब्द उपपद असतांना आउपसर्गपूर्वक हन्धातूहून अण्प्रत्यय होतो आणि शेवटच्या नकाराला टकारादेश विकल्पानें होतो असें म्हणावें; उदा० चार्वाघाट : चार्वाघातः.

(वा. ३) कर्मवाचक शब्द उपपद असतांना सम्उपसर्गपूर्वक हन्धातूहून अण्प्रत्यय होतो, आणि शेवटच्या नकाराला टकारादेश विकल्पानें होतो असें म्हणावें; उदा० वर्णान् संहन्तीति वर्णसंघाटः वर्णसंघातः, पदसंघाटः पदसंघातः.

(सू. ५२) येथें लक्षणे याचा संबंध कसा करावयाचा? लक्षण म्हणजे चिन्ह हाच कर्ता असला पाहिजे, किंवा लक्षणानें युक्त असा कर्ता असला पाहिजे?

या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक आहे?

फरक असा की जर लक्षण हाच कर्ता असला पाहिजे असा अर्थ असेल तर जायाघ्नस्तिलकालकः, पतिघ्नी पाणिरेखा, हीं उदाहरणें सिद्ध होतील; परंतु जायाघ्नो ब्राह्मणः, पतिघ्नी वृषली, हीं उदाहरणें सिद्ध होत नाहींत. आतां लक्षणानें युक्त कर्ता असला पाहिजे असा अर्थ असेल तर जायाघ्नो ब्राह्मणः, पतिघ्नी वृषली, हीं उदाहरणें सिद्ध होतील; परंतु जायाघ्नस्तिलकालकः, पतीघ्नी पाणिरेखा, हीं उदाहरणें सिद्ध होणार नाहींत.

---

२. दार्वाघाट म्हणजे चोचीनें लांकडें कोरणारा सुतार नांवाचा पक्षी.

१. क्लेश किंवा तमस् हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना अपउपसर्गपूर्वक हन्धातूहून डप्रत्यय होतो; उदा० क्लेशापहः पुत्रः, तमोपहः सूर्यः.

१. कुमार किंवा शीर्ष हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना हन्धातूहून णिनिप्रत्यय होतो; उदा० कुमारघाती, शीर्षघाती. शिरसशब्दाला शीर्षादेश याच सूत्रामध्यें शीर्षशब्द उच्चारला म्हणून झाला आहे.

१. जाया किंवा पति हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना हन्धातूहून टक्प्रत्यय कर्ता या अर्थी होतो, परंतु त्या कर्त्यांमध्यें त्या क्रियेचें चिन्ह असलें पाहिजे; उदा० जायाघ्नो ना; स्त्रीचा विनाश सुचविणारें तीळ वगैरे चिन्ह याच्या शरीरावर आहे. पतिघ्नी स्त्री; पतिविनाशसूचक विशेष प्रकारची

कर्तरीति सिद्धं जायाघ्नो ब्राह्मणः पतिघ्नी वृषलीति जायाघ्नस्तिलकालकः पतिघ्नी पाणिलेखेति न सिध्यति ॥ अस्तु लक्षणे कर्तरीति । कथं जायाघ्नो ब्राह्मणः पतिघ्नी वृषलीति । अकारो मत्वर्थीयः । जायाघ्नोऽस्मिन्नस्तीति सोऽयं जायाघ्नः । पतिघ्नी वृषलीति न सिध्यति ॥ अस्तु तर्हि लक्षणवति कर्तरीति । कथं जायाघ्नस्तिलकालकः पतिघ्नी पाणिलेखेति । अमनुष्यकर्तृक इत्येवं भविष्यति ॥

**अमनुष्यकर्तृके च ॥ ३ । २ । ५३ ॥**

अप्राणिकर्तृक इति वक्तव्यम् । इह मा भूत् । नगरघातो हस्ती ॥ यद्यप्राणिकर्तृक इत्युच्यते शशघ्नी शकुनिरिति न सिध्यति । अस्तु तर्ह्यमनुष्यकर्तृक इत्येव । कथं नगरघातो हस्ती । कृत्यल्युटो बहुलम् [३.३.११३] इत्येवमत्राण्भविष्यति ॥

**[शक्तौ[१] हस्तिकपाटयोः ॥ ३ । २ । ५४ ॥]**

**पाणिघताडघौ शिल्पिनि ॥ ३ । २ । ५५ ॥**

**राजघ उपसंख्यानम् ॥ १ ॥**

---

तर मग लक्षण हाच कर्ता असला पाहिजे, असा अर्थ असूं दे.

पण तसा अर्थ घेतला तर जायाघ्नो ब्राह्मणः, पतिघ्नी वृषली, या उदाहरणांची वाट काय ?

त्यांची वाट अशी लावावी की तेथें मत्वर्थी अकारप्रत्यय (५।२।२७) करावा. तो असाः– जायाघ्न हें त्या ब्राह्मणाच्या अंगावरील चिन्हाचें नांव झालें. तें जायाघ्न चिन्ह ज्याला आहे अशा अर्थी ह्या त्या जायाशब्दाहून अच्प्रत्यय करून सिद्ध झालेला जायाघ्नशब्द त्या ब्राह्मणाला लावतां येतो.

पण तशानें ही[२] पतिघ्नी वृषली हें सिद्ध होत नाहीं.

तर मग लक्षणानें युक्त कर्ता असला पाहिजे असाच अर्थ असूं दे.

पण तसा अर्थ घेतला तर जायाघ्नस्तिलकालकः, पतिघ्नी पाणिरेखा, या उदाहरणांमध्यें टक्प्रत्यय कशानें होईल ?

'अमनुष्यकर्तृके च' या पुढील सूत्रानें होईल.

(सू. ५३) ह्या सूत्रामध्यें अमनुष्यकर्तृके याच्या ऐवजीं 'अप्राणिकर्तृके' असें म्हणावें. कारण नगरघातः हस्ती येथें टक्प्रत्यय न झाला पाहिजे.

पण जर अप्राणिकर्तृके असें म्हटलें तर शशघ्नी शकुनि येथें टक्प्रत्यय होणार नाहीं.

तर मग अमनुष्यकर्तृके च असेंच असूं दे.

पण तसें ठेवलें तर नगरघातो हस्ती येथें अण्प्रत्ययाचा बाध करून टक्प्रत्यय होऊं लागेल.

'कृत्यल्युटो बहुलम्' (३।३।११३) येथें बहुलग्रहण[२] केलें आहे, त्यामुळें नगरघातः येथ अण्प्रत्ययच होईल.

(सू.५५,वा.१) राजघ या शब्दाचें येथें

---

रेषा जिच्या हातावर आहे अशी स्त्री.

२. कारण पतिघ्नशब्दाहून मत्वर्थी अच्प्रत्यय केला तर पुढें स्त्रीलिंगी टाप्प्रत्यय होईल. टक्प्रत्ययामुळें ङीप् (४।१।१५) होतो तो होणार नाहीं.

१. कर्मवाचक शब्द उपपद असतांना हन्धातूहून कर्ता या अर्थी टक्प्रत्यय होतो, पण तो कर्ता मनुष्यभिन्न असला पाहिजे; उदा० जायाघ्नस्तिलकालकः, पतिघ्नी पाणिरेखा, पित्तघ्नं घृतम्.

२. 'कांहीं ठिकाणीं कांहीं तरी निराळेंच होतें,' असाही बहुलग्रहणाचा अर्थ आहे.

१. हस्तिन् किंवा कपाट हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना हन्धातूहून टक्प्रत्यय होतो, शक्ति गम्यमान असतांना; उदा० हस्तिघ्नो मनुष्यः, कपाटघ्नश्चोरः.

१. पाणिघ आणि ताडघ ह्या शब्दांचें निपातन केलें आहे. पाणि आणि ताड हे कर्मवाचक शब्द असतांना हन्धातूहून कर्ता या अर्थी कप्रत्यय आणि टिभागाचा लोप निपातनामुळें होतो; पण तो

**राजघ उपसंख्यानं कर्तव्यम्। राजघः॥**

**आढ्यसुभगस्थूलपलितनग्नान्धप्रियेषु च्व्यर्थेष्वच्वौ कृञः करणे ख्युन्॥ ३। २। ५६॥**

**ख्युनि च्विप्रतिषेधानर्थक्यं ल्युट्ख्युनोरविशेषात्॥ १॥**

ख्युनि च्विप्रतिषेधोऽनर्थकः। किं कारणम्। ल्युट्ख्युनोरविशेषात्। ख्युना मुक्ते ल्युटा भवितव्यं न चैवास्ति विशेषश्च्व्यन्त उपपदे ल्युटः ख्युनो वा। तदेव रूपं स एव च स्वरः॥ अयमस्ति विशेषः। ल्युटि सतीकारेण भवितव्यं ख्युनि सति न भवितव्यम्। ख्युन्यपि सति भवितव्यम्। एवं हि सौनागाः पठन्ति। नञ्स्नञीकक्ख्युंस्तरुणतलुनानामुपसंख्यानमिति॥ अयं तर्हि विशेषः। ख्युनि सति नित्यसमासेन भवितव्यमुपपदसमासो हि नित्यसमास इति। ल्युटि सति न भवितव्यम्। ल्युट्यपि भवितव्यम्। गतिसमासोऽपि हि नित्यसमासश्च्व्यन्तं च गतिसंज्ञं भवति॥ मुमर्थं तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः। ख्युनि सति मुमा भवितव्यं ल्युटि सति न भवितव्यम्।

---

निपातन करावें; उदा० राजानं हन्ति राजघः.

(सू.५६,वा.१) ह्या ख्युन्प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें उपपद च्विप्रत्ययान्त नसावें, असा जो प्रतिषेध केला आहे तो निरर्थक आहे.

काय कारण?

कारण असें की येथें ल्युट् आणि ख्युन् या दोन प्रत्ययांमध्यें कांहींच फरक दिसत नाहीं. च्विप्रत्ययान्त उपपद असतांना ख्युन्प्रत्यय झाला नाहीं तर तेथें त्या करण या अर्थी ल्युट्प्रत्यय होणार, आणि च्विप्रत्ययान्त उपपद असतांना कृधातूहून ल्युट्प्रत्यय झाला काय किंवा ख्युन्प्रत्यय झाला काय, तेंच रूप होतें, तोच स्वर होतो, कांहींच फरक होत नाहीं.

पण हा फरक आहे. ल्युट्प्रत्यय झाला असतां स्त्रीलिंगी ईकारप्रत्यय (४।१।१५) होतो आणि ख्युन् केला असतां तो होत नाहीं.

हा फरक नाहीं. ख्युन्प्रत्यय झाला तरी ईकार होणारच. कारण 'नञ्स्नञीकक्ख्युंस्तरुणतलुनानामुपसंख्यानम्' असें ख्युन्प्रत्ययान्ताहून ईकार सांगणारें सौनागांचें वचन (४।१।१५,वा.६) आहे.

तर मग असा फरक आहे की ख्युन्प्रत्यय झाला असतां आढ्य वगैरे शब्दांना उपपदसंज्ञा असल्यामुळें नित्यसमास होतो. उपपदसमास (२।२।१९) हा नित्यसमास आहे, आणि ल्युट्प्रत्यय झाला असतां नित्यसमास होत नाहीं.

हाही फरक नाहीं. कारण ल्युट्प्रत्यय झाला असतांही नित्यसमास होतोच. गतिसमास (२।२।१८) हा नित्यसमासच आहे, आणि च्विप्रत्ययान्त शब्दाला तर गतिसंज्ञा(१।४।६१) कायमचीच आहे.

तर मग मुमागमाकरितां च्विप्रत्ययान्त नसावें हा प्रतिषेध सांगितला पाहिजे. कारण ख्युन्प्रत्यय झाला असतां मुमागम (६।३।६७) होतो आणि ल्युट्प्रत्यय झाला असतां होत नाहीं.

---

कर्ता शिल्पी असला पाहिजे. पाणिघ म्ह. ताल धरणारा मनुष्य. मल्लविद्येमध्यें कुशल असाही अर्थ या दोन्ही शब्दांचा आहे. ताडघ म्ह. प्रतिमल्लानें केलेला आघात, त्याचें निवारण करणारा, असा ताडघ याचा अर्थ होतो.

१. च्विप्रत्ययाचा अर्थ अभूततद्भाव गम्यमान असून प्रत्यक्ष च्विप्रत्यय ज्याहून केलेला नाहीं असे आढ्य, सुभग, स्थूल, पलित, नग्न, अन्ध, आणि प्रिय हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना कृधातूहून करण या अर्थी ख्युन्प्रत्यय होतो;

मुमर्थमिति चेन्नाव्ययत्वात् ॥ २ ॥

मुमर्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । अव्ययत्वात् । अनव्ययस्य मुमुच्यते च्व्यन्तं चाव्ययसंज्ञम् ॥

उत्तरार्थं तु ॥ ३ ॥

उत्तरार्थं तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । कर्तरि भुवः खिष्णुच्खुकञौ [३.२.५७] अच्वावित्येव । आढ्यीभविता ॥ अथेदानीमनेन मुक्ते ताच्छीलिक इष्णुज्विधीयते सोऽत्र कस्मान्न भवति । रूढिशब्दप्रकारास्ताच्छीलिका न च रूढिशब्दा गतिभिर्विशेष्यन्ते । न हि भवति देवदत्तः प्रदेवदत्त इति ॥

कर्तरि भुवः खिष्णुच्खुकञौ ॥ ३ । २ । ५७ ॥

किमर्थं खिष्णुजिकारादिः क्रियते न स्नुरित्येवोच्येत । तत्रायमप्यर्थः स्वरार्थश्चकारो न कर्तव्यो भवति ॥ केनेदानीमिकारादित्वं क्रियते ।

इष्णुच इकारादित्वमुदात्तत्वात्कृतं

---

(वा.२) मुमागमाकरितां उपपद च्विप्रत्ययान्त नसावें हा प्रतिषेध केला पाहिजे, असें म्हणणें असेल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें की च्विप्रत्ययान्त शब्दाला अव्ययसंज्ञा आहे, आणि मुमागम तर अव्ययभिन्न शब्दाला सांगितला आहे.

(वा.३) येथें च्विप्रत्ययान्त उपपद नसावें असा अच्वौ हा जो प्रतिषेध केला आहे तो पुढील सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरितां केला आहे. 'कर्तरि भुवः खिष्णुच्खुकञौ' या पुढील सूत्रामध्यें अच्वौ या पदाची अनुवृत्ति आहे. त्यामुळें आढ्यीभविता येथें खिष्णुच्, खुकञ्, हे प्रत्यय होत नाहींत.

पण आढ्यीभविता येथें खिष्णुच्, खुकञ्, हे प्रत्यय झाले नाहींत; तेव्हां ताच्छीलिक इष्णुच्प्रत्यय (३।२।१३८) जो सांगितला आहे तो कां बरें होत नाहीं ?

ताच्छीलिकप्रत्ययान्त शब्द हे रूढिशब्दासारखे समजले जातात, आणि रूढिशब्दाच्या मागें तर गतिसंज्ञक शब्द लावतां येत नाहीं. असें पहा की देवदत्त हा रूढिशब्द आहे, त्याच्या मागें प्र लावून प्रदेवदत्तः असा प्रयोग झालेला कोठेंही दृष्टीस पडत नाहीं.

(सू.५७) येथें खिष्णुच् असा इकारादि प्रत्यय कशाकरितां केला आहे ? तो तसा करूं नये. स्नु असाच प्रत्यय सांगावा. इकारादि प्रत्यय केला नाहीं म्हणजे सहजच दुसरी गोष्ट अशी साधते की चकार स्वराकरितां जो लावला आहे तोही लावावयास नको.

पण स्नुप्रत्यय केला तर त्याच्या मागें इकार कोठून येईल ?

भूधातु उदात्त असल्यामुळें इडागम (७।२।३५) होऊन इष्णुच् असा इकारादि

---

उदा० अनाढ्यम् आढ्यं कुर्वन्ति अनेन आढ्यंकरणम्; वस्तुतः संपन्न नसलेला मनुष्य ज्याच्या योगानें संपन्न आहे असा भासतो असा अलंकार वगैरे.

२. कारण गतिसंज्ञकाचा अन्वय धात्वर्थक्रियेवर होत असतो. क्रियेची प्रतीति योगार्थामुळें होते, आणि रूढिशब्दस्थलीं योगापेक्षां रूढि प्रबल असल्यामुळें योगार्थ प्रतीतच होत नाहीं, म्हणून तेथें गतिसंज्ञक शब्दाचा योग होत नाहीं. च्विप्रत्ययान्त हें गतिसंज्ञक आहे. त्याचा अन्वय नेहमीं क्रियेवरच होत असतो.

१. च्विप्रत्ययाचा अर्थ गम्यमान होत असून प्रत्यक्ष च्विप्रत्यय ज्याहून केलेला नाहीं असे आढ्य वगैरे शब्द सुबन्त उपपद असतांना भूधातूहून कर्ता या अर्थी खिष्णुच् आणि खुकञ् हे प्रत्यय होतात; उदा० अनाढ्य आढ्यो भवति आढ्यंभविष्णुः, आढ्यंभावुकः.

२. आद्युदात्त स्वराचा (३।१।३) बाध करून अन्तोदात्त स्वर (६।१।१६३) व्हावा याकरितां चकार लावावयाचा असतो. परंतु येथें इकार काढून स्नु असा एकाच् प्रत्यय सांगितला तर आद्युदात्त आणि अन्तो-

भुवः ।

भवतेरुदात्तत्वादिकारादित्वं भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । खिदयं क्रियते तत्र चर्त्वे कृते संदेहः स्यात्किद्वा खिद्वेति । संदेहमात्रमेतद्भवति सर्वसंदेहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमिति खिदिति व्याख्यास्यामः ॥

**नञस्तु स्वरसिद्ध्यर्थमिकारादित्वमिष्णुचः ॥**

इदं तर्हि प्रयोजनं कृत्योकेष्णुच्चार्वादयश्च [६.२.१६०] इत्येष स्वरो यथा स्यात् ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अयमपीटि कृते षत्वे चेष्णुज्भविष्यति ॥ न सिध्यति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति । अथवासिद्धं खल्वपि षत्वं षत्वस्यासिद्धत्वादिस्नुजेव भवति ॥

**इष्णुच इकारादित्वमुदात्तत्वात्कृतं भुवः ।**

**नञस्तु स्वरसिद्ध्यर्थमिकारादित्वमिष्णुचः ॥ १ ॥**

**स्पृशोऽनुदके क्विन् ॥ ३ । २ । ५८ ॥**

किमर्थो नकारः । स्वरार्थः । ञ्नितीत्याद्युदात्तत्वं यथा स्यात् ॥ नैतदस्ति

---

होईल.

तर मग खिष्णुच्प्रत्यय सांगण्याचा असा उपयोग समजावा की या प्रत्ययाच्या आरंभीं इत्संज्ञक खकार लावला आहे. जर इकार उच्चारला नाहीं तर त्या खकाराला चर्त्वानें (८।४।५५) ककार होऊन क्स्नु असें उच्चारावें लागेल. आणि तसें उच्चारलें तर हा इत्संज्ञक वर्ण मूळचा ककार आहे किंवा मूळचा खकार असून चर्त्वानें ककार झाला आहे असा संशय येतो, तेव्हां तो संशय उत्पन्न होऊं नये म्हणून इकार उच्चारला आहे.

हा संशय जरी येतो तरी तो नांवालाच आहे. कारण 'सर्वच ठिकाणीं संशय उत्पन्न झाला असतां तेथें शिष्ट लोकांनीं केलेल्या व्याख्यानावरून तेथें त्यांतील एक बाजू कायम करावी. संशय येतो या सबबीवर तें शास्त्र निरुपयोगी आहे असें कधींही समजूं नये,' या परिभाषेमुळें येथें हा प्रत्यय मूळचा खकारादि आहे असें समजतां येईल.

तर मग खिष्णुच्प्रत्यय सांगण्याचा असा उपयोग समजावा की 'कृत्योकेष्णुच्चार्वादयश्च' (६।२।१६०) यानें सांगितलेला नञाच्या पुढील इष्णुच्प्रत्ययान्त उत्तरपदाला अन्तोदात्त झाला पाहिजे.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण स्नुप्रत्यय मूळचा सांगितला असला तरी त्याला इडागम आणि सकाराला षत्व केलें असतां इष्णुच् असा होत आहेच.

परंतु अशा रीतीनें सिद्धि होणार नाहीं. कारण 'लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त या दोहोंमध्यें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें', या परिभाषेनें असला इडागम आणि षत्व होऊन बनलेला इष्णुच्प्रत्यय तेथें घेतां येणार नाहीं. अथवा हा इष्णुच्च खरोखर होत नाहीं. कारण षत्व (८।३।५९) असिद्ध (८।२।१) असल्यामुळें हा इस्नुच्च स्वराच्या दृष्टीनें समजला जात आहे.

(सू.५८) येथें क्विन्प्रत्ययाला नकार कशाकरितां जोडला आहे ?

स्वराकरितां जोडला आहे. 'ञ्नितिo' (६।१।१९७)या सूत्रानें नित्प्रत्ययान्त शब्दाला आद्युदात्त झाला पाहिजे.

---

दात्त यांमध्यें कांहीं फरकच होत नसल्यामुळें चकाराचा कांहीं उपयोग येत नाहीं.

१. उदकशब्दाशिवाय इतर सुबन्त शब्द उपपद असतांना स्पृश्धातूहून क्विन्प्रत्यय होतो; उदा० घृतं स्पृशति घृतस्पृक्, मन्त्रेण स्पृशति मन्त्रस्पृक्.

प्रयोजनम् । एकाचोऽयं विधीयते तत्र नार्थः स्वरार्थेन नकारेणानुबन्धेन । धातुस्वरेणैव सिद्धम् ॥ यस्तर्ह्यनेकाच् दधृगिति । वक्ष्यत्येतद्धृषेर्द्विर्वचनमन्तोदात्तत्वं च निपात्यत इति ॥ विशेषणार्थस्तर्हि । क विशेषणार्थेनार्थः । क्विन्प्रत्ययस्य कुः [८.२.६२] इति । क्विप्रत्ययस्य कुरित्युच्यमाने संदेहः स्यात्क्विवैष प्रत्ययः क्विब्वेति । संदेहमात्रमेतद्भवति सर्वसंदेहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमिति क्विप्रत्ययस्येति व्याख्यास्यामः ॥

**ऋत्विग्दधृक्स्रग्दिगुष्णिगञ्चुयुजिक्रुञ्चां च ॥ ३ । २ । ५९ ॥**[1]

दधृगिति किं निपात्यते ।

**धृषेर्द्विर्वचनमन्तोदात्तत्वं च ॥ १ ॥**

धृषेर्द्विर्वचनमन्तोदात्तत्वं च निपात्यते ॥

---

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण हा क्विन्प्रत्यय एकाच् धातूहून सांगितला आहे. तेव्हां तेथें आद्युदात्त होण्याकरितां नकार लावण्याचा कांहींच उपयोग होत नाहीं. कारण धातुस्वरानें(६।१।१६२)च सिद्ध[2] होत आहे.

तर मग अनेकाच् धातूकरितां नकार पाहिजे. पुढील सूत्रानें हा क्विन्प्रत्यय करूनच दधृक् असा अनेकाच् शब्द साधला आहे.

हाही उपयोग नाहीं. कारण धृष्धातूला द्वित्व आणि अन्तोदात्त स्वर हीं दोन्ही कार्यें निपातनामुळें होतात असें तेथें सांगावयाचेंच आहे.

तर मग नकारेत्संज्ञक असें विशेषण लागण्याकरितां तेथें नकार जोडला आहे.

असा विशेषण लागण्याचा उपयोग कोठें बरें होतो ?

क्विन्प्रत्ययस्य कुः (८।२।६२) येथें होतो. जर तेथें नकार न उच्चारतां क्विप्रत्ययस्य कुः असें म्हटलें तर तेथें हा क्विप्रत्यय घ्यावयाचा आहे किंवा क्विप्प्रत्यय घ्यावयाचा आहे असा संशय येतो.

जरी हा संशय येतो तरी तो नांवाचाच आहे. कारण सर्वच ठिकाणीं कोठेंही संशय आला तरी 'शिष्टांनीं केलेल्या व्याख्यानावरून एक बाजू ठरवावी, संशय येतो या सबबीवर तें शास्त्र निरुपयोगी समजूं नये,' या परिभाषेनें तेथें हा क्विप्रत्ययच घ्यावयाचा असें समजतां येईल.

(सू.५९) दधृक् या शब्दामध्यें काय बरें निपातन केलें आहे ?

(वा.१) धृष्धातूहून क्विन्प्रत्यय, धातूला द्वित्व आणि अंतोदात्त स्वर हीं कार्यें निपातित केलीं जातात.

---

२. धातुस्वरानें अन्त उदात्त होणार. परंतु धातु एकाच् असल्यामुळें धातूला अन्त उदात्त झाला काय आणि क्विन्प्रत्ययान्ताला आद्युदात्त झाला काय एकालाच होणार आहे. प्रत्ययामध्यें अच् मुळींच नसल्यामुळें येथें प्रत्ययस्वराची प्राप्तिच नाहीं. त्यामुळें पूर्वी झालेला धातुस्वर कायमच राहणार आहे.

१. ऋत्विक्, दधृक्, स्रक्, दिक् आणि उष्णिक् हे पांच शब्द क्विन्प्रत्ययान्त निपातित केले आहेत. ऋत्विक् येथें ऋतुशब्द उपपद असतांना यज्धातूहून क्विन्प्रत्यय केला आहे ऋतौ यजति ऋत्विक्. दधृक् येथें धृष्धातूहून क्विन्, द्वित्व आणि अन्त उदात्त झाला आहे. धृष्णोतीति दधृक्. स्रक् येथें सृज्धातूहून कर्म या अर्थी क्विन्प्रत्यय आणि धातूला अमागम झाला आहे. सृज्यते इति स्रक्. दिक् येथें दिश्धातूहून कर्म या अर्थी क्विन्. दिश्यते इति दिक्. उष्णिक् येथें उत्उपसर्गपूर्वक ष्णिह्धातूहून क्विन्, उत् याच्या तकाराचा लोप आणि धातूच्या सकाराला षत्व झालें आहे. सुबन्त उपपद असतांना अञ्च्धातूहून क्विन् होतो. युज्धातूहून क्विन्. येथें सुबन्त उपपद पाहिजे ही अट नाहीं. क्रुञ्च्धातूहून क्विन्प्रत्यय होतो आणि धातूच्या नकाराचा लोप

## त्यदादिषु दृशोऽनालोचने कञ्च ॥ ३ । २ । ६० ॥

किमर्थो ञकारः । स्वरार्थः । ञ्नितीत्याद्युदात्तत्वं यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । नकारेणाप्येष स्वरः सिद्धः ॥ विशेषणार्थस्तर्हि भविष्यति । क विशेषणार्थेनार्थः । कञ्करबिति । कन्करबिति ह्युच्यमाने याचितिका अत्रापि प्रसज्येत ॥

## दृशेः समानान्ययोश्चोपसंख्यानम् ॥ १ ॥

दृशेः समानान्ययोश्चोपसंख्यानं कर्तव्यम् । सदृक् सदृशः । अन्यादृक् अन्यादृशः ॥

## कृदर्थानुपपत्तिस्तु ॥ २ ॥

कृदर्थस्तु नोपपद्यते । दृशेः कर्तरि प्राप्नोति ॥

## इवार्थे तु तद्धितः ॥ ३ ॥

इवार्थेऽयं तद्धितो द्रष्टव्यः । स इवायं तादृक् । अन्य इवायमन्यादृक् ॥ अथवा युक्त एवात्र कृदर्थः । कर्मकर्तायम् । तमिवेमं पश्यन्ति जनाः सोऽयं स इव दृश्यमानस्तमिवात्मानं पश्यति । तादृक् । अन्यमिवेमं पश्यन्ति जनाः सोऽयमन्य

---

(सू.६०) ह्या कञ्प्रत्ययाला ञकार इत्संज्ञक कशाकरितां लावला आहे ?

स्वराकरितां लावला आहे. ञ्निति (६।१।१९७) या सूत्रानें ञित्प्रत्ययान्त शब्दाला आद्युदात्त सांगितला आहे तो येथें झाला पाहिजे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण नकार लावला तरी तो स्वर[२] सिद्ध होतो.

तर मग ञकारेत्संज्ञक असें विशेषण लागण्याकरितां येथें ञकार लावला आहे.

असा विशेषण लागण्याचा उपयोग कोठें बरें होतो ?

कञ्करप् (४।१।१५) येथें होतो. जर तेथें कन्करप् असें उच्चारलें तर याचिका[३] येथेंही ङीप्प्रत्यय होऊं लागेल.

(वा.१) समान[१] आणि अन्य हे शब्द उपपद असतांना दृश्धातूहून कञ् आणि क्विन् हे प्रत्यय होतात असें म्हणावें; उदा० सदृक् सदृशः, अन्यादृक् अन्यादृशः.

(वा.२) वरील उदाहरणांमध्यें दृश्धातूहून केलेला कृत्प्रत्यय कर्ता या अर्थी प्राप्त होतो, पण तो कृत्प्रत्ययाचा अर्थ येथें जुळत नाहीं.

(वा.३) येथें इव या अर्थी तद्धितप्रत्यय सांगितला पाहिजे. कारण तादृक्, तादृशः, या शब्दांपासून त्यासारखा हा असा अर्थ मनांत येतो.

अथवा येथें कृत्प्रत्ययाचा अर्थ बरोबर जुळतोच. तो असा की हा कर्मकर्ता आहे. ह्या देवदत्ताला त्या यज्ञदत्तासारखा लोक पाहतात, हा प्रथमप्रयोग होय. नंतर लोक या कर्त्यांची अविवक्षा करून हा देवदत्त आपणच आपल्याला यज्ञदत्तासारखा पाहतो अशी विवक्षा केली असतां तादृक्, तादृशः, ह्या कृत्प्रत्ययान्त शब्दांचा बरोबर अर्थ जुळतो. तमिवात्मानं पश्यतीति तादृक्, असा विग्रह आहे. तसेंच, ह्या देवदत्ताला लोक अन्यासारखे पाहतात, हा प्रथमप्रयोग होय. नंतर लोक या कर्त्यांची अविवक्षा करून हा देव-

---

(६।४।२४) होत नाहीं.

१. ज्ञानार्थक नव्हे अशा दृश्धातूहून कञ् आणि क्विन् असे प्रत्यय होतात, त्यद् वगैरे शब्द उपपद असतांना; उदा० त्यादृशः तादृक्, तादृशः तादृक्.

२. क्विन्प्रत्ययाप्रमाणें ह्या प्रत्ययालाही नकारच लावावा, बदलण्याचें कारण दिसत नाहीं.

३. येथें यावशब्दाहून कन्प्रत्यय (५।४।२९) झाला आहे.

४. तादृक्, तादृश, वगैरे शब्दांपासून त्यासारखा इतकाच अर्थ मनांत येत आहे.

इव दृश्यमानोऽन्यमिवात्मानं पश्यति। अन्यादृगिति ॥

**सत्सूद्विषद्रुहदुहयुजविदभिदच्छिदजिनीराजामुपसर्गेऽपि क्विप् ॥ ३ । २ । ६१ ॥**

**सदादिषु सुब्ग्रहणम् ॥ १ ॥**

सदादिषु सुब्ग्रहणं कर्तव्यम्। होता वेदिषत्। अतिथिर्दुरोणसत्॥ न तर्हीदानीमुपसर्गेऽपीति वक्तव्यम्। वक्तव्यं च। किं प्रयोजनम्। ज्ञापकार्थम्। किं ज्ञाप्यम्। एतज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र सुब्ग्रहण उपसर्गग्रहणं न भवतीति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। वदः सुप्यनुपसर्गग्रहणं चोदितं तन्न वक्तव्यं भवति ॥

[ **भजो ण्विः ३ । २ । ६२ ॥**

**छन्दसि सहः ॥ ३ । २ । ६३ ॥**

**वहश्च ॥ ३ । २ । ६४ ॥**

**कव्यपुरीषपुरीष्येषु ञ्युट् ॥ ३ । २ । ६५ ॥**

**हव्येऽनन्तःपादम् ॥ ३ । २ । ६६ ॥**

**जनसनखनक्रमगमो विट्**

---

दत्त आपणच आपल्याला दुसऱ्यासारखा पाहतो अशी विवक्षा केली असतां अन्यादृक्, अन्यादृशः, ह्या कञ्प्रत्ययान्त शब्दांचा अर्थ बरोबर जुळतो.

(सू.६१,वा.१) सद् वगैरे धातूंहून हा जो क्विप्प्रत्यय सांगितला आहे तो सुबन्त उपपद असतांना होतो असें म्हणावें; उदा० होता वेदिषत्, अतिथिर्दुरोणसत्.

तर मग आतां ह्या प्रकृतसूत्रामध्यें 'उपसर्गेऽपि' असें म्हणावयास नको.

त्याचा काय उपयोग?

ज्ञापन करणें हा त्याचा उपयोग आहे.

ज्ञापनानें कोणती गोष्ट सुचवावयाची आहे?

आचार्य असें सुचवितात की इतर ठिकाणीं कोठेंही सुब्ग्रहण केलें असेल तर तेथें सुबन्त म्हणून उपसर्गाचें ग्रहण करूं नये.

ह्या ज्ञापकाचा काय उपयोग?

उपयोग असा की वदः सुप्यनुपसर्गग्रहणम् (३।१।१०६, वा.१) असें जें वार्तिककारांनीं म्हटलें आहे तें म्हणावयास नको.

---

१. सद्, सू, द्विष्, द्रुह्, दुह्, युज्, विद्, भिद्, छिद्, जि, नी, आणि राज् या धातूंहून सुबन्त उपपद असतांना क्विप्प्रत्यय होतो, तें सुबन्त उपपद उपसर्ग असो किंवा इतर असो; उदा० वेदिषत्, प्रसूः.

२. कर्मवाचक उपपद पाहिजे असा आग्रह धरूं नये. हें तात्पर्य आहे. वेद्यां सीदतीति वेदिषत्. दुरोणे सीदतीति दुरोणसत्. वेदि म्ह. कर्म करण्याकरितां संस्कार केलेली भूमि. दुरोण म्ह. गृह.

१(६२)उपसर्ग किंवा इतर सुबन्त उपपद असतांना भज्धातूहून ण्विप्रत्यय होतो;उदा० अंशभाक्, प्रभाक्.

(६३) उपसर्ग किंवा इतर सुबन्त उपपद असतांना सह्धातूहून वेदामध्यें ण्विप्रत्यय होतो; उदा० तुरं सहते तुराषाट्. येथें तुरशब्दाच्या अकाराला दीर्घ (६।३।१३७) आणि सह्धातूच्या सकाराला षत्व (८।३।५६) झालें आहे.

(६४) उपसर्ग किंवा इतर सुबन्त उपपद असतांना वेदामध्यें वह्धातूहून ण्विप्रत्यय होतो; उदा० दित्यवाट्.

(६५) कव्य, पुरीष हे शब्द उपपद असतांना वेदामध्यें वह्धातूहन ञ्युट्प्रत्यय होतो; उदा० कव्यं वहतीति कव्यवाहनः. ञ्युट्प्रत्ययाचा ञकार इत्संज्ञक आहे म्हणून वृद्धि (७।२।११६) होते. यु याला अनादेश (७।१।१) झाला आहे.

(६६) हव्यशब्द उपपद असतांना वेदामध्यें वह्धातूहून ञ्युट्प्रत्यय होतो, परंतु तो शब्द पादाच्या शेवटीं असला पाहिजे; उदा०अग्निश्च हव्यवाहनः.

(६७) उपसर्ग किंवा इतर सुबन्त उपपद असतांना जन्, सन्, खन्, क्रम् आणि गम् या धातूंहून विट्प्रत्यय होतो, वेदामध्यें; उदा० अब्जाः, गोषाः, विसखः, दधिक्राः, अग्रेगाः, या उदाहरणांमध्यें

॥ ३ । २ । ६७ ॥]

**अदोऽनन्ने क्रव्ये च॥३।२।६८-६९॥**

किमर्थमिदमुच्यते नादोऽनन्न इत्येव सिद्धम्। न सिध्यति। छन्दसीत्येतदनुवर्तते भाषार्थोऽयमारम्भः। पूर्वस्मिन्नेव योगे छन्दोग्रहणं निवृत्तम्। तच्चावश्यं निवर्त्यमामादित्येवमर्थम्॥ अत उत्तरं पठति।

**अदोऽनन्ने क्रव्येग्रहणं वासरूपनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

अदोऽनन्ने क्रव्येग्रहणं क्रियते वासरूपो मा भूदिति॥

[**दुहः कब्घश्च ॥ ३ । २ । ७० ॥**]

**मन्त्रे श्वेतवहोक्थशस्पुरोडाशो ण्विन् ॥ ३ । २ । ७१ ॥**

**श्वेतवहादीनां डस् ॥ १ ॥**

श्वेतवहादीनां डस्वक्तव्यः। श्वेतवा इन्द्रः॥

**पदस्य च ॥ २ ॥**

पदस्येति च वक्तव्यम्। इह मा भूत्।

---

(सू. ६८, ६९) हें सूत्र कशाकरितां केलें आहे? तें करावयास नको. अदोऽनन्ने ह्या पूर्वसूत्रानेंच सिद्ध होत आहे.

त्यानें सिद्ध होत नाहीं. कारण तेथें छन्दसि याची अनुवृत्ति आहे. तेव्हां लोकांमध्यें क्रव्यात् असा प्रयोग होण्याकरितां हें सूत्र केलें आहे.

पण अदोऽनन्ने येथेंच छन्दसि हें पद निवृत्त होत आहे. आणि तेथें तर छन्दसि हें पद अवश्य निवृत्त केलेंच पाहिजे. कारण आमात्, सस्यात्, असे प्रयोग लोकांमध्येंही झाले पाहिजेत.

हें मनांत घेऊन वार्तिककार म्हणतातः—

(वा. १) अदोऽनन्ने यानें सिद्ध होत असतां क्रव्ये च हें जें सूत्र केलें आहे तें 'वाऽसरूप०' (३।१।९४) ही परिभाषा येथें प्रवृत्त होऊं नये याकरितां केलें आहे.

(सू.७१, वा.२) श्वेतवह् वगैरे चौघांहून डस्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० श्वेतवाः, इन्द्रः.

(वा. २) त्या डस्प्रत्ययान्त शब्दाला पदसंज्ञा होत असेल तरच तेथें डस्प्रत्यय होतो. कारण श्वेतवाहौ, श्वेतवाहः, येथें डस्प्रत्यय न झाला पाहिजे.

---

धातुच्या शेवटच्या वर्णाला आत्व (६।४।४१) झालें आहे.

१. अन्नशब्दाशिवाय इतर सुबन्त शब्द उपपद असतांना अद्धातूहून विट्प्रत्यय होतो; उदा० आममत्ति आमात्.

१. क्रव्य शब्द उपपद असतांना अद्धातूहून विट्प्रत्यय होतो; उदा० क्रव्यात्.

२. वासरूपपरिभाषा येथें आली तर एकदा अण्प्रत्यय होऊन क्रव्याद असा प्रयोग होऊं लागेल. क्रव्य म्ह. अपक्व मांस. आतां क्रव्याद असा जो लोकामध्यें प्रयोग दृष्टीस पडतो ते एक पक्व मांस शब्द उपपद असतांना अद्धातूहून अण्प्रत्यय आणि उपपदाला क्रव्यादेश (६।३।१०९) झाला आहे. त्यामुळें त्याचा अर्थ पक्वमांस खाणारा असा आहे.

१. सुबन्त उपपद असतांना दुह्धातूहून कप्प्रत्यय होतो आणि दुह्धातूच्या हकाराला घकारादेश होतो; उदा० कामान् दुग्धे कामदुघा.

१. मन्त्रामध्यें श्वेतवह्, उक्थशस् आणि पुरोडाश् यांहून ण्विन्प्रत्यय होतो. येथें ण्विन्प्रत्ययाच्या श्वेतवह् वगैरे तीन प्रकृतींचें निपातन केलें आहे. कर्तृवाचक श्वेतशब्द उपपद असतांना वह्धातूहून कर्म या अर्थी वह्धातूहून ण्विन्प्रत्यय होतो. श्वेताः वहन्ति एनम् स श्वेतवाट् इन्द्रः. कर्मवाचक किंवा करणवाचक उक्थशब्द उपपद असतांना शंस्धातूहून कर्ता या अर्थी ण्विन्प्रत्यय होतो. निपातनामुळें शंस्धातूच्या नकाराचा लोप होतो. उक्थानि शंसति उक्थैर्वा शंसति उक्थशाः यजमानः. उक्थ म्हणजे एक प्रकारचें साम. पुरस्शब्द उपपद असतांना दाश्धातूहून कर्म या अर्थी ण्विन् प्रत्यय होतो. निपातनामुळेंच धातूच्या दकाराला

श्वेतवाहौ श्वेतवाहः ॥ किं प्रयोजनम् ।

रुर्वर्थम् ॥ ३ ॥

रुर्यथा स्यात् ॥ क्रियते र्वर्थं निपातनम् अवयाः श्वेतवाः पुरोडाश्च [८.२.६७] इति । अतश्च र्वर्थम् उक्थशस्शब्दस्य सामान्येन रुः सिद्धो न तस्य निपातनं क्रियते । तन्न वक्तव्यम् । अवश्यं तद्वक्तव्यं दीर्घार्थम् । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धमत्र दीर्घत्वमत्वसन्तस्य चाधातोः [६.४.१४] इति । यत्र तेन न सिध्यति तदर्थम् । क्व च तेन न सिध्यति । संबुद्धौ । हे श्वेतवा इति ॥ न तर्हीदानीं डस्वक्तव्यः । वक्तव्यश्च । किं प्रयोजनम् । उत्वार्थम् । श्वेतवोभ्याम् श्वेतवोभिः ॥

[अवे यजः ॥ ३ । २ । ७२ ॥

विजुपे छन्दसि ॥ ३ । २ । ७३ ॥

आतो मनिन्क्वनिब्वनिपश्च ॥ ३ । २ । ७४ ॥

अन्येभ्योऽपि दृश्यन्ते ॥ ३ । २ । ७५ ॥

क्विप् च ॥ ३ । २ । ७६ ॥]

स्थः क च ॥ ३ । २ । ७७ ॥

किमर्थं स्थः ककिपावुच्येते न क्विप्सिद्धोऽन्येभ्योऽपि दृश्यते [३.२.१७८]

---

पण श्वेतवाः येथें तरी डस्प्रत्ययाचा काय बरें उपयोग होतो ?

(वा. ३) रुत्व होण्याकरितां डस्प्रत्यय सांगितला आहे.

पण अवयाःश्वेतवाःपुरोडाश्च (८।२।६७) असें निपातन रुत्वाकरितां केलेंच आहे ना ! आणि तें निपातन रुत्वाकरितांच केलें आहे म्हणूनच उक्थशस्शब्दाचें निपातन येथें नाहीं. कारण उक्थशस्शब्दाला रुत्व दुसऱ्या सूत्रानेंच (८।२।६६) सिद्ध होत आहे.

पण येथें डस्प्रत्यय सांगितला म्हणजे तेथें रुत्वाकरितां निपातन करावयास नको.

तरी पण तेथें तें श्वेतवाः असें दीर्घाकरितां निपातन अवश्य केलेंच पाहिजे.

हा त्या निपातनाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण डस्प्रत्यय केला असतां 'अत्वसन्तस्य च०' (६।४।१४) यानें दीर्घ होईलच.

पण ज्या ठिकाणीं त्यानें दीर्घ होत नाहीं त्याकरितां निपातन केलें पाहिजे ना !

कोठें बरें त्यानें दीर्घ होत नाहीं ?

हे श्वेतवाः या संबुद्धिप्रत्ययाच्या उदाहरणामध्यें.

तर मग आतां तें निपातनच असू दे. येथें डस्प्रत्यय सांगावयास नको.

हा डस्प्रत्ययहि सांगितलाच पाहिजे.

तो कशाकरितां ?

अशाकरितां की श्वेतवोभ्याम्, श्वेतवोभिः, येथें रुत्व होऊन उत्व(६।१।११४)होण्याकरितां.

(सू. ७७) येथें स्थाधातूहून कप्रत्यय आणि क्विप्प्रत्यय कशाकरितां सांगितले आहेत ? ते सांगावयास नकोत, कारण अन्येभ्योऽपि दृश्यते (३।२।१५८) यानें क्विप्-

---

इकार होतो. पुरः दाश्यते दीयते इति पुरोडाः.

१ (७२) मन्त्रामध्यें अवउपसर्गपूर्वक यज्धातूहून ण्विन्प्रत्यय होतो.

(७३) वेदामध्यें उपउपसर्गपूर्वक यज्धातूहून विच्प्रत्यय होतो.

(७४) उपसर्ग किंवा इतर सुबन्त उपपद असतांना आकारान्त धातूहून मनिन्, क्वनिप्, वनिप् आणि विच् हे प्रत्यय वेदामध्यें होतात; उदा० सुदामा, सुपीवा, भूरिदावा, कीलालपाः.

(७५) मनिन् वगैरे प्रत्यय इतर धातूंहूनही झालेले दृष्टीस पडतात.

(७६) धातूहून क्विप्प्रत्यय होतो; उदा० उखास्रत्, लिट्, द्विट्.

१. उपसर्ग किंवा इतर सुबन्त उपपद असतांना स्थाधातूहून क आणि क्विप्प्रत्यय होतात; उदा० शंस्थः, शंस्थाः.

इति कश्चातोऽनुपसर्गे कः [३] इति। न सिध्यति। विशेषविहितः कः सामान्यविहितं क्विपं बाधते। वासरूपेण क्विबपि भविष्यति॥ इदं तर्हि। शंस्थः शंस्थाः। उक्तमेतच्छमि संज्ञायां धातुग्रहणं कृञो हेत्वादिषु टप्रतिषेधार्थमिति। स यथैवाच्टं बाधत एवं कक्विपावपि बाधेत॥

## सुप्यजातौ णिनिस्ताच्छील्ये ॥ ३ । २ । ७८ ॥

सुपीति वर्तमाने पुनः सुब्ग्रहणं किमर्थम्। अनुपसर्ग इत्येवं तदभूत्। इदं सुब्मात्रे यथा स्यात्। प्रत्यासारिण्यः उदासारिण्यः॥

**णिन्विधौ साधुकारिण्युपसंख्यानम् १**

णिन्विधौ साधुकारिण्युपसंख्यानं कर्तव्यम्। साधुकारी साधुदायी॥

**ब्रह्मणि वदः ॥ २ ॥**

ब्रह्मणि वद उपसंख्यानं कर्तव्यम्। ब्रह्मवादिनो वदन्ति॥

## [कर्तर्युपमाने ॥ ३ । २ । ७९ ॥]

## व्रते ॥ ३ । २ । ८० ॥

किमुदाहरणम्। अश्राद्धभोजी। किं

---

प्रत्यय होईल. आणि आतोऽनुपसर्गे कः (३।२।३) यानें कप्रत्यय होईल.

अशा रीतीनें सिद्ध होत नाहीं. कारण सामान्यतः सर्व धातूंहून सांगितलेल्या क्विप्प्रत्ययाचा विशेष धातूहून सांगितलेल्या कप्रत्ययानें बाध होईल ना?

पण बाध झाला तरी 'वाऽसरूप०' (३।१।९४) परिभाषेनें एकदा क्विप्प्रत्यय होईलच.

तर मग शंस्थः, शंस्थाः, येथें कप्रत्यय आणि क्विप्प्रत्यय झाला पाहिजे याकरितां हें सूत्र केलें आहे असें समजावें. नाहीं तर 'शमि संज्ञायां धातुग्रहणं कृञो हेत्वादिषु टप्रतिषेधार्थम्' (३।२।१४, वा.१) असें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यामुळें अच्प्रत्यय (३।२।१४) जसा टप्रत्ययाचा बाध करतो तसा त्या कप्रत्यय आणि क्विप्प्रत्यय यांचाही बाध करील, म्हणून पुनः क आणि क्विप् हे प्रत्यय तेथें होण्याकरितां हें सूत्र केलें आहे.

(सू.७८) येथें सुपि असें मागून (३।२।४) अनुवृत्त येत असतां पुनः कशाकरितां म्हटलें आहे?

त्या सुपिपदानें उपसर्गाशिवाय सुबन्त घेतलें जातें आणि हा णिनिप्रत्यय तर कसलेंही सुबन्त असलें तरी झाला पाहिजे; उदा० उदासारिण्यः, प्रत्यासारिण्यः.

(वा. १) कर्त्यांचा ती क्रिया तशी करण्याचा स्वभाव नसला तरी जर तो ती क्रिया चांगली करीत असेल तर सुबन्त उपपद असतांना धातूहून णिनिप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० साधुकारी, साधुदायी.

(वा. २) ब्रह्मशब्द उपपद असतांना वद्धातूहून णिनिप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० ब्रह्मवादिनो वदन्ति.

(सू. ८०) या सूत्राचें उदाहरण काय? अश्राद्धभोजी हें उदाहरण होय.

पण काय हो, 'श्राद्धेतर अन्न भक्षण करतो'

---

१. जातिशब्द सोडून इतर सुबन्त उपपद असतांना धातूहून कर्ता या अर्थीं णिनिप्रत्यय होतो. परंतु ती क्रिया तशी करण्याचा स्वभाव असला पाहिजे. उष्णभोजी.

२. ब्रह्मप्रतिपादन करण्याचा कर्त्याचा स्वभाव नसला तरी णिनिप्रत्यय होण्याकरितां हीं दोन्ही वार्तिकें केलीं आहेत.

१. कर्तृवाचक उपमान असलेलें सुबन्त उपपद असतांना धातूहून कर्ता या अर्थीं णिनिप्रत्यय होतो; उदा० उष्ट्र इव क्रोशति उष्ट्रक्रोशी. येथें उपपद कर्ता हा प्रत्ययार्थकर्त्याचें उपमान आहे.

१. सुबन्त उपपद असतांना धातूहून णिनि प्रत्यय होतो, त्या शब्दापासून व्रतांतील अवस्था गम्यमान असतांना; उदा० स्थण्डिलशायी.

योऽश्राद्धं भुङ्क्ते सोऽश्राद्धभोजी। किं चातः। यदासावश्राद्धं न भुङ्क्ते तदास्य व्रतलोपः स्यात्। तद्यथा। स्थायी यदा न तिष्ठति तदास्य व्रतलोपो भवति॥ एवं तर्हि णिन्यन्तेन समासो भविष्यति। न श्राद्धभोजी अश्राद्धभोजीति। नैवं शक्यम्। स्वरे हि दोषः स्यात्। अश्राद्धभोजीत्येवं स्वरः प्रसज्येत अश्राद्धभोजीति चेष्यते॥ एवं तर्हि नञ् एवायं भुजिप्रतिषेधवाचिनः श्राद्धशब्देनासमर्थसमासः। न भोजी श्राद्धस्येति। स तर्ह्यसमर्थसमासो वक्तव्यः। यद्यपि वक्तव्योऽथवैतर्हि बहूनि प्रयोजनानि। कानि। असूर्यंपश्यानि मुखानि। अपुनर्गेयाः श्लोकाः। अश्राद्धभोजी ब्राह्मणः। सुडनपुंसकस्य [१.१.४३] इति॥

[बहुलमाभीक्ष्ण्ये॥ ३। २। ८१॥
मनः॥ ३। २। ८२॥]

आत्ममाने खश्च॥ ३। २। ८३॥

आत्मग्रहणं किमर्थम्। परमाने मा भूत्। क्रियमाणेऽप्यात्मग्रहणे परमाने प्राप्नोति। किं कारणम्। आत्मन इतीयं

असा का अश्राद्धभोजी याचा अर्थ आहे?

मग तसा अर्थ असला तर काय होईल?

जेव्हां श्राद्धान्न भक्षण करीत नाहीं, पण श्राद्धेतरही कांहींच भक्षण करीत नाहीं, तेव्हां व्रताचा लोप होईल ना? जसें स्थंडिलावर शयन करणारा जो त्याला स्थंडिलशायी म्हणतात. पण जेव्हां तो स्थंडिलावर शयन करीत नाहीं. तेव्हां त्याच्या व्रताचा लोप होतोच. तसेंच हें होय.

तर मग न श्राद्धभोजी अश्राद्धभोजी असा श्राद्धभोजी या णिन्प्रत्ययान्त शब्दाबरोबर नञ् हा अव्ययाचा समास केला म्हणजे भलता अर्थ मनांत येणार नाहीं.

असें करणें शक्य नाहीं. कारण स्वराच्या संबंधानें दोष येईल. मागून नञ्तत्पुरुष केला तर अव्ययाला पूर्वपदप्रकृतिस्वर (६।२।२) होऊन अश्राद्धभोजी असा आद्युदात्तस्वर होऊं लागेल आणि कृदुत्तरप्रकृतिस्वरानें अश्राद्धभोजी असा अन्तोदात्त इष्ट आहे.

तर मग आतां निषेध हा भोजनक्रियेचाच घेऊन नञाचा समास मात्र श्राद्धशब्दाबरोबर करावयाचा हा असमर्थ समास होय. श्राद्धान्न भक्षण न करणारा असा अर्थ आहे.

पण असमर्थ समास होतो असें वचन केलें पाहिजे.

जरी वचन करावें लागलें तरी हरकत नाहीं. कारण त्याचीं उदाहरणें पुष्कळच आहेत.

तीं कोणतीं?

असूर्यंपश्यानि मुखानि, अपुनर्गेयाः श्लोकाः, अश्राद्धभोजी ब्राह्मणः, सुडनपुंसकस्य.

(सू. ८३) येथें आत्मशब्द कशाकरितां घातला आहे?

दुसरा अमुक तऱ्हेचा आहे असें कर्ता मानीत असेल तर तेथें खश्प्रत्यय न झाला पाहिजे.

पण येथें आत्मशब्द घातला तरी तशा ठिकाणीं खश्प्रत्यय प्राप्त होणारच.

काय कारण?

---

२. मागें (१।१।४३ भाग १. पृष्ठ २५६) पहा.

१. पुनः पुनः ती क्रिया करणें असा अर्थ गम्यमान असेल तर सुबन्त उपपद असतांना धातूहून णिनिप्रत्यय बाहुल्येंकरून करून होतो; उदा० कषायपायिणो गान्धाराः.

१. सुबन्त उपपद असतांना दिवादिगणांतील मन्धातूहून णिनिप्रत्यय होतो; उदा०- दर्शनीयं मन्यते दर्शनीयमानी.

१. मानणें या क्रियेचा विषय आपणच असेल तर सुबन्त उपपद असतांना दिवादिगणांतील मन्धातूहून खश्प्रत्यय किंवा णिनिप्रत्यय होतो; उदा० दर्शनीयमात्मानं मन्यते दर्शनीयंमन्यः, दर्शनीयमानी.

कर्तरि षष्ठी मान इत्यकारो भावे । स यथैवात्मानं मन्यतेऽथापि परमात्मन एवासौ मानो भवति । नैष दोषः । आत्मन इति कर्मणि षष्ठीयम् । कथम् । कर्तृकर्मणोः कृति [२.३.६५] इति । ननु च कर्तर्यपि वा एतेनैव विधीयते तत्र कुत एतत्कर्मणि भविष्यति न पुनः कर्तरीति ॥ एवं तर्हि

**कर्मकर्तरि च ॥ १ ॥**

कर्मकर्तरि चेति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । आत्मन इति कर्मणि षष्ठी । कथम् । कर्तृकर्मणोः कृतीति । ननु चोक्तं कर्तर्यपि वा एतेनैव विधीयते तत्र कुत एतत्कर्मणि भविष्यति न पुनः कर्तरीति । आत्मग्रहणसामर्थ्यात्कर्मणि विज्ञास्यते ॥ एवमपि कर्मकर्तृग्रहणं कर्तव्यं कर्मापदिष्टो यग्यथा स्याच्छ्यन्मा भूदिति । कश्चात्र विशेषो यको वा श्यनो वा । यकि सत्यन्तोदात्तत्वेन भवितव्यं श्यनि सत्याद्युदात्तत्वेन ॥

---

कारण असें की येथें आत्मनः ही कर्ता या अर्थाची षष्ठी (२।३।६५) आहे, आणि मानशब्दामध्यें तर मन्धातूहून अ म्ह. घञ्प्रत्यय भाव या अर्थी केला आहे. तेव्हां कर्ता हा आपल्या स्वतःसंबंधानें मी अमुक तऱ्हेचा आहें असें मानीत असेल किंवा दुसरा अमुक तऱ्हेचा आहे असें मानीत असेल तरी मानणें ही क्रिया कर्त्याची त्याच्या स्वतःवरच आहे.

हा दोष येत नाहीं. कारण आत्मनः ही षष्ठी कर्म या अर्थाची (२।३।६५) आहे.

ती कशी ?

अशी की कर्तृकर्मणोः कृति (२।३।६५) या सूत्रानें कर्म या अर्थी षष्ठी सांगितलेली आहे.

पण कर्ता या अर्थीही त्याच सूत्रानें सांगितली आहे ना ? मग येथें कर्म या अर्थीच षष्ठी घ्यावयाची आणि कर्ता या अर्थी घ्यावयाची नाहीं असें कशावरून ?

तर मग

(वा. १) हा खश्प्रत्ययच मुळीं कर्मकर्ता या अर्थी होतो. असें म्हणावें.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

वचन करावयास नको. कारण आत्मनः ही षष्ठी कर्म या अर्थी घ्यावी म्हणजे काम भागेल.

ती कशी ?

'कर्तृकर्मणोः कृति' या सूत्रानें कर्म या अर्थी षष्ठी सांगितली आहे.

पण कर्ता या अर्थीही षष्ठी त्याच सूत्रानें सांगितली आहे. मग येथें कर्म या अर्थीच षष्ठी घ्यावयाची आणि कर्ता या अर्थी घ्यावयाची नाहीं असें कशावरून, असें आतांच म्हटलें आहे ना ?

तर मग येथें आत्मशब्द घातला आहे त्या जोरावर कर्म या अर्थीच षष्ठी येथें घ्यावयाची आहे.

तरी पण कर्मकर्ता या अर्थी खश्प्रत्यय होतो असें येथें म्हटलेंच पाहिजे. कारण कर्मवद्भावानें (३।१।८७) यक्विकरणप्रत्यय मध्यें झाला पाहिजे; श्यन्प्रत्यय (३।१।६९) न झाला पाहिजे.

पण येथें मध्यें विकरणभूत यक्प्रत्यय झाला काय किंवा श्यन्प्रत्यय झाला काय, त्यांमध्यें काय फरक होईल ?

यक् झाला असतां मन्य हा शब्द अन्तोदात्त (३।१।३) होईल, आणि श्यन् झाला असतां आद्युदात्त (६।१।१९७) होईल.

---

२. कारण कर्ता या अर्थी षष्ठी घेतली तर आत्ममानेय या म्हणण्याचा कांहींच उपयोग होत नाहीं.

श्यन्यपि सत्यन्तोदात्तत्वेनैव भवितव्यम्। कथम्। खशः स्वरः श्यनः स्वरं बाधिष्यते। सति शिष्टत्वाच्छ्यनः स्वरः प्राप्नोति। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति सति शिष्टोऽपि विकरणस्वरः सार्वधातुकस्वरं न बाधत इति यदयं तासेः परस्य लसार्वधातुकस्यानुदात्तत्वं शास्ति। लसार्वधातुक एतज्ज्ञापकं स्यात्। नेत्याह। अविशेषेण ज्ञापकम्॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य द्वितीये पादे प्रथममाह्निकम्॥

असें नाहीं. श्यन्प्रत्यय झाला तरी अन्तोदात्तच होणार आहे.

तो कसा ?

असा की खश्प्रत्ययाचा स्वर (३।१।३) श्यन्प्रत्ययामुळें होणाऱ्या आद्युदात्त स्वराचा बाध करील.

पण श्यन्प्रत्ययामुळें होणारा आद्युदात्त स्वर खश्प्रत्ययाच्या स्वरापेक्षां मागून प्राप्त होत असल्यामुळें तोच प्रबल होत आहे ना ?

विकरणप्रत्ययाचा स्वर हा जरी सतिशिष्ट म्ह. मागून येणारा आहे तरी तो पुढील सार्वधातुक प्रत्ययाच्या स्वराचा बाध करीत नाहीं, असें तास्प्रत्ययाच्या पुढील लसार्वधातुकप्रत्ययाला जो अनुदात्त सांगितला आहे (६।१।१८६) त्या आचार्यांच्या कृतीवरून सूचित होत आहे.[1]

पण तें ज्ञापक लसार्वधातुकप्रत्ययापुरतेंच समजलें जाईल.

असें नाहीं. मोघम सार्वधातुक प्रत्ययांसंबंधानें ज्ञापक घेतां येतें.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

१. नाहीं तर तास् या विकरणप्रत्ययाचा स्वर प्रबळ झाला तर त्याच्याबरोबर शेषनिघातानें (६।१।१५८) पुढील लसार्वधातुक प्रत्यय आपोआपच अनुदात्त होत असल्यामुळें अनुदात्ताचे विधान व्यर्थ होईल.

## भूते ॥ ३।२।८४॥

भूत इत्युच्यते कस्मिन्भूते। काले। न वै कालाधिकारोऽस्ति॥ एवं तर्हि धातोः [३.१.९१] इति वर्तते धातौ भूते। धातुर्वै शब्दो न च शब्दस्य भूतभविष्यद्वर्तमानतायां संभवोऽस्ति। शब्देऽसंभवादर्थे कार्यं विज्ञास्यते। कः पुनर्धात्वर्थः। क्रिया। क्रियायां भूतायाम्॥ यद्येवं

**निष्ठायामितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः १**

निष्ठायामितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः। केतरेतराश्रयता। भूतकालेनायं शब्देन निर्देशः क्रियते निर्देशोत्तरकालं च भूतकालता तदेतदितरेतराश्रयं भवति। इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते॥

**अव्ययनिर्देशात्सिद्धम्॥ २॥**

अव्ययवता शब्देन निर्देशः करिष्यते। अवर्तमानेऽभविष्यतीति॥ स तर्ह्यव्ययवता शब्देन निर्देशः कर्तव्यः। न कर्तव्यः। अव्ययमेष भूतेशब्दो नैषा भवतेर्निष्ठा। कथमव्ययत्वम्। विभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च निपाता भवन्तीति निपात-

---

(सू.८४) येथें भूते असें म्हटलें आहे. परंतु भूत कोण घ्यावयाचा?

भूतकाल घ्यावयाचा.

पण येथें काले असा अधिकार केलेला दिसत नाहीं.

तर मग येथें धातोः असा अधिकार येत आहे. त्याचेकडे भूते हें पद लावावें.

पण धातु हें नांव भू, एध् वगैरे शब्दांचें आहे, आणि शब्दाला तर भूत, भविष्य आणि वर्तमान हें कांहींच संभवत नाहीं.

जें कार्य शब्दाला संभवत नाहीं तें कार्य त्याच्या अर्थाला लावलें जातें. तसा येथें धातूच्या अर्थाकडे भूते याचा संबंध करतां येईल.

पण धातूचा अर्थ तरी काय बरें आहे?

धातूचा अर्थ क्रिया आहे. तेव्हां पूर्वी झालेली क्रिया विवक्षित असेल तर, असा भूते याचा अर्थ होतो.

पण असें असेल तर

(वा.१) निष्ठाप्रत्ययानें निर्देश केला असल्यामुळें इतरेतराश्रय येतो, म्हणून कांहींच सिद्ध होत नाहीं.

येथें इतरेतराश्रय कसा बरें येतो?

भूतकालीं निष्ठा म्ह. क्तप्रत्यय करून सिद्ध होणाऱ्या भूत या शब्दानें येथें निर्देश केला आहे, आणि निर्देश केल्यानंतर भूतकाल हा त्याचा अर्थ आहे हें समजणार. तेव्हां अर्थातच ह्या दोन गोष्टी एकमेकांवर अवलंबून आहेत असें समजतें. आणि अशा ज्या गोष्टी एकमेकांवर अवलंबून असतात त्यांपैकीं कांहींच सिद्ध होत नाहीं.

(वा.२) नञ् हें अव्यय ज्यामध्यें आहे अशा अवर्तमाने, अभविष्यति, या शब्दानें निर्देश केला म्हणजे सिद्ध होईल. इतरेतराश्रयदोष येणार नाहीं.

तर मग तसा निर्देश म्हणजे अव्यय ज्यामध्यें आहे अशा शब्दानें निर्देश केला पाहिजे.

तसा निर्देश करावयास नको. कारण येथें भूते असा जो शब्द उच्चारला आहे तो अव्ययच आहे. भूधातूहून निष्ठाप्रत्यय केलेला नव्हे.

भूते या शब्दाला अव्ययसंज्ञा कशी बरें होते?

उपसर्गविभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च (१।४।५७, गणसूत्र) यानें विभक्तिप्रत्ययान्तासारख्या दिसणाऱ्या भूते या शब्दाला निपातसंज्ञा होते. निपाताला १।१।३७ यानें अव्ययसंज्ञा होते.

---

१. हें अधिकारसूत्र आहे. पुढील प्रत्यय केले असतां तेथें भूतकालिक क्रियेचीच प्रतीति होते.

संज्ञा निपातोऽव्ययमित्यव्ययसंज्ञा ॥ अथापि भवतेर्निष्ठा। एवमप्यव्ययमेव। कथम्। न व्येतीत्यव्ययमिति। क पुनर्न व्येति। एतौ कालविशेषौ वर्तमानभविष्यन्तौ। स्वभावतो भूत एव वर्तते ॥ यदि तर्हि न व्येतीत्यव्ययं

**न वा तद्विधानस्यान्यत्राभावात् ॥३॥**

न वा भूताधिकारेणार्थः। किं कारणम्। तद्विधानस्यान्यत्राभावात्। येऽप्येत इत उत्तरं प्रत्ययाः शिष्यन्त एतेऽप्येतौ कालविशेषौ न वियन्ति वर्तमानभविष्यन्तौ। स्वभावत एव ते भूत एव वर्तन्ते॥ अत उत्तरं पठति।

**भूताधिकारस्य प्रयोजनं कुमारघाती शीर्षघाती आखुहा बिडालः सुत्वानः सुन्वन्तः सुषुपुषः अनेहाः अग्निमाद्धानस्य ॥ ४ ॥**

कुमारघाती शीर्षघातीति भविष्यद्वर्त-

---

आतां[२] जरी भूधातूहून निष्ठाक्तप्रत्यय करून भूते हा शब्द साधला तरी देखील तो अव्ययच आहे.

तो कसा?

न व्येति इति अव्ययम्, म्ह. आपल्या स्वरूपांतून जो अन्यत्र च्युत होत नाहीं त्याला अव्यय म्हणतात. शब्द तसाच आहे. आपला कायमचा अर्थ दाखविणें जें शब्दाचें स्वरूप त्यांतून तो कधींही च्युत होत नाहीं. तेव्हां भुत हा शब्द इतर अर्थाकडे कधींही वळत नाहीं.

पण इतर कोणत्या अर्थाकडे तो जात नाहीं?

हे जे भविष्य आणि वर्तमान असे विशेष काल आहेत त्यांकडे तो कधींही जात नाहीं, तर स्वभावतः भूतकाल याच अर्थी आहे.

पण अशा रीतीनें शब्द हा अव्यय असेल तर

(वा.३) भूते या अधिकाराचा कांहींच उपयोग दिसत नाहीं.

काय कारण?

कारण असें की पुढील सूत्रांनीं जे प्रत्यय सांगितले आहेत ते देखील आपल्या स्वरूपांतून च्युत होऊन भविष्य किंवा वर्तमान या विशेष कालाला दाखविणार नाहींत, तर स्वभावतः भूतकाल याच अर्थाला दाखवितात.

हें मनांत धरून वार्तिककार सांगतातः—

(वा.४) कुमारघाती वगैरे उदाहरणांमध्यें भूतकालाचा बोध होऊं नये, भविष्यकाल किंवा वर्तमानकाल यांचाच बोध व्हावा, हा भूते या अधिकाराचा उपयोग आहे. कुमारघाती, शीर्षघाती, येथें भविष्यकालाचा आणि वर्तमानकालाचा बोध व्हावा, भूतकालाचा बोध होऊं नये, याकरितां भूते हा अधिकार आहे.

---

२. येथून 'अव्ययनिर्देशात्सिद्धम्' हें वार्तिक दुसऱ्या तऱ्हेनें लावीत आहेत. आपल्या स्वरूपांतून कधींही च्युत न होणारा असा अव्ययशब्दाचा अर्थ मनांत घेऊन 'अव्ययनिर्देशात्सिद्धम्' असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे. भूधातूहून क्तप्रत्यय होऊन भूतशब्द उत्पन्न झाला आणि त्याचा अर्थाशीं संबंधही उत्पन्न झाला असता तर पूर्वीं दाखविलेला इतरेतराश्रयदोष आला असता. धातु, प्रत्यय, ही कल्पना सूत्रकारांनीं नवीन केली आहे. शब्द हे मूळचे नित्य आहेत. त्यांचा अर्थाशीं संबन्धही नित्य आहे. तेव्हां भूत हा शब्द अव्ययच म्हणजे नित्यच आहे. त्याचा अर्थही कायम मूळचाच आहे. तेव्हां इतरेतराश्रयदोष येत नाहीं.

३. भूते या अधिकारांतील 'कर्मणि हनः' (३।२।८६) या पुढील सूत्रानें सामान्यतः कोणतेंही कर्मवाचक उपपद असतांना णिनिप्रत्यय सांगितला आहे. जर भूते हा अधिकार नसेल तर तो तिन्ही कालीं प्राप्त होईल. तेव्हां अर्थातच कुमार व शीर्ष हे शब्द उपपद असतांना सांगितलेला णिनिप्रत्यय (३।२।५१) त्याचा अपवाद होऊन कुमारघाती, शीर्षघाती, हे प्रयोग भूतकालींही होऊं लागतील.

मानार्थौ भूतनिवृत्त्यर्थः ॥ आखुहा बिडाल इति भविष्यद्वर्तमानार्थः । इतरथा हि ब्रह्मादिषु नियमः त्रिषु कालेषु निवर्तकः स्यात् ॥ सुत्वानः सुन्वन्तः । यज्ञसंयोगे क्वनिपस्त्रिषु कालेषु शतापवादो मा भूत् ॥ सुषुपुषः । नजिङ् सर्वकालापवादो मा भूत् ॥ अनेहा इति वर्तमानकाल एव । अन्यत्रानाहन्ता ॥ आदधानस्य । कानच चानशस्ताच्छील्यादिषु सर्वकालापवादो मा भूत् । अग्निमादधानस्य । आदधानस्येत्येवान्यत्र ॥

[करणे यजः ॥ ३ । २ । ८५ ॥
कर्मणि हनः ॥ ३ । २ । ८६ ॥]

ब्रह्मभ्रूणवृत्रेषु क्विप् ॥३।२।८७॥

किमर्थं ब्रह्मादिषु हन्तेः क्विब्विधीयते न क्विप्चान्येभ्योऽपि दृश्यत इत्येव सिद्धम् ।

ब्रह्मादिषु हन्तेः क्विब्वचनं नियमार्थम् ॥ १ ॥

तसेंच आखुहा बिडालः येथें भविष्यकालाचा आणि वर्तमानकालाचा बोध व्हावा, भूतकालाचा बोध होऊं नये, हा भूते या अधिकाराचा उपयोग आहे. नाहीं तर ब्रह्म, भ्रूण आणि वृत्र हीं उपपदें असतांनाच हन्धातूहून क्विप्प्रत्यय होतो हा नियम (३।२।८७) फक्त भूतकाळींच इतर उपपदांची व्यावृत्ति करतो, तो तिन्ही कालीं व्यावृत्ति करूं लागेल. तसेंच, सुत्वानः येथें या भूतेअधिकारांतील ङ्वनिप्प्रत्यय (३।२।१०३) होऊन भूतकालाचा बोध होतो, आणि सुन्वन्तः येथें यज्ञसंयोग गम्यमान असतांना वर्तमाने (३।२।१२३) या अधिकारांतील शतृप्रत्यय (३।२।१३२) होऊन वर्तमानकालाचा बोध होतो, पण जर भूते, वर्तमाने, हे अधिकार नसतील तर यज्ञसंयोग असतांना सांगितलेला शतृप्रत्यय हा तिन्ही कालीं ङ्वनिप्प्रत्ययाचा बाध करील, तो करूं नये याकरितां हे अधिकार पाहिजेत. तसेंच सुषुपुषः येथें स्वप्धातूहून लिट्प्रत्यय (३।२।१०५) होऊन त्याला क्वसु (३।२।१०७) होतो. भूते, वर्तमाने, हे अधिकार नसतील तर नजिङ्प्रत्यय (३।२।१७२) हा तिन्ही कालीं लिट्प्रत्ययाचा बाध करील, तो करूं नये याकरितां हे अधिकार पाहिजेत. तसेंच अनेहा येथें असुप्रत्यय (उणा. सू.४।२२३) होऊन वर्तमानकालाचा बोध होतो. इतर कालीं असुप्रत्यय न होतां तृच्प्रत्यय होऊन अनाहन्ता असा प्रयोग होतो. हे अधिकार नसतील तर असुप्रत्यय सर्वकालीं तृच्प्रत्ययाचा बाध करूं लागेल. तसेंच आदधानस्य या प्रयोगामध्यें धाधातूहून लिट्प्रत्यय (३।२।१०५) होऊन त्याला कानच् (३।२।१०६) होऊन भूतकालाचा बोध होतो, आणि ताच्छील्य वगैरे अर्थ असतांना चानश्प्रत्यय(३।२।१२९) होऊन अग्निमादधानस्य येथें वर्तमानकालाचा बोध होतो. तेथें चानश्प्रत्यय हा सर्वकालीं कानच्प्रत्ययाचा अपवाद होऊं नये हा या अधिकारांचा उपयोग आहे.

(सू ८७) ब्रह्मन् वगैरे शब्द उपपद असतांना हन्धातूहून हा जो क्विप्प्रत्यय सांगितला आहे तो कशाकरितां ?

तो सांगावयास नको. कारण क्विप्च (३।२।७६), अन्येभ्योऽपि दृश्यते (३।२।१७८), यांनींच क्विप्प्रत्यय सिद्ध होत आहे.

(वा.१) नियमार्थ हें सूत्र केलें आहे. तो नियम असा की हन्धातूहून भूतकालीं जर

---

१. करण उपपद असतांना यज्धातूहून णिनिप्रत्यय भूतकालीं होतो; उदा० अग्निष्टोमेन इष्टवान् अग्निष्टोमयाजी.

१. कर्म उपपद असतांना हन्धातूहून भूतकालीं णिनिप्रत्यय होतो; उदा० पितृव्यघाती, मातुलघाती.

१. ब्रह्मन्, भ्रूण आणि वृत्र हे शब्द उपपद असतांनाच हन्धातूहून भूतकालीं क्विप्प्रत्यय होतो; उदा० ब्रह्महा, भ्रूणहा, वृत्रहा. पुरुषं हतवान् येथें क्विप्प्रत्यय होत नाहीं.

नियमार्थोऽयमारम्भः । ब्रह्मादिष्वेव हन्तेः क्विब्यथा स्यात् । किमविशेषेण । नेत्याह । उपपदविशेष एतस्मिंश्च विशेषे ॥ अथ ब्रह्मादिषु हन्तेर्णिनिना भवितव्यम् । न भवितव्यम् । किं कारणम् । उभयतो नियमात् । उभयतो नियमोऽयम् । ब्रह्मादिष्वेव हन्तेः क्विब्भवति क्विबेव च ब्रह्मादिष्विति ॥

**तथा चोत्तरस्य वचनार्थः ॥ २ ॥**

एवं च कृत्वोत्तरस्य योगस्य वचनार्थ उपपन्नो भवति । बहुलं छन्दसि [८८] इति । यो मातृहा पितृहा भ्रातृहा । न च भवति । अमित्रघातः ॥

**[बहुलं छन्दसि ॥ ३ । २ । ८८ ॥**

**सुकर्मपापमन्त्रपुण्येषु कृञः ॥ ३ । २ । ८९ ॥**

**सोमे सुञः । ३ । २ । ९० ॥**

**अग्नौ चेः ॥ ३ । २ । ९१ ॥**

---

क्विप्प्रत्यय होईल तर ब्रह्मन् वगैरे उपपद असतांनाच होतो.

मग हीं उपपदें असलीं म्हणजे सर्व ठिकाणीं क्विप्प्रत्यय होतो काय ?

तसा होत नाहीं असें म्हणतो. उपपदें हीं ब्रह्मन् वगैरेच पाहिजेत. तसेंच हन्धातु, भूतकाल, ह्या विशेष गोष्टीही पाहिजेतच.

आतां ब्रह्मन् वगैरे उपपदें असतांना हन्धातूहून णिनिप्रत्ययही व्हावा असें दिसतें.

तेथें णिनिप्रत्यय होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की हा नियम दोन्ही बाजूंनी होत आहे. तो असा की हन्धातूहून भूतकालीं क्विप्प्रत्यय करावयाचा असेल तर ब्रह्मन् वगैरे उपपदें असतांनाच करावा, आणि ब्रह्मन् वगैरे उपपदें असतांना हन्धातूहून भूतकालीं प्रत्यय करावयाचा असेल तर क्विप्प्रत्ययच करावा.

(वा.२) हें प्रकृत सूत्र नियमार्थ होत आहे म्हणूनच 'बहुलं छन्दसि' हें पुढील सूत्र क्विप्प्रत्यय होण्याबद्दल केलें तें बरोबर जुळतें यो मातृहा, पितृहा, भ्रातृहा, ह्या वैदिक उदाहरणांमध्यें क्विप्प्रत्यय होण्याकरितां तें सूत्र केलें आहे. तेथें बहुलम् असें म्हटलें असल्यामुळें अमित्रघातः येथें क्विप्प्रत्यय होत नाहीं.

---

२. तसेंच ब्रह्मन् वगैरे उपपदें असतांना भूतकालीं क्विप्प्रत्यय करावयाचा असेल तर हन्धातूहूनच करावा, आणि ब्रह्मन् वगैरे उपपदें असतांना हन्धातूहून क्विप्प्रत्यय करावयाचा असेल तर भूतकालींच करावा, अशाही दोन प्रकारचा नियम येथें होतो. म्हणजे येथें एकंदर चार प्रकारचा नियम होतो.

१. जर हें सूत्र नियमार्थ नसेल तर मातृहा वगैरे उदाहरणांमध्यें 'क्विप् च' (३।२।७६) या सामान्य सूत्रानेंच क्विप्प्रत्यय सिद्ध होत असल्यामुळें पुढील सूत्र व्यर्थ होईल.

१ (८८) वेदामध्यें इतर उपपद असतांनाही हन्धातूहून भूतकालीं क्विप्प्रत्यय होतो; उदा० यो मातृहा पितृहा.

(८९) सु, कर्मन्, पाप, मन्त्र आणि पुण्य हे शब्द उपपद असतांना कृधातूहूनच भूतकालीं क्विप्प्रत्यय होतो, सु, कर्मन् वगैरे उपपद असतांना कृधातूहून भूतकालींच क्विप्प्रत्यय होतो, आणि सु, कर्मन्, वगैरे उपपद असतांना कृधातूहून भूतकालीं क्विप्प्रत्ययच होतो; असा तीन प्रकारचा नियम येथें आहे.

(९०) कर्मवाचक सोमशब्द उपपद असतांनाच सुञ्धातूहून भूतकालीं क्विप्प्रत्यय होतो, सोमशब्द उपपद असतांना सुञ्धातूहूनच भूतकालीं क्विप्प्रत्यय होतो, आणि सोमशब्द असतांना सुञ्धातूहून भूतकालींच क्विप्प्रत्यय होतो, आणि सोमशब्द उपपद असतांना सुञ्धातूहून भूतकाळीं क्विप्प्रत्ययच होतो, असा चार प्रकारचा नियम येथें आहे.

(९१) कर्मवाचक अग्निशब्द उपपद असतांनाच चिधातूहून भूतकालीं क्विप्प्रत्यय होतो, अग्निशब्द उपपद असतांना चिधातूहूनच भूतकालीं क्विप्प्रत्यय होतो, आणि अग्निशब्द उपपद असतांना चिधातूहून भूतकालींच क्विप्प्रत्यय होतो, आणि

**कर्मण्यग्न्याख्यायाम् ॥ ३ । २ । ९२ ॥]**

**कर्मणीनिर्विक्रियः ॥३।२।९३॥**

**कर्मणि कुत्सिते ॥ १ ॥**

कर्मणि कुत्सित इति वक्तव्यम् । इह मा भूत् । धान्यविक्रायः ॥

**[दृशेः क्वनिप् ॥ ३ । २ । ९४**

**राजनि युधि कृञः ॥ ३ । २ । ९५ ॥**

**सहे च ॥ ३ । २ । ९६ ॥**

**सप्तम्यां जनेर्डः ॥ ३ । २ । ९७ ॥**

**पञ्चम्यामजातौ ॥ ३ । २ । ९८ ॥**

**उपसर्गे च संज्ञायाम् ॥३।२।९९।**

**अनौ कर्मणि ॥ ३ । २ । १०० ॥**

**अन्येष्वपि दृश्यते ॥३।२।१०१।**

अन्येभ्योऽपि दृश्यत इति वक्तव्यम् इहापि यथा स्यात् । आखा उत्खा परिखा ।

**निष्ठा ॥ ३ । २ । १०२ ॥**

**निष्ठायामितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः ॥ १ ॥**

निष्ठायामितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः केतरेतराश्रयता । सतोः क्तक्तवत्वो संज्ञया भवितव्यं संज्ञया च क्तक्तव

---

(सू. ९३, वा १) ह्या सूत्रामध्यें निंदा गम्यमान असतांना असें म्हणावें. कारण धान्यविक्रायः येथें इनिप्रत्यय न झाला पाहिजे.

(सू. १०१) इतर धातूंहूनही हा ड-प्रत्यय दिसतो असें म्हणावें; उदा० आखा, उत्खा, परिखा.

(सू. १०२, वा. १) निष्ठासंज्ञेविषयीं इतरे तराश्रय येत असल्यामुळें कांहींच सिद्ध हो नाहीं.

येथें इतरेतराश्रय कसा बरें येतो ?

असा येतो की क्त, क्तवतु, हे प्रत्य

---

अग्निशब्द उपपद असतांना चिधातूहून क्विप्प्रत्ययच होतो असा येथेंही चार प्रकारचा नियम आहे

(९२) कर्मवाचक शब्द उपपद असतांना चिधा-तूहून कर्म या अर्थीं क्विप्प्रत्यय होतो, आणि अग्नि शब्द उपपद असतांना चिधातूहून भूतकालीं क्विप् प्रत्ययच होतो, एकंदर शब्दानें अग्नीची आख्या होत असेल तर; उदा० श्येन इव चितः श्येनचित्.

१. कर्मवाचक उपपद असतांना विउपसर्गपूर्वक क्रीधातूहून इनिप्रत्यय होतो; उदा० सोमविक्रयी.

१.(९४) कर्मवाचक शब्द उपपद असतांना दृश्-धातूहून भूतकालीं क्वनिप्प्रत्यय होतो; उदा० मेरुं दृष्टवान् मेरुदृश्वा.

(९५) कर्मवाचक राजन् शब्द उपपद असतांना युध् आणि कृ या धातूंतून भूतकालीं क्वनिप्प्रत्यय होतो; उदा० राजानं योधितवान् राजयुध्वा. येथें युद्ध करविणें असा युध्धातूचा अर्थ आहे, म्हणून राजानं हें कर्म संभवतें. राजकृत्वा.

(९६) सहशब्द उपपद असतांना युध् आणि कृ या धातूंहून भूतकालीं क्वनिप्प्रत्यय होतो; उदा० सहयुध्वा, सहकृत्वा.

(९७) सप्तम्यन्त उपपद असतांना जन्धातूहू भूतकालीं डप्रत्यय होतो; उदा० उपसरे जात उपसरजः.

(९८) जातिशब्दाशिवाय पञ्चम्यन्त शब्द उपप असतांना जन्धातूहून भूतकालीं डप्रत्यय होतो उदा० संस्कारात् जातः संस्कारजः.

(९९) संज्ञाशब्दामध्यें उपसर्ग उपपद असतांन जन्धातूहून डप्रत्यय होतो; उदा० प्रजा.

(१००) कर्मवाचक शब्द उपपद असतांना अनु उपसर्गपूर्वक जन्धातूहून डप्रत्यय होतो; उदा पुमांसमनुरुध्य जातः पुमनुजः.

१. इतर कोणतेंही उपपद असतांना जन्धातू हून डप्रत्यय दिसतो; उदा० न जायत इत्यजः, द्वि जातः द्विजः.

१. धातूहून भूतकालीं निष्ठा म्हणजे क्त आ क्तवतु हे प्रत्यय होतात. क्त हा प्रत्यय सकर्म धातूंहून कर्म या अर्थीं आणि अकर्मक धातूंहून भा या अर्थीं होतो, आणि क्तवतु हा प्रत्यय स धातूंहून कर्ता या अर्थीं (३।४।६७।६९) होत उदा०—भुक्तमन्नम् भुक्तवान्.

भाष्येते तदेतदितरेतराश्रयं भवति। इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ॥

**द्विर्वा क्तक्तवतुग्रहणम् ॥ २ ॥**

द्विर्वा क्तक्तवतुग्रहणं कर्तव्यं भवति। क्तक्तवतू भूते। क्तक्तवतू निष्ठेति ॥

यदि पुनरिहैव निष्ठासंज्ञाप्युच्येत। क्तक्तवतू भूते। ततो निष्ठा। निष्ठासंज्ञौ च क्तक्तवतू भवत इति। किं कृतं भवति। द्विः क्तक्तवतुग्रहणं न कर्तव्यं भवति ॥

एवमपि ताविति वक्तव्यं स्यात्। वक्ष्यति ह्येतत्तौ सदिति वचनमसंसर्गार्थमिति। असंसक्तयोर्भूतेन कालेन निष्ठासंज्ञा यथा स्यात्। ञिमिदा मिन्नः। ञिक्ष्विदा क्ष्विण्णः ॥

यदि पुनरदृष्टश्रुतावेव क्तकवतू गृहीत्वा निष्ठासंज्ञोच्येत। नैवं शक्यम्। दृष्टश्रुतयोर्न स्यात्। ञिमिदा मिन्नः। तस्मान्नैवं शक्यम्। न चेदेवं द्विः क्तक्त

---

केल्यानंतर त्यांना निष्ठासंज्ञा (१।१।२६) होणार, आणि संज्ञा झाल्यानंतर त्या संज्ञाशब्दानें ते करतां येणार. तेव्हां असा हा इतरेतराश्रय येतो, आणि अशीं एकमेकांवर अवलंबून असलेल्या कार्यांपैकी कांहींच सिद्ध होत नाहींत.

(वा. २) अथवा क्त, क्तवतु, हे शब्द दोन ठिकाणीं उच्चारावेत. प्रकृत सूत्रामध्यें निष्ठाशब्द काढून त्याच्या जागीं क्तक्तवतू असें उच्चारून भूतकालीं क्त, क्तवतु, हे प्रत्यय सांगावेत. क्तक्तवतू निष्ठा (१।१।२६) येथें क्त, क्तवतु, हे शब्द उच्चारले आहेत तेही कायम ठेवावेत[२].

आतां जर येथें क्त, क्तवतु, हे शब्द उच्चारून भूतकालीं क्त, क्तवतु, ह्या प्रत्ययांचें विधान करून त्याच्यापुढें 'निष्ठा' असें संज्ञासूत्र करून त्या क्तक्तवतुप्रत्ययाना निष्ठासंज्ञा सांगितली तर—

तर काय होणार आहे ?

असें होणार आहे की क्त, क्तवतु, हे शब्द दोनदा उच्चारावयास नकोत[३].

तरी पण त्या निष्ठासंज्ञा सांगणाऱ्या 'निष्ठा' या संज्ञासूत्रामध्यें 'तौ' असा शब्द घालावा लागेल. तौ सदिति वचनमसंसर्गार्थम् (३।२ १२७, वा. १) असें पुढें वार्तिककार सांगणारच आहेत. म्हणजे जे क्तक्तवतुप्रत्यय भूतकालीं सांगितले नसतील त्यांनाही निष्ठासंज्ञा झाली पाहिजे; उदा० मिन्नः[४], क्ष्विण्णः, येथें ञिमिदा आणि ञिक्ष्विदा या मिद् व क्ष्विद् या धातूंहून वर्तमानकालीं क्तप्रत्यय (३।२।१८७) केला आहे.

आतां लौकिकप्रयोगांमध्यें जे क्तक्तवतुप्रत्यय दिसतात किंवा ऐकूं येतात त्यांपेक्षां निराळे असे क्तक्तवतुप्रत्यय भूतकालीं होतात अशी कल्पना करून तशा केलेल्या क्तक्तवतुप्रत्ययांना निष्ठासंज्ञा करावी.

पण असें करणें शक्य नाहीं.कारण तसें केलें तर ञिमिदा,ञिक्ष्विदा,या धातूंपासून साधलेल्या मिन्नः, क्ष्विण्णः, या प्रयोगांमध्यें दिसणाऱ्या व ऐकूं येणाऱ्या क्तक्तवतुप्रत्ययांना निष्ठासंज्ञा होणार नाहीं. तेव्हां तशा रीतीनें इतरेतराश्रयदोष दूर करणें शक्य नाहीं. आणि तसें जर

---

२. म्हणजे इतरेतराश्रयदोष येणार नाहीं.

३. आणि इतरेतराश्रयदोषही येणार नाही.

४. येथें निष्ठासंज्ञा झाली म्हणून क्तप्रत्ययाच्या तकाराला नकार (८।२।४२) झाला आहे.

५. 'क्तक्तवतू निष्ठा' या संज्ञासूत्राला उदाहरण मिळत नाहीं म्हणून उदाहरण मिळण्यासाठीं त्या सूत्राच्या सामर्थ्यानेंच ही कल्पना करतां येते. कृत, कृतवत्, वगैरे शब्दांमध्यें दिसणाऱ्या क्त, क्तवतु, या प्रत्ययांना निष्ठासंज्ञा करतां येत नाहीं. कारण संज्ञा करण्याचे पूर्वी 'निष्ठा' या सूत्रानें ते करतांच येत नाहीत म्हणून त्या संज्ञासूत्राला उदाहरण मिळत नाहीं.

वतुग्रहणं कर्तव्यमितरेतराश्रयं वा भवति॥

नैष दोषः। इतरेतराश्रयमात्रमेतद्भवति सर्वाणि चेतरेतराश्रयाण्येकत्वेन परिहृतानि सिद्धं तु नित्यशब्दत्वादिति। नेदं तुल्यमन्यैरितरेतराश्रयैः। न हि संज्ञा नित्या॥ एवं तर्हि भाविनी संज्ञा विज्ञास्यते। तद्यथा। कश्चित्कंचित्तन्तुवायमाहास्य सूत्रस्य शाटकं वयेति। स पश्यति यदि शाटको न वातव्योऽथ वातव्यो न शाटकः शाटको वातव्यश्चेति विप्रतिषिद्धम्। भाविनी खल्वस्य संज्ञाभिप्रेता। स मन्ये वातव्यो यस्मिन्नुते शाटक इत्येतद्भवतीति। एवमिहापि तौ भूते काले भवतो ययोरभिनिर्वृत्तयोर्निष्ठेत्येषा संज्ञा भविष्यति॥

## आदिकर्मणि निष्ठा॥ ३॥

आदिकर्मणि निष्ठा वक्तव्या। प्रकृतः कटं देवदत्त इति। किं पुनः कारणं न सिध्यति।

## यद्वा भवन्त्यर्थे॥ ४॥

यद्वा भवन्त्या अर्थे भाष्यते। प्रकृतः कटं देवदत्तः। प्रकरोति कटं देवदत्त इति॥

## न्याय्या त्वाद्यपवर्गात्॥ ५॥

न्याय्या त्वेषा भूतकालता। कुतः।

---

शक्य नाहीं तर क्त, क्तवतु, हे शब्द पूर्वी सांगितल्याप्रमाणें दोन ठिकाणीं तरी उच्चारले पाहिजेत किंवा इतरेतराश्रयदोष तरी पत्करला पाहिजे.

हा दोष येत नाहीं. कारण हा येथें इतरेतराश्रयदोष नुसता नांवालाच आहे. सर्वच ठिकाणच्या इतरेतराश्रयदोषाचा 'सिद्धं तु नित्यशब्दत्वात्' (१।१।१, वा.९) असा एक तऱ्हेचा परिहार केलाच आहे.

पण इतर ठिकाणच्या इतरेतरासारखा येथील इतरेतराश्रय नाहीं. कारण निष्ठा ही संज्ञा सूत्रकारांनीं कल्पित आहे; नित्य नव्हे.

तर मग ही भाविसंज्ञा समजावी, म्हणजे इतरेतराश्रयदोष येणार नाहीं. असें पहा की कोणी एक मनुष्य कोष्ट्याला सांगतो की ह्या सुतांचा शेला वीण. तें ऐकून तो कोष्टी मनांत विचार करतो की जर शेला असेल तर तेथें विणावयाचें कांहीं नाहीं. आतां जर विणावयाचें कांहीं असेल तर तेथें शेला नाहीं. शेला आहे आणि तो विणावयाचा आहे हें बोलणें विरुद्ध होतें. तेव्हां 'शेला वीण' असें जें हा म्हणतो त्यावरून त्याच्या मनामध्यें असें दिसतें की 'शेला विणावयाचा नाहीं. सुतंच विणावयाचीं; परंतु तीं अशीं विणावयाचीं की जशीं विणलीं असतां त्याला शेला म्हणतां येईल'. तसेंच येथें 'निष्ठा' या सूत्राचा अर्थ असा समजावा की धातूहून भूतकालीं तसे प्रत्यय करावेत की जे केल्यानंतर त्यांना निष्ठा असें म्हणतां येईल.

(वा.३) क्रियेचा प्रारंभ असतांना निष्ठाप्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०: प्रकृतः कटं देवदत्तः.

पण येथें निष्ठा या प्रकृत सूत्रानेंच कां बरें सिद्धि होत नाहीं ?

(वा.४) येथें वर्तमानकालीं क्तप्रत्यय केलेला दिसतो. प्रकृतः कटं देवदत्तः असें जेथें म्हणतात तेथेंच प्रकरोति कटं देवदत्तः असेंही म्हणतात[६].

(वा.५) क्रियेचा आरंभ जरी असला तरी येथें न्याय्य रीतीनेंच भूतकाल मानतां येतो.

तो कसा ?

असा की क्रियेचा आरंभींचा कांहीं थोडा

---

६. ज्यानें कट करण्यास प्रारंभ केला आहे असा देवदत्त असा येथें अर्थ आहे. येथें क्तप्रत्यय कर्ता या अर्थी झाला आहे (३।४।७१). तात्पर्य, येथें भूतकालची क्रिया आहे असें म्हणतां येत नाहीं, असा शंकाकाराचा अभिप्राय आहे.

आद्यपवर्गात्। आदिरत्रापवृक्तः। एष च नाम न्याय्यो भूतकालो यत्र किंचिदपवृक्तं दृश्यते ॥

वा चाद्यतन्याम् ॥ ६ ॥

वा चाद्यतन्यां भाष्यते। प्रकृतः कटं देवदत्तः। प्राकार्षीत्कटं देवदत्त इति ॥ किं शक्यन्त एते शब्दाः प्रयोक्तुमित्यतो न्याय्यैषा भूतकालता। नावश्यं प्रयोगादेव। क्रिया नामेयमत्यन्तापरिदृष्टानुमानगम्याशक्या पिण्डीभूता निदर्शयितुं यथा गर्भो निर्लुठितः। सासौ येन येन शब्देनाभिसंबध्यते तावति तावति परिसमाप्यते। तद्यथा। कश्चित्पाटलिपुत्रं जिगमिषुरेकमहर्गत्वाहेदमद्य गतमिति। न च तावतास्य व्रजिक्रिया परिसमाप्ता भवति। यत्तु गतं तदभिसमीक्ष्यैतत्प्रयुज्यत इदमद्य गतमिति। एवमिहापि यत्कृतं तदभिसमीक्ष्यैतत्प्रयुज्यते प्रकृतः कटं देवदत्त इति। यदा हि वेणिकान्तः कटोऽभिसमीक्षितो भवति प्रकरोति कटमित्येव तदा भवति ॥

[सुयजोर्ङ्वनिप् ॥ ३। २। १०३ ॥

जीर्यतेरतृन् ॥ ३। २। १०४ ॥

छन्दसि लिट् ॥ ३। २। १०५ ॥]

लिटः कानज्वा ॥ ३। २। १०६ ॥

क्वसुश्च ॥ ३। २। १०७ ॥

किमर्थं कानच्क्वसोर्वावचनं क्रियते।

---

तरी भाग होऊन गेलेलाच असतो. आणि जेथें थोडी क्रिया झालेली असते तेथें सरळ रीतीनेंच भूतकाल घेतां येतो.

(वा. ६) तसेंच आजचीच क्रिया सांगावयाची असेल तर प्रकृतः कटं देवदत्तः असें जेथें म्हणतात तेथें प्राकार्षीत् कटं देवदत्तः असेंही म्हणतात. जर येथें भूतकाल नसेल तर असे प्रयोग करतां येतील काय? तेव्हां तशा ठिकाणीं भूतकाल समजणें हें न्याय्यच आहे. शिवाय प्रयोगावरूनच येथें भूतकाल समजावयाचा असें नाहीं. तर वस्तुस्थितिही तशीच आहे. क्रिया ही केव्हांही प्रत्यक्ष न होणारी आणि अनुमानानेंच फक्त समजली जाणारी आहे, म्हणून एका ठिकाणीं गोळा झालेली अशी दाखवितां येत नाहीं. जसा पोटांत असलेला गर्भ अमुक असा प्रत्यक्ष दाखवितां येत नाहीं त्याप्रमाणेंच हें होय. तेव्हां ती क्रिया ज्या ज्या शब्दानें जशी दाखविली जाते तेवढीच तेथें पूर्ण झाली असें समजावें; जसें पाटलीपुत्राला जाण्याच्या उद्देशानें सकाळीं निघालेला मनुष्य संध्याकाळपर्यंत जाऊन असें म्हणतो की येथपर्यंत आलों, तेवढ्यानें कांहीं त्याचे जाणें पूर्ण झालें नाहीं, पण जेवढी मजल झाली तेवढीच मनांत धरून तो आज गमनक्रिया इतकी झाली असें म्हणतो, तसा येथें जेवढा कांहीं क्रियेचा भाग झाला असेल तेवढा मनांत आणून प्रकृतः कटं देवदत्तः असा भूतकालचा प्रयोग केला जातो. आतां विणण्यास प्रारंभ करण्याचे पूर्वी कांबी पसरून 'अशा तऱ्हेनें कट करावयाचा' असा विचार करीत असतो तेव्हां मात्र भूतकालीं प्रयोग होत नाहीं. कटं प्रकरोति असा वर्तमानकालाचाच प्रयोग होतो.

(सू. १०६, १०७) हे जे कानच् आणि

---

७. तेव्हां प्रकरोति कटं देवदत्तः या प्रयोगावरून वर्तमानकाल ठरविला तसा प्राकार्षीत् कटं देवदत्तः या प्रयोगावरून भूतकालही ठरवितां येतो.

८ जसा बाहेर पडलेला गर्भ प्रत्यक्ष दाखवितां येतो तशी क्रिया दाखवितां येत नाहीं, असाही अर्थ येथें 'यथा गर्भो निर्लुठितः' या वाक्याचा करतात.

१. सु आणि यज् या धातूहून भूतकालीं ङ्वनिप्प्रत्यय होतो; उदा० सुत्वा. यज्वा.

१. जॄधातूहून भूतकालीं अतृन्प्रत्यय होतो; उदा० जरन्, जीर्णः.

१. वेदामध्यें धातूहून सामान्य भूतकालीं लिट्प्रत्यय होतो; उदा० अहं सूर्यमुभयतो ददर्श.

१. वेदामध्यें लिटाचे स्थानीं कानच् हा आदेश विकल्पानें होतो; उदा० अग्निं चिक्यानः.

१. वेदामध्यें लिटाचे स्थानीं क्वसु हा आदेश विकल्पानें होतो; उदा० पपिवान्.

**कानच्क्वसोर्वावचनं छन्दसि तिङो दर्शनात् ॥ १ ॥**

कानच्क्वसोर्वावचनं क्रियते छन्दसि तिङो दर्शनात्। छन्दसि तिङपि दृश्यते। अहं सूर्यमुभयतो ददर्श। अहं द्यावापृथिवी आततान ॥

**न वानेन विहितस्यादेशवचनात् ॥२॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति। किं कारणम्। अनेन विहितस्यादेशवचनात्। अस्त्वनेन विहितस्यादेशः केनेदानीं छन्दसि विहितस्य लिटः श्रवणं भविष्यति। छन्दसि लुङ्लङ्लिटः [३.४.६] इत्यनेन ॥ तदेतद्वावचनं तिष्ठतु तावत्सांन्यासिकम् ॥

अथ कित्करणं किमर्थं नासंयोगाल्लिट्कित् [१.२.५] इत्येव सिद्धम्।

**कित्करणं संयोगान्तार्थम् ॥ ३ ॥**

कित्करणं क्रियते संयोगान्तार्थम्। संयोगान्ताः प्रयोजयन्ति। वृत्रस्य यद्बद्बधानस्य रोदसी। त्वमर्णवान्बद्बधानाँ अरम्णाः। अञ्जेराजिवानिति ॥ छान्दसौ कानच्क्वसू। लिट् च च्छन्दसि सार्वधातुकमपि भवति। तत्र सार्वधातुकमपिन्ङि-

क्वसु हे प्रत्यय सांगितले आहेत ते विकल्पानें कशाकरितां सांगितले आहेत?

(वा. १) कानच् आणि क्वसु हे प्रत्यय विकल्पानें अशाकरितां सांगितले आहेत की वेदामध्यें लिटाचे स्थानीं तिङ्प्रत्ययही झालेले दृष्टीस पडतात; उदा० अहं सूर्यमुभयतो ददर्श, अहं द्यावापृथिवी आततान.

(वा.२) विकल्पानें क्वसु, कानच्, हे प्रत्यय सांगण्याचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं.

काय कारण?

कारण असें की 'छन्दसि लिट्' या पूर्व सूत्रानें सांगितलेल्याच लिटाचे स्थानीं कानच्, क्वसु, हे आदेश होतात.

तर मग वेदामध्यें जे ददर्श, आततान, असे तिङ्प्रत्यय ऐकूं येतात तेथें कोणत्या सूत्रानें लिट्प्रत्यय केला आहे?

छन्दसि लुङ्लङ्लिटः (३।४।६) यानें तेथें लिट्प्रत्यय केला आहे.

तरी पण सूत्रकारांनीं जो येथें वाशब्द[२] उच्चारला आहे तो तसाच असूं दे.

आतां कानच्, क्वसु, ह्या प्रत्ययांना ककार कशाकरितां लावला आहे? तो लावावयास नको. असंयोगाल्लिट् कित् (१।२।५) या सूत्रानेंच ते प्रत्यय कित् समजले जातील.

(वा.३) संयोग शेवटीं असलेल्या धातूंकरितां येथें ककार लावला आहे. तसले धातुच येथें ककार लावण्याला कारणीभूत होतात; उदा० वृत्रस्य यद्बद्बधानस्य[३] रोदसी, त्वमर्णवान् बद्बधानाँ अरम्णाः, हे बन्धधातूचे प्रयोग आहेत. तसेंच अञ्जधातूचें आजिवान् असें रूप होतें.

पण कानच्, क्वसु, हे प्रत्यय वैदिक प्रयोगामध्येंच होणारे आहेत. आणि वेदामध्यें तर लिट्प्रत्ययाला सार्वधातुक संज्ञाही होते. तेव्हां तेथें सार्वधातुकमपित् (१।२।४) यानें प्रत्ययाला ङित्त्व होईल, आणि त्या ङित्त्वामुळेंच उपधानकाराचा लोप होईल. तेव्हां त्या-

---

२. पुढील सूत्रामध्यें वाशब्द पाहिजे. तेव्हां त्याची स्पष्ट प्रतिपत्ति होण्याकरितां येथेंच केला तरी हरकत नाहीं.

३. बन्धधातूच्या शेवटीं नकारधकारांचा संयोग आहे. अञ्जधातूच्या शेवटीं नकारजकारांचा संयोग आहे. त्यामुळें 'असंयोगात्०' या सूत्रानें कित् होत नाहीं, म्हणून नकाराचा लोप (६।४।२४) लौकिक प्रयोगामध्यें होत नाहीं. परंतु बद्बधान, आजिवान्, या वैदिक प्रयोगांमध्यें इत्संज्ञक ककार लावल्यामुळें नकाराचा लोप होतो. बद्बधान येथें बन्धधातूहून लिट्, कानच्, नकाराचा लोप, द्वित्व, वैदिक प्रयोगामध्यें अभ्यासांतील धकाराचा लोप (७।४।६०) न झाल्यामुळें जश्त्व (८।४।५३) झालें आहे. आजिवान् येथें अञ्जधातूहून लिट्, क्वसु, नकाराचा लोप, प्रत्ययाला इडागम, द्वित्व, वगैरें झालें आहे.

द्रुवतीति ङित्त्वादुपधालोपो भविष्यति ॥

ऋकारान्तगुणप्रतिषेधार्थं वा ॥ ४ ॥

ऋकारान्तगुणप्रतिषेधार्थं तर्हि कित्करणं कर्तव्यम्। अयं लिट्यृकारान्तानां प्रतिषेधविषये गुण आरभ्यते। स यथैवेह प्रतिषेधं बाधित्वा गुणो भवति तेरतुः तेरुः एवमिहापि स्यात् तितीर्वान् तितिराणः। पुनः कित्करणात्प्रतिषिध्यते ॥

भाषायां सदवसश्रुवः ३।२।१०८॥

भाषायां सदादिभ्यो वा लिट् ॥ १ ॥

भाषायां सदादिभ्यो वा लिड्वक्तव्यः। किं प्रयोजनम्।

तद्विषये लुङोऽनिवृत्त्यर्थम् ॥ २ ॥

तस्य लिटो विषये लुङोऽनिवृत्तिर्यथा स्यात्। उपसेदिवान्कौत्सः पाणिनिम्। उपासदत् ॥

अनद्यनपरोक्षयोश्च ॥ ३ ॥

अनद्यतनपरोक्षयोश्च वा लिड्वक्तव्यः। उपसेदिवान्कौत्सः पाणिनिम्। उपासीदत्। उपससाद ॥

अपवादविप्रतिषेधाद्धि तयोर्भावः ॥ ४ ॥

अपवादविप्रतिषेधाद्धि तौ स्याताम्। कौ। लङ्लिटौ ॥

तस्य क्वसुरपरोक्षे नित्यम् ॥ ५ ॥

तस्य लिटो भाषायां क्वसुरपरोक्षे नित्यमिति वक्तव्यम् ॥ अपरोक्षग्रहणेन नार्थः। तस्य क्वसुर्नित्यमित्येव। केनेदानीं लिटः परोक्षे श्रवणं भविष्यति। परोक्षे लिट्

---

करितां प्रत्ययांना इत्संज्ञक ककार लावावयास नको.

(वा.४) तर मग ऋकारान्त धातूंना गुणाचा प्रतिषेध होण्याकरितां या प्रत्ययांना इत्संज्ञक ककार लावला पाहिजे. कारण लिटामध्यें गुणाच्या निषेधाचा विषय (१।१।५) असतांना त्या निषेधाला मागें सारून ऋकारान्त धातूंना गुण होण्याकरितां मुद्दाम गुण (७।४।११) सांगितला आहे. तेव्हां जसा तेरतुः व तेरुः येथें निषेधाला बाजूला सारून गुण होतो तसा हे कानच् व क्वसु प्रत्यय केले असतांही तितीर्वान् व तितिराणः येथें होऊं लागेल. याकरितां मुद्दाम येथें गुणाचा निषेध होण्याकरितां प्रत्ययांना इत्संज्ञक ककार लावला आहे.

(सू.१०८,वा.१) भाषेमध्यें सद् वगैरे धातूंहून लिट् प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

(वा. २) ह्या लिटाच्या सामान्य भूतकाल या विषयामध्यें लुङाचा बाध न होतां एकदां लुङ् प्रत्यय झाला पाहिजे; उदा०— उपसेदिवान् कौत्सः पाणिनिम्, उपासदत् कौत्सः पाणिनिम्.

(वा. ३) अनद्यतन आणि परोक्ष हे अर्थ असतांनाही हा लिट् विकल्पानें होतो असें म्हणावें; जसें:—उपसेदिवान् कौत्सः पाणिनिम्. एकदां लिट् व लङ् होतो; उपससाद, उपासीदत्.

(वा. ४) नाहीं तर लुङाचा अपवाद हा लिट् आणि लुङाचे अपवाद ते लङ् व लिट् यांमध्यें विप्रतिषेध असल्यामुळें विप्रतिषेधानें ते होतील.

ते म्हणजे कोण ?

ते म्हणजे लङ् आणि लिट् हेच आपआपल्या विषयांत होतील.

(वा. ५) लौकिक प्रयोगांमध्यें त्या लिटाला क्वसु आदेश नित्य होतो; परंतु ‘ अपरोक्ष म्हणजे क्रिया परोक्ष नसतांना ’ असें म्हणावें.

येथें ‘ अपरोक्षे ’ असें म्हणण्याचा कांहीं उपयोग दिसत नाहीं. तस्य क्वसुर्नित्यम् एवढेंच पुरेसें आहे.

पण अपरोक्षे हा शब्द घातला नाहीं तर

---

१.(सू.१०८) लौकिक प्रयोगांमध्यें सद्, वस्, आणि श्रु या धातूंहून सामान्य भूतकालीं लिट् प्रत्यय होतो, आणि त्याला क्वसु हा आदेश होतो; उदा०-उपसेदिवान्, अनूषिवान्, उपशुश्रुवान्

[ ११५ ] इत्यनेन ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अनुवृत्तिः करिष्यते । भाषायां सदादिभ्यो वा लिड् भवति लिटश्च कसुर्भवति । ततो लुङ् [ ११० ] लुङ् भवति भूते काले भाषायां सदादिभ्यो वा लिड् भवति लिटश्च कसुर्भवति । ततोऽनद्यतने लङ् [ १११ ] अनद्यतने भूते काले लङ् भवति भाषायां सदादिभ्यो वा लिड् भवति लिटश्च कसुर्भवति । परोक्षे लिड् भवति भाषायां सदादिभ्यो वा लिड् भवति लिटश्च कसुर्भवति ॥ तत्रायमप्यर्थस्तस्य कसुरपरोक्षे नित्यमित्येतन्न वक्तव्यं भवति ॥

## उपेयिवाननाश्वाननूचानश्च ॥ ३ । २ । १०९ ॥

किमर्थमुपेयिवानिति निपातनं क्रियते । उपेयुषि निपातनमिडर्थम् । उपेयुषि निपातनं क्रियत इडर्थम् । इडयथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धोऽत्रेड्वस्वेकाजाद्धसाम् [ ७. २. ६७ ] इति । द्विर्वचने कृतेऽनेकाच्त्वान्न प्राप्नोति । इदमिह

---

परोक्ष क्रिया असेल त्या वेळीं कसु न होतां लिट् कसा राहील ?

तेथें परोक्षे लिट् (३।२।११५) यानें लिट् केला म्हणजे त्याला हा कसु होणार नाहीं.

तर मग हीं वार्तिककारांनीं केलेलीं विकल्पाचीं वचनें केलीं पाहिजेत.

तीं करावयास नकोत. अनुवृत्तीनेंच काम होईल. तें असें कीं प्रकृत सूत्रामध्यें 'वा' याची अनुवृत्ति आणून असा अर्थ करावा कीं लौकिक प्रयोगांमध्यें सद् वगैरे धातूंहून विकल्पानें लिट्-प्रत्यय सामान्य भूतकालीं होतो आणि त्या लिटाला कसु हा आदेश होतो. पुढें 'अनद्यतने लङ्' (३।२।१११) असें सूत्र आहे. अनद्यतन भूतकालीं धातूहून लङ् प्रत्यय होतो, असा त्याचा अर्थ आहे. तेथें 'भाषायां सदवसश्रुवः' याची अनुवृत्ति करून लौकिक प्रयोगांमध्यें सद् वगैरे धातूंहून अनद्यतन भूतकालीं लिट् प्रत्यय विकल्पानें होतो आणि त्या लिटाला कसु होतो, असा स्वतंत्र वाक्यार्थ करावा. त्याचे पुढें परोक्षे लिट् ( ३।२।११५ ) असें सूत्र आहे. क्रिया परोक्ष असतांना अनद्यतन भूतकालीं धातूंहून लिट् प्रत्यय होतो असा त्याचा अर्थ आहे. तेथेंही ह्या प्रकृत सूत्राची अनुवृत्ति करून लौकिक प्रयोगांमध्यें सद् वगैरे धातूंहून क्रिया परोक्ष असतांना अनद्यतन भूतकालीं लिट् प्रत्यय विकल्पानें होतो आणि त्या लिटाला कसु होतो असा स्वतंत्र वाक्यार्थ करावा. अशी व्यवस्था केली असतां आणखीही एक गोष्ट अशी साधते कीं 'तस्य कसुरपरोक्षे नित्यम्' हें वचन करावयास नको.

(सू. १०९) उपेयिवान् हें निपातन कशाकरितां केलें आहे ?

उपेयिवान् या ठिकाणीं क्वसु प्रत्ययाला इडागम होण्याकरितां निपातन केलें आहे. कारण इडागम तेथें झाला पाहिजे.

हा निपातनाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'वस्वेकाजाद्धसाम्' (७।२।६७) या सूत्रानेंच येथें इडागम सिद्ध आहे.

पण द्वित्व केल्यानंतर तेथें धातु अनेकाच् होत असल्यामुळें इडागम होणार नाहीं.

---

२. हा विकल्प केला म्हणून पक्षीं सामान्य भूतकालीं लुङ् होऊन उपासदत् हा प्रयोग सिद्ध होईल.

१.(सू.१०९) उपेयिवान्, अनाश्वान् आणि अनूचान ह्या तीन शब्दांचें निपातन केलें आहे. उपउपसर्गपूर्वक इण् धातूहून भूतकालीं क्वसु प्रत्यय, त्याला इडागम झाला आहे. नञ्उपपदपूर्वक अश् धातूहून तसाच क्वसुप्रत्यय आणि इडागमाचा निषेध झाला आहे आणि नञ्उपपदपूर्वक वच् धातूहून कानच् प्रत्यय झाला आहे.

संप्रधार्यम् । द्विर्वचनं क्रियतामिडिति । किमत्र कर्तव्यम् । परत्वादिडागमः । नित्यं द्विर्वचनम् कृतेऽपीटि प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । इडपि नित्यः । कृतेऽपि द्विर्वचन एकादेशे च प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । नात्रैकादेशः प्राप्नोति । किं कारणम् । दीर्घ इणः किति [ ७.४.६९ ] इति दीर्घत्वेन बाध्यते । तदेतदुपेयुषि निपातनमिडर्थं क्रियते ॥

**उपेयुषि निपातनमिडर्थमिति चेदजादावतिप्रसङ्गः ॥ १ ॥**

उपेयुषि निपातनमिडर्थमिति चेदजादाविटोऽतिप्रसङ्गो भवति । उपेयुषा उपेयुषे उपेयुषः उपेयुषीति ॥

**एकादिष्टस्येय्भावार्थं तु ॥ २ ॥**

एकादिष्टस्येय्भावार्थं तु निपातनं क्रियते । एकादिष्टस्य ईयित्येतद्रूपं निपात्यते । ननु चोक्तं नात्रैकादेशः प्राप्नोति । किं कारणम् । दीर्घ इणः किताति दीर्घत्वेन बाध्यत इति । तद्धि न सुष्ठूच्यते । न हि दीर्घत्वमेकादेशं बाधते । कस्तर्हि बाधते । यणादेशः । स चापि क्व बाधते । यत्रास्य निमित्तमस्ति । यत्र हि निमित्तं नास्ति निष्प्रतिद्वन्द्वस्तत्रैकादेशः ॥

**व्यञ्जने यणादेशार्थं वा ॥ ३ ॥**

अथवा व्यञ्जन एव यणादेशो निपा-

---

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो कीं द्वित्व अगोदर करावें किंवा इडागम अगोदर करावा ?

मग यांमध्यें काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव इडागम (७।२।३५) द्वित्वापेक्षां (६।१।८) अगोदर करावा.

पण द्वित्व नित्य आहे. इडागम केला तरी त्याची प्राप्ति आहे आणि न केला तरी आहे.

इडागम देखील नित्य आहे. द्वित्व केलें तरी एकादेश केल्यानंतर त्याची प्राप्ति आहे आणि न केलें तरी आहे.

पण द्वित्व केल्यानंतर एकादेशच मुळीं येथें प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ' दीर्घ इणः किति ' (७।४।६९) या दीर्घानें एकादेशाचा बाध होत आहे. एकंदरींत उपेयिवान् या शब्दामध्यें इडागम होण्याकरितां निपातन केलें आहे.

( वा. १ ) उपेयिवान् या शब्दामध्यें इडागम होण्याकरितां निपातन केलें असेल तर ज्या ठिकाणीं संप्रसारण होऊन क्वसु प्रत्यय अजादि होतो तेथेंही इडागम होऊं लागेल; उदा०ः—उपेयुषा, उपेयुषे, उपेयुषः, उपेयुषि.

( वा. २ ) एकादेश झाल्यानंतर ईयादेश होण्याकरितां निपातन केलें आहे. निपातनामुळें एकादेश झाल्यानंतर त्याला ईय् असा आदेश होतो.

पण येथें एकादेशाची प्राप्ति येत नाहीं असें सांगितलें आहे ना ?

काय कारण ?

कारण असें कीं ' दीर्घ इणः किति ' या दीर्घानें एकादेशाचा बाध होत आहे.

सांगितलें आहे खरें, पण तें बरोबर नाहीं. कारण दीर्घ कांहीं एकादेशाचा बाध करीत नाहीं.

तर मग कोण बाध करतो ?

यणादेश ( ६।४।८१ ) बाध करतो. तो देखील कोठें बाध करतो म्हणाल तर ज्या ठिकाणीं त्याचें अजादि प्रत्यय हें निमित्त असेल तेथेंच. तेव्हां ज्या ठिकाणीं तें निमित्त नाहीं त्या ठिकाणीं एकादेशाला दूर सारणारा कोणीच नाहीं.

( वा. ३ ) अथवा क्वसुप्रत्ययाला इडागम होण्यापूर्वीं व्यंजन पुढें असतांनाच यणादेश होण्याकरितां उपेयिवान् हें निपातन केलें

त्यते । यणादेशे कृत एकाच इतीट् सिद्धो भवति ॥

अपर आह ।

**नोपेयिवान्निपात्यो द्विर्वचनादिड् भविष्यति परत्वात् ।**

द्विर्वचनं क्रियतामिडितीड् भविष्यति विप्रतिषेधेन ॥ इहापि तर्हि द्विर्वचनादिट् स्यात् बिभिद्वान् चिच्छिद्वानिति ।

**अन्येषामेकाचां द्विर्वचनं नित्यमित्याहुः ॥ १ ॥**

अन्येषामेकाचां नित्यं द्विर्वचनम् । कृतेऽपीटि प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति ॥

**अस्य पुनरिट् च नित्यो द्विर्वचनं च न विहन्यते ह्यस्य ।**

अस्य पुनरिट् चैव नित्यो द्विर्वचनं च॥

**द्विर्वचने चैकाच्त्वात्**

द्विर्वचने च कृत एकाज्भवति । कथम् । एकादेशे कृते ॥

**तस्मादिड् बाधते द्वित्वम् ॥ २ ॥**

तस्मादिड् द्विर्वचनं बाधते ॥

**अनूचानः कर्तरि ॥ ४ ॥**

अनूचानः कर्तरीति वक्तव्यम् । अनूक्तवाननूचानः । अनूक्तमित्येवान्यत्र ॥

नोपेयिवान्निपात्यो द्विर्वचनादिड् भविष्यति परत्वात् ।
अन्येषामेकाचां द्विर्वचनं नित्यमित्याहुः ॥ १ च
अस्य पुनरिट् च नित्यो द्विर्वचनं ॥ न विहन्यते ह्यस्य ।
द्विर्वचने चैकाच्त्वात्तस्मादिड् बाधते द्वित्वम् ॥ २ ॥

**लुङ् ॥ ३ । २ । ११० ॥**

**लुङ्लटोरपवादप्रसङ्गो भूतभविष्यतोरविशेषवचनात् ॥ १ ॥**

लुङ्लटोरपवादः प्राप्नोति । अगमाम घोषान् अपाम पयः अशयिष्महि पूती-

---

आहे. तो यण् झाल्यानंतर धातु एकाच् होतो, म्हणून इडागम (७।२।६७) सहजच होत आहे.

येथें दुसरा कोणी वैयाकरण असें म्हणतोः—

(श्लो. १) येथें उपेयिवान् हें निपातन करावयास नको. कारण द्वित्वापेक्षां अगोदर परत्वास्तव इडागम होईल.

तर मग बिभिद्वान्, चिच्छिद्वान्, येथेंही द्वित्वाच्या पूर्वीं इडागम होऊं लागेल.

भिद् वगैरे इतर एकाच् धातूंहून क्वसु प्रत्यय केला असतां इडागमापेक्षां द्वित्व नित्य आहे असें म्हणतात. कारण इडागम केला तरी द्वित्व प्राप्त होतें आणि इडागम करण्याचे पूर्वीही प्राप्त होतें.

(श्लो. २) उपेयिवान् येथें तर इडागम आणि द्वित्व हीं दोन्ही कार्यें नित्य आहेत. कारण येथें द्वित्वानें इडागमाच्या एकाच् ह्या निमित्ताचा नाश होत नाहीं.

कारण द्वित्व केल्यानंतरही येथें धातु एकाच् होत आहे. तो कसा म्हणाल तर येथें एकादेश केल्यामुळें धातु एकाच् होत आहे.

तेव्हां उपेयिवान् येथें इडागम परत्वास्तव द्वित्वाचा बाध करतो.

(वा. ४) अनूचानः येथें अनु-उपसर्गपूर्वक वच् धातूहून कर्ता या अर्थी कानच् प्रत्यय होतो असें म्हणावें; जो अनुवाचन करता झाला तो अनूचान होय. कर्म या अर्थीं प्रत्यय करणें झाल्यास अनूक्तम् असेंच होतें.

(सू. ११०, वा. १) लुङ् आणि लट यांचा अपवाद प्राप्त होत आहे, तो असाः— अगमाम घोषान्, अपाम पयः, अशयिष्महि पूतीकतृणेषु या ठिकाणीं गम्, पा आणि शी या धातूंहून लुङ् प्रत्यय झाला आहे. तेथें त्याचा अपवाद म्हणून पुढील सूत्रानें लङ् प्राप्त होत

कतृणेषु । गमिष्यामो घोषान् पास्यामः पयः शयिष्यामहे पूतीकतृणेषु । किं कारणम् । भूतभविष्यतोरविशेषवचनात् । भूतभविष्यतोरविशेषेणैतौ विधीयेते लुङ्लृटौ तयोर्विशेषविहितौ लङ्लुटावपवादौ प्राप्नुतः ॥

**न वापवादस्य निमित्ताभावादनद्यतने हि तयोर्विधानम् ॥ २ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अपवादस्य निमित्ताभावात् । नात्रापवादस्य निमितमस्ति । किं कारणम् । अनद्यतने हि तयोर्विधानम् । अनद्यतने हि तौ विधीयेते लङ्लुटौ न चात्रानद्यतनः कालो विवक्षितः । किं तर्हि । भूतकालसामान्यं भविष्यत्कालसामान्यं च ॥ यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुं गमिष्यामो घोषान् पास्यामः पयः शयिष्यामहे पूतीकतृणेष्विति यत्रैतन्न ज्ञायते । किम् । कदेति । इह तु कथम् अगमाम घोषान् अपाम पयः अशयिष्महि पूतीकतृणेष्विति यत्रैतन्निर्ज्ञातं भवत्यमुष्मिन्नहनि गतमिति । अत्रापि न वापवादस्य निमित्ताभावादनद्यतने हि तयोर्विधानामित्येव । कथं पुनः सतो नामाविवक्षा स्यात् । सतोऽप्यविवक्षा भवति । तद्यथा । अलोमिकैडका । अनुदरा कन्येति । असतश्च विवक्षा

---

आहे. तसेंच गमिष्यामः घोषान्, पास्यामः पयः, शयिष्यामहे पूतीकतृणेषु, या ठिकाणीं गम्, पा आणि शी या धातूंहून लृट् प्रत्यय (३।३।१३) झाला आहे. तेथें त्याचा अपवाद लुट् प्रत्यय (३।३।२५) प्राप्त होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं सामान्य भूतकालीं हा लुङ् सांगितला आहे, आणि सामान्य भविष्यकालीं लृट् सांगितला आहे. तेव्हां अनद्यतन भूतकाल या विशेष अर्थीं सांगितलेला लङ् आणि अनद्यतन भविष्यकाळ या विशेष अर्थीं सांगितलेला लुट हे त्या लुङ्, आणि लृट्, यांचे अपवाद प्राप्त होतात.

(वा. २) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं अपवादशास्त्राचें निमित्तच येथें नाहीं.

येथें कसें बरें नाहीं ?

असें नाहीं कीं, अनद्यतने म्ह. जो भूतकाल व भविष्यकाल आजचा नव्हे अशा विशेष अर्थीं लङ् आणि लुट् सांगितले आहेत, आणि वरील उदाहरणांमध्यें तसा विशेषकाल विवक्षित आहे असें म्हणतां येत नाहीं.

तर येथें कसा काल विवक्षित आहे ?

सामान्य भूतकाल व सामान्य भविष्यकाल येथें विवक्षित आहेत.

आतां घोषान् गमिष्यामः, पयः पास्यामः, पूतीकतृणेषु शयिष्यामहे, येथें पुढें भविष्यकालीं त्या त्या क्रिया केव्हां करण्यांत येणार हें माहीत नसल्यामुळें सामान्य भविष्यकाल विवक्षित आहे असें म्हणतां येतें, तरी घोषान् अगमाम, पयः अपाम, पूतीकतृणेषु अशयिष्महि, येथें भूतकालीं त्या त्या क्रिया होऊन गेल्या असल्यामुळें गमन, पान आणि शयन या क्रिया अमुक दिवशीं झाल्या असें निश्चितच समजत आहे. तेथें सामान्यभूतकाल विवक्षित आहे असें कसें म्हणतां येईल ?

येथेंही 'अपवादशास्त्राचें निमित्त नाहीं, अनद्यतन या विशेषकालीं अपवाद सांगितला आहे' हें वार्तिककारांनीं दिलेलें उत्तर जमतेंच.

पण येथें भूतकाल हा अनद्यतन आहे असें निश्चित समजत असतांना त्याची अविवक्षा कशी होईल ?

कां बरें ? अस्तित्वांत असलेल्या वस्तूचीही अविवक्षा होऊं शकते; जसें:—अलोमिका एडका, अनुदरा कन्या. तसेंच अस्तित्वांत नस-

---

२. मागें अ. १.४.२४.टी.४भा २ पृ० १६२ पहा.

भवति । तद्यथा । समुद्रः कुण्डिका । विन्ध्यो वर्धितकमिति ॥

**वसेर्लुङ् रात्रिशेषे ॥ ३ ॥**

वसेर्लुङ्रात्रिशेषे वक्तव्यः । न्याय्ये प्रत्युत्थाने प्रत्युत्थितं कश्चित्कंचित्पृच्छति क्व भवानुषित इति । स आह । अमुत्रावात्समिति । अमुत्रावसमिति प्राप्नोति ॥

**जागरणसंततौ ॥४ ॥**

जागरणसंततावििति वक्तव्यम् । यो हि मुहूर्तमात्रमपि स्वपिति तत्रामुत्रावसमित्येव भवितव्यम् ॥

## अनद्यतने लङ् ॥ ३ । २ । १११॥

अनद्यतन इति बहुव्रीहिनिर्देशोऽद्य ह्योऽभुक्ष्महीति ॥ १ ॥

अनद्यतन इति बहुव्रीहिनिर्देशः कर्तव्यः । अविद्यमानाद्यतनोऽनद्यतन इति । किं प्रयोजनम् । अद्य ह्योऽभुक्ष्महीति । अद्य च ह्यश्चाभुक्ष्महीति व्यामिश्रे लुङेव यथा स्यात् ॥ यद्येवमद्यतनेऽपि लङ् प्राप्नोति न ह्यद्यतनेऽद्यतनो विद्यते । अद्यतनेऽप्यद्यतनो विद्यते । कथम् । व्यपदेशिवद्भावेन ॥

**परोक्षे च लोकाविज्ञाते प्रयोक्तुर्दर्शनविषये ॥ २ ॥**

परोक्षे च लोकाविज्ञाते प्रयोक्तुर्दर्शनविषये लङ् वक्तव्यः । अरुणद्यवनः साके-

---

लेल्या वस्तूचीही विवक्षा होऊं शकते; जसें:– समुद्रः कुण्ठिका, विन्ध्यो वर्धितकम्.

(वा. ३ ) रात्र संपतांना पूर्वरात्रीची वासक्रिया सांगावयाची असेल तर तेथें वस् धातूहून लुङ्प्रत्यय होतो असें म्हणावें. रात्रीच्या चवथ्या प्रहरामध्यें उठण्याची योग्य वेळ प्राप्त झाली असतां त्या वेळीं, म्हणजे पहाटेस, शयनावरून उठलेल्या मनुष्याला कोणी एक विचारतो कीं 'तूं कोठें निजला होतात?' नंतर तो उत्तर देतो की 'अमुत्र अवात्सम्' म्ह. तेथें मी निजलों होतों. येथें निजणें ही क्रिया पूर्वरात्रीची असल्यामुळें अनद्यतनकालची विवक्षित आहे असें स्पष्टच दिसतें. म्हणून येथें 'अमुत्र अवसम्' असा लुङ् प्रत्ययाचा प्रयोग प्राप्त होतो.

( वा. ४ ) हा जो वस् धातूहून लुङ् प्रत्यय सांगितला आहे तो त्या रात्रीं कर्ता सतत एकसारखा जागत असेल तरच होतो. जर त्याला थोडी तरी मध्यें झोप लागली असेल तर मात्र तेथें 'अमुत्र अवसम्' असा लङाचाच प्रयोग होतो.

( सू. १११, वा. १ ) नाहीं आहे अद्यतन म्ह. आजचा काल ज्यामध्यें अशा अर्थाचा अनद्यतने हा बहुव्रीहीनें निर्देश केला आहे असें समजावें.

ह्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं आज आणि काल असे दोन्ही काल मिळून एकदम कालाची विवक्षा असेल तर तेथें अद्य ह्योऽभुक्ष्महि, म्हणजे आज आणि काल जेवलों, येथें लुङ् प्रत्ययच झाला पाहिजे.

पण जर बहुव्रीहि घेतला तर अद्यतनकालींही लङ् प्रत्यय प्राप्त होतो. कारण अद्यतन कालामध्यें अद्यतन काल नसल्यामुळें अद्यतनकाल हा अनद्यतनशब्दानें घेतां येतो.

असा घेतां येत नाहीं. कारण व्यपदेशिवद्भावानें अद्यतनामध्येंही अद्यतन आहे असें म्हणतां येतें.

(वा. २ ) लोकप्रसिद्ध अशी एखादी क्रिया प्रयोग करणाऱ्याला प्रत्यक्ष नसतांही जर ती

---

१.( सू. १११ ) अनद्यतनभूतकालाची विवक्षा असेल तर धातूहून लङ् प्रत्यय होतो; उदा०—ह्यः [illegible]

२. कारण आपणच अपल्यामध्यें असत नाहीं.

३. मागें अ. १.१.२१, वा.२ भा.१, पृ०२००

तम् । अरुणद्यवनो मध्यमिकाम् ॥ परोक्ष इति किमर्थम् । उदगादादित्यः । लोकविज्ञात इति किमर्थम् । चकार कटं देवदत्तः । प्रयोक्तुर्दर्शनविषय इति किमर्थम् । जघान कंसं किल वासुदेवः ॥

[ अभिज्ञावचने लृट्

॥ ३ । २ । ११२ ॥

न यदि ॥ ३ । २ । ११३ ॥ ]

विभाषा साकाङ्क्षे ॥ ३ । २ । ११४ ॥

किमुदाहरणम् । अभिजानासि देवदत्त कश्मीरान्गमिष्यामस्तत्र सक्तून्पास्यामः । अभिजानासि देवदत्त कश्मीरानगच्छाम यत्र सक्तूनपिबाम् ॥ भवेत्पूर्वं परमाकाङ्क्षतीति साकाङ्क्षं स्यात्परं तु कथं साकाङ्क्षम् । परमपि साकाङ्क्षम् । कथम् । अस्त्यस्मिन्नाकाङ्क्षेत्यतः साकाङ्क्षम् ॥

विभाषा साकाङ्क्षे सर्वत्र ॥ १ ॥

विभाषा साकाङ्क्षे सर्वत्रेति वक्तव्यम् । क सर्वत्र । यदि चायदि च । यदि तावत् । अभिजानासि देवदत्त यत्कश्मीरान्गमि-

---

त्या प्रत्यक्ष होण्याला योग्य असेल तर तेथें लिट् न करतां लङ् होतो असें म्हणावें; उदा:०—अरुणत् यवनः साकेतम्, अरुणत् यवनो मध्यमिकाम्.

येथें परोक्षे असें कशाकरितां म्हटलें आहे?

उदगादादित्यः येथें अनद्यतनरूपानें विवक्षा नसतांही या वार्तिकानें लङ् होऊं लागेल. तो न व्हावा याकरितां म्हटलें आहे.

लोकप्रसिद्ध असें कशाकरितां म्हटलें आहे ?

चकार कटं देवदत्तः येथें परोक्षरूपानें क्रियेची विवक्षा असतांना लिट् होतो, तेथें प्रकृत वार्तिकानें लङ् न झाला पाहिजे.

आतां प्रयोग करणाऱ्याला ती क्रिया प्रत्यक्ष होण्याला योग्य असली पाहिजे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

जघान कंसं किल वासुदेवः येथें लिटाच्या विषयांत प्रकृत वार्तिकानें लङ् न झाला पाहिजे.

(सू. ११४) या सूत्राचें उदाहरण काय ?

अभिजानासि देवदत्त कश्मीरान् गमिष्यामः तत्र सक्तून् पास्यामः, अभिजानासि देवदत्त कश्मीरान् अगच्छाम तत्र सक्तून् अपिबाम.

पण येथें पूर्वी आठवून दिलेल्या गमनक्रियेला पुढील पानक्रियेची आकांक्षा असल्यामुळें गमनक्रियेला साकांक्ष म्हणणें बरोबर होईल. पुढील पानक्रियेला साकांक्ष कसें म्हणावें ?

पुढील पानक्रियेलाही साकांक्ष म्हणतां येतें. तें कसें ?

पूर्वक्रियेची आकांक्षा आहे म्हणून.

( वा. १ ) विभाषा साकाङ्क्षे या प्रकृत सूत्रानें जो लृट् प्रत्यय विकल्पानें सांगितला आहे तो सर्व ठिकाणीं होतो असें म्हणावें.

सर्व ठिकाणीं म्हणजे कोठें ?

यत् शब्दाचा योग असतांना आणि यत्

---

१.(सू.११२)स्मृतिवाचक शब्द उपपद असतांना धातूहून अनद्यतनकालीं लङ् न होतां लृट् प्रत्यय होतो, उदा० अभिजानासि कृष्ण वने वत्स्यामः.

१.(सू.११३)यत् शब्दाचा प्रयोग असेल तर पूर्वसूत्रानें प्राप्त झालेला लृट् प्रत्यय होत नाही, उदा०अभिजानासि कृष्ण यद्वने अवसाम; येथें लङ् प्रत्यय होतो.

१ (सू.११४) पूर्वींच्या दोन्ही सूत्रांच्या विषयामध्यें क्रिया साकांक्ष असेल तर तेथें लृट् प्रत्यय विकल्पानें होतो; उदा० अभिजानासि कृष्ण वने वत्स्यामः तत्र च तीर्थे स्नास्यामः. अभिजानासि कृष्ण वने अवसाम तत्र च तीर्थे अस्नाम; येथें यत् शब्दाचा प्रयोग केला तरी अशीच विकल्पानें दोन रूपें होतात. येथें वासक्रियेची म्ह. वनामधील राहण्याची जी आठवण करून दिली जाते ती तीर्थस्नानाची आठवण करून देण्याकरितांच केली जाते, म्हणून येथें वासक्रिया ही तीर्थस्नानक्रियेविषयीं साकांक्ष होते. त्यांपैकी वासक्रिया ही आकांक्षेचा आश्रय आहे, आणि स्नानक्रिया ही आकांक्षेचा विषय आहे; म्हणून दोन्ही ठिकाणीं लृट् प्रत्यय विकल्पानें होतो.

ष्यामः। यत्कश्मीरानगच्छाम। यत्तत्रौदनं भोक्ष्यामहे । यत्तत्रौदनमभुञ्ज्महि । अयदि। अभिजानासि देवदत्त कश्मीरान्गमिष्यामः। कश्मीरानगच्छाम। तत्रौदनं भोक्ष्यामहे। तत्रौदनमभुञ्ज्महि ॥

**परोक्षे लिट् ॥ ३ । २ । ११५ ॥**

परोक्ष इत्युच्यते किं परोक्षं नाम। परमक्ष्णः परोक्षम्। अक्षि पुनः किम्। अश्नोतेरयमौणादिकः करणसाधनः सिप्रत्ययः। अश्नुतेऽनेनेत्याक्षि ॥ यद्येवं पराक्षमिति प्राप्नोति। नैष दोषः।

**पराभावः परस्याक्षे परोक्षे लिटि दृश्यताम्।**

परशब्दस्याक्षशब्द उत्तरपदे परोभावो वक्तव्यः॥

**उत्वं वादेः परादक्ष्यणः**

अथवा परशब्दादुत्तरस्याक्षिशब्दस्योत्वं वक्तव्यम्॥

**सिद्धं त्वस्मान्निपातनात्॥**

अथवा निपातनादेव सिद्धं परोक्षे लिडिति॥

कस्मिन्पुनः परोक्षे। काले। न वै कालाधिकारोऽस्ति। एवं तर्हि धातोः [३.१.९१] इति वर्तते धातौ परोक्षे। धातुर्वै शब्दो न च शब्दस्य प्रत्यक्षापरोक्षतायां संभवोऽस्ति। शब्देऽसंभवादर्थे

---

शब्दाचा योग नसतांना. त्यांपैकीं यत् शब्दाच्या योगाचें उदाहरण—अभिजानासि देवदत्त यत्कश्मीरान् गमिष्यामः यत्तत्रौदनं भोक्ष्यामहे, अभिजानासि देवदत्त यत्कश्मीरानगच्छाम यत्तत्रौदनमभुञ्ज्महि. यत् शब्दाचा योग नसल्याचें उदाहरणः— अभिजानासि देवदत्त कश्मीरान् गमिष्यामः तत्रौदनं भोक्ष्यामहे, अभिजानासि देवदत्त कश्मीरानगच्छाम तत्रौदनमभुञ्ज्महि.

(सू. ११५) येथें परोक्षे असें म्हटलें आहे. पण परोक्ष म्हणजे काय ?

अक्षीच्या जें पर म्हणजे पलीकडचें तें परोक्ष होय.

पण त्यांतही पुन्हां प्रश्न उत्पन्न होतोच. आक्षि म्हणजे काय ?

अश्नुते अनेन इत्यक्षि; अश् धातूहून करण या अर्थी औणादिक सि प्रत्यय ( उणा. सू. ३।१५६) केला आहे.

पण येथें परशब्दाचा जर अक्षिशब्दाबरोबर समास असेल तर पराक्ष असा सामासिक शब्द झाला पाहिजे.

हा दोष येत नाहीं.

(श्लो.१) परोक्षे लिट् या सूत्रांतील परोक्ष या शब्दामध्यें अक्षि शब्द उत्तरपद पुढें असतांना पर शब्दाला परो असा आदेश होतो असें म्हणावें.

अथवा पर शब्दाच्या पुढील अक्षि शब्दाच्या आदि अकाराला उकार होतो असें म्हणावें.

अथवा परोक्षे लिट् या प्रकृत सूत्रामध्यें परोक्षे असें जें सूत्रकारांनीं उच्चारलें आहे त्याच निपातनावरून हा शब्द सिद्ध होतो असें समजावें.

आतां येथें परोक्ष कोण असतांना लिट्प्रत्यय होतो ?

परोक्ष काल घ्यावा.

पण येथें काले असा अधिकार नाहीं.

तर मग येथें धातोः असा अधिकार येत आहे, त्याचेकडे परोक्षे हें पद लावावें.

पण धातु हें नांव भू, एध्, वगैरे शब्दांना आहे आणि शब्दाला तर प्रत्यक्ष, परोक्ष, असें कांहींच संभवत नाहीं.

---

१.(सू.११५)परोक्ष आणि अनद्यतनभूतकालिक अशी क्रिया विवक्षित असेल तर धातूहून लङ् किंवा लुट् न करतां लिट् प्रत्यय करावा: उदा० कंसं जघान कृष्णः.

२. अश्नुते म्ह. व्यापतो. इन्द्रियाच्या योगानें सर्वत्र व्याप्ति होते. तेव्हां येथें अक्षि म्ह. इन्द्रिय होय.

कार्यं विज्ञास्यते । परोक्षे धातौ परोक्षे धात्वर्थ इति । कः पुनर्धात्वर्थः । क्रिया । क्रियायां परोक्षायाम् ॥ यद्येवं ह्योऽपचदित्यत्रापि लिट् प्राप्नोति । किं कारणम् । क्रिया नामेयमत्यन्तापरिदृष्टानुमानगम्याशक्या पिण्डीभूता निदर्शयितुं यथा गर्भो निर्लुठितः । एवं तर्हि साधनेषु परोक्षेषु ॥ साधनेषु च भवतः कः संप्रत्ययः । यदि तावद्गुणसमुदायः साधनं साधनमप्यनुमानगम्यम् । अथान्यद्गुणेभ्यः साधनं भवति प्रत्यक्षपरोक्षतायां संभवः ॥ अथ यदानेन रथ्यायां तण्डुलोदकं दृष्टं कथं तत्र भवितव्यम् । यदि तावत्साधनेषु परोक्षेषु पपाचेति भवितव्यम् । भवन्ति हि तस्य साधनानि परोक्षाणि । अथ य एते क्रियाकृता विशेषाश्चीत्काराः फूत्काराश्चेति तेषु परोक्षेषु । एवमपि पपाचेति भवितव्यम् ॥

कथंजातीयकं पुनः परोक्षं नाम । केचित्तावदाहुर्वर्षशतवृत्तं परोक्षमिति । अपर आहुः कटान्तरितं परोक्षमिति । अपर

---

जें कार्य शब्दाला संभवत नाहीं तें कार्य त्याच्या अर्थाला लावलें जातें. धातु परोक्ष असतांना म्हणजे धातूचा अर्थ परोक्ष असतांना.

पण धातूचा अर्थ तरी काय बरें आहे?

धातूचा अर्थ क्रिया आहे. तेव्हां क्रिया परोक्ष असेल तर लिट् प्रत्यय होतो असा अर्थ होतो.

पण क्रिया परोक्ष असतांना असा अर्थ घेतला तर ह्यः अपचत् येथें लिट् प्रत्यय प्राप्त होत आहे.

काय कारण?

कारण असें कीं क्रिया ही केव्हांही प्रत्यक्ष न होणारी पण अनुमानानेंच फक्त समजली जाणारी अशी आहे. एका ठिकाणीं गोळा झालेली अशी दाखविणें शक्य नाहीं. जसा पोटांत असलेला गर्भ अमुक असा प्रत्यक्ष दाखवितां येत नाहीं तसेंच हें होय.

तर मग क्रियेचीं साधनें परोक्ष असतांना लिट् प्रत्यय होतो असें समजावें.

पण साधनें परोक्ष असतांना असें जें म्हणतोस तेथें साधनाविषयीं तुझा काय समज आहे?

कर्ता, कर्म, करण, वगैरे पदार्थांच्या ज्या शक्ती त्या सर्व मिळून साधन होय, असें असेल तर तें साधन अनुमानानेंच समजलें जाणारें आहे. त्याचें प्रत्यक्ष कोठेंच नाहीं. आतां त्या शक्तीपेक्षां निराळे असे जे त्या शक्तीचे आश्रयभूत पदार्थ ते साधन समजत असशील तर मात्र तीं साधनें प्रत्यक्षही होऊं शकतील आणि परोक्षही होऊं शकतील. तेव्हां तसेंच येथें घ्यावयाचें आहे.

आतां, तांदुळ, पाणी, वगैरे पचनक्रियेला उपयोगी पडणारे पदार्थ रस्त्यांमध्यें देवदत्त वगैरे कोणाजवळ एखाद्याच्या दृष्टीस पडले तर तेथें त्यानें कसा बरें प्रयोग करावा?

जर क्रियेचीं साधनें परोक्ष असतांना असा प्रकृत सूत्राचा अर्थ असेल तरीही 'देवदत्तः पपाच' असा प्रयोग झाला पाहिजे. कारण तांदुळ, पाणी, वगैरे पदार्थ पचनक्रियेला उपयोगी पडत असतांना पाहिले नाहींतच. आतां पचन वगैरे क्रिया होतांना चीत्कार, फूत्कार, असे कांहीं शब्द होतात ते परोक्ष असतांना असा अर्थ असेल तरीही पपाच असा प्रयोग झाला पाहिजे.[1]

आतां क्रिया ही किती पूर्वीं झाली असली म्हणजे ती परोक्ष समजली जाणार या संबंधानें कांहीं लोक असें म्हणतात कीं शंभर वर्षांपूर्वींची क्रिया परोक्ष समजावी. दुसरे कांहीं लोक तर हजार वर्षांच्या पूर्वींची क्रिया परोक्ष समजावी

---

१. कारण ते चीत्कार वगैरे शब्दप्रयोग करणाऱ्यानें ऐकिले नाहींतच.

आहुर्व्यैहवृत्तं ऽ+हवृत्तं चेति॥ सर्वथोत्तमो न सिध्यति। सुप्तमत्तयोरुत्तम इति वक्तव्यम्। सुप्तोऽहं किल विललाप। मत्तोऽहं किल विललाप। सुप्तो न्वहं किल विललाप। मत्तो न्वहं किल विललाप। अथवा भवति वै कश्चिज्जाग्रदपि वर्तमानं कालं नोपलभते। तद्यथा। वैयाकरणानां शाकटायनो रथमार्ग आसीनः शकटसार्थं यान्तं नोपलेभे। किं पुनः कारणं जाग्रदपि वर्तमानं कालं नोपलभते। मनसा संयुक्तानीन्द्रियाण्युपलब्धौ कारणानि भवन्ति मनसोसांनिध्यात्॥

**परोक्षे लिडित्यन्तापह्नवे च ॥ १ ॥**

परोक्षे लिडित्यत्रात्यन्तापह्नवे चेति वक्तव्यम्। नो खण्डिकाञ्जगाम नो कलिङ्गाञ्जगाम न कारिसोमं प्रपपावग्ने न दार्वजस्य प्रतिजग्राह को मे मनुष्यः प्रहरेद्दधाय॥

परोभावः परस्याक्षे परोक्षे लिटि दृश्यताम्।
उत्वं वादेः परादक्ष्णः सिद्धं वास्मान्निपातनात्॥

असें म्हणतात. पण कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं इन्द्रियानें न जाणण्यासारखी क्रिया असली म्हणजे ती परोक्ष समजावी, मग ती भिंतीच्या किंवा तट्ट्याच्या पलीकडे कां होईना. कोणी म्हणतात कीं दोन दिवसांच्या पूर्वीं झालेली क्रिया परोक्ष होय. कोणी म्हणतात कीं तीन दिवसांच्या पूर्वीं झालेली क्रिया परोक्ष होय. कांहीं असो, लिटामध्यें उत्तमपुरुषाचा प्रयोग करतां येणार नाहीं. कर्ता झोपेमध्यें काय करतो, तसेंच मत्त मनुष्य उन्मादावस्थेंत काय करतो, तें ज्याचें त्याला प्रत्यक्ष होत नाहीं, परोक्षच होतें; तेथें उत्तमपुरुषाचें उदाहरण घ्यावें; जसें:- सुप्तोऽहं किल विललाप. तसेंच एखाद्या मनुष्याला जागेपणींसुद्धां त्या वेळीं काय चाललें आहे तें कळत नाहीं; जसें:—वैयाकरण शाकटायन हा गाडीवाटेवर बसला असतां शेजारून पुष्कळ गाड्या गेलेल्या त्याला कळल्या नाहींत.

पण जागेपणीं शेजारीं काय चाललें आहे तें न कळण्याचें कारण काय ?

इन्द्रियें हीं मनानें प्रेरित झालीं तरच तीं शेजारच्या पदार्थांचें ज्ञान करून देण्याला कारणीभूत होतात. तें मन जर दुसऱ्या एखाद्या विषयांत गुंतलें असेल तर तें इन्द्रियाच्या जवळ नसल्यामुळें ज्ञान होत नाहीं.

(वा. १) अत्यन्त अपलाप गम्यमान सेल तेथेंही लिट् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०:–, नो खण्डिकान् जगाम, नो कलिङ्गान् जगाम, न कारि सोमं प्रपपावग्ने, न दार्वजस्य प्रतिजग्राह को मे मनुष्यः प्रहरेद्दधाय.

४. कारण, तेथें प्रयोग करणारा हा स्वत.च त्या क्रियेचा कर्ता असल्यामुळें त्याला ती क्रिया परोक्ष होत नाहीं.

५. मी झोपेमध्यें किंवा उन्मादावस्थेमध्यें फार बडबडलों, असा अर्थ आहे. येथें बडबडणें ही क्रिया ज्याची त्यालाच दुसऱ्याचे सांगण्यावरूनच समजत असल्यामुळें परोक्ष आहे.

६. खाण्डिकदेशामध्यें तुझें शिक्षण झालें ना, असें विचारलें असतां त्याचें हें उत्तर आहे. मी खाण्डिक देशामध्यें गेलो सुद्धां नाहीं, असा याचा अर्थ आहे. माझें शिक्षण तेथें झालें नाहीं असें उत्तर दिलें तर तो शिक्षणाचा साधा अपलाप होतो; तेथें मी गेलोंही नाहीं हा अत्यंत अपलाप होय. मी दुसऱ्याच्या घरीं ऋत्विज होऊन कधींच सोम प्यालों नाहीं असा 'न कारि०' याचा अर्थ आहे. 'तू भलत्याकडून यजन करवितोस ना ?' या प्रश्नाचें हें उत्तर आहे तसेंच 'मी दार्वदेशांतील कोणाकडून कधींच प्रतिग्रह केला नाहीं, खोटी गोष्ट उठवून मला कोण बरं दोष देईल' असा 'न दार्वजस्य' याचा अर्थ आहे. 'तू अयोग्य अशा अमुकाकडून दाक्षिणा घेतलीस ना ?' या प्रश्नाचें हें उत्तर आहे.

[ **हशश्वतोर्लङ् च** ॥३।२।११६॥
**प्रश्ने चासन्नकाले** ॥३।२।११७॥]

**लट् स्मे** ॥३।२।११८॥

**स्मपुरा भूतमात्रे न स्मपुराद्यतने** ॥१॥

स्मपुरा भूतमात्रे न स्मपुराद्यतन इति वक्तव्यम् । किमयं स्मादिविधिः पुरान्तोऽविशेषेण भूतमात्रे भवति तत्र वक्तव्यं स्मलक्षणः पुरालक्षणश्चाद्यतने न भवत इति । आहोस्वित्स्मलक्षणः पुरालक्षणश्चाविशेषेण भूतमात्रे भवत इति तत्र स्माद्यर्थे न स्मपुराद्यतन इति वक्तव्यम् । किं चातः।

**स्मादिविधिः पुरान्तो यद्यविशेषेण किं कृतं भवति ।**
**न स्मपुराद्यतन इति ब्रुवता कात्यायनेनेह** ॥ १ ॥

स्मादिविधिः पुरान्तो यद्यविशेषेण भवति किं वार्तिककारः प्रतिषेधेन करोति न स्मपुराद्यतन इति ॥

**अनुवृत्तिरनद्यतनस्य लट् स्म इति तत्र नास्ति नञ्कार्यम् ।**

लट् स्म इत्यत्रानद्यतन इत्येतदनुवर्ति-

---

(सू. ११८ वा. १) 'स्मपुरा भूतमात्रे न स्मपुराऽद्यतने' असें म्हणावें. ' स्म शब्दापासून पुरा शब्दापर्यंत उपपद असतांना ह्या पांच सूत्रांनीं सांगितलेले प्रत्यय सामान्य भूतकालीं होतात, फक्त त्यांपैकीं पहिल्या दोन सूत्रांनीं स्म शब्द उपपद असतांना सांगितलेला प्रत्यय आणि शेवटच्या सूत्रानें पुरा शब्द उपपद असतांना सांगितलेला प्रत्यय अद्यतन भूतकालीं होत नाहीं, ' असा ह्या वार्तिकाचा अर्थ समजावा, किंवा ' स्म शब्द उपपद असतांना पहिल्या दोन सूत्रांनीं सांगितलेला प्रत्यय आणि शेवटच्या सूत्रानें पुरा शब्द उपपद असतांना सांगितलेला प्रत्यय सामान्यभूतकालीं होतो आणि स्म शब्दाच्या पुढें व पुरा शब्दाच्या पूर्वीं मधल्या दोन सूत्रांनीं ननु, न आणि नु उपपद असतांना सांगितलेले प्रत्यय अद्यतनभूतकालीं होत नाहींत, ' असा अर्थ समजावा ?

ह्या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

(श्लो. १) स्मशब्दाला आरंभ करून पुराशब्दापर्यंत उपपदें असतांना जर सामान्यभूतकालीं प्रत्यय होत असेल तर ' न स्मपुराद्यतने ' असे शब्द घालून त्याचा निषेध करणाऱ्या कात्यायनानें काय केलें असें समजावें ?

(श्लो. २) लट् स्मे या सूत्रामध्यें अनद्यतने या पदाची अनुवृत्ति केली असतां त्या निषेधाचा

---

१. (सू. ११६) पूर्वसूत्राचा विषय असतांना जर तेथें ह किंवा शश्वत् हें उपपद असेल तर तेथें एकदा लङ् प्रत्ययही होतो; उदा० इति ह अकरोत्, इति ह चकार, शश्वदकरोत्, शश्वच्चकार,

१. (सू. ११७) नुकत्याच झालेल्या क्रियेबद्दल प्रश्न असेल तर लिटाच्या विषयामध्यें एकदा लङ् प्रत्ययही होतो; उदा०—अगच्छद्देवदत्त; किम् , जगाम देवदत्तः किम् .

(सू. ११८) लिटाच्या विषयामध्यें म्हणजे भूत, अनद्यतन, किंवा परोक्ष क्रिया असतांना जर स्मशब्द उपपद असेल तर लिट् न करतां लट् करावा; उदा०—यजति स्म युधिष्ठिरः.

२. वार्तिकामध्यें स्मपुरा हा शब्द दोनदा आला आहे. तेव्हा कोठेंतरी एका ठिकाणी स्मपुरा या शब्दाचा निराळा अर्थ घेतला पाहिजे. कारण, एकाच अर्थानें विधि व निषेध संभवत नाहींत. दुसरा अर्थ म्हणजे ' स्मपुरा ' हा प्रत्याहार प्रकृत सूत्रांतील स्म शब्दापासन ' पुरि लुङ् चा स्मे ' या सूत्रांतील पुरा शब्दापर्यंत. पहिल्या अर्थाचे वेळीं पहिल्या स्मपुरा शब्दाचा हा अर्थ घेतला आहे. आणि तो प्रत्याहारच पण आदिअंत सोडून घेतला म्हणजे तो अर्थ वार्तिकाच्या दुसऱ्या अर्थाचे वेळीं दुसऱ्या स्मपुरा शब्दाचा घेतला आहे.

ष्यते ॥

अपरोक्षानद्यतनौ ननौ च नन्वोश्च विनिवृत्तौ ॥ २ ॥

न पुराद्यतन इति भवेदेतद्वाच्यं

तत्रैतावद्वक्तव्यं स्यान्न पुराद्यतन इति॥

तत्र चापि लुङ्ग्रहणम्।

तत्र चापि लुङ्ग्रहणं ज्ञापकं न पुरालक्षणोऽद्यतने भवतीति ॥

अथ बुद्धिरविशेषात्स्मपुरा हेतू

अथ बुद्धिरियमविशेषेण स्मपुरा हेतू इति ।

तत्र चापि शृणु भूयः ॥ ३ ॥

अपरोक्षे चेत्येष प्राक्पुरिसंशब्दनाद्विनिवृत्तः ।

सर्वत्रानद्यतनस्तथा सति नञा किमिह कार्यम् ॥ ४ ॥

स्मादावपरोक्षे चेत्यार्यामिति शक्यमेतदपि विद्धि ।

शक्यं हि निवर्तयितुं परोक्ष इति लट् स्म इत्यत्र ॥ ५ ॥

स्यादेषा तव बुद्धिः स्मलक्षणेऽप्येवमेव सिद्धमिति ।

लट् स्म इति भवेन्नार्थस्तस्मात्कार्यं परार्थं तु ॥ ६ ॥

एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यः स्मलक्षणः पुरालक्षणश्चानद्यतने भवत इति ॥

---

कांहीं उपयोग नाहीं.

'ननौ पृष्ट०' आणि 'नन्वो०' या दोन सूत्रांमध्यें अपरोक्ष आणि अनद्यतन या शब्दांची अनुवृत्ति करूं नये.

( श्लो. ३ ) तेव्हां आतां फक्त पुरा शब्द उपपद असतांना अद्यतनकालीं प्रत्यय होत नाहीं, एवढाच निषेध करावा लागेल.

वस्तुत: विचार केला तर तोही निषेध करावयास नको. कारण पुराशब्द उपपद असतांना सांगितलेला प्रत्यय अद्यतनकालीं होत नाहीं, ह्या अर्थाचें ज्ञापक तेथील लुङ्ग्रहणच होईल[३].

आतां या वार्तिकाचा अर्थ दुसरा घ्यावा म्हणजे स्म आणि पुरा हीं उपपदें सामान्य भूतकालीं प्रत्यय होण्याला कारणीभूत होतात असें वाटत असेल तर

त्याविषयींही सांगतों ऐका.

( श्लो.४ ) अपरोक्षे च हें 'पुरि लुङ्' या सूत्रापूर्वींपर्यंत आहे तेव्हां. त्यामुळें तेथें परोक्षे ह्या पदाची अनुवृत्ति बंद झाली तर अनद्यतन या पदाची अनवृत्ति सर्वत्र आहेच. मग तेथें अद्यतनकालीं होत नाहीं या निषेधाचा काय उपयोग?

(श्लो.५)आतां लट् स्मे याच्यापुढें अपरोक्षे च हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल असेंही समज. कारण लट् स्मे या सूत्रामध्येंच परोक्षे या पदाची अनुवृत्ति करूं नये. त्याची निवृत्ति करणें शक्य आहे.

(श्लो.६) अशा रीतीनें परोक्ष आणि अपरोक्ष या दोन्ही ठिकाणीं स्म उपपद असतांना लट् सिद्ध आहे असें जर तुला वाटत असेल तर लट् स्मे येथें परोक्षे याची निवृत्ति केली तरी अनद्यतने याची निवृत्ति नाहीं असें गृहीत धरलें म्हणजे स्मशब्द उपपद असतांना अद्यतनकालीं प्रत्यय होत नाहीं ह्या निषेधाचा उपयोग येत नाहीं; तरी पण पुराशब्द उपपद असतांना अद्यतनकालीं प्रत्यय होऊं नये याकरितां वार्तिकांतील निषेध पाहिजे.

तर मग वार्तिक मुळींच नको. स्म आणि पुरा हे शब्द उपपद असतांना सांगितलेले प्रत्यय अनद्यतनकालीं होतात असें आचार्या

---

३. पुरि लुङ् चास्मे, यानें जर अद्यतनकालीं प्रत्यय होईल तर लुङ्ग्रहण न करतां विकल्पानें लट् प्रत्यय सांगितला म्हणजे एकदा लुङ् या सामान्य सूत्रानेंच लुङ् होईल. तेव्हां लुङ्ग्रहण व्यर्थ होत आहे व तें ज्ञापक होईल.

[ अपरोक्षे च ॥ ३ । २ । ११९ ॥ ]

ननौ पृष्टप्रतिवचने ॥ ३।२।१२० ॥

ननौ पृष्टप्रतिवचन इत्यशिष्यं क्रियासमाप्तेर्विवक्षितत्वात् ॥ १ ॥

ननौ पृष्टप्रतिवचन इत्यशिष्यो लट् । किं कारणम् । क्रियासमाप्तेर्विवक्षितत्वात् । क्रियाया अत्रासमाप्तिर्विवक्षिता । एष नाम न्याय्यो वर्तमानः कालो यत्र क्रियाया असमाप्तिर्भवति तत्र वर्तमाने लट् [ ३.२.१२३ ] इत्येव सिद्धम् ॥ यदि वर्तमाने लडित्येव लड् भवति शतृशानचौ प्राप्नुतः । इष्येते शतृशानचौ । ननु मां कुर्वन्तं पश्य । ननु मां कुर्वाणं पश्येति ॥

[ नन्वोर्विभाषा ॥ ३ । २ । १२१ ॥ ]

पुरि लुङ् चास्मे ॥ ३ । २ । १२२ ॥

हशश्वद्भ्यां पुरा ॥ १ ॥

हशश्वल्लक्षणात्पुरालक्षणो भवति विप्र-

---

सूत्रकारच सुचवीत आहेत[४].

(सू. १२०, वा. १) ननौ पृष्टप्रतिवचने या प्रकृत सूत्रानें जो लट् प्रत्यय सांगितला आहे तो सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं, क्रियेची समाप्ति झाली नाहीं अशीच तेथें विवक्षा आहे आणि जेथें क्रियेची समाप्ति झाली नसते तेथें वर्तमानकाल समजणें हेंच योग्य आहे. तेव्हां तेथें 'वर्तमाने लट्' ( ३।२।१२३ ) यानेंच लट् प्रत्यय सिद्ध होत आहे.

पण जर 'वर्तमाने लट्' यानें लट् प्रत्यय केला तर त्याच्याच पुढील सूत्रानें त्या लटाचे स्थानीं सांगितलेले शतृ व शानच् हे आदेश होऊं लागतील.

शतृ व शानच् हे प्रत्यय तेथें होतातच; ते इष्टच आहेत; उदा०:—ननु मां कुर्वन्तं पश्य, ननु मां कुर्वाणं पश्य.

( सू. १२२, वा. १ ) ह किंवा शश्वत् उपपद असतांना सांगितलेल्या प्रत्यया (३।२।११६)-पेक्षां हा पुराशब्द उपपद असतांना सांगित-

---

४. वास्तविक विचार केला तर परोक्ष आणि अनद्यतन ही दोन पदें संबद्ध असल्यामुळें लट् स्मे येथें दोन्ही येतील; त्यांपैकीं अनद्यतने हें पाहिजेच आहे; त्याबरोबर परोक्षे येणार म्हणून 'अपरोक्षे च' हें सूत्र केलें पाहिजे. तेव्हां त्यावरून लट् स्मे हें अनद्यतनकालींच होईल व मागील टीपेंत लिहिल्याप्रमाणें 'पुरि लुङ् चास्मे' हें अनद्यतनकालींच प्रवृत्त होईल. तेव्हां वार्तिक मुळींच नको.

१.(सू. ११९) प्रत्यक्ष क्रिया असतांना आणि स्म शब्द उपपद असतांना धातूहून अनद्यतनभूतकालीं लङ् न करतां लट् करावा; उदा० एवं स्म पिता ब्रवीति. येथें प्रयोग करणारा प्रत्यक्ष ऐकलेलें आपल्या बापाचें भाषण सांगत आहे.

१.(सू. १२०) प्रश्नपूर्वक उत्तर देतांना त्या उत्तरवाक्यामध्यें ननु शब्द उपपद असतांना धातूहून सामान्यभूतकालीं लट् प्रत्यय होतो; उदा० 'हे देवदत्ता, तूं कट तयार केलास काय ?' या प्रश्नाचें उत्तर 'ननु करोमि भोः' असें दिलें आहे. 'होय, मीं हा आतांच केला.' असा अर्थ आहे.

२. कट तयार करून उठल्याबरोबर कोणी विचारलें तर 'हा आतां करतोंच आहें पहा' असें उत्तर देतो, तो या वाक्याचा अर्थ आहे.

१.(सू.१२१) प्रश्नपूर्वक उत्तर देतांना त्या उत्तरवाक्यामध्यें न किंवा नु शब्द उपपद असतांना धातूहून सामान्य भूतकालीं लट् प्रत्यय विकल्पानें होतो; उदा०—तूं कट तयार केलास काय ? या प्रश्नाचें उत्तर 'न करोमि भोः', 'नाकार्षम् भोः', असें दिलें जातें. 'मीं केला नाहीं' असा अर्थ आहे. तसेंच त्या प्रश्नाचें उत्तर 'अहं नु करोमि,' 'अहं न्वकार्षम्' असें दिलें जातें. 'आतांच मी केला' असा त्याचा अर्थ आहे.

१.(सू. १२२) पुरा शब्द उपपद असतांना आणि स्म शब्द उपपद नसतांना धातूहून अनद्यतनभूतकालीं लुङ् आणि लट् विकल्पानें होतात; उदा०—वसन्तीह पुरा छात्राः, अवात्सुः पुरा छात्राः. येथें लुङ् व लट् ज्या वेळीं होत नाहींत त्या वेळीं अवसन् असा लङ्ही होतो. परोक्षत्वाची विवक्षा असेल तर ऊषुः असा लिट्ही होतो.

तिषेधेन । हशश्वल्लक्षणस्यावकाशः । इति हाकरोत् इति ह चकार । शश्वदकरोत् शश्वच्चकार । पुरालक्षणस्यावकाशः । रथेनायं पुरा याति । रथेनायं पुरायासीत् । इहोभयं प्राप्नोति । रथेन ह शश्वत्पुरा याति । रथेन ह शश्वत्पुरायासीत् । पुरालक्षणो भवति विप्रतिषेधेन ॥

स्मः सर्वेभ्यो विप्रतिषेधेन ॥ २ ॥

स्मलक्षणः सर्वेभ्यो भवति विप्रतिषेधेन । हशश्वल्लक्षणात्पुरालक्षणाच्च । हशश्वल्लक्षणस्यावकाशः । इति हाकरोत् इति ह चकार । शश्वदकरोत् शश्वच्चकार । पुरालक्षणस्यावकाशः । रथेनायं पुरा याति । रथेनायं पुरायासीत् । स्मलक्षणस्यावकाशः। धर्मेण स्म कुरवो युध्यन्ते । इह सर्वं प्राप्नोति । न ह स्म वै पुरा शश्वदग्निरपरशुवृक्णं दहति । स्मलक्षणो लङ् भवति विप्रतिषेधेन ॥

वर्तमाने लट् ॥ ३ । २ । १२३ ॥

प्रवृत्तस्याविरामे शिष्या भवन्त्यवर्तमानत्वात् ॥ १ ॥

प्रवृत्तस्याविरामे शासितव्या भवन्ती । इहाधीमहे । इह वसामः । इह पुष्यमित्रं याजयामः । किं पुनः कारणं न सिध्यति । अवर्तमानत्वात् ॥

नित्यप्रवृत्ते च कालाविभागात् ॥ २ ॥

---

लेला प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. इति हाकरोत्, इति ह चकार, शश्वदकरोत्, शश्वच्चकार, येथें ह किंवा शश्वत् उपपद असतांना सांगितलेल्या प्रत्ययाला अवकाश आहे. तसेंच रथेनायं पुरा याति, रथेनायं पुराऽयासीत्, येथें पुराशब्द उपपद असतांना सांगितलेल्या प्रत्ययाला अवकाश आहे. आणि रथेन ह शश्वत्पुरा याति, रथेन ह शश्वत् पुरायासीत् या ठिकाणीं उभयतांची प्राप्ति येते. त्यांपैकीं पुराशब्द उपपद असतांना सांगितलेला प्रत्यय विप्रतिषेधानें होतो.[२]

(वा.२) ह शब्द, शश्वत् शब्द आणि पुरा शब्द हे उपपद असतांना सांगितलेल्या प्रत्ययापेक्षां स्म शब्द उपपद असताना सांगितलेला प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. इति हाकरोत्, इति ह चकार, शश्वदकरोत्, शश्वच्चकार, या ठिकाणीं ह आणि शश्वत् हे शब्द उपपद असतांना सांगितलेल्या प्रत्ययाला अवकाश आहे. रथेनायं पुरा याति, रथेनायं पुरायासीत्, या ठिकाणीं पुराशब्द उपपद असतांना सांगितलेल्या प्रत्ययाला अवकाश आहे. तसेंच,धर्मेण स्म कुरवो युध्यन्ते येथें स्मशब्द उपपद असतांना सांगितलेल्या प्रत्ययाला अवकाश आहे; आणि न ह स्म वै पुरा शश्वदग्निरपशु वृक्णं दहति येथें सर्वांचीच प्राप्ति येते. त्यांपैकीं स्मशब्द उपपद असतांना सांगितलेला लट् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो.

(सू.१२३, वा.१) एखादी क्रिया करण्याविषयीं प्रवृत्ति झाली असतां ती क्रिया पुरी होईतोंपर्यंत केव्हांही त्या क्रियेचा निर्देश करतांना लट् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०—इहाधीमहे, इह वसामः, इह पुष्यमित्रं याजयामः.

पण येथें प्रकृत सूत्रानेंच लट्प्रत्यय कां बरें होणार नाहीं ?

त्या वेळीं ती क्रिया करीत नाहीं म्हणून होणार नाहीं.

(वा.२) क्रियेविषयीं नेहमींच प्रवृत्ति असली तर तेथेंही लट् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०

---

२. 'पुरि लुङ् चास्मे' यापेक्षां 'लट् स्मे' हें पूर्वविप्रतिषेधानें होतें. पुरि लुङ् चास्मे या सूत्रामध्ये अस्मे असें म्हणावयास नको असा अभिप्राय आहे.

१.(सू. १२३) धातूहून वर्तमानकालीं लट् प्रत्यय होतो; उदा० पचति देवदत्तः.

२. 'येथें आम्ही अध्ययन करीत असतों' असा प्रयोग जेवतांनासुद्धां होतो. काशीला निघालेला मनुष्य मध्यें मुक्कामावर उतरून स्वस्थ बसला असतांही 'काशीला जात आहोंत' असें म्हणतो.

नित्यप्रवृत्ते च शासितव्या भवन्ती। तिष्ठन्ति पर्वताः। स्रवन्ति नद्य इति। किं पुनः कारणं न सिध्यति। कालाविभागात्। इह भूतभविष्यत्प्रतिद्वन्द्वो वर्तमानः कालो न चात्र भूतभविष्यन्तौ कालौ स्तः॥

न्याय्या त्वारम्भानपवर्गात् ॥ ३ ॥

न्याय्या त्वेषा वर्तमानकालता। कुतः। आरम्भानपवर्गात्। आरम्भोऽत्रानपवृक्तः। एष नाम न्याय्यो वर्तमानः कालो यत्रारम्भोऽनपवृक्तः॥

अस्ति च मुक्तसंशये विरामः॥ ४ ॥

यं खल्वपि भवान्मुक्तसंशयं वर्तमानं कालं न्याय्यं मन्यते भुङ्क्ते देवदत्त इति तेनैतत्तुल्यम्। सोऽपि ह्यवश्यं भुञ्जानो हसति वा जल्पति वा पानीयं वा पिबति। यद्यत्र युक्ता वर्तमानकालता दृश्यते इहापि युक्ता दृश्यताम्॥

सन्तिच कालविभागाः ॥ ५ ॥

सन्ति खल्वपि कालविभागाः। तिष्ठन्ति पर्वताः। स्थास्यन्ति पर्वताः तस्थुः पर्वता इति। किं शक्यन्त एते शब्दाः प्रयोक्तुमित्यतः सन्ति कालविभागाः। नावश्यं प्रयोगादेव। इह भूतभविष्यद्वर्तमानानां राज्ञां याः क्रियास्तास्तिष्ठतेरधिकरणम्। इह तावत्तिष्ठन्ति पर्वता इति संप्रति ये राजानस्तेषां याः क्रियास्तासु वर्तमानासु। स्थास्यन्ति पर्वता इतीत उत्तरं ये राजानो भविष्यन्ति तेषां याः क्रियास्तासु भवि-

---

तिष्ठन्ति पर्वताः, स्रवन्ति नद्यः.

पण येथें प्रकृत सूत्रानेंच कां बरें लट् प्रत्यय होणार नाहीं ?

कालाचा विभाग कांहींच कळत नाहीं, म्हणून होणार नाहीं. जो भूतकाल नव्हे आणि भविष्यकालही नव्हे तो वर्तमानकाल होय. आणि तिष्ठन्ति, स्रवन्ति, या पर्वत वगैरेंच्या क्रियांसंबंधानें भूतकाल कोणता व भविष्यकाल कोणता तें कांहींच कळत नाहीं. तेव्हां वर्तमानकालही कोठपासून धरावयाचा तें कांहीं सांगतां येत नाहीं.

( वा. ३ ) इहाधीमहे इत्यादि ठिकाणीं मध्यें एखादे वेळीं अध्ययनक्रिया करीत नसला तरी अध्ययनक्रियेचा वर्तमानकाल समजणें हें न्याय्यच आहे.

कशावरून ?

अशावरून कीं, आरंभिलेली अध्ययनक्रिया संपली नाहीं म्हणून. आरंभिलेली क्रिया संपली नाहीं एवढेंच पाहून वर्तमानकाल समजणें हें न्याय्य आहे.

( वा. ४ ) जेथें तूं खरोखर योग्य वर्तमानकाल आहे असें निःसंशय समजतोस, उदा० भुङ्क्ते देवदत्तः तें आणि हें उदाहरण सारखेंच आहे. असें पहा कीं, तोही जेवतांना मध्यें हसतो, बोलतो, पाणी पिणें इत्यादि इतर गोष्टी करतोच, मग तेथें जर वर्तमानकाल योग्य आहे असें तुला वाटतें तर इहाधीमहे या उदाहरणांतही वर्तमानकाल योग्य आहे असें समज.

( वा. ५ ) जेथें क्रिया नित्य असते तेथेंही कालाचे विभाग आहेतच; उदा०:–तिष्ठन्ति पर्वताः, स्थास्यन्ति पर्वताः, तस्थुः पर्वताः. कालाचे विभाग नसतील तर असे शब्दांचे प्रयोग करतां येतील काय? तेव्हां अर्थातच कालाचे विभाग आहेत असें मानलेंच पाहिजे.

या प्रयोगांवरूनच केवळ कालाचे विभाग मानले पाहिजेत असें नाहीं, तर भूत, भविष्य आणि वर्तमान अशा तिन्ही प्रकारच्या राजांच्या निरनिराळ्या तीन प्रकारच्या क्रिया त्या तिष्ठन्ति, स्थास्यन्ति व तस्थुः या क्रियापदांनीं दाखविलेल्या स्थितिक्रियांचें अधिकरण होत. तिष्ठन्ति पर्वताः येथें हल्लींच्या राजांच्या ज्या क्रिया त्या असतांना पर्वतांची स्थिति दाखविली जाते; स्थास्यन्ति पर्वताः येथें पुढें

ष्यन्तीषु। तस्थुः पर्वता इतीह ये राजानो बभूवुस्तेषां याः क्रियास्तासु भूतासु ॥

अपर आह। नास्ति वर्तमानः काल इति। अपि चात्र श्लोकानुदाहरन्ति।

न वर्तते चक्रमिषुर्न पात्यते
न स्यन्दन्ते सरितः सागराय।
कूटस्थोऽयं लोको न विचेष्टितास्ति
यो ह्येवं पश्यति सोऽप्यनन्धः ॥१॥

मीमांसको मन्यमानो युवा मेधाविसंमतः।
काकं स्मेहानुपृच्छति किं ते पतितलक्षणम् ॥ २ ॥

अनागते न पतसि अतिक्रान्ते च काक न।
यदि संप्रति पतसि सर्वो लोकः पतत्ययम् ॥
हिमवानपि गच्छति ॥

अनागतमतिक्रान्तं वर्तमानमिति त्रयम्। सर्वत्र च गतिर्नास्ति गच्छतीति

---

होणाऱ्या राजांच्या ज्या क्रिया त्यांनीं त्या वेळची पर्वतांची स्थिति दाखविली जाते; तस्थुः पर्वताः येथें पूर्वी झालेल्या राजांच्या ज्या क्रिया त्यांनीं त्या वेळची पर्वतांची स्थिति दाखविली जाते.

कांहीं लोक तर असें म्हणतात कीं, वर्तमानकाल हा मुळीं नाहींच. आणि या आपल्या म्हणण्याला साधक म्हणून पुढील श्लोक देतात.

हें संचारचक्र परिवर्तनशील आहे असें नाहीं. कोणी दुसऱ्यावर बाण टाकिला जात नाहीं. नद्या ह्या समुद्राकडे वाहतात असेंही नाहीं. हा लोक कूटस्थ म्ह. एका रूपानें कायमच आहे, ह्यांत फिरवाफिरव करणारा कोणीच नाहीं, असें जो नुसतें समजतो तोही ज्ञानी होय; मग त्याप्रमाणें वागणारा योगी हा ज्ञानी आहे हें काय सांगावें ?

आपण विचारी आहोंत असें मानणारा तरुण, लोकमान्य असा कोणी एक मनुष्य कावळ्याला विचारतो कीं, तुझी पतनाक्रिया आहे कोठें ? ती मुळींच नाहीं. भविष्यकालची आणि भूतकालची पतनक्रिया ह्या वेळीं जमेंत धरतां येत नाहीं.[3] सांप्रतकालीं पतनक्रिया आहे असें म्हणशील तर सर्वच लोकाला पतनक्रिया आहे असें म्हणावें लागेल. हिमवान् पर्वतसुद्धां इकडून तिकडे गमन करतो असें म्हणावें लागेल. याप्रमाणें भविष्यकाल, भूतकाल आणि वर्तमानकाल या तिन्ही कालीं गमनक्रिया सांगतां येत नाहीं. तेव्हां गच्छति असें लोक जें बोलतात तें

---

३. प्रातः स्नाति येथें प्रातःकाल हा स्नानक्रियेचें अधिकरण होतो पण तो प्रातःकाल कोणता हें त्या कालाचें स्वरूप सूर्य उगवणें या दुसऱ्या क्रियेनेंच ठरविलें जातें तेव्हां सूर्योदय ही क्रिया स्नानक्रियेचें अधिकरण होऊन सूर्योदये स्नाति असा प्रयोग होतो. तेव्हां ज्याप्रमाण येथे सूर्योदय ही क्रिया स्नानक्रियेची वेळ दाखविते त्याप्रमाणें त्या त्या राजांच्या क्रिया पर्वतांच्या स्थितिक्रियेची निरनिराळी वेळ दाखवितात. तेव्हां क्रियाभेदमूलक कालाचा भेद समजला जातो.

४. आतांपर्यंतचा भूतकाळ आणि पुढचा भविष्यकाळ, यांमध्यें संधिकालालाच वर्तमानकाल म्हणतात. वर्तमानकाल असा थोडासुद्धां काल नाहीं.

५. भूतकाल आणि भविष्यकाल यांचें प्रत्यक्ष संभवत नाहीं. आतां जर वर्तमानकाल म्हणून कांहीं काल असता तर तेवढ्यांत होणारें परिवर्तन प्रत्यक्ष समजेल. फेकणें किंवा नदीचें वाहणें प्रत्यक्ष समजेल. पण वर्तमानकाल असा कांहींच काल नाहीं; तेव्हां परिवर्तन वगैरे प्रत्यक्ष होत नाहीं.

६. कारण वर्तमानकालीं तिचें प्रत्यक्ष नाहीं.

७. सांप्रत काल म्ह. वर्तमानकाल, हा फक्त त्या भूत व भविष्य यांचा संधि आहे. त्यांत क्षण, अर्धक्षण निमेष वगैरे थोडासुद्धां काल नाहीं. मग त्या कालीं अमुक झालें असें कसें म्हणतां येईल ? आतां अनुभवाच्या विरुद्धच जर मनुष्य बोलूं लागला तर समुद्र, अरण्य, हे सुद्धां चालतात असें कां म्हणूं नये?

किमुच्यते ॥

क्रियाप्रवृत्तौ यो हेतुस्तदर्थं यद्विचेष्टितम्।
तत्समीक्ष्य प्रयुञ्जीत गच्छतीत्यविचारयन् ॥

अपर आह। अस्ति वर्तमानः काल इति। आदित्यगतिवन्नोपलभ्यते। अपि चात्र श्लोकमुदाहरन्ति।

बिसस्य बाला इव दह्यमाना न लक्ष्यते विकृतिः संनिपाते।
अस्तीति तां वेदयन्ते त्रिभावाः सूक्ष्मो हि भावोऽनुमितेन गम्यः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य द्वितीये पादे द्वितीयमाह्निकम्।

---

उगीचच कांहींतरी बोलतात.

गमनक्रिया करण्याचीं जीं रथ वगैरे साधनें तीं सज्ज करण्याकरितां जे घोडा जोडणें वगैरे व्यापार ते चालू झालेले पाहून गच्छति असा प्रयोग बेधडक करावा; कांहीं हरकत नाहीं.

येथें दुसरा कोणी असें म्हणतो की वर्तमानकाल हा सूक्ष्म का होईना पण कांहींतरी काल आहे. फक्त जशी सूर्याची गति प्रत्यक्ष होत नाहीं तसें त्या कालाचें प्रत्यक्ष होत नाहीं एवढेंच. आणि ह्या आपल्या बोलण्याचा साधक म्हणून पुढील श्लोक देतातः—

सर्व कारणसामग्री जुळली असतां पदार्थामध्यें होणारा विकार प्रत्यक्ष दिसत नाहीं हें खरें; जसें कमळाचा देठ जळूं लागला असतां त्यांतील सूक्ष्म तंतु जळतांना प्रत्यक्ष दिसत नाहींत, तसेंच हें होय. पण तिन्ही कालच्या वस्तूंचें ज्यांना प्रत्यक्ष होतें असे योगी लोक ही ती दाहक्रिया आहे असें जाणतातच. आतां आपल्यासारख्या लोकांनीं मात्र त्या सूक्ष्म गोष्टी अनुमानानेंच गृहीत धरल्या पाहिजेत.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें.

---

८. वर्तमानकाल म्हणून कांहीं थोडाथुडा काल आहे असें गृहीत धरूनच हें उत्तर दिलें आहे.

**लटः[1] शतृशानचावप्रथमासमानाधिकरणे ॥ ३ । २ । १२४ ॥**

**लस्याप्रथमासमानाधिकरणेनायोगादादेशानुपपत्तिर्यथान्यत्र ॥ १ ॥**

लस्याप्रथमासमानाधिकरणेनायोगादादेशयोरनुपपत्तिर्यथान्यत्र। तद्यथा। अन्यत्रापि लस्याप्रथमासमानाधिकरणेन योगो न भवति। क्वान्यत्र। लङि। अपचदोदनं देवदत्त इति ॥

**योग इति चेदन्यत्रापि योगः स्यात् ॥ २ ॥**

अथ मतमेतद्भवति योग इत्यन्यत्रापि योगः स्यात्। क्वान्यत्र। लङि। अपचदोदनं देवदत्त इति ॥

न क्वचिद्योग इति कृत्वातः सर्वत्र योगेन भवितव्यं क्वचिद्वायोग इति कृत्वा

---

(सू.१२४, वा.१) अप्रथमान्ताशीं समानाधिकरण अशा अर्थाशीं लकाराचा योग संभवत नसल्यामुळें[2] लकाराला हे आदेश कोठेंच करतां येणार नाहींत. जसा इतर ठिकाणीं अप्रथमान्ताशीं समानाधिकरण अशा अर्थाशीं लकाराचा योग होत नाहीं तसाच येथेंही होणार नाहीं.

इतर ठिकाणीं म्हणजे कोठें बरें ?

लङामध्यें पहा; उदा० अपचत् ओदनं देवदत्तः[3].

(वा. २) आतां पचन्तं देवदत्तं पश्य येथें अप्रथमान्ताशीं समानाधिकरण अशा अर्थाबरोबर लकाराचा योग आहे असें मतें असेल तर इतर ठिकाणींही तसा योग घ्यावा लागेल.

इतर ठिकाणीं म्हणजे कोठें बरें ?

लङामध्यें पहा; उदा० अपचत् ओदनं देवदत्तः[5].

पण एका ठिकाणीं योग असला म्हणजे सर्व ठिकाणीं योग असलाच पाहिजे, असा कांहीं नियम नाहीं. तसेंच एका ठिकाणीं योग नसला म्हणजे सर्व ठिकाणीं तो नसलाच पाहिजे,

---

१. लटाचे स्थानीं शतृ आणि शानच् असे आदेश होतात. परंतु त्या लटाचा जो अर्थ तो प्रथमान्त अर्थाशीं समानाधिकरण नसावा; उदा० पचन्तं देवदत्तं पश्य, पचमानं देवदत्तं पश्य, येथें लटाचा अर्थ कर्ता आहे तो देवदत्ताशीं समानाधिकरण आहे. कारण पचनक्रियेचा कर्ता देवदत्त आहे तो देवदत्त येथें पुढें दृशिक्रियेचें कर्म असल्यामुळें द्वितीयान्त आहे, प्रथमान्त नाहीं.

२. पाचकः येथें कृत्प्रत्ययाचा अर्थ कर्ता आहे. तेव्हां कृत्प्रत्ययाचा योग कर्ता या अर्थाशीं आहे. तो कर्ता पाचको देवदत्तः येथें प्रथमान्त अर्थाशीं समानाधिकरण होतो. कारण त्या कर्त्याचा देवदत्ताशीं अभेदानें अन्वय आहे. पाचकं देवदत्तं पश्य येथें अप्रथमान्ताशीं समानाधिकरण होतो. तसें पचन्तं देवदत्तं पश्य येथें जमत नाहीं. कारण लकाराच्या अर्थाचा नेहमीं क्रियेकडेच अन्वय होतो. तेव्हां देवदत्त हा जरी अप्रथमान्त अर्थ आहे तरी लकाराचा अर्थ कर्ता हा त्याच्याशीं समानाधिकरण होत नाहीं.

३. येथें अपचत् येथील लङाचा अर्थ जो कर्ता त्याचा देवदत्ताकडे अन्वय असता तर तो देवदत्त दृशिक्रियेचें कर्म असतांना अपचत् ओदनं देवदत्तं पश्य असा भलताच प्रयोग होऊं लागेल.

४ पचन्तं देवदत्तं पश्य येथें लकाराच्या अर्थाचा म्ह. कर्त्याचा अन्वय पचनक्रियेकडे आहे, देवदत्ताकडे नाहीं, आणि देवदत्त या अप्रथमान्ताचा अन्वय दर्शनक्रियेकडे आहे, पचनक्रियेच्या कर्त्याकडे नाहीं. तरी वस्तुतः लकाराचा अर्थ जो कर्ता आणि अप्रथमान्तार्थ देवदत्त हे दोघे वस्तुतः एकच असल्यामुळें समानाधिकरण आहेतच. तेव्हां अप्रथमान्तार्थाशीं समानाधिकरण जो कर्ता त्याच्याशीं लकाराचा योग आहे.

५. तेव्हां अपचत् ओदनं देवदत्तं पश्य असा भलताच अर्थ होऊं लागेल. लट् नसल्यामुळें शतृप्रत्यय फक्त नाहीं.

सर्वत्रायोगेन। तद्यथा। समानमीहमानानां चाधीयानानां च केचिदर्थैर्युज्यन्तेऽपरे न। न चेदानीं कश्चिदर्थवानित्यतः सर्वैरर्थवद्भिः शक्यं भवितुं कश्चिद्वानर्थक इति सर्वैरनर्थकैः। तत्र किमस्माभिः शक्यं कर्तुम्। यल्लटोऽप्रथमासमानाधिकरणेन योगो भवति लङो न स्वाभाविकमेतत्॥ अथवादेशे सामानाधिकरण्यं दृष्ट्वानुमानाद्गन्तव्यं प्रकृतेरपि सामानाधिकरण्यं भवतीति। तद्यथा। धूमं दृष्ट्वाग्निरत्रेति गम्यते त्रिविष्टब्धकं दृष्ट्वा परिव्राजक इति॥ विषम उपन्यासः। प्रत्यक्षस्तेनाग्निधूमयोरभिसंबन्धः कृतो भवति त्रिविष्टब्धकपरिव्राजकयोश्च। स तद्विदेशस्थमपि दृष्ट्वा जानात्यग्निरत्र परिव्राजकोऽत्रेति॥ भवति वै प्रत्यक्षादप्यनुमानबलीयस्त्वम्। तद्यथा। अलातचक्रं प्रत्यक्षं दृश्यतेऽनुमानाच्च गम्यते नैतदस्तीति॥ कस्यचित्खल्वपि सकृत्कृतोऽभिसंबन्धोऽत्यन्ताय कृतो भवति। तद्यथा। वृक्षपर्णयोरयं वृक्ष इदं

असाही नियम नाही. असें पहा की आचरणानें सारखे व बरोबरच अध्ययन करणारे अशा शिष्यांपैकीं पुढें कांहींना द्रव्यप्राप्ति होते, कांहींना होत नाहीं. तेव्हां त्यांतील एकाला द्रव्य प्राप्त झालें म्हणजे सर्वांना तसें झालेंच पाहिजे असें होणें शक्य नाहीं. तसेंच एखाद्याला द्रव्य प्राप्त झालें नाहीं म्हणजे सर्वांना तसेंच न मिळालें पाहिजे असें नाहीं. तेव्हां लट् केला असतां अप्रथमान्ताशीं समानाधिकरण अशा अर्थाशीं त्याचा योग होतो आणि लङ् केला असतां तसा होत नाहीं, येथें आम्हांला काय बरें करतां येईल?

कांहींच नाहीं. कारण ह्या गोष्टी स्वाभाविकच आहेत.

अथवा पचन्तं देवदत्तं पश्य येथें पच्धातूच्या पुढील लट्प्रत्ययाचे स्थानीं शतृआदेश झाल्यानंतर त्याचा सामानाधिकरण्यानें देवदत्ताकडे अन्वय झालेला पाहून असें अनुमान करावें की ह्या शतृप्रत्ययाचा स्थानी जो लट् त्याचाही संबंध देवदत्ताकडेच आहे; जसें धूम पाहून येथें अग्नि आहे असें अनुमान होतें, तसेंच संन्याशाचा दंड पाहून येथें संन्यासी आहे असें अनुमान होतें; तसेंच हें होय.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण तेथें अनुमान करणाऱ्यानें अग्नि आणि धूम यांचा संबंध पूर्वी प्रत्यक्ष पाहिलेला असतो. संन्याशी आणि त्याचा दंड यांचाही संबंध तसाच पूर्वी पाहिलेला असतो. त्यामुळें तो देशान्तरीं गेला तरी तेथेंही धूम किंवा संन्याशाचा दंड दृष्टीस पडेल तर येथें अग्नि आहे व येथें संन्याशी आहे असें निश्चयानें समजतो. पण प्रत्यक्षापेक्षांही अनुमान प्रबल आहे; जसें:– अलातचक्र हें प्रत्यक्ष पाहण्यांत वर्तुल दिसतें, परंतु तें वर्तुल नाहीं असें अनुमानानें निश्चित समजतें. शिवाय कांहीं ठिकाणीं एकाचा दुसऱ्याशीं असलेला संबंध एक वेळ प्रत्यक्ष झाला असला तरी तो कायमचाच समजला जातो; जसें:– हें झाड आणि हें त्याचें पान असा झाड आणि पान यांचा संबंध केव्हांही एकदा

६. तेव्हां प्रकृत स्थलीं आदेशाचा ज्याकडे सामानाधिकरण्यानें अन्वय, त्याकडेच स्थानीचा सामानाधिकरण्यानें अन्वय. हे दोन्ही अन्यत्र कोठें प्रत्यक्ष होत नसल्यामुळें येथें अनुमान करतां येणार नाहीं.

७. जळकें काष्ठ गरगर फिरवलें म्हणजे वर्तुल दिसतें तें अलातचक्र होय. वस्तुतः त्या काष्ठाचें टोंक कोणत्या तरी एका दिशेकडे असावयाचें. त्यावरून तेथें वर्तुल मुळींच नाहीं असें अनुमानानें सिद्ध होतें व तें वर्तुलप्रत्यक्षाचा बाध करतें. जर अनुमान होण्यापूर्वी साध्य आणि साधन यांचा संबंध प्रत्यक्ष असलाच पाहिजे असा नियम असेल तर प्रत्यक्ष हें अनुमानाला उपजीव्य असल्यामुळें तेंच प्रबल होऊं लागेल. आणि तें तर प्रबल नाहीं, असें अलातचक्रावरून दिसतें.

पर्णमिति। स तद्विदेशस्थमपि दृष्ट्वा जानाति वृक्षस्येदं पर्णमिति ॥

किं पुनरयं पर्युदासो यदन्यत्प्रथमासमानाधिकरणादिति। आहोस्वित्प्रसज्यप्रतिषेधः प्रथमासमानाधिकरणे नेति। कश्चात्र विशेषः।

**लटः शतृशानचावप्रथमासमानाधिकरण इति चेत्प्रत्ययोत्तरपदयोरुपसंख्यानम् ॥ ३ ॥**

लटः शतृशानचावप्रथमासमानाधिकरण इति चेत्प्रत्ययोत्तरपदयोरुपसंख्यानं कर्तव्यम्। कौर्वतः पाचतः। कुर्वद्भक्तिः पचद्भक्तिः कुर्वाणभक्तिः पचमानभक्तिः ॥

अस्तु तर्हि प्रसज्यप्रतिषेधः प्रथमासमानाधिकरणे नेति।

**प्रथमाप्रतिषेध उत्तरपद आदेशानुपपत्तिः ॥ ४ ॥**

प्रथमाप्रतिषेध उत्तरपद आदेशयोरनुपपत्तिः। कुर्वती चासौ भक्तिश्च कुर्वद्भक्तिः पचद्भक्तिः कुर्वाणभक्तिः पचमानभक्तिरिति॥ ये चाप्येते समानाधिकरणवृत्तयस्तद्धितास्तत्र च शतृशानचौ न प्राप्नुतः। कुर्वत्तरः पचत्तरः कुर्वाणतरः पचमानतरः। कुर्वद्रूपः पचद्रूपः कुर्वाणरूपः पचमानरूपः।

---

प्रत्यक्ष झाला म्हणजे पुढें तो देशान्तरीं गेला आणि तेथें पान दृष्टीस पडलें की हें झाडाचें पान आहे असें निश्चित समजतोच.

आतां येथें 'अप्रथमासमानाधिकरणे' हा पर्युदास समजावयाचा म्हणजे प्रथमान्तभिन्नाशीं सामानाधिकरण्य पाहिजे असा अर्थ घ्यावयाचा किंवा प्रसज्यप्रतिषेध समजावयाचा, म्हणजे प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असतांना हे प्रत्यय होत नाहींत असा अर्थ घ्यावयाचा? या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक आहे?

(वा.३) प्रथमान्तभिन्नाशीं सामानाधिकरण्य असेल तर लटाचे स्थानीं शतृशानच् हे आदेश होतात, असा अर्थ असेल तर प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतांना शतृशानच् होतात असें म्हणावें लागेल; उदा० कौर्वतः, पाचतः, कुर्वद्भक्तिः पचद्भक्तिः, कुर्वाणभक्तिः पचमानभक्तिः.

तर मग प्रसज्यप्रतिषेधच असूं दे. त्यामुळें प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असतांना हे प्रत्यय होत नाहींत असा अर्थ होईल.

(वा.४) प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असतांना हे प्रत्यय होत नाहींत, असा अर्थ असेल तर समानाधिकरण उत्तरपद पुढें असतांना हे आदेश होणार नाहींत; उदा० कुर्वती चासौ भक्तिश्च कुर्वद्भक्तिः, पचद्भक्तिः, कुर्वाणभक्तिः, पचमानभक्तिः. तसेंच जे तद्धित प्रत्यय समानाधिकरण अशाच कांहीं विशेष अर्थी सांगितले आहेत ते असतांना शतृशानच्प्रत्यय होणार नाहींत; उदा० कुर्वत्तरः पचत्तरः, कुर्वाणतरः पचमानतरः, कुर्वद्रूपः

---

८. तात्पर्य, प्रत्यक्ष वगैरे कोणत्याही कारणामुळें जो एकप्रकारचा संस्कार होतो तो अनुमानाचें कारण आहे. संबंधाचें प्रत्यक्ष हें कारण आहे असें समजूं नये.

९. कुर्वत्,पचत्,या शब्दांहून त्याचें अपत्य इत्यादि अर्थी अण्प्रत्यय झाला आहे. येथें कुर्वत्, पचत्, या शतृप्रत्ययान्ताचें कोणाशींच सामानाधिकरण नसल्यामुळें हे प्रत्यय होणार नाहींत. कुर्वद्भक्तिः वगैरे पुढील शब्दांमध्यें षष्ठीतत्पुरुषसमास आहे. तेव्हां कुर्वत् वगैरे कोणाशींच सामानाधिकरण्य नाहीं.

हे प्रत्यय होण्याला प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य नको हें खरें, पण पर्युदासपक्षीं इतरांशीं सामानाधिकरण्य पाहिजे असें होतें.

१०. तरप्(५।३।५७),रूपप्(५।३।६६) आणि कल्पप् (५।३।६७) हे प्रत्यय स्वार्थींच होत आहेत. अत्यंत स्वार्थी मात्र नव्हेत. ह्या प्रत्ययांनीं मूळ शब्दाच्या अर्थातच कांहीं विशेष दाखविला जातो. त्यामुळें पुढील देवदत्तः या प्रथमान्ताशीं कुर्वत् याचें सामानाधिकरण्य येथें होत आहे. हे दोष पर्युदासपक्षींही येतात.

कुर्वत्कल्पः पचत्कल्पः कुर्वाणकल्पः पचमानकल्प इति ॥

**सिद्धं तु प्रत्ययोत्तरपदयोश्चेति वचनात् ॥ ५ ॥**

सिद्धमेतत्। कथम्। प्रत्ययोत्तरपदयोश्च शतृशानचौ भवत इति वक्तव्यम् ॥

**तत्र प्रत्ययस्यादेशनिमित्तत्वादप्रसिद्धिः ॥ ६ ॥**

तत्र प्रत्ययस्यादेशनिमित्तत्वादप्रसिद्धिः। आदेशनिमित्तः प्रत्ययः प्रत्ययनिमित्तश्चादेशस्तदेतदितरेतराश्रयं भवति। इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ॥

**उत्तरपदस्य च सुबन्तनिमित्तत्वाच्छतृशानचोरप्रसिद्धिः ॥ ७ ॥**

उत्तरपदस्य च सुबन्तनिमित्तत्वाच्छतृशानचोरप्रसिद्धिः। उत्तरपदनिमित्तः सुप्सुबन्तनिमित्तं चोत्तरपदं तदेतदितरेतराश्रयं भवति। इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ॥

**न वा लकारस्य कृत्त्वात्प्रातिपदिकत्वं तदाश्रयं प्रत्ययविधानम् ॥ ८ ॥**

न वैष दोषः। किं कारणम्। लकारस्य कृत्त्वात्प्रातिपदिकत्वम्। लकारः कृत्कृत्प्रातिपदिकमिति प्रातिपदिकसंज्ञा। तदाश्रयं प्रत्ययविधानम्। प्रातिपदिकाश्रया स्वाद्युत्पत्तिर्भविष्यति ॥

**तिङादेशात्सुबुत्पत्तिः ॥ ९ ॥**

तिङादेशः क्रियतां सुबुत्पत्तिरिति परत्वात्सुबुत्पत्तिर्भविष्यति ॥

**तस्मादुत्तरपदप्रसिद्धिः ॥ १० ॥**

तस्मादुत्तरपदं प्रसिद्धमुत्तरपदे प्रसिद्ध

---

पचद्रूपः, कुर्वाणरूपः पचमानरूपः, कुर्वत्कल्पः पचत्कल्पः, कुर्वाणकल्पः पचमानकल्पः.

(वा.५) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

प्रत्यय आणि उत्तरपद पुढें असतांना शतृशानच् होतात असें वचन केलें म्हणजे झालें.

(वा.६) पुढील प्रत्यय हा शतृशानच् या आदेशांचें निमित्त असल्यामुळें कांहींच सिद्ध होत नाहीं. कारण 'पुढील तद्धित प्रत्यय हा ह्या आदेशांचें निमित्त, आणि हे आदेश त्या[11] प्रत्ययाचें निमित्त' असा इतरेतराश्रयदोष येतो. आणि अशीं एकमेकांवर अवलंबून होणारीं कार्यें असतील तर तेथें कांहींच हातीं लागत नाहीं.

(वा.७) तसेंच उत्तरपद हें सुबन्ताचें निमित्त असल्यामुळें शतृशानच् होणार नाहींत. कारण सुप् हा उत्तरपदाचें निमित्त[12] आहे आणि उत्तरपद हें सुबन्ताचें निमित्त[13] आहे, म्हणून येथेंही इतरेतराश्रयदोष येतो. आणि अशीं एकमेकावर अवलंबून कार्यें असतील तर तेथें त्यांपैकीं कांहींच हातीं लागत नाहीं.

(वा.८) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की शतृशानच् करण्यापूर्वीच लकाराला कृत्संज्ञा (३।१।९३) असल्यामुळें प्रातिपदिकसंज्ञा होईल, आणि प्रातिपदिकसंज्ञा झाल्यामुळें पुढें सुप्प्रत्ययाची उत्पत्ति होईल.

(वा.९) आतां लकाराचे स्थानीं तिङादेश (३।४।७८) करावेत किंवा पुढें सुप्प्रत्यय करावेत, असा विचार उत्पन्न झाला असतां परत्वास्तव सुप्प्रत्ययच अगोदर होतील.

(वा.१०) आणि सुप्प्रत्यय झाले म्हणजे समास होऊन उत्तरपद तयार होईल, आणि

---

११. कारण शतृ, शानच्, हे आदेश झाल्यानंतर कृत्प्रत्ययान्त म्हणून प्रातिपदिकसंज्ञा (१।२।४६) होईल आणि नंतर तद्धितप्रत्यय होतील.

१२. समास झाल्यानंतर त्यांतील पुढील भागाला उत्तरपद म्हणतात आणि सुप्प्रत्यय केल्यानंतरच समास होतो.

१३. कारण उत्तरपदामुळें हे शतृशानच् होणार आणि ते झाल्यानंतर प्रातिपदिकसंज्ञा होऊन सुप्-

उत्तरपद इति शतृशानचौ भविष्यतः ॥ इहापि तर्हि तिङादेशात्सुबुत्पत्तिः स्यात् पचति पठतीति। अस्त्यत्र विशेषः। नित्योऽत्र तिङादेशः। उत्पन्नेऽपि सुपि प्राप्नोत्यनुत्पन्नेऽपि प्राप्नोति । नित्यत्वात्तिङादेशे कृते सुबुत्पत्तिर्न भविष्यति॥ इहापि तर्हि नित्यत्वात्तिङादेशः स्यात् कुर्वद्भक्तिः पचद्भक्तिः पचमानभक्तिरिति । अस्त्यत्र विशेषः। शतृशानचौ तिङपवादौ तौ चात्र निमित्तवन्तौ न चापवादविषय उत्सर्गोऽभिनिविशते। पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः। प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते। न तावदत्र कदाचित्तिङ् भवति। अपवादौ शतृशानचौ प्रतीक्षते॥

तदेतत्क सिद्धं भवति। यत्र सामान्यादुत्पत्तिः। यत्र हि विशेषादत इञ् [४.१.९५] इतीतरेतराश्रयमेव तत्र भव-

तें उत्तरपद पुढें असलें म्हणजे त्याच्या निमित्तानें शतृशानच्प्रत्यय करतां येतील[१४].

तर मग पचति, पठति, येथेंही तिङ्प्रत्यय करण्याचे पूर्वी पुढें सुप्प्रत्यय होऊं लागतील.

पचति, पठति, येथें कुर्वद्भक्तिः यासारखी स्थिति नाहीं. त्यापेक्षां येथें विशेष आहे. तो असा की येथें लकाराचे आदेश तिङ् हे सुप्प्रत्ययांपेक्षां नित्य[१५] आहेत. कारण पुढें सुप्प्रत्यय केला तरी त्यांची प्राप्ति येते आणि न केला तरी प्राप्ति येते. तेव्हां नित्यत्वास्तव तिङादेश केल्यानंतर पुढें सुप्प्रत्यय होणार नाहीं.

तर मग कुर्वद्भक्तिः पचद्भक्तिः, कुर्वाणभक्तिः पचमानभक्तिः, येथेंही सुप्प्रत्ययांचा बाध करून नित्यत्वास्तव तिङादेश होऊं लागतील.

कुर्वद्भक्तिः येथें पचति, पठति, यांपेक्षां विशेष आहे. तो असा की येथें तिङादेश नित्य नाहींत. कारण तिङादेशांचे अपवाद जे शतृशानच् त्यांचें निमित्त उत्तरपद हें येथें आहे आणि अपवादाच्या विषयामध्यें उत्सर्ग म्हणजे बाध्यशास्त्र कधींही प्रवृत्त होत नाहीं. कारण अपवादशास्त्र पूर्वी मनांत येतें आणि नंतर उत्सर्गशास्त्र हें कायमच्या अर्थानें मनांत येतें. तेव्हां अपवादाचा विषय कोणता तें पाहून तो सोडून इतर ठिकाणीं उत्सर्गशास्त्र प्रवृत्त होतें म्हणून कुर्वद्भक्तिः येथें केव्हांही तिङादेश होणार नाहींत; आपले अपवाद जे शतृशानच् त्यांची येथें वाट पाहत बसणारच[१६].

अशा रीतीनें इतरेतराश्रयदोष न येतां उदाहरणाची सिद्धि होते, पण ती कोठें ?

उत्तरपद पुढें असतांना सिद्धि होते आणि मोघम प्रातिपदिकाहून प्रत्यय सांगितला असेल[१७] तेथें. आतां अकारान्त प्रातिपदिकाहून इञ्-

प्रत्यय होणार.

१४. तेव्हां इतरेतराश्रयदोष येत नाहीं.

१५. सुप्प्रत्यय मात्र नित्य नाहींत. कारण तिङादेश झाल्यानंतर 'अतिङ्' (३।१।९३) या निषेधामुळें कृत्संज्ञा नाही म्हणून प्रातिपादिकसंज्ञाही नाहीं, तेव्हां तिङ् झाल्यानंतर सुप्प्रत्ययांची प्राप्ति येत नाहीं.

१६. तात्पर्य, कुर्वद्भक्तिः येथें सुप् व तिङ् हे दोन्ही अनित्य असल्यामुळें परत्वास्तव सुप्प्रत्यय होऊन रूप साधतें.

१७. कुर्वतः अपत्यं कौर्वतः येथें कृधातूहून लट्प्रत्यय, त्याला कृत्संज्ञा असल्यामुळें प्रातिपदिकसंज्ञा होते, आणि अपत्यार्थी अण् हा तद्धितप्रत्यय वाटेल त्या प्रातिपदिकाहून सांगितला असल्यामुळें लट्प्रत्ययान्ताहून तो अणप्रत्यय (४।१।९२) होतो, आणि तो प्रत्यय पुढें आहे म्हणून त्याच्या निमित्तानें लटाचे स्थानीं शतृआदेश होऊन उदाहरण साधतें; परंतु वैक्षमाणिः हें मात्र साधत नाहीं; कारण येथें लटाला शानच्आदेश झाल्यानंतर अकारान्त प्रातिपदिकाहून इञ्प्रत्यय करतां येणार आणि इञ्प्रत्यय झाल्यानंतर त्याच्या निमित्तानें शानच् होणार, असा इतरेतराश्रय येतो.

ति । वीक्षमाणस्यापत्यं वैक्षमाणिरिति ॥ इह च शतृशानचौ प्राप्नुतः । पचतितराम् जल्पतितराम् पचतिरूपम् जल्पतिरूपम् पचतिकल्पम् जल्पतिकल्पम् पचति पठतीति ॥ तदेतत्कथं कृत्वा सिद्धं भवति ।

**शतृशानचौ यदि लटो वा ।**

यदि लटः शतृशानचौ वा भवतो व्यवस्थितविभाषा च । तेनेह च भविष्यतः कौर्वतः पाचतः कुर्वद्भक्तिः पचद्भक्तिः पचमानभक्तिः कुर्वत्तरः पचत्तरः पचमानतरः कुर्वद्रूपः पचद्रूपः पचमानरूपः कुर्वत्कल्पः पचत्कल्पः पचमानकल्पः पचन् पठन्निति च लटः शतृशानचौ । इह च न भविष्यतः पचतितराम् जल्पतितराम् पचतिरूपम् जल्पतिरूपम् पचतिकल्पम् जल्पतिकल्पम् पचति पठतीति च लटः शतृशानचौ ॥ तर्त्तर्हि वावचनं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । नन्वोर्विभाषा [३.२.१२१] इति । यदि तदनुवर्तते वर्तमाने लट् [१२३] इति लडपि विभाषा प्राप्नोति । संबन्धमनुवर्तिष्यते । नन्वोर्विभाषा । पुरि लुङ् चास्मे [१२२] विभाषा । वर्तमाने लट् पुरि लुङ् चास्मे विभाषा ।

---

प्रत्यय होतो (४।१।९५) असा विशेष प्रातिपदिकाहून प्रत्यय सांगितला असेल तेथें इतरेतराश्रयदोष येतोच; उदा० वीक्षमाणस्यापत्यं वैक्षमाणिः. तसेंच पचतितराम्[१८] जल्पतितराम्, पचतिरूपम् जल्पतिरूपम्, पचतिकल्पम् जल्पतिकल्पम्, पचति, पठति, ह्या उदाहरणांमध्यें लकाराचे स्थानीं शतृशानच् हे होऊं लागतीलच.

मग हीं उदाहरणें कशीं बरें सिद्ध होतील?

हे लटाचे स्थानीं शतृशानच्प्रत्यय जर विकल्पानें सांगितले आणि तो विकल्प सर्व ठिकाणीं सरसकट न घेता कोठें करणें आणि कोठें न करणें असा व्यवस्थेनेंच घेतला तर सर्व सिद्ध होईल. तेव्हां कौर्वतः पाचतः, कुर्वद्भक्तिः पचद्भक्तिः, कुर्वाणभक्तिः पचमानभक्तिः, कुर्वत्तरः पचत्तरः, कुर्वाणतरः पचमानतरः, कुर्वद्रूपः पचद्रूपः, कुर्वाणरूपः पचमानरूपः, कुर्वत्कल्पः पचत्कल्पः, कुर्वाणकल्पः पचमानकल्पः, पचन्, पठन्, येथें लटाचे स्थानीं शतृशानच् आदेश होतात. आणि पचतितराम् जल्पतितराम्, पचतिरूपम् जल्पतिरूपम्, पचतिकल्पम् जल्पतिकल्पम्, पचति, पठति, येथें लटाचे स्थानीं शतृशानच् आदेश होत नाहींत.

तर मग सूत्रामध्यें वाशब्द घातला पाहिजे.

घालावयास नको; मागून अनुवृत्त येत आहे.

मागें कोठेंसा वाशब्द आहे?

नन्वोर्विभाषा (३।२।१२१) येथें विभाषाशब्द आहे.

पण तो विभाषाशब्द जर प्रकृत सूत्रांत अनुवृत्त येत असेल तर 'वर्तमाने लट्' या सूत्रांतही त्याची अनुवृत्ति असलीच पाहिजे. तेव्हां तो लट्प्रत्ययही विकल्पानें होऊ लागेल असें नाहीं. मध्यें अनुवृत्ति असली तरी तेथें ती पूर्वसंबंधासहित करतां येईल ती अशीः— नन्वोर्विभाषा याच्या पुढील 'पुरि लुङ् चास्मे' या सूत्रामध्यें अनुवृत्त आलेले विभाषा हें पद पुराशब्द उपपद असतांना लुङ् आणि लट् हे प्रत्यय विकल्पानें होतात, असें पुराशब्दाशीं आणि लुङ्लट् या प्रत्ययांशीं संबंध पावलें आहे. पुढें 'वर्तमाने लट्' येथें 'पुरि लुङ् चास्मे विभाषा' इतक्या पदांची अनुवृत्ति

---

१८. येथें तरप्, रूपप्, कल्पप्, हे तद्धितप्रत्यय पुढें असल्यामुळें शतृशानच् होऊ लागतील. पचति, पठति, येथें लटाला कृत्संज्ञा असल्यामुळें प्रातिपदिकसंज्ञा होऊन पुढें सुप्प्रत्यय होईल, आणि तो सुप् हाच प्रत्यय पुढें असल्यामुळें शतृशानच् होऊं लागतील.

लटः शतृशानचौ विभाषा । पुरि लुङ् चास्म इति निवृत्तम् ॥ न तर्हीदानीम-प्रथमासमानाधिकरण इति वक्तव्यम् । वक्तव्यं च । किं प्रयोजनम् । नित्यार्थम् । अप्रथमासमानाधिकरणे नित्यौ यथा स्यातामिति । क्व तर्हीदानीं विभाषा । प्रथमासमानाधिकरणे । पचन् पचति । पचमानः पचत इति ॥

[संबोधने च ॥ ३ । २ । १२५ ॥]

लक्षणहेत्वोः क्रियायाः ॥ ३ । २ । १२६ ॥

लक्षणहेत्वोः क्रियाया गुण उप-संख्यानम् ॥ १ ॥

लक्षणहेत्वोः क्रियाया गुण उपसंख्यानं कर्तव्यम् । तिष्ठन्मूत्रयति । गच्छन्भक्षयतीति ॥

कर्तुश्च लक्षणयोः पर्यायेणाचयोगे ॥२॥

कर्तुश्च लक्षणयोः पर्यायेणाचयोग उपसंख्यानं कर्तव्यम् । योऽधीयान आस्ते स देवदत्तः । य आसीनोऽधीते स देवदत्तः ॥ अचयोग इति किमर्थम् । य आस्ते चाधीते च स चैत्रः ॥

तत्त्वान्वाख्याने च ॥३॥

तत्त्वान्वाख्याने चोपसंख्यानं कर्त-

---

होऊन पूर्वीप्रमाणें निराळा वाक्यार्थ होतो. त्याच्यापुढें 'लटः शतृशानचौ०' या प्रकृत सूत्रामध्यें मात्र फक्त विभाषा हेंच अनुवृत्त येतें; पुरि लुङ् चास्मे हीं पदें अनुवृत्त येत नाहींत.[१९]

तर मग आतां प्रकृत सूत्रामध्यें अप्रथमा-समानाधिकरणे असें म्हणावयास नको.

तें तर म्हटलें पाहिजे.

तें कशाकरितां ?

प्रथमान्तभिन्नाशीं सामानाधिकरण्य असतांना शतृशानच्प्रत्यय नित्यच झाले पाहिजेत[२०].

शतृशानच्प्रत्यय विकल्पानें कोठें करावयाचे ?

प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असतांना विकल्पानें होतात; उदा० पचन्, पचति; पचमानः, पचते.

(सू.१२६, वा.१) जी क्रिया दुसऱ्या क्रियेच्या साधनाचें चिन्ह किंवा हेतु होत असेल तर त्या क्रियेचा वाचक जो धातु त्याच्या पुढील लट्प्रत्ययाचे स्थानीं शतृशानच्आदेश होतात असें म्हणावें; उदा० तिष्ठन् मूत्रयति, गच्छन् भक्षयति.

(वा.२) एखाद्या क्रियेच्या कर्त्याचें चिन्ह अशा ज्या दोन क्रिया, त्यांपैकीं पाळीपाळीनें कोणत्या तरी एका क्रियेच्या वाचक धातूच्या पुढील लटाचे स्थानीं शतृशानच् हे आदेश होतात; परंतु त्या वाक्यामध्यें चशब्दाचा योग नसला पाहिजे, असें म्हणावें; उदा०— योऽधीयान आस्ते स देवदत्तः, य आसीनोऽधीते स देवदत्तः.

येथें चशब्दाचा योग नसावा असें कशाकरितां म्हटलें आहे ?

य आस्ते च अधीते च स चैत्रः येथें शतृशानच्प्रत्यय न झाले पाहिजेत.

(वा.३) स्वाभाविक गोष्टीचें कथन कर्तव्य असेल तर तेथें लटाचे स्थानीं शतृशानच् हे

---

१९. तेव्हां येथें स्वतंत्र निराळा वाक्यार्थ न होतां एकच वाक्यार्थ होतो आणि त्यांतच विभाषापदाचा संबंध होऊन शतृशानच् विकल्पानें होऊं लागतील.

२०. अप्रथमासमानाधिकरणे याचा स्वतंत्र वाक्यार्थ करावयाचा आणि त्यामध्यें विभाषापदाचा संबंध करावयाचा नाहीं.

१. संबोधनविभक्त्यन्ताशीं सामानाधिकरण्य असतांना लटाचे स्थानीं शतृशानच्आदेश होतात; उदा० हे पचन्, हे पचमान.

१. कोणतीही जी क्रिया दुसऱ्या क्रियेचें चिन्ह किंवा हेतु होत असेल तर त्या क्रियेचा वाचक जो धातु त्याच्या पुढील लट्प्रत्ययाचे स्थानीं शतृशानच् आदेश होतात; उदा० शयाना भुञ्जते यवनाः, अर्जयन् वसति.

व्यम् । शयाना वर्धते दूर्वा । आसीनं वर्धते बिसमिति ॥

## सदादयश्च बहुलम् ॥४॥

सदादयश्च बहुलमिति वक्तव्यम् । सन्ब्राह्मणः अस्ति ब्राह्मणः । विद्यते ब्राह्मणः विद्यमानो ब्राह्मण इति ॥

## इङ्जुहोत्योर्वावचनम् ॥५॥

इङ्जुहोत्योर्वेति वक्तव्यम् । अधीते अधीयानः । जुहोति जुह्वत् ॥

## माङ्याक्रोशे ॥६॥

माङ्याक्रोश इति वक्तव्यम् । मा पचन् । मा पचमानः ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । लक्षणहेत्वोः क्रियाया इत्येव सिद्धम् ॥ इह तावत्तिष्ठन्मूत्रयतीति तिष्ठतिक्रिया मूत्रयतिक्रियाया लक्षणम् । गच्छन्भक्षयतीति गच्छतिक्रिया भक्षयतिक्रियाया लक्षणम् ॥ योऽधीयान आस्ते स देवदत्त इत्यध्ययनक्रियासनक्रियाया लक्षणम् । य आसीनोऽधीते स देवदत्त इत्यासिक्रियाध्ययनक्रियायां लक्षणम् । इदं तर्हि प्रयोजनमचयोग इति वक्ष्यामीति । इह मा भूत् । य आस्ते चाधीते च स चैत्र इति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । नैतत्क्रियाया लक्षणम् । किं तर्हि । कर्तृलक्षणमेतत् ॥ शयाना वर्धते

---

आदेश होतात असें म्हणावें; उदा० शयाना वर्धते दूर्वा, आसीनं वर्धते बिसम्.

(वा.४) अस्ति या अर्थाच्या धातूच्या पुढील लट्प्रत्ययाचे स्थानीं शतृशानच् आदेश बाहुल्येंकरून होतात असें म्हणावें; उदा० सन् ब्राह्मणः अस्ति ब्राह्मणः, विद्यमानो ब्राह्मणः विद्यते ब्राह्मणः.

(वा.५) इङ्धातु आणि हुधातु यांच्या पुढील लटाचे स्थानीं शतृशानच् हे आदेश विकल्पानें होतात असें म्हणावें; उदा० अधीते अधीयानः, जुहोति जुह्वत्.

(वा.६) माङ् उपपद असतांना आणि आक्रोश गम्यमान असतांना लटाचे स्थानीं शतृशानच् आदेश होतात असें म्हणावें; उदा० मा पचन्, मा पचमानः.

तर मग आतां वार्तिककारांनीं सांगितल्याप्रमाणें हीं वचनें केलीं पाहिजेत.

हीं वचनें करावयास नकोत. 'लक्षणहेत्वोः क्रियायाः' या सूत्रानेंच हीं उदाहरणें सिद्ध होत आहेत; तें असें:– तिष्ठन् मूत्रयति यः स देवदत्तः येथें उभें राहणें[२] ही क्रिया मूत्रक्रियेचें चिन्ह होत आहेचे. तसेंच गच्छन् भक्षयति यः स देवदत्तः येथें गमनक्रिया ही भक्षणक्रियेचें चिन्ह होत आहेच. तसेंच योऽधीयान आस्ते स देवदत्तः येथेंही अध्ययनक्रिया ही आसनक्रियेचें चिन्ह होत आहेच. तसेंच य आसीनोऽधीते स देवदत्तः येथें आसनक्रिया ही अध्ययन प्रक्रियेचें चिन्ह आहेच.

तर मग 'कर्तुश्च लक्षणयोः पर्यायेणाचयोगे' ह्या वार्तिकाचा उपयोग असा की त्यामध्यें 'अचयोगे' असा निषेध करावयाचा आहे. कारण य आस्ते च अधीते च स चैत्रः येथें शतृशानच्प्रत्यय न झाले पाहिजेत. तेव्हां त्या निषेधाकरितां तें वार्तिक पाहिजे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'य आस्ते च अधीते च स चैत्रः' येथें कोणतीही क्रिया कोणत्याही क्रियेचें चिन्हच होत नाहीं[३], तर तेथें त्या दोन्ही क्रिया मिळून कर्त्याचें चिन्ह होत आहे. तसेंच शयाना वर्धते दूर्वा येथें शयनक्रिया ही

२. 'देवदत्त कोणता?' या प्रश्नाचें तिष्ठन् मूत्रयति देवदत्तः' हें उत्तर आहे. येथें उभें राहणें ही क्रिया मूत्रक्रियेचें चिन्ह होत आहेच.

३. तेव्हां प्रकृत सूत्राची तेथें प्राप्ति नसल्यामुळें 'अचयोगे' हा निषेध मुळीं नको आहे असें होतें.

दूयेति लोतिक्रिया वृद्धिक्रियाया लक्षणम्। आसीनं वर्धते बिसमित्यासिक्रिया वृद्धिक्रियाया लक्षणमिति ॥ सदादयश्च बहुलम् इङ्जुहोत्योर्वा माङ्याक्रोश इति वक्तव्यमेव ॥

## तौ[1] सत् ॥ ३ । २ । १२७ ॥

तौग्रहणं किमर्थम् । शतृशानचौ प्रतिनिर्दिश्येते । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृतौ शतृशानचावनुवर्तिष्येते । क्व प्रकृतौ । लटः शतृशानचावप्रथमासमानाधिकरणे [३.२.१२४] इति ॥ अत उत्तरं पठति ।

**तौ सदिति वचनमसंसर्गार्थम् ॥१॥**

तौग्रहणं क्रियतेऽसंसर्गार्थम् । असंसक्तयोरेतैर्विशेषैः शतृशानचोः सत्संज्ञा यथा स्यात् ॥ ननु चैते विशेषा निवर्तेरन् । यद्यप्येते विशेषा निवर्तन्तेऽयं तु खलु वर्तमानः कालोऽवश्यमुत्तरार्थोऽनुवर्त्यः । तस्मिन्ननुवर्तमाने वर्तमानकालविहितयोरेव शतृशानचोः सत्संज्ञा स्याद्भूतभविष्यत्कालविहितयोर्न स्यात् । किं पुनर्भूतभविष्यत्कालविहितयोः सत्संज्ञावचने प्रयोजनम् । पूरणगुणसुहितार्थसत् [२.२.११] इति । ब्राह्मणस्य पक्ष्यन् । ब्राह्मणस्य पक्ष्यमाणः ॥ अथ क्रियमाणे-

---

वृद्धिक्रियेचें चिन्ह होत आहेच. तसें आसीनं वर्धते बिसम् येथें आसनक्रिया ही वृद्धिक्रियेचें चिन्ह होत आहेच. आतां 'सदादयश्च बहुलम्', 'इङ्जुहोत्योर्वा' आणि 'माङ्याक्रोशे' हीं तीन वार्तिकें मात्र केलींच पाहिजेत.

(सू.१२७) येथें तौ असें कशाकरितां म्हटलें आहे ?

शतृ आणि शानच् यांचा परामर्श होण्याकरितां म्हटलें आहे.

हा त्याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण मागून शतृशानचौ याची अनुवृत्ति करतां येईल.

मागें कोठें बरें शतृशानचौ असें म्हटलें आहे ?

'लटः शतृशानचावप्रथमासमानाधिकरणे' (३।२।१२४) या सूत्रामध्यें म्हटलें आहे. हें मनांत घेऊन वार्तिककार म्हणतातः—

(वा.१) 'तौ सत्' या सूत्रामध्यें तौ असें जें म्हटलें आहे त्याचा उपयोग असा की पूर्वसूत्रांतील शतृशानच्प्रत्ययांचीं जीं निमित्तें त्यांचा या संज्ञेशीं संबंध न व्हावा. कारण तीं निमित्तें नसतांनाही झालेले जे शतृशानच्प्रत्यय त्यांनाही सत् ही संज्ञा झाली पाहिजे.

पण पूर्वसूत्रांत धरलेलीं जीं शतृशानच्प्रत्ययांचीं निमित्तें त्यांची येथें अनुवृत्ति केली नाहीं म्हणजे काम भागेल.

जरी त्या कांहीं विशेष निमित्तांची अनुवृत्ति केली नाहीं तरी वर्तमानकालाचा पुढें संबंध होण्याकरितां येथें त्याची अनुवृत्ति केलीच पाहिजे. आणि त्याची अनुवृत्ति आली म्हणजे वर्तमानकालीं सांगितलेल्या अशाच शतृशानच्प्रत्ययांना सत्संज्ञा होईल. भूतकालीं किंवा भविष्यकालीं सांगितलेल्या शतृशानच्प्रत्ययांना सत्संज्ञा होणार नाहीं.

पण भूतकालीं आणि भविष्यकालीं सांगितलेल्या शतृशानच्प्रत्ययांना सत्संज्ञा झाल्याचा उपयोग तरी कोठें बरें होतो ?

'पूरणगुणसुहितार्थसत्०' (२।२।११) येथें होतो. त्यामुळें ब्राह्मणस्य पक्ष्यन्[2], ब्राह्मणस्य पक्ष्यमाणः, येथें षष्ठीतत्पुरुषाचा निषेध होतो.

पण येथें तौ असा शब्द घातला तरी त्या-

---

१. शतृ आणि शानच् या दोन्ही प्रत्ययांना 'सत्' अशी संज्ञा होते.

२. येथें भविष्यकाळीं केलेल्या लट्प्रत्ययाचे (३।३।१३) स्थानीं शतृशानच् (३।३।१४) झाले आहेत.

ऽपि तौग्रहणे कथमेवासंसक्तयोरेतैर्विशेषैः सत्संज्ञा लभ्या । लभ्येत्याह । कथम् । ताविति शब्दतः । सदिति योगे क्रियमाणे तौग्रहणं योगाङ्गं जायते सति च योगाङ्गे योगविभागः करिष्यते । तौ । तावेतौ शतृशानचौ धातुमात्रात्परस्य प्रत्ययस्य भवतः । ततः सत् । सत्संज्ञौ भवतः शतृशानचौ ॥ इहापि तर्हि प्राप्नुतः । कारकः हारकः इति ।

अवधारणं लृटि विधानम् ।

लृटः सद्वा [३.३.१४] इत्येतन्नियमार्थं भविष्यति । लृट एव धातुमात्रात्परस्य नान्यस्येति ॥ कैमर्थक्यान्नियमो भवति । विधेयं नास्तीति कृत्वा । इह चास्ति विधेयम् । किम् । नित्यौ शतृशानचौ प्राप्तौ तौ विभाषा विधेयौ । तत्रापूर्वो विधिरस्तु नियमोऽस्त्वित्यपूर्व एव विधिर्भविष्यति न नियमः ॥

योगविभागतश्च विहितं सत् ।

एवं तर्हि योगविभागः करिष्यते । लृटः सत् । लृटः सत्संज्ञौ भवतः । किमर्थमिदम् । नियमार्थम् । लृट एव

पासून 'पूर्वसूत्रांतील वर्तमानकाल वगैरे विशेष निमित्तें नसतांना झालेल्या शतृशानच्प्रत्ययांना सत्संज्ञा होते' हा अर्थ कसा लब्ध होतो?

लब्ध होतो असें म्हणतो.

तो कसा?

असा की तौ या शब्दापासूनच तो अर्थ लब्ध होतो. 'तौ सत्' असें सूत्र केलें असतां तौ हा सूत्रापैकींच एक भाग आहे असें समजतें. आणि सूत्रापैकीं भाग असेल तर तेथें योगविभाग करतां येतो. तौ हें प्रथमसूत्र होय. धातूच्या पुढील प्रत्ययाला शतृशानच् हे आदेश होतात असा त्याचा अर्थ होय. त्याच्यापुढें सत् हें दुसरें सूत्र होय. शतृशानच्प्रत्ययांना सत् अशी संज्ञा होते असा त्याचा अर्थ होय.

पण असें केलें तर तौ या सूत्रानें कारकः, हारकः, येथें कृ, हृ, या धातूंच्या पुढील ण्वुल्प्रत्ययाला शतृशानच् हे आदेश होऊं लागतील.

लृटः सद्वा (३।३।१४) यानें जें लृटाचे स्थानीं शतृशानच्प्रत्ययांचें विधान केलें तें नियमार्थ[३] होईल. तो नियम असा की धातूच्या पुढील वाटेल त्या प्रत्ययाला जर शतृशानच् आदेश होतील तर फक्त लृट्प्रत्ययालाच होतील, इतर प्रत्ययांना होत नाहींत.

पण ज्या सूत्रानें कांहींच विधान करतां येत नाहीं तें सूत्र व्यर्थ होतें, म्हणून नियमार्थ समजलें जातें. आणि येथें तर नवीन विधान करतां येतें.

तें काय?

असें की तौ या सूत्रानें जे शतृशानच् प्राप्त झाले ते नित्य प्राप्त झाले म्हणून त्यांचा विकल्प[४] येथें नवीन सांगतां येतो. आणि नवीन कांहीं सांगून विधिवाक्य समजावें किंवा नियामकवाक्य समजावें असा जेथें विचार उत्पन्न होतो तेथें विधिच योग्य होय, नियम योग्य नाहीं.

तर मग आणखी एक योगविभाग करून शतृशानच्प्रत्ययांचें विधान करावें. योगविभाग असा करावा की लृटः सत् एवढेंच सूत्र करावें.

तें कशाकरितां?

नियम करण्याकरितां. तो नियम असा की धातूच्या पुढील वाटेल त्या प्रत्ययाला जर सत्

३ नियमवाक्य हें निषेधवाक्य नसून त्याचें तात्पर्य निषेध करण्याविषयीं मानावें लागतें आणि त्यामुळें प्राप्त झालेल्या कार्यांचा बाध करावा लागतो. हे दोषविधि वाक्यामध्यें येत नाहींत.

४. या सूत्रांत वाशब्द नसल्यामुळें विकल्पाचें विधान येथें मानतां येत नाहीं. तौ० आणि लृटःसत्० या दोन्ही सूत्रांमध्यें अप्रथमासमानाधिकरणे याची अनुवृत्ति असल्यामुळें प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असतांना विधानार्थ हें सूत्र होईल असें म्हणतां येत नाहीं.

धातुमात्रात्परस्य नान्यस्येति । ततो वा । वा च लृटः शतृशानचौ सत्संज्ञौ भवतः । तत्रायमप्यर्थः सद्विधिर्नित्यमप्रथमासमानाधिकरण इति वक्ष्यति तन्न वक्तव्यं भवति ॥

अथ यावेतावुत्तरौ शत्रानौ किमेतौ लादेशावाहोस्विदलादेशौ । कश्चात्र विशेषः ।

## उत्तरयोर्लादेशे वावचनम् ॥ २ ॥

उत्तरयोर्लादेशे वेति वक्तव्यम् । पवमानः यजमानः । पवते यजत इत्यपि यथा स्यात् ॥

## साधनाभिधानम् ॥ ३ ॥

साधनाभिधानं च प्राप्नोति । लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः [३.४.६९] भावकर्मणोरपि प्राप्नुतः ॥

## स्वरः ॥ ४ ॥

स्वरश्च साध्यः । कतीह पवमानाः अदुपदेशाल्लसार्वधातुकमनुदात्तं भवतीत्येष स्वरः प्राप्नोति ॥

## उपग्रहप्रतिषेधश्च ॥ ५ ॥

उपग्रहस्य च प्रतिषेधो वक्तव्यः कतीह निघ्नानाः । तङानावात्मनेपदम् [१. ४. १००] इत्यात्मनेपदसंज्ञा प्राप्नोति ॥

सन्तां तर्ह्यलादेशौ ।

## अलादेशे षष्ठीप्रतिषेधः ॥ ६ ॥

म्हणजे शतृशानच् आदेश होतील तर फक्त लट्प्रत्ययालाच होतील. त्यानंतर पुढें 'वा' एवढें दुसरें सूत्र होय. सत् म्हणजे शतृशानच् आदेश हे विकल्पानें होतात असा त्याचा अर्थ होय. शिवाय असें करण्यांत आणखी एक गोष्ट सहजसिद्ध होते ती ही की सद्विधिर्नित्यमप्रथमासमानाधिकरणे (३।३।१४,वा.१) असें जें पुढें वार्तिककार सांगणार आहेत तें सांगावयास नको.

आतां पुढील सूत्रांनीं सांगितलेले जे शतृ आणि आन हे प्रत्यय ते लटाचे स्थानीं होतात किंवा स्वतंत्र होतात ?

ह्या दोहोंमध्यें फरक काय ?

(वा.२) पुढील सूत्रांनीं सांगितलेले शतृ आणि आन हे लटाचे स्थानीं होतील तर एकदा तिङ्प्रत्यय करण्याकरितां तेथें वा असें म्हटलें पाहिजे; उदा० पचमानः यजमानः, पचते यजते, अशीं रूपें झालीं पाहिजेत.

(वा.३) शिवाय शतृ आणि आन हे कर्ता या अर्थीच होतात असा कर्त्याचा निर्देश तेथें केला पाहिजे; नाहीं तर लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः (३।४।६९) या सूत्रानें कर्म किंवा भाव या अर्थी केलेल्या लटाचे स्थानीं ही ते आदेश होऊं लागतील.

(वा.४) तसाच इष्ट स्वरही सांगावा लागेल. नाहीं तर 'कतीह पचमानाः' येथें उपदेशीं ऱ्हस्व अकारान्ताच्या पुढील लसार्वधातुकाला सांगितलेला अनुदात्त स्वर (६।१।१८६) होऊं लागेल.

(वा.५) तसेंच त्या शतृ आणि आन या प्रत्ययांना परस्मैपद, आत्मनेपद, या संज्ञा होत नाहींत असा निषेध सांगितला पाहिजे. नाहीं तर 'कतीह निघ्नानाः' येथें चानच्(३।२।१२९) प्रत्ययाला 'तङानावात्मनेपदम्' (१।४।१००) यानें आत्मनेपदसंज्ञा होऊं लागेल.

तर मग पुढील सूत्रांनीं सांगितलेले शतृ आणि आन हे लटाचे स्थानीं न सांगता स्वतंत्रच सांगावेत.

५ सूत्रामध्यें अप्रथमासमानाधिकरणे याची अनुवृत्ति नाहीं, तेव्हां प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असतांना या सूत्रानें शतृशानच् विकल्पानें होतात.

६. पूङ्यजोःशानन् वगैरे पुढील सूत्रांमध्यें लटः याची अनुवृत्ति केली तर लटाचे स्थानीं होतील नाहीं तर स्वतंत्रच होतील.

७. आत्मनेपदसंज्ञा झाली तर निघ्नानाः येथें हन्धातु परस्मैपदी असल्यामुळें चानश् होणार नाहीं

अलादेशे षष्ठीप्रतिषेधो वक्तव्यः। सोमं पवमानः। नडमाघ्नानः। अधीयन्पारायणम्। लप्रयोगे नेति प्रतिषेधो न प्राप्नोति॥ मा भूदेवं तृनित्येवं भविष्यति। कथम्। तृनिति नेदं प्रत्ययग्रहणम्। किं तर्हि। प्रत्याहारग्रहणम्। क संनिविष्टांना प्रत्याहारः। लटः शत्रित्यत आरभ्यातृनो नकारात्॥ यदि प्रत्याहारग्रहणं चौरस्य द्विषन् वृषलस्य द्विषन् अत्रापि प्राप्नोति।

द्विषः शतुर्वावचनम्॥ ७॥

द्विषः शतुर्वेति वक्तव्यम्। तच्चावश्यं वक्तव्यं प्रत्ययग्रहणे सति प्रतिषेधार्थम्। तदेव प्रत्याहारग्रहणे सति विध्यर्थं भविष्यति॥

**[पूङ्यजोः शानन्॥३।२।१२८॥**

**ताच्छील्यवयोवचनशक्तिषु चानश्॥ ३। २। १२९॥**

**इङ्धार्योः शत्रकृच्छ्रिणि॥ ३। २। १३०॥**

**द्विषोऽमित्रे॥ ३। २। १३१॥**

**सुञो यज्ञसंयोगे॥३।२।१३२॥**

---

(वा.६) लटाचे स्थानीं न सांगितले तर सोमं पवमानः, नडमाघ्नानः, पारायणमधीयन्, ह्या उदाहरणांमध्यें कर्माहून प्राप्त झालेल्या षष्ठीचा (२।३।६५) निषेध सांगावा लागेल. कारण लटाचे स्थानीं हे आदेश न झाल्यामुळें लकाराच्या प्रयोगामध्यें सांगितलेला षष्ठीचा निषेध (२।३।६९) प्राप्त होत नाहीं.

त्या कारणामुळें निषेध प्राप्त झाला नाहीं तर न होऊं दे; तृनामुळें त्याच सूत्रानें निषेध होईल.

तो कसा?

असा की त्या सूत्रामध्यें तृन् असें जें उच्चारलें आहे तें तृन् या प्रत्ययाचें ग्रहण आहे असें समजूं नये, तर तेथें तृन् हें प्रत्याहाराचें ग्रहण आहे.

पण तृन् हा प्रत्याहार कोठें उच्चारलेल्या प्रत्ययांचा आहे?

'लटः शतृ०' (३।२।१२४) या सूत्रांतील तृशब्दापासून तृन्(३।२।१३५)प्रत्ययाच्या नकारापर्यंत.

पण जर तृन् हा प्रत्याहार घेतला तर चोरस्य द्विषन्, वृषलस्य द्विषन्, येथेंही षष्ठीचा निषेध होऊं लागेल.

(वा.७) शतृप्रत्ययान्त द्विष्धातूचा योग असतांना कर्माहून षष्ठी विकल्पानें होते (२।३।६९,वा.६) असें म्हणावें. आणि तें दोन्ही वेळेला अवश्य म्हटलेंच पाहिजे. तृन् हा प्रत्यय घेतला तर एकदा षष्ठी न होण्याकरितां पाहिजे आणि आतां तृन् हा प्रत्याहार घेतला तर एकदा षष्ठी होण्याकरितां तेंच उपयोगीं

---

८. कारण द्विषोऽमित्रे (३।२।१३१) ह्यानें सांगितलेला शतृप्रत्यय तृन् या प्रत्याहारामध्यें सांपडत आहे.

१.(१२८) पूङ् आणि यज् ह्या धातूंहून कर्ता या अर्थी शानन्प्रत्यय होतो; उदा० पवमानः, यजमानः.

(१२९) धातूहून कर्ता या अर्थी चानश्प्रत्यय होतो, ताच्छील्य, वय किंवा शक्ति हे अर्थ गम्यमान असतांना. ताच्छील्य म्हणजे धातूचा अर्थ जो व्यापार तो करण्याचा कर्त्याचा स्वभाव; उदा०- मण्डयमानः. शिखण्डं वहमानः, शत्रुं निघ्नानः.

(१३०) इङ् आणि धारि या धातूंहून कर्ता या अर्थी शतृप्रत्यय होतो, परंतु धातूचा अर्थ जो व्यापार तो करतांना कर्त्याला कष्ट होत नाहींत असा अर्थ विवक्षित असला पाहिजे; उदा० पारायणमधीयन्, उपनिषदं धारयन्.

(१३१) द्विष्धातूहून कर्ता या अर्थी शतृप्रत्यय होतो, शत्रु हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० द्विषन् शत्रुः.

(१३२) सुञ्धातूहून कर्ता या अर्थी शतृप्रत्यय होतो, धातूच्या अर्थाचा मात्र यज्ञ करणाऱ्या मुख्य कर्त्यांशीं

**अर्हः प्रशंसायाम् ॥३।२।१३३॥**
**आक्केस्तच्छीलतद्धर्मतत्साधुकारिषु ॥ ३ । २ । १३४ ॥]**
**तृन् ॥ ३ । २ । १३५ ॥**

**तृन्विधावृत्विक्षु चानुपसर्गस्य ॥ १ ॥**

तृन्विधावृत्विक्षु चानुपसर्गस्येति वक्तव्यम् । होता पोता । अनुपसर्गस्येति किमर्थम् । प्रशास्ता प्रतिहर्ता ॥

**नयतेः षुक् च ॥ २ ॥**

नयतेः षुग्वक्तव्यः । तृंश्च प्रत्ययो वक्तव्यः । नेष्टा ॥

**न वा धात्वन्यत्वात् ॥ ३ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । धात्वन्यत्वात् । धात्वन्तरं नेषतिः ॥ कथं ज्ञायते ।

**नेषतु नेष्टादिति दर्शनात् ॥ ४ ॥**

नेषतु नेष्टादिति प्रयोगो दृश्यते । इन्द्रो नस्तेन नेषतु । गा वो नेष्टात् ॥

**त्विषेर्देवतायामकारश्चोपधाया अनिट्त्वं च ॥ ५ ॥**

त्विषेर्देवतायां तृन्वक्तव्योऽकारश्चोपधाया अनिट्त्वं चेति । त्वष्टा । किं

---

पडेल.

(सू.१३५, वा.१) ह्या तृन्प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें ऋत्विज् अर्थ गम्यमान असतांना तच्छील वगैरे अर्थ नसले तरी धातूहून तृन् प्रत्यय होतो असें म्हणावें; परंतु धातूच्या मागें उपसर्ग मात्र नसला पाहिजे; उदा० होता, पोता.

उपसर्ग नसावा असें कशाकरितां म्हटलें आहे ?

प्रशास्ता, प्रतिहर्ता, येथें तृन्प्रत्यय न झाला पाहिजे.[२]

(वा.२) नीधातूहून तृन्प्रत्यय होतो आणि नीधातूला षुगागम होतो, असें म्हणावें; उदा० नेष्टा.

(वा.३) अथवा नयतेः षुक्च हें करावयास नको.

काय कारण ?

कारण असें की नेष्टृशब्दामध्यें निराळाच धातु आहे. नेष् असा निराळाच धातु तेथें आहे.

हें कशावरून समजावें ?

(वा.४) नेषतु, नेष्टात्, असे प्रयोग दृष्टीस पडतात त्यावरून समजावें; उदा० इन्द्रो वस्तेन नेषतु, गा वो नेष्टात्.

(वा.५) त्विष्धातूहून देवता अर्थ असतांना तृन्प्रत्यय होतो असें म्हणावें आणि त्विष्धातूच्या उपधेला अकार होतो व प्रत्ययाला इडागम होत नाहीं असें म्हणावें; उदा० त्वष्टा.

पण हा येथें इडागमाचा निषेध त्विष्धातूपुरताच कसा केला आहे ?

त्विष्धातूपुरताच केला आहे असें नाहीं,[३]

---

संबंध असला पाहिजे; उदा० सुन्वन्तो यजमानाः.

(१३३) अर्ह्धातूहून कर्ता या अर्थी तृन्प्रत्यय होतो, प्रशंअर्थ गम्यमान असतांना; अदा० अर्हन् पूजाम्.

(१३४) हें अधिकारसूत्र आहे. ह्याच्या पुढील जे प्रत्यय क्विप्प्रत्ययापर्यंत (३।२।१७७) ते कर्ता या अर्थी होत आहेतच, पण तच्छील, तद्धर्म आणि तत्साधुकारी यांपैकी कोणताही अर्थ अधिक गम्यमान असतांना. धातूचा अर्थ जो व्यापार तो करण्याचा कर्त्याचा स्वभाव असणें, किंवा कर्त्याचा तो धर्म असणें, किंवा कर्त्याला तो व्यापार चांगला करतां येणें, हे क्रमानें तच्छील वगैरे शब्दांचे अर्थ होत.

१. धातूहून कर्ता या अर्थी तृन्प्रत्यय होतो, तच्छील वगैरेंपैकीं अर्थ गम्यमान असतांना; उदा० कर्ता कटान्.

२ प्रशास्ता, प्रतिहर्ता, हे शब्द तृच्प्रत्यय होऊन अन्तोदात्त (६।१।१६३) होतात, व तेच कृत्स्वरानें (६।२।१३९) कायम तृन्प्रत्यय झाला असता तर 'तादौ च०' (६।२।५०) यानें पूर्वपदाला प्रकृतिस्वर झाला असता.

३. कारण त्विष्धातु हा मूळचाच अनिट् आहे.

पुनरिदं त्विषेरेवानिट्त्वम् । नेत्याह । यथानुक्रान्तं यच्चानुक्रंस्यते सर्वस्यैष शेषोऽनिट्त्वं चेति ॥

**क्षदेश्च युक्ते ॥ ६ ॥**

क्षदेश्च युक्ते तृन्वक्तव्यः । क्षत्ता ॥

**छन्दसि तृच्च ॥ ७ ॥**

छन्दसि तृच्च तृंश्च वक्तव्यः । क्षत्तृभ्यः संग्रहीतृभ्यः । क्षत्तृभ्यः संग्रहीतृभ्यः ॥

**[अलंकृञ्निराकृञ्प्रजनोत्पचोत्पतोन्मदरुच्यपत्रपवृतुवृधुसहचर इष्णुच् ॥ ३ । २ । १३६ ॥**

**णेश्छन्दसि ॥ ३ । २ । १३७ ॥**

**भुवश्च ॥ ३ । २ । १३८ ॥]**

**ग्लाजिस्थश्च क्स्नुः ॥३।२।१३९॥**

**स्नोः कित्त्वे स्थ ईकारप्रतिषेधः ॥ १ ॥**

स्नोः कित्त्वे स्थ ईकारस्य प्रतिषेधो वक्तव्यः । स्थास्नुरिति । घुमास्थागापाजहातिसां हलि [६. ४. ६६] इतीत्वं प्राप्नोति ॥ एवं तर्हि न कित्करिष्यते ।

**अकिति गुणप्रतिषेधः ॥ २ ॥**

यद्यकिद्गुणप्रतिषेधो वक्तव्यः । जिष्णुरिति ॥

**भुव इट्प्रतिषेधश्च ॥ ३ ॥**

भुव इट्प्रतिषेधश्च वक्तव्यः । किं चान्यत् । गुणप्रतिषेधश्च । भूष्णुरिति ॥ अस्तु तर्हि कित् । ननु चोक्तं स्नोः कित्त्वे

---

तर येथें वार्तिककारांनीं तृन्प्रत्यय ज्या धातूहून पूर्वी सांगितला व पुढें सांगणार आहेत त्या सर्वच ठिकाणीं तृन्प्रत्ययाला इडागम होत नाहीं असा शेष जोडावा.

(वा.६) क्षद्धातूहून तृन्प्रत्यय होतो, युक्त अर्थ गम्यमान असतांना, असें म्हणावें; उदा० क्षत्ता.[5]

(वा.७) वेदामध्यें क्षद्धातूहून तृच्ही होतो आणि तृन्ही होतो असें म्हणावें; उदा० क्षत्तृभ्यः संग्रहीतृभ्यः, क्षत्तृभ्यः संग्रहीतृभ्यः.[6]

(सू.१३९, वा.१) ह्या स्नुप्रत्ययाला क्स्नु असा आरंभीं इत्संज्ञक ककार जोडला असेल तर स्थाधातूला ईत्व होत नाहीं असा निषेध सांगावा लागेल. कारण स्थास्नुः येथें 'घुमास्था०' (६।४।६६) या सूत्रानें ईत्व प्राप्त होत आहे.

तर मग ककार न जोडतां स्नु असा अकित्च करावा.

(वा.२) जर कित् केला नाहीं तर जिष्णुः येथें गुणाचा (७।३।८४) निषेध सांगितला पाहिजे.

(वा.३) तसेंच भूधातूच्या पुढील स्नुप्रत्ययाला इडागमाचाही निषेध सांगितला पाहिजे; गुणाचाही निषेध भूधातूला सांगितला पाहिजे; उदा० भूष्णुः.

तर मग क्स्नु असा इत्संज्ञक ककार जोड-

---

तेव्हां त्याच्यापुरता निषेध नकोच आहे.

४. म्हणूनच पोता, नेष्टा, क्षत्ता, येथें इडागम होत नाहीं.

५. क्षद् हा धातु ह्या वार्तिकाच्या जोरावर मानावयाचा आहे. प्रेरणा करणें हा त्याचा अर्थ आहे. सारथि हा जेव्हां घोडा वगैरेंना प्रेरणा करण्याच्या कामीं युक्त होतो तेव्हां त्याला क्षत्ता असें म्हणतात.

६. क्षत्तृ हा शब्द तृच् केला म्हणजे अन्तोदात्त (६।१।१६३) होतो आणि तृन् केला म्हणजे आद्युदात्त (६।१।१९७) होतो.

१.(१३६) अलं-कृञ्, निर्‌आ-कृञ्, प्र-जन्, उद्-पच्, उद्-पत्, उद्-मद्, रुच्, अप-त्रप्, वृत्, वृध्, सह् आणि चर् या धातूंहून तच्छील वगैरे कर्ता असतांना त्या अर्थी तृन्प्रत्यय होतो; उदा० अलंकरिष्णुः वगैरे.

(१३७) वेदामध्यें णिप्रत्ययान्त धातूहून तच्छील वगैरे कर्ता असतांना त्या अर्थी तृन्प्रत्यय होतो; उदा० धारयिष्णवः.

(१३८) वेदामध्यें भूधातूहून तच्छील वगैरे कर्ता असतांना त्या अर्थी तृन्प्रत्यय होतो; उदा० भविष्णुः.

१. ग्ला, जि, स्था आणि भू या धातूंहून तच्छील वगैरे कर्ता या अर्थी ग्स्नुप्रत्यय होतो; उदा० ग्लास्नुः जिष्णुः, स्थास्नुः, भूष्णुः.

२. कित् केला म्हणजे गुणाचा निषेध (१।१।५) आणि इडागमाचा निषेध (७।२।११) सिद्ध होतो.

कारप्रतिषेध इति । नैष दोषः ।

दंशिभ्यां स्नुश्छन्दसि ॥ ४ ॥

ादंशिभ्यां स्नुश्छन्दसि वक्तव्यः ।

। जङ्गमम् । दङ्क्ष्णवः पशव इति ॥

दानीं स्थोऽविशेषेण विधास्यते ।

ति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥

थान्यासमेवास्तु । ननु चोक्तं स्नोः

स्थ ईकारप्रतिषेध इति । एवं तर्हि

रिष्यते ।

त्त्वान्न स्थ ईकारः

ोर्गित्त्वात्स्थ ईकारो न भविष्यति ।

ारणम् ।

किङ्ङितोरीत्त्वशासनात् ।

किङ्ङितोरीत्त्वं शिष्यते ॥ इह तर्हि जिष्णुरिति गुणः प्राप्नोति ।

गुणाभावस्त्रिषु स्मार्यः

गुणाभावस्त्रिषु स्मर्तव्यः । गिति किति ङितीति । तद्गकारग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । क्रियते न्यास एव । ककारे गकारश्चर्त्वभूतो निर्दिश्यते । क्क्ङिति चेति ॥ इह तर्हि भूष्णुरिति श्र्युकः किति [७.२.११] इतीट्प्रतिषेधो न प्राप्नोति ।

श्र्युकोऽनिट्त्वं गकोरितोः ॥

श्र्युकोऽनिट्त्वं गकारककारयोरिति वक्तव्यम् । तद्गकारग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । क्रियते न्यास एव । ककारे

---

। असूं दे.

। कित् मानला तर स्थाधातूला ईत्वाचा सांगावा लागेल असें म्हटलें आहे ना ?

दोष येत नाहीं. कारण

ा.४) स्था आणि दंश् या धातूंहून वेदा- स्नुप्रत्यय सांगितलाच पाहिजे; उदा० । जङ्गमम्, दङ्क्ष्णवः पशवः. तो स्नु- स्थाधातूहून वेदापुरताच न सांगतां सांगितला म्हणजे झालें.

ाशा रीतीनें सिद्ध होतें खरें, पण सूत्रा- फिरवाफिरव होते ना ?

र मग मूळचेंच सूत्र आहे तसेंच असूं दे.

ग मूळचेंच सूत्र ठेवलें तर क्स्नु असा ात्यय होत असल्यामुळें स्थाधातूला वा निषेध सांगावा लागेल असें म्हटलें ना ?

र मग इत्संज्ञक ककार न जोडतां इत्सं- गकार जोडतां येईल.

स्नु असा गित्प्रत्यय आहे म्हणून स्था- ा ईत्व होणार नाहीं.

ाय कारण ?

ारण असें की कित् किंवा ङित्प्रत्यय पुढें असतांना ईत्व सांगितलें आहे.

पण इत्संज्ञक ककार जोडला नाहीं तर जिष्णुः येथें गुण होऊं लागेल ना ?

गित्, कित् आणि ङित् असे तीनही प्रकारचे प्रत्यय पुढें असतांना गुणाचा निषेध सांगावा.

तर मग क्ङिति च (१।१।५) या सूत्रामध्यें गकार उच्चारला पाहिजे.

निराळा उच्चारावयास नको. कारण मूळ सूत्रामध्यें उच्चारलाच आहे. ककाराच्या मागें गकाराला चर्त्व (८।४।५५) करून क्क्ङिति असा दोन ककारांचा निर्देश केला आहे.

तर मग भूष्णुः येथें श्र्युकः किति (७।२। ११) यानें इडागमाचा निषेध होणार नाहीं त्याची काय वाट ?

श्रि आणि उगन्त या धातूंच्या पुढील गित् आणि कित् अशा दोन्ही प्रकारच्या प्रत्ययांना इडागमाचा निषेध सांगावा.

तर मग श्र्युकः किति (७।२।११) या सूत्रामध्यें गकार उच्चारला पाहिजे.

निराळा उच्चारावयास नको. कारण मूळ सूत्रामध्यें उच्चारलाच आहे. ककाराच्या

---

. या वेळीं सूत्रामध्यें स्थाधातु मुळींच उच्चारूं नये.

गकारश्चर्त्वभूतो निर्दिश्यते । ग्रयुकः क्किनीति । यद्येवं चर्त्वस्यासिद्धत्वाद्धशीत्युत्वं प्राप्नोति । सौत्रो निर्देशः । अथवासंहितया निर्देशः करिष्यते । ग्रयुकः क्किनीति ॥

स्त्रोर्गित्त्वान्न स्थ ईकारः क्किङितोरीत्वशासनात् ।

गुणाभावस्त्रिषु स्मार्यः श्र्युकोऽनिट्त्वं गकोरितोः ॥

## [त्रसिगृधिधृषिक्षिपेः क्नुः ॥ ३ । २ । १४० ॥][1]

## शमित्यष्टाभ्यो घिनुण् ॥ ३ । २ । १४१ ॥

घिनणयं वक्तव्यः । घिनुणि हि सति शमिनौ शमिनः तमिनौ तमिनः उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः [७. १. ७०] इति नुम्प्रसज्येत । नैष दोषः । झल्ग्रहणं तत्र चोदयिष्यति ॥ इह तर्हि शमिनितरा शमिनीतरा तमिनितरा तमिनीतरा उगितो घादिषु नद्या अन्यतरस्यां ह्रस्वो भवतीत्यन्यतरस्यां ह्रस्वत्वं प्रसज्येत । इष्यत एव ह्रस्वत्वम् ॥

### घिनुणकर्मकाणाम् ॥ १ ॥

घिनुणकर्मकाणामिति वक्तव्यम् । इह मा भूत् । संपृणक्ति शाकमिति ॥

### उक्तं वा ॥ २ ॥

किमुक्तम् । अनभिधानादिति ॥

## [संपृचानुरुधाङ्यमाङ्यसपरिसृसंसृजपरिदेविसंज्वरपरिक्षिप-[1]

---

मागें गकाराला चर्त्व करून ग्र्युकः क्किति असा दोन ककारांचा निर्देश केला आहे.

पण चर्त्वानें ककार करून उच्चारला असेल तर तें चर्त्व असिद्ध असल्यामुळें तो गकार आहे असें समजून हशि च (६।१।११४) यानें मागें उत्व होऊं लागेल.

सौत्रनिर्देश आहे म्हणून येथें उत्व झालें नाहीं; अथवा वाक्यामध्यें संहितेची अविवक्षा करून संधि न करतां निर्देश केला आहे असें समजावें. तो असाः– ग्र्युकः क्किति.

(सू.१४१) ह्या प्रत्ययांतील उकाराच्या ऐवजीं अकार घालून घिनण् असा करावा.

घिनुण् असा असला तर शमिनौ शमिनः, तमिनौ तमिनः, येथें उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः (७।१।७०) यानें नुमागम होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण त्या सूत्रामध्यें झल्ग्रहण करावें असें पुढें (७।१।१, वा.११) सांगणार आहेत.

तर मग शमिनितरा शमिनीतरा, तमिनितरा तमिनीतरा, येथें 'उक् इत्संज्ञक असलेल्या शब्दाच्या पुढील ङीप्रत्ययाला घ वगैरे पुढें असतांना विकल्पानें ऱ्हस्व होतो' (६।३।४५) असा सांगितलेला ऱ्हस्व विकल्पानें होऊं लागेल. म्हणून घिनण् असा सांगितला पाहिजे.

पण येथें विकल्पानें ऱ्हस्व इष्टच आहे.

(वा.१) घिनुण्प्रत्यय अकर्मक धातूहून होतो असें म्हणावें. कारण 'संपृणग्धि शाकम्' येथें पुढील सूत्रानें घिनुण्प्रत्यय न झाला पाहिजे.

(वा.२) अथवा ह्याविषयीं मागें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

अनभिधानात् (३।२।१,वा.५) म्ह. सकर्म-

---

४. तेव्हां ग्र्युकः असा जो रेफाला विसर्ग झाला आहे तो न होतां उत्व होऊन 'ग्र्युको क्किति' असा संधि होऊं लागेल.

१. त्रस्, गृध्, धृष् आणि क्षिप् या धातूंहून तच्छील वगैरे कर्ता असतांना त्या अर्थी क्नुप्रत्यय होतो; उदा० त्रस्नुः, गृध्नुः, धृष्णुः, क्षिप्नुः.

१. शम्, तम्, दम्, श्रम् भ्रम्, क्षम्, क्लम् आणि मद् ह्या आठ धातूंहून कर्ता या अर्थी घिनुण्प्रत्यय होतो, ताच्छील्य वगैरे अर्थ गम्यमान असतांना; उदा० शमी, तमी.

१.(१४२) सम्-पृच्, अनु-रुध्, आङ्-यम्, आङ्-यस्, परि-सृ, सम्-सृज्, परि-देवि, सम्-ज्वर्, परि-

परिरटपरिवदपरिदहपरिमुहदुषद्विषद्रुहदुहयुजाक्रीडविविचत्यजरजभजातिचरापचरामुषाभ्याहनश्च ॥३।२।१४२॥

वौ कषलसकत्थस्रम्भः ॥ ३।२।१४३॥

अपे च लषः ॥३।२।१४४॥

प्रे लपसृद्रुमथवदवसः ॥३।२।१४५॥]

निन्दहिंसक्लिशखादविनाशपरिक्षिपपरिरटपरिवादिव्याभाषासूयो वुञ् ॥ ३ । २ । १४६ ॥

किमर्थं निन्दादिभ्यो वुञ्विधीयते न ण्वुलैव सिद्धम् । न ह्यस्ति विशेषो निन्दादिभ्यो ण्वुलो वा वुञो वा । तदेव रूपं स एव स्वरः ॥

वुञमनेकाचः ॥ १ ॥

वुञमनेकाचः प्रयोजयन्ति । असूयकः ॥ अथ येऽत्रैकाचः पठ्यन्ते तेषां ग्रहणं किमर्थम् । न तेषां ण्वुलैव सिद्धम् । न सिध्यति । अयं तच्छीलादिष्वर्थेषु तृन्विधीयते स विशेषविहितः सामान्य-

---

काढून घिनुणप्रत्यय झाल्याचे प्रयोग नाहींत, म्हणून होत नाहीं.

(सू. १४६) निन्द् वगैरे धातूंहून हा वुञ्प्रत्यय कशाकरितां बरें सांगितला आहे? तो सांगावयास नको. ण्वुल्(३।१।१३३)प्रत्ययानेंच तीं रूपें सिद्ध होतात. कारण निन्द् वगैरे धातूंहून ण्वुल्प्रत्यय केला काय आणि वुञ्प्रत्यय केला काय कांहींच फरक नाहीं. रूप तसेंच होतें आणि स्वरही तसाच होतो.[२]

(वा.१) अनेकाच् धातु वुञ्प्रत्यय सांगावयास लावतात; उदा० असूयकः.

पण या सूत्रामध्यें एकाच् धातु जे उच्चारले आहेत ते कशाकरितां? ते उच्चारूं नयेत. त्यांचीं उदाहरणें ण्वुल्प्रत्ययानेंच सिद्ध होतील.

तशा रीतीनें सिद्ध होणार नाहींत. कारण ताच्छील्य वगैरे विशेष अर्थ गम्यमान असतांना तृन्प्रत्यय (३।२।१३५) सांगितला आहे. तेव्हां तो विशेषविहित तृन्प्रत्यय ताच्छील्य वगैरे अर्थ विवक्षित असतील तेथें सामान्यतः सांगितलेल्या ण्वुल्प्रत्ययाचा बाध करील ना?

पण बाध केला तरी 'वाऽसरूप०'(३।१।९४)न्यायानें तो विकल्पानेंच बाध करील.

---

क्षिप्, परि-रट्, परि-वद्, परि-दह्, परि-मुह्, दुष्, द्विष्, द्रुह्, दुह्, युज्, आ-क्रीड्, वि-विच्, त्यज्, रज्, भज्, अति-चर्, अपचर्, आ-मुष् आणि अभि-आ-हन् या धातूंहून कर्ता या अर्थी घिनुण्प्रत्यय होतो, ताच्छील्य वगैरे अर्थ गम्यमान असतांना; उदा० संपर्की, अनुरोधी.

(१४३) वि हा उपसर्ग उपपद असतांना कष्, लष्, कत्थ् आणि स्रम्भ् या धातूंहून पूर्वीच्याच अर्थी घिनुणप्रत्यय होतो; उदा० विकाषी.

(१४४) अप आणि वि हे उपसर्ग उपपद असतांना लष्धातूंहून घिनुण्प्रत्यय पूर्वीच्याच अर्थी होतो; उदा० अपलाषी, विलाषी.

(१४५) प्रउपसर्ग उपपद असतांना लप्, सृ, द्रु, मथ्, वद् आणि वस् या धातूंहून पूर्वीच्या अर्थी घिनुण्प्रत्यय होतो; उदा० प्रलापी, प्रसारी.

१. निन्द्, हिंस्, क्लिश्, खाद्, वि-नश्, परिक्षिप्, परि-रट्, परि-वादि, वि आ-भाष् आणि कण्ड्वादि यक्प्रत्ययान्त असूयधातूंहून कर्ता या अर्थी वुञ्प्रत्यय होतो, ताच्छील्य वगैरे अर्थ गम्यमान असतांना; उदा० निन्दकः.

२. असूयकः येथें वुञ्प्रत्यय केला तर आद्युदात्त होतो (६।१।१९७) आणि ण्वुल्प्रत्यय केला तर लिति (६।१।१९३) या सूत्रानें असूयकः असा ऊकार उदात्त होतो. निन्दकः येथें आद्युदात्त झाला तरी इकाराच उदात्त होणार आणि लिति यानें उदात्त झाला तरी इकारालाच होणार, म्हणून एकाच् धातूंमध्यें वुञ् आणि ण्वुल् यांमध्यें स्वरांत कांहींच फरक होत नाहीं.

विहितं ण्वुलं बाधेत । वासरूपन्यायेन ण्वुलपि भविष्यति ॥ अत उत्तरं पठति ।

**निन्दादिभ्यो वुञ्वचनमन्येभ्यो ण्वुलः प्रतिषेधार्थम् ॥ २ ॥**

निन्दादिभ्यो वुञ्वचनं क्रियते ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्यस्तच्छीलादिषु वासरूपन्यायेनान्येभ्यो ण्वुल् न भवतीति ॥

**तृजादिप्रतिषेधार्थं वैके ॥ ३ ॥**

अथवैतज्ज्ञापयत्याचार्यस्ताच्छीलिकेषु सर्व एव तृजादयो वासरूपेण न भवन्तीति ॥

**[देविक्रुशोश्चोपसर्गे ॥३।२।१४७॥**

**चलनशब्दार्थादकर्मकाद्युच् ॥३।२।१४८॥**

**अनुदात्तेतश्च हलादेः॥३।२।१४९]**

**जुचङ्क्रम्यदन्द्रम्यसृगृधिज्वलशुचलषपतपदः ॥ ३ । २ । १५० ॥**

**पदिग्रहणमनर्थकमनुदात्तेतश्च हलादेरिति सिद्धत्वात् ॥ १ ॥**

पदिग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अनुदात्तेतश्च हलादेरिति सिद्धत्वात् । अनुदात्तेतश्च हलादेः [१४९] इत्येवात्र युच्सिद्धः ॥ न सिध्यति । अयं पदेरुकञ्विधीयते लषपतपदस्थाभूवृषहनकमगमशॄभ्य उकञ् [१५४] इति । स विशेषविहितः सामान्यविहितं युचं बाधेत ॥ वासरूपन्यायेन युजपि भविष्यति ॥

---

तेव्हां एकदा ण्वुल्प्रत्ययही होईल. हें मनांत आणून पुढें वार्तिककार म्हणतात :

(वा.२) निन्द् वगैरे धातूंहून जो वुञ्प्रत्यय सांगितला आहे तो इतर धातूंहून ण्वुल्प्रत्यय न व्हावा याकरितां सांगितला आहे. तें असें:- निन्द् वगैरे धातूंहून जो वुञ्प्रत्यय सांगितला आहे तो ज्ञापनाकरितां सांगितला आहे.

त्या ज्ञापनानें काय ठरवावयाचें आहे ?

असें ठरविलें जातें की ह्या ताच्छील्यप्रकरणामध्यें वासरूपन्यायानें ण्वुल् होत नाहीं. त्यामुळें निन्द् वगैरेंपेक्षां इतर धातूंहून ताच्छील्य वगैरे अर्थ असतांना ण्वुल्प्रत्यय होत नाहीं.

(वा.३) येथें इतर लोक असें म्हणतात की ह्या ताच्छील्यप्रकरणामध्यें वासरूपन्यायच येत नाहीं. तेव्हां ताच्छील्य वगैरे अर्थ असतांना तृन् वगैरे सर्वच मोघम सांगितलेले प्रत्यय होत नाहींत.

(सू.१५०, वा.१) ह्या सूत्रामध्यें पद्धातूचें ग्रहण व्यर्थ केलें आहे.

काय कारण ?

कारण असें की अनुदात्तेतश्च हलादेः या पूर्वसूत्रानेंच पद्धातूहून युच्प्रत्यय होत आहे.

पण त्यानें सिद्ध होणार नाहीं. कारण 'लषपतपदस्थाभूवृषहनकमगमशॄभ्य उकञ्' (३।२।१५४) या सूत्रानें पद्धातूहून उकञ्प्रत्यय सांगितला आहे. तो विशेषविहित असल्यामुळें त्याच्यापेक्षां सामान्य अशा 'अनुदात्ततश्च०' या सूत्रानें सांगितलेल्या युच्प्रत्ययाचा तो बाध करील.

जरी बाध केला तरी वासरूपन्यायानें विक-

---

१. (१४७) उपसर्ग उपपद असतांना देवि आणि क्रुश् या धातूंहून कर्ता या अर्थी वुञ्प्रत्यय होतो, तच्छील वगैरे अर्थ असतांना; उदा० आदेवकः.

(१४८) अकर्मक असे जे चलनार्थक व शब्दार्थक धातु त्यांहून पूर्वीच्या अर्थी युच्प्रत्यय होतो; उदा० चलनः, शब्दनः.

(१४९) अनुदात्त इत्संज्ञक असलेला जो हलादि अकर्मकधातु त्याहून पूर्वीच्या अर्थी युच्प्रत्यय होतो.; उदा० वर्तनः.

१. जु, चङ्क्रम्य, दन्द्रम्य, सृ, गृधु, ज्वल्, शुच्, लष्, पत् आणि पद् या धातूंहून पूर्वीच्या अर्थी युच्प्रत्यय होतो; उदा० जवनः.

**असरूपनिवृत्त्यर्थं तु ॥ २ ॥**

असरूपनिवृत्त्यर्थं तर्हि पदिग्रहणं क्रियते । एतज्ज्ञापयत्याचार्यस्ताच्छीलिकेषु ताच्छीलिका वासरूपेण न भवन्तीति ॥ यद्येतज्ज्ञाप्यते सूददीपदीक्षश्च [१५३] इति दीपिग्रहणमनर्थकम् । अयं दीपे रो विधीयते नमिकम्पिस्म्यजसकमहिंसदीपो रः [१६७] इति। स विशेषविहितः सामान्यविहितं युचं बाधिष्यते । एवं तर्हि सिद्धे सति यद्दीपिग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवति युचो रेण समावेश इति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । कम्रा कन्या कमना कन्येत्येतत्सिद्धं भवति ॥

**[क्रुधमण्डार्थेभ्यश्च ॥३।२।१५१॥**

**नयः ॥३।२।१५२॥**

**सूददीपदीक्षश्च ॥३।२।१५३॥**

**लषपतपदस्थाभूवृषहनकमगमशॄभ्य उकञ् ॥३।२।१५४॥**

**जल्पभिक्षकुट्टलुण्टवृङः षाकन् ॥३।२।१५५॥**

**प्रजोरिनिः ॥३।२।१५६॥**

**जिदृक्षिविश्रीण्वमाव्यथाभ्यमपरिभूप्रसूभ्यश्च ॥३।२।१५७॥]**

**स्पृहिगृहिपतिदयिनिद्रातन्द्राश्रद्धाभ्य आलुच् ॥ ३ । २ । १५८ ॥**

---

स्पानें करील. तेव्हां एकदां युच्प्रत्यय होईलच.

(वा.२) इतर असरूपप्रत्यय वासरूप न्यायानें होतील ते होऊं नयेत याकरितां येथें पद्धातूचें ग्रहण केलें आहे. तें असें की येथील पदग्रहण पूर्वी सांगितल्याप्रमाणें व्यर्थ होतें. तेव्हां त्यावरून सूत्रकार असें ज्ञापन करतात की ह्या ताच्छील्यप्रकरणांतील अपवाद हे ह्या ताच्छील्यप्रकरणांतील उत्सर्गांचा कायमचाच बाध करतात. त्याविषयीं वासरूपन्याय प्रवृत्त होत नाहीं.[2]

पण हें ज्ञापक घेतलें तर सूददीपदीक्षश्च (३।२।१५३) या सूत्रानें जो दीप्धातूच्या पुढें युच्प्रत्ययाचा निषेध केला आहे तो व्यर्थ होतो. कारण नमिकम्पिस्म्यजसकमहिंसदीपो रः (३।२।१६७) यानें सांगितलेला विशेषविहित रप्रत्यय युच्प्रत्ययाचा कायमचाच बाध करील. अशा रीतीनें सिद्ध होत असतांना जें युच्प्रत्यय न होण्याकरितां 'सूददीप०' या सूत्रामध्यें सूत्रकार दीप्धातूचें ग्रहण करीत आहेत त्यावरून ते असें ज्ञापन करीत आहेत की युच्प्रत्ययाचा रप्रत्यय कायमचा बाध करीत नाहीं. तेथें एकदा युच्प्रत्ययही होतो.[3]

या ज्ञापनाचा काय उपयोग ?

---

२. तेव्हां उकञ्प्रत्ययानें युच्प्रत्ययाचा नित्य बाध होईल, म्हणून युच्प्रत्यय होण्याकरितां येथें पदग्रहण केलें आहे.

३. तेव्हां दीप्धातूहून एकदा युच्प्रत्यय होऊं लागेल त्याकरितां निषेधसूत्रामध्यें दीपग्रहण पाहिजे.

१. (१५१) क्रोधार्थक आणि भूषणार्थक धातूंहून ताच्छील्यादिक अर्थी युच्प्रत्यय होतो; उदा० क्रोधनः, रोषणः, मण्डनः, भूषणः.

(१५२) यकारान्त धातूंहून युच्प्रत्यय होत नाहीं; उदा० क्नूयिता, क्ष्मायिता.

(१५३) सूद्, दीप् आणि दीक्ष् या धातूंहून युच्प्रत्यय होत नाहीं; उदा० सूदिता, दीपिता, दीक्षिता.

(१५४) लष्, पत्, पद्, स्था, भू, वृष्, हन्, कम्, गम् आणि शॄ या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थी उकञ्प्रत्यय होतो; उदा० लाषुकः.

(१५५) जल्प्, भिक्ष्, कुट्ट्, लुण्ट् आणि वृङ् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थी षाकन्प्रत्यय होतो; उदा० जल्पाकः जल्पाकी.

(१५६) प्रउपसर्गपूर्वक जुधातूहून ताच्छील्यादिक अर्थी इनुप्रत्यय होतो; उदा० प्रजवी प्रजविनौ.

(१५७) जि, दृ, क्षि, वि-श्रि, इण्, वम्, अ-व्यथ्, अभि-अम्, परि-भू आणि प्र-सू या धातूंहूत ताच्छील्यादिक अर्थी इनुप्रत्यय होतो; उदा० जयी.

१. स्पृहि, गृहि, पति, दय्, नि-द्रा, तत्-द्रा, आणि

किमर्थमालुजुच्यते न लुशेवोच्येत । का रूपासिद्धिः स्पृहयालुः गृहयालुः । शपि कृतेऽतो दीर्घो यञि [७.३.१०१] इति दीर्घत्वं भविष्यति । एवं तर्हि सिद्धे सति यदालुचं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्येभ्योऽप्ययं भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । आलुचि शीङ्ग्रहणं चोदयिष्यति तन्न कर्तव्यं भवति ॥

**आलुचि शीङ्ग्रहणम् ॥ १ ॥**

आलुचि शीङ्ग्रहणं कर्तव्यम् । शयालुः ॥

**[दाधेट्सिशदसदो रुः ॥ ३ । २ । १५९ ॥**

**सृघस्यदः क्मरच् ॥३।२।१६०॥**

**भञ्जभासमिदो घुरच् ॥ ३ । २ । १६१ ॥**

**विदिभिदिच्छिदेः कुरच् ॥ ३ । २ । १६२ ॥**

**इण्नशजिसर्तिभ्यः क्वरप् ॥ ३ । २ । १६३ ॥**

**गत्वरश्च ॥ ३ । २ । १६४ ॥**

**जागरूकः ॥ ३ । २ । १६५ ॥**

**यजजपदशां यङः ॥३।२।१६६॥**

**नमिकम्पिस्म्यजसकमहिंसदीपो**

---

उपयोग असा की कम्रा कन्या, कमना कन्या, येथें एकदा युच्प्रत्यय सिद्ध होतो.

(सू.१५८) येथें आलुच् असा प्रत्यय कशाकरितां सांगितला आहे ? तसा सांगावयास नको, तर लुश् असाच सांगावा.

पण लुश् असा सांगितला तर स्पृहयालुः, दयालुः, हीं रूपें कशीं साधतील ?

लुश् केला म्हणजे मध्यें विकरण शप्प्रत्यय (३।१।६८) होईल आणि नंतर त्याला 'अतो दीर्घो यञि' (७।३।१०१) यानें दीर्घ होईल. तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांना आचार्य जे आलुच् सांगतात त्यावरून ते असें ज्ञापन करतात की हा आलुच्प्रत्यय स्पृहि, गृहि, वगैरेंपेक्षां इतर धातूंहूनही होतो.

या ज्ञापनाचा उपयोग काय ?

'आलुचि शीङ्ग्रहणम्' असें जें वार्तिककार सांगणार आहेत तें सांगावयास नको.

(वा.१) ह्या आलुच्प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें शीङ्धातूचें ग्रहण करावें; उदा० शयालुः.

---

श्रत्-धा या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थीं आलुच्प्रत्यय होतो; उदा० स्पृहयालुः.

२. ज्या ठिकाणीं लुश्प्रत्ययानें सिद्धि होणार नाही अशा इतर धातूंहून शीङ्धातूहून लुश्प्रत्यय केला तर शप्प्रत्ययाचा लुक् (२।४।७२) होऊन शयालुः साधणार नाही.

१.(१५९) दा, धेट्, सि, शद् आणि सद् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थीं रुप्रत्यय होतो; उदा०दारुः.

(१६०)सृ, घस्, आणि अद् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थीं क्मरच् प्रत्यय होतो; उदा० सृमरः.

(१६१) भञ्ज्, भास् आणि मिद् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थीं घुरच्प्रत्यय होतो;उदा०भङ्गुरः. येथें धातूच्या जकाराला कुत्वानें(७।३।५२) गकार झाला आहे.

(१६२) विद्, भिद् आणि छिद् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थीं कुरच्प्रत्यय होतो;उदा०विदुरः.

(१६३) इण्, नश्, जि आणि सृ या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थीं क्वरप्प्रत्यय होतो; उदा० इत्वरः.

(१६४) गत्वर असें निपातन केलें आहे. त्यामुळें गम्धातूहून क्वरप्प्रत्यय आणि धातूच्या मकाराचा लोप झाला आहे. नंतर तुगागम (६।१।७१) झाला आहे.

(१६५) जागृधातूहून ताच्छील्यादिक अर्थीं ऊकप्रत्यय होतो; उदा० जागरूकः.

(१६६) यङ्प्रत्ययान्त जे यज्, जप् आणि दश् हे धातु त्यांहून ताच्छील्यादिक अर्थीं ऊकप्रत्यय होतो; उदा० यायजूकः.

(१६७) नम्, कम्प्, स्मि, अ-जस्, कम्, हिंस् आणि दीप् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थीं रप्रत्यय होतो; उदा० नम्रः.

**रः ॥ ३ । २ । १६७ ॥**

**सनाशंसभिक्ष उः ॥३।२।१६८॥**

**विन्दुरिच्छुः ॥ ३ । २ । १६९ ॥**

**क्याच्छन्दसि ॥ ३ । २ । १७० ॥]**

**आदृगमहनजनः किकिनौ लिट् च ॥ ३ । २ । १७१ ॥**

किमर्थं किकिनोः कित्त्वमुच्यते नासंयोगाल्लिट् कित् [१.२.५] इत्येव सिद्धम्।

**किकिनोः कित्त्वमृकारगुणप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

किकिनोः कित्करणं क्रियत ऋकारगुणप्रतिषेधार्थम्। अयमॄकारान्तानां लिटि गुणः प्रतिषेधविषय आरभ्यत ऋच्छत्यॄताम् [७.४.११] इति। स यथेह भवति आतस्तरतुः आतस्तरुरित्येवमिहापि प्रसज्येत मित्रावरुणौ ततुरिः दूरे ह्यध्वा जगुरिरिति। स पुनः कित्त्वेन बाध्यते॥

**उत्सर्गश्छन्दसि सदादिभ्यो दर्शनात् ॥ २ ॥**

उत्सर्गश्छन्दसि किकिनौ वक्तव्यौ। किं प्रयोजनम्। सदादिभ्यो दर्शनात्। सदादिभ्यो हि किकिनौ दृश्येते। सदिमनिरमिनमिविचीनां सेदिः मेनिः रेमिः नेमिश्चक्रमिवाभवत् विविचिं रत्नधातमम् ॥

**भाषायां धाञ्कृसृजनिनमिभ्यः ॥ ३ ॥**

भाषायां धाञ्कृसृजनिनमिभ्यः किकिनौ वक्तव्यौ ॥ धाञ्। दधिः। धाञ् ॥

(सू.१७१) येथें कि आणि किन् या प्रत्ययांना इत्संज्ञक ककार कशाकरितां जोडला आहे? तो जोडावयास नको. कारण 'असंयोगाल्लिट्कित्' (१।२।५) यानेंच कित्त्व होईल.

(वा.१) कि आणि किन् या प्रत्ययांना जो इत्संज्ञक ककार जोडला आहे तो ऋकाराला गुणाचा निषेध होण्याकरितां जोडला आहे. दीर्घ ऋकारान्त धातूहून लिट्प्रत्यय केला असतां निषेधाचा (१।१।६) विषय असतांनाही गुण होण्याकरितां ऋच्छत्यॄताम् (७।४।११) असें सूत्र मुद्दाम केलें आहे. तेव्हां जसा तो गुण आतस्तरतुः आतस्तरुः येथें होतो तसा मित्रावरुणौ ततुरिः, दूरे अध्वा जगुरिः, येथेंही होऊं लागेल. त्याचा पुन्हा येथें ककार जोडल्यामुळें बाध होतो.

(वा.२) हे कि आणि किन्प्रत्यय वेदामध्यें साधारण सर्व धातूंहून होतात असें सांगावें.

याचा काय उपयोग?

वेदामध्यें सद्, मन्, रम्, नम् आणि विच् ह्या सद् वगैरे धातूंच्या पुढें हे प्रत्यय केलेले दृष्टीस पडतात. तेव्हां तीं उदाहरणें साधणें हा उपयोग होय; जसें:– सेदिः, मेनिः, रेमिः, नेमिश्चक्रमिवाभवत्, विविचिं रत्नधातमम्.

(वा.३) लौकिक प्रयोगांमध्यें धाञ्, कृ, सृ, जन् आणि नम् या धातूंहून कि आणि किन्प्रत्यय होतात असें म्हणावें; उदा० दधिः, चक्रिः, सस्रिः, जज्ञिः, नेमिः.

(१६८) सन्प्रत्ययाचा धातु, आ-शस् आणि भिक्ष् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थी उप्रत्यय होतो; उदा० चिकीर्षुः.

(१६९) विन्दु आणि इच्छु असे दोन शब्द येथें उप्रत्ययान्त निपातित केले आहेत. निपातनामुळें विद्धातूला नुमागम आणि इष्धातूच्या षकाराला छकारादेश झाला आहे.

(१७०) वेदामध्यें क्यप्रत्ययान्त धातूहून ताच्छील्यादिक अर्थी उप्रत्यय होतो; उदा० मित्रयुः. येथें दीर्घ (७।४।७५) आणि ईकार (७।४।३३) झाला नाहीं (७।४।३५).

१. अकारान्त धातु, दीर्घ ऋकारान्त धातु आणि गम्, हन्, जन् हे धातु यांहून ताच्छील्यादिक अर्थी कि आणि किन् हे प्रत्यय होतात; आणि ते प्रत्यय लिटाप्रमाणें समजावेत, त्यामुळें ते द्वित्व वगैरे होतात; उदा. पपिः, ततुरिः. किन्प्रत्ययांतील नकार इत्संज्ञक आहे, त्यामुळें पपि वगैरे शब्दांमध्यें पकदा आद्युदात्त (६।१।१९७) होतो.

कृ । चक्रिः । कृ ॥ सृ । सस्रिः । सृ ॥ जनि । जज्ञिः । जनि ॥ नमि । नेमिः ॥

**सासहिवावहिचाचलिपापतीनां निपातनम् ॥ ४ ॥**

सासहिवावहिचाचलिपापतीनां निपातनं कर्तव्यम् । वृषा सहमानं सासहिः । वावहिः । चाचलिः । पापतिः ॥

अपर आह । सहिवहिचलिपतिभ्यो यङन्तेभ्यः किकिनौ वक्तव्यौ । एतान्येवोदाहरणानि ॥

**[[१]स्वपितृषोर्नजिङ् ॥३।२।१७२॥**

**[१]शॄवन्द्योरारुः ॥ ३ । २ । १७३ ॥]**

**[१]भियः क्रुक्लुकनौ ॥ ३ । २ । १७४॥**

भियः क्रुकनपि वक्तव्यः । भीरुकः ॥

**[[१]स्थेशभासपिसकसो वरच् ॥ ३ । २ । १७५ ॥**

**यश्च यङः ॥ ३ । २ । १७६ ॥**

**भ्राजभासधुर्विद्युतोर्जिपॄजुग्रावस्तुवः क्विप् ॥३।२।१७७॥]**

**अन्येभ्योऽपि दृश्यते ॥३।२।१७८॥**

किमर्थमिदमुच्यते न क्विप्चान्येभ्योऽपि दृश्यत इत्येव सिद्धम् ।

**क्विब्विधिरनुपपदार्थः ॥ १ ॥**

अनुपपदार्थोऽयमारम्भः । पचेः पक् । भिदेर्भित् । छिदेश्छित् ॥ अथ योऽत्र सोपपदस्तस्य ग्रहणं किमर्थम् । न तेनैव

---

(वा.४) सासहि, वावहि, चाचलि आणि पापति या चार शब्दांचें येथें निपातन करावें; उदा० वृषा सहमानं सासहिः; वावहिः, चाचलिः, पापतिः.

येथें दुसरा कोणी असें म्हणतो की यङ्प्रत्ययान्त जे सह्, वह्, चल् आणि पत् हे धातु त्यांहून कि आणि किन्प्रत्यय होतात असें म्हणावें. याचींही उदाहरणें तींच होत.

(सू. १७४) भीधातूहून क्रुकन् असाही प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० भीरुकः.

(सू.१७८) हें सूत्र कशाकरितां केलें आहे? तें करावयास नको. कारण क्विप्च (३।२।७६) या सूत्रानें इतर धातूंहूनही क्विप्प्रत्यय केलेला दृष्टीस पडतो. त्यानेंच येथेंही होईल.

(वा.१) उपपद नसतांना धातूहून क्विप्प्रत्यय होण्याकरितां हें सूत्र केलें आहे. पच्धातूचें पक्, भिद्धातूचें भित्, छिद्धातूचें छित् असें होतें.

आतां येथें पूर्वसूत्रामध्यें ग्रावस्तु असा उपपदासहित जो धातु उच्चारला आहे तो कशाकरितां? त्याचें उच्चारण करावयास नको. कारण तेथें क्विप्प्रत्यय क्विप्च (३।२।७६) या सूत्रानेंच सिद्ध होईल.

तसा सिद्ध होणार नाहीं. कारण ताच्छील्यादिक अर्थाचा निर्देश ज्या सूत्रामध्यें केला आहे तेथें कांहीं लोक आ केः (३।२।१३४) असें म्हणतात. आणि कांहीं लोक प्राक्केः असें म्हणतात.

---

१. स्वप् आणि तृष् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थी नजिङ्प्रत्यय होतो; उदा० स्वप्नक्, तृष्णक्.

१. शॄ व वन्द् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थी आरुप्रत्यय होतो; उदा० शरारुः, वन्दारुः.

१. भीधातूहून ताच्छील्यादिक अर्थी क्रु आणि क्लुकन् असे प्रत्यय होतात; उदा० भीरुः, भीलुकः.

१. (१७५) स्था, ईश्, भास्, पिस् आणि कस् या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थी वरच्प्रत्यय होतो; उदा० स्थावरः, ईश्वरः.

(१७६) यङ्प्रत्ययान्त याधातूहून ताच्छील्यादिक अर्थी वरच्प्रत्यय होतो; उदा० यायावरः.

(१७७) भ्राज्, भास्, धुर्, वि-द्युत्, ऊर्ज्, पॄ, जु आणि ग्राव-स्तु या धातूंहून ताच्छील्यादिक अर्थी क्विप्प्रत्यय होतो; उदा० विभ्राट्, भाः, धूः, विद्युत्, ऊर्क्, पूः, जूः, ग्रावस्तुत्. जूः येथें बाहुलकास्तव दीर्घ होतो.

१. इतर धातूंहूनही ताच्छील्यादिक अर्थी क्विप्प्रत्यय दृष्टीस पडतो; उदा० युक्, छित्, भित्.

सिद्धम् । न सिध्यति । इह केचिदा क्वेरिति सूत्रं पठन्ति केचित्प्राक्क्वेरिति । तत्र य आ क्वेरिति पठन्ति तैः क्विबप्याक्षिप्तो भवति तत्र तच्छीलादिष्वर्थेषु क्विब्यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । य एवासावविशेषविहितः स तच्छीलादिषु भविष्यत्यन्यत्र च ॥ न सिध्यति । अयं तच्छीलादिष्वर्थेषु तृन्विधीयते स विशेषविहितः सामान्यविहितं क्विपं बाधेत ॥ वासरूपेण क्विबपि भविष्यति ॥ न सिध्यति । इदानीमेव ह्युक्तं तच्छीलादिष्वर्थेषु वासरूपेण तृजादयो न भवन्तीति क्विप्चापि तृजादिः ॥

## वचिप्रच्छ्यायतस्तुकटप्रुजुश्रीणां दीर्घश्च ॥ २ ॥

वचिप्रच्छ्यायतस्तुकटप्रुजुश्रीणां दीर्घत्वं च वक्तव्यं क्विप्च । वचि । वाक् । वाचि ॥ प्रच्छि । शब्दप्राट् । प्राच्छि ॥ आयतस्तु । आयतस्तूः । आयतस्तु ॥ कटप्रु । कटप्रूः । कटप्रु ॥ जु । जूः ॥ श्रि । श्रीः ॥

अपर आह । वचिप्रच्छ्योरसंप्रसारणं चेति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । दीर्घवचनसामर्थ्यात्प्रसारणं न भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । दीर्घत्वं क्रियतां संप्रसारणमिति किमत्र

---

तेथें जे लोक आ क्वेः म्हणजे क्विप्रत्ययापर्यंत असें म्हणतात त्यांच्या मतीं ताच्छील्यादिक अर्थीं सांगितलेल्या प्रत्ययांमध्यें हा क्विप्प्रत्ययही सामील होतो; तेव्हां ताच्छील्यादिक अर्थ असतांना क्विप्प्रत्यय झाला पाहिजे; याकरितां पुन्हा येथें सांगितला आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. जो क्विप्च (३।२।७६) या सूत्रानें मोघम क्विप्प्रत्यय सांगितला आहे तो ताच्छील्यादिक अर्थ असतांनाही होईल आणि नसतांनाही होईल.

अशा रीतीनें सिद्धि होणार नाहीं. कारण ताच्छील्यादिक अर्थीं जो तृन्प्रत्यय (३।२।१३५) सांगितला आहे तो विशेषविहित आहे, म्हणून मोघम सांगितलेल्या क्विप्प्रत्ययाचा बाध करील.

पण बाध केला तरी 'वासरूप०'(३।१।९४) न्यायानें एकदा क्विप् होईलच.

अशा रीतीनेंही सिद्धि होणार नाहीं. कारण आतांच सांगितलें आहे ना की ताच्छील्यादिक अर्थीं सांगितलेल्या प्रत्ययांच्या उदाहरणांमध्यें मोघम सांगितलेले तृच् वगैरे प्रत्यय वासरूपन्यायानें होत नाहींत (३।२।१४६, वा.३) आणि क्विप्च (३।२।७६) यानें सांगितलेला क्विप्प्रत्यय हाही मोघम सांगितलेल्या त्या तृच् वगैरेपैकींच आहे.

(वा.२) वच्, प्रच्छ्, आयतस्तु, कटप्रु, जु आणि श्रि या धातूंहून क्विप्प्रत्यय होतो आणि या धातूंमधील अचाला दीर्घ होतो असें म्हणावें; उदा० वाक्, शब्दप्राट्, आयतस्तूः, कटप्रूः, जूः, श्रीः.

येथें दुसरा कोणी असें म्हणतो की वच् आणि प्रच्छ् या धातूंना संप्रसारण होत नाहीं असें म्हणावें.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण त्या धातूंनाही दीर्घ सांगितला आहे; त्याच्या जोरावर संप्रसारण होणारच नाहीं.[1]

पण येथें अगोदर असा विचार उत्पन्न होतो की येथें दीर्घ अगोदर करावा किंवा संप्रसारण करावें.

मग यांत काय बरें अगोदर करावें ?

---

१. जर संप्रसारण होईल तर त्याच्या पुढील स्वर ऱ्हस्व असला काय किंवा दीर्घ झाला काय त्याला पूर्वरूप (६।१।१०८) होणार असल्यामुळें दीर्घविधान व्यर्थ होईल.

कर्तव्यम् । परत्वात्संप्रसारणम् । अन्तरङ्गं दीर्घत्वम् । कान्तरङ्गता । प्रत्ययोत्पत्तिसंनियोगेन दीर्घत्वमुच्यत उत्पन्ने प्रत्यये संप्रसारणम् । तत्रान्तरङ्गत्वाद्दीर्घत्वे कृते संप्रसारणं प्रसारणपरपूर्वत्वे कृते कार्यकृतत्वात्पुनर्दीर्घत्वं न स्यात् । तस्मात्सुष्ठूच्यते दीर्घवचनसामर्थ्यात्प्रसारणं न भविष्यतीति ॥

**द्युतिगमिजुहोतीनां द्वे च ॥३॥**

द्युतिगमिजुहोतीनां द्वे चेति वक्तव्यम् । द्युति । दिद्युत् । द्युति ॥ गमि । जगत् । गमि ॥ जुहोति । जुहोतेर्दीर्घश्च । जुहूः ॥ दृणातेर्ह्रस्वश्च द्वे च क्विप्चेति वक्तव्यम् । ददृत् ॥ जुहूर्जुहोतेर्ह्वयतेर्वा ॥ दद्दृणातेर्दीर्यतेर्वा ॥ जूर्ज्वरतेर्जीर्यतेर्वा ॥

**ध्यायतेः संप्रसारणं च ॥ ४ ॥**

ध्यायतेः संप्रसारणं च क्विप्च वक्तव्यः ॥ धीर्ध्यायतेर्दधातेर्वा ॥

**[भुवः संज्ञान्तरयोः ॥३।२।१७९॥][1]**

**विप्रसंभ्यो ड्वसंज्ञायाम्[1] ॥ ३ । २ । १८० ॥**

**डुप्रकरणे मितद्र्वादिभ्य उपसंख्यानं धातुविधितुक्प्रतिषेधार्थम् ॥१॥**

डुप्रकरणे मितद्र्वादिभ्य उपसंख्यानं

---

परत्वास्तव संप्रसारण (६।१।१५,१६) अगोदर करावें.

पण दीर्घ अंतरंग आहे ना?

तो कसा अंतरंग होतो?

क्विप्प्रत्यय जो होतो त्याच्याबरोबरच दीर्घ सांगितला आहे आणि क्विप्प्रत्यय केल्यानंतर संप्रसारण प्राप्त होतें. तेव्हां तेथें अंतरंगत्वास्तव दीर्घ अगोदर केल्यानंतर संप्रसारण होणार आणि त्या संप्रसारणाला पूर्वरूप केल्यानंतर पुन्हा दीर्घ कांहीं करतां येणार नाहीं. कारण तेथेंच तें कार्य पूर्वी एकदा केलें आहे.[3] तेव्हां दीर्घविधानाच्या जोरावर संप्रसारण होत नाहीं असें जें पूर्वी सांगितलें आहे तें बरोबरच आहे.

(वा.३) द्युत्, गम् आणि हु या धातूंहून क्विप्प्रत्यय होतो आणि या धातूंना द्वित्व होतें असें म्हणावें; उदा०— दिद्युत्, जगत्. हुधातूला दीर्घ होतो : जुहूः.

दृधातूहून क्विप्प्रत्यय होतो, दृधातूला ऱ्हस्व होतो आणि द्वित्व होतें, असें म्हणावें; उदा० ददृत्. जुहू हा शब्द हुधातूपासून किंवा ह्वेञ्‌धातूपासून त्याला संप्रसारण करून साधतां येतो. तसेंच दद्दृत् हा शब्द क्र्यादिगणांतील दृधातूपासून किंवा दिवादिगणांतील दृधातूपासून साधतां येतो. तसेंच जूः हा शब्द ज्वर्धातूपासून किंवा जृधातूपासून साधतां येतो.

(वा.४) ध्यैधातूहून क्विप्प्रत्यय होतो आणि ध्यैधातूला संप्रसारण होतें असें म्हणावें; उदा० धीः. धीः हा शब्द ध्यैधातूपासून किंवा धाधातूपासून साधतां येतो.

(सू.१८०, वा.१) ह्या डुप्रत्ययाच्या प्रकरणामध्यें असें म्हणावें की मितद्रु वगैरे शब्द साधण्याकरितां द्रु वगैरे धातूंहून डुप्रत्यय होतो.

काय कारण?

---

३. तेव्हां संप्रसारण झालें तरी दीर्घविधान व्यर्थ होतें हें सिद्ध झालें.

१. भूधातूहून क्विप्प्रत्यय होतो, परंतु तो शब्द कोणाचीतरी संज्ञा असली पाहिजे, किंवा मध्यस्थ हा अर्थ असला पाहिजे; उदा० विभूः हें कोणाचें तरी नांव आहे; प्रतिभूः याचा अर्थ मध्यस्थ म्हणजे जामीन असा आहे.

१. वि, प्र आणि सम् या उपसर्गांच्या पुढील भूधातूहून कर्ता या अर्थी डुप्रत्यय होतो, संज्ञा नसतांना; उदा० विभुः व्यापकः, प्रभुः स्वामी, संभुर्जनिता.

कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । धातुविधितुक्प्रतिषेधार्थम् । धातुविधेस्तुकश्च प्रतिषेधो यथा स्यात् । मितद्रुः मितद्रू मितद्रवः । अचि श्नुधातुभ्रुवाम् [६.४.७७] इत्युवङादेशो मा भूत् । इह च मितद्र्वा मितद्र्वे नोङ्धात्वोः [६.१.१७५] इति प्रतिषेधो मा भूत् ॥ तुग्विधिः । मितद्रुः । ह्रस्वस्य पिति कृति तुग्भवतीति तुग्मा भूदिति ॥

[धः कर्मणि ष्ट्रन् ॥ ३ । २ । १८१ ॥

दाम्नीशसयुयुजस्तुतुदसिसिचमिहपतदशनहः करणे ॥ ३ । २ । १८२ ॥

हलसूकरयोः पुवः ॥३।२।१८३॥

अर्तिलूधूसूखनसहचर इत्रः ॥ ३ । २ । १८४ ॥

पुवः संज्ञायाम् ॥ ३ । २ । १८५ ॥

कर्तरि चर्षिदेवतयोः ॥३।२।१८६॥

ञीतः क्तः ॥ ३ । २ । १८७ ॥ ]

मतिबुद्धिपूजार्थेभ्यश्च ।३।२।१८८।

शीलितो रक्षितः क्षान्त आक्रुष्टो जुष्ट इत्यपि ।

रुष्टश्च रुषितश्चोभावभिव्याहृत इत्यपि ॥ १ ॥

हृष्टतुष्टौ तथा कान्तस्तथोभौ संयतोद्यतौ ।

---

कारण असें की त्या उकाराला धातूमुळें प्राप्त होणारें कार्य आणि तुगागम न झाला पाहिजे; उदा० मितद्रुः मितद्रू मितद्रवः. येथें अचिश्नुधातु० (६।४।७७) यानें उवङ् न झाला पाहिजे. तसेंच मितद्र्वा मितद्र्वे येथें नोङ्धात्वोः (६।१।१७५) ह्यानें सांगितलेल्या विभक्तिप्रत्ययाला होणाऱ्या उदात्त स्वराचा निषेध न झाला पाहिजे. तसेंच मितद्रुः येथें ह्रस्वस्य पिति कृति तुक् (६।१।७१) यानें तुगागम न झाला पाहिजे.

(सू.१८८) इतर धातूंहूनही हा वर्तमानकालीं सांगितलेला क्तप्रत्यय होतो; उदा० शीलितः, रक्षितः, क्षान्तः, आक्रुष्टः, जुष्टः, रुष्टः, रुषितः(७।२।२८), अभिव्याहृतः, हृष्टः, कान्तः,

---

२. डुप्रत्यय केल्यामुळें धातूच्या उकाराचा लोप होतो, म्हणून उवङ् आणि उदात्तस्वराचा निषेध होत नाहीं. तसेंच क्विप्प्रत्यय केला असता तर पित् असा कृत् पुढें आहे म्हणून तुगागम झाला असतां डुप्रत्यय केल्यामुळे तो होत नाही.

१. (१८१) धाधातूहून कर्म या अर्थी ष्ट्रन्प्रत्यय होतो. धयति एनामिति म्हणजे जिचें बालक स्तनपान करतें ती धात्री उपमाता. दधाति एनामिति म्हणजे जिचें मनुष्य धारण करतो ती धात्री आमलकी.

(१८२) दाप्, नी, शस्, यु, युज्, स्तु, तुद्, सि, सिच्, मिह्, पत्, दश् आणि नह् या धातूंहून करण या अर्थी ष्ट्रन्प्रत्यय होतो; उदा० दाति अनेन दात्रम्, म्हणजे तोडण्याचें साधन.

(१८३) पूधातूहून करण या अर्थी ष्ट्रन्प्रत्यय होतो; तें करण नांगर किंवा सूकर याचा अवयव असला पाहिजे; उदा० पोत्रम् म्ह. नांगराचें टोंक किंवा सूकराचें मुख.

(१८४) ऋ, लू, धू, सू, खन्, सह्, चर्, या धातूंहून करण या अर्थी इत्रप्रत्यय होतो; उदा० अरित्रम् म्ह. सुकाणू.

(१८५) पूधातूहून करण या अर्थी इत्रप्रत्यय होतो, संज्ञा असतांना; उदा० पुनाति अनेन पवित्रम्.

(१८६) पूधातूहून करण या अर्थी इत्रप्रत्यय होतो, ऋषि अर्थ गम्यमान असतांना, आणि कर्ता या अर्थी इत्रप्रत्यय होतो, देवता अर्थ गम्यमान असतांना; उदा० पूयते अनेन पवित्रः ऋषिः, पुनातीति पवित्रः अग्निः.

(१८७) ञि इत्संज्ञक असलेल्या धातूहून वर्तमानकालीं क्तप्रत्यय होतो; उदा० ञिमिदा, मिन्नः.

१. इच्छा, ज्ञान आणि पूजा या अर्थांच्या धातूंना वर्तमानकालीं क्तप्रत्यय होतो; उदा० राज्ञाम् मतः, बुद्धः, पूजितः, इष्टः, ज्ञातः, अर्चितः.

२. या सूत्रामध्यें सूत्रकारांनीं चशब्द घातला आहे त्यावरून ह्या इतर शब्दांचा संग्रह होतो.

कष्टं भविष्यतीत्याहुरमृताः पूर्ववत्स्मृताः ॥ २ ॥

न म्रियन्तेऽमृताः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य द्वितीये पादे तृतीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

संयतः, उद्यतः. कष्टशब्दामध्यें भविष्यकाळीं क्तप्रत्यय होतो. अमृतशब्दामध्यें पूर्वीप्रमाणें म्हणजे वर्तमानकालींच होतो. न म्रियन्ते अमृताः असा अमृतशब्दाचा विग्रह आहे.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील तिसरें आह्निक समाप्त झालें.

*

**उणादयो बहुलम् ॥ ३ । ३ । १ ॥**

बहुलवचनं किमर्थम् ।

बाहुलकं प्रकृतेस्तनुदृष्टेः

तन्वीभ्यः प्रकृतिभ्य उणादयो दृश्यन्ते न सर्वाभ्यो दृश्यन्ते ॥

प्रायसमुच्चयनादपि तेषाम् ।

प्रायेण खल्वपि ते समुच्चिता न सर्वे समुच्चिताः ॥

कार्यसशेषविधेश्च तदुक्तं

कार्याणि खल्वपि सशेषाणि कृतानि न सर्वाणि लक्षणेन परिसमाप्तानि ॥ किं पुनः कारणं तन्वीभ्यः प्रकृतिभ्य उणादयो दृश्यन्ते न सर्वाभ्यो दृश्यन्ते । किं च कारणं प्रायेण समुच्चिता न सर्वे समुच्चिताः । किं च कारणं कार्याणि सशेषाणि कृतानि न सर्वाणि लक्षणेन परिसमाप्तानि ।

नैगमरूढिभवं हि सुसाधु ॥१॥

नैगमाश्च रूढिभवाश्चौणादिकाः सुसाधवः कथं स्युः ॥

नाम च धातुजमाह निरुक्ते

नाम खल्वपि धातुजम् । एवमाहुर्नैरुक्ताः ॥

व्याकरणे शकटस्य च तोकम् ।

वैयाकरणानां च शाकटायन आह धातुजं नामेति ॥ अथ यस्य विशेषपदार्थो न समुत्थितः कथं तत्र भवितव्यम् ।

यन्न विशेषपदार्थसमुत्थं प्रत्ययतः

प्रकृतेश्च तदूह्यम् ॥ २ ॥

प्रकृतिं दृष्ट्वा प्रत्यय ऊहितव्यः

---

(सू. १) या सूत्रामध्यें बहुलम् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

उणादिप्रत्यय हे थोडक्याच धातूंहून केलेले दिसतात; सर्व धातूंहून केलेले दिसत नाहींत.

तसेंच त्या प्रत्ययांचा 'कृवापाजि०' (उणा० १।१) इत्यादि सूत्रांनीं जो संग्रह केला आहे तो बराच केला आहे. पण सर्वसंग्रह तेथें झाला नाहीं.

त्या प्रत्ययांबरोबर होणारीं इतर कार्यें जीं होतात त्यांपैकीं[२] कांहीं सांगावयाचीं राहिलींच आहेत. म्हणून बहुलम् असें येथें म्हटलें आहे.

पण उणादिप्रत्यय हे थोडक्याच धातूंहून केलेले दिसतात, सर्वांहून केलेले दिसत नाहींत. तसेंच त्या सूत्रामध्यें त्या सर्व प्रत्ययांचा संग्रह झाला नाहीं. तसेंच इतर कार्यें देखील पूर्णपणानें सांगितलीं गेलीं नाहींत. म्हणून त्यांविषयीं बहुलम् असें म्हणण्याचें काय बरें कारण ?

वैदिकशब्द आणि लोकांतीलही संज्ञाशब्द हे साधुशब्दच आहेत[३]. बहुलग्रहण नसेल तर त्या सर्व शब्दांना साधुत्व कसें येईल ?

नाम म्हणून जेवढें आहे तें सर्व यच्चयावत् धातूंपासून तयार झालें आहे असें निरुक्तकार म्हणतात.

तसेंच वैयाकरणामधील शाकटायन ऋषिही सर्व प्रकारचें नाम धातुपासूनच तयार झालें आहे असें म्हणतो.

आतां जेथें विशेष प्रकृतिप्रत्यय सांगून नाम तयार केलें नसेल तेथें कसें करावें ?

ज्या नामामध्यें विशेष प्रकृतिप्रत्यय सांगितले नसतील तेथें आणि जेथें बराचसा भाग प्रकृतीचा असावा असें वाटेल तेथें त्या प्रकृतीहून प्रत्ययाची कल्पना करावी. तसेंच ज्या ठिकाणीं बराचसा भाग प्रत्ययाचा असावा असें वाटेल तेथें त्या प्रत्ययाच्या मागें प्रकृतीची कल्पना करावी.

---

१. उणादिप्रत्यय वर्तमानकाली होतात आणि ते बाहुल्येंकरून होतात.

२. बहुलग्रहणानें त्या उणादिसूत्रांमध्यें जी काय उणीव राहिली असेल ती दूर होते.

३. कारण ह्या पाणिनीय व्याकरणामध्यें तशा शब्दांचा संग्रह केला आहे.

प्रत्ययं च दृष्ट्वा प्रकृतिरूहितव्या ॥
संज्ञासु धातुरूपाणि प्रत्ययाश्च ततः परे ।
कार्याद्विद्यादनुबन्धमेतच्छास्त्रमुणादिषु ॥

**[भूतेऽपि दृश्यन्ते ॥ ३ । ३ । २॥]**

**भविष्यति गम्यादयः ॥३।३।३॥**

**भविष्यतीत्यनद्यतन उपसंख्यानम् १**

भविष्यतीत्यनद्यतन उपसंख्यानं कर्तव्यम् । श्वो ग्रामं गमी । किं पुनः कारणं न सिध्यति । लृटायं निर्देशः क्रियते लृट्चानद्यतने लुटा बाध्यते । तेन लृट एव विषय एते प्रत्ययाः स्युर्लुटो विषये न स्युः ॥

**इतरेतराश्रयं च ॥ २ ॥**

इतरेतराश्रयं च भवति । केतरेतराश्रयता । भविष्यत्कालेनायं निर्देशः क्रियते निर्देशोत्तरकाला च भविष्यत्कालता तदेतदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ॥

**उक्तं वा ॥ ३ ॥**

किमुक्तम् । एकं तावदुक्तं न वापवादस्य निमित्ताभावादनद्यतने हि तयोर्विधानमिति ॥ अपरमप्युक्तमव्ययनिर्देशात्सिद्धमिति । अव्ययवता शब्देन निर्देशः कर्तव्यः । अवर्तमानेऽभूत इति ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । अव्ययमेष भविष्यतिशब्दो नैषा भवते-

---

संज्ञाशब्दामध्यें वर्ण पाहून त्याप्रमाणें धातूची कल्पना करावी व पुढें प्रत्ययाची कल्पना करावी. तसेंच तेथें ज्या इत्संज्ञक वर्णाचें कार्य दृष्टीस पडेल तेथें त्या इत्संज्ञक वर्णाची कल्पना करावी. हें उणादिशास्त्र होय.

(सू.३, वा.१) गमी वगैरे शब्दांतील इन् वगैरे प्रत्यय अनद्यतनभविष्यकालीं होतात असें म्हणावें; उदा० श्वो ग्रामं गमी.

पण भविष्यकालीं सांगितलेला प्रत्यय अनद्यतनभविष्यकालीं होणार नाहीं याचें काय बरें कारण ?

कारण असें की प्रकृत सूत्रामध्यें 'भविष्यति' असा भूधातूहून लृट्प्रत्यय करून निर्देश केला आहे, आणि अनद्यतनभविष्यकालीं तर लृट्प्रत्ययाचा लुटानें बाध होत आहे. तेव्हां अर्थातच त्या लृटाच्या विषयांतच गमी वगैरे शब्दांतील प्रत्यय होतील, लुटाच्या विषयांत होणार नाहींत.

(वा.२) शिवाय येथें इतरेतराश्रयदोषही येतो.

तो इतरेतराश्रयदोष येथें कसा बरें येतो ?

असा की भविष्यकालीं लृट्प्रत्यय करून सिद्ध होणाऱ्या भविष्यत् या शब्दानें येथें निर्देश केला आहे, आणि निर्देश केल्यानंतर भविष्यकाल हा त्याचा अर्थ आहे हें समजणार. तेव्हां अर्थातच ह्या दोन गोष्टी एकमेकांवर अवलंबून आहेत असें समजतें. आणि अशा ज्या गोष्टी एकमेकांवर अवलंबून असतात त्यांपैकीं कांहींच सिद्ध होत नाहीं.

(वा.३) अथवा हें मागें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

एक तर असें सांगितलें आहे की 'न वापवादस्य निमित्ताभावादनद्यतने हि तयोर्विधानम्' (३।२।११०, वा.२) आणि दुसरेंही असें सांगितलें आहे की 'अव्ययनिर्देशात्सिद्धम्' (३।२।८४, वा.२). नञ् हें अव्यय ज्यामध्यें आहे अशा 'अवर्तमाने अभूते' या शब्दांनीं निर्देश केला म्हणजे सिद्ध होईल. इतरेतराश्रय दोष येणार नाहीं.

तर मग तसा निर्देश म्हणजे अव्यय ज्यामध्यें आहे अशा शब्दानें निर्देश केला पाहिजे.

तसा निर्देश करावयास नको. कारण येथें

---

१. हे उणादिप्रत्यय भूतकालींही दृष्टीस पडतात; उदा० वृत्तं वर्त्म, चरितं चर्म, भसितं भस्म.

१. गमी वगैरे शब्दांतील इन्प्रत्यय भविष्यकालीं होतो.

लुट्। कथमव्ययसंज्ञा। विभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च निपाता भवन्तीति निपातसंज्ञा निपातोऽव्ययमित्यव्ययसंज्ञा ॥ अथापि भवतेर्लृट्। एवमप्यव्ययमेव। कथम्। न व्येतीत्यव्ययमिति। क पुनर्न व्येति। एतौ कालविशेषौ भूतवर्तमानौ। स्वभावतो भविष्यत्येव वर्तते ॥ यदि तर्हि न व्येतीत्यव्ययं न वा तद्विधानस्यान्यत्राभावात्। न वा भविष्यदधिकारेणार्थः। किं कारणम्। तद्विधानस्यान्यत्राभावात्। येऽपि ह्यत इत उत्तरं प्रत्ययाः शिष्यन्त एतेऽप्येतौ कालविशेषौ न विवाम्ति भूतवर्तमानौ स्वभावतो भविष्यत्येव वर्तन्ते ॥ अत उत्तरं पठति।

**भविष्यदधिकारस्य प्रयोजनं यावत्पचति पुरा पचतीत्यनपशब्दत्वाय४ यावत्पुरानिपातयोर्लट् ॥३।३।४॥**

**यावत्पुरादिषु लड्विधिर्लुटः पूर्वविप्रतिषिद्धम् ॥१॥**

यावत्पुरादिषु लड्विधिर्भवति लुटः पूर्वविप्रतिषेधेन। यावत्पुरानिपातयोर्लट् भवतीत्यस्यावकाशः। यावद्भुङ्क्ते। पुरा

---

भविष्यति असा जो शब्द उच्चारला आहे तो अव्ययच आहे. भूधातूहून लृट्प्रत्यय केलेला नव्हे.

पण भविष्यति या शब्दाला अव्ययसंज्ञा कशी बरें होते?

विभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च (१।४।५७, गणसूत्र) यानें विभक्तिप्रत्ययान्तासारख्या दिसणाऱ्या 'भविष्यति' या शब्दाला निपातसंज्ञा होते, आणि निपाताला अव्ययसंज्ञा सांगितली आहे (१।१।३७), म्हणून अव्ययसंज्ञा होते.

आतां जरी भूधातूहून लृट्प्रत्यय करून 'भविष्यति' हा शब्द साधला तरी देखील तो अव्ययच आहे.

तो कसा?

असा की न व्येति इति अव्ययम्, म्हणजे आपल्या स्वरूपांतून जो अन्यत्र च्युत होत नाहीं त्याला अव्यय म्हणतात. शब्द तसाच आहे. आपला कायमचा अर्थ दाखविणें हें जें शब्दाचें स्वरूप त्यांतून तो कधींही च्युत होत नाहीं. म्हणजे भविष्यति हा शब्द इतर अर्थाकडे कधींही वळत नाहीं.

पण इतर कोणत्या बरें अर्थाकडे तो जात नाहीं?

हे जे भूत आणि वर्तमान असे विशेष काल आहेत त्यांकडे तो कधींही जात नाहीं, तर स्वभावतः भविष्यकाल या एका अर्थीच आहे.

पण अशा रीतीनें शब्द जर अव्यय असेल तर 'न वा तद्विधानस्यान्यत्राभावात्' (३।२।८४, वा.३) या वार्तिकाचा आणि भविष्यति या अधिकाराचा कांहींच उपयोग दिसत नाहीं.

काय कारण?

कारण असें की तद्विधानस्यान्यत्राभावात्, म्हणजे पुढील सूत्रांनीं जे प्रत्यय सांगितले आहेत ते देखील आपल्या स्वरूपांतून च्युत होऊन भूत आणि वर्तमान या विशेष कालांना कधींही दाखविणार नाहींत, तर स्वभावतः भविष्यकाल याच अर्थाला दाखवितात.

हें मनांत घेऊन वार्तिककार सांगतात—

(वा.४) 'यावत्पचति', 'पुरा पचति', हे पुढील सूत्रानें साधणारे प्रयोग भविष्यकालीं अपशब्द नाहींत हें समजणें हा भविष्यति या अधिकाराचा उपयोग आहे.

(सू.४, वा.१) यावत्, पुरा, वगैरे उपपदें असतांना हा जो भविष्यकालीं लट्प्रत्यय सांगितला आहे तो लुटापेक्षां (३।३।१५) पूर्व-

---

२. मागें ३।२।८४ टीप २ पहा.

१. यावत् आणि पुरा हे शब्द उपपद असतांना धातूहून भविष्यकालीं लट्प्रत्यय होतो; उदा० यावद्भुङ्क्ते.

भुङ्क्ते। लुटोऽवकाशः। श्वः कर्ता। श्वोऽध्येता। इहोभयं प्राप्नोति। यावच्छ्वो भुङ्क्ते। पुरा श्वो भुङ्क्ते। लड्भवति पूर्वविप्रतिषेधेन॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। अनद्यतने लुट् [१५] इत्यत्र यावत्पुरानिपातयोर्लडित्येतदनुवर्तिष्यते॥

**[विभाषा कदाकर्ह्योः॥३।३।५॥**
**किंवृत्ते लिप्सायाम्॥३।३।६॥]**
**लिप्स्यमानसिद्धौ च॥३।३।७॥**

किमर्थमिदमुच्यते न लिप्स्यमानसिद्धिरपि लिप्सैव तत्र किंवृत्ते लिप्सायाम् [६] इत्येव सिद्धम्। अकिंवृत्तार्थोऽयमारम्भः। यो भवतामोदनं ददाति स स्वर्गं लोकं गच्छति। यो भवतामोदनं दास्यति स स्वर्गं लोकं गमिष्यति॥

**[लोडर्थलक्षणे च॥३।३।८॥**
**लिङ्चोर्ध्वमौहूर्तिके॥३।३।९॥]**
**तुमुन्ण्वुलौ क्रियायां क्रियार्थायाम्॥३।३।१०॥**

---

विप्रतिषेधानें होतो. 'यावत्पुरानिपातयोर्लट्' या प्रकृत सूत्राला यावद्भुङ्क्ते, पुराभुङ्क्ते, येथें अवकाश आहे, श्वः कर्ता, श्वोऽध्येता, येथें लुटाला अवकाश आहे, आणि यावत् श्वो भुङ्क्ते, पुरा श्वो भुङ्क्ते, येथें दोघांचीही प्राप्ति येत आहे. तेव्हां त्यांमध्यें लट् पूर्वविप्रतिषेधानें होतो.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण अनद्यतने लुट् (३।३।१५) येथें 'यावत्पुरानिपातयोर्लट्' याची अनुवृत्ति आणून स्वतंत्र वाक्यार्थ करतां येईल.

(सू.७) हें सूत्र कशाकरितां केलें आहे? तें करावयास नको. कारण इच्छिलेला पदार्थ देण्यापासून कांहीं कार्य दाखविलें असतां तेथें तो पदार्थ मिळण्याची इच्छा त्याला असणारच. तेव्हां तेथें 'किंवृत्ते लिप्सायाम्' या पूर्वसूत्रानेंच लट्प्रत्यय सिद्ध होतो.

किंशब्दाच्या पुढें प्रत्यय लागून तयार झालेला शब्द उपपद असतांनाही लट्प्रत्यय होण्याकरितां हें सूत्र केलेलें आहे; उदा० यो भवतामोदनं ददाति स स्वर्गं लोकं गच्छति, यो भवतामोदनं दास्यति स स्वर्गं लोकं गमिष्यति.

---

१. कदा आणि कर्हि हीं उपपदें असतांना धातूहून भविष्यकालीं लट्प्रत्यय विकल्पानें होतो; उदा० कदा भुङ्क्ते, कदा भोक्ष्यते, कदा भोक्ता.

१. किंशब्दाच्या पुढें प्रत्यय लागून तयार झालेला शब्द उपपद असतांना धातूहून भविष्यकालीं लट्प्रत्यय विकल्पानें होतो, लिप्सा अर्थ गम्यमान असतांना; लिप्सा म्ह. मिळण्याची इच्छा; उदा० कतरो भिक्षां ददाति, कतरो भिक्षां दास्यति, कतरो भिक्षां दाता.

१. धातूहून भविष्यकालीं लट्प्रत्यय विकल्पानें होतो, इच्छिलेला पदार्थ देण्यापासून कांहीं कार्य दाखविलें असेल तर; उदा० यो भक्तं ददाति स स्वर्गं गच्छति, यो भक्तं दास्यति स स्वर्गं गमिष्यति, यो भक्तं दाता स स्वर्गं गन्ता.

१. विधि वगैरे लोट्प्रत्ययाचा जो अर्थ त्याचें चिन्ह अशी जी क्रिया तद्वाचक धातूहून भविष्यकाली लट्प्रत्यय विकल्पानें होतो; उदा० उपाध्यायश्चेदागच्छति अथ त्वं छन्दोऽधीष्व. आगच्छति येथें एकदा आगमिष्यति असा लट् होतो. अनद्यतनभविष्यकाल असेल तर एकदा लुट्ही होतो.

१. विधि वगैरे लोट्प्रत्ययाचा जो अर्थ त्याचें चिन्ह अशी जी क्रिया तद्वाचक धातूहून मुहूर्तानंतरच्या भविष्यकाली लिङ् आणि लट्प्रत्यय विकल्पानें होतात; उदा० ऊर्ध्वं मुहूर्तादुपाध्यायश्चेदागच्छेत् त्वं छन्दोऽधीष्व. येथें एकदा आगच्छति असा लट्ही होतो आणि एकदा आगमिष्यति असा लट्ही होतो व लुटाचा विषय असेल तर आगन्ता असा एकदा लुट्ही होतो.

१. एखादी क्रिया साधण्याकरितां तिचें साधन म्हणून तिच्याकरितां केली जाणारी जी दुसरी क्रिया तद्वाचक धातु उपपद असतांना त्या साध्य क्रियावाचक धातूहून भविष्यकालीं तुमुन् आणि ण्वुल्-

किमर्थं क्रियायामुपपदे क्रियार्थायां ण्वुल्विधीयते नाविशेषेण विहितो ण्वुल् स क्रियायामुपपदे क्रियार्थायामन्यत्र च भविष्यति । ण्वुलि सकर्मकग्रहणं चोदितमकर्मकार्थोऽयमारम्भः । आसको व्रजति । शायको व्रजतीति । प्रत्याख्यातं तत्र वा धातुमात्राद्दर्शनाण्ण्वुल इति ॥ एवं तर्हि तृजादिषु वर्तमानकालोपादानं चोदितमवर्तमानकालार्थोऽयमारम्भः । तदपि प्रत्याख्यातं न वा कालमात्रे दर्शनादन्येषामिति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । अकेनोर्भविष्यदाधमर्ण्ययोः [२.३.७०] इत्यत्र षष्ठ्याः प्रतिषेध उक्तः स यथा स्यात् । एतदपि नास्ति प्रयोजनम् । य एवासावविशेषविहितः स यदा भविष्यति भविष्यति तदास्य प्रतिषेधो भविष्यति ॥ एवं तर्हि भविष्यदधिकारविहितस्य प्रतिषेधो यथा स्यात् । इह मा भूत् । अङ्ग यजतां लप्स्यन्तेऽस्य याजकाः । य एनं याजयिष्यन्तीति । नैष भविष्यत्कालः ।

---

(सू.१०) क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना हा जो येथें ण्वुल्प्रत्यय सांगितला आहे तो कशाकरितां ? तो सांगावयास नको. कारण मोघम जो ण्वुल्प्रत्यय (३।१।१३३) सांगितला आहे तो क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांनाही होईल आणि नसतांनाही होईल.

पण तो ण्वुल्प्रत्यय सकर्मक धातूंहून होतो (३।१।१३३, वा.१) असें तेथें वार्तिककारांनीं म्हटलें आहे ना ? तेव्हां अकर्मक धातूंकरितां येथें सांगितला पाहिजे; उदा० आसको व्रजति, शायको व्रजति.

त्या वार्तिकाचें 'न वा धातुमात्राद्दर्शनाण्ण्वुलः' असें पुढील वार्तिकानें प्रत्याख्यान केलें आहे.

तर मग ते तृच् वगैरे प्रत्यय वर्तमानकालीं होतात (३।१।१३३, वा.३) असें सांगितलें आहे. तेव्हां वर्तमानकालाशिवाय इतर कालीं होण्याकरितां येथें ण्वुल्प्रत्यय सांगितला पाहिजे.

पण त्याचेही पुढें 'न वा कालमात्रे दर्शनादन्येषाम्' (३।१।१३३, वा.४) असें प्रत्याख्यान केलें आहे.

तर मग येथें ण्वुल्प्रत्यय सांगण्याचा उपयोग असा समजावा की भविष्यकालीं केलेल्या अकप्रत्ययाचा योग असतांना कर्मांहून षष्ठी होत नाहीं असा जो 'अकेनोर्भविष्यदाध०' (२।३।७०) या सूत्रानें षष्ठीचा निषेध सांगितला आहे तो झाला पाहिजे.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण मोघम जो ण्वुल्प्रत्यय सांगितला आहे तो जेव्हां भविष्यकालीं केला जाईल तेव्हां हा निषेध होईलच.

तर मग भविष्यति या अधिकारामध्यें सांगितलेल्या अधिकारामध्यें अकप्रत्ययाचा योग असतांना तो षष्ठीचा निषेध होतो असा त्याचा अर्थ आहे. तो निषेध होण्याकरितां येथें ण्वुल्प्रत्यय सांगितला पाहिजे. त्याचा तसा अर्थ घेण्याचें कारण हें की 'अङ्ग यजतां लप्स्यन्ते अस्य याजकाः य एनं याजयिष्यन्ति' (ह्या राजानें यज्ञ करावा; यज्ञ करविणारे ऋत्विज् याला मिळतील की जे याच्याकडून यजन करवितील), येथें 'अस्य' या पदामध्यें जी षष्ठी झाली आहे तिचा निषेध न झाला पाहिजे.[2]

पण येथें भविष्यकालच मुळीं नाहीं.

---

प्रत्यय होतात; उदा० भोक्तुं गच्छति, भोजको गच्छति.

२. पुढें यजन करविणारे असा याजकशब्दाचा अर्थ आहे. तेव्हां याजकशब्दामध्यें भविष्यकालीं ण्वुल्प्रत्यय केला आहे. पण तो भविष्यति या अधिकारांतील नव्हे. म्हणून षष्ठीचा निषेध होत नाहीं.

कस्तर्हि । भूतकालः । कथं तर्हि भविष्यत्कालता गम्यते । धातुसंबन्धे प्रत्ययाः [३.४.१] इति ॥ यस्तर्हि न धातुसंबन्धः । इमेऽस्य याजकाः । इमेऽस्य लावका इति । एषोऽपि भूतकालः । कथं तर्हि भविष्यत्कालता गम्यते । संबन्धात् । स च तावत्तैरयाजितो भवति तस्य च तावत्तैर्यवा अलूना भवन्त्युच्यते च ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । अयं क्रियायामुपपदे क्रियार्थायां तुमुन्विधीयते स विशेषविहितः सामान्यविहितं ण्वुलं बाधेत । एतदपि नास्ति प्रयोजनम् । भावे तुमुन्विधीयते कर्तरि ण्वुलतत्र कः प्रसङ्गो यद्भावे विहितस्तुमुन्कर्तरि विहितं ण्वुलं बाधेत ॥ लृट् तर्हि बाधेत । वासरूपेण ण्वुलपि भविष्यति ॥ अत उत्तरं पठति ।

---

मग कोणता काल येथें आहे ?

भूतकाल येथें आहे.

मग येथें भविष्यकाल आहे असें कसें वाटतें ?

धात्वर्थांचा तसा संबंध असतांना तसें प्रत्यय होत असतात (३।४।१) म्हणून तसें वाटतें.[३]

तर मग जेथें धात्वर्थांचा संबंध नाहीं तेथें कसें ? उदा० इमे अस्य याजकाः (हे याचे ऋत्विज् होत), इमे अस्य लावकाः (हे याचे शेत कापणारे लोक होत).

येथेंही याजकशब्दामध्यें भूतकालींच ण्वुल्प्रत्यय केला आहे.[४]

मग येथें भविष्यकालाची प्रतीति कशी होते ?

संबंधामुळें तशी प्रतीति होते. कारण तेथें संबंध पुढें होणार आहे. म्हणजे तोंपर्यंत त्या राजाकडून कांहीं त्यांनीं यजन करविलें नाहीं, तसेंच त्याचें शेत कांहीं तोंपर्यंत त्यांनीं कापलें नाहीं, अशा स्थितींत याजक, लावक, म्हणतात.[५]

तर मग आतां येथें ण्वुल्प्रत्यय सांगण्याचा असा उपयोग समजावा की येथें हा तुमुन्प्रत्यय क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना सांगितला आहे. तेव्हां तो विशेषविहित तुमुन्प्रत्यय सामान्यतः सांगितलेल्या ण्वुल्प्रत्ययाचा बाध करील, म्हणून मुद्दाम येथें तुमुन्प्रत्ययाबरोबर तो सांगितला आहे.

हा देखील उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण हा तुमुन्प्रत्यय भाव या अर्थी होणारा आहे, आणि ण्वुल्प्रत्यय कर्ता या अर्थी होत आहे. तेव्हां भाव या अर्थी होणारा हा तुमुन्प्रत्यय कर्ता या अर्थी होणाऱ्या ण्वुल्प्रत्ययाचा बाध करील हें कसें बरें घडूं शकेल ?

तर मग त्या मोघम सांगितलेल्या ण्वुल्प्रत्ययाचा भविष्यकालीं लृट्प्रत्यय बाध करील, म्हणून येथें पुनः ण्वुल्प्रत्यय मुद्दाम सांगावा लागत आहे.

पण लृट्प्रत्ययानें ण्वुल्प्रत्ययाचा बाध केला तरी वासरूपन्यायानें एकदा ण्वुल्प्रत्यय होईलच. हें सर्व मनांत आणून वार्तिककार

---

३. जसा वसन् ददर्श येथें वस्धातूहून लट्प्रत्यय भूतकालीं केला आहे असें वाटतें. कारण ददर्श येथें भूतकालीं लिट् केला आहे तसा येथें याजयिष्यन्ति हा लृट्प्रत्यय भविष्यकालीं केला असल्यामुळें याजकशब्दांतील ण्वुल्प्रत्यय भविष्यकालीं केला आहे असें वाटतें.

४. याजक, लावक, या शब्दांमध्यें स्वभावतःच भूतकालाचा बोध होतो. ज्यानें पूर्वी यजन केलें आहे त्यालाच याजक म्हणतात. तसेंच ज्यानें पूर्वी शेत कापण्याचें काम केलें आहे त्यालाच लावक म्हणतात.

५. म्हणून तेथें भविष्यकाल आहे असें वाटतें; पण वस्तुतः पूर्वी इतर ठिकाणीं यजन करविल्यामुळेंच त्यांना याजक असें तेथें म्हणतात. असेंच लावक येथें समजावें.

**ण्वुलः क्रियार्थोपपदस्य पुनर्विधानं तृजादिप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

ण्वुलः क्रियार्थोपपदस्य पुनर्विधानं क्रियते ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्यः क्रियायामुपपदे क्रियार्थायां वासरूपेण तृजादयो न भवन्तीति । ण्वुलपि तृजादिः ॥

**भाववचनाश्च ॥३।३।११॥**

किमर्थमिदमुच्यते नाविशेषेण भावे प्रत्यया ये विहितास्ते क्रियायामुपपदे क्रियार्थायामन्यत्र च भविष्यन्ति ।

**भाववचनानां यथाविहितानां प्रतिपदविध्यर्थम् ॥ १ ॥**

भाववचनानां यथाविहितानां प्रतिपदविध्यर्थोऽयमारम्भः । इदानीमेव ह्युक्तं क्रियायामुपपदे क्रियार्थायां वासरूपेण तृजादयो न भवन्तीति भाववचनाश्चापि तृजादयः ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति । यथाविहिता इति तु वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । इह याभ्यः प्रकृतिभ्यो येन विशेषेण भावे प्रत्यया विहितास्ताभ्यः प्रकृतिभ्यस्तेनैव विशेषेण क्रियायामुपपदे क्रियार्थायां यथा स्युर्व्यतिकरो मा भूदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इह भावे प्रत्यया भवन्तीतीयता सिद्धम् । सोऽयमेवं सिद्धे सति

---

म्हणतातः--

(वा.१) क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना विशेषविहित प्रत्ययानें सामान्यतः सांगितलेल्या तृच् वगैरे प्रत्ययांचा कायमचाच बाध होतो; तेथें वासरूपन्यायानें तृच् वगैरे प्रत्यय होत नाहींत. सामान्यतः सांगितलेला ण्वुल् हा तृच् वगैरेपैकींच आहे.

(सू.११) हें सूत्र कशाकरितां केलें आहे? तें करावयास नको. कारण भावे (३।३।१८) या अधिकारामध्यें मोघम सांगितलेले जे प्रत्यय ते क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांनाही होतील आणि नसतांनाही होतील. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतातः--

(वा.१) भाववाचक प्रत्यय ज्या ज्या धातूहून जसे जसे सांगितले त्या त्या धातूहून क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना तसे तसे झाले पाहिजेत, म्हणून हें सूत्र केलें आहे. कारण आतांच सांगितलें आहे की 'क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना सामान्यतः सांगितलेले तृच् वगैरे प्रत्यय अपवादाच्या विषयामध्यें वासरूपन्यायानें होत नाहींत आणि भावे या अधिकारामध्यें सांगितलेले प्रत्यय तृच् वगैरेपैकींच आहेत.

हा या सूत्राचा उपयोग आहे खरा, पण--

पण आणिक काय पाहिजे?

यथाविहिताः म्हणजे तेथें जसे सांगितले तसे येथें होतात असें म्हटलें पाहिजे.

याचा काय उपयोग?

याचा उपयोग असा की त्या भावे या अधिकारामध्यें ज्या विशेष धातूहून जें विशेष निमित्त धरून जे प्रत्यय सांगितले आहेत तेच प्रत्यय क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना त्याच धातूहून तेंच निमित्त असतांना झाले पाहिजेत; त्यामध्यें घोटाळा होऊं नये.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. येथें भावे एवढेंच म्हटलें असतां क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना भावे सांगितलेले प्रत्यय होतील. अशा रीतीनें सिद्ध होत असतांना

---

१. भावे (३।३।१८) या अधिकारामध्यें ज्या धातूहून जे निमित्त धरून जो प्रत्यय सांगितला आहे त्याच धातूहून तेंच निमित्त असतांना तोच प्रत्यय क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना भविष्यकालीं होतो; उदा० पाकाय व्रजति.

यद्वचनग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनं वाचका यथा स्युरिति । यदि च याभ्यः प्रकृतिभ्यो येन विशेषेण भावे प्रत्यया विहितास्ताभ्यः प्रकृतिभ्यस्तेन विशेषेण क्रियायामुपपदे क्रियार्थायां भवन्ति ततोऽमी वाचकाः कृताः स्युः । अथ हि प्रकृतिमात्राद्वा स्युः प्रत्ययमात्रं वा स्यान्नामी वाचकाः कृताः स्युः ॥

## अण्कर्मणि च ॥३ । ३ । १२॥

किमर्थमिदमुच्यते नाविशेषेण कर्मण्यण्विहितः स क्रियायामुपपदे क्रियार्थायामन्यत्र च भविष्यति ।

### अणः पुनर्वचनमपवादविषयेऽनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥

अणः पुनर्वचनं क्रियतेऽपवादविषयेऽनिवृत्तिर्यथा स्यात् । गोदायो व्रजति । कम्बलदायो व्रजतीति ॥ किमुच्यतेऽपवादविषयेऽनिवृत्तिर्यथा स्यादिति न पुनरुत्सर्गविषये प्रतिपदविध्यर्थं स्यात् । इदानीमेव ह्युक्तं क्रियायामुपपदे क्रियार्थायां वासरूपेण तृजादयो न भवन्तीत्यण्चापि तृजादिः ॥ एवं तर्ह्युभयमनेन क्रियतेऽपवादविषये चानिवृत्तिरुत्सर्गविषये च प्रतिपदविधानम् । कथं पुनरे-

आचार्यांनीं जो प्रकृत सूत्रामध्यें वचनशब्द अधिक घातला आहे त्याचा उपयोग असा की क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना भावे सांगितलेले प्रत्यय होतात एवढाच अर्थ येथें नाहीं तर ते प्रत्यय भाव या अर्थाचे वाचक झाले पाहिजेत. भावे या अधिकारामध्यें ज्या विशेष धातूंहून जें विशेष निमित्त धरून जे प्रत्यय सांगितले ते जर त्याच धातूंहून तेंच निमित्त असतांना फक्त क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना जर केले तरच ते प्रयोगामध्यें भाववाचक होतील. आतां जर भावे या अधिकारामध्यें सांगितलेल्या प्रत्ययांपैकीं वाटेल तो प्रत्यय वाटेल त्या धातूहून केला तर त्या प्रयोगापासून भाव या अर्थाचा बोध होत नाहीं.

(सू. १२) हें सूत्र कशाकरितां केलें आहे? तें करावयास नको. कर्मण्यण् (३।२।१) या सूत्रानें कर्मवाचक उपपद असतांना मोघम अण्प्रत्यय सांगितलाच आहे, तो क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांनाही होईल आणि नसतांनाही होईल.

(वा. १) येथें अण्प्रत्यय पुनः मुद्दाम एवढ्याकरितां सांगितला आहे की त्या अप्रत्ययाचे जे अक वगैरे (३।२।३) अपवादप्रत्यय त्यांच्या विषयामध्येंही जर क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असेल तर अण्प्रत्ययाची निवृत्ति न झाली पाहिजे; उदा० गोदायो व्रजति, कम्बलदायो व्रजति.

पण अपवादाच्या विषयामध्यें अपवादाची निवृत्ति न झाली पाहिजे एवढाच ह्या सूत्राचा उपयोग काय सांगतां? तर त्या सामान्यतः सांगितलेल्या अण्प्रत्ययाच्या स्वतःच्या विषयामध्येंही अण्प्रत्ययाचें विधान करण्याकरितां हें सूत्र उपयोगीं पडेल. कारण आतांच सांगितलें आहे की क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना सामान्यतः सांगितलेले तृच् वगैरे प्रत्यय अपवादाच्या विषयामध्यें वासरूपन्यायानें होत नाहींत, आणि कर्मण्यण् (३।२।१) यानें सांगितलेला अण्प्रत्यय तर तृच् वगैरे प्रत्ययांपैकींच आहे.

तर मग प्रकृत सूत्रानें दोन्ही गोष्टी केल्या जातात. एक अपवादाच्या विषयामध्यें अण्प्रत्ययाची निवृत्ति न होणें आणि दुसरी गोष्ट ही की त्याच्या स्वतःच्या विषयामध्यें त्याचें

१. कर्मवाचक उपपद असतांना धातूहून कर्ता या अर्थीं भविष्यकालीं अण्प्रत्यय होतो, क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना; उदा० काण्डं लुनातीति काण्डलावो व्रजति.

केन यत्नेनोभयं लभ्यम् । लभ्यमित्याह । कथम् । कर्मग्रहणसामर्थ्यात् । कथं पुनरन्तरेण कर्मग्रहणं कर्मण्यण्लभ्यः । वचनग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति । अपर्यायेणेति तु वक्तव्यम् । कदाचिद्धि कर्मणि स्यात्कदाचित्क्रियायामुपपदे क्रियार्थायामिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । चेन संनियोगः करिष्यते । अण्कर्मणि च । किं चान्यत् । क्रियायां चोपपदे क्रियार्थायामिति । एवमपि प्रत्येकमुपपदसंज्ञा न प्राप्नोति । चेनैव संनियोगः करिष्यते प्रत्येकं च वाक्यपरिसमाप्तिर्दृष्टेति प्रत्येकमुपपदसंज्ञा भविष्यति ॥

**लृट् शेषे च ॥ ३ । ३ । १३ ॥**

शेषवचनं किमर्थम् ।

**लृटि शेषवचनं क्रियायां प्रतिपदविध्यर्थम् ॥ १ ॥**

लृटि शेषवचनं क्रियते क्रियायां प्रतिपदविध्यर्थम् । प्रतिपदविधिर्यथा स्यात् ॥

---

पुन्हा विधान करणें.

पण ह्या दोन्ही गोष्टी एका प्रयत्नानें कशा बरें साधतील ?

साधतील असें म्हणतों.

तें कसें ?

असें की कर्मग्रहणाच्या जोरावर दोन्ही गोष्टी साधतील.

पण कर्मग्रहण केलें नाहीं तर 'कर्मवाचक उपपद असतांना' हा अर्थ कसा होईल ?

वचनग्रहणाची अनुवृत्ति[२] केली असतां तें काम भागेल.

असा या सूत्राचा उपयोग आहे खरा, पण—

पण आतां आणखी काय पाहिजे आहे ?

'अपर्यायेण' म्हणजे दोन्ही प्रकारचीं उपपदें एकदम असतांना असें येथें म्हटलें पाहिजे. नाहीं तर कर्मवाचक उपपद आणि क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद यांपैकीं पाळीपाळीनें कदाचित् कर्मवाचक उपपद असतांना होईल आणि कदाचित् क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना होईल.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण सूत्रांतील चशब्दानें दोन्ही उपपदांचा समुच्चय होईल. तो असा की 'अण्प्रत्यय होतो, कर्मवाचक उपपद असतांना, आणखी' असा अर्थ अण् कर्मणि च एवढ्याचा होतो. तेव्हां तेथें आणखी तें काय अशी आकांक्षा उत्पन्न झाली असतां मागून चालू असलेलें क्रियार्थक क्रियावाचक धातु हें उपपद घेतां येईल.

पण असा समुच्चय केला तर प्रत्येकाला उपपदसंज्ञा होणार नाहीं.

उपपदसंज्ञांचाही समुच्चय चशब्दानेंच करावयाचा, परंतु 'वाक्याची पूर्णता प्रत्येकाचे ठिकाणीं झालेली दृष्टीस पडते' या न्यायानें उपपदसंज्ञा प्रत्येकाला होईल.

(सू.१३) ह्या सूत्रामध्यें शेषशब्द कशाकरितां घातला आहे ?

(वा.१) ह्या लृट्प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें शेषशब्द घातला आहे तो क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना तेथें प्रतिपदोक्त लृटाचें विधान करण्याकरितां घातला आहे.

---

२. वचनग्रहणाची अनुवृत्ति केली असतां तो अण्प्रत्यय आपल्या अर्थाचा वाचक झाला असला पाहिजे, असा अर्थ होतो. आणि हा अण्प्रत्यय कर्मवाचक उपपद असतांनाच आपल्या अर्थाचा वाचक होतो, म्हणून कर्मवाचक उपपद असतांना होणार नाहीं; तेव्हां कर्मग्रहण व्यर्थ होऊन स्वतंत्र निराळा वाक्यार्थ होईल. तेव्हां मूळ वाक्यार्थानें एक आणि या निराळ्या वाक्यार्थानें दुसरी, अशा दोन्ही गोष्टी साधतील.

१. ज्या ठिकाणीं लट् होण्याकरितां शेषग्रहण करावयाचें त्या शेषग्रहणानें उलट लट्प्रत्यय तेथून दूर केला जातो.

**अविशेषेण विधाने लृटोऽभावः प्रतिषिद्धत्वात् ॥ २ ॥**

अविशेषेण हि विधाने सति लृटोऽभावः स्यात् । करिष्यामीति व्रजति । हरिष्यामीति व्रजतीति । किं कारणम् । प्रतिषिद्धत्वात् । इदानीमेव ह्युक्तं क्रियायामुपपदे क्रियार्थायां वासरूपेण तृजादयो न भवन्तीति लृट्चापि तृजादिः ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति । साधीयस्तु खलु शेषग्रहणेन क्रियार्थोपपदाल्लृण्निर्भज्यते । किं कारणम् । अक्रियार्थोपपदत्वात् । शेष इत्युच्यते शेषश्च कः । यदन्यत्क्रियायाः क्रियार्थायाः ॥ एवं तर्हि लृटि शेषवचनं क्रियायां प्रतिपदविध्यर्थम् । लृटि शेषवचनं क्रियते क्रियायां प्रतिपदविधिर्यथा स्यात् । लृट् शेषे च । करिष्यति हरिष्यतीति । क्व च । क्रियायामुपपदे क्रियार्थायामिति ॥ स तर्हि चकारः कर्तव्यः । न कर्तव्यः । इह लृड्भवतीतीयता सिद्धम् । सोऽयमेवं सिद्धे सति यच्छेषग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनं योगाङ्गं यथोपजायेत । सति च योगाङ्गे योगविभागः करिष्यते । लृड्भवति क्रियायामुपपदे क्रियार्थायामिति । ततः

---

(वा. २) लृट्प्रत्ययाचें मोघम विधान केलें तर क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना जरी तेथें लृट्प्रत्यय प्राप्त होतो तरी तो होणार नाहीं; उदा० करिष्यामीति व्रजति.

काय बरें कारण ?

कारण असें की तेथें त्याचा प्रतिषेध होत आहे. आतांच सांगितलें आहे की क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना सामान्यतः सांगितलेले तृजादिप्रत्यय अपवादाच्या विषयामध्यें वासरूपन्यायानें होत नाहींत आणि हा लृट्प्रत्यय तृच्प्रत्ययासारखाच आहे.

हा शेषग्रहणाचा उपयोग आहे खरा, पण–

पण काय, त्यामध्यें कांहीं वांधा आहे काय ?

वांधा असा आहे की ज्या ठिकाणीं क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद असतांना लृट्प्रत्यय होण्याकरितां शेषग्रहण करावयाचें तें उलट त्या शेषग्रहणानें त्या उदाहरणांतून लृट्प्रत्यय अगदीं बरोबर हाकलून मात्र दिला जातो.

असें होण्याचें कारण काय ?

क्रियार्थक क्रियावाचक उपपद नसेल अशा उदाहरणाकरिता तें होत आहे. असें पहा की येथें शेषे असें म्हटलें आहे आणि शेष म्हणजे काय तर पूर्वी सांगितलें असेल त्याहून निराळें, म्हणजे क्रियार्थक क्रियावाचक उपपदाहून निराळें.

तर मग 'लृटि शेषवचनं क्रियायां प्रतिपदविध्यर्थम्' या वार्तिकाचा अभिप्राय असा समजावा की ह्या सूत्रामध्यें जें शेषग्रहण केलें आहे तें क्रियार्थक क्रियावाचक उपपद असतांना प्रतिपदोक्त लृट्प्रत्ययाचें विधान झालें पाहिजे. तें असें:– क्रियार्थक क्रियावाचक उपपद नसतांना लृट् होतो; उदा० करिष्यति, हरिष्यति; चशब्दावरून इतर ठिकाणींही होतो.

इतर ठिकाणीं तें कोठें ?

क्रियार्थक क्रियावाचक उपपद असतांना.

तर मग त्याकरितां सूत्रामध्यें चशब्द घातला पाहिजे.

घालावयास नको.

तो कसा ?

असा की येथें 'लृट्' एवढ्याच सूत्रानें काम भागतें असें असतांही जें शेषग्रहण केलें आहे त्याचा उपयोग असा की शेषे हा सूत्रांतील भाग समजला गेला पाहिजे, आणि तसा तो सूत्रांतील भाग समजला म्हणजे योगविभाग करितां येतो. लृट् एवढेंच पहिलें सूत्र होय. क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद

शेषे । शेषे च लृङ्भवतीति ॥

**लृटः सद्वा ॥ ३ । ३ । १४ ॥**

**सद्विधिर्नित्यमप्रथमासमानाधिकरणे ॥ १ ॥**

सद्विधिरप्रथमासमानाधिकरणे नित्यमिति वक्तव्यम् । पक्ष्यन्तं पश्य । पक्ष्यमाणं पश्य ॥ क तर्हीदानीं विभाषा । प्रथमासमानाधिकरणे । पक्ष्यन् पक्ष्यति । पक्ष्यमाणः पक्ष्यते ॥

**अनद्यतने लुट् ॥ ३ । ३ । १५ ॥**

योगविभागः कर्तव्यः । अनद्यतने लृटः सत्संज्ञौ भवतः । श्वोऽग्नीनाधास्यमानेन । श्वः सोमेन यक्ष्यमाणेन । ततो लुट् । लुड्भवत्यनद्यतने । श्वः कर्ता । श्वोऽध्येता । केन विहितस्यानद्यतने लटः सत्संज्ञावुच्येते । एतदेव ज्ञापयति भवत्यनद्यतने लडिति यदयमनद्यतने लटः सत्संज्ञौ शास्ति । एवं च कृत्वा सोऽप्यदोषो भवति यदुक्तं भविष्यतीत्यनद्यतन उपसंख्यानमिति ॥

**परिदेवने श्वस्तनी भविष्यन्त्यर्थे ॥१॥**

परिदेवने श्वस्तनी भविष्यन्त्या अर्थ इति वक्तव्यम् । इयं नु कदा गन्ता यैवं पादौ निदधाति । अयं नु कदाध्येता य

---

असतांना धातूहून भविष्यकालीं लृट्प्रत्यय होतो. त्याच्यापुढें शेषे हें दुसरें सूत्र होय. क्रियार्थक क्रियावाचक धातु उपपद नसतांनाही धातूहून भविष्यकालीं लृट्प्रत्यय होतो असा त्याचा अर्थ होय.

(सू.१४, वा.१) प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य नसेल त्या ठिकाणीं हे सत् म्ह. शतृशानच् आदेश लृटाचे स्थानीं नित्य होतात असें म्हणावें; उदा० पक्ष्यन्तं पश्य, पक्ष्यमाणं पश्य.

तर मग विकल्प कोठें करावयाचा ?

प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असेल तेथें विकल्प होतो; उदा० पक्ष्यन् पक्ष्यति; पक्ष्यमाणः पक्ष्यते.

(सू.१५) येथें योगविभाग करावा. 'अनद्यतने' एवढेंच प्रथमसूत्र होय. अनद्यतनभविष्यकालीं लृटाचे स्थानीं शतृशानच् आदेश होतात असा त्याचा अर्थ होय; उदा० श्वोऽग्नीनाधास्यमानेन, श्वः सोमेन यक्ष्यमाणेन. त्याच्यापुढें लुट् हें दुसरें सूत्र होतें. अनद्यतनभविष्यकालीं धातूहून लुट्प्रत्यय होतो असा त्याचा अर्थ होतो; उदा० श्वः कर्ता, श्वोऽध्येता.

पण या पहिल्या सूत्रानें जे अनद्यतनभविष्यकालीं लृट्प्रत्ययाला शतृशानच् आदेश सांगितले तेथें लृट्प्रत्यय कशानें करावा ?

ज्या अर्थी अनद्यतनभविष्यकालीं लृट्प्रत्ययाला शतृशानच् आदेश सांगितले आहेत त्या अर्थी तेथें पूर्वी लृट्प्रत्यय होतो असें ज्ञापन होतें. आणि असें हें ज्ञापन केलें म्हणजे तोही दोष राहत नाहीं की ज्याकरितां 'भविष्यतीत्यनद्यतन-उपसंख्यानम्' (३।३।३,वा.१) असें वार्तिक वार्तिककारांनीं म्हटलें आहे.

(वा.१) परिदेवन म्हणजे विलाप गम्यमान असतांना लृट्प्रत्ययाच्या अर्थी लुट्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०— इयं नु कदा[2] गन्ता यैवं पादौ निदधाति (जी ही अशी येथें पाय खोवीत आहे ती जाणार तरी केव्हां ?); अयं नु कदाऽध्येता य एवमनभियुक्तः (जो हा असा उडाणटप्पूपणा करतो तो अध्ययन तरी

---

१. लृटाचे स्थानीं शतृशानच् हे आदेश विकल्पानें होतात.

१. धातूहून अनद्यतन भविष्यकालाची विवक्षा असतांना लुट्प्रत्यय होतो; उदा० श्वः कर्ता.

२. केव्हां जाईल यामध्यें अद्यतनकालाचाही संभव असल्यामुळें अनद्यतनकालाची विवक्षा आहे असें म्हणतां येत नाहीं, म्हणून हें वार्तिक केलें आहे.

एवमनभियुक्त इति ॥

**कालप्रकर्षात्तूपमानम् ॥ २ ॥**

कालप्रकर्षात्तूपमानं भविष्यति। गन्तेवेयं गन्ता। नेयं गमिष्यति। अध्येतेवायमध्येता। नायमध्येष्यते ॥ न वै तिङन्तेनोपमानमस्ति। एवं तर्ह्यनद्यतन इवानद्यतन इति ॥

**पदरुजविशस्पृशो घञ् ।३।३।१६।**

**स्पृश उपतापे ॥ १ ॥**

स्पृश उपताप इति वक्तव्यम्। इह मा भूत्। कम्बलस्पर्श इति ॥

**सृ स्थिरे ॥ ३ । ३ । १७ ॥**

व्याधिमत्स्यबलेष्विति वक्तव्यम्। अतीसारो व्याधिः। विसारो मत्स्यः। बले। शालसारः खदिरसारः ॥

**भावे ॥ ३ । ३ । १८ ॥**

**भावे सर्वलिङ्गो निर्देशः ॥१॥**

भावे सर्वलिङ्गो निर्देशः कर्तव्यः। भूतौ भवने भाव इति। किं प्रयोजनम्। सर्वलिङ्गे भाव एते प्रत्यया यथा स्युरिति। किं पुनः कारणं न सिध्यति। पुँल्लिङ्गेनायं निर्देशः क्रियत एकवचनान्तेन च तेन

---

करणार केव्हां ?).

(वा.२) ज्या ठिकाणीं कालाधिक्याचा संभव आहे त्या ठिकाणीं अद्यतनकालही अनद्यतनकालासारखा समजला जातो;[3] उदा० गन्तेवेयं गन्ता नेयं गमिष्यति (ही आज जाणारी जरी असेल तरी उद्यां जाणारीसारखीच आहे; आजही जाईल असें वाटत नाहीं); अध्येता इवायमध्येता नायमध्येष्यते (आज जरी हा अध्ययन करावयाला बसेल तरी उद्यां अध्ययन करणाऱ्यासारखाच हा आहे; आज हा अध्ययन करील असें वाटत नाहीं).

पण क्रियापदानें उपमा दाखविली जात नाहीं ना ?

तर मग अनद्यतमकालाची उपमा अद्यतनकालाला द्यावी म्हणजे झालें.[4]

(सू.१६, वा.१) रोग हा अर्थ गम्यमान असताना स्पृश्‌धातूहून घञ्प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण कम्बलस्पर्शः[2] येथें घञ्प्रत्यय न झाला पाहिजे.

(सू.१७) व्याधि, मत्स्य आणि बल हे अर्थ गम्यमान असतांना हा घञ्प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० अतीसारः व्याधिः, विसारः मत्स्यविशेषः, सारः बलम्, शालसारः, खदिरसारः.

(सू.१८) हा जो एकटा येथें पुंल्लिंगी भावशब्दानें निर्देश केला आहे तसा स्त्रीलिंगी भूतिशब्दानें आणि नपुंसकलिंगी भवन्‌शब्दानें असा सर्व लिंगांनीं निर्देश केला पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा की सर्व लिंगांमध्यें धात्वर्थी हे प्रत्यय झाले पाहिजेत.

पण भावे असें म्हटलें आहे तेवढ्यानें सर्व लिंगांमध्यें प्रत्यय होणार नाहींत याचें काय बरें कारण ?

कारण असें की येथें भावे हा पुंलिंगी एकवचनी निर्देश आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं

---

३. तेव्हां पूर्वींचें वार्तिक करावयास नको.

४. प्रकृत सूत्रामध्यें अनद्यतनपदानें गौण अनद्यतनकालही घेतला जातो.

१. पद्, रुज्, विश् आणि स्पृश् या धातूंहून कर्ता या अर्थी कालसामान्य असतांना घञ्प्रत्यय होतो; उदा० पद्यते इति पादः, रुजतीति रोगः, वेशः, स्पर्शः.

२. स्पृशतीति स्पर्शः येथें अच्प्रत्यय(३।१।१३४)च झाला आहे. त्यामुळें स्पर्श हा शब्द येथें अन्तोदात्त होतो.

१. लवकर नाश न पावणारा कर्ता असेल तर त्या अर्थी सृधातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० सारः, बलम्,

१. धातूहून भाव या अर्थी घञ्प्रत्यय होतो; उदा० पाकः, त्यागः.

पुँल्लिङ्ग एव भाव एकवचने चैते प्रत्ययाः स्युः स्त्रीनपुंसकयोर्द्विवचनबहुवचनयोश्च न स्युः॥ नात्र निर्देशस्तन्त्रम्। कथं पुनस्तेनैव च नाम निर्देशः क्रियते तच्चातन्त्रं स्यात्। तत्कारी च भवांस्तद्द्वेषी च। नान्तरीयकत्वादत्र पुँल्लिङ्गेन निर्देशः क्रियत एकवचनेन च। अवश्यं कयाचिद्विभक्त्या केनचिच्च लिङ्गेन निर्देशः कर्तव्यः। तद्यथा। कश्चिदन्नार्थी शालिकलापं सतुषं सपलालमाहरति नान्तरीयकत्वात्। स यावदादेयं तावदादाय तुषपलालान्युत्सृजति। तथा कश्चिन्मांसार्थी मत्स्यान्सशकलान्सकण्टकानाहरति नान्तरीयकत्वात्। स यावदादेयं तावदादाय शकलकण्टकान्युत्सृजति। एवमिहापि नान्तरीयकत्वात्पुँल्लिङ्गेन निर्देशः क्रियत एकवचनान्तेन च। न ह्यत्र निर्देशस्तन्त्रम्। कयाचिद्विभक्त्या केनचिच्च लिङ्गेन निर्देशः कर्तव्यः॥ अथवा कृभ्वस्तयः क्रियासामान्यवाचिनः क्रियाविशेषवाचिनः पचादयः। यच्चात्र पचतेर्भवतिर्भवति न तद्भवतेः पचतिर्भवति। यच्च भवतेः पचतिर्भवति न तत्पचतेर्भवतिर्भवति। किं च पचतेर्भवतिर्भवति। सामान्यम्। किं च भवतेः पचतिर्भवति। विशेषः। तद्यथा। उपाध्यायस्य शिष्यो मातुलस्य

---

पुंलिंगी एकवचनाची विवक्षा असेल तेथेंच धातूच्या अर्थी हे प्रत्यय होतील, स्त्रीलिंगी आणि नपुंसकलिंगी होणार नाहींत. तसेंच पुंलिंगीसुद्धां द्विवचनी आणि बहुवचनी होणार नाहींत.

पण येथें पुंलिंग आणि एकवचन यांची विवक्षा सूत्रकार करीत नाहींत.

भावे हा निर्देश सूत्रकारांनींच केला आहे ना? मग त्यांच्याच मतीं त्याची अविवक्षा कशी बरें होईल? असें असेल तर जें तूं करतोस त्याचाच तूं द्वेष करतोस असें नाहीं का होत?

सूत्रकारांनीं जो येथें पुंलिंगी एकवचनी निर्देश केला आहे तो नाइलाज म्हणून केला आहे; तो कांहीं मुद्दाम केलेला नव्हे. कारण कोणताही शब्द उच्चारावयाचा म्हणजे त्याला कोणतीतरी विभक्ति लावलीच पाहिजे व कोणतें तरी लिंग तेथें असलेंच पाहिजे जसें अन्नाची इच्छा करणारा कोणी मनुष्य कोंड्यासकट, भुसासकट, भाताची राशि नाइलाजास्तव आणतो, पण पुढें त्यांतील जेवढा ग्राह्य भाग तेवढा घेऊन बाकी साल कांटे फेकून देतो, तसें येथेंही सूत्रकारांनीं नाइलाजास्तव भावे असा पुंलिंगी एकवचनी निर्देश केला आहे; पण तो त्यांनाच विवक्षित नाहीं. कारण येथें निर्देश विवक्षित आहे असें म्हणतां येत नाहीं. कोणत्या तरी विभक्तीनें आणि कोणत्या तरी लिंगानें निर्देश केला पाहिजे म्हणूनच तो तसा केला आहे.[2]

अथवा कृ, भू, अस्, हे धातु सामान्यक्रियावाचक आहेत आणि पच् वगैरे धातु हे विशेषक्रियावाचक आहेत. असें पहा की भवतिक्रिया ही पचिक्रियेची जी जशी होते तशी कांहीं उलट पचिक्रिया ही भवतिक्रियेची होत नाहीं. तसेंच तेथें पचिक्रिया ही भवतिक्रियेची जी जशी होते तशी कांहीं उलट भवतिक्रिया ही पचिक्रियेची होत नाहीं.

भवतिक्रिया ही पचिक्रियेची कोण बरें होते?

सामान्य होते.

पचिक्रिया ही भवतिक्रियेची कोण बरें होते?

विशेष होते. लोकांमध्येंही असें दृष्टीस

---

२. तात्पर्य, पाक, पक्ति, पचन, या शब्दभेदामुळें पचिक्रियेमध्यें जरी औपाधिकभेद भासला तरी त्या सर्व ठिकाणीं भवतिक्रिया हें सामान्य सारखेंच आहे. त्या दृष्टीनें सूत्रकारांनीं भवतिक्रिया या

भागिनेयं गत्वाह । उपाध्यायं भवानभिवादयतामिति । स गत्वा मातुलमभिवादयते । तथा मातुलस्य भागिनेय उपाध्यायस्य शिष्यं गत्वाह । मातुलं भवानभिवादयतामिति । स गत्वोपाध्यायमभिवादयते । एवमिहापि पचतेर्भवतौ यत्तन्निर्दिश्यते ॥

## [1]अकर्तरि च कारके संज्ञायाम् ॥ ३ । ३ । १९ ॥

कारकग्रहणं किमर्थम् ।

**कारकग्रहणमनादेशे स्वार्थविज्ञानात् ॥ १ ॥**

कारकग्रहणं क्रियतेऽनादेशे स्वार्थविज्ञानात् । अनिर्दिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे भवन्तीति । तद्यथा । गुप्तिज्किद्भ्यः सन् [३.१.५] यावादिभ्यः कन् [५.४.२९] इति । एवमिमेऽपि प्रत्ययाः स्वार्थे स्युः । स्वार्थे मा भूवन्कारके यथा स्युरित्येवमर्थमिदमुच्यते ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । विहितः प्रत्ययः स्वार्थे । भावे घञिति ॥ तेनातिप्रसक्तमिति कृत्वा नियमोऽयं विज्ञायेत । अकर्तरि संज्ञायामेवेति । अस्ति चेदानीं कश्चित्संज्ञाभूतो भावो यदर्थो विधिः स्यात् । अस्तीत्याह । आवाहः विवाह इति ॥ कैमर्थक्यान्नियमो भवति ।

---

पडतें की कोणी एक उपाध्यायाचा शिष्य, तो उपाध्याय ज्याचा मामा आहे अशा त्याच्या भाच्याकडे जाऊन त्याला म्हणतो की अरे, उपाध्यायाला नमस्कार कर. तें ऐकून तो भाचा मामाकडे जाऊन त्याला नमस्कार करतो किंवा तो त्या मामाचा भाचा त्या उपाध्यायाच्या शिष्याकडे जाऊन त्याला सांगतो की अरे, मामाला नमस्कार कर. तें ऐकून तो शिष्य उपाध्यायाकडे जाऊन त्याला नमस्कार करतो. तसेंच येथेंही भवतिक्रियेमध्यें पचिक्रियेचें जें काय सामान्य म्हणून आहे त्या दृष्टीनें सूत्रकारांनीं भावे असा निर्देश केला आहे.[3]

(सू.१९) येथें कारके असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा.१) कारकग्रहण अशाकरितां केलें आहे की जर तें केलें नाहीं तर स्वार्थी प्रत्यय होऊं लागेल. कारण ज्या ठिकाणीं प्रत्ययाच्या अर्थाचा निर्देश केला नसेल तेथें तो प्रत्यय स्वार्थी होतो अशी परिभाषा आहे; जसें:– 'गुप्तिज्किद्भ्यः सन्' (३।१।५), यावादिभ्यः कन् (५।४।२९), या सूत्रांनीं सांगितलेले प्रत्यय स्वार्थी होतात. तसें येथेंही सांगितलेले प्रत्यय स्वार्थी होऊं लागतील. तेव्हां ते स्वार्थी होऊं नयेत तर कारक या अर्थी झाले पाहिजेत म्हणून येथें कारके असें म्हटलें आहे.

कारके याचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण स्वार्थी घञ्प्रत्यय 'भावे' या सूत्रानें सांगितलाच आहे.

पण त्यानें संज्ञा नसतांनाही होईल म्हणून नियमार्थ 'अकर्तरि च' हें सूत्र होईल. तो नियम असा की पूर्व सूत्रानें भावे घञ्प्रत्यय करणें झाल्यास संज्ञा असतांनाच तो होतो.

पण ज्यामध्यें भावे घञ्प्रत्यय केला आहे असा एखादा तरी संज्ञाशब्द[1] आहे काय ?

होय आहे. आवाह[2], विवाह, हे शब्द तसे होत.

पण विधेय कांहींच नसल्यामुळें सूत्र व्यर्थ झालें तर तें नियमार्थ समजलें जातें आणि

---

अर्थाचा येथें भावशब्द उच्चारला आहे.

३. उपाध्यायाचा शिष्य त्या भाच्याला सांगतांना त्याचा मामा हा आपला उपाध्याय होत असल्यामुळें उपाध्यायाला असा शब्द वापरतो, तसा येथें सूत्रकारांनीं भाव हा सामान्यदर्शक शब्द वापरला आहे.

१. कार्याहून भिन्न कर्म वगैरे जें कारक त्या अर्थी धातूहून घञ्प्रत्यय होतो; एकंदर तो शब्द कोणाची तरी संज्ञा असली पाहिजे. प्रास्यन्ति एनमिति प्रासः, आहरन्ति रसमस्मात् इति आहारः.

२. आवाह म्हणजे वरानें वधूला आपल्या घरीं

**विधेयं नास्तीति कृत्वा । इह चास्ति विधेयम् । किम् । अकर्तरि च कारके संज्ञायां घञ्विधेयः । तत्रापूर्वो विधिरस्तु नियमोऽस्त्वित्यपूर्व एव विधिर्भविष्यति न नियमः ॥ तदेव तर्हि प्रयोजनं स्वार्थे मा भूवन्निति । ननु चोक्तं विहितः प्रत्ययः स्वार्थे भावे घञितीति । अन्यः स भावो बाह्यः प्रकृत्यर्थात् । अनेनेदानीमाभ्यन्तरे भावे स्यात् । कः पुनरेतयोर्भावयोर्विशेषः । उक्तो भावभेदो भाष्ये ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः । नञ्युक्तमिवयुक्तं चान्यस्मिंस्तत्सदृशे कार्यं विज्ञायते तथा ह्यर्थो गम्यते । तद्यथा । अब्राह्मणमानयेत्युक्ते ब्राह्मणसदृशं पुरुषमानयति नासौ लोष्टमानीय कृती भवति । एवमिहाप्यकर्तरीति कर्तृप्रतिषेधादन्यस्मिन्नकर्तरि कर्तृसदृशे कार्यं विज्ञास्यते । किं चान्यदकर्तृ कर्तृसदृशम् । कारकम् ॥ उत्तरार्थं तर्हि कारकग्रहणं कर्तव्यम् । परिमाणाख्यायां सर्वेभ्यः [२०] कारके यथा स्यात् । इह मा भूत् । एका तिलोच्छ्रितिः । द्वे सृती इति । घञनुक्रमणमजब्विषयेऽवचने हि स्त्रीप्रत्ययानामप्यपवादविज्ञानमिति**

येथें तर विधेय आहे.

तें कोणतें ?

संज्ञाशब्दामध्यें कर्तृभिन्नकारक या अर्थी घञ्प्रत्यय येथें नवीन सांगतां येतो. तेव्हां असा हा अपूर्वविधि समजावा किंवा नियम मानावा असा विचार उत्पन्न झाला असतां तेथें अपूर्वविधि मानणेंच योग्य होय. नियम मानणें योग्य[3] नव्हे.

तर मग कारके याचा उपयोग ह्या सूत्रानें स्वार्थी घञ्प्रत्यय होऊं नये हाच ठरतो.

पण स्वार्थी घञ्प्रत्यय 'भावे' या पूर्वसूत्रानेंच सिद्ध आहे असें आतांच सांगितलें आहे ना ?

सांगितलें आहे खरें, पण तो बाह्यभाव स्वार्थभावापेक्षां निराळा आहे आणि प्रकृत सूत्रानें आंतरभाव या अर्थी घञ्प्रत्यय होणार आहे.

पण ह्या आंतर आणि बाह्य अशा दोन प्रकारच्या भावांमध्यें फरक तरी काय आहे ?

ह्या दोन भावांमध्यें फरक मागें (३।१।६७ भा.) आम्हीं भाष्यामध्यें दाखविलाच आहे.

पण हाही कारके याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः' म्हणजे नञानें किंवा इवशब्दानें युक्त असा जो शब्द तो आपल्या अर्थाहून भिन्न आणि आपल्या अर्थासारख्या अशाच पदार्थाला दाखवितो. कारण लोकांमध्यें त्यापासून तसाच अर्थ मनांत येतो. असें पहा की अब्राह्मणमानय म्ह. ब्राह्मणभिन्नाला आण असें सांगितलें असतां तेथें ब्राह्मणाहून निराळा पण ब्राह्मणासारखा क्षत्रिय वगैरे कोणीतरी मनुष्यच आणिला जातो. एखाद्यानें अब्राह्मण म्हणून तेथें ढेंकूळ आणलें तर त्याला कोणी शाहणा म्हणत नाहीं. त्याप्रमाणें येथेंही अकर्तरि असा कर्ता या अर्थाचा निषेध केला म्हणून कर्त्याहून भिन्न पण कर्त्यासारखा असाच अर्थ मनांत येईल.

आतां कर्त्याहून भिन्न पण कर्त्यासारखें असें काय बरें आहे ?

इतर कारकच तसें आहे.

तर मग पुढें अनुवृत्ति होण्याकरितां येथें कारके असें म्हटलें पाहिजे. 'परिमाणाख्यायां सर्वेभ्यः' या पुढील सूत्रानें कारक या अर्थीच घञ्प्रत्यय झाला पाहिजे. एका तिलोच्छ्रितिः, द्वे सृती, येथें भाव या अर्थी घञ्प्रत्यय होऊं नये. तेव्हां 'घञनुक्रमणमजब्विषये, अवचने

आणण (वरात)

३. कारण नियमामध्यें प्राप्त गोष्टीचा बाध होतो हें गौरव होतें.

४. कर्म, करण, वगैरे इतर कारकें या अर्थी घञ्प्रत्यय होणें हा उपयोग.

वक्ष्यति तन्न वक्तव्यं भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अत्राप्यकर्तरीत्येवानुवर्तिष्यते ॥

**संज्ञाग्रहणानर्थक्यं च सर्वत्र घञो दर्शनात् ॥ २ ॥**

संज्ञाग्रहणं चानर्थकम् । किं कारणम् । सर्वत्र घञो दर्शनात् । असंज्ञायामपि हि घञ्दृश्यते । को भवता दायो दत्तः । को भवता लाभो लब्ध इति ॥ यदि संज्ञाग्रहणं न क्रियतेऽतिप्रसङ्गो भवति । कृतः कट इत्यत्र कारः कट इति प्राप्नोति ।

**अतिप्रसङ्ग इति चेदभिधानलक्षणत्वात्प्रत्ययस्य सिद्धम् ॥३॥**

अतिप्रसङ्ग इति चेत्तन्न । किं कारणम् । अभिधानलक्षणत्वात्प्रत्ययस्य सिद्धम् । अभिधानलक्षणाः कृत्तद्धितसमासाः । अनभिधानान्न भविष्यन्ति ॥

**परिमाणाख्यायां सर्वेभ्यः ॥३।३।२०**

सर्वग्रहणं किमर्थम् । सर्वेभ्यो धातुभ्यो घञ्यथा स्यात् । अजपोरपि विषये । एकस्तण्डुलनिश्चायः । द्वौ शूर्पनिष्पावौ ॥

**सर्वग्रहणमनर्थकं परिमाणाख्यायामिति सिद्धत्वात् ॥ १ ॥**

सर्वग्रहणमनर्थकम् । किं कारणम् ।

---

हि स्त्रीप्रत्ययानामप्यपवादविज्ञानम्' (वा.२३), असें जें पुढील सूत्रावर वार्तिककारांनीं म्हटलं आहे तें म्हणावयास नको.

हाही कारके याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण येथून अकर्तरि या पदाची अनुवृत्ति तेथें आहेच.[5]

(वा.२) ह्या सूत्रामध्यें संज्ञायाम् असें जें म्हटलें आहे तें निरर्थक आहे.

काय कारण ?

कारण असें की संज्ञा नसतांनाही घञ्प्रत्यय केलेला दृष्टीस पडतो; उदा० को भवता लाभो लब्धः; को भवता दायो दत्तः.

पण जर संज्ञायाम् असें म्हटलें नाहीं तर कृतः कटः या अर्थी कृधातूहून कर्म या अर्थी घञ्प्रत्यय होऊन कारः कटः असें होऊं लागेल.

(वा.३) असा दोष येतो असें म्हणणें असेल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें की कृत्प्रत्यय, तद्धितप्रत्यय आणि समास हे जसा प्रयोग असेल त्या मानानें होतात. तेव्हां कार या शब्दापासून कृत या अर्थाचें अभिधान होत नसल्यामुळें कृधातूहून कर्म या अर्थी घञ्प्रत्यय होणार नाहीं.

(सू २०) येथें सर्वेभ्यः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

परिमाण अर्थ असतांना सर्वच धातूंहून घञ्प्रत्यय झाला पाहिजे. तेव्हां घञ्प्रत्ययाचे अपवाद जे अच् (३।३।५५) आणि अप् (३।३।५७) हे प्रत्यय त्यांच्याही विषयांमध्यें हा घञ्प्रत्ययच परिमाण अर्थ असतांना झाला पाहिजे; उदा० एकस्तण्डुलनिश्चायः, द्वौ शूर्पनिष्पावौ.

(वा.१) ह्या सूत्रामध्यें सर्वग्रहण करावयास नको. 'परिमाणाख्यायाम्' एवढ्या सूत्रानेंच अच्, अप्, या अपवादाच्या विषयांमध्येंही घञ्प्रत्यय सिद्ध होत आहे.[2] तेव्हां सर्व-

---

५. तेव्हां कर्तृभिन्न असें म्हटलें असतां अर्थात् कारकच येईल.

१. परिमाण अर्थ गम्यमान असेल तर सर्वच धातूंहून कर्तृभिन्न कारक किंवा भाव या अर्थी घञ्प्रत्यय होतो. अकर्तरि कारके आणि भाव यांची अनुवृत्ति कृत्यल्युटो बहुलम् (३।३।११३) या सूत्रापर्यंत आहे; उदा० एकस्तण्डुलनिश्चायः, द्वौ शूर्पनिष्पावौ. निश्चाय म्हणजे भोत, निष्पाव म्हणजे कणिंग

२. परिमाणाख्यायाम् याची उदाहरणें पूर्वसूत्रानेंच सिद्ध होत असल्यामुळें तें व्यर्थ होतें. तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तव अपवादाच्या विषयामध्येंही घञ्प्रत्यय होईल, म्हणून त्याकरितां सर्वेभ्यः असें

परिमाणाख्यायामिति सिद्धत्वात् । परिमाणाख्यायामित्येव घञ्सिद्धोऽजपोरपि विषये नार्थः सर्वग्रहणेन ॥ अस्त्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । एकः पाकः द्वौ पाकौ त्रयः पाका इति । पूर्वेणाप्येतत्सिद्धम् । न सिध्यति । संज्ञायामिति पूर्वो योगो न चैषा संज्ञा । प्रत्याख्यायते संज्ञाग्रहणम् । अथापि क्रियते । एवमपि न दोषः। अजपावपि संज्ञायामेव। यथाजातीयक उत्सर्गस्तथाजातीयकेनापवादेनापि भवितव्यम्॥ उत्तरार्थं तर्हि। इङश्च [२१] सर्वेभ्योऽपि यथा स्यात् । ननु चायमिङेक एव। वण्टरण्डाकल्पः सर्वेषु साधनेषु यथा स्यात्। उपेत्याधीयते तस्मादुपाध्यायः । अधीयते तस्मिन्नध्यायः । अध्यायन्यायोद्यावसंहाराधारावायाश्च [३.३.१२२] इत्येतन्निपातनं न कर्तव्यं भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । क्रियते न्यास एव ॥ उत्तरार्थमेव तर्हि वक्तव्यम् । कर्मव्यतिहारे णच्स्त्रियाम् [४३] इति सर्वेभ्यो यथा स्यात्। एतदपि नास्ति प्रयोजनम् । वक्ष्यत्येतत्कर्मव्यति-

---

ग्रहणाचा उपयोग नाहीं.

पण परिमाणाख्यायां याचा उपयोग दुसरीकडे आहे.

तो कोणता ?

एकः पाकः, द्वौ पाकौ, त्रयः पाकाः.[३]

येथें देखील पूर्वसूत्रानेंच घञ् होईल.

पूर्वसूत्रानें येथें घञ्प्रत्यय होणार नाहीं. कारण येथें संज्ञायाम् असें म्हटलें आहे, आणि पाकः येथें तर संज्ञा नाहीं.

पण पूर्वसूत्रांतील संज्ञायाम् हें पद नकोच आहे (वा.२); त्याचें प्रत्याख्यानच केलें आहे.

आतां जरी संज्ञायाम् असें तेथें असलें तरी दोष नाहीं. कारण अच्, अप् , हे अपवाद ही संज्ञा असतांना होणारे आहेत; कारण जसें सामान्य शास्त्र तसेंच विशेष शास्त्र असलें पाहिजे.[४]

तर मग येथें सर्वग्रहण पुढें अनुवृत्त होण्याकरितां केलें आहे असें समजावें. तें असें की 'इङश्च' यानें सांगितलेला घञ्प्रत्यय सर्वत्र होतो.

पण काय हो, तेथें इङ्धातु वण्ट, रण्डा,[५] यांप्रमाणें एकटाच उच्चारला आहे ना ?

सर्वेभ्यः याचा अर्थ सर्व धातूंहून असा नव्हे, तर सर्व प्रकारचीं उदाहरणें साधण्याकरितां कर्म, करण, वगैरे सर्व कारकें या अर्थी इङ्धातूहून घञ्प्रत्यय झाला पाहिजे; उदा० उपेत्य अधीयते अस्मात् इति उपाध्यायः, अधीयते अस्मिन्नित्यध्यायः; अध्यायन्यायोद्यावसंहारावायाश्च (३।३।१२२) येथें अध्याय हें निपातन करावयास नको.

हाही सर्वशब्दाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं, कारण अध्यायशब्दाचें निपातन केलेंच आहे.

तर मग पुढें अनुवृत्तीकरितांच येथें सर्वग्रहण केलें आहे. 'कर्मव्यतिहारे णच् स्त्रियाम्' (३।३।४२) यानें सांगितलेला णच्प्रत्यय सर्व धातूंहून झाला पाहिजे.[६]

हाही सर्वशब्दाचा उपयोग बरोबर दिसत

---

म्हणावयास नको.

३. पाकः येथें पच्धातूहून कर्म या अर्थी घञ्प्रत्यय झाला आहे. पाक म्ह. पक. हा एक शिजलेल्या भाताचा ढीग आहे असा अर्थ आहे. तेव्हां येथें परिमाण म्हणजे इयत्ता गम्यमान होत आहे. संज्ञा नसल्यामुळें पूर्वसूत्रानें सिद्धि नाहीं असा अभिप्राय आहे.

४. तेव्हां अर्थातच संज्ञा नसतांना अच्, अप्, या अपवादप्रत्ययांच्या बाधाकरितां सर्वग्रहण करावयास नको.

५. वण्ट म्ह. विधुर, किंवा रण्डा म्ह. विधुर. हे जसे एकटेच असतात त्याप्रमाणें.

६. बाधकप्रत्ययाचाही बाध करून णच्प्रत्यय झाला पाहिजे.

हारे स्त्रीग्रहणं व्यतिपाकार्थं पृथग्ग्रहणं बाधकबाधनार्थं व्यावचोरीव्यावचर्च्यर्थं तत्र व्यतीक्षादिषु दोषः सिद्धं तु प्रकृते स्त्रीग्रहणे णञ्ग्रहणं णिञ्ग्रहणं चेति ॥ उत्तरार्थमेव तर्हि। अभिविधौ भाव इनुण् [४४] सर्वेभ्यो यथा स्यात्। सांराविणम्। एतदपि नास्ति प्रयोजनम्। वक्ष्यत्येतदभिविधौ भावग्रहणं नपुंसके क्तादिनिवृत्त्यर्थं पृथग्ग्रहणं बाधकबाधनार्थं न तु ल्युट इति ॥ इदं तर्हि प्रयोजनं प्रकृत्याश्रयो योऽपवादस्तस्य बाधनं यथा स्यादर्थाश्रयो योऽपवादस्तस्य बाधनं मा भूदिति। एका तिलोच्छ्रितिः। द्वे सृती इति ॥ घञनुक्रमणमजब्विषयेऽवचने हि स्त्रीप्रत्ययानामप्यपवादविज्ञानमिति चोदयिष्यति तन्न वक्तव्यं भवति ॥

**घञनुक्रमणमजब्विषये ॥ २ ॥**

घञनुक्रमणमजब्विषय इति वक्तव्यम् ॥

**अवचने हि स्त्रीप्रत्ययानामप्यपवादविज्ञानम् ॥ ३ ॥**

अनुच्यमाने ह्येतस्मिन्स्त्रीप्रत्ययानामप्यपवादोऽयं विज्ञायेत। एका तिलोच्छ्रितिः। द्वे सृती इति ॥

**दारजारौ कर्तरि णिलुक् च ॥ ४॥**

दारजारौ कर्तरि वक्तव्यौ। णिलुक् च वक्तव्यः। दारयन्तीति दाराः। जरयन्तीति जाराः ॥

**करणे वा ॥ ५ ॥**

करणे वा वक्तव्यौ। दीर्यते तैर्दाराः।

---

नाहीं. कारण तेथें वार्तिककार सांगणारच आहेत:'कर्मव्यतिहारे स्त्रीग्रहणं व्यतिपाकार्थम्', 'पृथग्ग्रहणं बाधकबाधनार्थम्,' 'व्यावचोरी व्यावचर्च्यर्थम्', 'तत्र व्यतीक्षादिषु दोषः', 'सिद्धं तु प्रकृते स्त्रीग्रहणे णञ्ग्रहणं णिञ्ग्रहणं च' (३।३।४३, वा.१ ५).

तर मग त्याच्यापुढें अनुवृत्तीकरितांच येथें सर्वग्रहण केलें आहे. 'अभिविधौ भाव इनुण्' (३।३।४४) यानें सांगितलेला इनुण्प्रत्यय सर्वधातूंहून झाला पाहिजे; उदा० सांराविणम्.

हाही सर्वशब्दाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण तेथें वार्तिककार सांगणारच आहेत: 'अभिविधौ भावग्रहणं नपुंसके क्तादिनिवृत्त्यर्थम्', 'पृथग्ग्रहणं बाधकबाधनार्थम्', 'न तु ल्युटः' (३।३।४४, वा.१-३).

तर मग आतां सर्वेभ्यः याचा येथेंच उपयोग असा की विशेष धातु उच्चारून सांगितलेला जो अपवादप्रत्यय त्याचा बाध[७] ह्या घञानें होतो. विशेष अर्थ उच्चारून सांगितलेला जो अपवादप्रत्यय त्याचा बाध न झाला पाहिजे; उदा० एका तिलोच्छ्रितिः,[८] द्वे सृती. तेव्हां येथेंच पुढें 'घञनुक्रमणमजब्विषये' 'अवचने हि स्त्रीप्रत्ययानामप्यपवादविज्ञानम्' असें जें वार्तिककार सांगणार आहेत तें सांगावयास नको.

(वा.२) अच् आणि अप् याच अपवादांच्या विषयांमध्यें घञ्प्रत्यय होतो असें म्हणावें.

(वा.३) तसें न म्हणतां सामर्थ्यात् अपवादांचाही हा घञ्प्रत्यय बाध करतो असें घेतलें तर स्त्रीप्रत्यय जो क्तिन् (३।३।९४) वगैरे त्यांचाही हा घञ बाध करील; उदा० एका तिलोच्छ्रितिः, द्वे सृती.

(वा.४) णिप्रत्ययान्त दॄ आणि जॄ या धातूंहून कर्ता या अर्थी घञ्प्रत्यय होतो आणि णिप्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें; उदा० दारयन्तीति दाराः, जारयन्तीति जाराः.

(वा.५) णिप्रत्ययान्त दॄ आणि जॄ या

---

७. सर्वेभ्यः असा पंचमीनिर्देश केला आहे, म्हणून सर्व धातूंहून असाच त्याचा अर्थ होतो.

८. उच्छ्रिति, सृति, हे शब्द विशेष परिमाणाचे बोधक आहेत, तरी पण प्रकृतसूत्रानें येथें क्तिन्प्रत्य-

जीर्यन्ति तैर्जाराः ॥

**इङश्च ॥ ३ । ३ । २१ ॥**

**इङश्चेत्यपादाने स्त्रियामुपसंख्यानं तदन्ताच्च वा ङीष् ॥ १ ॥**

इङश्चेत्यत्रापादाने स्त्रियामुपसंख्यानं कर्तव्यं तदन्ताच्च वा ङीष्वक्तव्यः । उपेत्याधीयते तस्या उपाध्यायी उपाध्याया ॥

**शॄ वायुवर्णनिवृतेषु ॥ २ ॥**

शॄ इत्येतस्माद्वायुवर्णनिवृतेषु घञ्वक्तव्यः । शारो वायुः । शारो वर्णः । गौरिवाकृतनीशारः प्रायेण शिशिरे कृशः ॥

**[उपसर्गे रुवः ॥ ३ । ३ । २२ ॥**

**समियुद्रुदुवः ॥ ३ । ३ । २३ ॥**

**श्रिणीभुवोऽनुपसर्गे ॥ ३।३।२४॥**

**वौ क्षुश्रुवः ॥ ३ । ३ । २५ ॥**

**अवो दोर्नियः ॥ ३ । ३ । २६ ॥**

**प्रे द्रुस्तुस्रुवः ॥ ३ । ३ । २७ ॥**

**निरभ्योः पूल्वोः ॥ ३ । ३ । २८ ॥**

**उन्न्योर्ग्रः ॥ ३ । ३ । २९ ॥**

**कॄ धान्ये ॥ ३ । ३ । ३० ॥**

**यज्ञे समि स्तुवः ॥ ३ । ३ । ३१ ॥**

**प्रे स्त्रोऽयज्ञे ॥ ३ । ३ । ३२ ॥**

**प्रथने वावशब्दे ॥ ३ । ३ । ३३ ॥**

**छन्दो नाम्नि च ॥ ३ । ३ । ३४ ॥**

---

धातूहून करण या अर्थी घञ्प्रत्यय होतो असे म्हणावें; उदा० दीर्यते यैः ते दाराः, जीर्यन्ति यैः ते जाराः.

(सू.२१, वा.१) इङ्धातूहून अपादान या अर्थी घञ्प्रत्यय होतो, स्त्रीत्व विवक्षा असतांना, आणि त्या घञ्प्रत्ययान्ताहून ङीष्प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हणावें; उदा० उपेत्य अधीयते अस्याः सकाशात् इति उपाध्यायी, उपाध्याया.

(वा २) शॄधातूहून घञ्प्रत्यय होतो, वायु, वर्ण किंवा निवृत (अंगवस्त्र) हे अर्थ गम्यमान असतांना, असें म्हणावें; उदा० शारो वायुः, शारो वर्णः, गौरिवाकृतनीशारः प्रायेण शिशिरे कृशः.

---

याचा बाध करून घञ्प्रत्यय होत नाहीं.

१. इङ्धातूहून घञ्प्रत्यय होतो. उपेत्य अधीते अस्मादित्युपाध्यायः. येथून पुढें इकारान्त धातूहून सांगितलेल्या घञ्प्रत्ययानें अच्-(३।३।५६)प्रत्ययाचा बाध होतो.

१. (२२) उपसर्ग उपपद असतांना रुधातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० संरावः, उपरावः.

(२३) सम्उपसर्ग उपपद नसतांना यु, द्रु आणि दु या धातूंहून घञ्प्रत्यय होतो; उदा० संयावः, संद्रावः. संदावः.

(२४) श्रि, नी, आणि भू या धातूंहून उपसर्ग नसतांना घञ्प्रत्यय होतो; उदा० श्रायः, नायः, भावः.

(२५) विउपसर्ग उपपद असतांना क्षु आणि श्रु या धातूंहून घञ्प्रत्यय होतो; उदा० विक्षावः, विश्रावः.

(२६) अव किंवा उत् हे उपसर्ग उपपद असतांना नीधातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० अवनायः, उन्नायः.

(२७) प्रउपसर्ग उपपद असतांना द्रु, स्तु आणि स्रु, या धातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० प्रद्रावः, प्रस्तावः, प्रस्रावः.

(२८) निस्उपसर्ग उपपद असतांना पूधातूहून आणि अभिउपसर्ग उपपद असतांना लूधातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० निष्पावः, अभिलावः.

(२९) उत् किंवा नि हे उपसर्ग उपपद असतांना गॄधातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० उद्गारः, निगारः.

(३०) उत् किंवा नि हे उपसर्ग उपपद असतांना कॄधातूहून घञ्प्रत्यय होतो;, परंतु धातूचा अर्थ जी क्रिया ती धान्यसंबंधीं असली पाहिजे; उदा० उत्कारः धान्यस्य, निकारः धान्यस्य, येथें पसरणें हा धातूचा अर्थ आहे.

(३१) यज्ञासंबंधीं प्रयोगामध्यें सम्उपसर्ग उपपद असतांना स्तुधातूहून घञ्प्रत्यय होतो;उदा० संस्तावः. यज्ञांतील सामगायन करणाऱ्याच्या प्रदेशाला संस्ताव म्हणतात.

(३२) यज्ञाशिवाय इतर ठिकाणीं प्रउपसर्ग उपपद असतांना स्तॄधातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० शंखस्य प्रस्तारः.

(३३) विउपसर्ग उपपद असतांना स्तॄधातूहून प्रथन या अर्थी घञ्प्रत्यय होतो, परंतु तें प्रथन म्ह. विस्तार शब्दासंबंधीं नसावें; उदा० पटस्य विस्तारः,

(३४) वृत्तविशेषदर्शक संज्ञाशब्दामध्यें विउपसर्ग-

**उदि ग्रहः ॥ ३ । ३ । ३५ ॥]**

**समि मुष्टौ ॥ ३ । ३ । ३६ ॥**

**समि मुष्टावित्यनर्थकं वचनं परिमाणाख्यायामिति सिद्धत्वात् ॥१॥**

समि मुष्टावित्येतद्वचनमनर्थकम् । किं कारणम् । परिमाणाख्यायामिति सिद्धत्वात् । परिमाणाख्यायामित्येव सिद्धम् ॥

**अपरिमाणार्थं तु ॥ २ ॥**

अपरिमाणार्थोऽयमारम्भः । मल्लस्य संग्राहः । मुष्टिकस्य संग्राह इति ॥

**उद्ग्राभनिग्राभौ च च्छन्दसि स्रुगुद्यमननिपातनयोः ॥ ३ ॥**

उद्ग्राभः निग्राभ इतीमौ शब्दौ छन्दसि वक्तव्यौ स्रुगुद्यमननिपातनयोरर्थयोः । उद्ग्राभं च निग्राभं च ब्रह्म देवा अवीवृधन् ॥

**[परिन्योर्नीणोर्द्यूताभ्रेषयोः ॥ ३ । ३ । ३७ ॥**

**परावनुपात्यय इणः ॥३।३।३८॥**

**व्युपयोः शेतेः पर्याये ॥३।३।३९॥**

**हस्तादाने चेरस्तेये ॥ ३।३।४० ॥**

**निवासचितिशरीरोपसमाधानेष्वादेश्च कः ॥ ३ । ३ । ४१ ॥**

**संघे चानौत्तराधर्ये ॥३।३।४२॥]**

---

(वा.१) समि मुष्टौ हें सूत्र करावयास नको. काय कारण ?

कारण असें की परिमाणाख्यायां सर्वेभ्यः (३।३।२०) यानेंच सिद्ध होत आहे.

(वा.२) परिमाण गम्यमान नसल्यामुळें त्या ठिकाणीं घञ्प्रत्यय होण्याकरितां हें सूत्र केलें आहे; उदा० मल्लस्य संग्राहः, मुष्टिकस्य संग्राहः.

(वा.३) वेदामध्यें उद्ग्राभ आणि निग्राभ या दोन शब्दांचें निपातन करावें. क्रमानें त्या शब्दांचे स्रुचा वर घेणें, स्रुचा खालीं करणें, हे असले अर्थ पाहिजेत. उद्ग्राभं च

---

पूर्वक स्तृधातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० विष्टारपङ्क्तिश्छन्दः.

(३५) उत्उपसर्ग उपपद असतांना ग्रह्धातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० उद्ग्राहः . हा घञ् अप्(३६।३।५८)प्रत्ययाचा अपवाद आहे.

१. समूउपसर्ग उपपद असतांना ग्रह्धातूहून घञ्प्रत्यय होतो; उदा० मल्लस्य संग्राहः. संग्राह म्ह. मुष्टिबंध. 'मुष्टीनें धरली जाणारी ढालतरवार वगैरेंची मूठ' असाही संग्राहशब्दाचा अर्थ आहे.

२. मुष्टि म्ह. मिटलेलीं पांच बोटें; ह्यांनीं नियमित परिमाणाचा कांहींच बोध नाही.

१. (३७) परिउपसर्ग उपपद असतांना नीधातूहून घञ्प्रत्यय होतो, त्या क्रियेचा द्यूताशीं संबंध गम्यमान असतांना; तसेंच निउपसर्ग उपपद असतांना इण्धातूहून घञ्प्रत्यय होतो, अभ्रेष गम्यमान असतांना. अभ्रेष म्ह. भ्रेष नसणें, योग्य आचरण करणें. उदा० परिणायेन शारान् हन्ति, एषोऽन्यायः. परिणाय म्हणजे समन्तान्नयन.

(३८) परिउपसर्ग उपपद असतांना इण्धातूहून घञ्प्रत्यय होतो, क्रमानें प्राप्त झालेल्या गोष्टीचा अतिक्रम न करणें हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० तव पर्यायः (तुझी पाळी).

(३९) वि आणि उप हे उपसर्ग उपपद असतांना शीधातूहून घञ्प्रत्यय होतो, पर्याय गम्यमान असतांना; उदा० तव विशायः, तव राजोपशायः.

(४०) चिधातूहून घञ्प्रत्यय होतो,हातानें पदार्थ घेणें हा अर्थ गम्यमान असतांना; चौर्याचा संबंध मात्र नसला पाहिजे; उदा० पुष्पप्रचायः, फलप्रचायः.

(४१) निवास,चिति, शरीर किंवा राशीकरण हे अर्थ गम्यमान असतांना चिधातूहून घञ्प्रत्यय होतो, आणि धातूच्या चकाराला ककार होतो; उदा० निकायः, आकायमग्नीश्चिन्वीत कायः. महागोमयनिकायः.

(४२) संघ अर्थ गम्यमान असतांना चिधातूहून घञ्प्रत्यय होतो आणि धातूच्या चकाराला ककार होतो, पण कांही पुढें, कांहीं त्याच्या मागें, असा क्रम त्यांमध्यें नसावा; उदा० ब्राह्मणनिकायः.

**कर्मव्यतिहारे णच्स्त्रियाम्**
**॥ ३ । ३ । ४३ ॥**

स्त्रीग्रहणं किमर्थम् ।

**कर्मव्यतिहारे स्त्रीग्रहणं व्यतिपाकार्थम् ॥ १ ॥**

कर्मव्यतिहारे स्त्रीग्रहणं क्रियते व्यतिपाकार्थम् । इह मा भूत् । व्यतिपाको वर्तते ॥ अथ किमर्थं पृथग्ग्रहणम् ।

**पृथग्ग्रहणं बाधकबाधनार्थम् ॥२॥**

पृथग्ग्रहणं क्रियते बाधकबाधनार्थम् । ये तस्य बाधकास्तद्बाधनार्थम् ॥ किं प्रयोजनम् ।

**व्यावचोरीव्यावचर्च्यर्थम् ॥३॥**

व्यावचोरी वर्तते । व्यावचर्ची वर्तते ॥

**तत्र व्यतीक्षादिषु दोषः ॥४॥**

तत्र व्यतीक्षादिषु दोषो भवति । व्यतीक्षा वर्तते । व्यतीहा वर्तते ॥

**सिद्धं तु प्रकृते स्त्रीग्रहणे णज्ग्रहणं णिज्ग्रहणं च ॥५॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रकृत एव स्त्रीग्रहणेऽयं योगः कर्तव्यः । स्त्रियां क्तिन् । ततः कर्मव्यतिहारे णच् । ततो णिचः ॥

**अभिविधौ भाव इनुण् ॥३।३।४४॥**

---

निग्राभं च ब्रह्मदेवा अवीवृधन्.

(सू.४३) येथें स्त्रियाम् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा.१) प्रकृत सूत्रामध्यें जें स्त्रियाम् असें म्हटलें आहे तें व्यतिपाक वगैरे शब्दांकरितां म्हटलें आहे. व्यतिपाक या पुंल्लिंगी शब्दामध्यें क्रियाविनिमय असतांनाही णच्प्रत्यय न झाला पाहिजे.

आतां हा णच्प्रत्यय येथें निराळा कशाकरितां सांगितला आहे ?

(वा.२) स्त्रियां क्तिन् (३।३।९४) या अधिकारामध्यें हा णच्प्रत्यय न सांगतां येथें निराळा जो सांगितला आहे तो बाधकप्रत्ययाचाही बाध करण्याकरितां, म्ह. त्या क्तिन्प्रत्ययाचे जे बाधक युच् वगैरे प्रत्यय (३।३।१०७) त्यांचा बाध करून हा णच्प्रत्ययच तेथें व्हावा, याकरितां सांगितला आहे.

याचा काय उपयोग ?

(वा.३) व्यावचोरी, व्यावचर्ची, येथें चोरि, चर्चि, या णिच्प्रत्ययान्त धातूंहून क्तिन्प्रत्ययाचा बाध करून युच्प्रत्यय प्राप्त होतो, तो न होतां णच्प्रत्ययच झाला पाहिजे; उदा० व्यावचोरी वर्तते, व्यावचर्ची वर्तते.

(वा.४) ह्या णच्प्रत्ययानें क्तिन्प्रत्ययाच्या बाधक प्रत्ययांचा बाध होईल तर व्यतीक्षा वगैरे शब्दांमध्यें दोष येतो; उदा० व्यतीक्षा वर्तते, व्यतीहा वर्तते.

(वा.५) हें सर्व सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें की 'स्त्रियां क्तिन्' येथून स्त्रीग्रहण चालू असतांना हें णच्प्रत्यय सांगणारें सूत्र करावें. तें असें:—'स्त्रियां क्तिन्' याच्यापुढें 'कर्मव्यतिहारे णच्' असें सूत्र करून पुढें 'णिचः' असें सूत्र करावें.

(सू.४४) ह्या सूत्रामध्यें भावे असें कशाहोऊं लागेल.

---

१ क्रियाविनिमय गम्यमान असतांना धातूहून भावे णच्प्रत्यय होतो; तो शब्द पुढें स्त्रीलिंगी चालतो; उदा० व्यावक्रोशी (एकमेकाला आव्हान करणें). णच्प्रत्ययानंतर स्वार्थी अञ् तद्धितप्रत्यय(५।४।१४), त्याच्या पुढें ङीप्-(४।१।१५)प्रत्यय झाला आहे.

२. येथें क्तिन्प्रत्ययाचा बाध करून अप्रत्यय (३।३।१०२) होत असतो, त्याचा ह्या णच्प्रत्ययानें बाध

३. क्रियाविनिमय असतांना णिच्प्रत्ययान्त धातूहून णच्प्रत्यय होतो, असा या सूत्राचा अर्थ होय. युच्प्रत्ययाचा बाध करण्याकरितां हें सूत्र केलें आहे.

१. अभिव्याप्ति गम्यमान असतांना धातूहून भावे इनुण्प्रत्यय होतो; उदा० सांराविणम्. येथें

भावग्रहणं किमर्थम् ।

**अभिविधौ भावग्रहणं नपुंसके क्तादिनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

अभिविधौ भावग्रहणं क्रियते । नपुंसके क्तादिनिवृत्त्यर्थम् । नपुंसकलिङ्गे भावे क्तादयो मा भूवन्निति ॥ अथ किमर्थं पृथग्ग्रहणम् ।

**पृथग्ग्रहणं बाधकबाधनार्थम् ॥ २ ॥**

पृथग्ग्रहणं क्रियते । बाधकबाधनार्थम् । ये तस्य बाधकास्तद्बाधनार्थम् ॥

**न तु ल्युटः ॥ ३ ॥**

ल्युटो बाधनं नेष्यते । संकूटनमित्येव भवति ॥

**[आक्रोशेऽवन्योर्ग्रहः ॥३।३।४५ ॥**

**प्रे लिप्सायाम् ॥ ३ । ३ । ४६ ॥**

**परौ यज्ञे ॥ ३ । ३ । ४७ ॥ ॥**

**नौ वृ धान्ये ॥ ३ । ३ । ४८ ॥**

**उदि श्रयतियौतिपूद्रुवः ॥ ३ । ३ । ४९ ॥**

**विभाषाङि रुप्लुवोः ॥ ३ । ३ । ५० ॥**

**अवे ग्रहो वर्षप्रतिबन्धे ॥३।३।५१॥**

**प्रे वणिजाम् ॥ ३ । ३ । ५२ ॥**

**रश्मौ च ॥ ३ । ३ । ५३ ॥**

---

करितां म्हटलें आहे ?

(वा. १) प्रकृत सूत्रामध्यें जें भावे असें म्हटलें आहे तें नपुंसकलिंगीं सांगितलेले क्त (३।३।११४) वगैरे प्रत्यय होऊं नयेत म्हणून म्हटलें आहे.

आतां हा इनुण् प्रत्यय निराळा येथें कशाकरितां सांगितला आहे ?

(वा. २) हा येथें इनुण् प्रत्यय निराळा अशाकरितां सांगितला आहे कीं ह्याच्या विषयामध्येंच वासरूपन्यायाच्या जोरावर ह्याला एकदां मागें सारून घञ्, क्त, वगैरे प्रत्यय होतील ते न व्हावेत.

(वा. ३) ल्यूट् प्रत्ययाचा मात्र बाध होत नाहीं. तेव्हां संकूटनम् असें होतेंच.

---

हा इनुण् प्रत्यय केल्यानंतर पुढें स्वार्थी तद्धित अण् प्रत्यय (५।४।१५) झाला आहे.

२. 'अकर्तरि कारके' याच्या निवृत्तीकरितां भावग्रहण केलें आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण पूर्वसूत्रामध्येंच त्याची निवृत्ति झाली आहे. णच् वगैरे प्रत्यय कारक या अर्थी केलेले कोठेंही दिसत नाहीत. तेव्हां अनभिधानास्तव होणार नाहींत.

३. नपुंसके भावे क्तः (३।३।११४) या प्रकरणांतच हें सूत्र करावें असा अभिप्राय आहे.

४. ह्या इनुण् प्रत्ययाच्या विषयामध्येंच एकदां वासरूपन्यायानें ल्युट् प्रत्यय (३।३।११५) होतो.

१. (४५) अव किंवा नि हे उपसर्ग उपपद असतांना ग्रह् धातूहून भावे घञ् प्रत्यय होतो, आक्रोश अर्थ गम्यमान असतांना; उदा० अवग्राहो हन्त ते वृषल भूयात्, निग्राहो हन्त ते वृषल भूयात्.

(४६) प्र हा उपसर्ग उपपद असतांना ग्रह् धातूहून भावे घञ् प्रत्यय होतो, लाभाची इच्छा गम्यमान असतांना; उदा० पात्रप्रग्राहेण चरति भिक्षुः.

(४७) परि उपसर्ग उपपद असतांना ग्रह् धातूहून भावे घञ् प्रत्यय होतो, यज्ञासंबंधीं अर्थ गम्यमान असतांना; उदा० उत्तरपरिग्राहः, अधरपरिग्राहः.

(४८) नि उपसर्ग उपपद असतांना वृ धातूहून घञ् प्रत्यय होतो, धान्यविशेष अर्थ असतांना; उदा० नीवारः.

(४९) उत् उपसर्ग उपपद असतांना श्रि, यु, पू आणि द्रु या धातूहून घञ् प्रत्यय होतो; उदा० उच्छ्रायः, उद्यावः, उत्पावः, उद्द्रावः.

(५०) आङ् उपसर्ग उपपद असतांना रु आणि प्लु या धातूहून घञ् प्रत्यय विकल्पानें होतो; उदा० आरावः आरवः; आप्लावः, आप्लवः.

(५१) अव उपसर्ग उपपद असतांना ग्रह् धातूहून विकल्पानें घञ् प्रत्यय होतो, वृष्टीचा प्रतिबंध हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० अवग्राहः, अवग्रहः.

(५२) प्र उपसर्ग उपपद असतांना ग्रह् धातूहून विकल्पानें घञ् प्रत्यय होतो, तागडीशीं संबंध असलेला अर्थ गम्यमान असतांना; उदा० तुलाप्रग्राहेण चरति.

(५३) प्र उपसर्ग उपपद असतांना ग्रह् धातूहून घञ् प्रत्यय विकल्पानें होतो, चाबूक अर्थ गम्यमान

**[प्रे द्रुस्तुस्रुवः ॥ ३। ३। २७ ॥ ... ]**

**वृणोतेराच्छादने ॥ ३। ३। ५४ ॥**
**परौ भुवोऽवज्ञाने ॥ ३। ३। ५५॥]**

**एरच् ॥३।३।५६**

**अज्विधौ भयस्योपसंख्यानम् ॥१॥**

अज्विधौ भयस्योपसंख्यानं कर्तव्यम् । भयम् ॥

अत्यल्पमिदमुच्यते भयस्येति । भयादीनामिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । भयम् वर्षम् ॥ किं प्रयोजनम् ।

**नपुंसके क्तादिनिवृत्त्यर्थम् ॥२॥**

नपुंसकलिङ्गे भावे क्तादयो मा भूवन्निति ॥

**कल्पादिभ्यश्च प्रतिषेधः ॥ ३ ॥**

कल्पादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । कल्पः अर्थः मन्त्रः ॥

**जवसवौ छन्दसि ॥ ४ ॥**

जवसवौ छन्दसि वक्तव्यौ । ऊर्वोरस्तु मे जवः । अयं मे पञ्चौदनः सवः ॥

**[ऋदोरप् ॥ ३ । ३ । ५७ ॥]**

**ग्रहवृदृनिश्चिगमश्च ॥३।३।५८॥**

किमर्थं निष्पूर्वाच्चिनोतेरब्विधीयते नाऽचैव सिद्धम् । न ह्यस्ति विशेषो निष्पूर्वाच्चिनोतेरपो वा अचो वा । तदेव रूपं स एव स्वरः ॥ न सिध्यति । हस्तादाने

---

(सू.५६, वा.१) ह्या अच् प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें भय शब्दाचें उपसंख्यान करावें; उदा० भयम्.

येथें भय ह्या एकट्या शब्दापुरतेंच जें उपसंख्यान केलें आहे तें फार थोडें आहे; भयादीनाम् असें म्हटलें पाहिजे; उदा० भयम्, वर्षम्.

याचा उपयोग काय ?

(वा.२) इवर्णान्त धातूहून भाव या अर्थी नपुंसकलिंगीं क्त वगैरे प्रत्यय (३।३।११४; ११५) होऊं[2] नयेत हा याचा उपयोग होय.

(वा.३) कल्पि वगैरे णिच् प्रत्ययान्त धातूंहून हा अच् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें· उदा० कल्पः[3], अर्थः, मन्त्रः.

(वा.४) जव आणि सव हे शब्द वेदांमध्यें अच् प्रत्ययान्त निपातित केले आहेत असें म्हणावें; उदा० ऊर्वोरस्तु मे जवः; अयं मे पञ्चौदनः सवः.

(सू. ५८) येथें निस्पूर्वक चि धातूहून जो अप् प्रत्यय सांगितला आहे तो कशाकरितां ? तो सांगावयास नको. अच् प्रत्ययानेंच (३।३।५६) सिद्ध होत आहे. कारण, निस्पूर्वक चि धातूहून अच् प्रत्यय केला काय आणि अप् प्रत्यय केला काय, कांहीं फरक नाहीं. तेंच रूप आणि तोच स्वर होत आहे.

---

असतांना; उदा० प्रग्राहः प्रग्रहः.

(५४) प्र उपसर्ग उपपद असतांना वृ धातूहून विकल्पानें घञ् प्रत्यय होतो, आच्छादन हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० प्रावारः, प्रवरः

(५५) परि उपसर्ग उपपद असतांना भू धातूहून विकल्पानें घञ् प्रत्यय होतो, अवज्ञा हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० परिभावः, परिभवः.

१. भाव किंवा कर्तृभिन्न कारक या अर्थी इवर्णान्त धातूहून अच् प्रत्यय होतो; उदा०चयः, जयः.

२. त्यामुळें भय या अर्थी भीतम्, भयनम्, असे प्रयोग होत नाहींत.

३. येथें घञ् प्रत्ययच होतो.त्यामुळें हे शब्द आद्युदात्त होतात.

४. येथें पुढील सूत्रानें अप् प्रत्यय होत नाहीं. म्हणून प्रत्यय अनुदात्त (३।१।४) होत नाहीं.

१. (५७) दीर्घऋकारान्त धातू आणि उवर्णान्त धातू यांहून अप् प्रत्यय होतो, भाव आणि कर्तृभिन्न कारक या अर्थीं; उदा० करः, गरः, यवः, लवः. येथून पुढें भाव आणि कर्तृभिन्न कारक या अर्थी प्रत्यय होतात.

१. ग्रह्, वृ, दृ, निस्पूर्वक चि आणि गम् या धातूंहून अप् प्रत्यय होतो, घञ् होत नाहीं; उदा० ग्रहः, वरः, दरः, निश्चयः, गमः.

२. चि धातूहून अच् प्रत्यय केला म्हणजे तो प्रत्ययाचा अकार उदात्त (६।१।१६३) होतो; आणि

चेर्घञ्प्राप्तस्तद्बाधनार्थम् ॥ अत उत्तरं पठति ।

**अब्विधौ निश्चिग्रहणमनर्थकं स्तेयस्य घञ्विधौ प्रतिषेधात् ॥१॥**

अब्विधौ निश्चिग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । स्तेयस्य घञ्विधौ प्रतिषेधात् । स्तेयस्य घञ्विधौ प्रतिषेध उच्यते निष्पूर्वश्चिनोतिः स्तेये वर्तते ॥ अस्तेयार्थं तर्हीदं वक्तव्यं निष्पूर्वाच्चिनोतेरस्तेये यथा स्यात् ।

**अस्तेयार्थमिति चेन्नानिष्टत्वात् ॥२॥**

अस्तेयार्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । अनिष्टत्वात् । न हि निष्पूर्वाच्चिनोतेरस्तेयेऽबिष्यते । किं तर्हि । घञेवेष्यते ॥ एवं तर्हि सिद्धे सति यन्निष्पूर्वाच्चिनोतेरपं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो यत्तदन्तस्थाथघञ्क्ताजबित्रकाणाम् [ ६।२।१४३;४४ ] इति तन्निष्पूर्वाच्चिनोतेर्न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । निश्चयः। एष स्वरः सिद्धो भवति ॥

**वशिरण्योश्चोपसंख्यानम् ॥ ३ ॥**

वशिरण्योश्चोपसंख्यानं कर्तव्यम् । स

---

पण अच् प्रत्ययानें साधणार नाहीं. अच् प्रत्ययाचा बाध करून हस्तादाने चेरस्तेये ( ३।३।४० ) या सूत्रानें घञ् प्रत्यय प्राप्त होत आहे. त्याचा बाध करण्याकरितां येथें अप् प्रत्यय सांगितला पाहिजे. हें मनांत आणून पुढें वार्तिककार लिहितातः—

(वा. १) अप् प्रत्यय सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें निस्पूर्वक चि धातूचें जें ग्रहण केलें आहे तें व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें की घञ् सांगणाऱ्या त्या सूत्रामध्यें स्तेयाचा प्रतिषेध केला आहे आणि निस्पूर्वक चि धातु हा स्तेय करणें या अर्थी आहे.

तर मग निस्पूर्वक चि धातूचा स्तेय करणें या अर्थाशिवाय दुसरा अर्थ असेल तेथें घञ् प्रत्ययाचा बाध करून अप् प्रत्यय होण्याकरितां येथें निस्पूर्वक चि धातूचें ग्रहण केलें पाहिजे.

(वा. २) स्तेय करणें याशिवाय इतर अर्थ असतांना अप् प्रत्यय होण्याकरितां येथें निस्पूर्वक चि धातूचें ग्रहण केलें पाहिजे असें असेल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें की स्तेय करणें याशिवाय इतर अर्थी निस्पूर्वक चि धातूहून अप् प्रत्यय इष्टच नाहीं.

तर मग येथें कोणता बरें प्रत्यय इष्ट आहे ?

घञ् प्रत्ययच इष्ट आहे.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांना जो येथें निस्पूर्वक चि धातूहून अप् प्रत्यय आचार्यांनीं सांगितला आहे त्यावरून त्यांनीं असें सूचित केलें आहे कीं 'अन्तः' या अधिकारातील 'थाथघञ्क्ताजबित्रकाणाम्' (६।२।१४४) या सूत्रानें सांगितलेला उत्तरपदाला अन्तोदात्त निस्पूर्वक चि धातूपासून साधलेल्या उत्तरपदाला होत नाहीं.

या ज्ञापकाचा काय उपयोग ?

निश्चयः येथें मध्योदात्त सिद्ध होतो.

(वा. ३) वश् आणि रण् या धातूंहून अप् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० स वशं

---

अप् प्रत्यय केला असतां तो प्रत्ययाचा अकार अनुदात्त (३।१।४) होऊन धातूमधील अच् उदात्त कायम राहतो. निस् याचा त्याच्याशीं गतिसमास केला असतांही कृदुत्तरपदप्रकृतिस्वरानें (६।२।१३९) तेच स्वर कायम राहतील. तथापि त्या प्रकृतिस्वराचा अपवाद थाथघञ्० (६।२।१४४) यानें उत्तरपदाला अन्तोदात्त झाला म्हणजे स्वरामध्यें फरक राहत नाही. अच् व अप् यांपैकीं कोणताही प्रत्यय केला तरी त्या अन्तोदात्ताची प्राप्ति येते.

वशं सैन्धवम् । धनंजयो रणे रणे ॥

**घञर्थे कविधानं स्थास्नापाव्यधिहनियुध्यर्थम् ॥४॥**

घञर्थे को विधेयः । किं प्रयोजनम् । स्थास्नापाव्यधिहनियुध्यर्थम् ॥ स्था । प्रतिष्ठन्तेऽस्मिन्धान्यानीति प्रस्थः । प्रस्थे हिमवतः शृङ्गे । स्था ॥ स्ना । प्रस्नान्ति तस्मिन्निति प्रस्नः । स्ना ॥ पा । प्रपिबन्त्यस्यां प्रपा । पा ॥ व्यधि । आविध्यन्ति तेनाविधम् । व्यधि ॥ हनि । विघ्नन्ति तस्मिन्मनांसि विघ्नः । हनि ॥ युधि । आयुध्यन्ते तेनायुधम् ॥

**[उपसर्गेऽदः ॥३।३।५९॥**

**नौ ण च ॥३।३।६०॥**

**व्यधजपोरनुपसर्गे ॥३।३।६१॥**

**स्वनहसोर्वा ॥३।३।६२॥**

**यमः समुपनिविषु च ॥३।३।६३॥**

**नौ गदनदपठस्वनः ॥३।३।६४॥**

**क्वणो वीणायां च ॥३।३।६५॥**

**नित्यं पणः परिमाणे ॥३।३।६६॥**

**मदोऽनुपसर्गे ॥३।३।६७॥**

**प्रमदसंमदौ हर्षे ॥३।३।६८॥**

**समुदोरजः पशुषु ॥३।३।६९॥**

**अक्षेषु ग्लहः ॥३।३।७०॥**

---

सैन्धवम्, धनंजयो रणे रणे.

(वा.४) घञ् प्रत्ययाच्या अर्थी धातूहून क प्रत्यय होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग?

उपयोग असा कीं स्था, स्ना, पा, व्यध्, हन् आणि युध् या धातूंहून क प्रत्यय झाला पाहिजे; उदा० प्रतिष्ठन्ते धान्यानि अस्मिन् इति प्रस्थः, प्रस्नान्ति जना अस्मिन् इति प्रस्नः, प्रपिबन्ति जलं जना अस्यामिति प्रपा, आविध्यन्ति अनेन आविधम्, विघ्नन्ति मनांसि अस्मिन् इति विघ्नः, आयुध्यन्ते योद्धारो येन तत् आयुधम्.

---

१. (५९) उपसर्ग उपपद असतांना अद् धातूहून अप् प्रत्यय होतो; उदा० विघसः, प्रघसः.

(६०) नि उपसर्ग उपपद असतांना अद् धातूहून ण आणि अप् असे प्रत्यय होतात; उदा० न्यादः, निघसः.

(६१) उपसर्ग नसतांना व्यध् आणि जप् या धातूंहून अप् प्रत्यय होतो; उदा० व्यधः, जपः.

(६२) उपसर्ग नसतांना स्वन् व हस् या धातूंहून अप् प्रत्यय विकल्पानें होतो; उदा० स्वनः, स्वानः, हसः, हासः.

(६३) उपसर्ग नसतांना आणि सम्, उप, नि, वि, हे उपसर्ग असतांना यम् धातूहून विकल्पानें अप् प्रत्यय होतो; उदा० यमः यामः, संयमः संयामः, उपयमः उपयामः, नियमः नियामः, वियमः वियामः.

(६४) नि उपसर्ग उपपद असतांना गद्, नद्, पठ् आणि स्वन् या धातूंहून विकल्पानें अप् प्रत्यय होतो; उदा० निगदः निगादः, निनदः निनादः, निपठः निपाठः, निस्वनः निस्वानः.

(६५) नि उपसर्ग उपपद असतांना किंवा मुळींच उपसर्ग नसतांना किंवा वीणासंबंध गम्यमान असतांना क्वण् धातूहून अप् प्रत्यय विकल्पानें होतो; उदा० निक्वणः निक्वाणः, क्वणः क्वाणः, कल्याणक्वणा वीणा.

(६६) पण् धातूहून नित्य अप् प्रत्यय होतो, इयत्ताविशेष गम्यमान असतांना; उदा० मूलकपणः (विकण्याकरितां बांधलेली मुळ्यांची पेंढी).

(६७) उपसर्ग नसतांना मद् धातूहून अप् प्रत्यय होतो; उदा० विद्यामदः.

(६८) प्रमद आणि संमद हे दोन शब्द निपातित केले आहेत, हर्ष गम्यमान असतांना; उदा० कन्यानां प्रमदः, कोकिलानां संमदः.

(६९) सम् किंवा उत् हे उपसर्ग उपपद असतांना अज् धातूहून अप् प्रत्यय होतो, पशूंचा संबंध गम्यमना असतांना; उदा० समजः पशुसमुदायः, उदजः पशुप्रेरणम्.

(७०) ग्रह् धातूहून अप् प्रत्यय आणि धातूंतील रेफाला लकारादेश असें येथें निपातन केलें आहे, पण ग्रह् धातूच्या अर्थाचा अक्षाशीं संबंध गम्यमान असतांना उदा० अक्षस्य ग्लहः.

प्रजने सर्तेः ॥ ३ । ३ । ७१ ॥
ह्वः संप्रसारणं च न्यभ्युपविषु ७२
आङि युद्धे ॥७३॥
निपानमाहावः ॥७४॥
भावेऽनुपसर्गस्य ॥७५॥
हनश्च वधः ॥७६॥
मूर्त्तौ घनः ॥७७॥
अन्तर्घनो देशे ॥७८॥
अगारैकदेशे प्रघणः प्रघाणश्च ॥
उद्घनोऽत्याधानम् ॥ ८० ॥
अपघनोऽङ्गम् ॥ ८१ ॥
करणेऽयोविद्रुषु ॥ ८२ ॥ ]

स्तम्बे[1] क च ॥ ३ । ३ । ८३ ॥

कस्मादयं को विधीयते । हन्तेरित्याह । तद्धन्तिग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । हनश्च वधः [ ७६ ] इति । तद्वा अनेकेन निपातनेन व्यवच्छिन्नं न शक्यमनुवर्तयितुम् । नैतानि निपातनानि । हन्तेरेत आदेशाः । यद्यादेशा घनस्वरो न सिध्य-

(सू.८३) ह्या सूत्रानें सांगितलेला क प्रत्यय कोणत्या धातूहून होतो ?

हन् धातूहून होतो असें आम्ही म्हणतों.

तर मग सूत्रामध्यें हन् धातूचा निर्देश केला पाहिजे.

हन् धातूचा निर्देश करावयास नको. कारण मागून अनुवृत्ति येत आहे.

हनः असें मागें कोठें बरें म्हटलें आहे?

हनश्च वधः (३।३।७६) या सूत्रामध्यें म्हटलें आहे.

पण त्याची येथें अनुवृत्ति करणें शक्य नाहीं. कारण अनेक सूत्रांमध्यें निपातनें केलीं असल्यामुळें त्याची अनुवृत्ति बंद आहे.

त्या मधल्या सूत्रांमध्यें निपातनें केलींच नाहींत; तर ते हन्धातूला आदेशच सांगितले आहेत.

जर आदेश सांगितले आहेत तर घन शब्दाला निपातनामुळें जो अन्तोदात्त होतो तो होणार नाहीं.

तर मग तीं सर्व निपातनेंच असोत.

---

(७१) प्रथमगर्भग्रहण हा अर्थ गम्यमान असतांना सृ धातूहून अप् प्रत्ययही होतो; उदा० गवामुपसरः.

(७२) नि, अभि, उप, वि हे उपसर्ग उपपद असतां ह्वे धातूहून अप् प्रत्यय होतो आणि धातूमधील वकाराला संप्रसारण होतें; उदा० आहवः संग्रामः.

(७३) आ उपसर्ग उपपद असतांना ह्वे धातूहून अप् प्रत्यय व धातूमधील वकाराला सप्रसारण होतें, युद्ध अर्थ गम्यमान असतांना, उदा० आहूयन्तेऽस्मिन्निति आहवः.

(७४) आहावः असें निपातन केलें आहे. येथें आ उपसर्गापुढील ह्वे धातूहून अप् प्रत्यय, धातूमधील वकाराला संप्रसारण आणि त्याला वृद्धि निपातनामुळें झाली आहे, निपान हा अर्थ असतांना; उदा० आहावः, विहिरीजवळ पशूंना पाणी पिण्याकरितां बांधलेला हौद. गुराखी तेथें गुरांना हांका मारतात.

(७५) उपसर्ग नसतांना ह्वे धातूहून भावे अप्प्रत्यय होतो आणि धातूंतील वकाराला संप्रसारण होतें; उदा० हवः, हवेहवे, सुहवं शूरमिन्द्रम्.

(७६) उपसर्ग नसतांना हन् धातूहून भावे अप्प्रत्यय होतो आणि वधादेश होतो; उदा० वधः

(७७) काठिण्य अर्थ गम्यमान असतांना हन् धातूहून भावे अप् प्रत्यय होतो आणि धातूला घन आदेश होतो; उदा० दधिघनः (दह्याचा काठिणपणा).

(७८) देशविशेष अर्थ असतांना अन्तर्घन असा शब्द निपातिला जातो.

(७९) प्रघण आणि प्रघाण ह्या दोन शब्दांचे निपातन केलें जातें, घरासंबंधीं भाग हा अर्थ असतांना; दाराबाहेरचा कट्टा हा या शब्दांचा अर्थ आहे.

(८०) अत्याधान या अर्थी उद्घन असा शब्द येथें निपातित केला आहे. लाकडें तासतांना त्यांचा आधार असा ओंडा.

(८१) अपघन या शब्दाचें येथें निपातन केलें आहे; शरीरांतील भाग हा त्याचा अर्थ आहे.

(८२) अयस्, वि आणि द्रु हे शब्द उपपद असतांना हन् धातूहून करण या अर्थी अप् प्रत्यय होतो आणि हन् धातूला घनादेश होतो; उदा० अयोघनः, विघनः, द्रुघनः.

[1] स्तम्ब शब्द उपपद असतांना हन् धातूहून करण

सिध्यति स्रस्तिः ध्वस्तिरिति प्राप्नोति । किं पुनरिदं परिगणनम् । त्रय एवाबादयः । आहोस्विदुदाहरणमात्रम् । किं चातः । यदि परिगणनं भेदो भवति । अथोदाहरणमात्रं नास्ति भेदः । स्रस्तिः ध्वस्तिरित्येव भवितव्यम् ॥

स्थागापापचो भावे[१] ॥३।३।९५॥

**स्थादिभ्यः सर्वापवादप्रसङ्गः ॥ १ ॥**

स्थादिभ्यः सर्वापवादः क्तिन्प्राप्नोति । स यथैवाङं बाधत एवं ण्वुलिञावपि बाधेत। कां त्वं स्थायिकामस्थाः कां स्थायिम् ॥

**सिद्धं त्वङ्विधाने स्थादिप्रतिषेधात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अङ्विधान एव स्थादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । प्रतिषिद्धे तस्मिन्क्तिनेव भविष्यति । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं स्थादिभ्यः सर्वापवादप्रसङ्ग इति । नैष दोषः । पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इत्येवमयं स्त्रियां

---

होऊं लागेल.

पण काय हो, आप् वगैरे धातूंहून जो हा क्तिन् प्रत्यय पुन्हां सांगण्यांत आला आहे तेथें आप्, राध् आणि दीप् असे तीनच धातू घ्यावयाचे? किंवा ते तीन नुसते उदाहरणादाखल घेतले आहेत तेव्हां आणखीही तेथें घेतां येतील?

या दोहोंमध्यें फरक काय होत आहे?

जर तीनच धातू घ्यावयाचे असतील तर फरक होत आहेचं. आतां ते नुसते उदाहरणादाखल दाखविले आहेत असे असेल तर मात्र फरक होणार नाहीं. स्रस्तिः, ध्वस्तिः, अशींच रूपें तेथें व्हावीं.

(सू.९५,वा.१) स्था वगैरे धातूंहून जो हा क्तिन् प्रत्यय सांगितला आहे तो सर्वच प्रत्ययांचा अपवाद होऊं लागेल; म्हणजे हा क्तिन् प्रत्यय जसा अङ् प्रत्ययाचा बाध करतो तसा तो ण्वुल्, इञ्(३।३।११०), यांचाही बाध करून होऊं लागेल; उदा० कां त्वं स्थायिकाम्, कां त्वं स्थायिम्.

(वा.२) हें सिद्ध होत आहे.

तें कसें?

असें की अङ् प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्येंच स्था, गा, वगैरे धातूंहून अङ् प्रत्यय होत नाहीं असा प्रतिषेध सांगावा. म्हणजे त्या अङ् प्रत्ययाचा निषेध झाला म्हणजे क्तिन् प्रत्ययच होईल.

अशा रीतीनें सिद्ध होईल खरें, पण सूत्रामध्यें फिरवाफिरव होते ना?

तर मग मूळचें आहे तेवढेंच सूत्र असूं दे.

पण मूळचें सूत्र कायम केलें तर हा क्तिन् प्रत्यय सर्वच प्रत्ययांचा बाध करील असा दोष दिला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण 'पूर्वी पठित जे अपवाद ते जवळच्याच विधीचा बाध करितात, दूरच्या विधींचा बाध करीत नाहींत' या न्यायानें हा क्तिन् प्रत्यय जवळच्या अङ् प्रत्ययाचाच बाध करील; त्याच्या पुढें सांगितलेल्या

---

तला असल्यामुळें त्यांच्या पुढील निष्ठा प्रत्ययाला इडागमाचा निषेध (७।२।१५) होत आहे.

५. आप् वगैरे तीनच धातू घेतले तर स्रंसा, ध्वंसा, असा अ प्रत्यय (३।३।१०३) होईल. आणि हे तीन धातू नुसते उदाहरणादाखल घेतले असतील तर त्यांमध्यें स्रंस्, ध्वंस्, हे घेतां येतील, आणि स्रस्तिः, ध्वस्तिः, असा क्तिन् प्रत्यय होईल, असा फरक होतो.

१. स्था, गा, पा आणि पच् या धातूंहून भावे क्तिन् प्रत्यय होतो, स्त्रीत्वविवक्षा असतांना; उदा० प्रस्थितिः, उद्गीतिः. येथें अङ् प्रत्यय (३।३।१०६) प्राप्त होत आहे. त्याच्या बाधाकरितां हें केलें आहे. पच् धातु षित् असल्यामुळें त्याहूनही अङ् प्रत्यय (३।३।१०४) प्राप्त होत आहे.

क्तिनक्तं बाधिष्यते ण्वुलिञौ न बाधिष्यते ॥

**श्रुयजिषिस्तुभ्यः करणे ॥ ३ ॥**

श्रुयजिषिस्तुभ्यः करणे क्तिन्वक्तव्यः। श्रूयतेऽनयेति श्रुतिः। इज्यतेऽनयेतीष्टिः। इष्यतेऽनयेष्टिः। स्तूयतेऽनया स्तुतिः ॥

**ग्लाज्याहाभ्यो निः ॥ ४ ॥**

ग्लाज्याहाभ्यो निर्वक्तव्यः। ग्लानिः ज्यानिः हानिः ॥

**[मन्त्रे[1]वृषेषपचमनविदभूवीरा उदात्तः ॥ ३ । ३ । ९६ ॥**

**ऊतियूतिजूतिसातिहेतिकीर्तयश्च[1] ॥ ३ । ३ । ९७ ॥]**

**व्रजयजोर्भावे[1] क्यप् ॥३।३।९८॥**

**क्यब्विधिरधिकरणे च ॥ १ ॥**

क्यब्विधिरधिकरणे चेति वक्तव्यम्। समजन्ति तस्यां समज्या ॥

**[संज्ञायां[1] समजनिषदनिपतमनविदषुञ्शीङ्भृञिणः ॥ ३ । ३ । ९९ ॥]**

**कृञः[1] श च ॥ ३ । ३ । १०० ॥**

**कृञः श चेति वावचनं क्तिनर्थम् ॥ १ ॥**

कृञः श चेति वावचनं कर्तव्यं क्तिनपि यथा स्यात्। कृतिः ॥

**इच्छा[1] ॥ ३ । ३ । १०१॥**

किं निपात्यते। इषेः शे यगभावः ॥

---

ण्वुल्, इञ्, या प्रत्ययांचा बाध करणार नाहीं.

(वा.३) श्रु, यज्, इष् आणि स्तु या धातूंहून करण या अर्थी क्तिन् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० श्रूयतेऽनया श्रुतिः, इज्यतेऽनया इष्टिः, स्तूयतेऽनया स्तुतिः.

(वा.४) ग्ला, ज्या आणि हा या धातूंहून नि प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० ग्लानिः, ज्यानिः, हानिः.

(सू.९८,वा.१) हा क्यप् प्रत्यय अधिकरण या अर्थीही होतो असें म्हणावें; उदा० समजन्ति तस्यां समज्या[2].

(सू.१००,वा.१) 'कृञः श च' या सूत्रानें सांगितलेला प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा की एकदा क्तिन् प्रत्ययही झाला पाहिजे; उदा० कृतिः.

(सू.१०१) येथें काय निपातन केलें आहे ?

इष् धातूहून भावे श प्रत्यय केला असतां यक्(३।१।६७)प्रत्यय होत नाहीं.

---

१. (९६) मंत्रामध्यें वृष्,इष्,पच्,मन् विद्,भू,वी आणि रा या धातूंहून क्तिन् प्रत्यय होतो,व तो उदात्त होतो; उदा० वृष्टिः, इष्टिः.

१. (९७) मंत्रामध्यें ऊति,यूति,जूति,साति, हेति, कीर्ति, हे शब्द क्तिन् प्रत्ययान्त निपातित केले जातात. प्रत्ययांतील इकार उदात्त होतो. ऊतिः येथें अव्-धातूला ऊठ् (६।४।२०) झाला आहे. यूति आणि जूति येथें निपातनामुळें दीर्घ झाला आहे. साति येथें निपातनामुळें ईत्व (७।४।४०) झालें नाहीं. हन् किंवा हि या धातूचें हेति हें निपातन आहे. कीर्ति येथें युच् प्रत्यय (३।३।१०७) झाला नाहीं.

१. व्रज आणि यज या धातूंहून भावे क्यप् प्रत्यय होतो, तो उदात्त होतो, स्त्रीत्वविवक्षा असतांना; उदा० व्रज्या, इज्या.

२. येथें पुढील सूत्रानें क्यप् प्रत्यय अधिकरण या अर्थीं झाला आहे.

१. (९९) संज्ञाशब्दामध्यें सम्-अज्,नि-पत्,नि-षद्,मन्,विद्,षुञ्,शीङ्,भृञ् आणि इण्,या धातूंहून क्यप् प्रत्यय होतो व तो उदात्त होतो, स्त्रीत्वविवक्षा असतांना; उदा० समज्या सभा; निषद्या आपणः.

१. कृ धातूहून श प्रत्यय आणि क्यप् प्रत्यय होतात; स्त्रीत्वविवक्षा असतांना;उदा० क्रिया; कृत्या

१. इच्छा या शब्दाचें येथें निपातन केलें आहे.

अत्यल्पमिदमुच्यत इच्छेति। इच्छापरिचर्यापरिसर्यामृगयाटाट्यानां निपातनं कर्तव्यम् ॥ जागर्तेरकारो वा। जागर्या जागरा ॥

**[अ प्रत्ययात् ॥ ३। ३। १०२ ॥**
**गुरोश्च हलः ॥३। ३। १०३॥]**
**षिद्भिदादिभ्योऽङ् ॥३।३।१०४॥**

**भिदा विदारणे ॥ १ ॥**

भिदा विदारण इति वक्तव्यम्। भित्तिरन्या ॥

**छिदा द्वैधीकरणे ॥ २ ॥**

छिदा द्वैधीकरण इति वक्तव्यम्। छित्तिरन्या ॥

**आरा शस्त्र्याम् ॥ ३ ॥**

आरा शस्त्र्यामिति वक्तव्यम्। आर्तिरन्या ॥

**धारा प्रपाते ॥ ४ ॥**

धारा प्रपात इति वक्तव्यम्। धृतिरन्या ॥

**गुहा गिर्योषध्योः ॥ ५ ॥**

गुहा गिर्योषध्योरिति वक्तव्यम्। गूढिरन्या ॥

**[चिन्तिपूजिकथिकुम्बिचर्चश्च ॥ ३। ३। १०५॥**
**आतश्चोपसर्गे ॥ ३। ३। १०६॥]**
**ण्यासश्रन्थो युच् ॥३।३।१०७॥**

---

येथें हें सूत्रकारांनीं फार थोडें सांगितलें आहे. इच्छा, परिचर्या[२], परिसर्या, मृगया आणि अटाट्या इतक्या शब्दांचें येथें निपातन केलें पाहिजे. जागृ धातूहून भावे अ प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हणावें; उदा० जागरा; एकदां शप्रत्यय होतो : जागर्या.

(सू.१०४,वा.१) विदारण अर्थ असतांनाच भिदा असा अङ् प्रत्यय होतो असें म्हणावें. इतर अर्थी भिद्यते इति भित्तिः.

(वा. २) दोन तुकडे करणें, या अर्थीच छिदा असा अङ् प्रत्यय होतो असें म्हणावें. इतर अर्थी छित्तिः असें होतें.

(वा.३) शस्त्री या अर्थीच आरा[२] असा अङ् प्रत्यय होतो असें म्हणावें. इतर अर्थी आर्तिः पीडा.

(वा.४) सतत पतन या अर्थीच धारा असा अङ् प्रत्यय होतो असें म्हणावें. इतर अर्थी धृतिः असें होतें.

(वा.५) गिरि किंवा ओषध या अर्थीच गुहा असा अङ् प्रत्यय होतो असें म्हणावें. इतर अर्थी गूढिः असें होतें.

(सू.१०७) ह्या युच् प्रत्ययाला चकार

---

२. परिचर्या वगैरे शब्दांमध्यें भावे श प्रत्यय केल्यानंतर मध्यें यक् प्रत्यय झाला आहे.

१. (१०२) प्रत्ययान्त धातूहून भावे अ प्रत्यय होतो, स्त्रीत्वविवक्षा असतांना; उदा० चिकीर्षा, पुत्रकाम्या.

(१०३) ज्यामध्यें गुरु वर्ण आहे, अशा हलन्त धातूहून भावे अ प्रत्यय होतो, स्त्रीत्वविवक्षा असतांना; उदा० ईहा.

१. षकारेत्संज्ञक धातूहून आणि भिदादि गणांतील धातूहून भावे अङ् प्रत्यय होतो, स्त्रीत्वविवक्षा असतांना; उदा० जरा, त्रपा, भिदा, छिदा.

२. आ उपसर्गपूर्वक ऋ धातूहून अङ् व वृद्धि(६।१।९१) झाली आहे.

१. (१०५) चिन्त्, पूज्, कथ्, कुम्ब्, आणिच चर्च् या णिप्रत्ययान्त धातूहून भावे अङ् प्रत्यय होतो; हा युच् प्रत्ययाचा (३।३।१०७) अपवाद आहे; उदा० चिन्ता, पूजा, कथा, कुम्बा, चर्चा.

१. (१०६) उपसर्ग उपपद असतांना आकारान्त धातूहून भावे अङ् प्रत्यय होतो; हा क्तिन् प्रत्ययाचा बाधक आहे; उदा० प्रदा, उपदा.

१. णिप्रत्ययान्त धातु, आस् आणि श्रन्थ या धातूंहून भावे युच् प्रत्यय होतो; हा युच् अ प्रत्ययाचा (३।३।१०२) अपवाद आहे; उदा० कारणा, आसना, श्रन्थना.

किमर्थश्चकारः । स्वरार्थः । चितो ऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात्॥ नैतदस्ति प्रयोजनम् । उदात्त इति वर्तते भूवीरा उदात्तः [ ३. ३. ९६ ] इति । यद्युदात्त इति वर्तते व्रजयजोर्भावे क्यप् [९८] किमर्थः पकारः । तुगर्थः । ह्रस्वस्य पिति कृति [६.१.७१] इति । उदात्त इति वर्तते । एवमपि कुत एतत्तादन्तस्योदात्तत्वं भविष्यति न पुनरादेरिति । उदात्त इत्यनुवर्तनसामर्थ्याद्यस्याप्राप्तः स्वरस्तस्य भवति । कस्य चाप्राप्तः । अन्त्यस्य॥सामान्यग्रहणाविघातार्थस्तर्हि । क सामान्यग्रहणाविघातार्थेनार्थः । युवोरनाकौ [ ७.१.१. ] इति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । वक्ष्यत्येतत्सिद्धं तु युवोरनुनासिकवचनादिति ॥

**युच्प्रकरणे घट्टिवन्दिविदिभ्य उपसंख्यानम् ॥१॥**

युच्प्रकरणे घट्टिवन्दिविदिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । घट्टना वन्दना वेदना॥

**इषेरनिच्छार्थस्य ॥ २ ॥**

इषेरनिच्छार्थस्येति वक्तव्यम् । अन्विष्यते अन्वेषणा ॥

---

कशाकरितां जोडला आहे ?

स्वराकरितां जोडला आहे. ञितः (६।१।१६३) या सूत्रानें सांगितलेला अन्त उदात्त झाला पाहिजे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'मन्त्रे वृषेषपचमन०' (३।३।९६) या सूत्रांतून उदात्तग्रहणाची अनुवृत्तीच येथें येत आहे.

पण जर उदात्तग्रहणाची अनुवृत्ति येथें येत असेल तर 'व्रजयजोर्भावे क्यप्(३।३।९८) या सूत्रामध्यें क्यप् प्रत्ययाला पकार कशाकरितां जोडला आहे.[2]

ह्रस्वस्य पिति कृति तुक् (६।१।७२) या सूत्रानें सुत्या येथें तुगागम झाला पाहिजे म्हणून जोडला आहे ?

आतां उदात्तः एवढेंच पद येथें अनुवृत्त होत आहे.तेव्हां तेवढयावरून हा उदात्त स्वर प्रत्ययाच्या अंतालाच होईल आणि आदीला होणार नाहीं हें कशावरून ?

जर आदीला होईल तर उदात्तः ही अनुवृत्ति व्यर्थच होईल.[3] तेव्हां त्याच्या सामर्थ्यानें ज्याला उदात्त प्राप्त नाहीं त्यालाच होईल.

कोणाला बरें उदात्त प्राप्त होत नाहीं ?

अन्त्याला.

तर मग यु या सामान्य शब्दानें या युच् प्रत्ययाचें जें ग्रहण होतें त्यामध्यें बिघाड होऊं नये म्हणून चकार जोडला आहे.

असें यु शब्दानें या युच् प्रत्ययाचें ग्रहण कोठें बरें होतें ?

युवोरनाकौ ( ७।१।१ ) या सूत्रामध्यें होतें.

हाही चकाराचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'सिद्धं तु युवोरनुनासिकवचनात्' (७।१।१, वा. २२) असें वार्तिककार पुढें सांगणारच आहेत.[4]

( वा.१ ) ह्या युच् प्रकरणामध्यें घट्ट, वन्द् आणि विद् या धातूंहून युच् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० घट्टना, वन्दना, वेदना.

( वा.२ ) इच्छा या अर्थाशिवाय इतर अर्थाच्या इष् धातूहून युच् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० अन्विष्यते अन्वेषणा.

---

२. कारण, तेथें उदात्त ग्रहणाची अनुवृत्ति असल्यामुळें पकाराचा उपयोग अनुदात्त (३।१।४) सांगतां येत नाहीं.

३. कारण, आदीला उदात्त (३।१।३) सिद्धच आहे.

४. तात्पर्य, उदात्त ग्रहणाच्या अनुवृत्तीनें काम भागत असल्यामुळें युच् प्रत्ययाला चकार नको असें होतें.

**परेर्वा ॥ ३ ॥**

परेर्वेति वक्तव्यम् । अन्यां परीष्टिं चर । अन्यां पर्येषणां चर ॥

## रोगाख्यायां ण्वुल् बहुलम् ॥ ३ । ३ । १०८ ॥

**धात्वर्थनिर्देशे ण्वुल् ॥१॥**

धात्वर्थनिर्देशे ण्वुल्वक्तव्यः । का नामासिकान्येष्वीहमानेषु । का नाम शायिकान्येष्वधीयानेषु ॥

**इक्श्तिपौ धातुनिर्देशे ॥ २ ॥**

इकश्तिपावित्येतौ प्रत्ययौ धातुनिर्देशे वक्तव्यौ । पचेर्ब्रूहि । पचतेर्ब्रूहि ॥

**वर्णात्कारः ॥ ३ ॥**

वर्णात्कारप्रत्ययो वक्तव्यः । अकारः इकारः ॥

**रादिफः ॥ ४ ॥**

रादिफो वक्तव्यः । रेफः ॥

**मत्वर्थाच्छः ॥ ५ ॥**

मत्वर्थाच्छो वक्तव्यः । मत्वर्थीयः ॥

**इणजादिभ्यः ॥ ६ ॥**

इणजादिभ्यो वक्तव्यः । आजिः आतिः आदिः ॥

**इञ्वपादिभ्यः ॥ ७ ॥**

इञ्वपादिभ्यो वक्तव्यः । वापिः वासिः वादिः ॥

**इक्कृष्यादिभ्यः ॥ ८ ॥**

इक्कृष्यादिभ्यो वक्तव्यः । कृषिः किरिः गिरिः ॥

---

( वा.३ ) परि या उपसर्गाच्या पुढील इष् धातूहून युच् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० अन्यां परीष्टिं चर; अन्यां पर्येषणां चर.

(सू.१०८, वा.१) क्रियेचा निर्देश कर्तव्य असतांना धातूहून ण्वुल् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० का नाम आसिका अन्येष्वीहमानेषु, का नाम शायिका अन्येष्वधीयानेषु.

(वा.२) धातूचा निर्देश कर्तव्य असतांना धातूहून इक् आणि श्तिप् असे प्रत्यय होतात असें म्हणावें; उदा० पचेर्ब्रूहि, पचतेर्ब्रूहि.

(वा.३) वर्णाचा निर्देश कर्तव्य असतांना वर्णाहून कारप्रत्यय होतो; उदा० अकारः; इकारः.

( वा.४ ) वर्णाचा निर्देश कर्तव्य असतांना र या वर्णाहून इफ असा प्रत्यय होतो; उदा० रेफः,

(वा.५) मत्वर्थक प्रत्ययाचा निर्देश कर्तव्य असतांना मत्वर्थ शब्दाहून छ प्रत्यय होतो; उदा० मत्वर्थीयः.

(वा.६) क्रियेचा निर्देश कर्तव्य असतांना अज् वगैरे धातूंहून इण् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० आजिः, आतिः, आदिः.

(वा.७) क्रियेचा निर्देश कर्तव्य असतांना वप् वगैरे धातूंहून इञ् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० वापिः, वासिः, वादिः.

(वा.८) क्रियेचा निर्देश कर्तव्य असतांना कृष् वगैरे धातूंहून इक् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा० कृषिः, किरिः गिरिः.

---

१. धातूहून भावे ण्वुल् प्रत्यय होतो स्त्रीत्व विवक्षा असतांना, आणि तो प्रत्ययान्त शब्द रोगविशेषाची संज्ञा असली पाहिजे. उदा० प्रच्छर्दिका ( आम्लपित्त ), प्रवाहिका ( संग्रहणी ), विचर्चिका (खरूज). हा प्रत्यय बाहुल्येकरून होतो.

२. इतर लोक उद्योग करीत असतांना तुझ्या या स्वस्थ बसण्याला काय म्हणावें आणि इतर लोक अध्ययन करीत असतांना तुझ्या या निजण्याला काय म्हणावें, असा याचा अर्थ आहे.

३. पच् धातूचें अमुक रूप कसें होतें तें सांग असा याचा अर्थ आहे.

४. कार, इक, छ, हे प्रत्यय धातूहून केले नाहीत तरीं धातोः या अधिकारांत सांगितले असल्यामुळें कृत् संज्ञा (३।१।९३) होते व म्हणून प्रातिपदिक संज्ञा

संपदादिभ्यः क्विप् ॥ ९ ॥

संपदादिभ्यः क्विब्वक्तव्यः । संपत् विपत् प्रतिपत् आपत् परिपत् ॥

[संज्ञायाम् ॥ ३ । ३ । १०९॥

विभाषाख्यानपरिप्रश्नयोरिञ्च ॥ ३ । ३ । ११० ॥

पर्यायार्हर्णोत्पत्तिषु ण्वुच् ॥ ३ । ३ । १११ ॥

आक्रोशे नञ्यनिः ॥३। ३।११२॥]

कृत्यल्युटो बहुलम् ॥३।३।११३॥

कृतो बहुलमिति वक्तव्यं पादहारकार्थम् । पादाभ्यां ह्रियते पादहारकः । गले चोप्यते गलेचोपकः । श्वोऽग्नीनाधास्यमानेन । श्वः सोमेन यक्ष्यमाणेन ॥

[नपुंसके भावे क्तः ॥३।३।११४॥

ल्युट् च ॥ ३ । ३ । ११५ ॥

कर्मणि च येन संस्पर्शात्कर्तुः शरीरसुखम् ॥ ३ । ३ । ११६ ॥

करणाधिकरणयोश्च ॥३।३।११७॥

पुंसि संज्ञायां घः प्रायेण ॥ ३ । ३ । ११८ ॥]

---

(वा. ९) क्रियेचा निर्देश कर्तव्य अससम् वगैरे उपसर्गपूर्वक पद् धातूहून क्विम् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० संपत्, विपत्, प्रतिपत्, आपत्, परिपत्.

(सू. ११३) कृतो बहुलमिति वक्तव्यं पादहारकार्यर्थम्, ह्या सूत्रामध्यें कृत्यल्युटः याच्या ऐवजीं कृतः असें म्हणावें. कारण पादहारक वगैरे शब्द साधले पाहिजेत. पादाभ्यां ह्रियते पादहारकः, गले चोप्यते गलेचोपकः श्वोऽग्नीनाधास्यमानेन श्वः सोमेन यक्ष्यमाणेन.

(१।२।४६) होते.

१. (१०९) संज्ञा शब्दामध्ये धातूहून ण्वुल् प्रत्यय होतो. उदा० उद्दालकपुष्पभञ्जिका. शालभञ्जिका.

१. (११०) क्रियेसंबंधीं प्रश्न व उत्तर यांमध्यें धातूहून इञ् व ण्वुल् प्रत्यय विकल्पानें होतात. उदा. कां त्वं कारिमकार्षीः सर्वां कारिमकार्षम्. येथें कारिम् याच्या ऐवजीं कारिकाम् ,क्रियाम् , कृत्याम् , कृतिम् असेही शब्द घालतां येतात.

(१११) पर्याय, योग्यता, ऋण आणि उत्पत्ति हे अर्थ गम्यमान असतांना धातूहून ण्वुच् प्रत्यय विकल्पानें होतो उदा. भवतः शायिका. इक्षुभक्षिकामर्हति भवान् इक्षुभक्षिकां मे धारयसि, इक्षुभक्षिकोत्पद्यते.

(११२) नञ् उपपद असतांना धातूहून अनि प्रत्यय होतो, आक्रोश गम्यमान असतांना उदा० अजीवनिस्ते शठ भूयात्.

१. कृत्यसंज्ञक प्रत्यय ( ३।१।९५ ) आणि ल्युट् प्रत्यय हे बाहुल्येकरून होतात. म्हणजे सांगितलेल्या अर्थापेक्षां निराळ्या अर्थींही होतात. उदा० स्नानीयं चूर्णम्. येथें अनीयर् हा कृत्यप्रत्यय करण या अर्थी झाला आहे. राजभोजनाः शालयः येथें ल्युट् प्रत्यय कर्म या अर्थी झाला आहे.

२. कर्म या अर्थी ण्वुल् प्रत्यय सांगितला नाहीं. तो पादहारक गलेचोपक येथें होतो; तसेच श्वो ऽग्नीनाधास्यमानेन इत्यादि उदाहरणांमध्यें श्वःया पदावरून अनद्यतन कालाची विवक्षा स्पष्ट होत असतांनाही लुट् न होतां लृट् झाला आहे.

१. (११४) धातूहून क्त प्रत्यय भावे होतो, नपुंसक लिंगाची विवक्षा असतांना. उदा० हसितम्.

१. (११५) धातूहून भावे ल्युट् प्रत्यय होतो नपुंसक लिंगाची विवक्षा असतांना. उदा० हसनम्.

१. (११६) ज्या कर्माच्या स्पर्शानें कर्त्याला शरीरसुख होते त्या कर्माचा वाचक शब्द उपपद असतांना धातूहून ल्युट् प्रत्यय होतो. उदा पयःपानं सुखम्. येथें नित्यउपपद समास (२।२।१९) होतो.

१. (११७) धातूहून करण किंवा अधिकरण या अर्थी ल्युट् प्रत्यय होतो. उदा० इध्मप्रव्रश्चनः, गोदोहनी स्थाली.

१. (११८) संज्ञा-शब्दांमध्यें प्रायः धातूहून घ प्रत्यय होतो पुंल्लिंगाची विवक्षा असतांना. हा प्रत्यय करण किंवा अधिकरण या अर्थी होतो. उदा. दन्तच्छदः ओष्ठः आकरः खनिः. येथें प्रायः असें म्हटलें असल्यामुळें कषः निकषः येथेंही घ प्रत्ययच होतो. घञ् होत नाहीं.

**गोचरसंचरवहव्रजव्यजापणनिगमाश्च ॥ ३ । ३ ॥ ११९ ॥**

**गोचरादीनामग्रहणं प्रायवचनाद्यथा कषो निकष इति ॥ १ ॥**

गोचरादीनां ग्रहणं शक्यमकर्तुम् । घञ् कस्मान्न भवति । प्रायवचनात् । यथा कषः निकष इति प्रायवचनाद् घञ्न भवति ॥

**[अवे तॄस्त्रोर्घञ् ॥ ३ । ३ । १२० ॥]**

**हलश्च ॥ ३।३।१२१ ॥**

**घञ्विधाववहाराधारावायानामुपसंख्यानम् ॥१॥**

घञ्विधाववहाराधारावायानामुपसंख्यानं कर्तव्यम् । अवह्रियन्तेऽस्मिन्नवहारः ॥ आध्रियन्तेऽस्मिन्नाधारः । एत्यैतस्मिन्वयन्त्यावायः ॥

**[ अध्यायन्यायोद्यावसंहाराधारावायाश्च ॥ ३ । ३ । १२२ ॥ ]**

**उदङ्कोऽनुदके ॥३।३।१२३॥**

किमर्थमिदमुच्यते न हलश्च [१२१] इत्येव सिद्धम् । अनुदक इति वक्ष्यामीति । इह मा भूत् । उदकोदञ्चनः ॥

**उदङ्कोऽनुदकग्रहणानर्थक्यं च प्रायवचनाद्यथा गोदोहनः प्रसाधन इति ॥ १ ॥**

उदङ्कोऽनुदकग्रहणं चानर्थकम् । घञ्कस्मान्न भवति । प्रायवचनाद्घञ्न भवति । यथा गोदोहनः प्रसाधन इति ॥

---

( सू. ११९ वा.१ ) गोचर वगैरे शब्दांचें येथें निपातन करावयास नको.

पण मग घञ् प्रत्यय त्या ठिकाणीं कां बरें होत नाहीं ?

पूर्वसूत्रामध्यें प्रायेण असें म्हटलें आहे त्यावरून; जसें:- कषः, निकषः, येथें घञ् प्रत्यय होत नाही; त्याप्रमाणें येथेंही होणार नाहीं.

( सू. १२१, वा १. ) ह्या घञ् प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें अवहार, आधार, आणि आवाय या शब्दांचें निपातन करावें; उदा० अवह्रियन्ते अस्मिन् अवहारः, आध्रियन्ते अस्मिन् आधारः, एत्य वयन्ति अस्मिन् आवायः

(सू.१२३) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. 'कारण हलश्च'(३।३।१२१) या सूत्रानेंच येथें घञ् प्रत्यय सिद्ध आहे.

उदकाचा संबंध असतांना घञ् प्रत्यय न होण्याकरतां केलें आहे. कारण उदकोदञ्चनः येथें घञ् प्रत्यय न झाला पाहिजे.

'उदङ्कोऽनुदके' हें सूत्र व्यर्थ आहे.

पण हें सूत्र नसलें तर उदङ्क शब्दामध्यें घञ् प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

प्रायेण असें जें म्हटलें आहे ( ३।३।११८) त्यामुळें; जसा गोदोहनः, प्रसाधनः, येथें घञ् प्रत्यय होत नाहीं तसा उदङ्क शब्दामध्येंही होणार नाहीं.

---

१. गोचर संचर वह व्रज व्यज आपण आणि निगम हे शब्द घ प्रत्ययान्त निपातन केले आहेत. येथें करण किंवा अधिकरण या अर्थी घ प्रत्यय झाला आहे.

१. (१२०)अव उपसर्ग उपपद असतांना तॄ आणि स्तॄ या धातूंहून करण किंवा अधिकरण या अर्थी घञ् प्रत्यय होतो; उदा० अवतारः, अवस्तारः.

१. हलन्त धातूहून करण किंवा अधिकरण या अर्थी घञ् प्रत्यय होतो; तो शब्द पुंल्लिंगी चालतो; उदा० लेखः, वेषः, बन्धः, मार्गः.

१. (१२२)अध्याय,न्याय,उद्याव,संहार, आधार आणि आवाय हे शब्द निपातित केले आहेत. या ठिकाणीं करण किंवा अधिकरण या अर्थी घञ् प्रत्यय केला आहे.

१. उदङ्क या शब्दाचें येथें निपातन केलें आहे. पण त्या धात्वर्थक्रियेचा उदकाशी संबंध नसावा उदा०- तैलोदङ्कः (तेल वर काढण्याचें साधन). उदकोदञ्चनः (म्ह. पाणी काढण्याचा पोहरा). येथें हा घञ् होत नाहीं.

[जालमानायः ॥ ३ । ३ । १२४ ॥ ][1]

## खनो घ च ॥३।३।१२५॥[1]

डो वक्तव्यः । आखः ।। डरो वक्तव्यः । आखरः ।। इको वक्तव्यः । आखनिकः ।। इकवको वक्तव्यः । आखनिकवकः ।।

## ईषद्दुःसुषु कृच्छ्राकृच्छ्रार्थेषु खल् ॥ ३ । ३ । १२६ ॥[1]

### अजब्भ्यां स्त्रीखलनाः ॥ १ ॥

अजब्भ्यां स्त्रीखलना भवन्ति विप्रतिषेधेन । अजपोरवकाशः । चयः लवः । स्त्रीप्रत्ययानामवकाशः । कृतिः हृतिः । इहोभयं प्राप्नोति । चितिः स्तुतिः ।। खलोऽवकाशः । ईषद्भेदः सुभेदः । अजपोः स एव । इहोभयं प्राप्नोति । ईषच्चयः सुचयः । ईषल्लवः सुलवः ॥ अनस्यावकाशः । इध्मप्रव्रश्चनः । अजपोः स एव । इहोभयं प्राप्नोति । पलाशचयनः अविलवनः ॥ स्त्रीखलना भवन्ति विप्रतिषेधेन ॥

### स्त्रियाः खलनौ विप्रतिषेधेन ॥२॥

स्त्रियाः खलनौ भवतो विप्रतिषेधेन । स्त्रीप्रत्ययानामवकाशः । कृतिः हृतिः । खलोऽवकाशः । ईषद्भेदः सुभेदः । इहोभयं प्राप्नोति । ईषद्भेदा सुभेदा ॥ अनस्यावकाशः । इध्मप्रव्रश्चनः । स्त्रीप्रत्ययानां स एव । इहोभयं प्राप्नोति. । सक्तुधानी तिलपीडनी ।। खलनौ भवतो विप्रतिषेधेन ।।

---

(सू. १२५) खन् धातूहून घ प्रत्ययाप्रमाणें ड प्रत्ययही होतो असें म्हणावें. उदा० आखः; डर प्रत्ययही होतो. उदा० आखरः, इक प्रत्ययही होतो. उदा० आखनिकः. इकवक असाही प्रत्यय होतो. उदा० आखनिकवकः.

(सू. १२६ वा.) अच् व अप् या प्रत्ययांपेक्षां स्त्रियाम् या अधिकारांतील प्रत्यय आणि अन प्रत्यय हे विप्रतिषेधानें होतात. अच् (३।३।५६) आणि अप् (३।३।५७) या प्रत्ययांना चयः लवः येथें अवकाश आहे. स्त्री प्रत्ययाला (३।३।९४) कृतिः हृतिः येथें अवकाश आहे. आणि चितिः स्तुतिः येथें दोघांची प्राप्ति येत आहे. तसेंच या खल् प्रत्ययाला ईषद्भेदः सुभेदः येथें अवकाश आहे. अच् आणि अप् या प्रत्ययांना अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. आणि ईषच्चयः सुचयः ईषल्लवः सुलवः येथें दोघांची प्राप्ति येत आहे. तसेंच इध्मप्रव्रश्चनः येथें अन प्रत्ययाला (३।३।११७) अवकाश आहे. अच् आणि अप् यांना अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. आणि पलाशचयनः अविलवनः येथे दोघांची प्राप्ति येत आहे.तेव्हां तेथें स्त्रीप्रत्यय,खल् प्रत्यय आणि अन प्रत्यय हे विप्रतिषेधानें होतात.

(वा.२) त्यांत सुद्धां स्त्री प्रत्ययापेक्षां खल् आणि अन हे प्रत्यय विप्रतिषेधानें होतात. स्त्री प्रत्ययांना कृतिः हृतिः येथें अवकाश आहे. खल् प्रत्ययाला ईषद्भेदः सुभेदः येथें अवकाश आहे. आणि ईषद्भेदा सुभेदा येथें दोघांची प्राप्ति येत आहे. तेव्हां तेथें खल् आणि अन हे प्रत्यय विप्रतिषेधानें होतात.

---

१. (१२४) जाल या अर्थी आनाय असें निपातन केलें आहे. आङ् उपसर्गपूर्वक नी धातूहून करण या अर्थी घञ् प्रत्यय येथें झाला आहे.

१. खन् धातूहून करण किंवा अधिकरण या अर्थी घ आणि घञ् प्रत्यय होतात; उदा०-आखन, आखानः

१. ईषत्, दुस् किंवा सु यांपैकीं उपपद असतांना आणि सुख किंवा दुःख गम्यमान असतांना धातूहून खल् प्रत्यय होतो. उदा० ईषत्करः कटो भवता, सुकरः, दुष्करः; या उदाहरणांमध्यें खल् प्रत्यय कर्म या अर्थी (३।४।७०) झाला आहे.

## कर्तृकर्मणोश्च भूकृञोः ॥ ३ । ३ । १२७ ॥

**खल्कर्तृकर्मणोश्च्व्यर्थयोः ॥ १ ॥**

खल्कर्तृकर्मणोश्च्व्यर्थयोरिति वक्तव्यम् । अनाढ्येन भवतेषदाढ्येन शक्यं भवितुमीषदाढ्यंभवं भवता । दुराढ्यंभवम् । स्वाढ्यंभवम् ॥

**कर्तृकर्मग्रहणं चोपपदसंज्ञार्थम् ॥ २ ॥**

कर्तृकर्मग्रहणं चोपपदसंज्ञार्थं द्रष्टव्यम् । द्रैष्यं विजानीयादभिधेययोरिति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टे कर्तृकर्मग्रहणं चोपपदसंज्ञार्थमिति ॥

## [आतो युच् ॥ ३ । ३ । १२८ ॥ छन्दसि गत्यर्थेभ्यः ॥ ३ । ३ । १२९ ॥] अन्येभ्योऽपि दृश्यते ॥ ३ । ३ । १३० ॥

**भाषायां शासियुधिदृशिधृषिभ्यो युच् ॥ १ ॥**

भाषायां शासियुधिदृशिधृषिभ्यो युज्वक्तव्यः । दुःशासनः दुर्योधनः दुर्दर्शनः दुर्धर्षणः ॥

मृषेश्चेति वक्तव्यम् । दुर्मर्षणः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य तृतीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

(सू.१२७ वा १) उपपद जें कर्ता आणि कर्म असेल तें वस्तुतः तसें नसन तसें भासलेलें असा अर्थ विवक्षित असेल तरच खल् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० अनाढ्येन भवता ईषदाढ्येन शक्यं भवितुम् इति ईषदाढ्यंभवं भवता; दुराढ्यंभवम्, स्वाढ्यंभवम्.

(वा.२) येथें सूत्रामध्यें कर्तृकर्मणोः असें जें म्हटलें आहे त्याचा उपयोग उपपद संज्ञेकडे करावा. कर्ता तसेंच कर्म या अर्थी खल् प्रत्यय होतो असा करूं नये.ही गोष्ट मित्रत्वाच्या नात्यानें आचार्य वार्तिककार येथें 'कर्तृकर्मग्रहणं चोपपदार्थम्' या वार्तिकानें सांगत आहेत.

(सू.१३०वा१.) लौकिक प्रयोगामध्यें शास्, युध्, दृश्, आणि धृप् या धातूंहून युच् प्रत्यय होतो; ईषत्, दुस् किंवा सु हे शब्द उपपद असतांना असें म्हणावें. उदा०दुःशासनः, दुर्योधनः, दुर्दर्शनः, दुर्धर्षणः.

मृष् धातूहूनही युच् प्रत्यय होतो असें म्हणावें; दुर्मर्षणः.

---

१. कर्तृवाचक शब्द उपपद असतांना भू धातूहून भावे खल् प्रत्यय होतो. आणि कर्मवाचक शब्द उपपद असतांना कृञ् धातूहून कर्मे या अर्थी खल् प्रत्यय होतो. पण ईषत् ,दुस् किंवा सु यांपैकीं उपपद पाहिजेच. उदा० ईषदाढ्यंभवं भवता. (वस्तुतः आढ्य नसून थोडा आढ्य असल्यासारखी तुझी स्थिति आहे.) स्वाढ्यंकरो देवदत्तो भवता. (देवदत्त हा वस्तुतः आढ्य नसून तूं त्याला आढ्य केल्यासारखा दिसतो.)

१. (१२८) सुख किंवा दुःख हे अर्थ गम्यमना असताना आणि ईषत् दुस् किंवा सु यांपैकीं उपपद असतांना आकारान्त धातूहून युच् प्रत्यय होतो. उदा० ईषत्पानः सोमो भवता.

१. (१२९) सुख किंवा दुःख हे अर्थ गम्यमान असतांना आणि ईषत् दुस् किंवा सु यांपैकीं उपपद असतांना गत्यर्थक धातूहून वेदामध्यें युच् प्रत्यय होतो. उदा० सूपसदनः अग्निः.

१. इतर धातूहूनही वेदामध्यें हा युच् प्रत्यय झालेला दृष्टीस पडतो. उदा० सुदोहनामकृणोद् ब्रह्मणे गाम्.

## वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वा ॥ ३ । ३ । १३१॥

वत्करणं किमर्थम् । वर्तमानसामीप्ये वर्तमाने वेतीयत्युच्यमाने वर्तमाने ये प्रत्यया विहितास्ते वर्तमानसामीप्ये धातुमात्रात्स्युः । वत्करणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति। यदि च याभ्यः प्रकृतिभ्यो येन विशेषेण वर्तमाने प्रत्यया विहितास्ताभ्यः प्रकृतिभ्यस्तेनैव विशेषेण वर्तमानसामीप्ये भवन्ति ततोऽमी वर्तमानवत्कृताः स्युः । अथ हि प्रकृतिमात्राद्वा स्युः प्रत्ययमात्रं वा स्यान्नामी वर्तमानवत्कृताः स्युः ॥

इह वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वेत्युक्त्वा लडेवोदाह्रियते । यदि पुनर्वा लड् भवतीत्येवोच्येत ॥ अत उत्तरं पठति।

### वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वचनं शत्राद्यर्थम् ॥ १ ॥

वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वचनं क्रियते शत्राद्यर्थम् । शत्राद्यर्थोऽयमारम्भः। एषोऽस्मि पचन् । एषोऽस्मि पचमान इति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् ।लडादेशौ शतृशानचौ तत्र वा लड् भवतीत्येव सिद्धम् ॥ यौ तर्ह्यलडादेशौ । एषोऽस्मि पवमानः । एषोऽस्मि यजमान इति ॥ यौ चापि लडादेशौ तावपि प्रयोजयतः । वर्तमान-

---

(सू. १३१) येथें वत् असें कशाकरिता म्हटलें आहे? 'वर्तमानसामीप्ये वर्तमाने वा' असें सूत्र केलें तर वर्तमानकालीं जे प्रत्यय सांगितले आहेत ते सर्वच प्रत्यय वर्तमानसमीपकालीं वाटेल त्या धातूहून विकल्पानें होऊं लागतील. येथें वत् असें म्हटलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं कारण, ज्या धातूहून जें निमित्त धरून जो प्रत्यय वर्तमानकालीं सांगितला ( ३।३। १२३–१८८ ) असेल त्याच धातूहून तेंच निमित्त असतांना तोच प्रत्यय वर्तमानसमीपकालीं केला तर तो त्या वर्तमानासारखा केला असें होईल. आणि जर वाटेल त्या धातूहून वर्तमानकालीं सांगितलेल्या प्रत्ययांपैकीं वाटेल तो प्रत्यय केला तर तो त्या वर्तमानासारखा केला असें होणार नाहीं.

आतां ह्या सूत्रामध्यें वर्तमानवद्वा असें म्हणून उदाहरण एकट्या लट् प्रत्ययाचेंच दिलें जातें. तेव्हां जर येथें लट् प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हटलें तर काय होईल हा विचार मनांत आणून वार्तिककार म्हणतात.

(वा. १) येथें वर्तमानवत् असें जें म्हटलें आहे तें शतृ वगैरे प्रत्यय होण्याकरितां म्हटलें आहे. उदा० एषोऽस्मि पचन्; एषोऽस्मि पचमानः.

वर्तमानवत् म्हणण्याचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण शतृ व शानच् हे लटाचें स्थानींच होणारे आदेश आहेत. तेव्हां विकल्पानें लट् होतो एवढेंच म्हटलें तरी तें काम होईल.

तर मग लटाचे स्थानीं जे न होणारे आहेत त्या प्रत्ययांकरितां येथें वर्तमानवत् असें म्हटलें पाहिजे उदा एषोऽस्मि पवमानः; एषोऽस्मि यजमानः (३।२।१२८–१३०). शिवाय लटाचे स्थानीं जे शतृ व शानच् सांगितले आहेत त्यांकरितांही येथें वर्तमानवत् असें म्हटलें पाहिजे. कारण, वर्तमानकालीं सांगितलेल्याच

---

१ (१३१) वर्तमानकालाच्या अगदी जवळचा जो भूतकाल किंवा भविष्यकाल त्या कालच्या क्रियेचा वाचक जो धातु त्याहून वर्तमानकाली प्रत्यय होत असतांना तसेंच विकल्पानें करावें; उदा० केव्हां आलास? असा प्रश्न विचारला असतां 'आतां इतक्यांतच आलों' या अर्थाचें 'अयमागच्छामि' असें उत्तर दिलें जातें; 'आगच्छन्तमेव मां विद्धि' ( मी इतक्यांत येत आहे असें समज ) असेंही उत्तर दिलें जाते. तसेंच, तूं केव्हां जाणार? या प्रश्नाचें उत्तर 'एष गच्छामि' ( हा निघालोंच ) असें दिलें जातें. विकल्प असल्यामुळें 'एषोऽस्म्यागतः एष गमिष्यामि' असेंही होतें.

विहितस्य लटः शतृशानचावुच्येते अविशेषविहितश्चायं योगः । शत्राद्यर्थमिति खल्वप्युच्यते बहवश्च शत्रादयः । एषोऽस्म्यलंकरिष्णुः । एषोऽस्मि प्रजनिष्णुः ॥

**आशंसायां भूतवच्च ॥ ३ । ३ । १३२ ॥**

आशंसा नाम भविष्यत्काला ॥

**आशंसायां भूतवदतिदेशो लङ्लिटोः प्रतिषेधः ॥ १ ॥**

आशंसायां भूतवदतिदेशे लङ्लिटोः प्रतिषेधो वक्तव्यः ॥

**न वापवादस्य निमित्ताभावादनद्यतने हि तयोर्विधानम् ॥२॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । अपवादस्य निमित्ताभावात् । नात्रापवादस्य निमित्तमस्ति । कथम् । अनद्यतने हि तयोर्विधानम् । अनद्यतने हि तौ विधीयेते लङ्लिटौ न चात्रानद्यतनः कालो विवक्षितः । कस्तर्हि । भूतकालसामान्यम् ॥

---

लटाचे स्थानीं ते शतृ व शानच् (३।२।१२४) आदेश होणार आहेत; आणि येथें वर्तमानवत् असें न म्हणतां वा लट् असें म्हटलें तर हा लट् प्रत्यय वर्तमानकालीं सांगितला असें होत नाहीं. शिवाय, शत्राद्यर्थम् म्ह. शतृ वगैरे प्रत्यय होण्याकरितां असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे. आणि ते शतृ वगैरे प्रत्यय तर पुष्कळ आहेत. उदा० एषोऽस्मि अलंकरिष्णुः[2]. एषोऽस्मि प्रजनिष्णुः. ( ३।२।१३६ )

(सू. १३२) आशंसा ही भविष्यकाळचीच संभवते.

(वा.१) भूतकाळीं सांगितलेल्या प्रत्ययांचा जो येथें आशंसा अर्थ असतांना अतिदेश केला आहे त्या अतिदेशानें लङ् व लिट् प्राप्त होतात त्यांचा प्रतिषेध करावा[2].

(वा. २) अथवा हा प्रतिषेध सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं येथें अपवादाचें निमित्त नाहीं. म्हणजे सामान्यभूत काळीं सांगितलेल्या लुङ् प्रत्ययाचा अपवाद जे लङ् व लिट् त्यांचें निमित्त येथें नाहीं.

तें कसें ?

असें कीं–'अनद्यतने हि तयोर्विधानम्' म्ह. ते लङ् व लिट् हे प्रत्यय अनद्यतन कालीं सांगितले आहेत; आणि येथें तर अनद्यतन काल विवक्षित नाहीं.

मग येथें कोणत्या बरें कालाची विवक्षा आहे ?

सामान्यभूत कालाची विवक्षा आहे[3].

---

२ तेव्हां इष्णुच् वगैरे प्रत्यय लटाचे स्थानी होणार नव्हेत; म्हणून 'वा लट्' असें म्हटलें असतां ते होणार नाहींत. याकरितां येथें 'वर्तमानवत्' असें म्हटलें पाहिजे.

१(१३२)भूतकाळींआणि वर्तमानकाळीं सांगितलेले जे प्रत्यय ते भविष्यकाळींही होतात, परंतु आशंसा हा अर्थ गम्यमान असतांना. आशंसा म्हणजे न मिळालेली वस्तु मिळण्याची इच्छा. उपाध्याय येतील तर व्याकरणाध्ययन करूं या अर्थी'उपाध्यायश्चेदागमिष्यति व्याकरणमध्येष्यामहे' असा प्रयोग होतो. तेथें 'आगमिष्यति' याच्या ऐवजीं 'आगमत्', 'आगतः' 'आगच्छति' असा लुङ्, निष्ठा व लट्, यांचाही प्रयोग होतो. तसेंच 'अध्येष्यामहे' याचे ऐवजीं, अध्मगीष्महि', 'अधीतवन्तः', 'अधीमहे' यांचाही प्रयोग होतो.

२ कारण, जरी लङ् हा अनद्यतनभूत कालीं (३।२।१११) सांगितला आहे व त्यांतच क्रिया परोक्ष असेल तर लिट् (३।२।११५) सांगितला आहे तरी ते भूत कालीं सांगितले आहेत असें म्हणतां येतेंच.

३. सामान्यभूत कालाचा येथें भूतवत् हा निर्देश आहे तेव्हां अनद्यतनभूत कालीं सांगितलेल्या प्रत्ययाचा अतिदेश होत नाहीं. कारण, सामान्याचा अतिदेश केला असतांना विशेषाचा अतिदेश होत नाहीं अशी परिभाषा आहे.

**आशंसासंभावनयोरविशेषात्तद्विधानस्याप्राप्तिः ॥ ३ ॥**

आशंसा संभावनमित्यविशिष्टावेतावर्थौ । आशंसासंभावनयोरविशेषात्तद्विधानस्याप्राप्तिः । आशंसायां ये विधीयन्ते ते संभावनेऽपि प्राप्नुवन्ति ये च संभावने विधीयन्ते त आशंसायामपि प्राप्नुवन्ति । किं तर्ह्युच्यतेऽप्राप्तिरिति न साधीयः प्राप्तिर्भवति । इष्टा व्यवस्था न प्रकल्पेत । न सर्वे सर्वत्रेष्यन्ते ॥

**न वा संभावनावयवत्वादाशंसायाः ॥ ४ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । संभावनावयवत्वादाशंसायाः । संभावनावयवात्मिकाशंसा । आशंसा नाम प्रधारितोऽर्थोऽभिनीतश्चानभिनीतश्च । संभावनं नाम प्रधारितो ऽर्थो ऽभिनीत एव ॥

**अर्थासंदेहो वालमर्थत्वात्संभावनस्य ॥ ५ ॥**

अथवार्थासंदेह एव पुनरस्य । किं कारणम् । अलमर्थत्वात्संभावनस्य । संभावन आलमर्थ्यं गम्यत आशंसायां पुनरनालमर्थ्यम् ॥ आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति संभावने ऽप्यनालमर्थ्यं गम्यत इति यदयं संभावने ऽलमित्याह । तस्मात्सुष्ठूच्यते न वा संभावनावयवत्वादाशंसाया इति ॥

**क्षिप्रवचने लृट् ॥ ३ । ३ । १३३ ॥**

**क्षिप्रवचने लृट आशंसावचने लिङ्प्रतिषेधेन ॥ १ ॥**

क्षिप्रवचने लृट आशंसावचने लिङ्

---

(वा. ३) आशंसा आणि संभावन या दोहोंमध्यें फरक नाहीं. आणि फरक नसल्यामुळें 'तद्विधानस्य अप्राप्तिः' म्ह० आशंसा अर्थ असतांना जे प्रत्यय सांगितले आ॒ेत ते संभावन अर्थ असतानाही प्राप्त होतात; आणि संभावन अर्थ असतांना जे प्रत्यय सांगितले आहेत ते आशंसा अर्थ असतांनाही प्राप्त होतात.

तर मग वार्तिककारानीं 'प्राप्तिः' असें म्हटलें पाहिजे; 'अप्राप्तिः' असें कसें म्हटलें ?

प्राप्ति होते खरी, पण ती प्राप्ति चांगली नव्हे. त्यानें कांहीं इष्ट व्यवस्था होत नाहीं. कारण ते[४] सर्वच प्रत्यय सर्वत्र इष्ट नाहींत.

(वा. ४) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं आशंसा ही संभावनेपेक्षां निराळ्या स्वरूपाची आहे. आशंसा ज्या वस्तूविषयीं असते ती वस्तू मनानें निश्चित स्वरूपाची असते; मग ती वस्तू मिळण्यास शक्य असो किंवा नसो. आणि ज्या वस्तूविषयीं संभावना केली जाते ती वस्तू निश्चित स्वरूपाची असली तरी ती मिळण्यास शक्य अशीच असते.

(वा. ५) अथवा या दोन शब्दांचा अर्थ निःसंशयच निराळा आहे.

काय कारण ?

कारण असें कीं. संभावनेमध्यें सामर्थ्य गम्यमान होतें; आणि आशंसेमध्यें सामर्थ्य गम्यमान होत नाहीं.

पण संभावनेमध्येंही सामर्थ्य गम्यमान होतेंच असा नियम नाहीं असें 'संभावनेऽलमिति चेत्०' (३।३।१५४) या आचार्यांच्या कृतीवरून सूचित होत आहे. तेव्हां 'न वा संभावनावयवत्वात्' असा जो वार्तिककारानीं पूर्वी भेद दाखविला आहे तोच बरोबर आहे.

(सू. १३३ वा. १) 'क्षिप्रवचने लृट्' यापेक्षां

---

४. आशंसा शब्द उच्चारून सांगितलेले प्रत्यय हे संभावन शब्द उच्चारून सांगितलेल्या प्रत्ययाच्या विषयामध्यें इष्ट नाहीत; तसेंच उलट संभावन शब्द उच्चारून सांगितलेले प्रत्यय हे आशंसा शब्द उच्चारून सांगितलेल्या प्रत्ययाच्या विषयांत इष्ट नाहींत.

१. (१३३) क्षिप्र म्ह. शीघ्र या अर्थाचा शब्द उपपद असेल तर पूर्वसूत्राच्या विषयामध्यें भूतवत् प्रत्यय न करितां लृट् होतो. उदा० 'उपाध्यायश्चेत्क्षिप्रमागमिष्यति क्षिप्रं व्याकरणमध्येष्यामहे.'

भवति विप्रतिषेधेन । क्षिप्रवचने लृट् भवतीत्यस्यावकाशः । उपाध्यायश्चेदागतः क्षिप्रमध्येष्यामहे । आशंसावचने लिङ् भवतीत्यस्यावकाशः । उपाध्यायश्चेदागत आशंसे युक्तोऽधीयीय । इहोभयं प्राप्नोति उपाध्यायश्चेदागत आशंसे क्षिप्रमधीयीय । लिङ् भवति विप्रतिषेधेन ॥

**अनिष्पन्ने निष्पन्नशब्दः शिष्यो ऽनिष्पन्नत्वात् ॥ २ ॥**

अनिष्पन्ने निष्पन्नशब्दः शिष्यः शासितव्यः । किं कारणम् । अनिष्पन्नत्वात् । देवश्चेद्वृष्टो निष्पन्नाः शालयः । तत्र भवितव्यं संपत्स्यन्ते शालय इति ॥

**सिद्धं तु भविष्यत्प्रतिषेधात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । भविष्यत्प्रतिषेधात् । यल्लोको भविष्यद्वाचिनः शब्दस्य प्रयोगं न मृष्यति । कश्चिदाह । देवश्चेद्वृष्टः संपत्स्यन्ते शालय इति । स उच्यते । मैवं वोचः संपन्नाः शालय इत्येवं ब्रूहि ॥

**हेतुभूतकालसंप्रेक्षितत्वाद्वा ॥ ४ ॥**

हेतुभूतकालसंप्रेक्षितत्वाद्वा पुनः सिद्धमेतत् । हेतुभूतकालं वर्षं वर्षकाला च क्रिया ॥ यदि तर्हि निष्पन्नोऽर्थः किं निष्पन्नकार्याणि न क्रियन्ते । कानि । भोजनादीनि । अन्यदिदानीमेतदुच्यते किं निष्पन्नकार्याणि न क्रियन्त इति यत्तु

---

आशंसावचने लिङ्' या पुढील सूत्रानें सांगितलेला लिङ् विप्रतिषेधानें होतो. उपाध्यायश्चेदागतः क्षिप्रमध्येष्यामहे येथें क्षिप्रवचने लृट् याला अवकाश आहे. तसेंच उपाध्यायश्चेदागतः आशंसे युक्तोऽधीयीय येथें 'आशंसावचने लिङ्' याला अवकाश आहे. आणि उपाध्यायश्चेदागत: आशंसे क्षिप्रमधीयीय येथें दोघांची प्राप्ति येते. तेव्हां त्यांमध्यें विप्रतिषेधानें लिङ् होतो.

(वा. २) येथें उदाहरणामध्यें अनिष्पन्न अवस्था असतांनाही निष्पन्न शब्द घालण्याबद्दल सांगावें.

काय कारण ?

कारण असें कीं त्या वेळीं ती वस्तू निष्पन्न म्हणजे सिद्ध झालेली नसते. उदा० देवश्चेद् वृष्टो निष्पन्नाः शालयः येथें वस्तुस्थितीला अनुसरून संपत्स्यन्ते शालयः असा प्रयोग झाला पाहिजे.

(वा. ३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं, वर जें उदाहरण दाखविलें आहें तशा ठिकाणीं भविष्यकाळ दाखविणाऱ्या शब्दाचाच प्रयोग लोकांना खपत नाहीं. असें पहा कीं 'देवश्चेद् वृष्टः संपत्स्यन्ते शालयः' असा प्रयोग कोणीं केला तर लगेच त्याला दुसरा कोणी म्हणतो कीं 'अरे, असें बोलूं नको, तर 'संपन्नाः शालयः' असें म्हण.

(वा. ४) अथवा शालिनिष्पत्तीची कारणीभूत जी वृष्टि तिच्या कालाकडे नजर दिली असतां हें सिद्ध होत आहे. कारण वर्षाकाल हा निष्पत्तिक्रियेचा काल आहे. निष्पत्तिक्रिया ही वर्षाकालींच होणारी आहे.

पण जर पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्या अवस्थेंत शाली निष्पन्नच असतील तर शाली तयार झाल्यानंतर होणारीं कार्यें त्यावेळीं कां बरें केलीं जात नाहींत.

तीं कार्यें कोणतीं ?

भोजन वगैरे कार्यें. तीं त्या वेळीं त्या शालींच्या योगानें होत नाहींत.

शालिनिष्पत्ति झाल्यानंतर होणारीं भोजन वगैरें कार्यें त्या वेळीं केलीं जात नाहींत हें तुम्ही आतां निराळें बोलत आहांत. आमचें म्हणणें इतकेंच कीं शाली निष्पन्न आहेत कीं नाहींत

२. देवानें पाऊस पाडला कीं तांदूळ तयार झालाच असा या वाक्याचा अर्थ आहे.

३. पेरणी झाल्यानंतर फक्त पावसाचीच अपेक्षा उरली. त्या अवस्थेंत शाली तयारच आहेत. फक्त पावसानें ते स्थूल रूपानें दृष्टिगोचर होणार. तेव्हां तेथें 'संपत्स्यन्ते' असें म्हणतां येत नाहीं. 'संपन्नाः' असेंच म्हणणें योग्य आहे.

तन्निष्पन्नोऽर्थो न निष्पन्न इति स निष्पन्नोऽर्थः । अवश्यं खल्वपि कोष्ठगतेष्वपि शालिष्ववहननादीनि प्रतीक्ष्याणि । एवमिहापि निष्पन्नोऽर्थोऽवश्यं तु जननादीनि प्रतीक्ष्याणि ॥

**अस्त्यर्थानां भवन्त्यर्थे सर्वा विभक्तयः कर्तुर्विद्यमानत्वात् ॥ ५ ॥**

अस्त्यर्थानां भवन्त्यर्थे सर्वा विभक्तयः शासितव्याः । कूपोऽस्ति । कूपो भविष्यति । कूपो भविता । कूपोऽभूत् । कूप आसीत् । कूपो बभूवेति । कथं पुनर्ज्ञायते भवन्त्या एषोर्थ इति । कर्तुर्विद्यमानत्वात् । कर्तात्र विद्यते । कथं पुनर्ज्ञायते कर्तात्र विद्यत इति । कूपोऽनेन कदाचिद् दृष्टो न चास्य कंचिदप्यपायं पश्यति । स तु तत्र बुद्ध्या नित्यां सत्तामध्यवस्यति कूपोऽस्तीति ॥

**सिद्धं तु यथास्वं कालसमुच्चारणात् ॥ ६ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यथास्वमेता विभक्तयः स्वेषु स्वेषु कालेषु प्रयुज्यन्त इति ॥ कथं पुनर्ज्ञायते यथास्वमेता विभक्तयः स्वेषु स्वेषु कालेषु प्रयुज्यन्त इति ।

**अवात्वात् ॥ ७ ॥**

यन्न वा भाष्यन्ते ॥

**असिद्धविपर्यासश्च ॥ ८ ॥**

असिद्धश्च विपर्यासः। न हीह कश्चित्कूपो·

---

तर निष्पन्न आहेत एवढेंच आम्हांला सांगावयाचें आहे. शिवाय, तुमच्या म्हणण्याप्रमाणें शाली निष्पन्न म्हणजे स्थूल रूपांत आलेले व घरामध्यें कोठारांत भरून ठेविलेले असले तरी भोजन वगैरे कामीं उपयोगीं पडावेत म्हणून सडून घेण्याकरितां वाट पाहावी लागतेच. तसे पूर्वावस्थेंतही शाली निष्पन्न आहेतच; फक्त त्यांना स्थूल रूप प्राप्त होण्याकरितां कांहीं काळपर्यंत वाट पाहावी लागते.

(वा. ५) तिन्ही कालीं सांगितलेले लकार सत्ता या अर्थाच्या धातूहून लटाच्या अर्थी होतात असें म्हणावें. उदा० कूपोऽस्ति[4], कूपो भविष्यति, कूपो भविता, कूपोऽभूत्, कूप आसीत्, कूपो बभूव.

पण कूपो भविष्यति वगैरे प्रयोग लटाच्या अर्थी आहेत म्हणजे वर्तमान काल दाखविणारे आहेत असें कशावरून समजावें ?

कर्तुर्विद्यमानत्वात् म्हणजे कूप हा कर्ता तेथें अस्तित्वांत आहे यावरून समजावें.

पण कर्ता आहे हें तरी कशावरून गृहीत धरावें ?

अशावरून गृहीत धरितां येतें कीं प्रयोगकर्त्यानें एखाद्या ठिकाणीं असलेली विहीर केव्हां तरी सहज पाहिली व त्यानंतर ती बुजविली असें कांहींच त्याच्या ऐकण्यांत आलें नाहीं; तेव्हां त्या ठिकाणीं ती कायमची आहेच असें साहजिकच त्याच्या मनांत येतें.

( वा. ६ ) हें सिद्ध होत आहे ?

तें कसें ?

असें कीं, हे जे येथें लट् लुट् वगैरे प्रत्यय झाले आहेत ते ज्या कालीं जे सांगितले तसेच ते तेथें आपापल्या कालींच झाले आहेत.

पण, हे येथें जसे सांगितले आहेत तसे आपापल्या कालींच झाले आहेत असें कशावरून समजावें ?

( वा. ७ ) अशावरून समजावें कीं ते प्रत्यय कांहीं विकल्पानें सांगितले नाहींत.[5]

( वा. ८ ) शिवाय भूत कालीं व भविष्य कालीं सांगितलेले प्रत्यय सत्तार्थक धातूहून वर्तमान कालीं होतात असा जो येथें 'अस्त्यर्थानाम्' यानें विपर्यास केला आहे तो प्रयोगांत रूढ झालेला दिसत नाहीं, कारण जेथें कूपोऽस्ति

---

४. कूपोऽस्ति म्ह. कूप आहे. याच अर्थाचे पुढील पांचही प्रयोग आहेत त्यांमध्यें अस् धातूहून क्रमानें लृट् लुट्, लुङ्, लङ्, आणि लिट् हे प्रत्यय झाले आहेत. लङाशिवाय इतर चारहीं प्रयोगांमध्यें अस् धातूला भू आदेश (२।४।५२) झाला आहे.

५. तेव्हां अर्थातच त्यांची प्राप्ति येथें येते म्हणून ते केलेच पाहिजेत.

ऽस्तीति प्रयोक्तव्ये कूपोऽभूदिति प्रयुङ्क्ते॥ किं पुनः कारणं न वा भाष्यन्ते ऽसिद्धश्च विपर्यासः। इह किंचिदिन्द्रियकर्म किंचिद् बुद्धिकर्म। इन्द्रियकर्म समासादनं बुद्धिकर्म व्यवसायः। एवं हि कश्चित्पाटलिपुत्रं जिगमिषुराह। योऽयमध्वा गन्तव्य आ पाटलिपुत्रादेतस्मिन्कूपो भविष्यति। अनद्यतने कूपो भवितेति। समासाद्य कूपोऽस्तीति। समासाद्यातिक्रम्य कूपोऽभूदिति। समासाद्यातिक्रम्योषित्वा कूप आसीदिति। समासाद्यातिक्रम्योषित्वा विस्मृत्य कूपो बभूवेति। तद्यदेन्द्रियकर्म तदैता विभक्तयो यदा हि बुद्धिकर्म तदा वर्तमाना भविष्यति॥

[ आशंसावचने लिङ् ॥ ३। ३। १३४॥ ][1]

ना ऽनद्यतनवत्क्रियाप्रबन्धसामीप्ययोः ॥ ३। ३। १३५॥[1]

किमर्थमिमौ द्वौ प्रतिषेधावुच्येते नाद्यतनवदित्येवोच्येत।

**नानद्यतनवत्प्रतिषेधे लङ्लुटोः प्रतिषेधः॥ १॥**

---

असा प्रयोग होतो; तेथं कांहीं कूपोऽभूत् असा प्रयोग कोणीं केलेला दिसत नाहीं.

पण ते प्रत्यय विकल्पानें सांगितले नाहींत व त्यांचा विपर्यासही रूढ नाहीं याचें काय बरें कारण ?

कारण असें कीं:– लोकामध्यें कर्म दोन प्रकारचें आहे. एक इन्द्रियाचें व दुसरें बुद्धीचें. इन्द्रियाचें कर्म म्हणजे विषय प्राप्त होणें. आणि बुद्धीचें कर्म म्हणजे विषय मनांत आणणें. असें पहा कीं लोकामध्यें पाटलिपुत्राला निघालेला कोणी मनुष्य असें म्हणतो कीं - हा जो आपल्याला पाटलिपुत्रापर्यंत मार्ग क्रमावयाचा आहे त्यामध्यें अमुक ठिकाणीं 'कूपो भविष्यति' म्हणजे विहीर येईल. अनद्यतनकालीं येणारी असेल तर 'कूपो भविता' म्हणजे उद्यां अमक्या ठिकाणीं विहीर येईल, असें म्हणतो. विहिरीच्या जवळ आला म्हणजे 'कूपोऽस्ति' असा प्रयोग करतो. त्याच्या पुढें गेला म्हणजे म्हणतो कीं– 'कूपोऽभूत' म्ह. विहीर होती, असा प्रयोग करतो. त्याच्याही पुढें रात्रीं कोठें तरी वस्ती करून दुसरे दिवशीं म्हणतो कीं–'कूप आसीत्' म्ह. काल अमुक ठिकाणीं विहीर होती असें म्हणतो. तसेंच पुढें जाऊन कांहीं दिवस वस्ती करून त्या गोष्टीचें विस्मरण झाल्यानंतर म्हणतो कीं--'कूपो बभूव' म्ह. 'मध्यें कोठें तरी विहीर होती' असें म्हणतो. हे तिन्ही कालचे प्रयोग इन्द्रियकर्म जेव्हां घ्यावें तेव्हां जुळतात. आतां बुद्धिकर्म जेव्हां घ्यावें तेव्हां मनामध्यें विहिरीचें अस्तित्व नित्यच असल्यामुळें कूपोऽस्ति असा नेहमीं वर्तमान कालाचाच प्रयोग होईल.

(सू. १३५) ह्या सूत्रामध्यें दोन नञ् कशाकरितां उच्चारले आहेत ? तसे उच्चारूं नयेत. तर 'अद्यतनवत्' असेंच उच्चारावें.

---

१. (१३४) आशंसावाचक शब्द उपपद असतांना भविष्य कालीं लिङ् प्रत्यय होतो. तेथें भूतवत् प्रत्यय (३।३।१३२) करूं नयेत उदा० उपाध्यायश्चेदागच्छेत्, आशंसे युक्तः अधीयीय.

१. (१३५) धातूहून अनद्यतन कालीं सांगितलेले प्रत्यय होत नाहींत; पण धात्वर्थ जी क्रिया ती नेहमींचीं किंवा समीपकालची विवक्षित असली पाहिजे. उदा० यावज्जीवमन्नमदात्. येथें पौर्णमास्यतिक्रान्ता तस्यां गामदित, येथें अनद्यतनभूत कालीं प्राप्त झालेल्या लङाचा यानें निषेध केला आहे. तेव्हां सामान्यभूत कालीं सांगितलेला लुङ् (३।२।११०) होतो. तसेंच यावज्जीवमन्नं दास्यति; येथें पौर्णमास्यागामिनी तस्यां गां दास्यति. येथें अनद्यतनभविष्य कालीं प्राप्त झालेल्या लुट् प्रत्ययाचा यानें निषेध केला आहे, तेव्हां सामान्यभविष्य कालीं सांगितलेला लृट् प्रत्यय (३।३।१३) होतो.

नानद्यतनवत्प्रतिषेधे लङ्लुटोः प्रतिषेधो द्रष्टव्यः ॥

**अद्यतनवद्वचने हि विधानम् ॥ २ ॥**

अद्यतनवद्वचने हि सति विधिरयं विज्ञायेत ॥ तत्र को दोषः ।

**तत्र लड्विधिप्रसङ्गः ॥ ३ ॥**

तत्र लड्विधिः प्रसज्येत ॥

**लुङ्लृटोश्चायथाकालम् ॥ ४ ॥**

लुङ्लृटोश्चायथाकालं प्रयोगः प्रसज्येत । लुङोऽपि विषये लृट् स्यात् । लृटश्च विषये लुङ् स्यात् ॥ अद्य पुनरयं द्वौ प्रतिषेधावुक्त्वा तूष्णीमास्ते यथाप्राप्तमेवाद्यतने भविष्यतीति ॥

**भविष्यति मर्यादावचनेऽवरस्मिन् ॥ ३ । ३ । १३६ ॥**

किमर्थमिदमुच्यते न नानद्यतनवदित्येव सिद्धम् ।

**भविष्यति मर्यादावचनेऽवरस्मिन्नित्यक्रियाप्रबन्धार्थम् ॥ १ ॥**

अक्रियाप्रबन्धार्थोऽयमारम्भः ॥ किमुच्यतेऽक्रियाप्रबन्धार्थ इति न पुनः क्रियाप्रबन्धार्थोऽपि स्यात् ।

**क्रियाप्रबन्धार्थमिति चेद्वचनानर्थक्यम् ॥ २ ॥**

---

(वा. १) नानद्यतनवत् असे दोन नञ् उच्चारून हा निषेध सांगितला म्हणजे तो फक्त लङ् आणि लुट् यांचा प्रतिषेध होतो.

(वा. २) अद्यतनवत् असें म्हटलें तर अद्यतनीं होणाऱ्या प्रत्ययाचें येथें विधान केलें असें होईल.

मग तसें झालें तर दोष काय येतो ?

(वा. ३) तसें झालें असतां येथें लटाचें विधान केलें जाईल.[२]

(वा. ४) तसेंच लुङ् आणि लृट् यांचा भलत्या काळीं प्रयोग होईल.[३] म्हणजे अद्यतन भूतकाल हा लुङाचा विषय आहे, तेथेही लृट् होऊं लागेल; आणि अद्यतन भविष्यकाल हा लृटाचा विषय आहे, तेथेंही लुङ् होऊं लागेल. आणि या सूत्रामध्यें दोन नञ् उच्चारले म्हणजे मात्र आपल्या उदाहरणामध्यें प्राप्त झालेल्या लङ् किंवा लुट् यांना फक्त मागें सारून हा निषेध स्वस्थ बसतो. तसें झाल्यानें तर अद्यतनकालीं होणारे प्रत्यय त्या त्या सूत्रांनीं आपोआपच होतील.[४]

(सू. १३६)[१] हें सूत्र आणि पुढील सूत्र कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. कारण नानद्यतनवत्० या पूर्व सूत्रानेंच यांचीं उदाहरणें सिद्ध होतात.

(वा. १) क्रियाप्रबन्ध म्हणजे कायमची क्रिया. तशी नसलेल्या ठिकाणीं निषेध होण्याकरितां हें सूत्र केलें आहे.

नेहमींची क्रिया नसतांना असें कां म्हणतां ? नेहमींची क्रिया असेल त्या ठिकाणींही निषेध होण्याकरितां असें कां म्हणत नाहीं ?

---

२. कारण, अद्यतन कालामध्यें वर्तमान कालही असूं शकतो; म्हणून तेथें लट् प्रत्यय होत असतो.

३. अद्यतन कालीं होणाऱ्या लुङ् आणि लृट् प्रत्ययांचें प्रकृत सूत्रानें विधान केलें असें होईल. तेव्हां अद्यतनभूत कालीही लुङाप्रमाणें लृट् होऊं लागेल, आणि अद्यतनभविष्य कालींही लृटाप्रमाणें लुङ् होऊं लागेल.

४. त्या त्या सूत्रांनीं लुङ् आणि लृट् झाले म्हणजे भलत्या कालीं होण्याचा संभवच नाहीं.

१.(१३६) मर्यादित देशांतील अनेक भागांपैकीं पूर्वभागामध्यें होणारी जी भविष्यकालाची क्रिया तद्वाचक धातूहून अनद्यतनभविष्य कालीं प्राप्त झालेला लुट् प्रत्यय होत नाहीं. उदा० योऽयमध्वा गन्तव्य आ पाटलिपुत्रात् तस्य यदवरं कौशाम्ब्याः तत्र सक्तून् पास्यामः (जो हा पाटलिपुत्रापर्यंत आपल्याला मार्ग क्रमावयाचा आहे त्यांतील कौशाम्बी नगराच्या अलीकडील प्रदेशामध्यें सक्तु प्राशन करूं.)

क्रियाप्रबन्धार्थमिति चेद्वचनमनर्थकम्। सिद्धं क्रियाप्रबन्धे पूर्वेणैव ॥

इदं तर्हि प्रयोजनमनहोरात्राणामिति वक्ष्यामीति । इह मा भूत्। योऽयं त्रिंशद्रात्र आगामी तस्य यो ऽवरः पञ्चदशरात्र इति।

**अहोरात्रप्रतिषेधार्थमिति चेन्नानिष्टत्वात् ॥ ३ ॥**

अहोरात्रप्रतिषेधार्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । अनिष्टत्वात् । अत्रापि नानद्यतनवदित्येवेष्यते ॥

इदं तर्हि प्रयोजनं भविष्यतीति वक्ष्यामीति । इह मा भूत् । योऽयमध्वा गत आपाटलिपुत्रात्तस्य यदवरं साकेतादिति । नानिष्टत्वात् । अत्रापि नानद्यतनवदित्येवेष्यते ॥ इदं तर्हि प्रयोजनं मर्यादावचन इति वक्ष्यामीति । इह मा भूत् । यो ऽयमध्वाऽपरिमाणो गन्तव्यस्तस्य यदवरं साकेतादिति। नानिष्टत्वात्। अत्रापि नानद्यतनवदित्येवेष्यते ॥ इदं तर्हि प्रयोजनमवरस्मिन्निति वक्ष्यामीति । इह मा भूत्। योऽयमध्वा ऽऽ पाटलिपुत्राद्गन्तव्यस्तस्य यत्परं साकेतादिति। नानिष्टत्वात्। अत्रापि

---

( वा. २ ) नेहमींची क्रिया असेल त्या ठिकाणीं निषेध होण्याकरितां असें म्हटलें तर त्याकरितां मुळींच हें वचन करावयास नको. कारण नेहमींची क्रिया असेल तर तेथें पूर्व सूत्रानेंच निषेध सिद्ध होत आहे.

तर मग पुढील सूत्राचा उपयोग असा समजावा कीं 'अनहोरात्राणाम्' असें तेथें म्हणावयाचें आहे. त्यामुळें 'योऽयं त्रिंशद्रात्र आगामी तस्य योऽवरः पञ्चदशरात्रः' असा विभाग दाखविला असेल तेथें पूर्वसूत्रानें निषेध न झाला पाहिजे.

( वा. ३ ) अहोरात्रामुळें होणारा विभाग दाखविला असेल तेथें निषेध न होण्याकरतां असें म्हणणें असेल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं-- तेथें निषेध न होणें इष्ट नाहीं. तशा ठिकाणींही[२] नानद्यतनवत् या पूर्वसूत्रानें निषेध होणें हेंच इष्ट आहे.

तर मग या सूत्राचा उपयोग असा कीं भविष्यति असें येथें म्हटलें आहे. त्यामुळें 'योऽयमध्वा गतः आ पाटलिपुत्रात् तस्य यदवरं साकेतात्' असा भूतकालाचा विभाग दाखविला असेल तेथें पूर्वसूत्रानें निषेध न झाला पाहिजे.

हेंही बरोबर नाहीं. कारण तेथेंही निषेध न होणें हें इष्ट नाहीं तर तेथेंही नानद्यतनवत्० या पूर्वसूत्रानें निषेध होणें हेंच इष्ट आहे.

तर मग या सूत्राचा उपयोग असा कीं मर्यादावचने असें येथें म्हटलें आहे. तेव्हां पाटलिपुत्र ही मर्यादा न दाखवितां मोघम 'योऽयमध्वा गन्तव्यः तस्य यदवरं साकेतात्' असा अमर्यादित प्रदेशाचा विभाग दाखविला असतां तेथें पूर्वसूत्रानें निषेध न झाला पाहिजे.

हेंही बरोबर नाहीं. कारण तेथेंही निषेध न होणें इष्ट नाहीं. तर तेथ 'नानद्यतवत्०' या पूर्वसूत्रानें निषेध होणें इष्टच आहे.

तर मग या सूत्राचा उपयोग असा कीं अवरस्मिन् असें येथें म्हटलें आहे. तेव्हां 'योऽयमध्वा गन्तव्य आ पाटलिपुत्रात् तस्य यत्परं साकेतात्' अशी साकेताच्या पलीकडील विभागामधील क्रिया दाखवावयाची असतांना तेथें पूर्वसूत्रानें निषेध न झाला पाहिजे.

हेंहीं बरोबर नाहीं. कारण तेथेंही निषेध न होणें इष्ट नाहीं. तर तेथें नानद्यतनवत्० या पूर्वसूत्रानें निषेध होणें हेंच इष्ट आहे. तेव्हां

---

२. नेहमींची क्रिया नसेल त्या ठिकाणीं जर अहोरात्रामुळें कालाचा विभाग दाखविला असेल तर तेथें 'कालविभागे०' या सूत्रानें निषेध न व्हावा हा 'अनहोरात्राणाम्' याचा उपयोग होत असल्यामुळें नेहमींचा क्रिया असेल त्या ठिकाणीं अहोरात्रामुळें कालाचा विभाग दाखवावयाचा असतां तेथें पूर्वसूत्राचा बाध करण्याचें सामर्थ्य 'अनहोरात्राणाम्' यामध्यें नाहीं.

नानद्यतनवदित्येवेष्यते ॥ तस्मात्सुष्ठूच्यते भविष्यति मर्यादावचने ऽवरस्मिन्नित्यक्रियाप्रबन्धार्थं क्रियाप्रबन्धार्थमिति चेद्वचनानर्थक्यमिति ॥

**[1]कालविभागे चानहोरात्राणाम् ॥ ३ । ३ । १३७ ॥**

**अनहोरात्राणामिति तद्विभागे प्रतिषेधः ॥ १ ॥**

अनहोरात्राणामिति तद्विभागे प्रतिषेधो वक्तव्यः। यो ऽयं त्रिंशद्रात्र आगामी तस्य यो ऽवरो ऽर्धमास इति ॥

**तैश्च विभागे ॥ २ ॥**

तैश्च विभाग इति वक्तव्यम्। यो ऽयं मास आगामी तस्य यो ऽवरः पञ्चदशरात्र इति ॥ द्वेष्यं विजानीयादहोरात्राणामेवाहोरात्रैर्विभागे प्रतिषेधो भवतीति। तदाचार्यः सुहृद् भूत्वान्वाचष्टेऽनहोरात्राणामिति तेषां विभागे तैश्च विभाग इति ॥

**[1]परस्मिन्विभाषा ॥ ३ । ३ । १३८ ॥**

कस्मिन्परस्मिन्। कालविभागे। कुत एतत्। योगविभागकरणसामर्थ्यात् ॥

**[1]लिङ्निमित्ते लृङ् क्रियातिपत्तौ ॥ ३ । ३ । १३९ ॥**

---

एकंदरींत 'नेहमींची क्रिया नसेल त्या ठिकाणीं निषेध होण्याकरतां हीं सूत्रें केलीं आहेत, नेहमींची क्रिया असेल तर पूर्वसूत्रानेंच सिद्ध होत आहे' असें जें पूर्वी (वा.१,२) सांगितलें आहे तेंच बरोबर आहे.

(सू.१३७ वा. १) येथें 'अनहोरात्राणाम्' असें मोघम म्हटलें आहे. तेव्हां अहोरात्रामुळें मर्यादित झालेल्या कालाचा विभाग दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेनें दाखविला असेल तेथें हा प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या निषेधाचा प्रतिषेध होतो असें म्हणावें. उदा०–योऽयं त्रिंशद्रात्र आगामी तस्य योऽवरोऽर्धमासः[2].

(वा. २) तसेंच कोणत्याही तऱ्हेनें मर्यादित झालेल्या कालाचा विभाग जर अहोरात्रामुळें दाखविला असेल तर तेथेंही प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या निषेधाचा प्रतिषेध होतो असें म्हणावें उदा० 'योऽयं मास आगामी तस्य योऽवरः पञ्चदशरात्रः' एकंदरींत अहोरात्रामुळें मर्यादित झालेल्या कालाचा विभाग अहोरात्रामुळेंच दाखविला असेल तेथेंच प्रकृतसूत्र प्रवृत्त होत नाहीं अशी जी कांहीं लोकाची समजूत आहे ती त्याज्य होय. हीच गोष्ट येथें 'अनहोरात्राणामिति[3] तेषां विभागे तैश्च विभागे' असें लिहून आचार्य वार्तिककारांनीं मित्रत्वाच्या नात्यानें सांगितली आहे.

(सू. १३८) येथें पर शब्दानें जो पुढील विभाग घ्यावयाचा तो देशाचा कीं कालाचा?

कालाचाच पुढील विभाग येथें घ्यावयाचा आहे.

हें कशावरून समजावें?

पूर्वींचीं दोन सूत्रें निरनिराळीं केलीं त्यावरूनच हें समजावें.

सूत्रकाराच्या मनांतील अभिप्राय येथें वार्तिककारांनीं स्पष्ट केला आहे.

---

१.(१३७)मर्यादित कालांतील अवांतर मर्यादेच्या पूर्वकालामध्यें होणारी जी भविष्यकालची क्रिया तद्वाचक धातूहून अनद्यतन भविष्यकालीं प्राप्त झालेला लुट् प्रत्यय होत नाहीं. पण तो कालाचा विभाग अहोरात्रामुळें होणारा नसला पाहिजे. उदा० योऽयं संवत्सर आगामी तस्य यदवरमाग्रहायण्यास्तत्राध्येष्यामहे.

२ 'तत्र अध्येतास्महे' असा येथें लुट् प्रत्यय होतो. त्याचा निषेध होत नाहीं.

३. 'अनहोरात्राणाम्' ही षष्ठी सामान्यसंबंधार्थक आहे, त्यामुळें या दोन्हीं तऱ्हांचा संग्रह होतो, हा

१. (१३८) मर्यादित कालांतील अवांतर मर्यादेच्या उत्तरकालामध्यें होणारी जी भविष्यकालची क्रिया तद्वाचक धातूहून अनद्यतनभविष्य कालीं प्राप्त झालेला लुट् प्रत्यय विकल्पानें होतो; पण तो कालाचा विभाग अहोरात्रामुळें होणारा नसला पाहिजे; उदा० योऽयं संवत्सर आगामी तस्य यत्परमाग्रहायण्यास्तत्राध्येतास्महे. येथें एकदां अध्येष्यामहे असेंही होतें.

१.(१३९)लिङाचें निमित्त असतांना धातूहून भविष्य-

साधनातिपत्तावित्यपि वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । अभोक्ष्यत भवान्मांसेन यदि मत्समीप आसिष्यतेति ॥ तर्त्ताहि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नान्तरेण साधनं क्रियायाः प्रवृत्तिरस्तीति साधनातिपत्तिश्चेत्क्रियातिपत्तिरपि भवति तत्र क्रियातिपत्तावित्येव सिद्धम् ॥

## भूते च ॥ ३ । ३ । १४० ॥

### भूते लृङुताप्यादिषु ॥ १ ॥

भूते लृङुताप्यादिषु द्रष्टव्यः । उताध्यैष्यत । अप्यध्यैष्यत ॥

## वोताप्योः ॥ ३ । ३ । १४१ ॥

### विभाषा गर्हाप्रभृतौ प्रागुतापिभ्याम् ॥ १ ॥

विभाषा गर्हाप्रभृतौ प्रागुतापिभ्यामिति वक्तव्यम्॥ वोताप्योरिति ह्युच्यमान संदेहः स्यात्प्राग्वोतापिभ्यां सह वेति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टे विभाषा गर्हाप्रभृतौ

---

( सू. १३९ ) साधनाची अनिष्पत्ति असतांना असेंही येथें म्हणावें कारण 'अभोक्ष्यत भवान् मांसेन यदि मत्समीप आसिष्यत' येथेंही लृङ् प्रत्यय झाला पाहिजे.

तर मग तसें येथें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण साधनावांचून क्रियेची प्रवृत्तीच होत नाहीं. तेव्हां ज्या ठिकाणीं जें साधन नसेल त्या ठिकाणीं त्या साधनानें होणारी विशेष प्रकारची ती क्रियाही होत नाहीं असें अर्थातच सिद्ध होतें. तेव्हां क्रियेची अनिष्पत्ति गम्यमान असतांना या म्हणण्यानेंच तेथेंही सिद्धी होते.

( सू. १४० वा १ ) हा जो भूतकालीं लृङ् प्रत्यय लिङाच्या निमित्तानेंच सांगितला आहे तीं लिङाचीं निमित्तें 'उताप्योः' ( ३।३।१५२ ) या सूत्रापासून पुढें आहेत. उदा०–उताध्यैष्यत, अप्यध्यैष्यत.

( सू. १४१ वा १ ) हा जो भूतकालीं लृङ् प्रत्ययाचा विकल्प लिङाच्या निमित्तानेंच सांगितला आहे तीं लिङाचीं निमित्तें 'गर्हायाम्०' या पुढील सूत्रापासून 'उताप्योः' या सूत्राच्या पूर्वींचीं घ्यावींत. सूत्रकारांनी जें 'आ उताप्योः' असें म्हटलें आहे त्यावरून संशय उत्पन्न होतो. तो असा कीं–'उताप्योः' या सूत्राच्या पूर्वी किंवा उताप्योः हें सूत्र त्यांत धरावयाचें ? म्हणून येथें आचार्य वार्तिककार मित्रत्वाच्या नात्यानें सांगतात कीं–पुढील सूत्रापासून 'उताप्योः' याच्या पूर्वींचींच लिङाचीं निमित्तें येथे पहावयाचीं.

---

कालीं लृङ् प्रत्यय होतो, परंतु तेथें क्रियेची अनिष्पत्ति गम्यमान असली पाहिजे; उदा० अभोक्ष्यत भवान् यदि मत्समीप आसिष्यत ( जर तूं माझ्याजवळ असशील तर तुला जेवावयाला मिळेल ). जेव्हां जवळ असण्याचा संभव नाहीं अशा वेळचें हें वाक्य आहे. त्यामुळें येथें क्रियेची अनिष्पत्ति आहे. दोन क्रियांमध्यें कार्यकारणभाव असणें हें लिङाचें निमित्त ( ३।३।१५६ ) आहे तें तेथें आहे. जवळ असणें हें भोजन क्रियेचें कारण आहे.

२. जर माझ्याजवळ असशील तर तुला मांस भोजन करावयाला सांपडेल असा याचा अर्थ आहे. येथें जवळ असण्याचा संभव नसल्यामुळें भोजनामध्यें फक्त मांस मिळणार नाहीं; साधें भोजन मिळेलच. तेव्हां भोजन क्रियेची अनिष्पत्ति येथें नाहीं. फक्त भोजनाचें एक प्रकारचें साधन जें मांस त्याची अनिष्पत्ति आहे.

१ (१४०)लिङाचें निमित्त असतांना धातूहून भूतकालीं लृङ् प्रत्यय होतो. परंतु तेथें क्रियेची अनिष्पत्ति गम्यमान असली पाहिजे, उदा.-अभोक्ष्यत भवान् यदि मत्समीप आसिष्यत ( जर माझ्याजवळ असतास तर तुला जेवावयास मिळालें असतें. )

१. (१४१) या सूत्रामध्यें 'वा आ उताप्योः' असा पदच्छेद आहे. या सूत्रापासून उताप्योः० (३।३।१५२) या सूत्राच्या मागील सूत्रापर्यंत जीं जीं निमित्तें धरून लिङ् प्रत्यय सांगितला आहे तीं तीं निमित्तें असतांना तेथें जो पूर्वसूत्रानें भूतकालीं लृङ् प्रत्यय सांगितला आहे तो विकल्पानें करावा. उदा०–कथं नाम तत्रभवान् वृषलमयाजयिष्यत्.

प्रागुतापिभ्यामिति ॥

**गर्हायां लडपिजात्वोः ॥ ३।३।१४२॥**

**गर्हायां लड्विधानमनर्थक्यं क्रियासमाप्तिविवक्षितत्वात् ॥ १ ॥**

गर्हायां लड्विधिरनर्थकः । किं कारणम् । क्रियासमाप्तिविवक्षितत्वात् । क्रियाया अत्रासमाप्तिर्गम्यते । एष च नाम न्याय्यो वर्तमानः कालो यत्र क्रियाऽपरिसमाप्ता भवति तत्र वर्तमाने लट् [ ३.२.१२३ ] इत्येव सिद्धम् ॥ यदि वर्तमाने लडित्येवमत्र लड्भवति शतृशानचौ प्राप्नुतः । इष्येते च शतृशानचौ । अपि मां याजयन्तं पश्य । अपि मां याजयमानं पश्य ।

**[ विभाषा कथमि लिङ् च ॥ ३।३।१४३॥**

**किंवृत्ते लिङ्लृटौ ॥ ३।३।१४४॥]**

**अनवक्लृप्त्यमर्षयोरकिंवृत्तेऽपि ॥ ३।३।१४५॥**

---

(सू. १४२ वा १) हा जो गर्हा अर्थ असतांना येथें लट् प्रत्यय सांगितला आहे तो व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं येथें क्रिया[2] संपलीच नाहीं अशी विवक्षा आहे. आणि जेथें क्रिया संपली नाहीं तेथें तो योग्य रीतीनेंच वर्तमान काल समजला जातो. तेव्हां वर्तमाने लट् (३।२।१२३) या सूत्रानेंच तेथें लट् प्रत्यय सिद्ध होत आहे.

पण जर वर्तमानकाल समजून लट् करावा तर त्याला शतृ व शानच् आदेश (३।२।१२४) ही होतील.

शतृ व शानच् आदेश तेथें इष्टच आहेत. उदा०— अपि मां याजयन्तं पश्य, अपि मां याजयमानं पश्य.

---

येथें एकदा 'याजयेत्' असेंही होतें.

१.(१४२)अपि किंवा जातु हे शब्द उपपद असतांना आणि कुत्सा गम्यमान असतांना धातूहून सामान्यकालीं लट् प्रत्यय होतो उदा०-अपि नाम तत्रभवान् वृषलं याजयति (काय तूं वृषलाकडून यजन केलेस, करतोस, करशील ही गोष्ट बरोबर नाहीं.)

२. यजन करविणें इत्यादि क्रिया.

१.(१४३) कथम्'हा शब्द उपपद असतांना आणि कुत्सा हा अर्थ गम्यमान असतांना धातूहून लिङ् आणि लट् हे प्रत्यय विकल्पानें होतात; उदा०-कथं नाम तत्रभवान् वृषलं याजयेत् याजयति वा. हे प्रत्यय कालसामान्यीं सांगितले आहेत. विकल्प असल्यामुळें एकदां सामान्यभूत कालाची विवक्षा असेल तर लिट् होतो. अनद्यतनभूत कालाची विवक्षा असेल तर लङ् होतो. त्यांत परोक्षत्वाची विवक्षा असेल तर लिट् होतो. तसेंच सामान्यभविष्य कालाची विवक्षा असेल तर लुट् होतो. अनद्यतनभविष्य कालाची विवक्षा असेल तर लुट् होतो. येथें लिङ् सांगितला असल्यामुळें याच उदाहरणामध्यें क्रियेची अनिष्पत्ति गम्यमान असेल तर भूत कालीं एकदां लृङ् होतो; आणि भविष्य कालीं नित्य लृङ् होतो. पुढेंही ज्या सूत्रामध्यें लिङ् सांगितला असेल तेथें असेंच समजावें आणि त्यांत सुद्धां उताप्योः० (३।३।१५२) या सूत्रापासून पुढें लिङ् सांगितला असेल तेथें त्याच्या उदाहरणामध्यें क्रियेची अनिष्पत्ति गम्यमान असेल तर भूतकाल असो किंवा भविष्यकाल असो, नित्य लृङ् प्रत्ययच होतो.

१ (१४४) किम् शब्दापासून तयार झालेला शब्द उपपद असतांना आणि कुत्सा अर्थ गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लिङ् आणि लृट् हे प्रत्यय होतात; उदा०को नाम वृषलो य तत्रभवान् याजयेत् याजयिष्यति वा.

१.(१४५) किम् शब्दापासून तयार झालेला किंवा न झालेला असा कोणताही शब्द उपपद असतांना आणि असंभावना किंवा असहन यांपैकीं अर्थ गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लिङ् आणि लृट् हे प्रत्यय होतात; उदा० न संभावयामि तत्रभवान् वृषलं याजयेत्, न संभावयामि तत्रभवान् वृषलं याजयिष्यति, न मर्षये भवान् वृषलं याजयेत्, न मर्षये भवान् वृषलं याजयिष्यति.

**किंवृत्तस्यानधिकारादुत्तरत्राकिंवृत्तग्रहणानर्थक्यम् ॥ १ ॥**

किंवृत्तस्यानाधिकारादुत्तरत्राकिंवृत्तग्रहणमनर्थकम् । निवृत्तं किंवृत्त इति तस्मिन्निवृत्ते ऽविशेषेण किंवृत्ते चाकिंवृत्ते च भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनमुपपदसंज्ञां वक्ष्यामीति । उपपदसंज्ञावचने किं प्रयोजनम् । उपपदमातिङ् [ २. २. १९ ] इति समासो यथा स्यात् । अतिङिति प्रतिषेधः प्राप्नोति । यदा तर्हि लृटः सत्संज्ञौ तदोपपदसंज्ञा भविष्यति । भविष्यदधिकारविहितस्य लृटः सत्संज्ञावुच्येते अविशेषविहितश्चायम् ॥

**[ किंकिलास्त्यर्थेषु लृट् ॥ ३।३।१४६ ]**

**जातुयदोर्लिङ् ॥ ३ । ३ । १४७ ॥**

**जातुयदोर्लिङ्विधाने यदायद्योरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

जातुयदोर्लिङ्विधाने यदायद्योरुपसंख्यानं कर्तव्यम् । यदा भवाद्विधः क्षत्रियं याजयेत् । यदि भवाद्विधः क्षत्रियं याजयेत् ।

---

( सू. १४५ वा. १ ) किंवृत्त शद्बाची अनुवृत्ति केली नाहीं म्हणजे काम भागेल. तेव्हां येथे अकिंवृत्त हा शद्ब व्यर्थ होतो. किंवृत्त शद्बाची अनुवृत्ति नसली म्हणजे मोघम सांगितलेले प्रत्यय—किम् शब्दापासून तयार झालेला शब्द उपपद असो अथवा नसो—सर्वत्र होतीलच.

तर मग अकिंवृत्ते या शब्दाचा येथें उपयोग असा कीं—त्याला उपपद संज्ञा (३।१।९२) झाली पाहिजे.

पण उपपद संज्ञेचा येथें उपयोग काय?

उपपदमतिङ् ( २।२।१९ ) यानें समास होणें हा उपयोग होईल.

तेथें तर अतिङ् असा क्रियापदाबरोबर उपपदाचा समास होत नाहीं असें म्हटलें आहे.

तर मग ह्या लृट् प्रत्ययाला जेव्हां शतृ व शानच् आदेश ( ३।२।१४ ) होतील तेव्हां समास होण्याकरितां उपपद संज्ञा उपयोगीं पडेल.

ह्या लृट् प्रत्ययाला ते आदेश होतच नाहींत. कारण भविष्यकालीं असा विशेष सांगितलेला जो लृट् प्रत्यय त्यालाच ते सांगितले आहेत. आणि हा लृट् प्रत्यय तर कालसामान्यीं सांगितला आहे.

( सू. १४७ वा. १ ) हा जो जातु किंवा यद् शब्द उपपद असतांना लिङ् प्रत्यय सांगितला आहे. तो यदा किंवा यदि शब्द उपपद असतांनाही होतो असें म्हणावें. उदा० यदा भवद्विधः क्षत्रियं याजयेत्; यदि भवद्विधः क्षत्रियं याजयेत्.

---

१ (१४६) किंकिल हा शब्द किंवा अस्ति या अर्थाचा शब्द उपपद असतांना आणि असंभावना किंवा असहन यांपैकीं अर्थ गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लृट् प्रत्यय होतो. उदा०—न संभावयामि किंकिल भवान् वृषलं याजयिष्यति; न संभावयामि अस्ति किल भवान् वृषलं याजयिष्यति; न मर्षये किंकिल भवान् वृषलं याजयिष्यति; न मर्षये अस्ति किल भवान् वृषलं याजयिष्यति. या उदाहरणांमध्यें पूर्व सूत्रानें लिङ् होत नाही. कारण हा लृट् प्रत्यय त्याचा अपवाद आहे.

१ (१४७) जातु किंवा यद् शब्द उपपद असतांना आणि असंभावना किंवा असहन यांपैकीं अर्थ गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लिङ् प्रत्यय होतो. उदा.०—न संभावयामि जातु भवान् वृषलं याजयेत्; न संभावयामि यद् भवान् वृषलं याजयेत्; न मर्षये जातु भवान् वृषलं याजयेत्; न मर्षये यद्भवान् वृषलं याजयेत्. हा लिङ् प्रत्यय अनवक्लृप्त्यमर्षयो० ( ३।३।१४५ ) यानें सांगितलेल्या लृट् प्रत्ययाचा अपवाद आहे.

[यच्चयत्रयोः ॥ ३ । ३ । १४८ ॥
गर्हायां च ॥ ३ । ३ । १४९ ॥
चित्रीकरणे च ॥ ३ । ३ । १५० ॥]
शेषे लृडयदौ ॥ ३ । ३ । १५१ ॥
चित्रीकरणे यदिप्रतिषेधानर्थक्यमर्थान्यत्वात् ॥ १ ॥

चित्रीकरणे यदिप्रतिषेधोऽनर्थकः । किं कारणम् । अर्थान्यत्वात् । न हि यदावुपपदे चित्रीकरणं गम्यते । किं तर्हि । संभावनम् ॥

[उताप्योः समर्थयोर्लिङ् ॥ ३ । ३ । १५२ ॥
कामप्रवेदनेऽकच्चिति ॥ ३ । ३ । १५३ ॥
संभावनेऽलमिति चेत्सिद्धाप्रयोगे ॥ ३ । ३ । १५४ ॥
विभाषा धातौ संभावनवचनेऽयदि ॥ ३ । ३ । १५५ ॥]

---

(सू. १५१ वा. १) आश्चर्य अर्थ गम्यमान असतांना असें येथें निमित्त धरलें आहे. तेव्हां येथें यदि शब्दाचा प्रयोग नसावा हें म्हणणें व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं तेथें अर्थ निराळा भासतो. कारण, यदि शब्दाचा प्रयोग असतांना आश्चर्याची प्रतीति होत नाहीं; तर तेथें संभावन हा अर्थ प्रतीत होतो.

---

१(१४८) यच्च किंवा यत्र शब्द उपपद असतांना आणि संभावना किंवा असहन यांपैकीं अर्थ गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लिङ् प्रत्यय होतो. उदा. न संभावयामि यच्च भवान् वृषलं याजयेत्; न संभावयामि यत्र भवान् वृषलं याजयेत् ; न मर्षये यच्च भवान् वृषलं याजयेत्; न मर्षये यत्र भवान् वृषलं याजयेत्. पूर्वसूत्राप्रमाणे हाही लिङ् प्रत्यय लृट् प्रत्ययाचा अपवाद आहे.

१.(१४९)यच्च किंवा यत्र शब्द उपपद असतांना आणि कुत्सा अर्थ गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लिङ् प्रत्यय होतो, उदा०-यच्च भवान् ऋद्धो वृद्धो ब्राह्मणः सन् वृषलं याजयेत् अन्याय्यं तत् ; यत्र भवान्०

१.(१५०)यच्च किंवा यत्र शब्द उपपद असतांना आणि आश्चर्य अर्थ गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लृट् प्रत्यय होतो. उदा० यच्च भवान् वृषलं याजयेत् आश्चर्यमेतत्; यत्र भवान् वृषलं०

१.(१५१)यच्च आणि यत्र यांशिवाय इतर उपपद असतांना आणि आश्चर्य गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लृट् प्रत्यय होतो, परंतु यदि शब्दाचा प्रयोग नसतांना. उदा० आश्चर्यमन्धो नाम कृष्णं द्रक्ष्यति.

१. (१५२) उत किंवा अपि शब्द उपपद असतांना धातूहून कालसामान्यीं लिङ् प्रत्यय होतो. त्या उत आणि अपि यांचा बाढं म्हणजे खचित हा अर्थ असला पाहिजे. उदा० उत हन्यादधं हरिः; अपि हन्यादघं हरिः. सम आहे अर्थ ज्यांचा ते समर्थ होत. बाढं हा अर्थ त्या दोघांचाही आहे.

१.(१५३) प्रयोगकर्त्याची इच्छा गम्यमान होत असेल तर धातूहून कालसामान्यीं लिङ् प्रत्यय होतो. पण कच्चित् शब्दाचा प्रयोग नसला पाहिजे. उदा० कामो मे भुञ्जीत भवान्.

१.(१५४)संभावित क्रियावाचक धातूहून कालसामान्यी लिङ् प्रत्यय होतो; पण तेथें अलम् शब्दाचा प्रयोग नसून त्याचा अर्थ (सामर्थ्य) गम्यमान असला पाहिजे; उदा० अपि गिरिं शिरसा भिन्द्यात.

१.(१५५)पूर्वसूत्राचा विषय असतांना त्यांत जर संभावनावाचक धातु उपपद असेल तर लिङ् प्रत्यय विकल्पानें होतो; यत् शब्दाचा प्रयोग मात्र नसला पाहिजे; उदा० संभावयामि भुञ्जीत भवान्; संभावयामि भोक्ष्यते भवान्.

**हेतुहेतुमतोर्लिङ् ॥ ३ । ३ । १५६ ॥**

**हेतुहेतुमतोर्लिङ्वा ॥ १ ॥**

हेतुहेतुमतोर्लिङ्वेति वक्तव्यम् । अनेन चेद्यायान्न शकटं पर्याभवेत् । अनेन चेद्यास्यति न शकटं पर्याभविष्यति ॥

**भविष्यदधिकारे ॥ २ ॥**

भविष्यदधिकार इति वक्तव्यम् । इह मा भूत् । वर्षतीति धावति । हन्तीति पलायते ॥ अथेदानीं शतृशानचावत्र कस्मान्न भवतः ।

देवत्रातो गलो ग्राह इतियोगे च सद्विधिः ।

मिथस्ते न विभाष्यन्ते गवाक्षः संशितव्रतः ॥

**इच्छार्थेषु लिङ्लोटौ ॥ ३ । ३ । १५७ ॥**

**कामप्रवेदनं चेत् ॥ १ ॥**

कामप्रवेदनं चेद्गम्यत इति वक्तव्यम् । इह मा भूत् । इच्छन्कटं करोति ॥

**समानकर्तृकेषु तुमुन् ॥ ३ । ३ । १५८ ॥**

**लिङ् च ॥ ३ । ३ । १५९ ॥**

**इच्छार्थेभ्यो विभाषा वर्तमाने ॥ ३ । ३ । १६० ॥ ]**

---

( सू. १५६ वा. १ ) हा जो प्रकृत सूत्रानें लिङ् प्रत्यय सांगितला आहे तो विकल्पानें होतो असें म्हणावें उदा०- दक्षिणेन चेद्यायात् न शकटं पर्याभवेत्; दक्षिणेन चेद्यास्यति न शकटं पर्याभविष्यति.

( वा. २ ) हा लिङ् प्रत्यय भविष्यकालीं होतो, असें म्हणावें. वर्षतीति धावति, हन्तीति पलायते. येथें वर्तमानकालीं लिङ् प्रत्यय न झाला पाहिजे.

आतां पण वर्षतीति धावति येथें व हन्तीति पलायते येथें लटाचे स्थानीं शतृ व शानच् हे आदेश (३।२।१२४) कां बरें होत नाहींत.

( सू. १५७ ) प्रयोगकर्त्यानें आपली इच्छा प्रकाशित केली असेल तर हे लिङ् व लोट् प्रत्यय होतात, असें म्हणावें. कारण इच्छन् कटं करोति देवदत्तः येथें हे लिङ् व लोट् प्रत्यय न झाले पाहिजेत.

---

१.(१५६) ज्या दोन क्रियांमध्यें कार्यकारणभाव गम्यमान असेल त्या क्रियांच्या वाचक धातूहून लिङ्-प्रत्यय होतो; उदा० दक्षिणेन चेद्यायात् न शकटं पर्याभवेत् (दक्षिण बाजूनें जाईल तर त्याची गाडी बिघडणार नाहीं).

२. या ठिकाणी 'अनेन' शब्दाऐवजीं 'दक्षिणेन' असा पाठभेद कांहीं प्रतींत आढळतो; तो ज्यास्तीं स्पष्ट असल्यामुळें भाषांतरामध्यें घेतला आहे व उदाहरणें दिलीं आहेत.

३. अध्याय ७ पाद. ४ सू. ४१ शेवटचें भाष्य पहा.

१.(१५७)इच्छार्थक धातु उपपद असतांना धातूहून कालसामान्यीं लिङ् आणि लोट् हे प्रत्यय होतात. उदा० इच्छामि भुञ्जीत भवान्; इच्छामि भुङ्क्तां भवान्.

१ (१५८) इच्छार्थक धातु उपपद असतांना धातूहून तुमुन् प्रत्यय होतो, पण त्या धातूचा आणि इच्छार्थक धातूचा कर्ता एकच असला पाहिजे; उदा० भोक्तुमिच्छति देवदत्तः.

१. (१५९) इच्छार्थक धातु उपपद असतांना धातूहून लिङ् प्रत्ययही होतो, पण त्या धातूचा आणि इच्छार्थक धातूचा कर्ता एकच असला पाहिजे; उदा० भुञ्जीय इतीच्छति

१. (१६०) इच्छार्थक धातूहून वर्तमानकालीं लिङ् प्रत्यय विकल्पानें होतो; उदा० इच्छेत्, इच्छति.

**विधिनिमन्त्रणामन्त्रणाधीष्टसंप्रश्नप्रार्थनेषु लिङ् ॥३।३।१६१॥**

विध्यधीष्टयोः को विशेषः। विधिर्नाम प्रेषणम्। अधीष्टं नाम सत्कारपूर्विका व्यापारणा॥ अथ निमन्त्रणामन्त्रणयोः को विशेषः। संनिहितेन निमन्त्रणं भवत्यसंनिहितेनामन्त्रणम्। नैषोऽस्ति विशेषः। असंनिहितेनापि निमन्त्रणं भवति संनिहितेन चामन्त्रणम्। एवं तर्हि यन्नियोगतः कर्तव्यं तन्निमन्त्रणम्। किं पुनस्तत्। हव्यं कव्यं वा। ब्राह्मणेन सिद्धं भुज्यतामित्युक्ते ऽधर्मः प्रत्याख्यातुः। आमन्त्रणे कामचारः॥

कथं पुनरिदं विज्ञायते। निमन्त्रणादीनामर्थ इति। आहोस्विन्निमन्त्रणादिषु गम्यमानेष्विति। कश्चात्र विशेषः।

**निमन्त्रणादीनामर्थे चेदामन्त्रयै निमन्त्रयै भवन्तमिति प्रत्ययानुपपत्तिः प्रकृत्यभिहितत्वात् ॥ १ ॥**

निमन्त्रणादीनामर्थे चेदामन्त्रयै निमन्त्रयै भवन्तमिति प्रत्ययानुपपत्तिः। किं कारणम्। प्रकृत्यभिहितत्वात्। प्रकृत्याभिहितः सोऽर्थ इति कृत्वा प्रत्ययो न प्राप्नोति॥

**द्विवचनबहुवचनाप्रसिद्धिश्चैकार्थत्वात् ॥ २ ॥**

द्विवचनबहुवचनयोश्चाप्रसिद्धिः। किं कारणम्। एकार्थत्वात्। एकोऽयमर्थो

---

(सू. १६१) विधि आणि अधीष्ट या शब्दांच्या अर्थांमध्यें काय बरें फरक आहे?

विधि म्हणजे चाकर वगैरेंना हुकूम करणें; आणि अधीष्ट म्हणजे वडील माणसांना सत्कारपूर्वक प्रेरणा करणें.

आतां निमंत्रण आणि आमंत्रण या शब्दांच्या अर्थांमध्यें काय फरक आहे!

निमंत्रण म्हणजे आसन वगैरे संनिहित पदार्थ पुढें करून त्याविषयीं प्रेरणा करणें. आणि आमंत्रण म्हणजे भोजन संनिहित नसलें तरी त्या विषयीं प्रेरणा करणें.

हा फरक बरोबर दिसत नाहीं. कारण, संनिहित नसतांनाही निमंत्रण होतें. आणि संनिहित असतांनाही आमंत्रण होते.

तर मग आतां त्या दोहोंमध्यें असा फरक समजा कीं जे विधिपूर्वक केलें जातें तें निमंत्रण होय.

असें कोणतें बरें निमंत्रण आहे?

हव्यकव्यकर्मासंबंधानें असें निमंत्रण दिलें जातें. सिद्ध अन्न ब्राह्मणानें भक्षण करावें असा तेथें विधि सांगितला आहे. शिवाय, निमंत्रणस्थलीं प्रत्याख्यान करणाऱ्याला अधर्म उत्पन्न होतो. आणि आमंत्रणस्थलीं स्वेच्छाचार असतो. वाटेल तर कबूल करावें, नाकबूल केलें तरी अधर्म होत नाहीं.

आतां येथें निमंत्रण वगैरेंच्या अर्थीं लिङ् प्रत्यय होतो. किंवा ते अर्थ गम्यमान असतांना लिङ् प्रत्यय होतो; यांपैकीं काय समजावें?

या दोहोंमध्यें फरक काय?

निमंत्रण वगैरेंच्या अर्थीं लिङ् होतो असें असेल तर भवन्तमामन्त्रयै, भवन्तं निमन्त्रयै या प्रयोगांमध्यें लोट् प्रत्यय होणार नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं मागील धातूनेंच तो अर्थ उक्त होतो म्हणून पुढें त्याच अर्थीं पुनः पुढील सूत्रानें लोट् प्रत्यय होणार नाहीं.

(वा. २) तसेंच द्विवचन आणि बहुवचन हे त्या लोट् प्रत्ययाचे स्थानीं करतां येणार नाहींत.

काय कारण?

---

१ (१६१) विधि, निमंत्रण, आमंत्रण, अधीष्ट, संप्रश्न आणि प्रार्थना या अर्थीं धातूहून लिङ् प्रत्यय होतो; कर्ता, कर्म किंवा भाव या तिघांपैकीं कोणता तरी एक अर्थ लकाराचा असतो तो पाहिजेच; उदा० कटं कुर्यात्.

२. निमंत्रण घेऊन प्रत्याख्यान करणाऱ्याला; आणि योग्यता असून निमंत्रण न स्वीकारणाऱ्याला,

निमन्त्रणं नाम तस्यैकत्वादेकवचनमेव प्राप्नोति ॥

अस्तु तर्हि निमन्त्रणादिषु गम्यमानेषु। इहापि तर्हि प्राप्नोति। देवदत्तो भवन्तमामन्त्रयते । देवदत्तो भवन्तं निमन्त्रयत इति।

**सिद्धं तु द्वितीयाकाङ्क्षस्य प्रकृते प्रत्ययार्थे प्रत्ययविधानात् ।। ३ ॥**

सिद्धमेतत् ।कथम्। द्वितीयाकाङ्क्षस्य धातोः प्रकृते प्रत्ययार्थे प्रत्ययो भवतीति वक्तव्यम्। के च प्रकृता अर्थाः। भावकर्मकर्तारः ॥ भवोत्सिद्धं प्राप्नोतु भवानामन्त्रणम् अनुभवतु भवानामन्त्रणमिति यत्र द्वितीय आकाङ्क्ष्यते। इदं तु न सिध्यति आमन्त्रयै निमन्त्रया इति। अत्रापि द्वितीय आकाङ्क्ष्यते। कः। निमन्त्रिरेव। आमन्त्रया आमन्त्रणम् निमन्त्रयै निमन्त्रणमिति। कथं पुनर्निमन्त्रिर्नाम निमन्त्रणमाकाङ्क्षेत्। दृष्टश्च भावेन भावयोगः। तद्यथा। इषिरिषिणा युज्यते स्त्रीत्वं च स्त्रीत्वेन ॥

---

कारण असें कीं निमंत्रण करणें ही क्रिया एकच आहे. तेव्हां ती एकच असल्यामुळें त्या अर्थी झालेल्या लोट् प्रत्ययाचे स्थानीं फक्त एकवचनच होईल.[३]

तर मग आतां निमंत्रण वगैरे अर्थ गम्यमान असतांना प्रत्यय होतो असाच अर्थ असूं दे.

पण तसा अर्थ असेल तर देवदत्तो भवन्तमामन्त्रयते, देवदत्तो भवन्तं निमन्त्रयते येथेंही लिङ् व लोट् हे प्रत्यय होऊं लागतील.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

ज्या धातूच्या अर्थाचा दुसऱ्याच्या अर्थाशीं संबंध[४] आहे त्या धातूहून प्रकृत अर्थींच लिङ् वगैरे प्रत्यय होतात, असें म्हणावें.

कोणते बरे अर्थ प्रकृत आहेत ?

भाव, कर्म आणि कर्ता हे ते प्रकृत अर्थ होत.

तरी पण 'प्राप्नोतु भवानामन्त्रणम्,' 'अनुभवतु भवानामन्त्रणम्' अशा ज्या ठिकाणीं प्राप्ति व अनुभव या क्रियांचा दुसऱ्याशीं म्हणजे आमंत्रणाशीं संबंध आहे तेथें लोट् वगैरे प्रत्यय सिद्ध होतील. पण निमन्त्रयै आमन्त्रयै येथें लोट् प्रत्यय सिद्ध होणार नाहीं.

येथेंही मन्त्र धातूच्या अर्थाचा दुसऱ्या अर्थाशीं संबंध आहेच.

तो दुसरा अर्थ कोणता ?

निमन्त्रण हाच तो दुसरा अर्थ होय. निमन्त्रयै निमन्त्रणम् आमन्त्रयै आमन्त्रणम्.

पण निमन्त्रणाचाच निमन्त्रणाशीं संबंध कसा बरें होईल ?

कां बरें ? एका भावाचा दुसऱ्या तऱ्हेच्या त्याच भावाशीं संबंध झालेला दृष्टीस पडतो. जसें 'एषिषिषति, येथें धात्वर्थ इच्छेचा प्रत्ययार्थ इच्छेशीं संबंध होतो. तसेंच स्त्रीत्वाचा

---

३ कर्ता आणि कर्म, हे अर्थ लिङ् प्रत्ययाला सर्वसाधारण आहेतच, हें मनांत न घेतां हा दोष दिला आहे.

४. कटं कुर्यात् येथें कृ धातूचा अर्थ जो कृति त्याचा विधीशी संबंध आहे; करोति कटम् येथें नाहीं. तसा निमन्त्रयते येथेंही निमंत्रण क्रियेचा विधि वगैरे कोणाशीं संबंध नाहीं.

यावतात्र द्वितीय आकाङ्क्ष्यते ।

अस्तु तर्हि निमन्त्रणादीनामर्थे इति । ननु चोक्तं निमन्त्रणादीनामर्थे चेदामन्त्रयै निमन्त्रयै भवन्तमिति प्रत्ययानुपपत्तिः प्रकृत्यभिहितत्वादिति । नैष दोषः । योऽसौ द्वितीय आकाङ्क्ष्यते स एव मम प्रत्ययार्थो भविष्यति ॥ अयं तर्हि दोषो द्विवचनबहुवचनाप्रसिद्धिश्चैकार्थत्वादिति । नैष दोषः ।

**सुपां कर्मादयोऽप्यर्थाः संख्या चैव तथा तिङाम् ।**

सुपां संख्या चैवार्थः कर्मादयश्च ।

**प्रसिद्धो नियमस्तत्र**

प्रसिद्धस्तत्र नियमः ।

**नियमः प्रकृतेषु वा ॥**

अथवा प्रकृतानर्थानपेक्ष्य नियमः । के च प्रकृताः । एकत्वादयः । एकस्मिन्नेवैकवचनं न द्वयोर्न बहुषु । द्वयोरेव द्विवचनं नैकस्मिन्न बहुषु । बहुष्वेव बहुवचनं नैकस्मिन्न द्वयोरिति ॥

---

क्लीत्वाशीं संबंध होतो. तेव्हां त्याप्रमाणें येथेंही एका निमन्त्रणाचा दुसऱ्या निमन्त्रणाशीं संबंध होईल[६].

तर मग आतां निमन्त्रण वगैरे अर्थी हे प्रत्यय होतात असाही अर्थ असूं दे.

पण निमंत्रण वगैरे अर्थी हे प्रत्यय होतात असें म्हटलें तर भवन्तमामन्त्रयै, भवन्तं निमन्त्रयै येथें धातूनेंच तो अर्थ उक्त होत असल्यामुळें पुन्हां त्या अर्थी प्रत्यय होणार नाहीं, असें आतांच सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण, धात्वर्थ निमंत्रणाचा ज्या दुसऱ्या निमंत्रणाशीं संबंध आतां दाखविला त्याच दुसऱ्या निमंत्रण या अर्थी निमन्त्रयै येथें लोट् प्रत्यय होईल.

तर मग निमंत्रण वगैरे प्रत्ययार्थ मानले तर निमंत्रण हें एकच असल्यामुळें द्विवचन आणि बहुवचन होणार नाहीं, हा दोष येतो ना ?

हाही दोष येत नाहीं.

सुप् प्रत्ययाचे कर्म वगैरेही अर्थ आहेत आणि संख्याहीं अर्थ आहे. तसेंच तिङ् प्रत्ययाचे कर्म वगैरेही अर्थ आहेत आणि संख्याही अर्थ आहे.

तेव्हां अर्थाविषयींचा नियम म्हणजे अर्थनियम प्रसिद्ध आहेच.

अथवा प्रकृत अर्थांना धरूनच नियम समजावा.

ते प्रकृत अर्थ कोणते ?

एकत्व द्वित्व वगैरे ते होत. तेव्हां एकाबद्दलच एकवचन घालावें, दोन किंवा बहु यांबद्दल एकवचन घालूं नये; दोघांबद्दलच द्विवचन घालावें, एक किंवा बहु यांबद्दल द्विवचन घालूं नये; तसेंच बहूंबद्दलच बहुवचन घालावें, दोन किंवा एक यांबद्दल बहुवचन घालं नये.

---

५. क्रियारूपी निमंत्रण धात्वर्थ होय आणि तेंच अवश्यकर्तव्य या रूपानें प्रत्ययाचा अर्थ होऊं शकतें.

६ या ठिकाणीं मूळ संस्कृतामध्यें 'क्लीत्वं च क्लीत्वेन' यानंतर वाक्य तसेंच प्रकरण पुरें केलें आहे तें डॉ. कीलहार्न यांनीं प्रसिद्ध केलेल्या प्रतीस अनुसरून केलें आहे. वास्तविक पाहतां 'यावता चात्रापि०' हें पुढील वाक्य 'क्लीत्वं च क्लीत्वेन' या वाक्याशीं संबद्ध आहे म्हणून तें पुरें झाल्यावर प्रकरण पुरें व्हावयास पाहिजे. हें लक्षांत घेऊन भाषांतर दोन्ही वाक्यांचें मिळून केलें आहे,

७. एकाच निमंत्रणाचा औपाधिक भेद घेऊन त्यांतील एकाचा दुसऱ्याशीं संबंध गृहीत धरला तर.

८. तेव्हां त्या कर्म वगैरेचें एकत्व, द्वित्व आणि बहुत्व दाखविण्याकरितां तीनही वचनें होतील.

## [ लोट् च ॥ ३।३।१६२॥ ]

## प्रैषातिसर्गप्राप्तकालेषु कृत्याश्च ॥ ३।३।१६३॥

किमर्थं प्रैषादिष्वर्थेषु कृत्या विधीयन्ते नाविशेषेण विहिताः कृत्यास्ते प्रैषादिषु भविष्यन्त्यन्यत्र च। प्रैषादिषु कृत्यानां विधानं नियमार्थम्। नियमार्थोऽयमारम्भः। प्रैषादिष्वेव कृत्या यथा स्युरिति ॥

**प्रैषादिषु कृत्यानां वचनं नियमार्थमिति चेत्तदनिष्टम् ॥ १ ॥**

प्रैषादिषु कृत्यानां वचनं नियमार्थमिति चेत्तदनिष्टं प्राप्नोति। न हि प्रैषादिष्वेव कृत्या इष्यन्ते। किं तर्हि। अविशेषेणेष्यन्ते। बुसोपेन्ध्यम् तृणोपेन्ध्यम् घनघात्यम् ॥

**विध्यर्थं तु स्त्रियाः प्रागिति वचनात् ॥ २ ॥**

विध्यर्थं तु प्रैषादिषु कृत्यानां वचनम्। अयं प्रैषादिष्वर्थेषु लोड्विधीयते स विशेषविहितः सामान्यविहितान्कृत्यान्बाधते। वासरूपेण कृत्या अपि भविष्यन्ति। न स्युः। किं कारणम्। स्त्रियाः प्रागिति

---

(सू. १६३) येथें प्रैष वगैरे अर्थ गम्यमान असतांना जें कृत्य प्रत्यय सांगितले आहेत ते कशाकरितां सांगितले आहेत? ते सांगावयास नकोत. कारण कृत्य प्रत्यय मोघम सांगितलेच आहेत (३।१।९६–३।१।१३२); तेव्हां ते प्रत्यय प्रैष वगैरे गम्यमान असतांनाही होतील आणि इतर ठिकाणींही होतील.

पण प्रैष वगैरे अर्थ गम्यमान असतांना जें हें कृत्य प्रत्ययांचें विधान केलें आहे तें नियमार्थ होईल. नियम असा कीं—प्रैष वगैरे अर्थ असतांनाच कृत्य प्रत्यय झाले पाहिजेत.

(वा. १) हें वचन नियमार्थ म्हटलें तर अनिष्ट प्राप्त होतें. कारण, प्रैष वगैरे अर्थ असतांनाच कृत्य प्रत्यय होतात असें मुळींच इष्ट नाहीं.

तर कसें इष्ट आहे?

प्रैष वगैरे अर्थ असोत किंवा नसोत सर्वच ठिकाणीं इष्ट आहेत. उदा०— बुसोपेन्ध्यम्[२] तृणोपेन्ध्यम्, घनघात्यम्.

(वा. २.) प्रकृत सूत्रानें जे प्रैष वगैरे अर्थ असतांना कृत्य प्रत्यय सांगितले आहेत तें वचन विध्यर्थच केलें पाहिजे. जर त्यानें कृत्यप्रत्ययांचें विधान केलें नाहीं तर याच सूत्रानें सांगितलेला लोट् प्रत्यय हा विशेष अर्थी सांगितला असल्यामुळें तो सामान्यतः सांगितलेल्या कृत्य प्रत्ययांचा बाध करील.

पण बाध केला तरी वासरूपन्यायानें (३।१।९४) विकल्पानें बाध करील. तेव्हां प्रैष वगैरे अर्थ गम्यमान असतांनाही कृत्यप्रत्यय एकदां होतीलच.

प्रैष वगैरे अर्थ गम्यमान असतांना कृत्य प्रत्यय मुळींच होणार नाहींत.

काय कारण?

कारण असें कीं 'स्त्रियाः प्राक्' असें

---

१. (सू.१६२) पूर्व सूत्राच्या विषयामध्यें धातूहून एकदां लोट् प्रत्ययही होतो; उदा० कटं करोतु देवदत्तः.

१. (सू. १६३) प्रैष, अतिसर्ग व प्राप्तकाल हे अर्थ गम्यमान असतांना धातूहून कृत्य प्रत्यय होतात आणि लोट् प्रत्ययही होतो; उदा० भवता कटः कर्तव्यः, भवान् कटं करोतु. येथें कट म्हणजे चटई करण्याविषयीं प्रेरणा केली आहे असा अर्थ होतो. किंवा 'तुझ्या मनांत कट करण्याचा आहे ना? कर' असा अर्थ होतो, किंवा 'कट करण्याचा आतां हंगामच आहे, कर' असाही अर्थ होतो.

२. अग्निस्तोकं बुसोपेन्ध्यम्, म्ह० विस्तवाची ठिणगी भुसानें पेट घेते ही वस्तुस्थिति सांगितली आहे. घनघात्यम् याचा अर्थ 'हा पदार्थ इतका कठीण आहे कीं तो घणानेंच फोडला पाहिजे.'

वचनात्। प्राक्स्त्रिया वासरूपः ॥

**[ लिङ् चोर्ध्वमौहूर्तिके ॥ ३ । ३ । १६४ ॥**

**स्मे लोट् ॥ ३ । ३ । १६५ ॥**

**अधीष्टे च ॥ ३ । ३ । १६६ ॥ ]**

**कालसमयवेलासु तुमुन् ॥ ३ । ३ । १६७ ॥**

प्रथमान्तेष्विति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। इह मा भूत्। काले भुङ्क्ते ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। प्रैषादिष्विति वर्तते। तच्चावश्यं प्रैषादिग्रहणमनुवर्त्यम्। प्रथमान्तेष्विति ह्युच्यमान इहापि प्रसज्येत।

काल: पचति भूतानि।
काल: संहरति प्रजाः ॥

**[ लिङ् यदि ॥ ३ । ३ । १६८ ॥**

**अर्हे कृत्यतृचश्च ॥ ३ । ३ । १६९ ॥**

**आवश्यकाधमर्ण्ययोर्णिनिः ॥ ३ । ३ । १७० ॥**

**कृत्याश्च ॥ ३ । ३ । १७१ ॥**

---

सांगितलें असल्यामुळें 'स्त्रियाम्' (३।३।९४) या अधिकाराच्या पूर्वींच वासरूप न्यायाची प्रवृत्ति होते.

( सूत्र १६७ ) काल वगैरे शब्द उपपद असतांना हा जो तुमुन् प्रत्यय येथें सांगितला आहे तो ते काल वगैरे शब्द प्रथमान्त असतील तरच होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं काले भुङ्क्ते येथें तुमुन् प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण प्रैष वगैरे अर्थ गम्यमान असतांना अशी येथें अनुवृत्ति येत आहे. आणि ती अनुवृत्ति तर अवश्य केलीच पाहिजे. काल: वगैरे शब्द प्रथमान्त उपपद असतांना एवढेंच नुसतें म्हटलें तरः—

काल: पचति भूतानि काल: संहरति प्रजाः येथेंही तुमुन् प्रत्यय होऊं लागेल.

---

१. (सू. १६४) प्रैष, अतिसर्ग आणि प्राप्तकाल हे अर्थ गम्यमान असतांना आणि धात्वर्थक्रिया ही मुहूर्तानंतर होणारी असेल तर धातूहून लिङ् प्रत्यय होतो आणि प्राप्त झालेले प्रत्ययही एकदां होतात; उदा० मुहूर्तादूर्ध्वं भवान् कटं कुर्यात्, भवता कटः कर्तव्यः, भवान् कटं करोतु.

१. (सू. १६५) पूर्वसूत्राचा विषय असतांना जर तेथें स्म शब्द उपपद असेल तर एकटा लोट् प्रत्ययच होतो; उदा० मुहूर्तादूर्ध्वं भवान् कटं करोतु स्म.

१. (सू. १६६) धात्वर्थक्रिया ही मुहूर्तानंतर होणारी नसलीं तरी जर तेथें स्म शब्द उपपद असून अधीष्ट अर्थ गम्यमान असेल तर तेथें एकटा लोट् प्रत्ययच होतो ,उदा० अङ्ग स्म उपाध्याय माणवकमध्यापय.

१. (सू. १६७) प्रैष, अतिसर्ग आणि प्राप्तकाल हे अर्थ गम्यमान असतांना आणि काल, समय व वेला यांपैकीं एक शब्द उपपद असेल तर धातूहून तुमुन् प्रत्यय होतो; उदा० भोक्तुं कालः.

१. (सू. १६८) पूर्वसूत्राच्या विषयामध्येंच जर यत् शब्द उपपद असेल तर धातूहून तुमुन् न करतां लिङ् प्रत्यय करावा; उदा० कालो यद् भुञ्जीत भवान्.

१. (सू. १६९) योग्यता गम्यमान असतांना धातूहून कृत्य प्रत्यय, तृच् प्रत्यय व लिङ् प्रत्ययही होतात. उदा० भवता खलु कन्या वोढव्या, भवान् खलु कन्याया वोढा, भवान् खलु कन्यां वहेत.

१. (सू. १७०) आवश्यकता किंवा आधमर्ण्य गम्यमान असतांना धातूहून कर्ता या अर्थी सांगितलेला णिनि प्रत्यय होतो; उदा० अवश्यंकारी, शतंदायी. अधमर्णस्य भावः आधमर्ण्यम्. अधमर्ण म्ह. रिणको.

१. (सू. १७१) आवश्यकता किंवा आधमर्ण्य गम्यमान असतांना धातूहून भाव किंवा कर्म या अर्थी सांगितलेले कृत्य प्रत्ययही होतात; उदा० भवता खलु अवश्यं कटः कर्तव्यः, भवता शतं दातव्यम्.

**शकि लिङ् च ॥ ३ । ३ । १७२ ॥**[1]

**आशिषि लिङ्लोटौ ॥३।३।१७३॥**[1]

**क्तिच्क्तौ च संज्ञायाम् ॥ ३ । ३ । १७४ ॥**[1]

**माङि लुङ् ॥ ३ । ३ । १७५ ॥**[1]

**स्मोत्तरे लङ् च ॥ ३।३।१७६ ॥**[1]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य तृतीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें.

तिसरा पादही समाप्त झाला.

---

१. ( सू. १७२ ) धात्वर्थ जी क्रिया ती करण्याचें सामर्थ्य गम्यमान असतांना धातूहून लिङ् प्रत्यय व कृत्य प्रत्यय होतात. उदा० भवता खलु भारो वोढव्यः, भवान् खलु भारं वहेत्.

१ (सू.१७३)अप्राप्त गोष्ट प्राप्त व्हावी अशी इच्छा गम्यमान असेल तर धातूहून लिङ् आणि लोट् हे प्रत्यय होतात. उदा० चिरं जीयाद् भवान्; चिरं जीवतु भवान्.

१. ( सू. १७४ ) अप्राप्त गोष्ट प्राप्त व्हावी अशी इच्छा गम्यमान असेल तर धातूहून क्तिच् आणि क्त हे प्रत्यय होतात; पण तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे; उदा० तनुतात् इति तन्तिः,देवाः एनं देयासुः इति देवदत्तः.

१. (सू.१७५)माङ् अव्यय उपपद असतांना धातूहून लुङ् प्रत्यय होतो. लट्, लिट् वगैरेंचा हा अपवाद आहे; उदा० मा कार्षीत्.

१. ( सू.१७६ ) माङ् अव्ययाच्या पुढें स्म शब्द असेल तर धातूहून लङ्, व लुङ् असे प्रत्यय होतात; उदा० मा स्म करोत्, मा स्म कार्षीत्.

## धातुसंबन्धे प्रत्ययाः॥ ३।४।१॥

प्रत्यय इति वर्तमाने पुनः प्रत्ययग्रहणं किमर्थम्। अधातुप्रत्ययानामपि धातुसंबन्धे साधुत्वं यथा स्यात्। गोमानासीत्। गोमान्भवितेति॥

इह पश्यामो भूतकालो भविष्यत्कालेनाभिसंबध्यमानो भविष्यत्कालः संपद्यते। कस्मान्न भविष्यत्कालो भूतकालेनाभिसंबध्यमानो भूतकालः संपद्यते।

**धातुसंबन्धे प्रत्ययस्य यथाकालविधानात्सिद्धम्॥ १॥**

यथाकालविहिता एवैते प्रत्ययाः स्वेषु स्वेषु कालेषु प्रयुज्यन्ते॥ कथं तर्हि कालान्यत्वं गम्यते।

**उपपदस्य तु कालान्यत्वम्॥ २॥**

उपपदस्यैतत्कालान्यत्वम्॥ कुतो नु खल्वेतदग्निष्टोमयाजीत्येतदुपपदं भविष्यति न पुनर्जनितेति। एवं तर्ह्यस्त्यादिभिर्योगे। अस्त्यादिविषयाः प्रत्ययाः

---

'प्रत्ययः' (३।१।१) असा अधिकार चालू असतां पुन्हां येथें 'प्रत्यय' ग्रहण कशाकरितां केलें आहे?

ह्या प्रत्यय प्रकरणांत सांगितले नाहींत असे जे धातूपेक्षां निराळ्या प्रकृतीहून सांगितलेले प्रत्यय त्यांनाही धात्वर्थांचा संबंध असेल त्या ठिकाणीं इतर कालीं साधुत्व समजलें पाहिजे याकरितां केलें आहे. उदा० गोमान् आसीत्, गोमान् भविता.

आतां 'अग्निष्टोमयाजी अस्य पुत्रो भविता' या प्रकृत सूत्राच्या उदाहरणामध्यें 'अग्निष्टोमयाजी' यांतील भूतकाल दाखविणारा 'णिनि' प्रत्यय हा 'पुत्रो भविता' अशी भविष्यकालीं होणारी जी पुत्रजननक्रिया तिच्याशीं संबंध असल्यामुळें यजनक्रियेचाही भविष्यकाल दाखवितो तसा उलट भूतकालच्या यजनक्रियेशीं संबंध असल्यामुळें भविता येथील लुट् प्रत्यय भूतकालच दाखवितो असें कां समजूं नये?

(वा. १) जे प्रत्यय ज्या कालीं सांगितले आहेत त्या प्रत्ययांचा त्या आपआपल्या कालींच येथें प्रयोग केला आहे.[3]

तर मग येथें भिन्न कालाची प्रतीति होते कोठें?

(वा. २) अग्निष्टोमयाजी या उपपदामध्यें निराळ्या कालाची प्रतीति होते.

पण 'जनिता' याचें 'अग्निष्टोमयाजी' हें उपपद आहे असें कशावरून? 'अग्निष्टोमयाजी' याचें 'जनिता' हें उपपद आहे असें कां समजूं नये?

तर मग अस्ति वगैरेंशीं ज्याचा योग आहे तो प्रत्यय निराळ्या कालाचा दर्शक असला तरी साधु समजावा असें म्हणतां

---

१. (सू. १) ज्या ठिकाणीं धात्वर्थ क्रियांचा परस्पर संबंध असेल त्या ठिकाणीं मुख्य क्रियावाचक धातूच्या पुढील प्रत्यय ज्या कालीं केला असेल त्या कालींच गौणक्रियावाचक धातूच्या पुढील प्रत्यय समजावा. उदा० 'अग्निष्टोमयाजी अस्य पुत्रो जनिता' येथें जनिता हा लुट् प्रत्यय अनद्यतनभविष्यकालीं केला आहे त्यामुळें 'अग्निष्टोमयाजी' येथील णिनि प्रत्यय (३।२।८५) भूतकाली न समजतां भविष्यकालींच समजावा.

२. येथें गोशब्दाहून 'मतुप्' प्रत्यय (५।२।९४ 'तद् अस्ति अस्य' या अर्थीं सांगितला आहे. तेथें अस्ति असा वर्तमान कालाचा निर्देश आहे. तरी गोमान् आसीत् येथें 'गावः आसन् अस्य गोमान्', तसेंच, गोमान् भविता येथें 'गावः भवितारः अस्य गोमान्' या अर्थीं मतुप् प्रत्ययाचा प्रयोग बरोबर आहे असें समजलें जातें.

३. तेव्हां लुट् प्रत्यय भविष्यकालीं सांगितला आहे तो तसाच जनिता येथें केला आहे.

साधव इति वक्ष्यामि। के पुनरस्त्यादयः। अस्तिभूजनयः॥ एवमपि यदास्त्यादीनामेवास्त्यादिभिर्योगस्तदा न ज्ञायते कः कस्य कालमनुवर्तत इति। भावि कृत्यमासीत्। पुत्रो जनिष्यमाण आसीत्॥ एवं तर्हि वाक्यमेवैतदेवंजातीयकं प्रयुज्यते। अग्निष्टोमयाजीत्येतत्तस्मिन्भविता। कस्मिन्। योऽस्य पुत्रो जनिता। कदा। यदानेनाग्निष्टोमेनेष्टं भवति॥

**क्रियासमभिहारे लोट् लोटो हिस्वौ वा च तध्वमोः॥ ३।४।२॥**

**हिस्वयोः परस्मैपदात्मनेपदग्रहणं लादेशप्रतिषेधार्थम्॥ १॥**

हिस्वयोः परस्मैपदात्मनेपदग्रहणं कर्तव्यं हिः परस्मैपदानां यथा स्यात्स्व आत्मनेपदानामिति। किं प्रयोजनम्।

येईल[४].

अस्ति वगैरे म्हणजे ते कोणते बरें धातू घ्यावयाचे?

अस्, भू आणि जन् हे ते धातू होत.

तरी पण अस् वगैरे धातूंचाच अस् वगैरे धातूंशीं योग असेल तेव्हां कोणत्या धातूच्या पुढील प्रत्यय कोणत्या धात्वर्थाच्या कालाला अनुसरतो हें ठरवितां येणार नाहीं. उदा० 'भावि कृत्यमासीत्', 'पुत्रो जनिष्यमाण आसीत्'.

तर मग 'अग्निष्टोमयाजी अस्य पुत्रो जनिता' याचा अर्थ असा समजावा कीं, 'ज्यानें अग्निष्टोम यज्ञ केला आहे' अशा अर्थाचें अग्निष्टोमयाजी हें जें वाक्य त्याचा त्याच्या संबंधानें प्रयोग करण्यांत येईल.

कोणाच्या संबंधानें?

जो याला मुलगा होईल त्याच्या संबंधानें.

केव्हां?

जेव्हां यानें अग्निष्टोम यज्ञ केला असें होतें तेव्हां.

(वा. १) 'हि' व 'स्व' हे आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें परस्मैपद व आत्मनेपद असे शब्द घातले पाहिजेत. कारण, 'हि' आदेश परस्मैपदाचे स्थानीं झाला पाहिजे आणि 'स्व' आदेश हा आत्मनेपदाचे स्थानीं झाला पाहिजे.

याचा काय उपयोग?

४. अग्निष्टोमयाजी येथें यज् धातूच्या कर्त्याच्या द्वारानें जनिता या जनिक्रियेशी संबंध असल्यामुळें यज् धातूच्या पुढील णिनि प्रत्यय भविष्यकालीं साधु समजला जातो.

५ त्या वेळीं तें कृत्य पढें होणारें असें होतें; त्या वेळीं त्याला मुलगा व्हावयाचा होता असा अर्थ आहे.

१ (सू. २) क्रियांचा समभिहार गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लोट् प्रत्यय होतो आणि त्या लोटाचे स्थानीं परस्मैपद प्राप्त झालें असतां 'हि' आदेश होतो; त्यांतसुद्धां मध्यमपुरुष बहुवचन आदेश (३।४।१०१) जेथें प्राप्त होईल तेथें विकल्पानें 'हि' आदेश होतो. तेव्हां एकदां 'त' आदेश होतो. तसेंच त्या लोटाचे स्थानीं आत्मनेपद प्राप्त झालें असतां 'स्व' आदेश होतो. त्यांतसुद्धां मध्यमपुरुष बहुवचन 'ध्वम्' आदेश जेथें प्राप्त होईल तेथें विकल्पानें 'स्व' आदेश होतो; तेव्हां एकदां 'ध्वम्' आदेश होतो. क्रियासमभिहार म्हणजे पुनः पुनः ती क्रिया करणें. किंवा ती क्रिया ज्यास्त करणें. उदा० लुनीहि लुनीहि इत्येवायं लुनाति. लुनीहि याला द्वित्व (८।१।४) झालें आहे. 'तोड तोड तोडतो' असा याचा अर्थ आहे. येथें कोणत्याही वचनाची, कोणत्याही पुरुषाची आणि कोणत्याही कालाची विवक्षा असली तरी 'लुनीहि' हा प्रयोग कायमच आहे. फक्त, पुढें लुनाति असा जो अनुप्रयोग होतो तेथें मात्र विवक्षेप्रमाणें लुनीतः लुनन्ति इत्यादि सर्व प्रकारचे प्रयोग होतात. त्यांत मध्यमपुरुष बहुवचनाची विवक्षा असेल तर 'लुनीहि लुनीहि' याच्या ऐवजीं एकदां 'लुनीत लुनीत' असा परस्मैपदामध्यें प्रयोग होतो आणि आत्मनेपदामध्यें 'लुनीष्व लुनीष्व' याच्या ऐवजीं एकदां 'लुनीध्वम् लुनीध्वम्' असा प्रयोग होतो.

लादेशप्रतिषेधार्थम् । लादेशौ हिस्वौ मा भूतामिति । किं च स्याद्यदि लादेशौ हिस्वौ स्याताम् । तिङन्तं पदमिति पदसंज्ञा न स्यात् ॥ मा भूदेवम् । सुबन्तं पदमिति पदसंज्ञा भविष्यति । कथं स्वाद्युत्पत्तिः ।

**लकारस्य कृत्त्वात्प्रातिपदिकत्वं तदाश्रयं प्रत्ययविधानम् ॥ २ ॥**

लकारः कृत्तस्य कृत्त्वात्कृत्प्रातिपदिकमिति प्रातिपदिकसंज्ञा तदाश्रया प्रातिपदिकाश्रया स्वाद्युत्पत्तिरपि भविष्यति ॥ यदि स्वाद्युत्पत्तिः सुपां श्रवणं प्राप्नोति । अव्ययादिति सुब्लुग्भविष्यति । कथमव्ययत्वम् । विभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च निपाता भवन्तीति निपातसंज्ञा निपातोऽव्ययमित्यव्ययसंज्ञा ॥ इह तर्हि स भवाँल्लुनीहि लुनीहीत्येवायं लुनाति तिङतिङः [ ८.१. २८] इति निघातो न प्राप्नोति ॥

**समसंख्यार्थं च ॥ ३ ॥**

समसंख्यार्थं च हिस्वयोः परस्मैपदात्मनेपदग्रहणं कर्तव्यम् । हिः परस्मैपदानां यथा स्यात्स्व आत्मनेपदानां व्यतिकरो मा भूदिति ॥

**न वा तध्वमोरादेशवचनं ज्ञापकं पदादेशस्य ॥ ४ ॥**

न वा हिस्वयोः परस्मैपदात्मनेपद-

---

उपयोग असा कीं तसे शब्द घातले नाहींत तर हे हि व स्व आदेश लकाराचे स्थानीं होतील ते तसे न झाले पाहिजेत.

पण लकाराचे स्थानीं म्ह. लोटाचे स्थानीं 'हि' व 'स्व' आदेश झाले तर काय होईल ?

जर ह्या सूत्रानें लोट् प्रत्यय करून त्याला मध्यें परस्मैपद व आत्मनेपद आदेश न करितां एकदम हि व स्व आदेश केले तर तिङ् प्रत्यय येथें न झाल्यामुळें तिङ्प्रत्ययान्ताला सांगितलेली 'पद' संज्ञा (१।४।१४) होणार नाहीं.

तिङ्प्रत्ययान्ताला सांगितलेली 'पद' संज्ञा न कां होईना, सुप्प्रत्ययान्ताला त्याच सूत्रानें जी 'पद' संज्ञा सांगितलेली आहे ती होईल.

पण येथें सुप् प्रत्यय तरी कसे होणार ?

(वा. २) लोट् हा 'कृत्' संज्ञक ( ३।१।९३ ) आहे. कृत्संज्ञेमुळें प्रातिपदिकसंज्ञा ( १।२।४६ ) होईल; आणि त्यामुळें पुढें सुप् प्रत्यय ( ४।१।२ ) होतील.

पण जर येथें सुप् प्रत्यय होतील तर त्यांचें श्रवण होऊं लागेल.

अव्ययादाप्सुपः ( २।४।८२ ) यानें त्या सुप् प्रत्ययांचा लुक् होईल.

पण येथें 'अव्यय' संज्ञा कशी ?

विभक्तिप्रत्ययान्तासारखे आणि स्वरासारखे दिसणारे जे शब्द त्यांना निपातसंज्ञा सांगितली आहे ( १।४।५७ गणसूत्र ) ती निपातसंज्ञा होते. नंतर निपाताला अव्ययसंज्ञा सांगितली आहे (१।१।३७); ती अव्ययसंज्ञा होईल.

तर मग लोटाचे स्थानीं एकदम हि व स्व आदेश झाले तर 'स भवान् लुनीहि लुनीहि इत्येवायं लुनाति' येथें भवान् या अतिङन्ताच्या पुढील लुनीहि याला तिङन्त म्हणून तिङतिङः (८।१।२८) या सूत्रानें अनुदात्त होत असतो तो होणार नाहीं.

(वा. ३) हि व स्व या आदेशांच्या संख्येबरोबर स्थानींची संख्या जुळण्याकरितांही येथें परस्मैपद व आत्मनेपद हे शब्द घातले पाहिजेत. कारण, क्रमानें (१।३।१०) परस्मैपदांचे स्थानीं हि आदेश आणि आत्मनेपदांचे स्थानीं स्व आदेश झाला पाहिजे. त्यांत घोटाळा होऊं नये.

(वा. ४) अथवा परस्मैपदांचे स्थानीं 'हि' आदेश होतो आणि आत्मनेपदांचे स्थानीं 'स्व' आदेश होतो असें येथें स्पष्ट म्हणावयास नको.

काय कारण ?

ग्रहणं कर्तव्यम् । किं कारणम् । तध्वमोरादेशवचनं ज्ञापकं पदादेशस्य । यदयं वा च तध्वमोरित्याह तज्ज्ञापयत्याचार्यः पदादेशौ हिस्वाविति ॥

**तत्र पदादेशे पित्त्वाटोः प्रतिषेधः ॥ ५ ॥**

तत्र पदादेशे पित्त्वस्याटश्च प्रतिषेधो वक्तव्यः । पित्त्वस्य तावत् । स भवाँल्लुनीहि लुहीनीत्येवायं लुनाति । आटः खल्वपि । सोऽहं लुनीहि लुनीहीत्येवं लुनामि ॥ पित्त्वस्य तावन्न वक्तव्यः । पित्प्रतिषेधे योगविभागः करिष्यते । इह सेर्हिर्भवति । ततोऽपिच्च । अपिच्च भवति यावान्हिर्नाम ॥ आटश्चापि न वक्तव्यः । आटि कृते साट्कस्यादेशो भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । आट्क्रियतामादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादाडागमः । नित्य आदेशः । कृतेऽप्याटि प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । आडपि नित्यः । कृतेऽप्यादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । अनित्य आट् । अन्यस्य कृतेऽप्यादेशे प्राप्नोत्यन्यस्याकृते ऽपि प्राप्नोति शब्दान्त-

---

कारण असें कीं याच सूत्रामध्यें आचार्य (पाणिनि) ' फक्त त चे स्थानीं होणारा हि आदेश आणि ध्वम् चे स्थानीं होणारा स्व आदेश हे विकल्पानें करावे ' अतें सांगतात त्यावरून ते असं सुचवितात कीं 'परस्मैपद' व 'आत्मनेपद' यांचेच हे आदेश आहेत.

(वा.५) परस्मैपद व आत्मनेपद यांचे स्थानीं जर हे आदेश होतील तर पित्त्व आणि आट् आगम यांचा प्रतिषेध सांगितला पाहिजे. यांपैकीं पित्त्वाचें उदाहरण 'स भवान् लुनीहि[२] लुनीहि इत्येवायं लुनाति.' आट् आगमाचें उदाहरण 'लुनीहि[३] लुनीहि इत्येवाहं लुनामि'

पित्त्वाचा तर प्रतिषेध करावयास नको. सेर्ह्यपिच्च (३।४।८७) येथें योगविभाग करितां येईल. तो असाः– 'सेर्हि' येवढेंच पहिलें सूत्र होय. लोटाचे स्थानीं झालेल्या 'सिप्' प्रत्ययाला 'हि' आदेश होतो असा त्याचा अर्थ होय. त्याच्या पुढें 'अपिच्च' हें दुसरे सूत्र होय. ह्या शास्त्रामध्यें 'हि' असा प्रत्यय ज्या ठिकाणीं असेल त्या सर्व ठिकाणीं तो 'पित्' होत नाहीं. आट् आगमाचाही प्रतिषेध सांगावयास नको. कारण हा 'हि' आदेश होण्यापूर्वीच 'मिप्' प्रत्ययाला 'आट्' आगम झाल्यानंतर त्या आट् आगमासहित मिप् प्रत्ययाला हा 'हि' आदेश झाला म्हणजे लुनीहि रूप साधेल.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो कीं 'लुनीहि' येथें 'मिप्' प्रत्ययाला 'आट्' आगम अगोदर करावा किंवा हा 'हि' आदेश अगोदर करावा.

मग या दोहोंमध्यें काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव आट् आगम अगोदर करावा.

पण हा ' हि ' आदेश नित्य आहे ना ! कारण, आट् आगम केला तरी ' हि ' आदेश प्राप्त होतो; आणि न केला तरी प्राप्त होतो.

तसा ' आट् ' आगम पण नित्य आहे; कारण, 'हि' आदेश केला तरी आट् आगम प्राप्त होतो, आणि न केला तरी प्राप्त होतो.

आट् आगम अनित्य आहे. कारण, हि आदेश केल्यानंतर एकाला प्राप्त होतो आणि 'हि' आदेश करण्याचे पूर्वी दुसऱ्याला प्राप्त होतो. आणि अशा रीतीनें निरनिराळ्या शब्दा-

---

२. येथें लोट् प्रत्ययाचे स्थानीं सिप् आदेश करून त्याचे स्थानीं केलेला हि आदेश स्थानिवद्भावानें (१।१।५६) पित् समजला जाईल; त्यामुळें त्याला ङित्व (१।२।४) होणार नाहीं; म्हणून ईत्व (६।४।११३) होणार नाहीं.

३. येथें लोट् प्रत्ययाचे स्थानीं मिप् आदेश करून त्याचे स्थानीं केलेला हि आदेश स्थानिवद्भावानें उत्तम पुरुष समजला तर त्याला आट् आगम (३।४।९२) होऊं लागेल.

रस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । आदेशो ऽप्यनित्यः । अन्यस्य कृत आटि प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । उभयोरनित्ययोः परत्वादाडागमः । आटि कृते साटकस्यादेशो भविष्यति ॥ इदं तर्हि सो ऽहं भुङ्क्ष्व भुङ्क्ष्वेत्येवं भुनजा इति श्नसोरल्लोपः [ ६. ४. १११ ] इत्यकारलोपो न प्राप्नोति ॥ समसंख्यार्थत्वं चाप्यपरिहृतमेव ॥

**सिद्धं तु लोण्मध्यमपुरुषैकवचनस्य क्रियासमभिहारे द्विर्वचनात् ॥ ६ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । लोण्मध्यमपुरुषैकवचनस्य क्रियासमभिहारे द्वे भवत इति वक्तव्यम् ॥ केन विहितस्य क्रियासमभिहारे लोण्मध्यमपुरुषैकवचनस्य द्विर्वचनमुच्यते । एतदेव ज्ञापयत्याचार्यो भवति क्रियासमभिहारे लाडिति यदयं क्रियासमभिहारे लोण्मध्यमपुरुषैकवचनस्य द्विर्वचनं शास्ति । कुतो नु खल्वे

ला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो.

तसा ' हि ' आदेश पण अनित्य आहे. कारण आट् आगम केल्यानंतर एकाला प्राप्त होतो, आणि आट् आगम करण्याचे पूर्वी दुसऱ्याला प्राप्त होतो. आणि अशा रीतीनें निरनिराळ्या शब्दाला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो. तेव्हां दोन्हीहि अनित्य असल्यामुळें त्यांमध्यें परत्वास्तव आट् आगम अगोदर होईल आणि आट् आगम झाल्यानंतर त्या आट् आगमासहित मिप् प्रत्ययाला ' हि ' आदेश होईल.

अशा रीतीनें येथील दोष दूर झाला तरी ' भुङ्क्ष्व भुङ्क्ष्व इत्येवं भुनजै ' येथें " श्नसोरल्लोपः " (६।४।१११) यानें अकाराचा लोप होणार नाहीं हा दोष येतोच. बरें, आतां हा दोष जाण्याकरितां हे आदेश लोटालाच होतात असें म्हणावें, तर ' हि ' व ' स्व ' या दोन आदेशांच्या संख्येबरोबर संख्या जुळण्याकरितां परस्मैपद आणि आत्मनेपद हे दोन प्रकारचे स्थानी येथें सांगितले पाहिजेत असें जें पूर्वी ( वा. २ ) म्हटलें होतें त्याचें उत्तर कांहीं दिलें नाहीं. तेव्हां तो दोष येतो.

( वा. ६) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

लोट् मध्यमपुरुष एकवचनी क्रियापदाला क्रियासमभिहार अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें एवढेंच येथें सांगावें. आतां क्रियासमभिहार या अर्थी लोट् प्रत्यय कोणीं सांगितला आहे कीं त्यांतील मध्यमपुरुष एकवचनी क्रियापदाला येथें सांगितलेलें द्वित्व करितां येईल अशी आकांक्षा आली असतां ज्या अर्थी क्रियासमभिहार हा अर्थ असतांना लोट् मध्यमपुरुष एकवचनीं क्रियापदाला आचार्यांनीं द्वित्व सांगितलें आहे त्या अर्थी क्रियासमभिहार या अर्थी लोट् प्रत्यय होतो असें त्यांनीं सूचित केलें आहे असें समजलें जाईल.

पण येथें ज्ञापकावरूनच लोट् प्रत्यय होतो. असें कसें गृहीत धरतां येईल ? कारण, जो सामान्यतः मोघम लोट् प्रत्यय ( १।३।१६२ ) सांगितला आहे तो केल्यानंतर तेथें जेव्हां क्रियासमभिहार अर्थ गम्यमान असेल तेव्हां त्याला द्वित्व होतें असें कां बरें गृहीत धरूं नये ?

४. भुङ्क्ष्व येथें उत्तमपुरुष एकवचन इट् प्रत्ययाला आट् आगम झाल्यानंतर स्व आदेश झाला तरी तो आट् पित् असल्यामुळें स्थानिवद्भावानें स्व आदेश पित् होईल, म्हणून ङित् ( १।२।४ ) न झाल्यामुळें 'श्नसोरल्लोपः' (६।४।११) याची प्राप्ति येणार नाहीं.

५. असें केलें असतां 'परस्मैपदी धातूंच्या पुढेंही स्व आदेश होईल आणि आत्मनेपदी धातूंच्या पुढेंही हि आदेश होईल ' हा घोटाळा होत नाहीं. तसेंच पित्त्व व आट् आगम यांचा प्रतिषेध करावयास नको, व तिङ् असल्यामुळें अनुदात्तही होईल.

तज्ज्ञापकादत्र लोड्भविष्यति न पुनर्य एवासावविशेषविहितः स यदा क्रियासमभिहारे भवति तदास्य द्विर्वचनं भवतीति । लोण्मध्यमपुरुषैकवचन एव खल्वपि सिद्धं स्यादिमौ चान्यौ हिस्वौ सर्वेषां पुरुषाणां सर्वेषां वचनानामिष्येते । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं हिस्वयोः परस्मैपदात्मनेपदग्रहणं लादेशप्रतिषेधार्थं समसंख्यार्थं चेति । नैष दोषः ।

**योगविभागात्सिद्धम् ॥ ७ ॥**

योगविभागः करिष्यते । क्रियासमभिहारे लोड्भवति । ततो लोटो हिस्वौ भवतः । लोडित्येवानुवर्तते । लोटौ यौ हिस्वाविति । कथं वा च तध्वमोरिति । वा च तध्वंभाविनो लोट इत्येवमेतद्विज्ञायते ॥

**[ समुच्चयेऽन्यतरस्याम् ॥३।४।३॥ ]**[१]

**यथाविध्यनुप्रयोगः पूर्वस्मिन्**[१] **३ । ४ । ४ ।**

शिवाय, लोट् मध्यमपुरुष एकवचनी क्रियापदामध्यें जे 'हि' (३।४।८७) आणि 'स्व' (३।४।९१) होतात तेवढ्यापुरतें हें द्वित्व होऊन उदाहरण साधेल. परंतु येथें जे हे आचार्यांनीं निराळे हि आणि स्व सांगितले आहेत ते प्रथम, मध्यम व उत्तम या तिन्ही पुरुषांमध्यें आणि एकवचन द्विवचन आणि बहुवचन या तिन्ही वचनांमध्यें इष्ट आहेत ते साधत नाहींतच. शिवाय, सूत्र फिरवावें लागतें हा दोष येतोच.

तर मग मूळचें सूत्र जसें आहे तसेंच असू दे.

पण परस्मैपद आणि आत्मनेपद यांना क्रमानें हि आणि स्व हे आदेश सांगावे; कारण, लोटाचे स्थानीं ते आदेश न झाले पाहिजेत याकरितां आणि स्थानी व आदेश यांची संख्या जुळण्याकरितां असें म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं.

(वा.७) येथें योगविभाग करावा. तो असाः—

'क्रियासमभिहारे लोट्' एवढेंच पहिलें सूत्र होय. क्रियासमभिहार हा अर्थ गम्यमान असतांना धातूहून कालसामान्यीं लोट् प्रत्यय होतो असा त्याचा अर्थ होय. त्याच्या पुढें "लोटो हिस्वौ" हें दुसरें सूत्र होय. येथें पूर्व सूत्रांतून 'लोट्' एवढ्याच पदाची अनुवृत्ति आहे. पूर्वसूत्रानें सांगितलेल्या लोटाला 'हि' आणि 'स्व' हे आदेश होतात; आणि लोट् जे 'हि' (३।४।८७) आणि 'स्व' (३।४।९१) त्यांप्रमाणेंच[६] हे 'हि' आणि 'स्व' समजावे.

'वा च तध्वमोः' या सूत्रांतील भागाचा अर्थ काय ?

परस्मैपदांतील 'त' आणि आत्मनेपदांतील 'ध्वम्' हे जे मध्यमपुरुष बहुवचनाचे प्रत्यय ते ज्या ठिकाणीं पूर्वसूत्रानें केलेल्या ह्या लोटाला होणारे असतील तेथें त्या लोटाला 'हि' व 'स्व' हे आदेश विकल्पानें होतात, असा त्याचा अर्थ होय.

६. या अतिदेशानें ह्या 'हि' याला परस्मैपदसंज्ञा आणि स्व याला आत्मनेपद संज्ञा होते. त्यामुळें परस्मैपदी धातूच्या पुढील ह्या लोटाला स्व होत नाहीं आणि आत्मनेपदी धातूच्या पुढील ह्या लोटाला हि होत नाहीं. तसेंच या अतिदेशानें ह्या हि व स्व यांना तिङ्संज्ञा झाल्यामुळे 'तिङ्ङतिङः' (८।१।२८) यानें अनुदात्त सिद्ध होतो. व पदसंज्ञाही सिद्ध होते.

१. (सू. ३) अनेक क्रियांचा समुच्चय गम्यमान असेल तर त्या क्रियांचे वाचक धातूहून विकल्पानें लोट् प्रत्यय होतो. त्याचे स्थानीं पूर्वीप्रमाणेंच हि व स्व हे आदेश होतात. त आणि ध्वम् यांच्या विषयामध्यें विकल्पानें होतात. उदा० सक्तून् पिब धानाः खादेत्यभ्यवहरति.

१. (सू. ४) लोट् प्रत्यय सांगणारी जी मागील दोन सूत्रें त्यांतील पूर्वसूत्रानें लोट् प्रत्यय केला

किमर्थमिदमुच्यते । अनुप्रयोगो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । हिस्वान्तमव्यक्तपदार्थकं तेनापरिसमाप्तोऽर्थ इति कृत्वानुप्रयोगो भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनं यथाविधीति वक्ष्यामीति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । समुच्चये सामान्यवचनस्य [ ३.४.५. ] इति वक्ष्यति तत्रान्तरेण वचनं यथाविध्यनुप्रयोगो भविष्यति ॥

**समुच्चये सामान्यवचनस्य ॥ ३ । ४ । ५ ॥**

किमर्थमिदमुच्यते । अनुप्रयोगो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । हिस्वान्तमव्यक्तपदार्थकं तेनापरिसमाप्तोऽर्थ इति कृत्वानुप्रयोगो भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनं सामान्यवचनस्येति वक्ष्यामीति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । सामान्यवचनस्यानुप्रयोगोऽस्तु विशेषवचनस्येति सामान्यवचनस्यैवानुप्रयोगो भविष्यति लघुत्वात् ॥

---

(सू. ४) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? अनुप्रयोग झाला पाहिजे म्हणून केलें आहे.

हा या सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण कीं, काल, कारक आणि संख्या या अर्थांची प्रतीति या हिप्रत्ययान्त आणि स्वप्रत्ययान्त पदापासून होत नाहीं; तर केवळ क्रियेचीच प्रतीति होते. तेव्हां अपुरा असलेला अर्थ भरून काढण्यासाठीं आपोआपच पुढें एखाद्या क्रियापदाचा अनुप्रयोग होईलच.

तर मग ह्या सूत्राचा उपयोग असा समजावा कीं त्याच धातूचा अनुप्रयोग झाला पाहिजे.

हा देखील उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'समुच्चये सामान्यवचनस्य' या पुढील सूत्रानें 'अनेक क्रियांचा समुच्चय असेल तेथेंच फक्त सामान्यक्रियावाचक अशा इतर धातूचा अनुप्रयोग करावा' असा नियम केला आहे. तेव्हां अर्थातच हें प्रकृत सूत्र केलें नाहीं तरी येथें त्याच धातूचा अनुप्रयोग होईल.

(सू. ५) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? अनुप्रयोग झाला पाहिजे म्हणून केलें आहे.

हा या सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण कीं, काल कारक आणि संख्या या अर्थांची प्रतीति या हिप्रत्ययान्त आणि स्वप्रत्ययान्त पदांपासून होत नाहीं; केवळ क्रियेचीच प्रतीति होते. तेव्हां अपुरा असलेला अर्थ भरून काढण्यासाठीं आपोआपच पुढें एखाद्या क्रियापदाचा अनुप्रयोग होईलच.

तर मग या सूत्राचा उपयोग असा समजावा कीं, सामान्यक्रियावाचक धातूचाच अनुप्रयोग झाला पाहिजे.

हा देखील उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, सामान्यक्रियावाचक धातूचा अनुप्रयोग करावा किंवा विशेषक्रियावाचक धातूचा अनुप्रयोग करावा असा विचार प्राप्त झाला असतां तेथें सामान्यक्रियावाचक धातूचाच अनुप्रयोग होईल. कारण त्यांतच लाघव[२] आहे.

---

असतां तो लोट् प्रत्यय ज्या धातूहून केला असेल त्याच धातूचा पुढें अनुप्रयोग होतो. त्यामुळें लुनीहि लुनीहीत्येवायं छिनत्ति असा प्रयोग होत नाहीं.

१. ( सू. ५ ) समुच्चयेन्यतरस्याम् ( ३।४।३ ) या सूत्रानें लोट् प्रत्यय केला असतां तेथें सामान्य क्रियावाचक अशा धातूंचा अनुप्रयोग करावा. त्यामुळें सक्तून् पिब, धानाः खाद इति ओदनं भुङ्क्ते असा अनुप्रयोग होत नाहीं.

२. 'पशुः' या विशेष शब्दाच्या पुढें प्राणी असा सामान्य शब्द घातला तर पशु हा प्राणी आहे असा अन्वय चटदिशी मनांत येतो; आणि पशुः या विशेष शब्दाच्या पुढें पक्षी असा विशेष शब्दच घातला

**[ छन्दसि लुङ्लङ्लिटः ॥ ३ । ४ । ६ ॥**

**लिङर्थे लेट् ॥ ३ । ४ ।७॥ ]**

**उपसंवादाशङ्कयोश्च ॥३।४।८॥**

**उपसंवादाशङ्कयोर्वचनानर्थक्यं लिङर्थत्वात् ॥ १ ॥**

उपसंवादाशङ्कयोर्वचनमनर्थकम् । किं कारणम् । लिङर्थत्वात् । लिङर्थे लेट् [ ३. ४. ७ ] इत्येव सिद्धम् ॥ कः पुनर्लिङर्थः । केचित्तावदाहुः । हेतुहेतुमतोर्लिङ् [ ३. ३. १५६ ] इति । अपर आहुः । वक्तव्य एवैतस्मिन्विशेषे लिङ् । प्रयुज्यते हि लोके यदि मे भवानिदं कुर्यादहमपि त इदं दद्याम् ॥

**तुमर्थे सेसेनसेऽसेन्क्सेकसेनध्यैअध्यैन्कध्यैकध्यैन्शध्यैशध्यैन्तवैतवेङ्तवेनः ॥ ३ । ४ । ९॥**

तुमर्थ इत्युच्यते कस्तुमर्थः । कर्ता ।

(सू. ८ वा. १) उपसंवाद आणि आशंका या अर्थी जो येथें लेट् प्रत्यय सांगितला आहे तें वचन व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं ते लिङ् प्रत्ययाचे अर्थ आहेत. तेव्हां 'लिङर्थे लेट्' या पूर्वसूत्रानेंच तेथें लेट् प्रत्यय सिद्ध होत आहे.

पण येथें कोणता बरें लिङ् प्रत्ययाचा अर्थ आहे ?

याचें उत्तर कांहीं लोक असें देतात कीं, कार्यकारणभाव येथें गम्यमान होतो. आणि तो लिङ् प्रत्ययाचा अर्थ हेतुहेतुमतोर्लिङ् (३।३।१५६) या सूत्रावरून समजतो. दुसरे कांहीं लोक असें म्हणतात कीं, उपसंवाद आणि आशंका या अर्थी लिङ् प्रत्ययच मुळीं सांगितला पाहिजे. कारण 'यदि मे भवानिदं कुर्यादहमपि ते इदं दद्याम्' असा लिङाचा प्रयोग लोकांमध्यें दृष्टीस पडतो.

(सू. ९) येथें तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी असें म्हटलें आहे. तो तुमुन् प्रत्ययाचा अर्थ कोणता ?

कर्ता हा तुमुन् प्रत्ययाचा अर्थ होय. (३।४।६७).

---

तर तेथें प्राणी असा अध्याहार करून पशु व पक्षी हे दोनही प्राणी आहेत असा अर्थ करावा लागतो हें गौरव होतें.

१. (सू. ६) लुङ् (३।२।११०) लङ् (३।२।१११) आणि लिट् (३।२।११५) हे प्रत्यय ज्या अर्थी सांगितले आहेत तो अर्थ विवक्षित नसतांनाही वेदामध्यें ते प्रत्यय विकल्पानें होतात. तेव्हां तेथें तो अर्थ विवक्षित असलेल्या अर्थी प्राप्त झालेले प्रत्ययही एकदां होतात.

१. (सू. ७) लिङ् प्रत्ययाच्या अर्थी लेट् प्रत्यय वेदामध्यें विकल्पानें होतो. (३।२।३४ टीप ५ पहा.)

१. (सू. ८) उपसंवाद आणि आशंका हे अर्थ गम्यमान असतांना वेदामध्यें लेट् प्रत्यय होतो. तूं मज्जसाठीं अमुक केलेंस तर मी अमुक करीन अशा प्रकारचा जो पणबन्ध त्याला उपसंवाद म्हणतात. जसें 'द्यूतामध्यें पराभव केलास तर वनवास करीन' असें दुर्योधनाला धर्मराजाचें भाषण. जर अमुक झालें तर अमुक गोष्ट प्राप्त होईल अशी जी उत्प्रेक्षा तिला आशंसा म्हणतात. येथें ती गोष्ट खात्रीनें प्राप्त होईलच असा निश्चय नसला तरी बऱ्याच अंशानें संभव असतो.

२ येथें हेतुहेतुमतोर्लिङ् (३।३।१५६) यानें लिङ् प्रत्यय होतो असें म्हणतां येत नाही. कारण उपसंवादामध्यें खरा कार्यकारणभाव नसतो द्यूतामध्यें पराजय हें कांहीं वनवासाचें कारण सर्वत्र ठरविलेलें नाहीं. धर्मराजानें आपल्या पुरतें तें सुद्धां त्या वेळेपुरतें कल्पिलेलें आहे. आशंकेमध्यें निश्चय नसल्यामुळे कार्यकारणभाव तेथेंही खरा विवक्षित नाहीं.

१. से, सेन्, असे, असेन्, क्से, कसेन्, अध्यै, अध्यैन्, कध्यै, कध्यैन्, शध्यै, शध्यैन्, तवै, तवेङ् आणि तवेन् हे प्रत्यय वेदामध्यें तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी होतात. या प्रत्ययांतील नकार, ककार, शकार आणि ङकार हे इत्संज्ञक आहेत.

यद्येवं नार्थस्तुमर्थग्रहणेन । येनैव खल्वपि हेतुना कर्तरि तुमुन्भवति तेनैव हेतुना सयादयोऽपि भविष्यन्ति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्तुमर्थग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽस्त्यन्यः कर्तुस्तुमुनोऽर्थ इति । कः पुनरसौ । भावः । कुतो नु खल्वेतद्भावे तुमुन्भविष्यति न पुनः कर्मादिषु कारकेष्विति । ज्ञापकादयं कर्तुरपकृष्यते न चान्यस्मिन्नर्थ आदिश्यते ऽनिर्दिष्टार्थाश्च प्रत्ययाः स्वार्थे भवन्तीति स्वार्थे भविष्यति। तद्यथा । गुप्तिज्किद्भ्यः सन् [ ३.१.५ ] । यावादिभ्यः कन् [ ५.४. २९ ] इति । सोऽसौ स्वार्थे भवन्भावे भविष्यति ॥ किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । अव्ययकृतो भावे भवन्तीत्येतन्न वक्तव्यं भवति ॥

[ प्रयै रोहिष्यै अव्यथिष्यै ॥ ३।४।१०॥[१]

दृशे विख्ये च ॥ ३।४।११ ॥[१]

शकि णमुल्कमुलौ ॥ ३।४।१२ ॥[१]

ईश्वरे तोसुन्कसुनौ ॥३।४।१३॥[१]

---

असेंच जर असेल, तर येथें तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी असें म्हणण्याचा कांहींच उपयोग दिसत नाहीं. कारण ज्या कारणानें तुमुन् प्रत्यय कर्ता या अर्थी होणार त्याच कारणानें से वगैरे प्रत्ययही कर्ता या अर्थी होतील.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांनाही ज्या अर्थी येथें 'तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी' असें आचार्य म्हणतात त्या अर्थी ते असें सुचवितात कीं, तुमुन् प्रत्ययाचा अर्थ कर्ता याशिवाय निराळा कांहीं तरी आहे.

तो कोणता बरें असावा ?

भाव हा तो अर्थ होय.

पण तुमुन् प्रत्यय कर्म वगैरे अर्थी न होतां भाव या अर्थीच होईल हें कशावरून ?

अशावरून कीं, येथें जें 'तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी' असें म्हटलें आहे त्यावरून कर्ता हा अर्थ तुमुन् प्रत्ययाचा नाहीं असें ठरतें आणि दुसरा कोणताही अर्थ तुमुन् प्रत्ययाचा सांगितला नाहीं. आणि 'मोघम सांगितलेला प्रत्यय स्वार्थी होतो' असा न्याय आहे. तेव्हां तुमुन् प्रत्यय स्वार्थी होईल. जसें गुप्तिज्किद्भ्यः सन् ( ३।१।५ ), यावादिभ्यः कन् (५।४।२९) हे प्रत्यय स्वार्थी होतात. तो हा स्वार्थी होणारा तुमुन् प्रत्यय भाव या अर्थीच होईल. कारण धातूचा स्वार्थ म्हणजे भावच होय.

'तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी' या म्हणण्यावरून तुमुन् प्रत्ययाचा अर्थ कर्ता नाहीं असें ज्ञापन करून युक्तीनें जो तुमुन् प्रत्ययाचा अर्थ भाव हा ठरविला त्याचा उपयोग काय ?

अव्यय संज्ञेला कारणीभूत (१।१।३९,४०) जे कृत् प्रत्यय ते भाव या अर्थी होतात असें निराळें सांगावयास नको.

---

१. (सू.१०)प्रयै, रोहिष्यै आणि अव्यथिष्यै हे शब्द तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी वेदामध्यें निपातन केले आहेत. यांना अव्ययसंज्ञा ( १।१।३९ ) आहे. प्र उपसर्गापुढील या धातूहून कै प्रत्यय होतो. रुह् आणि नञ्च्या पुढील व्यथ् धातूहून इष्यै प्रत्यय होतो. प्रयाणाकरितां, आरोहणाकरितां, आणि व्यथा न होण्याकरितां, असे यांचे क्रमानें अर्थ आहेत.

१. (सू. ११) दृशे आणि विख्ये हे शब्द तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी वेदामध्यें निपातन केलें आहेत. यांना अव्यय संज्ञा आहे. दृश् धातु आणि वि उपसर्गापुढील ख्या धातु यांहून के प्रत्यय होतो. पाहण्याकरितां आणि सांगण्याकरितां, असे यांचे क्रमानें अर्थ आहेत.

१.(सू.१२)शक् धातु उपपद असतांना वेदामध्यें तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी णमुल् आणि कमुल् असे प्रत्यय होतात. उ० विभाजं नाशक्नुवन्. अपलुपं नाशक्नुवन्. विभक्तुम् आणि अपलोप्तुम् असे यांचे अर्थ आहेत. यांनाही अव्ययसंज्ञा आहेच.

१.(सू.१३)ईश्वर शब्द उपपद असतांना वेदामध्यें तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी तोसुन् आणि कसुन् असे प्रत्यय

कृत्यार्थे तवैकेन्केन्यत्वनः ॥ ३।४।१४ ॥
अवचक्षे च ॥ ३।४।१५ ॥
भावलक्षणे स्थेण्कृञ्वदिचरिहुतमिजनिभ्यस्तोसुन् ॥ ३।४।१६ ॥
सृपितृदोः कसुन् ॥ ३।४।१७ ॥
अलंखल्वोः प्रतिषेधयोः प्राचां क्त्वा ॥ ३।४।१८ ॥ ]

उदीचां माङो व्यतीहारे ॥ ३ । ४ । १९ ॥

किमर्थं मेङः सानुबन्धकस्यात्त्वभूतस्य ग्रहणं क्रियते नोदीचां मेङ इत्येवोच्येत। तत्रायमप्यर्थ उदीचां मेङ इति व्यतिहारग्रहणं न कर्तव्यं भवति । किंकारणम् । तद्विषयो हि सः । व्यतिहारविषय एव मयतिः ॥ एवं तर्हि सिद्धे सति यन्मेङः सानुबन्धकस्यात्त्वभूतस्य ग्रहणं करोति

---

(सू. १९) येथें ङकार इत्संज्ञकासहित मेङ् धातु आत्व करून उच्चारिला आहे, तसा उच्चारूं नये; 'उदींचां मेङः' असेंच सूत्र करावें. तसें करण्यांत दुसरी एक गोष्ट अशी साधते कीं, उदीचा मेङः एवढेंच सूत्र पुरेंसें होईल. व्यतीहारे हें म्हणावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं, त्याच अर्थाचा तो आहे. व्यतिहार हाच मेङ् धातूचा अर्थ आहे.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांनाही येथें आचार्य सूत्रकार ज्या अर्थी ङकार इत्संज्ञकासहित मेङ् धातूचें आत्व करून उच्चा-

---

होतात. उ० ईश्वरोभिचरितोः ईश्वरो विलिखः; अभिचरितुम् आणि विलिखितुम् असे यांचे अर्थ आहेत. येथेंही अव्ययसंज्ञा (१।१।४०) आहेच.

१. (सू.१४)तवै केन् केन्य आणि त्वन् हे प्रत्यय वेदामध्यें कृत्य प्रत्ययाच्या अर्थी होतात. उदा०-अन्वेतवै, अवगाहे, दिदृक्षेण्यः, कर्त्वम्. अन्वेतव्यम्, अवगाहितव्यम्, दिदृक्षितव्यः, कर्तव्यम् असे क्रमानें अर्थ आहेत. तवै आणि केन् हे प्रत्यय केले असतां अव्ययसंज्ञा आहे.

१.(सू.१५)अवचक्षे असें वेदामध्यें कृत्य प्रत्ययाच्या अर्थी निपातन केले आहे. अव उपसर्गापुढील चक्ष् धातुहून एश् प्रत्यय झाला आहे. याला अव्ययसंज्ञा आहे. अवख्यातव्यम् असा याचा अर्थ आहे.

१.(सू.१६)स्था,इण्,कृञ्,वद्,चर्,हु,तम् आणि जन् या धातूंहून वेदामध्यें भावी तोसुन् प्रत्यय होतो. परंतु स्था वगैरे धातूंचा अर्थ जी क्रिया तिनें दुसरी क्रिया मर्यादित होत असेल तर– उदा० आसंस्थातोः वेद्यां सीदन्ति. संस्थातोः हे अव्यय आहे. त्याचा अर्थ समाप्ति असा आहे.

१. (सू.१७)सृप् आणि तृद् या धातूंहून वेदामध्यें भावी कसुन् प्रत्यय होतो,परंतु धात्वर्थ जी क्रिया तिनें दुसरी क्रिया मर्यादित होत असेल तर. उदा०– पुरा विसृपः. विसृपः म्ह. विसर्पण (गमन) त्याचें पूर्वी असा अर्थ आहे. दुसऱ्या क्रियेवर त्याचा अन्वय आहे. पुरा आतृदः. आतृदः म्ह. आतर्दन (हिंसन) त्याचें पूर्वी असा अर्थ आहे. येथेंही अव्यय संज्ञा आहे.

१. (सू.१८)प्रतिषेध या अर्थाचे अलम् किंवा खलु हे शब्द उपपद असतांना धातूहून भावी क्त्वा प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०'अल कृत्वा', 'खलु कृत्वा'. आतां करणें नको असा अर्थ आहे.

१. (सू.१९)विनिमय करणें या अर्थाच्या मेङ् धातूहून क्त्वा प्रत्यय विकल्पानें होतो उदा० अपमित्य याचते. एखाद्या वस्तूची याचना करून मागाहून बदलतो असा अर्थ आहे. येथें याचना करणें ही क्रिया पूर्वकाली आहे, आणि बदलणें ही क्रिया उत्तर कालची आहे. तेव्हां मेङ् धातूहून क्त्वा प्रत्यय (३।४।२१) होणार नाहीं म्हणून हें सूत्र केलें आहे. एकदां याचित्वा अपमयते असा प्रयोग होतोच. सूत्रांतील माङः या पदानें मोजणें या अर्थाच्या माङ् धातूचें ग्रहण होऊं नयें म्हणून व्यतीहारे असें म्हटलें आहे.

तज्ज्ञापयत्याचार्यो नानुबन्धकृतमनेजन्तत्वं भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । तत्रासरूपसर्वादेशदाप्प्रतिषेधे पृथक्त्वनिर्देशो ऽनाकारान्तत्वादित्युक्तं तन्न वक्तव्यं भवति ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते न समानकर्तृकयोः पूर्वकाले [३.४.२१] इत्येव सिद्धम् । अपूर्वकालार्थो ऽयमारम्भः । पूर्वं ह्यसौ याचते पश्चादपमयते ॥

[परावरयोगे च ॥ ३ । ४ । २० ॥]

समानकर्तृकयोः पूर्वकाले ॥ ३ । ४ । २१ ॥

इह कस्मान्न भवति पूर्वं भुङ्क्ते पश्चाद्व्रजतीति । स्वशब्देनोक्तत्वान्न भवति । न तर्हीदानीमिदं भवति पूर्वं भुक्त्वा ततो व्रजतीति । नैतत्क्रियापौर्वकाल्यम् । किं तर्हि । कर्तृपौर्वकाल्यमेतत् । पूर्वं ह्यसौ भुक्तान्येभ्यो भोक्तृभ्यस्ततः पश्चाद्व्रजत्यन्येभ्यो व्रजितृभ्यः ॥

इह कस्मान्न भवति । आस्यते भोक्तुमिति । कुतः कस्मान्न भवति किमासेरा होस्विद् भुजेः। भुजेः कस्मान्न भवति। अपू-

रण करितात त्या अर्थी त्यावरून ते असें सुचवितात कीं, एजन्ताच्या पुढें इत्संज्ञक वर्ण जरीं असला तरी त्यामुळें पूर्वीचा भाग एजन्त नाहीं असें समजूं नये.

या ज्ञापनाचा काय बरें उपयोग ?

उपयोग असा कीं, 'तत्रासरूपसर्वादेशदाप्प्रतिषेधे पृथक्त्वनिर्देशोऽनाकारान्तत्वात्' ( १।३।९ वा. १० ) असें जें म्हटलें आहे तें म्हणावयास नको.

पण हें सूत्रच मुळीं कशाकरितां बरें केलें आहे ? तें करावयास नको. कारण, 'समानकर्तृकयोः पूर्वकाले' ( ३।४।२१ ) यानेंच क्त्वा प्रत्यय होईल.

पूर्वकालिक क्रियावाचक धातूहून क्त्वा प्रत्यय त्यानें सांगितला आहे; आणि पूर्वकालीं क्रिया नसतांनाही क्त्वा प्रत्यय होण्याकरितां हें सूत्र केलें आहे. कारण, हा पूर्वी कांहींतरी वस्तूची याचना करतो आणि नंतर त्यांत बदल करतो.

(सू. २१) 'पूर्वं भुङ्क्ते पश्चाद् व्रजति' येथें भुज् धातूहून क्त्वा प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

पूर्व या शब्दानेंच भोजनक्रियेचा पूर्वकाल दाखविला असल्यामुळें होत नाहीं.

तर मग 'पूर्वं भुक्त्वा ततो व्रजति' असा प्रयोग होतच नाहीं काय ?

तसा प्रयोग होतो; पण त्याचा अर्थ निराळा आहे. तेथें कांहीं गमनक्रियेपेक्षा भोजनक्रियेचा जो पूर्वकाल तो कांहीं पूर्वशब्दानें दाखविला जात नाहीं. तो क्त्वा प्रत्ययानेंच दाखविला आहे.

तर मग पूर्वशब्दानें कोणाचा पूर्वकाल दाखविला जातो ?

कर्त्याच्या संबंधानें पूर्वकाल पूर्वशब्दानें दाखविला आहे. म्हणजे इतर भोजन करणाऱ्यांपेक्षां हा अगोदर भोजन करून नंतर इतर गमन करणाऱ्यांपेक्षां अगोदर गमन करितो.

आता आस्यते भोक्तुम् येथें क्त्वा प्रत्यय कां होत नाहीं ?

पण क्त्वा प्रत्यय कां होत नाहीं हा प्रश्न कोणत्या धातूसंबंधानें करीत आहां? आस् धातूसंबंधानें कां भुज् धातूसंबंधानें ? भुज् धातूहून कां होत नाहीं असें विचाराल तर भोजनक्रिया

१. (सू. २०) एक पदार्थ अलीकडे व एक पदार्थ पलीकडे असा त्यांचा योग गम्यमान असतांना धातूहून क्त्वा प्रत्यय होतो. अप्राप्य नदीं पर्वतः; अथवा अतिक्रम्य पर्वतं नदी. येथें दोन्ही ठिकाणीं पर्वत अलीकडे व नदी पलीकडे असा अर्थ विवक्षित आहे.

१. (सू. २१) ज्या अनेक क्रियांचा कर्ता एक आहे त्या क्रियांपैकीं पूर्वकालची जी क्रिया तद्वाचक धातूहून क्त्वा प्रत्यय होतो. उ०-स्नात्वा भुक्त्वा व्रजति,

२. जेवण्याकरितां येथें ठाणें दिलें आहे असा अर्थ आहे.

र्वकालत्वात् । आसेस्तर्हि कस्मान्न भवति । यस्मादत्र लड् भवति । एतदत्र प्रष्टव्यं लडत्र कथं भवतीति । लट् चात्र वासरूपेण भविष्यति ॥

## समानकर्तृकयोरिति बहुष्वप्राप्तिः ॥ १ ॥

समानकर्तृकयोरिति बहुषु क्त्वा न प्राप्नोति । स्नात्वा भुक्त्वा पीत्वा व्रजतीति । किं पुनः कारणं न सिध्यति । द्विवचननिर्देशात् । द्विवचनेनायं निर्देशः क्रियते तेन द्वयोरेव पौर्वकाल्ये स्याद्बहूनां न स्यात् ॥

## सिद्धं तु क्रियाप्रधानत्वात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । क्रियाप्रधानत्वात् । क्रियाप्रधानो ऽयं निर्देशः । नात्र निर्देशस्तन्त्रम् ॥ कथं पुनस्तेनैव नाम निर्देशः क्रियते तच्चातन्त्रं स्यात् । तत्कारी च भवांस्तद्द्वेषी च । नान्तरीयकत्वादत्र द्विवचनेन निर्देशः क्रियते । अवश्यं कयाचिद्विभक्त्या केनचिद्वचनेन निर्देशः कर्तव्यः । तद्यथा । कश्चिदन्नार्थी शालिकलापं सतुषं सपलालमाहरति नान्तरीयकत्वात् । स यावदादेयं तावदादाय तुषपलालान्युत्सृजति । तथा कश्चिन्मांसार्थी मत्स्यान्सशकलान्सकण्टकानाहरति नान्तरीयकत्वात् । स यावदादेयं तावदादाय शकलकण्टकान्युत्सृजति । एवमिहापि नान्तरीयकत्वाद् द्विवचनेन निर्देशः क्रियते । न ह्यत्र निर्देशस्तन्त्रम् ॥ एवमपि

---

ही पूर्वकालची नाहीं. आस् धातूहून कां होत नाहीं असें विचाराल तर त्या धातूहून लट् प्रत्यय झाला आहे.

पण तेथेंच असा प्रश्न उद्भवतो कीं क्त्वा प्रत्ययाच्या विषयामध्यें लट् कसा झाला ?

वासरूपन्यायानें ( ३।१।९४ ) एकदां क्त्वा प्रत्यय होत नाहीं तेव्हां लट् होईल.

(वा. १) 'समानकर्तृकयोः' असें म्हटलें असल्यामुळें दोहोंपेक्षां ज्यास्त क्रिया असतील तेथें क्त्वा प्रत्यय होणार नाहीं. उदा० स्नात्वा भुक्त्वा पीत्वा व्रजति.

पण येथें क्त्वा प्रत्यय होणार नाहीं याचें काय बरें कारण ?

द्विवचनाचा निर्देश केला आहे. 'समानकर्तृकयोः' असें येथें द्विवचन उच्चारिलें आहे. त्यामुळें दोन क्रियांमध्यें पूर्वकाल दाखवावयाचा असेल तरच क्त्वा प्रत्यय होईल. ज्यास्त क्रिया असतील तर होणार नाहीं.

(वा. २) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें कीं 'समानकर्तृकयोः' हा निर्देश मुख्यत्वानें क्रिया दाखविणारा आहे. त्या क्रियांची संख्या दाखविणारा नव्हे. येथें द्विवचनाची विवक्षा सूत्रकार करीत नाहींत.

पण सूत्रकारांनींच द्विवचन उच्चारिलें आहे ना ? मग त्यांच्याच मतीं त्याची अविवक्षा कशी होईल ? असें असेल तर, जें तूं करतोस त्याचाच तूं द्वेष करितोस, असें नाहीं कां होत ?

सूत्रकारांनीं जो येथें द्विवचनाचा निर्देश केला आहे तो नाइलाजास्तव केला आहे. तो कांहीं मुद्दाम केलेला नव्हे. कारण, कोणताही शब्द उच्चारावयाचा म्हणजे त्याला कोणती तरी विभक्ति आणि कोणतें तरी वचन अवश्य लाविलेंच पाहिजे. जसें अन्नाची इच्छा करणारा भाताची रास कोंड्यासकट व भुसासकट नाइलाजास्तव आणतो. मग पुढें त्यांतील जेवढा ग्राह्य भाग आहे तेवढा घेऊन कोंडा व भूस टाकून देतो. तसेंच मांसाची इच्छा करणारा कोणी मनुष्य नाइलाजास्तव सालासकट, कांट्यासकट मासे आणतो. पण पुढें त्यांतील जेवढा भाग ग्राह्य आहे तेवढा घेऊन बाकीचे साल, कांटे वगैरे फेकून देतो. तसें येथेंही सूत्रकारांनीं नाइलाजास्तव द्विवचनानें निर्देश केला आहे. पण तो त्यांनाच विवक्षित नाहीं. तरी पण—

**लोकविज्ञानान्न सिध्यति ॥ ३ ॥**

तद्यथा । लोके ब्राह्मणानां पूर्व आनीयतामित्युक्ते सर्वपूर्व आनीयते । एवमिहापि सर्वपूर्वायाः क्रियायाः प्राप्नोति ॥

**अनन्त्यवचनात्तु सिद्धम् ॥ ४ ॥**

समानकर्तृकयोरनन्त्यस्येति वक्तव्यम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं समानकर्तृकयोरिति बहुष्वप्राप्तिरिति । परिहृतमेतत्सिद्धं तु क्रियाप्रधानत्वादिति । ननु चोक्तमेवमपि लोकविज्ञानान्न सिध्यतीति । नैष दोषः । सर्वेषामत्र प्रजिक्रियां प्रति पौर्वकाल्यम् । स्नात्वा व्रजति भुक्त्वा व्रजति पीत्वा व्रजतीति । एवं च कृत्वा प्रयोगोऽनियतो भवति । स्नात्वा भुक्त्वा पीत्वा व्रजति । पीत्वा स्नात्वा भुक्त्वा व्रजतीति ॥

**व्यादाय स्वपितीत्युपसंख्यानमपूर्वकालत्वात् ॥ ५ ॥**

व्यादाय स्वपितीत्युपसंख्यानं कर्तव्यम् । किं पुनः कारणं न सिध्यति । अपूर्वकालत्वात् । पूर्वं ह्यसौ स्वपिति पश्चाद् व्याददाति ॥

**न वा स्वप्नस्यावरकालत्वात् ॥ ६ ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् ।

---

(वा. ३) लोकांतील व्यवहार पाहिला असतां हें सिद्ध होत नाहीं. असें पहा कीं ह्या ब्राह्मणांमध्यें पहिला आणावा असें म्हटलें असतां त्या सर्व ब्राम्हणांमध्यें जो पहिला असेल तोच एकटा आणिला जातो. तसें येथेंही सर्व क्रियांमध्यें जी पहिली क्रिया तद्वाचक धातूहूनच फक्त क्त्वा प्रत्यय प्राप्त होतो.

(वा. ४) 'समानकर्तृकयोरनन्त्यस्य'[1] असें सूत्र करावें.

अशा रीतीनें सिद्ध होतें. पण सूत्र फिरवावें लागतें.

तर मग मूळचें जसें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मूळचेंच सूत्र ठेविलें तर 'समानकर्तृकयोः' असें म्हटलें असल्यामुळें दोहोंपेक्षां ज्यास्त क्रिया असतील तर तेथें क्त्वा प्रत्यय होणार नाहीं असा दोष दाखविला आहे ना?

समानकर्तृकयोः येथें मुख्यत्वानें क्रियेचा निर्देश केला आहे, तेथें द्विवचनाची विवक्षा नाहीं; असा त्या दोषाचा परिहारही केला आहे.

तरी पण लोकांतील व्यवहार पाहिला असतां हें सिद्ध होत नाहीं असा दोष येतोच.

हा दोष येत नाहीं. कारण, स्नात्वा व्रजति, भुक्त्वा व्रजति, पीत्वा व्रजति, असे प्रयोग येथें होतात. त्यावरून स्नान, भोजन, आणि प्राशन या तीनही क्रिया गमनक्रियेपेक्षां पूर्वकालच्या आहेत असें दिसतें; आणि त्यामुळेंच त्या तीन क्रियांमध्यें क्रम निश्चित नसल्यामुळें प्रयोगही वाटेल तसा होतो. उदा० स्नात्वा भुक्त्वा पीत्वा व्रजति; पीत्वा स्नात्वा भुक्त्वा व्रजति इत्यादि.

(वा. ५) व्यादाय स्वपिति (तोंड पसरून निजतो) या प्रयोगामध्यें क्त्वा प्रत्यय होतो असें म्हणावें.

पण येथें प्रकृत सूत्रानेंच क्त्वा प्रत्यय कां बरें सिद्ध होत नाहीं?

व्यादान म्ह० तोंड पसरणें ही क्रिया पूर्वकालची नाहीं. कारण, ज्याला तशी संवय आहे तो अगोदर निजतो आणि मग त्याचें तोंड पसरलें जातें.

(वा. ६) व्यादाय स्वपिति या प्रयोगाकरितां निराळें वचन करावयास नको.

काय कारण?

---

१. अनेक क्रियांमध्यें जो शेवटची क्रिया नव्हे तद्वाचकच धातूहून क्त्वा प्रत्यय होतो असा अर्थ होईल. त्यामुळें शेवटींची गमन क्रिया सोडून बाकींच्या ज्या स्नान, भोजन, व पान ह्या क्रिया तद्वाचक तिन्ही धातूंहून क्त्वा प्रत्यय होईल.

प्रस्यावरकालत्वात् । अवरकालः प्रः। अवश्यमसौ व्यादाय मुहूर्तमपि ापिति ॥

**आभीक्ष्ण्ये णमुल् च ॥३।४।२२॥**
**न यद्यनाकाङ्क्षे ॥३।४।२३॥ ]**

## विभाषाग्रेप्रथमपूर्वेषु ॥ ३ । ४ । २४ ॥

किमियं प्राप्ते विभाषाहोस्विदप्राप्ते । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते । आभीक्ष्ण्य इति वा नित्ये प्राप्ते ऽन्यत्र वाप्राप्ते । किं चातः । यदि प्राप्त आभीक्ष्ण्ये ऽनिष्टा विभाषा प्राप्नोत्यन्यत्र चेष्टा न सिध्यति । अथाप्राप्ते

**अग्रादिष्वप्राप्तविधेः समासप्रतिषेधः ॥ १ ॥**

अग्रादिष्वप्राप्तविधेः समासप्रतिषेधो

---

कारण असें कीं निजणें ही क्रिया उत्तर- लीं आहेच. जरी झोंप लागल्यानंतर तोंड रलें जातें तरी तोंड पसरल्यानंतर पुढें डा वेळ तरी झोंप असतेच.

(सू. २४) येथें प्राप्तविभाषा आहे किंवा प्राप्तविभाषा आहे ?

पण प्राप्तविभाषा कशी संभवते आणि प्राप्तविभाषा तरी कशी संभवते ?

जर 'आभीक्ष्ण्ये' या पदाची अनुवृत्ति येथें ली तर पूर्व सूत्रानें नित्य प्राप्त असतांना कृत सूत्रानें 'अग्रे' वगैरेंपैकीं उपपद असेल तर थें विकल्प होईल अशी प्राप्तविभाषा होते. तां आभीक्ष्ण्ये याची अनुवृत्ति येथें केली हीं ( आणि आभीक्ष्ण्य अर्थ असतांना या कल्पाचा बाध करून पूर्वविप्रतिषेधानें नित्यच ा व णमुल् हे प्रत्यय होतात असें मानिलें ) तर आभीक्ष्ण्य अर्थ नसतांना क्त्वा व णमुल् प्रत्ययांची मुळींच प्राप्ति नाहीं; तेथें या प्रकृत सूत्रानें विकल्पानें क्त्वा व णमुल् होतील. ( अशा रीतीनें ही अप्राप्तविभाषा होते ).

मग या दोन पक्षांमध्यें फरक काय ?

फरक असा कीं, जर प्राप्तविभाषा घेतली तर आभीक्ष्ण्य अर्थ असतांना हे क्त्वा व णमुल् प्रत्यय विकल्पानें नकोत ते तसे होऊं लागतील. शिवाय, आभीक्ष्ण्य अर्थ नसतांना अग्रे वगैरे शब्द उपपद असतील तर हे क्त्वा व णमुल् प्रत्यय विकल्पानें झाले पाहिजेत ते तसे होणार नाहींत.

आतां याकरितां येथें अप्राप्तविभाषा घेतली तर—

(वा. १) अग्र वगैरे शब्द उपपद असतांना पूर्व सूत्रानें प्राप्त न झालेला णमुल् प्रत्यय या प्रकृत सूत्रानें केला असल्यामुळें उपपद-

---

४. व त्यामुळें सुप्त्वा व्याददाति असा प्रयोगही ोच.

१. (सू. २२) पूर्व सूत्राच्या विषयामध्यें पूर्व- लची क्रिया पुनः पुनः होते अशी विवक्षा असेल तेथें णमुल् प्रत्यय होतो आणि क्त्वा प्रत्ययही ो उदा०—भोजं भोजं व्रजति, भुक्त्वा भुक्त्वा ाति. येथें द्वित्व ( ८।१।४ ) झालें आहे.

१. (सू. २३) यत् शब्द उपपद असतांना पूर्व- लिकक्रियावाचक धातूहून क्त्वा आणि णमुल् हे ा होत नाहींत; परंतु उत्तरकालिक क्रिया दाख- ल्यानंतर त्या वाक्याला आकांक्षा असतां कामां नये. उदा०—यदयं भुङ्क्ते ततो व्रजति. यदयं भुक्त्वा व्रजति. येथें तच्छब्दघटित वाक्याची आकांक्षा शिल्लक राहते म्हणून हा निषेध होत नाहीं.

१. ( सू. २४ ) अग्रे, प्रथम आणि पूर्व हे शब्द उपपद असतांना पूर्वकालिकक्रियावाचक धातूहून णमुल् आणि क्त्वा हे प्रत्यय विकल्पानें होतात. उदा०—अग्रे भोजम्, अग्रे भुक्त्वा.

२. प्राप्तविभाषेमध्यें कार्य होतें तें पूर्वसूत्रानेंच होतें. फक्त तें कार्य जें एकदां होत नाहीं तेवढें उदाहरण या वैकल्पिक सूत्राचें समजलें जातें; आणि अप्राप्तविभाषेमध्यें अगदीं याच्या उलट असतें.

वक्तव्यः ॥ स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः। उक्तमेतदमैवाव्ययेन[२.२.२०] इत्यत्रैवकारकरणस्य प्रयोजनममैवाव्ययेन यत्तुल्यविधानमुपपदं तत्र समासो यथा स्यादमा चान्येन च यत्तुल्यविधानमुपपदं तत्र मा भूदिति ॥

[कर्मण्याक्रोशे कृञः खमुञ् ॥३।४।२५]

**स्वादुमि णमुल् ॥ ३ ।४ ।२६॥**

किमर्थं स्वादुमि मकारान्तत्वं निपात्यते न खमुञ्प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते ।

**स्वादुमि मान्तनिपातनमीकाराभावार्थम् ॥ १ ॥**

स्वादुमि मान्तनिपातनं क्रियत ईकाराभावार्थम् । ईकारो मा भूदिति । स्वाद्वीं कृत्वा यवागूं भुङ्क्ते स्वादुंकारं यवागूं भुङ्क्ते ॥

**च्व्यन्तस्य च मकारान्तार्थम् ॥ २ ॥**

च्व्यन्तस्य च मकारान्तत्वं निपात्यते । अस्वादु स्वादु कृत्वा भुङ्क्ते स्वादुंकारं भुङ्क्ते ॥

**आ च तुमुनः समानाधिकरणे ॥ ३ ॥**

आ च तुमुनः प्रत्ययाः समानाधिकरणे वक्तव्याः । केन । अनुप्रयोगेण ।

---

समास (२।२।१९) प्राप्त होतो त्याचा प्रतिषेध सांगावा लागेल.

तर मग आतां तसा समासाचा निषेध सांगावा.

सांगावयास नको. कारण हें मागें सांगितलेंच आहे. अमैवाव्ययेन (२।२।२०) या सूत्रांतील एव शब्दाचा उपयोग असा सांगितला आहे कीं अव्यय संज्ञेला कारणीभूत जो अम् प्रत्यय तो एकच प्रत्यय ज्या ठिकाणीं सांगितला असेल त्या ठिकाणींच त्याच्या बरोबर उपपदाचा समास होतो व ज्या ठिकाणीं अम् प्रत्ययाच्या जोडीला दुसरा प्रत्यय सांगितला असेल तेथील उपपदाचा त्या अम्प्रत्ययान्ताबरोबर उपपद समास न झाला पाहिजे.

( सू. २६ ) येथें स्वादुम् असें जें मकारान्त निपातन केलें आहे तें कशाकरितां ? तें करूं नये. खमुञ् प्रत्यय पूर्वसूत्रानें सांगितला आहे त्याची येथें अनुवृत्ति आणली म्हणजे काम[2] भागेल.

( वा. १ ) येथें स्वादुम् असें जें मकारान्त निपातन केलें आहे तें ईकार म्ह. ङीप् प्रत्यय ( ४।१।४४ ) होऊं नये याकरितां केलें आहे. उदा० स्वाद्वीं कृत्वा यवागूं भुङ्क्ते, स्वादुंकारं यवागूं भुङ्क्ते.

(वा. २) ज्या ठिकाणीं उपपदाच्या पुढें च्वि प्रत्यय केला असेल तेथें पुढें मकार आला[3] पाहिजे. उदा० अस्वादु स्वादु कृत्वा भुङ्क्ते, स्वादुंकारं भुङ्क्ते.

( वा. ३ ) तुमुन् ( ३।४।६५ ) प्रत्ययापर्यंत हे जे प्रत्यय सांगितले आहेत ते समानाधिकरणार्थी होतात असें म्हणावें.

हा त्या प्रत्ययांचा अर्थ कोणाशीं समानाधिकरण पहावयाचा ?

पुढें अनुप्रयोग केलेल्या धातूच्या पुढील

---

१. (सू.२५) कर्मवाचक शब्द उपपद असतांना आणि आक्रोश गम्यमान असतांना कृञ् धातूहून खमुञ् प्रत्यय होतो. उदा० चोरंकारमाक्रोशति. तूं चोर आहेस अशी त्याची निंदा करतो, असा अर्थ आहे.

१. (सू.२६) ज्या अनेक क्रियांचा कर्ता एक आहे त्या क्रियांपैकीं पूर्वकालिक जी क्रिया तद्वाचक कृ धातूहून स्वादु या अर्थाचा शब्द उपपद असतांना णमुल् प्रत्यय होतो, आणि त्या उपपदाच्या शेवटीं मकार येतो. उदा० स्वादुंकारं भुङ्क्ते; संपन्नकारं भुङ्क्ते.

२. खमुञ् प्रत्यय येथें सांगितला म्हणजे उपपदाला मुम् आगम ( ६।३।६७ ) होईल.

३. कारण तेथें अनव्ययस्य असा निषेध असल्यामुळें मुम् आगम होणार नाहीं.

किं प्रयोजनम् । स्वादुंकारं यवागूर्भुज्यते देवदत्तेनेति देवदत्ते तृतीया यथा स्यात् । किं च कारणं न स्यात् । णमुलाभिहितः कर्तेति । ननु च भुजिप्रत्ययेनानभिहितः कर्तेति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति तृतीया । यदि सत्यभिधाने चानभिधाने च कुतश्चिदनभिधानमिति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति तृतीया यवाग्वां द्वितीया प्राप्नोति । किं कारणम् । णमुलानभिहितं कर्मेति ॥

यदि पुनरयं कर्मणि विज्ञायेत । नैवं शक्यम् । इह हि स्वादुंकारं यवागूं भुङ्क्ते देवदत्त इति यवाग्वां द्वितीया न स्यात् । किं कारणं न स्यात् । णमुलाभिहितं कर्मेति । ननु च भुजिप्रत्ययेनानभिहितं कर्मेति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति द्वितीया । यदि सत्यभिधाने चानभिधाने च कुतश्चिदनभिधानमिति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति द्वितीया देवदत्ते तृतीया प्राप्नोति ।

---

प्रत्ययार्थी.

याचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं—स्वादुंकारं यवागूर्भुज्यते देवदत्तेन या वाक्यामध्यें देवदत्त शब्दाहून तृतीया झाली पाहिजे.

पण तेथें तृतीया कां बरें होणार नाहीं ?

णमुल् प्रत्यय जर कर्ता या अर्थी केला तर त्या प्रत्ययानें कर्ता अर्थ उक्त होतो म्हणून.

पण भुज्यते हा त प्रत्यय कर्मणि केला असल्यामुळें त्यानें देवदत्त हा कर्ता उक्त होत नाहीं. तेव्हां तें मनांत धरून कर्ता अनुक्त समजून तृतीया होईल.

जर कर्ता, कर्म यांसारखा अर्थ एकाच वाक्यांत एका प्रत्ययानें उक्त होतो आणि दुसऱ्या प्रत्ययानें तो अनुक्त होतो अशा स्थितींत 'कोणीं तरी तो अर्थ अनुक्त आहे' या सबबीवर अनुक्त कर्त्याहून सांगितलेली तृतीया होईल तर त्याच वाक्यामध्यें यवागू शब्दाहून द्वितीया होऊं लागेल.

काय कारण ?

कारण असें कीं यवागु हें कर्म भुज्यते यांतील त प्रत्ययानें उक्त असलें तरी णमुल् प्रत्ययानें तें अनुक्त होत आहेच.

आतां हा णमुल् प्रत्यय जर कर्म या अर्थी करावा तर तसेंही करणें शक्य नाहीं. कारण कर्मणि णमुल् केला तर 'स्वादुंकारं यवागूं भुङ्क्ते देवदत्तः' या कर्तरि प्रयोगामध्यें यवागू शब्दाहून द्वितीया होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं णमुल् प्रत्ययानें कर्म उक्त होत आहे.

पण भुङ्क्ते या भुज् धातूच्या पुढील प्रत्ययानें कर्म अनुक्त आहे. तेव्हां तें मनांत धरून कर्म अनुक्त समजून यवागूम् ही द्वितीया होईल.

जर कर्ता, कर्म यांसारखा अर्थ एकाच वाक्यांत एका प्रत्ययानें उक्त होतो आणि दुसऱ्या प्रत्ययानें तो अनुक्त होतो, अशा स्थितींत 'कोणीं तरी तो अर्थ अनुक्त आहे' या सबबीवर अनुक्त कर्माहून सांगितलेली द्वितीया होईल तर त्याच वाक्यामध्यें देवदत्तः येथें तृतीया होऊं लागेल.

४. तो प्रत्यय कर्ता कर्म वगैरे ज्या अर्थी केला असेल त्याच अर्थी हे णमुल् वगैरे प्रत्यय होतात. दोन्ही प्रत्यय एकाच अर्थी असल्यामुळें ते समानाधिकरण होतात. वाच्य या संबंधानें दोन शब्दांचे अर्थ हें एकच अधिकरण आहे.

५. कर्त्याहून तृतीया (२।३।१८), कर्माहून द्वितीया (२।३।२) अशा ज्या विभक्ती सांगितल्या आहेत त्या तो कर्ता कर्म वगैरे अर्थ कोणीं प्रत्ययानें उक्त होत नसेल तर—(२।३।१) च होतात.

किं कारणम् । णमुलानभिहितः कर्तेति ॥

अथानेन क्त्वायामर्थः । पक्त्वौदनो भुज्यते देवदत्तेनेति । बाढमर्थः । देवदत्ते तृतीया यथा स्यात् । किं च कारणं न स्यात् । क्त्वयाभिहितः कर्तेति । ननु च भुजिप्रत्ययेनानाभिहितः कर्तेति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति तृतीया । यदि सत्यभिधाने चानभिधाने च कुताश्चिदनाभिधानमिति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति तृतीयौदने द्वितीया प्राप्नोति । किं कारणम् । क्त्वयानाभिहितं कर्मेति ॥ यदि पुनरयं कर्मणि विज्ञायेत । नैवं शक्यम् । इह हि पक्त्वौदनं भुङ्क्ते देवदत्त इत्योदने द्वितीया न स्यात् । किं च कारणं न स्यात् । क्त्वयाभिहितं कर्मेति । ननु च भुजिप्रत्ययेनानाभिहितं कर्मेति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति द्वितीया । यदि सत्यभिधाने चानभिधाने च कुताश्चिदनाभिधानमिति कृत्वानाभिहिताश्रयो विधिर्भविष्यति द्वितीया देवदत्ते तृतीया प्राप्नोति । किं कारणम् । क्त्वयानाभिहितः कर्तेति ॥

---

काय कारण ?

कारण असें की देवदत्त हा कर्ता भुङ्क्ते यांतील त प्रत्ययानें उक्त असला तरी णमुल् प्रत्ययानें तो अनुक्त होत आहेच.

आतां 'आ च तुमुनः समानाधिकरणे' या वचनाचा 'पक्त्वौदनो भुज्यते देवदत्तेन' या क्त्वा प्रत्ययाच्या प्रयोगामध्यें कांहीं उपयोग आहे काय ?

होय. खात्रीनें उपयोग आहे. तो असा कीं त्या वाक्यामध्यें देवदत्तेन ही तृतीया झाली पाहिजे.

पण येथें तृतीया का बरें होणार नाहीं ?

क्त्वा प्रत्यय जर कर्ता या अर्थी केला तर त्या प्रत्ययानें कर्ता हा अर्थ उक्त होतो म्हणून.

पण भुज्यते हा त प्रत्यय कर्मणि केला आहे; त्यानें देवदत्त हा कर्ता उक्त होत नाहीं हें मनांत धरून कर्ता अनुक्त समजून तृतीया होईल.

जर कर्ता, कर्म, यांसारखा अर्थ एकाच वाक्यांत एका प्रत्ययानें उक्त होतो आणि दुसऱ्या प्रत्ययानें तो अनुक्त होतो अशा स्थितींत 'कोणीं तरी तो अर्थ अनुक्त आहे' या समजीवर अनुक्त कर्त्याहून सांगितलेली तृतीया होईल तर त्याच वाक्यामध्यें ओदन शब्दाहून द्वितीया होऊं लागेल.

काय कारण ?

कारण असें कीं ओदन हें कर्म भुज्यते यांतील त प्रत्ययानें उक्त असलें तरी क्त्वा प्रत्ययानें तें अनुक्त होत आहेच.

आतां हा क्त्वा प्रत्यय कर्म या अर्थी करावा तर तसेंही करणें शक्य नाहीं; कारण, कर्मणि क्त्वा प्रत्यय समजला तर पक्त्वा ओदनं भुङ्क्ते देवदत्तः या कर्तरि प्रयोगामध्यें ओदन शब्दाहून द्वितीया होणार नाहीं.

न होण्याचें कारण काय ?

कारण असें कीं क्त्वा प्रत्ययानें कर्म उक्त होत आहे.

पण भुङ्क्ते या भुज् धातूच्या पुढील त प्रत्ययानें कर्म अनुक्त आहे; तेव्हां तें मनांत धरून कर्म अनुक्त समजून ओदनम् ही द्वितीया होईल.

जर कर्ता, कर्म यांसारखा अर्थ एकाच वाक्यांत एका प्रत्ययानें उक्त होतो आणि दुसऱ्या प्रत्ययानें तो अनुक्त होतो अशा स्थितींत 'कोणीं तरी तो अर्थ अनुक्त आहे' या समजीवर अनुक्त कर्माहून सांगितलेली द्वितीया होईल, तर त्याच वाक्यामध्यें देवदत्तः येथें तृतीया होऊं लागेल.

काय कारण ?

कारण असें कीं देवदत्तः हा कर्ता भुङ्क्ते यांतील त प्रत्ययानें उक्त असला तरी क्त्वा प्रत्ययानें तो अनुक्त होत आहेच.

अथानेन तुमुन्यर्थः । भोक्तुमोदनः पच्यते देवदत्तेनेति । बाढमर्थः । देवदत्ते तृतीया यथा स्यात् । किं च कारणं न स्यात् । तुमुनाभिहितः कर्तेति । ननु च पचिप्रत्ययेनानभिहितः कर्तेति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति तृतीया । यदि सत्यभिधाने चानभिधाने च कुतश्चिदनभिधानमिति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति तृतीयौदने द्वितीया प्राप्नोति । किं कारणम् । तुमुनानभिहितं कर्मेति ॥

यदि पुनरयं कर्मणि विज्ञायेत । नैवं शक्यम् । इह हि भोक्तुमोदनं पचति देवदत्त इत्योदने द्वितीया न स्यात् । किं च कारणं न स्यात् । तुमुनाभिहितं कर्मेति । ननु च पचिप्रत्ययेनानभिहितं कर्मेति कृत्वा नभिहिताश्रयो विधिर्भविष्यति द्वितीया । यदि सत्यभिधाने चानभिधाने च कुतश्चिदनभिधानमिति कृत्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति द्वितीया देवदत्ते तृतीया प्राप्नोति । किं कारणम् । तुमुनानभिहितः कर्तेति ॥

अथानेनेहार्थः । पक्त्वौदनं ग्रामो गम्यते देवदत्तेनेति । बाढमर्थः । देव-

---

आतां 'आ च तुमुनः समानाधिकरणे' या वचनाचा 'भोक्तुमोदनः पच्यते देवदत्तेन' या तुमुन् प्रत्ययाच्या प्रयोगामध्यें कांहीं उपयोग आहे काय ?

होय. खात्रीनें उपयोग आहे. तो असा कीं त्या वाक्यामध्यें देवदत्तेन ही तृतीया झाली पाहिजे.

पण तेथें तृतीया कां बरें होणार नाहीं ?

तुमुन् प्रत्यय जर कर्ता या अर्थी केला तर त्या प्रत्ययानें कर्ता हा अर्थ उक्त होतो म्हणून.

पण पच्यते हा त प्रत्यय कर्मणि केला आहे म्हणून त्यानें देवदत्त हा कर्ता उक्त होत नाहीं, हें मनांत धरून कर्ता अनुक्त समजून तृतीया होईल.

जर कर्ता, कर्म, यांसारखा अर्थ एकाच वाक्यांत एका प्रत्ययानें उक्त होतो आणि दुसऱ्या प्रत्ययानें तो अनुक्त होतो अशा स्थितींत 'कोणीं तरी तो अर्थ अनुक्त आहे' या सबबीवर अनुक्त कर्त्याहून सांगितलेली तृतीया होईल तर त्याच वाक्यामध्यें ओदनः येथें द्वितीया होऊं लागेल.

काय कारण ?

कारण असें कीं ओदन हें कर्म पच्यते यांतील त प्रत्ययानें उक्त असलें तरी तुमुन् प्रत्ययानें तें अनुक्त होत आहेच.

आतां हा तुमुन् प्रत्यय कर्म या अर्थी समजावा तर तसेंही शक्य नाहीं. कारण, कर्मणि तुमुन् प्रत्यय समजला तर 'भोक्तुमोदनं पचति देवदत्तः' या कर्तरि प्रयोगामध्यें ओदन शब्दाहून द्वितीया होणार नाहीं.

न होण्याचें कारण काय ?

कारण असें कीं तुमुन् प्रत्ययानें कर्म उक्त होत आहे.

पण पचति या पच् धातूच्या पुढील ति प्रत्ययानें कर्म अनुक्त आहे; तेव्हां तें मनांत धरून कर्म अनुक्त समजून ओदनम् ही द्वितीया होईल.

जर कर्ता, कर्म, यांसारखा अर्थ एकाच वाक्यांत एका प्रत्ययानें उक्त होतो आणि दुसऱ्या प्रत्ययानें तो अनुक्त होतो अशा स्थितींत 'कोणीं तरी तो अर्थ अनुक्त आहे' या सबबीवर अनुक्त कर्माहून सांगितलेली द्वितीया होईल तर त्याच वाक्यामध्यें देवदत्तः येथे तृतीया होऊं लागेल.

काय कारण ?

कारण असें कीं देवदत्तः हा कर्ता पचति यांतील तिप् प्रत्ययानें उक्त असला तरी तुमुन् प्रत्ययानें तो अनुक्त होत आहेच.

आतां 'आ च तुमुनः समानाधिकरणे' या वचनाचा 'पक्त्वौदनं ग्रामो गम्यते देवदत्तेन' या वाक्यामध्यें कांहीं उपयोग आहे काय ?

होय. खात्रीनें उपयोग आहे. तो असा कीं त्या वाक्यामध्यें देवदत्तेन ही तृतीया

दृत्से तृतीया यथा स्यात् । किं च कारणं न स्यात् । क्त्वयाभिहितः कर्तेति । ननु च गमिप्रत्ययेनानभिहितः कर्तेति क्त्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति तृतीया । यदि सत्यभिधाने चानभिधाने च कुतश्चिदनभिधानमिति क्त्वानभिहिताश्रयो विधिर्भविष्यति तृतीया यदुक्तमोदने द्वितीया प्राप्नोतीति स इह दोषो न जायते ॥

तत्तर्हि वक्तव्यमा च तुमुनः समानाधिकरण इति । न वक्तव्यम् । अव्ययकृतो भावे भवन्तीति भावे भविष्यन्ति । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । तुमर्थ इति वर्तते । तुमर्थश्च कः । भावः ॥

[ अन्यथैवंकथमित्थंसु सिद्धाप्रयोगश्चेत् ॥३।४।२७॥

यथातथयोरसूयाप्रतिवचने ॥ ३ । ४ । २८ ॥

कर्मणि दृशिविदोः साकल्ये ॥ ३ । ४ । २९ ॥

झाली पाहिजे.

पण तेथें तृतीया कां बरें होणार नाहीं ?

क्त्वा प्रत्यय जर कर्ता या अर्थी केला तर त्या प्रत्ययानें कर्ता हा अर्थ उक्त होतो म्हणून.

पण गम्यते हा प्रत्यय कर्मणि केला आहे. तेव्हां त्यानें देवदत्त हा कर्ता उक्त होत नाहीं हें मनांत धरून कर्ता अनुक्त समजून तृतीया होईल.

जर कर्ता, कर्म, यांसारखा अर्थ एकाच वाक्यांत एका प्रत्ययानें उक्त होतो आणि दुसऱ्या प्रत्ययानें तो अनुक्त होतो अशा स्थितींत 'कोणीं तरी तो अर्थ अनुक्त आहे' या सबबीवर अनुक्त कर्त्याहून सांगितलेली तृतीया होईल तर येथें मात्र 'ओदन शब्दाहून द्वितीया होऊं लागेल' हा दोष येत नाहीं.

तर मग एकंदरींत 'आ च तुमुनः समानाधिकरणे' हें वचन केलें पाहिजे.

तें वचन करावयास नको. कारण, 'अव्ययसंज्ञेला कारणीभूत जे कृत् प्रत्यय ते भाव या अर्थी होतात' म्हणून हे प्रत्यय भाव या अर्थी होतील.

पण काय, असें तरी वचन केलेंच पाहिजे ना?

तसें वचन करावयास नको.

पण वचन केलें नाहीं तर हे प्रत्यय भाव या अर्थी होतात हें कसें समजलें जाईल ?

तुमर्थे (३।४।९) अशी अनुवृत्ति केली म्हणजे काम भागेल.

तुमुन् प्रत्ययाचा अर्थ कोणता.

भाव हा तुमुन् प्रत्ययाचा अर्थ होय.

---

१. (सू. २७) अन्यथा, एवम्, कथम् आणि इत्थम् हे शब्द उपपद असतांना कृ धातूहून णमुल् प्रत्यय होतो. परंतु तेथें कृ धातूचा मुळीं प्रयोगच जरी केला नाहीं तरी हरकत नाहीं अशी स्थिति असली पाहिजे. म्हणजे कृ धातूचा प्रयोग करण्यांत आणि न करण्यांत अर्थांत बदल होतां कामा नये. उदा० अन्यथाकारं भुङ्क्ते. अन्यथा भुङ्क्ते याचा जो अर्थ आहे तोच अन्याथाकारं भुङ्क्ते याचा अर्थ आहे.

१. (सू. २८) असूयेनें प्रत्युत्तर दिलें असतां त्या उत्तरवाक्यामध्यें यथा आणि तथा हे शब्द उपपद असतांना कृ धातूहून णमुल् प्रत्यय होतो; परंतु तेथें कृ धातूचा प्रयोग मुळींच केला नाहीं तर जो अर्थ प्रतीत होतो तोच अर्थ कृ धातूचा प्रयोग केला तरी असला पाहिजे. उदा० यथाकारमहं भोक्ष्ये तथाकारं भोक्ष्ये किं तवानेन ( मी जसें जेवीन तसें जेवीन; तुला काय करावयाचें आहे ?)

१. (सू. २९) कर्म उपपद असतांना दृश् आणि विद् या धातूंहून णमुल् प्रत्यय होतो साकल्य अर्थ गम्यमान असतांना. उदा० कन्यादर्शं वरयति (जी जी कन्या पाहतो तिला वरतो ). ब्राह्मणवेदं भोजयति. ( ब्राह्मण असा समजला कीं त्याला भोजन देतो.)

[यावति विन्दजीवोः ॥ ३।४।३० ॥
चर्मोदरयोः पूरेः ॥ ३ । ४ । ३१ ॥]
वर्षप्रमाणे ऊलोपश्चास्यान्यतरस्याम् ॥ ३ । ४ । ३२ ॥

ऊलोपश्चास्यान्यतरस्यांग्रहणं शक्यमकर्तुम् । कथं गोष्पदप्रं वृष्टो देव इति । प्रातिः पूरणकर्मा तस्मादेष कः । यदि को विभक्तीनां श्रवणं प्राप्नोति । श्रूयन्त एवात्र विभक्तयः । तद्यथा । एकेन गोष्पदप्रेण ॥

[चेले क्नोपेः ॥ ३ । ४ । ३३ ॥
निमूलसमूलयोः कषः ॥ ३ । ४ । ३४ ॥
शुष्कचूर्णरूक्षेषु पिषः ॥ ३ । ४ । ३५ ॥
समूलाकृतजीवेषु हन्कृञ्ग्रहः ॥ ३ । ४ । ३६ ॥]
करणे हनः ॥ ३।४।३७ ॥

हनः करणेऽनर्थकं वचनं हिंसार्थेभ्यो णमुल्विधानात् ॥ १ ॥

हनः करणेऽनर्थकं वचनम् । किं

---

(सूत्र ३२) 'ऊलोपश्चास्यान्यतरस्याम्' असें जें येथें म्हटलें आहे तें म्हटलें नाहीं तरी चालेल.

मग 'गोष्पदप्रं वृष्टो देवः' हा प्रयोग कसा बरें साधेल ?

पूरण करणें या अर्थाचा प्रा धातु आहे; त्याहून क प्रत्यय (३।२।३) या प्रयोगामध्यें केलेला आहे.

पण जर 'गोष्पदप्रं' येथ क प्रत्यय केला तर त्याच्या पुढें विभक्तीचें श्रवण होऊं लागेल.

गोष्पदप्र शब्दापुढें विभक्तीचें श्रवण होतेच आहे; जसें—एकेन गोष्पदप्रेण.

(सू. ३७, वा. १) हन् धातूहून जो येथें करण उपपद असतांना णमुल् प्रत्यय सांगितला आहे तो व्यर्थ आहे.

काय कारण ?

---

१. (सू. ३०) लाभ या अर्थाचा विद् धातु आणि जीव् धातु यांहून णमुल् प्रत्यय होतो यावत् शब्द उपपद असतांना. उदा० यावद्वेदं भुङ्क्ते (जेवढें मिळेल तेवढें खातो.) यावज्जीवमधीते.

१. (सू. ३१) चर्मन् आणि उदर हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना पूर् धातुहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० चर्मपूरं स्तृणाति. (चर्माला पुरेल इतकें आच्छादन करतो.) उदरपूरं भुङ्क्ते.

१. (सू. ३२) कर्मवाचक शब्द उपपद असतांना पूर् धातूहून णमुल् प्रत्यय होतो आणि त्या पूर् धातूंतील ऊकाराचा लोप मात्र विकल्पानें होतो; परंतु त्या शब्दापासून वृष्टीचें प्रमाण गम्यमान होत असलें पाहिजे. उदा० गोष्पदप्रं वृष्टो देवः; गोष्पदपूरं वृष्टो देवः-

२. वर्षप्रमाणे पवढया सूत्रानें गोष्पदपूरम् हें उदाहरण साधेल.

३. णमुल् प्रत्यय केला म्हणजे अव्यय संज्ञा (१।१।३९) होते. आणि प्रा धातूहून क प्रत्यय करून तें क्रियाविशेषण केलें म्हणजे गोष्पदप्रम् हा प्रयोग साधले; परंतु त्या गोष्पदप्र शब्दाहून इतर विभक्तीही होऊं लागतील, व क-प्रत्ययान्ताला अव्यय संज्ञा नसल्यामुळें त्या विभक्ती राहतील.

१. (सू. ३३) वस्त्रवाचक शब्द कर्म उपपद असतांना क्नोपि म्ह. णि प्रत्ययान्त क्नूय धातूहून णमुल् प्रत्यय होतो. परंतु त्या शब्दापासून वृष्टीचें प्रमाण गम्यमान होत असलें पाहिजे. उदा० चेलक्नोपं वृष्टो देवः; वस्त्रक्नोपं वृष्टो देवः-

१. (सू. ३४) निमूल व समूल हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना कष् धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० निमूलकाषं कषति, समूलकाषं कषति. येथपासून 'उपमाने०' (३।४।४५) या सूत्रापर्यंत धातूहून णमुल् प्रत्यय केल्यानंतर त्याच्या पुढें त्याच धातूचा अनुप्रयोग (३।४।४६) होतो.

१. (सू. ३५) शुष्क चूर्ण आणि रूक्ष हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना पिष् धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उदा०—शुष्कपेषं पिनष्टि.

१ (सू ३६) समूल अकृत आणि जीव हे कर्मवाचक शब्द उपपद असतांना क्रमानें हन् कृञ् आणि ग्रह् या धातूंहून णमुल् प्रत्यय होतो. उ० समूलघातं हन्ति.

१ (सू. ३७) करणवाचक शब्द उपपद असतांना हन् धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० पाणिघातं वेदिं हन्ति. यथें हन् धातु गमन या अर्थानेंहि चालतो. हात टेकीत टेकीत वेदीपर्यंत जातो असा येथें अर्थ आहे.

कारणम् । हिंसार्थेभ्यो णमुल्विधानात् । हिंसार्थेभ्यो णमुल् विधीयते तेनैव सिद्धम् ॥

## अर्थवत्त्वहिंसार्थस्य विधानात् ॥ २ ॥

अर्थवत्तु हन्तेर्णमुल्वचनम् ॥ कोर्थः । अहिंसार्थस्य विधानात् । अहिंसार्थाण्णमुल् यथा स्यात् । अस्ति पुनरयं कचिद्धन्तिरहिंसार्थो यदर्थो विधिः स्यात् । अस्तीत्याह । पाण्युपघातं वेदिं हन्ति ॥

## नित्यसमासार्थं च ॥ ३ ॥

नित्यसमासार्थं च हिंसार्थादपि हन्तेरनेन विधिरेषितव्यः । कथं पुनरिच्छतापि हिंसार्थाद्धन्तेरनेन विधिर्लभ्यः । अनेनास्तु तेन वेति तेन स्याद्विप्रतिषेधेन ॥ हन्तेः पूर्वविप्रतिषेधो वार्तिकेनैव ज्ञापितः ॥

यदयं नित्यसमासार्थं चेत्याह तज्ज्ञापयत्याचार्यो हिंसार्थादपि हन्तेरनेन विधिर्भवतीति ॥

[स्नेहने पिषः ॥ ३ । ४ । ३८ ॥
हस्ते वर्तिग्रहोः ॥ ३ । ४ । ३९ ॥
स्वे पुषः ॥ ३ । ४ । ४० ॥]
अधिकरणे बन्धः ॥ ३ । ४ । ४१ ॥

---

कारण असें की हिंसार्थक धातूंहून णमुल् प्रत्यय सांगितला (३।४।४८) आहे, त्यानेंच येथें णमुल् प्रत्यय सिद्ध होत आहे.

(वा.२) प्रकृत सूत्रानें जो हा हन् धातूहून णमुल् प्रत्यय सांगितला आहे त्याचा उपयोग आहे.

तो उपयोग कोणता बरें ?

हिंसा या अर्थापेक्षां इतर अर्थ असेल तेव्हां हन् धातूहून णमुल् प्रत्यय झाला पाहिजे.

पण हन् धातूला हिंसा या अर्थापेक्षां निराळा अर्थ आहे काय, कीं ज्याकरितां येथें णमुल् प्रत्यय सांगितला आहे असें म्हणतां येईल ?

इतर अर्थ आहे असें म्हणतो; उदा० पाण्युपघातं वेदिं हन्ति.

(वा. ३) हिंसार्थक हन् धातु असेल तेथेंही नित्यसमास होण्याकरितां हन् धातूहून प्रकृत सूत्रानें णमुल् प्रत्यय करणें इष्ट आहे.

पण हिंसार्थक हन् धातूहून प्रकृत सूत्रानें णमुल प्रत्यय इष्ट असला तरी तो व्हावा कसा ? कारण प्रकृत सूत्रानें णमुल् करावा किंवा 'हिंसार्थानाम्' (३।४।४८) या सूत्रानें करावा असा विप्रतिषेध उपस्थित झाला असतां परत्वास्तव त्यानेंच होईल.

तशा ठिकाणीं पूर्वविप्रतिषेधानें प्रकृत सूत्रानेंच णमुल् प्रत्यय होतो, असें वार्तिककारांनीं सुचविलें आहे. 'नित्यसमास होण्याकरितां हें सूत्र पाहिजे' असें येथें ज्या अर्थी वार्तिककार सांगत आहेत त्या अर्थी त्यावरून असें सूचित होतें की हिंसार्थक हन् धातूहूनही प्रकृत सूत्रानेंच णमुल् प्रत्यय होतो.

---

२. हिंसार्थानाम्- (३।४।४८) या सूत्रानें णमुल् प्रत्यय केला की तेथें उपपदसमास विकल्पानें (२।२।२१) होतो.

१.(सू.३८) ओलावा उत्पन्न करणारा जो साधनीभूत पदार्थ तद्वाचक शब्द उपपद असतांना पिष् धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० उदपेषं पिनष्टि (पाणी घालून वाटतो.) तैलपेषं पिनष्टि (तेल घालून कुटतो.)

१.(सू.३९) हस्त या अर्थाचा करणवाचक शब्द उपपद असतांना वर्ति म्ह. णि-प्रत्ययान्त वृत् धातु, आणि ग्रह् धातु यांहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० हस्तवर्तं वर्तयति, करवर्तं वर्तयति. (हातानें फिरवितो.) हस्तग्राहं गृह्णाति, करग्राहं गृह्णाति. (हातानें घेतो.)

१.(सू. ४०) आत्मीय, ज्ञाति अथवा धन या अर्थाचा करणवाचक शब्द उपपद असतांना पुष् धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० स्वपोषं पुष्णाति, गोपोषं पुष्णाति, पितृपोषं पुष्णाति, धनपोषं पुष्णाति.

१. (सू. ४१) अधिकरण—वाचक शब्द उपपद असतांना बन्ध् धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० चक्रबन्धं बध्नाति. (चाकावर बांधतो.)

इह कस्मान्न भवति । ग्रामे बद्ध इति । एवं वक्ष्यामि । अधिकरणे बन्धः संज्ञायाम् (४१-४२)। ततः कर्त्रोर्जीवपुरुषयोर्नशिवहोः (४३) इति । कथमट्टालिकाबन्धं बद्धः चण्डालिकाबन्धं बद्धः ॥ उपमाने कर्मणि च (४५) इत्येवं भविष्यति ॥

[संज्ञायाम् ॥ ३ । ४ । ४२ ॥
कर्त्रोर्जीवपुरुषयोर्नशिवहोः॥३।४।४३
ऊर्ध्वे शुषिपूरोः ॥ ३ । ४ । ४४॥
उपमाने कर्मणि च ॥ ३।४।४५ ॥
कषादिषु यथाविध्यनुप्रयोगः ॥३।४।४६॥
उपदंशस्तृतीयायाम् ॥३।४।४७॥
हिंसार्थानां च समानकर्मकाणाम् ॥ ३ ४।४८।
सप्तम्यां चोपपीडरुधकर्षः ॥३।४।४९॥

(सू. ४१) 'ग्रामे बद्धः' येथें प्रकृत सूत्रानें णमुल् प्रत्यय कां होत नाहीं ?

हें सूत्र आणि पुढील सूत्र अशीं दोन सूत्रें मिळून एकच सूत्र 'अधिकरणे बन्धः संज्ञायाम्' असें करतां येईल, व त्याच्या पुढें 'कर्त्रोर्जीवपुरुषयोर्नशिवहोः' हें सूत्र येईल.

'संज्ञायाम्' हें पुढील सूत्र निराळें केलें नाहीं तर 'अट्टालिकाबन्धं बद्धः', 'चण्डालिकाबन्धं बद्धः', हीं त्याचीं उदाहरणें कशीं साधतील ?

'उपमाने कर्मणि च' (३।४।४५) या सूत्रानेंच तेथें णमुल् प्रत्यय होईल.

---

२. गांवामध्यें धरला असा अर्थ आहे. येथें णमुल् प्रत्यय झाला तर 'ग्रामबन्धं बद्धः' असा प्रयोग होईल.

३. ग्रामे बद्धः येथें संज्ञा नसल्यामुळें णमुल् प्रत्यय होणार नाहीं.

१. (सू. ४२) संज्ञा असतांना बन्ध् धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० क्रौञ्चबन्धं बध्नाति. एक प्रकारच्या बंधाची ही संज्ञा आहे.

१. (सू. ४३) जीव आणि पुरुष हे कर्तृवाचक शब्द उपपद असतांना क्रमानें नश् आणि वह् या धातूंहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० जीवनाशं नश्यति. (जीव नष्ट होतो.) पुरुषवाहं वहति (पुरुष ओझें वाहतो.)

१. (सू. ४४) कर्तृवाचक ऊर्ध्व शब्द उपपद असतांना शुष् आणि पूर् या धातूंहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० ऊर्ध्वशोषं शुष्यति, ऊर्ध्वपूरं पूर्यते (एखादें झाड उभें असतांनाच सुकतें, घागरीचें तोंड वर असतांनाच ती पाकस वगैरेंनीं भरते.)

१. (सू. ४५) उपमान-भूत जे कर्म किंवा कर्ता तद्वाचक शब्द उपपद असतांना धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० घृतनिधायं जलं निदधाति (तुपाप्रमाणें पाणी ठेवतो;) अजकनाशं नष्टः (बोकडाप्रमाणे नष्ट झाला.)

१. (सू. ४६) कष् वगैरे धातूंहून आतांपर्यंत जो णमुल प्रत्यय सांगितला (३।४।३४-४५) आहे तेथे ज्या धातूहून णमुल प्रत्यय केला असेल त्याच धातूचा पुढें अनुप्रयोग होतो.

१. (सू. ४७) तृतीयान्त उपपद असतांना उप उपसर्गपूर्वक दंश् धातूहून णमुल् प्रत्यय होतो. उ०-मूलकोपदंशं भुङ्क्ते; मूलकेनोपदंशं भुङ्क्ते; या सूत्रापासून पुढें णमुल् प्रत्यय केला असतां तेथें उपपदसमास विकल्पानें होतो (२ । २ । २१ ).

१. (सू. ४८) तृतीयान्त उपपद असतांना हिंसार्थक धातूहून णमुल् प्रत्यय होतो; परंतु अनुप्रयोग केलेल्या धातूचें आणि हिंसात्मक धातूचें कर्म एकच असलें पाहिजे. उ० दण्डोपघातं गाः कालयति, दण्डेनोपघातं गाः कालयति.

१ (सू. ४९) उप उपसर्गाच्या पुढील जे पीड् रुध् आणि भ्वादि गणांतील कृष् धातु त्यांहून सप्तम्यन्त किंवा तृतीयान्त उपपद असतांना णमुल् प्रत्यय होतो. उदा० पार्श्वोपपीडं शेते; पार्श्वयोरुपपीडं शेते; पार्श्वाभ्यामुपपीडं शेते.

समासत्तौ ॥३।४।५०॥
प्रमाणे च ॥३।४।५१॥
पादाने परीप्सायाम् ॥३।४।५२॥
द्वितीयायां च ॥३।४।५३॥
स्वाङ्गेऽध्रुवे ॥३।४।५४॥
परिक्लिश्यमाने च ॥३।४।५५॥
विशिपतिपदिस्कन्दां व्याप्यमा- नासेव्यमानयोः ॥३।४।५६॥
अस्यतितृषोः क्रियान्तरे कालेषु ॥३।४।५७॥
नाम्न्यादिशिग्रहोः ॥३।४।५८॥
अव्ययेऽयथाभिप्रेताख्याने कृञः क्त्वाणमुलौ ॥३।४।५९॥]
तिर्यच्यपवर्गे ॥३।४।६०॥

१ (सू. ५०) सप्तम्यन्त किंवा तृतीयान्त उपपद सतांना धातूहून अत्यन्त सामीप्य गम्यमान असतांना णमुल् प्रत्यय होतो. उदा० केशग्राहं युध्यन्ते. शेषुग्राहं युध्यन्ते. केशैर्ग्राहं युध्यन्ते.

१ (सू. ५१) सप्तम्यन्त किंवा तृतीयान्त उपपद सतांना धातूहून णमुल् प्रत्यय होतो प्रमाण म्यमान असतांना. उदा० द्व्यङ्गुलोत्कर्षं खण्डिकां छनत्ति. द्व्यङ्गुले उत्कर्षं खण्डिकां छिनत्ति. द्व्यङ्गुलोत्कर्षं खण्डिकां छिनत्ति.

१ (सू. ५२) अपादानवाचक शब्द उपपद सतांना धातूहून णमुल् प्रत्यय होतो त्वरा गम्यमान सतांना. उदा० शय्योत्थाय धावति. शय्याया त्थायं धावति. (अंथरुणावरून उठला कीं इतर मकडे दुर्लक्ष करून लगेच धावतो.)

१ (सू. ५३) द्वितीयान्त उपपद असतांना आणि रा गम्यमान असतांना धातूहून णमुल् प्रत्यय तो. उदा० यष्टिग्राहं युध्यन्ते, यष्टिग्राहं युध्यन्ते काठी घेउन लढू लागतात; शस्त्रें आणीपर्यंतही बत नाहींत.)

१ (सू. ५४) द्वितीयान्त स्वांगवाचक शब्द पपद असतांना धातूहून णमुल् प्रत्यय होतो. परंतु स्वाङ्ग ध्रुव नसावें. उदा० भ्रूविक्षेपं कथयति, भ्रुवं क्षेपं कथयति. ज्या स्वांगावाचून प्राणी जगू शकत ाहीं तें स्वांग ध्रुव होय.

१ (सू. ५५) द्वितीयान्त स्वांगवाचक शब्द पपद असतांना धातूहून णमुल प्रत्यय होतो परंतु स्वांग सर्व बाजूनें धात्वर्थ-क्रियेनें पीडित होत सलें पाहिजे. उदा० उरःप्रतिपेषं युध्यन्ते, उरः-प्रतिपेषं युध्यन्ते.(सर्व उराचा चुराडा होत लढतात.)

१ (सू. ५६) विश्, पत, पद्, आणि स्कन्द् या धातूंहून द्वितीयान्त उपपद असतांना णमुल् प्रत्यय होतो; त्या धात्वर्थ-क्रियेचा कर्माशीं संबंध सर्व अंशांनीं असला पाहिजे, किंवा वारंवार होत असला पाहिजे. उदा० गेहानुप्रवेशमास्ते. (घरांत सर्व ठिकाणीं प्रवेश करून आहे, वरचेवर घरांत प्रवेश करून आहे.) समास होत नाहीं त्या वेळीं गेहम याला किंवा अनुप्रवेशं याला पाळीपाळीनें द्वित्व (८।१।४) होतें.

१ (सू. ५७) धात्वर्थक्रियेमध्यें व्यवधान दाखविणारा जो काल तद्वाचक द्वितीयान्त उपपद असतांना दिवादि गणांतील अस् धातु किंवा तृष् धातु याहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० द्व्यहात्यासं गाः पाययति. (मध्यें दोन दिवस टाकून बैलांना पाणी पाजतो). एकदां समास होत नाही.

१ (सू. ५८) द्वितीयान्त नाम शब्द उपपद असतांना आ उपसर्गपूर्वक दिश् धातु आणि ग्रह धातु यांहून णमुल् प्रत्यय होतो. उदा० नामादेशमाचष्टे (नांव घेऊन सांगतो.) नामग्राहमाह्वयति (नाव घेऊन हाक मारतो )

१ (सू.५९ अव्यय उपपद असतांना कृ धातूहून क्त्वा प्रत्यय होतो, परंतु तेथें इच्छित नसेल तशा रीतीनें सांगणें असा अर्थ विवक्षित पाहिजे. उदा० उच्चैःकृत्य उच्चःकारमप्रियमाचष्टे (वाईट गोष्ट मोठ्यानें सांगतो.) एकदां समास होत नाहीं तेव्हां उच्चैः कृत्वा, उच्चैः कारम् असें होतें.

१ (सू ६०) तिर्यच् शब्द उपपद असतांना कृ धातूहून समाप्ति हा अर्थ गम्यमान असतांना क्त्वा आणि णमुल् प्रत्यय होतात, तिर्यक्कृत्य गतः तिर्यक्कारं गतः, ( काम पुरें करून गेला.) एकदां समास होत नाहीं त्या वेळीं तिर्यक् कृत्वा गतः तिर्यक् कारं गतः असें होतें.

अयुक्तोयं निर्देशः। तिरश्चीति भवितव्यम्। सौत्रोयं निर्देशः॥

[स्वाङ्गे तस्प्रत्यये कृभ्वोः ॥ ३।४।६१ ॥]

नाधार्थप्रत्यये च्व्यर्थे ॥३।४।६२

अर्थग्रहणं किमर्थम्। नाधाप्रत्यय इतीयत्युच्यमाने इहैव स्यात् द्विधाकृत्य। इह न स्यात् द्वैधंकृत्य। अर्थग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति। नाधाप्रत्यये च सिद्धं भवति यथान्यस्तेन समानार्थः॥

अथ प्रत्ययग्रहणं किमर्थम्॥ इह मा भूत्। हिरुक्कृत्वा पृथक्कृत्वा॥

[तूष्णीमि भुवः ॥३।४।६३॥]

अन्वच्यानुलोम्ये ॥३।४।६४॥

अयुक्तोयं निर्देशः। अनूचीति भवितव्यम्॥ सौत्रोयं निर्देशः॥

[शकधृषज्ञाग्लाघटरभलभक्रमसहार्हास्त्यर्थेषु तुमुन् ॥३।४।६५॥

पर्याप्तिवचनेष्वलमर्थेषु॥३।४।६६]

---

(सू. ६१) येथें तिर्यचि हा निर्देश बरोबर दिसत नाहीं; तिरश्चि असें पाहिजे. (६।४।१३८).

हा निर्देश सौत्र आहे.

(सू. ६२) येथें 'नाधार्थ' यांतील अर्थ हा शब्द कशाकरितां घातला आहे?

तो न घालतां नाधाप्रत्यये एवढेंच म्हटलें तर द्विधाकृत्य येथें धाप्रत्ययान्त उपपद असतांनाच ह्या सूत्राची प्रवृत्ति होईल; आणि द्वैधंकृत्य येथें धमुञ्प्रत्ययान्त उपपद असतांना होणार नाहीं. अर्थ शब्द घातला असतां हा दोष येत नाहीं. ना आणि धा हे प्रत्यय असतांनाही इष्ट कार्य सिद्ध होईल, आणि त्या प्रत्ययांच्या अर्थीच होणारा जो दुसरा कोणता प्रत्यय तो उपपदामध्यें असला तरी तेथेंही काम भागेल.

आतां येथें प्रत्यय-ग्रहण कशाकरितां केलें आहे.

'हिरुक् कृत्वा', 'पृथक कृत्वा', येथें प्रकृत सूत्राची प्रवृत्ति न झाली पाहिजे.

(सू. ६४) येथें 'अन्वचि' हा निर्देश बरोबर दिसत नाहीं. अनूचि असें पाहिजे. (६।४।१३८)

हा निर्देश सौत्र आहे.

---

१ (सू. ६१) तम्-(५।४।४४) प्रत्ययान्त स्वांगवाचक शब्द उपपद असतांना कृ आणि भू या धातूंहून क्त्वा आणि णमुल् प्रत्यय होतात. उदा० मुखतःकृत्य गतः, मुखतःकारं गतः, मुखतोभूय तिष्ठति, मुखतोभावं तिष्ठति. एकदां समास होत नाहीं त्या वेळीं मुखतः कृत्वा, मुखतो भावम् असें होतें.

१ (सू. ६२) ना(५।२।२७) आणि धा(५।३।४२) या प्रत्ययांच्या अर्थी सांगितलेले जे प्रत्यय ते शेवटीं असलेलें उपपद असतांना कृ आणि भू या धातूंहून क्त्वा आणि णमुल् हे प्रत्यय होतात; परंतु तेथें उपपदाचा अर्थ खऱ्या रीतीनें नसून कल्पिलेला असावा. उदा० अनाना नाना कृत्वा गतः, इति नानाकृत्य गतः, नानाकारं गतः, नानाभावं गतः इत्यादि. येथें सर्व ठिकाणीं एकदां समास होत नाहीं.

२ हिरुक् आणि पृथक् हीं अव्ययें विना या अर्थाचीं म्ह० ना प्रत्ययाच्या अर्थाचीं आहेत

१ (सू. ६३) तूष्णीम् शब्द उपपद असतांना भू धातूहून क्त्वा आणि णमुल् हे प्रत्यय होतात. उदा. तूष्णींभूय, तूष्णींभावम्. एकदां समास होत नाहीं. तूष्णीं भूत्वा.

१ (सू. ६४) अन्वच् शब्द उपपद असतांना आणि अनुकूलत्व गम्यमान असतांना भू धातूहून क्त्वा आणि णमुल् हे प्रत्यय होतात. उदा० अन्वग्भूय आस्ते. अन्वग्भावमास्ते. (दुसऱ्याच्या मनाप्रमाणें वागतो.) एकदां समास होत नाहीं. अन्वग् भूत्वा.

१ (सू. ६५) शक् धृष् ज्ञा ग्ला घट् रभ् लभ् क्रम् सह् अर्ह् आणि अस्ति या अर्थीच धातू ह्यांपैकीं कोणताही धातु उपपद असतांना कोणत्याही धातूहून तुमुन् प्रत्यय होतो. उदा० भोक्तुं शक्नोति

१ (सू. ६६) पूर्णतावाचक शब्द उपपद असतांना आणि सामर्थ्य गम्यमान असतांना धातूहून तुमुन् प्रत्यय होतो. उदा. पर्याप्तो भोक्तुम् (हा चांगला जेवणारा आहे.)

**कर्तरि कृत् ॥ ३ । ४ । ६७ ॥**[1]

किमर्थमिदमुच्यते ।

**कर्तरि कृद्वचनमनादेशे स्वार्थविज्ञानात् ॥ १ ॥**

कर्तरि कृतो भवन्तीत्युच्यतेऽनादेशे स्वार्थविज्ञानात् । अनिर्दिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे भवन्ति । तद्यथा । गुप्तिज्किद्भ्यः सन् [ ३ . १ . ५. ] यावादिभ्यः कन् [ ५ . ४ . २९ ] इति । एवमिमे प्रत्ययाः कृतः स्वार्थे स्युः । स्वार्थे मा भूवन्कर्तरि यथा स्युरित्येवमर्थमिदमुच्यते ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । यमिच्छति स्वार्थ आह तम् । भावे घञ् भवतीति ॥ कर्मणि तर्हि मा भूवन्निति । कर्मण्यपि यमिच्छत्याह तम् । धः कर्मणि ष्ट्रन् [ ३. २. १८१ ] इति ॥ करणाधिकरणयोस्तर्हि मा भूवन्निति । करणाधिकरणयोरपि यमिच्छत्याह तम् । ल्युट् करणाधिकरणयोर्भवतीति ॥ संप्रदानापादानयोस्तर्हि मा भूवन्निति । संप्रदानापादानयोरपि यमिच्छत्याह तम् । दाशगोघ्नौ संप्रदाने [ ३.४.७३ ] भीमादयोऽपादाने [ ७४ ] इति ॥ य इदानीमतोऽन्यः प्रत्ययः शेषः सोऽन्तरेण वचनं कर्तर्येव भविष्यति ॥ तदेव तर्हि

---

(सूत्र ६७) हें सूत्र कशाकरिता केलें आहे?

(वा. १) कर्ता या अर्थी कृत् प्रत्यय होतात असें येथें सांगितलें आहे. कारण जर तसें सांगितलें नाहीं तर ते प्रत्यय स्वार्थी होऊं लागतील. 'अमुक अर्थी प्रत्यय होतो' असा अर्थाचा निर्देश ज्या ठिकाणीं केला नसेल तेथें ते प्रत्यय स्वार्थी होतात' अशी परिभाषा आहे; जसें:–गुप्तिज्किद्भ्यः सन् ( ३।१।५ ) यावादिभ्यः कन् (५।४।२९) या सूत्रांनीं सांगितलेले सन् आणि कन् हे प्रत्यय जसे स्वार्थी होतात त्याप्रमाणेंच हे कृत् प्रत्ययही भाव या स्वार्थी होऊं लागतील. ते स्वार्थी होऊं नयेत, तर कर्ता या अर्थी झाले पाहिजेत, याकरितां हें सूत्र केलें आहे.

हा या सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, जो प्रत्यय स्वार्थी व्हावा असें आचार्यांना वाटतें तेथें आचार्य स्पष्ट तसें बोलतात, उदाहरणार्थः- भाव या अर्थी घञ् प्रत्यय होतो. ( ३।३।१८ ).

तर मग कर्म या अर्थी कृत् प्रत्यय होऊं लागतील ते होऊं नयेत याकरितां हें सूत्र केलें असेल.

असेंही म्हणतां येत नाहीं. कारण, जो प्रत्यय कर्म या अर्थी व्हावा असें आचार्यांना वाटतें तेथें स्पष्टच तसें आचार्य बोलतात. उदा० धः कर्मणि ष्ट्रन् (३।२।१८१).

तर मग करण किंवा अधिकरण या अर्थी कृत् प्रत्यय होऊं लागतील ते न होण्याकरितां हें सूत्र केलें असेल.

असेंही म्हणता येत नाहीं. कारण, जो प्रत्यय करण किंवा अधिकरण या अर्थी व्हावा असें आचार्यांना वाटतें तेथें स्पष्टच तसें आचार्य बोलतात. जसें:---करण किंवा अधिकरण या अर्थी ल्युट् प्रत्यय होतो. ( ३।३।११७ ).

तर मग संप्रदान किंवा अपादान या अर्थी कृत् प्रत्यय होऊं लागतील ते न व्हावे याकरितां हें सूत्र केलें असेल.

असेंही म्हणतां येत नाहीं. कारण जो प्रत्यय संप्रदान किंवा अपादान या अर्थी व्हावा असें आचार्यांना वाटतें तेथें स्पष्टच तसें ते बोलतात, जसें :—दाशगोघ्नौ संप्रदाने (३।४।७३), भीमादयो ऽपादाने (३।४।७४). तेव्हां आतां या विशेष अर्थी सांगितलेल्या प्रत्ययाशिवाय उरलेला जो कृत् प्रत्यय तो 'कर्ता या अर्थी होतो' असें प्रत्यक्ष म्हटलें नाहीं तरी तो आपोआपच कर्ता या अर्थी होईल.

तर मग कृत् प्रत्यय स्वार्थी होऊं नयेत हाच या सूत्राचा उपयोग समजावा.

---

[1] सू. ६७) कृत्संज्ञक प्रत्यय कर्ता या अर्थी होतात. हा सामान्य नियम आहे. उदा० कर्ता

प्रयोजनं स्वार्थे मा भूवन्निति। ननु चोक्तं यमिच्छति स्वार्थ आह तं भावे घञ् भवतीति। अन्यः स भावो बाह्यः प्रकृत्यर्थात्। अनेनेदानीमाभ्यन्तरे भावे स्युस्तत्र मा भूवन्निति कर्तृग्रहणम्। कः पुनरेतयोर्भावयोर्विशेषः। उक्तो भावभेदो भाष्ये। अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति।

**तत्र ल्युनादिप्रतिषेधो नानावाक्यत्वात् ॥ २ ॥**

तत्र ल्युनादीनां प्रतिषेधो वक्तव्यः। ल्युनादयः कर्तरि मा भूवन्निति। ननु च करणे ल्युनादयो विधीयन्ते ते कर्तरि न भविष्यन्ति। तेन च करणे स्युरनेन च कर्तरि। ननु चापवादत्वात् ल्युनादयो बाधकाः स्युः। न स्युः। किं कारणम्। नानावाक्यत्वात्। नाना वाक्यं तच्चेदं च। समानवाक्येऽपवादैरुत्सर्गा बाध्यन्ते नानावाक्यत्वाद् बाधनं न प्राप्नोति ॥

**तद्वच्च कृत्येष्वेवकारकरणम् ॥ ३ ॥**

एवं च कृत्वा कृत्येष्वेवकारः क्रियते। तयोरेव कृत्यक्तखलर्थाः [ ३.४.७० ] इति। भावे चाकर्मकेभ्य इति ॥

---

पण जो प्रत्यय स्वार्थी व्हावा असें आचार्यांना वाटतें तेथें स्पष्टच ते तसें बोलतात. जसें 'भाव या अर्थी घञ् प्रत्यय होतो' असें आतांच सांगितलें आहे ना ?

भावे असा जो भाव सांगितला आहे तो प्रकृतीच्या अर्थापेक्षा म्हणजे स्वार्थापेक्षां निराळा आहे. तो भाव बाह्य आहे. आणि स्वार्थ जो भाव तो आभ्यन्तर भाव आहे, त्या अर्थी कृत् प्रत्यय होऊं लागतील ते होऊं नयेत याकरितां येथे कर्ता या अर्थी कृत् प्रत्यय होतात असें सांगितलें आहे.

पण आभ्यन्तर आणि बाह्य या दोन भावांमध्यें काय बरें फरक आहे ?

या दोन भावांतील फरक मागें (३।१।६७) भाष्यामध्यें दाखविलाच आहे.

हा उपयोग आहे खरा ?

मग पुढें आतां तुमचें काय म्हणणें आहे ?

( वा. २ ) ह्या कृत् प्रत्ययांमधील ल्युन् वगैरे प्रत्यय कर्ता या अर्थी होत नाहींत असा प्रतिषेध करावा. कारण ल्युन् ( ३।२।५६ ) वगैरे प्रत्यय कर्ता या अर्थी न झाले पाहिजेत.

पण ल्युन् वगैरे प्रत्यय करण या अर्थी सांगितले आहेत. तेव्हा कर्ता या अर्थी ते होणार नाहींतच.

त्या सूत्रानें करण या अर्थी सांगितले म्हणून काय झालें ? त्यानें करण या अर्थी होतील आणि प्रकृत सूत्रानें कर्ता या अर्थीही होतील.

पण करण या अर्थी सांगितलेले ल्युन् वगैरे प्रत्यय अपवाद असल्यामुळें प्रकृत सूत्राचा बाध करतील.

बाध करणार नाहींत.

काय कारण ?

कारण असें की करणीं ल्युन् प्रत्यय सांगणारें तें वाक्य, आणि कर्ता या अर्थी कृत् प्रत्यय सांगणारें प्रकृत वाक्य हीं दोन्ही वाक्यें अगदीं भिन्न भिन्न आहेत म्हणजे त्यांचा परस्पर कांहीं संबंध नाहीं. परस्परसंबंधानें एकवाक्यता होण्यासारखीं जीं वाक्यें असतील तेथेंच अपवाद शास्त्रानें सामान्य शास्त्राचा बाध केला जातो. तेव्हां परस्परांशीं असंबद्ध अशीं हीं वाक्यें असल्यामुळें त्यांतील एकानें दुसऱ्याचा बाध होणार नाहीं.

(वा. ३) याप्रमाणेंच कृत्य प्रत्ययाचा अर्थ सांगतांना सूत्रकारांनीं 'भावे चाकर्मकेभ्यः' याच्या पुढें 'तयोरेव कृत्यक्तखलर्थाः' (३।४।७०) ह्या सूत्रामध्यें एव शब्द घातला आहे.

---

२ कर्तरि कृत् या शास्त्राचा त्या त्या प्रत्ययांचा विशेष अर्थ सांगणाऱ्या शास्त्रांनीं बाध होत नाहीं हें मनांत धरूनच.

किं प्रयोजनम् ।

**तच्च भव्याद्यर्थम् ॥ ४ ॥**

भव्यादिषु समावेशः सिद्धो भवति । गेयो माणवकः साम्नाम् । गेयानि माणवकेन सामानीति ॥

**ऋषिदेवतयोस्तु कृद्भिः समावेशवचनं ज्ञापकमसमावेशस्य ॥ ५ ॥**

यदयं कर्तरि चर्षिदेवतयोः [३.२ १८६]इति सिद्धे सति समावेशे समावेशार्थं चकारं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न भवति समावेश इति ॥ किमर्थं तर्हि कृत्येष्वेवकारः क्रियते ।

**एवकारकरणं च चार्थे ॥ ६ ॥**

एवकारकरणं च चार्थे द्रष्टव्यम् । तयोर्भावकर्मणोः कृत्या भवन्ति भव्यादीनां कर्तरि चेति ॥ किं प्रयोजनम् ।

**तच्च भव्याद्यर्थम् ॥ ७ ॥**

भव्यादिषु समावेशः सिद्धो भवति गेयो माणवकः साम्नाम् । गेयानि माणवकेन सामानीति ॥

यत्तावदुच्यत ऋषिदेवतयोस्तु कृद्भिः समावेशवचनं ज्ञापकमसमावेशस्येति नैतज्ज्ञापकसाध्यमपवादैरुत्सर्गा बाध्यन्त इति । एष एव न्यायो यदुताप-

---

बाध होत नाहीं असें जें त्या एव शब्दानें सुचविलें आहे त्याचा काय उपयोग ?

(वा. ४) 'भव्यगेय०' ( ३।४६।८ ) या पुढील सूत्रानें त्या शब्दामध्यें कर्ता या अर्थी कृत्य प्रत्यय सांगितले आहेत; तेथें ते प्रत्यय एकदां इतर अर्थीहि होतात. उदा० गेयो माणवकः साम्नाम्, गेयानि माणवकेन सामानि.

(वा. ५) परंतु अशा रीतीनें समावेश म्ह० दोन्ही अर्थी प्रत्यय सिद्ध होत असतांनाही आचार्यांनीं समावेश होण्याकरितां 'कर्तरि चर्षिदेवतयोः' (३।२।१८६) या सूत्रामध्यें ज्या अर्थी चकार घातला आहे त्या अर्थी ' समावेश होत नाहीं ' असें त्यावरून सूचित होतें.-

पण असें असेल तर मग कृत्य प्रत्ययांचा अर्थ सांगतांना एव शब्द कां बरें घातला आहे ?[३]

(वा. ६) तो जो एव शब्द घातला आहे तो च शब्दाच्या अर्थी घातला आहे असें समजावें. त्यामुळें ' तयोरेव० ' ( ३।४।७० ) या सूत्राचा असा अर्थ होतो. तयोः म्ह. त्या भाव आणि कर्म या अर्थी कृत्य वगैरे प्रत्यय होतात आणि भव्य वगैरे शब्दांमध्यें कर्ता या अर्थीहि होतात.

याचा काय उपयोग ?

(वा. ७) तसा अर्थ केला म्हणून भव्य वगैरे शब्दांमध्यें समावेश सिद्ध होतो, उदा० गेयो[४] माणवकः साम्नाम्, गेयानि माणवकेन सामानि.

आतां समावेश होण्याकरितां कर्तरि चर्षिदेवतयोः (३।२।१८६) या सूत्रामध्यें जो च शब्द उच्चारला आहे तो 'समावेश होत नाहीं' या गोष्टीचें ज्ञापक आहे' असें जें (वा. ५) म्हटलें आहे त्यासंबंधानें इतकेंच सांगावयाचें आहे कीं ' समावेश होत नाहीं ' म्ह० अपवाद शास्त्रांनीं सामान्य शास्त्रांचा बाध होतो, या गोष्टीला ज्ञापक कशाला पाहिजे ! अपवाद शास्त्रांनीं सामान्य शास्त्राचा बाध व्हावा हाच न्याय आहे. आतां ' परस्परसंबंध न झालेली

---

३ ' तयोरेव० ' या सूत्रानें कृत्य प्रत्यय भाव किंवा कर्म या अर्थी सांगितले आहेत. त्यानें जर तेथें प्रकृत सूत्राचा बाध केला असता तर सूत्रकारानीं तेथें एव शब्द घातला नसता.

४ येथें गा धातूपासून कर्ता या अर्थी यत् प्रत्यय झाला आहे; आणि गेयानि सामानि येथें समावेश झाला आहे.

वादैरुत्सर्गा बाध्येरन् । ननु चोक्तं नानावाक्यत्वाद् बाधनं न प्राप्नोतीति । न विदेशस्थमिति कृत्वातो नाना वाक्यं भवति । विदेशस्थमपि सदेकवाक्यं भवति । तद्यथा । द्वितीयेऽध्याये लुगुच्यते तस्य चतुर्थषष्ठयोरलुगुच्यतेऽपवादः ॥ यदप्युच्यत एवकारकरणं च चार्थे इति कथं पुनरन्यो नामान्यस्यार्थे वर्तते । कथमेवकारश्चार्थे वर्तते । स एष एवकारः स्वार्थे वर्तते । किं प्रयोजनम् । ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्य इत उत्तरं समावेशो भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । तव्यभव्याद्यर्थम् । भव्यादिषु समावेशः सिद्धो भवति । गेयो माणवकः साम्नाम् । गेयानि माणवकेन सामानीति ॥ यद्येतज्ज्ञाप्यत इहापि समावेशः प्राप्नोति । दाशगोघ्नौ संप्रदाने [ ३. ४. ७३. ] भीमादयोऽपादाने [ ७४ ] इति । अत्रापि सिद्धं भवति । यदयमादिकर्मणि क्तः कर्तरि च । [ ७१ ] इति सिद्धे समावेशे समावेशं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः प्रागमुतः समावेशो भवतीति ॥

किं पुनरयं प्रत्ययनियमः । धातोः परोऽकारोऽकशब्दो वा नियोगतः कर्तारं

---

अशीं हीं भिन्न भिन्न वाक्यें आहेत म्हणून त्यांमध्यें एकानें दुसऱ्याचा बाध होणार नाहीं' असें जें म्हटलें आहे तें येथें बरोबर दिसत नाहीं. कारण भिन्न भिन्न ठिकाणीं तीं वाक्यें आहेत म्हणून कांहीं त्यांचा परस्परसंबंध न होतां तीं अलगच राहतात असें नाहीं. असें पहा कीं दूर ठिकाणीं असलेल्याही वाक्यांचा परस्परसंबंध होऊन एकवाक्यता होते. उदा०:— दुसऱ्या अध्यायामध्यें (२।४।९१) लुक् सांगितला आहे, आणि त्याचा अपवाद अलुक् हा चवथ्यामध्यें (४।१।८९) आणि सहाव्यामध्यें (६।३।१) सांगितला आहे.

तसेंच एव शब्द च शब्दाच्या अर्थी घातला आहे ( वा. ६ ) असें जें म्हटलें आहे तेंही बरोबर नाहीं. कारण, एक शब्द दुसऱ्या शब्दाच्या अर्थी कसा बरें असूं शकेल ? उदा० एव हा शब्द च शब्दाच्या अर्थी कसा असूं शकेल ? तो एव शब्द तेथें स्वतःच्या अर्थींच आहे.

त्याचा तेथें काय उपयोग ?

ज्ञापकाकरितां तो तेथें उपयोगीं पडतो.

त्या ज्ञापकानें कोणती गोष्ट ठरवावयाची आहे ?

कर्तरि कृत् ह्या प्रकृत सूत्राच्या पुढें जो अपवाद प्रत्यय असेल त्यानें सामान्यप्राप्त प्रत्ययाचा बाध होत नाहीं, पण समावेशच होतो; ही गोष्ट आचार्यांच्या मनांत येथें ठरवावयाची आहे.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं भव्य, गेय, वगैरे शब्दांमध्यें समावेश होतो, म्ह० इतर अर्थीही कृत्य प्रत्यय होतो, उदा० गेयो माणवकः साम्नाम्, गेयानि माणवकेन सामानि.

पण असें जर ज्ञापक केलें तर 'दाशगोघ्नौ संप्रदाने' ( ३।४।७३ ), 'भीमादयोऽपादाने' ( ३।४।७४ ), येथेंही समावेश होऊं लागेल.

येथेंही इष्ट सिद्ध होत आहे. तें असें कीं अशा रीतीनें सिद्ध होत असतांनाही 'आदिकर्मणि क्तः कर्तरि च' ( ३।४।७१ ) या सूत्रामध्यें आचार्यांनीं जो समावेश होण्याकरितां च शब्द घातला आहे त्यावरून तें असें सूचित करतात की 'आदिकर्मणि०' या सूत्राच्या पूर्व सूत्रापर्यंतच समावेश होतो.

पण काय हो, या प्रकृत सूत्राचा अर्थ कसा समजावा ? धातूच्या पुढील जो अ किंवा अक वगैरे शब्द नियोगानें म्ह० शास्त्रानुसार कर्त्याला दाखवितो तो कर्ता या अर्थी साधु समजावा; अशा रीतीनें प्रत्ययासंबंधीं नियम

भ्रुवन्कृत्संज्ञश्च भवति प्रत्ययसंज्ञश्चेति। आहोस्वित्संज्ञानियमः। धातोः परोऽकारोऽकशब्दो वा स्वभावतः कर्तारं ब्रुवन्कृत्संज्ञश्च भवति प्रत्ययसंज्ञश्चेति। कश्चात्र विशेषः।

**तत्र प्रत्ययनियमेऽनिष्टप्रसङ्गः॥ ८॥**

तत्र प्रत्ययनियमे सत्यनिष्टं प्राप्नोति। काष्ठभिदब्राह्मणः। बलभिदब्राह्मणः। एषोऽपि नियोगतः कर्तारं ब्रुवन्कृत्संज्ञश्च स्यात् प्रत्ययसंज्ञश्च॥

**संज्ञानियमे सिद्धम्॥ ९॥**

संज्ञानियमे सति सिद्धं भवति॥ यदि संज्ञानियमो विभक्तादिषु दोषः। विभक्ता भ्रातरः पीता गाव इति न सिध्यति। प्रत्ययनियमे पुनः सति परिगणिताभ्यः प्रकृतिभ्यः परः क्तो नियोगतः कर्तारमाह। न चेमास्तत्र परिगण्यन्ते प्रकृतयः॥

**विभक्तादिषु चाप्राप्तिः प्रकृतेः प्रत्ययपरवचनात्॥ १०॥**

विभक्तादिषु च प्रत्ययनियमस्याप्राप्तिः। किं कारणम्। प्रकृतेः प्रत्ययपरवचनात्। परिगणिताभ्यः प्रकृतिभ्यः परः क्तः

---

करण्याविषयीं प्रकृत सूत्राचें तात्पर्य समजन त्यालाच नंतर कृत्संज्ञा व प्रत्ययसंज्ञा होतात किंवा साहजिक रीतीनें कर्ता या अर्थाचा वाचक असा जो धातूच्या पुढील अ किंवा अक वगैरे शब्द त्यालाच कृत् व प्रत्यय[५] या संज्ञा होतात अशा रीतीनें संज्ञेसंबंधीं नियम करण्याविषयीं तात्पर्य समजावें ?

या दोहोंमध्यें फरक काय ?

(वा. ८) येथें प्रत्ययासंबंधीं नियम असेल तर काष्ठभिदब्राह्मणः[६], बलभिदब्राह्मणः येथें अनिष्ट प्राप्त होतें. तेथें भिद् धातूच्या पुढील जो अब्राह्मण शब्दांतील आदि अकार तोही या प्रकृत सूत्रामुळें कर्ता या अर्थी साधु समजून त्याला कृत् व प्रत्यय या संज्ञा होतील.

(वा. ९) संज्ञेसंबंधीं नियम मानला म्हणजे मात्र हें सिद्ध होत आहे.

पण जर संज्ञेसंबंधीं नियम मानला तर विभक्त वगैरे शब्दांमध्यें दोष येतो. विभक्ताः भ्रातरः, पीताः गावः हे प्रयोग सिद्ध होणार नाहींत[७]. आणि प्रत्ययासंबंधीं नियम मानला म्हणजे मात्र हे सिद्ध होतातः गत्यर्थाकर्मक० (३।४।७२) या सूत्रानें कांहीं विशेष धातू उच्चारून त्यांच्या पुढें कर्ता या अर्थी क्त प्रत्ययाचें विधान केलें आहे, आणि भज् आणि[८] पा हे धातू तर त्यांमध्यें उच्चारले नाहींत.

(वा. १०) प्रत्ययनियमपक्षींही विभक्त वगैरे शब्दांमध्यें प्रकृत सूत्राची प्राप्ति येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं, कांहीं धातूच्या पुढील कर्ता या अर्थाच्या क्त प्रत्ययाला फक्त त्यानें[९]

---

५ ह्या संज्ञानियमपक्षीं ल्युन् वगैरे प्रत्यय कर्ता या अर्थी होत नाहींत हा प्रतिषेध (वा. २) करावयास नको.

६ काष्ठभिदब्राह्मणः येथ भिद् धातूच्या पुढील अ हा नियोगानेंच कर्ता या अर्थाचा वाचक आहे. न ब्राह्मणः असा तो अकार हा नञाचा नकार जाऊन राहिलेला असतो. नञाचा अर्थ भिन्न असा आहे. आणि जो ब्राह्मणभिन्न आहे तोच भिद् धातूचा कर्ता आहे. तेव्हां त्या अकाराला कर्ता या अर्थी प्रकृत सूत्रानें साधुत्व समजून त्याला कृत् आणि प्रत्यय या संज्ञा होऊं लागतील.

७ अब्राह्मणः येथील अकार कांहीं कर्ता या रूपानें कर्त्याचा वाचक स्वभावतः नाहीं.

८ विभक्ताः पीताः येथें कर्ता या अर्थी क्त प्रत्यय दिसतो. त्याला प्रत्ययनियमपक्षीं प्रकृत सूत्रानें साधुत्व समजलें जातें असा अभिप्राय आहे खरा, पण त्या सूत्रांत भज् आणि पा हे धातू दिले नाहीत.

९ तेव्हां विभक्ताः आणि पीताः येथें प्रकृत सूत्रानेंच कर्ता या अर्थी क्त प्रत्ययाला साधुत्व समजलें जातें असें म्हटलें पाहिजे.

स्वभावतः कर्तारमाह न चेमास्तत्र परिगण्यन्ते ॥ न तर्हीदानीमयं साधुर्भवति । भवति साधुर्न तु कर्तरि । कथं तर्हीदानीमत्र कर्तृत्वं गम्यते । अकारो मत्वर्थीयः । विभक्तमेषामस्ति विभक्ताः । पीतमेषामस्ति पीता इति । अथवोत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । विभक्तधना विभक्ताः । पीतोदकाः पीता इति ॥

[ भव्यगेयप्रवचनीयोपस्थानीयजन्याप्लाव्यापात्या वा ॥ ३।४।६८ ॥]

लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः ॥ ॥ ३ । ४ । ६९ ॥

किमर्थमिदमुच्यते । ल एतेषु साधनेषु यथा स्यात्कर्तरि च कर्मणि च भावे चाकर्मकेभ्य इति । नैतदस्ति प्रयोजनम् । भावकर्मणोरात्मनेपदं विधीयते शेषात्क-

---

साधुत्व सांगितलें आहे. म्हणजे ज्या ठिकाणीं क्त प्रत्यय स्वभावतःच कर्ता या अर्थी दिसतो त्या ठिकाणच्या धातूंचें तेथें गत्यर्थ, अकर्मक इत्यादि परिगणन केलें आहे. आणि या परिगणनामध्यें भज् आणि पा हे धातू नाहींत.

तर मग विभक्ता भ्रातरः, पीता गावः अशा रीतीचे प्रयोग होत नाहींतच कीं काय ?

ते प्रयोग साधु आहेत, पण त्यांतील क्त प्रत्यय कर्ता या अर्थाचा मात्र नव्हे.

तर मग विभक्त आणि पीत या शब्दापासून भ्राते आणि गाई या कर्त्यांचा बोध कसा होतो ?

'विभक्त आहे ज्याचें' अशा अर्थी विभक्त[१०] शब्दाहून मतुप् प्रत्ययाच्या अर्थी अकार प्रत्यय (५।२।१२७) करावा. 'तसेंच पीत आहे ज्यांचें' या अर्थी पीत शब्दाहून अकार प्रत्यय करावा.

अथवा 'विभक्तं धनं येषां' ते विभक्तधनाः या बहुव्रीहीमधील धन या उत्तरपदाचा लोप झाला आहे, तसेंच पीतोदकाः या बहुव्रीहीमधील उदक या उत्तर पदाचा लोप झाला आहे व त्यामुळें विभक्ताः भ्रातरः, पीताः गावः असे प्रयोग होतात असें समजावें.

(सू.६९) हें सूत्र कशाकरिता केलें आहे ?

क्रियेचें साधन जें कर्ता किंवा कर्म त्या अर्थी लकार झाले पाहिजेत, तसेंच अकर्मक धातूहून भाव या अर्थी लकार झाले पाहिजेत.

हा या सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'भावकर्मणोः' (१।३।१३) या सूत्रानें भाव आणि कर्म या अर्थी लकाराचे स्थानीं आत्मनेपद सांगितलें आहे. आणि 'शेषात्कर्तरि०' (१।३।७८) या सूत्रानें कर्ता या अर्थी लकाराचे स्थानीं परस्मैपद सांगितलें आहे आणि लकाराचा विषय काय तो एव-

---

१० विभक्त म्ह. विभागलेलें द्रव्य. येथें वि+भज् याहून कर्म या अर्थीच क्त प्रत्यय केला आहे. तसेंच पीत येथेंही पा धातूहून कर्म या अर्थीच क्त प्रत्यय केला आहे.

१ ( सू. ६८ ) भव्य गेय प्रवचनीय उपस्थानीय जन्य आप्लाव्य आणि आपात्य हे शब्द कर्ता या अर्थी कृत्य प्रत्यय करून निपातन केले आहेत. एरवी त्या शब्दांतील भू वगैरे धातूंहून इतर अर्थीही ( अकर्मकाहून भाव या अर्थी व सकर्मकाहून कर्म या अर्थी ) कृत्य प्रत्यय होतात. उदा० भवतीति भव्यः, भव्यमनेन; गेयो माणवकः, गेयं साम; प्रवचनीयो गुरुः, प्रवचनीयः स्वाध्यायः, उपस्थानीयः शिष्यः, उपस्थानीयो गुरुः; जायतेऽसौ जन्यः, जन्यमनेन; आप्लवतेऽसौ आप्लाव्यः, आप्लाव्यमनेन; आपततीति आपात्यः, आपात्यमनेन.

१ (सू.६९) लट् लिट् वगैरे लकार हे सकर्मक धातूहून कर्ता किंवा कर्म या अर्थी होतात; आणि अकर्मक धातूहून भाव किंवा कर्ता या अर्थी होतात. उदा० तण्डुलं पचति देवदत्तः; तण्डुलः पच्यते देवदत्तेन; आस्यते देवदत्तेन; आस्ते देवदत्तः.

२ येथें लः असें कशाकरितां म्हटलें आहे अशाच याचा अभिप्राय आहे. कारण, कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः या पदाची पुढें अनुवृत्ति आहे तेव्हां पुढील सूत्रांमध्यें तीं पदें घातलींच पाहिजेत.

तर्हि परस्मैपदमेतावांश्च लो यदुत परस्मैपदमात्मनेपदं च। स चायमेवं विहितः ॥ अत उत्तरं पठति।

**लग्रहणं सकर्मकनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

लग्रहणं क्रियते सकर्मकनिवृत्त्यर्थम्। सकर्मकाणां भावे लो मा भूदिति ॥ यदि पुनस्तत्रैवाकर्मकग्रहणं क्रियेत ॥ तत्त्राकर्मकग्रहणं कर्तव्यम् ॥ ननु चेहापि क्रियते। भावे चाकर्मकेभ्य इति ॥ परार्थमेतद्भविष्यति। तयोरेव कृत्यक्तखलर्थाः [७०] भावे चाकर्मकेभ्य इति ॥ यावदिह लग्रहणं तावत्तत्राकर्मकग्रहणम्। इह वा लग्रहणं क्रियेत तत्र वाकर्मकग्रहणं को न्वत्र विशेषः ॥ अयमस्ति विशेषः। इह लग्रहणे क्रियमाण आनः कर्तरि सिद्धो भवति। तत्र पुनरकर्मकग्रहणे क्रियमाण आनः कर्तरि न प्राप्नोति ॥ तत्राप्यकर्मकग्रहणे क्रियमाण आनः कर्तरि सिद्धो भवति। कथम्। भावकर्मणोरित्यतोऽन्यद्यदात्मनेपदानुक्रमणं सर्वं तत्कर्त्रर्थम्।

---

ढाच आहे कीं, एक परस्मैपद तरी त्याचे स्थानीं होणार किंवा आत्मनेपद तरी होणार; आणि तो लकारच येथें त्या अर्थी सांगितला आहे. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात :—

(वा. १) लः कर्मणि० हें सूत्र सकर्मकाच्या निवृत्तीकरितां केलें आहे. सकर्मक धातूहून भाव या अर्थी लकार न झाला पाहिजे.

आतां भाव या अर्थी लकाराचे स्थानीं आत्मनेपद सांगणाऱ्या सूत्रामध्यें जर अकर्मक धातूहून असें म्हटले तर तेथें अकर्मक शब्द ज्यास्त घालावा लागेल.

पण येथेंही 'भावे चाकर्मकेभ्यः' असा अकर्मक शब्द घातलाच आहे ना ?

पुढें अनुवृत्तीकरितां हें उपयोगी पडत आहे.'तयोरेव कृत्यक्तखलर्थाः'या पुढील सूत्रामध्यें 'भावे चाकर्मकेभ्यः'याची अनुवृत्ति आहे.

तरी पण तुम्हांला येथें लग्रहण केलें पाहिजे व मला आत्मनेपद सांगणाऱ्या सूत्रामध्यें अकर्मकग्रहण केलें पाहिजे. मिळून सारखेच होतें, ज्यास्त होत नाहीं.

आता येथें ल–ग्रहण केलें किंवा तेथे अकर्मक–ग्रहण केलें या दोहोंमध्यें फरक काय बरें होतो ?

फरक होतो तर. येथें ल–ग्रहण केलें म्हणजे आन म्हणजे शानच् प्रत्यय कर्ता या अर्थीही सिद्ध होतो. आणि जर तेथें म्हणजे भाव व कर्म अर्थ असतांना आत्मनेपद सांगणाऱ्या सूत्रामध्यें अकर्मक–ग्रहण केलें तर ते अर्थ असतांनाच आन प्रत्यय होईल कर्ता या अर्थी होणार नाहीं.

पण तेथें अकर्मक–ग्रहण केलें तरी देखील आन प्रत्यय कर्ता या अर्थी सिद्ध होतो.

तो कसा ?

तो असा कीं भावकर्मणोः (१।३।१३) या सूत्राच्या पुढें जीं आत्मनेपद सांगणारीं सूत्रें आहेत तीं सर्व कर्ता अर्थ असतांनाच आत्मनेपद सांगत आहेत.

---

३ तेव्हां त्यावरूनच तेथें हे तिन्ही अर्थ आहेत असें अनुमानानेंच सिद्ध होत आहे

४ भाव, कर्ता व कर्म हे अर्थ निमित्त धरून आत्मनेपद व तसेंच परस्मैपद सांगितलें आहे. त्यावरून त्या तिन्ही अर्थी लकार होतो असें ज्ञापकानें मानलें तर सर्वच धातूंहून तिन्ही अर्थी लकार होऊं लागेल. त्यामध्यें अकर्मक धातूहून कर्म या अर्थी जरी लकार करतां आला नाहीं तरी सकर्मक धातूहून भाव या अर्थी लकार होऊं लागेल.

५ कारण आन प्रत्ययाला आत्मनेपद संज्ञा (१।४।१००) आहे, परस्मैपद संज्ञा नाहीं.

विप्रतिषेधाद्वानः कर्तरि॥ विप्रतिषेधाद्वानः कर्तरि भविष्यति । तत्र भावकर्मणोरित्येतदस्तु कर्तरि कृत् [ ३ ४. ६७ ] इति कर्तरि कृादित्येतद्भविष्यति विप्रतिषेधेन ॥

सर्वप्रसङ्गस्तु ॥ सर्वेभ्यस्तु धातुभ्य आनः कर्तरि प्राप्नोति । परस्मैपदिभ्योऽपि ॥ नैष दोषः । अनुदात्तङित इत्येष योगो नियमार्थो भविष्यति ॥ यद्येष योगो नियमार्थो विधिर्न प्रकल्पते । आस्ते शेत इति । अथ विध्यर्थ आनस्य नियमो न प्राप्नोति । आसीनः शयानः । तथा नेर्विशः [ १. ३. १७ ] इत्येवमाद्यनुक्रमणं यदि नियमार्थं विधिर्न प्रकल्पते । अथ विध्यर्थमानस्य।नियमो न प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि नियमार्थम् । ननु चोक्तं विधिर्न प्रकल्पत इति । विधिश्च प्रक्लृप्तः । कथम्।भावकर्मणोरित्यत्रानुदात्तङित इत्येतदनुवर्तिष्यते । यद्यनुवर्तत एवमप्यनुदात्तङित एव भावकर्मणोरात्मनेपदं प्राप्नोति । एवं तर्हि योगविभागः करिष्यते । अनुदात्तङित आत्मनेपदं भवति । ततो भावकर्मणोः । ततः कर्तरि । कर्तरि

अथवा विप्रतिषेधामुळें आन हा प्रत्यय कर्ता या अर्थी होईल. भावकर्मणोः यावरून आन प्रत्ययाचा अर्थ भाव किंवा कर्म समजावा[६] किंवा कर्तरि कृत् यावरून आन प्रत्ययाचा अर्थ कर्ता समजावा असा संशय उत्पन्न झाला असता कर्तरि कृत् हें शास्त्र विप्रतिषेधामुळें भावकर्मणोः यापेक्षां परत्वास्तव प्रबल होतें.

पण तसें असेल तर सर्वच धातूंहून म्हणजे परस्मैपदी धातूंहूनसुद्धां आन प्रत्यय कर्ता या अर्थी होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ' अनुदात्तङितः (१।३।१२) हें सूत्र नियमार्थ[७] होईल.

पण जर तें सूत्र नियमार्थ मानलें तर आस्ते शेते, या ठिकाणीं जें त्या सूत्रानें आत्मनेपदाचें विधान होत होतें तें आतां होणार नाहीं. बरें, आतां तें सूत्र विध्यर्थ म्हणावें तर आसीनः शयानः इत्यादि ठिकाणींच आन प्रत्यय होतो असा नियम होणार नाहीं. तसेंच नेर्विशः (१।३।१७) इत्यादि शास्त्रें जर नियमार्थ मानलीं तर तेथें आत्मनेपदाचें विधान केलें जाणार नाहीं. बरें, आता तीं सूत्रें विध्यर्थ म्हणावीं तर आन प्रत्ययाचा नियम केला जाणार नाहीं.

तर मग आतां परस्मैपदी धातूंहून कर्ता या अर्थी आन प्रत्यय होऊं नये म्हणून अनुदात्तङित० हें सूत्र नियमार्थच असूं दे.

पण तें नियमार्थ मानलें तर आस्ते शेते येथें आत्मनेपदाचें विधान होणार नाहीं असें आतांच सांगितलें आहे ना ?

तेथें आत्मनेपदाचें विधान निराळ्या तऱ्हेनें करतां येईल.

तें कसें.

' भावकर्मणोः' या सूत्रामध्यें 'अनुदात्तङितः' याची अनुवृत्ति केली म्हणजे काम भागेल.

पण अनुवृत्ति केली तर अनुदात्त आणि ङ हे इत्संज्ञक असलेल्या धातूंहूनच भाव व कर्म या अर्थी आत्मनेपद होतें असा पूर्वीपेक्षांही संकुचित अर्थ होऊं लागेल.

तर मग आतां अनुदात्तङित आत्मनेपदम् या नियमार्थ सूत्राच्या पुढील जें भावकर्मणोः (१।३।१३) हें सूत्र त्याच्या पुढील सूत्रामध्यें योगविभाग करण्यांत येईल. त्यांत 'कर्तरि' एवढेंच पहिलें सूत्र होईल. तेथें अनुदात्तङित

६ भावकर्मणोः हें आत्मनेपदाचा अर्थ सांगणारें आहे असें येथें गृहीत धरलें आहे.

७ कर्ता या अर्थी जर आत्मनेपद होईल तर अनुदात्त किंवा ङकार इत्संज्ञक असलेल्या धातूहूनच होईल असा नियम होय. उदा० आसीनः, शयानः.

चात्मनेपदं भवति । अनुदात्तङित इत्येव । भावकर्मणोरिति निवृत्तम् । ततः कर्मव्यतिहारे । कर्तरीत्येवानुवर्तते ऽनुदात्तङित इत्यपि निवृत्तम् ॥ यदप्युच्यते तथा नेर्विंश इत्येवमाद्यनुक्रमणं यदि नियमार्थं विधिर्न प्रकल्पते ऽथ विध्यर्थमानस्य नियमो न प्राप्नोतीत्यस्तु विध्यर्थम् । ननु चोक्तमानस्य नियमो न प्राप्नोतीति । नैष दोषः । यथैवात्राप्राप्तास्तङो भवन्त्येवमानो ऽपि भविष्यति ॥

सर्वत्राप्रसङ्गस्तु ॥ सर्वेषु तु साधनेष्वानो न प्राप्नोति विप्रतिषेधाद्धानः कर्तरीति भावकर्मणोर्न स्यात्कर्तर्येव स्यात् । इह पुनर्लग्रहणे क्रियमाणे कर्तरि कृदित्येतदस्तु लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्य इति लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्य इत्येतद्भविष्यति विप्रतिषेधेन ॥

सर्वप्रसङ्गस्तु ॥ लादेशः सर्वेषु साधनेषु प्राप्नोति । शतृकसू च भावकर्मणोरपि प्राप्नुतः ॥ नैष दोषः । शेषात्परस्मैपदं कर्तरीत्येवं तौ कर्तारं ह्रियेते ॥

## [१ तयोरेव कृत्यक्तखलर्थाः ॥३।४।७०॥

---

याची अनुवृत्ति येईल. आणि भावकर्मणोः याची अनुवृत्ति येणार नाहीं. त्या सूत्रानें अनुदात्त अथवा ङ् इत्संज्ञक असलेल्या धातूहून कर्ता या अर्थी आत्मनेपदाचें विधान होऊन आस्ते शेते इत्यादि उदाहरणें साधतील. त्याच्या पुढें ' कर्मव्यतिहारे ' हें दुसरें सूत्र येईल. तेथें फक्त कर्तरि एवढ्याचीच अनुवृत्ति येईल; अनुदात्तङितः याचीही अनुवृत्ति येणार नाहीं; म्हणून त्याचा पूर्वीप्रमाणेंच वाक्यार्थ होईल.

तसेंच आणखी जें सांगितलें आहे कीं नेर्विशः ( १।३।१७ ) इत्यादि सूत्रें जर नियमार्थ मानलीं तर निविशते इत्यादि उदाहरणांमध्यें आत्मनेपदाचें विधान केलें जाणार नाहीं, आणि जर तीं सूत्रें विध्यर्थ मानावीं तर आन प्रत्ययाचा नियम केला जाणार नाहीं, तर त्याचें उत्तर असें कीं—तीं सूत्रें विध्यर्थच असोत.

पण विध्यर्थ मानलीं तर आन प्रत्ययासंबंधानें नियम होणार नाहीं असें आतांच म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. येथें जसे त आताम् इत्यादि प्रत्यय अप्राप्त असूनही होतात तसा आन प्रत्ययही होईल.

पण भाव, कर्म आणि कर्ता या तिन्ही अर्थी आन प्रत्यय इष्ट आहे तो होणार नाहीं. कर्तरि कृत् यानें परत्वास्तव बाध केल्यामुळें भाव, व कर्म या अर्थी आन प्रत्यय होणार नाहीं; कर्ता या अर्थीच फक्त होईल. येथें ल–ग्रहण केलें म्हणजे मात्र 'कर्तरि कृत्' आणि 'लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः' ह्या दोन शास्त्रांची एका ठिकाणीं प्राप्ति आली असतां तेथें विप्रतिषेधामुळे 'लः कर्मणि च भावे चाकर्मकेभ्यः' हेंच शास्त्र परत्वास्तव प्रवृत्त होईल.

पण लकाराचे स्थानीं होणारे इतर सर्व आदेश कोणत्याही प्रकारचें साधन या अर्थी होऊं लागतील. थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे शतृ व क्वसु हे प्रत्यय भाव व कर्म या अर्थींही प्राप्त होतील.

हा दोष येत नाहीं. ज्या धातूहून आत्मनेपद प्राप्त होत नाहीं अशा धातूहून कर्ता या अर्थी परस्मैपद होतें असें सांगितलें (१।३।७८) असल्यामुळें परस्मैपदसंज्ञक शतृ व क्वसु हे

---

८ अनुदात्तङितः या नियमामुळें आन प्रत्ययाची प्राप्ति येत नाहीं. त आताम् वगैरे तङ् प्रत्ययही भाव किंवा कर्म या अर्थी सांगितलेले निविशते येथें कर्ता या अर्थी होणार नाहींत.

१(सू.७०) कृत्यसंज्ञक प्रत्यय, क्त प्रत्यय आणि खल् (३।३।१२६) या प्रत्ययांच्या अर्थी सांगितलेले प्रत्यय अकर्मक धातूहून भाव या अर्थी आणि सकर्मक धातूहून कर्म या अर्थींच होतात.

**आदिकर्मणि क्तः कर्तरि च ॥३।४।७१॥**
**गत्यर्थाकर्मकश्लिषशीङ्स्थासवसजनरुहजीर्यतिभ्यश्च ॥३।४।७२॥**
**दाशगोघ्नौ संप्रदाने ॥३।४।७३॥**
**भीमादयोऽपादाने ॥३।४।७४॥**
**ताभ्यामन्यत्रोणादयः ॥३।४।७५॥**
**क्तोऽधिकरणे च ध्रौव्यगतिप्रत्यवसानार्थेभ्यः ॥३।४।७६॥ ]**
**लस्य ॥ ३ । ४ । ७७ ॥**

**लादेशे सर्वप्रसङ्गो ऽविशेषात् ॥ १ ॥**

लादेशे सर्वप्रसङ्गः । सर्वस्य लकारस्यादेशः प्राप्नोति । अस्यापि प्राप्नोति । लुनाति लभते । किं कारणम् । अविशेषात् । न हि कश्चिद्विशेष उपादीयत एवंजातीयकस्य लकारस्यादेशो भवतीति । अनुपादीयमाने विशेषे सर्वप्रसङ्गः ॥

अर्थवद्ग्रहणात्सिद्धम्। अर्थवतो लकारस्य ग्रहणं न चैषो ऽर्थवान् ॥

**अर्थवद्ग्रहणात्सिद्धमिति चेन्न वर्णग्रहणेषु ॥ २ ॥**

---

प्रत्यय कर्ता या अर्थीच ठरविले जातात.

(सू. ७७ वा. १) लकाराचे स्थानीं पुढील सूत्रानें सांगितलेले जे आदेश ते वाटेल त्या लकाराला होऊं लागतील. उदा० लुनाति लभते इत्यादि ठिकाणीं धातूच्या लकारालाही ते होतील.

काय कारण ?

कारण असें कीं—अमक्या प्रकारच्या लकाराला आदेश ते होतात असा कांहीं तेथें विशेष सांगितला नाहीं. तेव्हां विशेष सांगितला नसल्यामुळें सर्व ठिकाणीं आदेश होऊं लागतील.

अर्थवान् लकाराचें ग्रहण केल्यामुळें इष्ट गोष्ट सिद्ध होते. अर्थवान् जो लकार त्याचें येथें ग्रहण केलें आहे. आणि लुनाति लभते इत्यादि ठिकाणीं लकाराला कांहींच अर्थ नाहीं.

---

१ (सू. ७१) आदिकर्म या अर्थी जो क्त प्रत्यय सांगितला (३।२।१०२ वा. ३) आहे तो कर्ता या अर्थीही होतो. उदा. प्रकृतः कटं देवदत्तः. एरवीं प्रकृतः कटो देवदत्तेन असा कर्म या अर्थी क्त प्रत्यय होतोच.

१ (सू. ७२) गमनार्थक धातू, अकर्मक धातु, श्लिष्, शीङ्, स्था, आस्, वस्, जन्, रुह्, आणि जृ धातूहून कर्ता या अर्थीही क्त प्रत्यय होतो. एरवीं इतर अर्थी म्हणजे अकर्मक धातूहून भाव या अर्थी व सकर्मक धातूहून कर्म या अर्थी क्त प्रत्यय होतोच. उदा. ग्रामं गतः देवदत्तः, गतो ग्रामो देवदत्तेन.

१ (सू. ७३) दाश आणि गोघ्न हे शब्द येथें निपातन केले आहेत. दाश् धातूहून संप्रदाय या अर्थी अच् प्रत्यय झाला आहे. दीयते अस्मै दाशः । गां हन्ति अस्मै गोघ्नः अतिथिः । येथें हन् धातूहून संप्रदान या अर्थी टक् प्रत्यय झाला आहे.

१ (सू. ७४) भीम वगैरे शब्द अपादान अर्थी प्रत्यय करून निपातन केले आहेत. बिभेति अस्मात् इति भीमः येथें भी धातूहून मक् प्रत्यय उणा. (१।१४५) झाला आहे.

१ (सू. ७५) संप्रदान आणि अपादान यांशिवाय इतर अर्थी उणादि प्रत्यय होतात. कर्ता, कर्म, करण, अधिकरण आणि भाव या अर्थांपैकीं ज्या शब्दामध्यें जो अर्थ जुळेल तो घ्यावा.

१ (सू. ७६) स्थिति गति आणि भक्षण या अर्थाच्या धातूहून अधिकरण या अर्थीही क्त प्रत्यय होतो. एरवीं ज्या अर्थी प्राप्त असेल त्या अर्थी करावा. उदा० मुकुन्दस्य आसितमिदम्, आसितो मुकुन्दः, आसितं मुकुन्देन । मुकुन्दस्य यातमिदं स्थलम्, यातः स्थलं मुकुन्दः, मुकुन्देन यातं स्थलम् ।

१ (सू. ७७) हें अधिकार-सूत्र आहे. पुढील सूत्रामध्यें लस्य याचा संबंध आहे. ल या शब्दानें येथें लट्, लिट्, लुट्, लृट्, लेट्, लोट्, लङ्, लिङ्, लुङ् आणि लृङ् असे दहा लकार घेतले आहेत.

अर्थवद्ग्रहणात्सिद्धमिति चेत्तन्न । किं कारणम् । वर्णग्रहणमिदं न चैतद्वर्णग्रहणेषु भवत्यर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येति ॥

**तस्माद्विशिष्टग्रहणम् ॥ ३ ॥**

तस्माद्विशिष्टस्य लकारस्य ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । धातोः [३. १. ९१] इति वर्तते ॥ एवमपि शाला माला मल्ल इत्यत्र प्राप्नोति । उणादयो ऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि ॥ एवमपि नन्दनः अत्र प्राप्नोति। इत्संज्ञात्र बाधिका भविष्यति । इहापि तर्हि बाधेत । पचति पठतीति । इत्कार्याभावादत्रेत्संज्ञा न भविष्यति । इदमस्तीत्कार्यं लिति प्रत्ययात्पूर्वमुदात्तं भवतीत्येष स्वरो यथा स्यात् । लितीत्युच्यते न चात्र लितं पश्यामः । अथापि कथंचिद्वचनाद्वानुवर्तनाद्वेत्संज्ञकानामादेशः स्यादेवमपि न दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न लादेशे लित्कृतं भवतीति यदयं णलं

(वा. २) अर्थवान् लकाराचें येथें ग्रहण केलें असल्यामुळें इष्टसिद्धि होत आहे असें म्हणशील तर तसें नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं येथें 'लस्य' हें वर्णग्रहण आहे. आणि 'अर्थवानाचें ग्रहण संभवत असतांना अनर्थकाचें ग्रहण करूं नये' ही परिभाषा तर वर्णग्रहणाविषयीं प्रवृत्त होत नाहीं.

(वा. ३) तेव्हां अमुक प्रकारच्या लकाराला हे आदेश होतात असें येथें विशेष प्रकारच्या लकाराचें ग्रहण करावें.

तसें करावयास नको. कारण धातोः (३।१।९१)या पदाची मागाहून अनुवृत्ति येत आहे.

धातोः याची अनुवृत्ति आली तरी शाला, माला, मल्लः या शब्दांतील धातूच्या पुढील प्रत्ययाच्या आदि लकाराला ते आदेश होऊं लागतील.

पण उणादि प्रत्यय करून साधलीं जाणारीं प्रातिपदिकें मुळीं अव्युत्पन्नच समजलीं जातात.

तरी पण नन्दनः येथें नन्द् धातूच्या पुढील ल्यु प्रत्ययाच्या (३।१।१३४) लकाराला हे आदेश होऊं लागतील.

तेथें लकाराला प्राप्त झालेल्या इत्संज्ञेनें त्या आदेशांचा बाध होईल.

तर मग पचति पठति येथेंही लटाच्या लकाराला जे तिङ् आदेश होतात त्यांचा इत्संज्ञा बाध करील.

लट् वगैरे प्रत्ययाच्या लकाराला इत्संज्ञा करण्याचा कांहींच उपयोग नसल्यामुळें तेथें लकाराला इत् संज्ञा होणार नाहीं.

पण इत् संज्ञा करण्याचा उपयोग आहे. लिति (६।१।१९३) या सूत्रानें प्रत्ययाच्या पूर्वीच्या अचाला सांगितलेला जो उदात्त तो येथे झाला पाहिजे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण लित् प्रत्यय पुढें असतांना असें तेथ म्हटलें आहे. आणि येथें तर त्या प्रत्ययांपैकीं एक वर्णही पुढें दिसत नाहीं.

आतां येथे 'लस्य' असें म्हटलें आहे म्हणून किंवा त्याची अनुवृत्ति पुढील सूत्रांत केली आहे म्हणून त्या इत्संज्ञक लकाराचा लोप न करता त्याला आदेश होतील अशी कशीतरी कल्पना केली तरी देखील हा दोष येत नाहीं. लोप न झाल्यामुळें लिति या सूत्राची प्राप्ति आली तरी लकाराचें स्थानीं आदेश

२ - धातूच्या पुढील लकाराला हे आदेश होतात असा अर्थ होतो म्हणून लुनाति येथें ते होत नाहींत.

३ - तेव्हां त्यामध्यें धातु, प्रत्यय ही कांहींच कल्पना नसल्यामुळें धातूच्या पुढें लकार आहे असें म्हणतां येत नाहीं.

४ - कारण इत्संज्ञा झाली कीं लागलींच त्या इत्संज्ञकाचा लोप( १।३।९ ) होत असतो.

लितं करोति ॥ अथाप्युणादयो व्युत्पाद्यन्त एवमपि न दोषः । क्रियते विशिष्टग्रहणं लस्येति ॥

**लादेशो वर्णविधेः पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ ४**

लादेशो वर्णविधेर्भवति पूर्वविप्रतिषेधेन । लादेशस्यावकाशः । पचतु पठतु । वर्णविधेरवकाशः । दध्यत्र मध्वत्र । इहोभयं प्राप्नोति । पचत्वत्र पठत्वत्रेति । लादेशो भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः ।

**उक्तं वा ॥ ५ ॥**

किमुक्तम् । लादेशो वर्णविधेरिति ॥

**[ तिप्तस्झिसिप्थस्थमिब्वस्मस्तातांझथासाथांध्वमिड्वहिमहिङ् ॥३।४।७८॥ ]**

**टित आत्मनेपदानां टेरे ॥ ३ । ४ । ७९ ॥**

**टित एत्व आत्मनेपदेष्वानप्रतिषेधः ॥ १ ॥**

टित एत्व आत्मनेपदेष्वानस्य प्रतिषेधो वक्तव्यः । पचमानः यजमानः । टित

---

केले असतां तेथें इत्संज्ञक लकारामुळें प्राप्त होणारें कार्य होत नाहीं असें आचार्यांच्या कृतीवरून सूचित होतें. ज्याअर्थी आचार्यांनीं णल् या आदेशाला ( ३ । ४ । ८२ ) इत्संज्ञक लकार जोडला आहे त्याअर्थी वरील गोष्ट त्यांचें मनांत आहे असें दिसून येतें.

तसेंच उणादि प्रत्यय करून साधलीं जाणारीं जीं प्रातिपदिकें त्यांमध्यें प्रकृतिप्रत्ययांची कल्पना गृहीत धरली तरी शाला, माला, मल्लः वगैरे शब्दांतील धातूच्या पुढील लकाराला हे आदेश होतील हा दोष येत नाहीं. कारण येथें लस्य असें विशेष प्रकारच्या अनुनासिक लकाराचें ग्रहण केलें आहे.

(वा. ४) वर्णाला सांगितलेल्या कार्यापेक्षां लादेश हा पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतो. लादेशाला ( ३।४।८६ ) पचतु पठतु येथें अवकाश आहे. वर्णाला सांगितलेल्या कार्याला ( ६।१।७७ ) दध्यत्र मध्वत्र येथें अवकाश आहे. आणि पचत्वत्र पठत्वत्र येथें उ हा लादेश आणि यण् या दोघांची एकदम प्राप्ति येते व तेथें पूर्वविप्रतिषेधानें लादेश जें उत्व तें पूर्वी होतें.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको.

(वा.५) अथवा हें पूर्वी सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

लादेशो वर्णविधेः ( १ । ४ । २ वा २० ) असें मागें सांगितलें आहे.

( सू.७९ वा.१ ) टित् लकाराचे स्थानीं झालेल्या आत्मनेपद प्रत्ययांतील ' टि ' भागाला जो हा एकार आदेश सांगितला आहे तो आन प्रत्ययाला होत नाहीं असें म्हणावें. उदा० पचमानः, यजमानः. येथें आन

---

१ ( सू. ७८ ) तिप् तस् झि, सिप् थस् थ, मिप् वस् मस्, त आताम् झ, थास् आथाम् ध्वम्, इट् वहि आणि महि हे अठरा आदेश लकाराचें स्थानीं होतात. त्यांपैकीं पहिल्या नऊ प्रत्ययांना परस्मैपद संज्ञा ( १।४।१०९ ) आहे. आणि पुढील नऊ प्रत्ययांना आत्मनेपद संज्ञा (१।४।११०) आहे. ह्या दोन्ही प्रकारच्या नऊ प्रत्ययांपैकीं पहिल्या तीन प्रत्ययांना प्रथम पुरुष, मधल्या तीन प्रत्ययांना मध्यम पुरुष, आणि शेवटल्या तीन प्रत्ययांना उत्तम पुरुष या संज्ञा ( १।४।१०१ ) आहेत. त्या तीन प्रत्ययांतसुद्धां पहिल्या प्रत्ययाला एकवचन, दुसऱ्याला द्विवचन, आणि तिसऱ्याला बहुवचन ( १।४।१०२ ) अशा संज्ञा आहेत.

१ (सू. ७९) टित् जे लकार त्यांचे स्थानीं आदेश झालेल्या आत्मनेपद प्रत्ययांतील टित्संज्ञक भागाला

इत्येत्वं प्राप्नोति ॥

## उक्तं वा ॥ २ ॥

किमुक्तम् । ज्ञापकं वा सानुबन्धकस्यादेशवचन इत्कार्याभावस्येति ॥ नैतदस्त्युक्तम् । एवं किल तदुक्तं स्याद्यद्येवं विज्ञायेत टित् आत्मनेपदम् टिदात्मनेपदम् टिदात्मनेपदानामिति । तच्च न । टितो लकारस्य यान्यात्मनेपदानीत्येवमेतद्विज्ञायते ॥ अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । टित् आत्मनेपदम् टिदात्मनेपदम् टिदात्मनेपदानामिति विज्ञायमाने अकुर्वि अत्रापि प्रसज्येत । नैष टित् । कस्तर्हि । ठित् । स चावश्यं ठित्कर्तव्य आदिर्मा भूदिति ॥ कथमिटोऽत् [ ३. ४. १०६ ] इति । इठोऽदिति वक्ष्यामीति । तच्चावश्यं वक्तव्यं पर्यवपाद्यस्य मा भूत् । लविषीष्ट ॥ इह तर्हि इषमूर्जमहमित आदि आतो लोप इटि च [ ६. ४. ६४ ] इत्याकारलोपो न प्राप्नोति । तस्माट्टिदेषः ॥ आदिस्तर्हि कस्मान्न भवति सप्तदशादेशाः स्थानेयोगत्वं प्रयोजयन्ति

---

प्रत्यय ( ३।२।१२४ ) लटाचें स्थानीं झाला आहे आणि त्याला आत्मनेपद संज्ञाही आहे म्हणून एकार प्राप्त होतो.

( वा. २ ) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

ज्ञापकं वा सानुबन्धकस्याऽऽदेशवचन इत्कार्याभावस्य ( २ । ४ । ४९ वा २४ ) असें मागें सांगितलेंच आहे

तें जें सांगितलें आहे तें येथें निरुपयोगी आहे. कारण टकारेत्संज्ञक जें आत्मनेपद त्याच्या टि भागाला एत्व होतें असा प्रकृत सूत्राचा अर्थ गृहीत धरून तें सांगितलें असेल. परंतु या सूत्राचा तसा अर्थ नाहीं; तर टित् लकाराचे स्थानीं झालेलें जें आत्मनेपद असा येथें अर्थ आहे. आणि असा या प्रकृत सूत्राचा अर्थ अवश्य केलाच पाहिजे. कारण, टकार इत्संज्ञक ज्याचा आहे असें जें आत्मनेपद त्याच्या टि भागाला एकार आदेश होतो असा अर्थ घेतला तर अकुर्वि येथें एकार आदेश होऊं लागेल.

इट् आदेश हा टकार इत्संज्ञक ज्याचा आहे असा नाहीं.

तर मग तो कसा आहे?

त्याचा ठकार इत्संज्ञक आहे असा. आणि ज्याचा ठकार इत्संज्ञक आहे असाच तो मानला पाहिजे.कारण ठकार इत्संज्ञक असल्यास तो इट् आदेश लकाराचा आद्यावयव ( १ । १ । ४६ ) होईल, तो तसा न झाला पाहिजे.

इट् असा तो प्रत्यय असेल तर 'इटोऽत्' ( ३।४।१०६ ) यानें त्याला अकार आदेश कसा बरें होईल ?

तेथें ही 'इठोऽत्' असें म्हणतां येईल. आणि तसें तेथें म्हटलेंच पाहिजे. कारण लविषीष्ट येथें इट् आगमाला अकार आदेश न झाला पाहिजे.

तर मग 'इषमूर्जमहमित आदि' या मंत्रांतील आदि या क्रियापदामध्यें आतो लोप इटि च (६।४।६४) यानें आकाराचा लोप होणार नाहीं. तेव्हां इट् असा टकार इत्संज्ञक असलेला असाच इट् प्रत्यय मानला पाहिजे.

तर मग तो लकाराचा आद्यावयव ( १।१।४६ ) असा आगम कां होत नाहीं ?

पूर्व सूत्रांतील तिप् तस् वगैरे अठरा प्रत्ययांपैकीं सतरा प्रत्यय जर लकाराचे स्थानीं आदेश होत आहेत तर त्यांतील इट् हा एकटाच त्या सतरांच्या विरुद्ध स्वतःचे आदेशत्व

---

एकार आदेश होतो, उदा० आस्ते शेते.

२ - कृ धातूच्या पुढील लङ् प्रत्ययाला उत्तम पुरुष एकवचन इट् आदेश येथें झाला आहे. येथें इट् हा आत्मनेपद प्रत्यय टित् लकाराचे स्थानीं

**तानेको नोत्सहते विहन्तुमिति कृत्वादिन भविष्यति । पर्यवपाद्यस्य तर्हि कस्मान्न भवति । लविषीष्टेति । असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इति । इदं तर्ह्युक्तं प्रकृतानामात्मनेपदानामेत्वं भवतीति । के प्रकृताः । तादयः ॥**

**आनेमुग्ज्ञापकं त्वेत्वे टित्तङाभिशिसीरिचः। डारौरःसु टिदटितः प्रकृते तद्गुणे कथम्।**

**[थासः से ॥३।४।८०॥**

**लिटस्तझयोरेशिरेच् ॥३।४।८१॥]**

**परस्मैपदानां णलतुसुस्थलथुसणल्वमाः ॥ ३ । ४ । ८२ ॥**

---

टाकण्याविषयीं धजत नाहीं, म्हणून आद्यावयव होणार नाहीं.

तर मग आतां टकारच कायम केला तर लविषीष्ट येथें इ् आगमाला 'इटोऽत्' यानें अकार कां होत नाहीं ?

इटोऽत् हें अंतरंग अत्व कर्तव्य असतांना बहिरंग इ् आगम असिद्ध आहे म्हणून होत नाहीं.

तर मग आतां प्रकृत आत्मनेपद प्रत्ययांनाच या प्रकृत सूत्रानें एत्व होतें असें जें मागें ( ३ । ४ । ४९ पृ. ४८६ पं. २० ) सांगितलें आहे तेंच उत्तर समजावें.

प्रकृत आत्मनेपद प्रत्यय ते कोणते ?

पूर्वसूत्रांत सांगितलेले त, आताम् इत्यादि नऊ प्रत्यय हे प्रकृत होत.

टित् प्रत्ययाचे स्थानीं झालेले जे तङ् त्यांनाच प्रकृत सूत्रानें एत्व होतें अशाविषयीं आने मुक् ( ७।२।८२ ) हा निर्देश ज्ञापक आहे. तसेच इश्, सि, आणि इरिच् असे जे आदेश सांगितले आहेत तेही पण ज्ञापक होत. त्यामुळें डा, रौ, रस् ह्यांना हें एत्व होत नाहीं. तसेंच प्रकृत स्थलीं अकुर्वि येथें इट् हा स्वतः टित् आहे व तो अटित् जो लङ् त्याचे स्थानीं झालेला आहे. म्हणून तेथें एत्व होत नाहीं. आतां प्रकृत सूत्रानें केलेल्या एकाराला जसा ऐकार ( ३।४।९३ ) होतो तसा पचावेदम् येथें गुण ( ६।१।८६ ) झाल्यानंतर त्या एकाराला ऐकार कां होत नाहीं ?

---

झालेला नाहीं. स्वतः मात्र तो टित् आहे.

३ - इट् हा टकारच कायम झाला असतां इतर दोष जातात. अकुर्वि येथें प्रकृत सूत्रानें एत्व होत नाही. कारण टित् लकाराचे स्थानीं झालेला जो आत्मनेपद प्रत्यय असा अर्थ येथें आहे. आतां फक्त पचमानः येथें शानच् या आत्मनेपद प्रत्ययाला प्रकृत सूत्रानें एत्व होऊं लागेल हा दोष उरतो त्याचें निराकरण येथून करीत आहेत.

४ - तङाशिवाय इतराला म्ह० शानच् प्रत्ययाला व तङाच्या आदेशांना एत्व होत नाहीं.

५ - आने ही 'आन' याची सप्तमी आहे. जर शानच् प्रत्ययाला प्रकृत सूत्रानें एत्व होईल तर शानच प्रत्ययाला आन असा आकार येऊं शकत नाहीं. कारण शकाराला इत्संज्ञा व लोप होईतोंपर्यंत एत्व थांबणार नाहीं.

६ - पुढील दोन सूत्रांनीं से एश् इरेच् असे तङापैकीं थास्, त आणि झ यांना आदेश सांगितले आहेत. जर तङाच्या आदेशांना एत्व होईल तर हे आदेश एकारान्त न सांगतां इकारान्त सांगितले तरी चालतील. तेव्हां ज्याअर्थी एकारान्त आदेश सांगितले आहेत त्याअर्थी तङाच्या आदेशांना एत्व होत नाहीं असें सूचित होतें. त्यामुळें शयिता शयितारौ शयितारः येथें डा रौ रस् ( २।४।८५ ) यांना एत्व होत नाहीं.

१ (सू. ८०) टित् लकाराचे स्थानीं झालेला जो थास् प्रत्यय त्याला से असा आदेश होतो. उदा० कुरुषे.

१ (सू. ८१) लिटाचे स्थानीं आदेश झालेले जे त आणि झ त्यांना क्रमानें एश् आणि इरेच् असे आदेश होतात. उदा० चक्रे चक्रिरे.

१ (सू. ८२) लिटाचे स्थानीं आदेश झालेले जे

**णलः शित्करणं सर्वादेशार्थम् ॥१॥**

णलिशत्कर्तव्यः । किं प्रयोजनम् । सर्वादेशार्थम् । शित्सर्वस्येति सर्वादेशो यथा स्यात् । अक्रियमाणे हि शकारेऽलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य प्रसज्येत ॥

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । अनित्त्वात्सिद्धमिति । णकारः क्रियते तस्यानित्त्वात्सिद्धम् ॥ क एष परिहारो न्याय्यः । शकारमसि चोदितः । णकारं करिष्यामि शकारं न करिष्यामीति । णकारो वात्र क्रियेत शकारो वा को न्वत्र विशेषः । अवश्यमत्र णकारो वृद्ध्यर्थः कर्तव्यो णितीति वृद्धिर्यथा स्यात् ॥ नार्थो वृद्ध्यर्थेन णकारेण। णित्त्वे योगविभागः करिष्यते । इदमस्ति गोतो णित् [ ७. १. ९० ] । ततोऽल् । अल् च णिद्भवति । तत उत्तमो वेति॥ एवं तर्हि लकारः क्रियते । तस्यानित्त्वात्सिद्धम् । क एष परिहारो न्याय्यः। शकारमसि चोदितः । लकारं करिष्यामि शकारं न करिष्यामीति । लकारो वा क्रियेत शकारो वा को न्वत्र विशेषः । अवश्यमेवात्र स्वरार्थो लकारः कर्तव्यो

(सू.८२ वा.१) ह्या प्रकृत सूत्रांतील णल् या आदेशाला इत्संज्ञक शकार जोडावा.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं शित् आदेश सर्वांचे स्थानीं होतो ( १।१।५५ ) या परिभाषेनें ति या सर्वांचे स्थानीं णल् आदेश झाला पाहिजे. जर इत्संज्ञक शकार जोडला नाहीं तर ' अन्त्य अलाला आदेश होतो' ( १।१।५२ ) या परिभाषेनें ति प्रत्ययांतील अन्त्य इकाराला णल् आदेश होऊं लागेल.

(वा.२) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

णकाराला पूर्वी इत् संज्ञा नसल्यामुळें[२] हें सिद्ध होत आहे.

हें उत्तर बरोबर आहे काय? शकार करण्याबद्दल मीं विचारलें, आणि तुम्ही म्हणतां कीं णकार करतों, शकार करीत नाहीं. णकार केला काय किंवा शकार केला काय यांत काय बरें फरक आहे?

फरक आहे तर, वृद्धीकरितां णकार अवश्य केलाच पाहिजे. णित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली वृद्धि ( ७।२।११५, ) ११६ जुहाव पपाच येथें झाली पाहिजे.

वृद्धीकरितां येथें प्रत्यक्ष णकार जोडावयास नको. कारण ' णित् समजावा ' असा अतिदेश जेथें केला आहे तेथें योगविभाग करण्यांत येईल. 'गोतो णित्' (७।१।९०) असें सूत्र आहे. त्याच्या पुढें ' अल् ' एवढेंच सूत्र निराळें करावें. अल् हा प्रत्यय णित् समजावा असा त्याचा अर्थ होय. त्याच्या पुढें ' उत्तमो वा 'हें दुसरें सूत्र होय. त्याचा अर्थ पूर्वीप्रमाणें कायमच आहे.

अशा रीतीनें णकाराचा उपयोग नसला तर लकार करूं, आणि त्याला पूर्वी इत्संज्ञा नसल्यामुळें हें सिद्ध होईल.

हें तरी उत्तर बरोबर आहे काय ? शकार करण्याबद्दल मीं विचारलें आणि तुम्ही म्हणतां कीं लकार करतों, शकार करीत नाहीं.

लकार केला काय किंवा शकार केला काय यांत काय फरक आहे ?

फरक आहे तर, स्वराकरितां येथें लकार अवश्य जोडलाच पाहिजे. लित् प्रत्यय असेल

तिप्, तस् वगैरे परस्मैपद नांवाचे नऊ प्रत्यय त्यांना क्रमानें णल्, अतुस्, उस्, थल्, अथुस्, अ, णल्, व आणि म असें नऊ आदेश होतात. उदा० बभूव, बभूवतुः इत्यादि.

२ - णल् आदेश झाल्यानंतर त्यांतील णकाराला इत्संज्ञा ( १।३।७ ) होणार. तेव्हां आदेश होतांना णकार असल्यामुळें तो आदेश अनेकाल् आहे म्हणून सर्वादेश ( १।१।५५ ) होईल. इत्संज्ञक

लिति प्रत्ययात्पूर्वमुदात्तं भवती त्येष स्वरो यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम्। धातुस्वरे कृते द्विर्वचनं तत्रान्तर्यतोऽन्तोदात्तस्यान्तोदात्त आदेशो भविष्यति। कथं पुनरयमन्तोदात्तः स्याद्यदैकाच। व्यपदेशिवद्भावेन। यथैव तर्हि व्यपदेशिवद्भावेनान्तोदात्त एवमाद्युदात्तोऽपि तत्रान्तर्यत आद्युदात्तस्याद्युदात्त आदेशः प्रसज्येत। सत्यमेवमेतत्। न त्विदं लक्षणमस्ति धातोरादिरुदात्तो भवतीति। इदं पुनरस्ति धातोरन्त उदात्तो भवतीति सो ऽसौ लक्षणेनान्तोदात्तस्तत्रान्तर्यतो ऽन्तोदात्तस्यान्तोदात्त आदेशो भविष्यति। एतदप्यादेशे नास्त्यादेशस्यान्त उदात्तो भवतीति। प्रकृतितो ऽनेन स्वरो लभ्यः प्रकृतिश्चास्य यथैवान्तोदात्तैवमाद्युदात्तापि॥ द्विःप्रयोगे चापि द्विर्वचन उभयोरन्तोदात्तत्वं प्रसज्येत। अनुदात्तं पदमेकवर्जम [ ६. १. १५८ ] इति नास्ति यौगपद्येन संभवः। पर्यायः प्रसज्येत॥ तस्मात्स्वरार्थो लकारः कर्तव्यः। लकारः क्रियते तस्यानित्त्वात्सिद्धम्॥

**अकारस्य शित्करणं सर्वादेशार्थम् ॥३॥**

अकारः शित्कर्तव्यः। किं प्रयोजनम्।

---

तेथें त्या प्रत्ययाच्या पूर्वीच्या अचाला उदात्त होतो ( ६।१।१९३ ). असा सांगितलेला उदात्त येथें झाला पाहिजे.

लकाराचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण मागील धातूला धातुस्वरानें(६।१।१६२) अन्त उदात्त झाल्यानंतर द्वित्व होणार. तेव्हां त्या द्वित्वानें होणारा आदेश अन्तोदात्त स्थानीला स्थानीप्रमाणें अन्तोदात्तच होईल ( १।१।५० ).

पण पपाच इत्यादि उदाहरणांमध्यें पच् वगैरे स्थानींना अन्तोदात्त असें कसें बरें म्हणतां येईल? कारण त्यांत एकच अच् आहे.

एकच अच् जरी असला तरी व्यपदेशिवद्भावानें ( १।१।२१ वा. २ ) आपणच आपला अन्त असें म्हणतां येतें.

तर मग पच् वगैरे एकाच् स्थानींना जसें व्यपदेशिवद्भावानें अन्तोदात्त म्हणतां येतें तसें त्यांना आद्युदात्तही म्हणतां येईल. आणि तसें म्हटलें म्हणजे द्वित्वानें होणारा पच् पच् हा आदेश आद्युदात्तही होऊं लागेल.

हें सर्व खरें आहें, पण येथें धातूचा आदि उदात्त होतो असें शास्त्र मात्र नाहीं. आणि धातूचा अंत उदात्त होतो (६।१।१६२) असें मात्र शास्त्र आहे. तेव्हां शास्त्रानें जर तो स्थानी अन्तोदात्त होत आहे तर त्या अन्तोदात्त स्थानीप्रमाणें द्वित्वाला होणारा आदेश अन्तोदात्तच होईल.

तरी देखील 'आदेशाचा अन्त उदात्त होतो' असें कांहीं आदेशांविषयीं प्रत्यक्ष वचन नाहीं ना? फक्त आदेशाला स्थानीप्रमाणें स्वर मिळावयाचा आहे आणि स्थानीला तर येथें जसें अन्तोदात्त म्हणतां येतें तसेंच आद्युदात्तही म्हणतां येतें. शिवाय धातूला द्वित्व होतें तें खरोखरच द्विःप्रयोगरूपीं असल्यामुळें पहिल्यासारखाच त्याच्या पुढें दुसरा येतो तेव्हां दोन्ही पच् हे अन्तोदात्त होऊं लागतील.

पण 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' ( ६।१।१५८) या सूत्रामुळें एका पदामध्यें दोन उदात्त एकदम असूं शकत नाहींत.

एकदम होत नसले तरी पाळीपाळीनें होतील.

एकंदरींत द्वित्व झाल्यानंतर त्यांतील शेवटच्या अचाला उदात्त होण्याकरितां लकार जोडला पाहिजे. आणि तो लकार जोडला म्हणजे त्याला पूर्वी इत्संज्ञा नसल्यामुळें आदेश होतांना तो अनेकाल् समजून सर्वादेश होईल. तेव्हां शकार नको.

(वा.३) ह्या प्रकृत सूत्रामध्यें मध्यम पुरुष बहुवचन थ प्रत्ययाचे स्थानीं सांगितलेला जो अ आदेश त्याला शकार इत्संज्ञक जोडला पाहिजे.

---

वर्ण धरून जर आदेश अनेकाल् होत असेल तर अनेकाल् समजूं नये ही परिभाषा ( १।१।५५ पृ. १३२ पं ५ ) मनांत न घेतां हा विचार चालूं आहे.

सर्वादेशार्थम् । शित्सर्वस्येति सर्वाऽदेशो यथा स्यात् । अक्रियमाणे हि शकारे ऽलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य प्रसज्येत ॥ ननु चाकारस्याकारवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वान्तरेण शकारं सर्वादेशो भविष्यति । अस्त्यन्यदकारस्याकारवचने प्रयोजनम् । किम् ।

**अकारवचनं समसंख्यार्थम् ॥ ४ ॥**

संख्यातानुदेशो यथा स्यात् ॥

**तस्माच्छित्करणम् ॥ ५ ॥**

तस्माच्छकारः कर्तव्यः ॥ न कर्तव्यः । क्रियते न्यास एव । प्रश्लिष्टनिर्देशो ऽयम् । अ अ । सोऽनेकाल्शित्सर्वस्य [ १.१. ५५ ] इति सर्वादेशो भविष्यति ॥

**[ [1]विदो लटो वा ॥३।४।८३॥**

**[1]ब्रुवः पञ्चानामादित आहो ब्रुवः ॥ ३।४।८४ ॥ ]**

**[1]लोटो लङ्वत् ॥ ३।४।८५ ॥**

**लङ्वदतिदेशे जुस्भावप्रतिषेधः ॥ १ ॥**

लङ्वदतिदेशे जुस्भावस्य प्रतिषेधो वक्तव्यः । यान्तु वान्तु । लङः शाकटायनस्यैव [३.४.१११] इति जुस्भावः प्राप्नोति ॥

---

त्याचा काय उपयोग?

उपयोग असा कीं शित् आदेश सर्वाचे स्थानीं होतो ( १।१।५५ ) या परिभाषेनें थ या सर्वाचे स्थानीं अ हा आदेश झाला पाहिजे. जर इत्संज्ञक शकार येथें जोडला नाहीं तर 'अन्त्य अलाला आदेश होतो' ( १।१।५२ ) या परिभाषेनें थ प्रत्ययांतील अन्त्य अकाराला अ आदेश होऊं लागेल.

पण अकारालाच जर अकार झाला तर त्याचा कांहींच उपयोग नाहीं. म्हणून सामर्थ्यास्तवच तो शित् नसला तरी सर्वाचे स्थानीं होईल.

असें होणार नाहीं. कारण, अकारालाच अकार झाला तरी त्याचा निराळा उपयोगआहे.

तो कोणता ?

(वा.४) स्थानींच्या नऊ या संख्येबरोबर आदेशांची नऊ ही संख्या जुळून क्रमानें आदेश (१।३।१०) झाले पाहिजेत हा.

( वा. ५ ) एकंदरीत अ हा आदेश शित् केला पाहिजे.

शित् करावयास नको. कारण सूत्रकारांनीं सर्वादेश होण्याकरितां सूत्रामध्यें उपाय केलेलाच आहे. तो असा कीं – येथें प्रश्लेषानें अ अ असे दोन अकार आहेत. त्यांना पररूप ( ६।१।९७ ) करून आचार्यांनीं एक अ उच्चारला आहे. तेव्हां 'अ अ' एवढा आदेश अनेकाल् असल्यामुळें थ या सर्वाचे स्थानीं तो होईल.

( सू. ८५ वा. १ ) लोटाला लङासारखीं कार्यें होतात या अतिदेशानें यान्तु वान्तु या उदाहरणांमध्यें लङः शाकटायनस्यैव ( ३।४।१११ ) या सूत्रानें सांगितलेला जुस् आदेश प्राप्त होतो त्याचा प्रतिषेध केला पाहिजे.

---

१ (सू. ८३) विद् धातूच्या पुढील लकाराचें स्थानीं आदेश झालेले जे तिप्, तस् वगैरे परस्मैपद नावाचे नऊ प्रत्यय त्यांना क्रमानें णल्, अतुस् वगैरे पूर्वसूत्रांत सांगितलेले नऊ आदेश विकल्पानें होतात. उदा० वेद वेत्ति इत्यादि.

१ (सू. ८४) ब्रू धातूच्या पुढील लटाला आदेश झालेले जे तिप्, तस् वगैरे परस्मैपद नांवाचे झालेले पांच प्रत्यय त्यांना क्रमानें णल्, अतुस्, उस्, थल् आणि अथुस् हे पांच आदेश विकल्पानें होतात. आदेश होतील तेव्हां त्यांच्या बरोबरच ब्रू धातूला आह असा आदेश होतो. उदा. ब्रवीति.

१(सू. ८५) लङाचें स्थानीं आदेशाला जीं कार्यें होतात तीं कार्यें लोटाचे स्थानीं झालेल्या आदेशाला करावीं. उदा. भवताम् येथें ताम् आदेश (३।४।१०१) होतो. भवाव येथें सकाराचा लोप (३।४।९९) होतो.

उत्ववचनात्सिद्धम् ॥ २ ॥

उत्वमत्र बाधकं भविष्यति ॥ अनवकाशा हि विधयो बाधका भवन्ति सावकाशं चोत्वम् । कोऽवकाशः । पचतु पठतु । अत्रापीकारलोपः प्राप्नोति । तद्यथैवोत्वमिकारलोपं बाधत एवं जुस्भावमपि बाधते । न बाधते । किं कारणम् । येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्त इकारलोप उत्वमारभ्यते जुस्भावे पुनः प्राप्ते चाप्राप्ते च । अथवा पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इत्येवमुत्वमिकारलोपं बाधते जुस्भावं न बाधते ॥ एवं तर्हि वक्ष्यति तत्र लङ्ग्रहणस्य प्रयोजनं लङेव यो लङ् तत्र यथा स्याल्लङ्वद्भावेन यो लङ् तत्र माऽभूदिति ॥

[ एरुः ॥३।४।८६॥ ]

सेर्ह्यपिच्च ॥ ३।४।८७ ॥

[वा छन्दसि ॥ ३।४।८८ ॥]

मेर्निः ॥ ३।४।८९ ॥

हिन्योरुत्वप्रतिषेधः ॥ १ ॥

---

(वा.२) उत्व सांगितलें असल्यामुळें हें सिद्ध होईल. यान्तु वान्तु येथें जुस् आदेशाचा उत्व ( ३।४।८६ ) बाध करील.

पण ज्या विधींना कोठेंही अवकाश नसतो ते दुसऱ्या विधींचा बाध करतात. आणि उत्वाला तर अवकाश आहे.

कोठें बरें तो अवकाश आहे ?

पचतु, पठतु या उदाहरणामध्यें उत्वाला अवकाश म्हणजे जागा आहे.

येथें जुस् आदेशाची प्राप्ती नसली तरी इकाराचा लोप ( ३।४।१०० ) येथें प्राप्त होत आहे. तेव्हां येथें जसा उत्वानें इकारलोपाचा बाध होतो तसा यान्तु येथें जुस् आदेशाचाही बाध होईल.

पण जुस् आदेशाचा उत्वानें बाध होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं अपवादाच्या सर्व उदाहरणांमध्यें ज्या शास्त्राची प्राप्ति असते त्याच शास्त्राचा त्या अपवादानें बाध केला जातो. ' इकाराचा लोप प्राप्त नाहीं अशा उदाहरणामध्ये उत्व झालें आहे ' असें एकही उदाहरण नाहीं. आणि जुस् आदेश हा मात्र उत्वाच्या कांहीं उदाहरणांमध्यें प्राप्त होतो आणि कांहीं उदाहरणांमध्यें प्राप्त होत नाहीं. अथवा पूर्वपठित जे अपवाद ते जवळ असलेल्याच विधीचा बाध करतात दूर असलेल्या विधीचा बाध करीत नाहींत असा नियम आहे. तेव्हां हें उत्व ( ३।४।८२ ) इकारलोपाचाच ( ३।४।१०० ) बाध करतें, जुस् आदेशाचा ( ३।४।१११ ) बाध करीत नाहीं.

तर मग आतां प्रकृत सूत्रानें केलेल्या अतिदेशामुळें यान्तु, यान्तु येथें जुस् आदेश होईल असा जो दोष येतो त्याचें उत्तर असें कीं – 'लङः शाकटायनस्यैव ' या सूत्रामध्यें लङः असें जें म्हटलें आहे त्याचा उपयोग पुढें सांगावयाचाच आहे. तो असा कीं- ' लङ्च 'जो लङ् म्हणजे मूळचा खराच जो लङ् तेथेंच जुस् आदेश झाला पाहिजे. आणि लङासारखा समजावा अशा अतिदेशाने ज्याला लङ्पणा मिळाला आहे तेथें जुस् आदेश होऊं नये.

---

१(सू.८६) लोटाचे स्थानी झालेल्या आदेशांतील इकाराला उकार होतो. उदा. पचतु.

१(सू.८७) लोटाचे स्थानी झालेला जो सि प्रत्यय त्याचें स्थानी हि आदेश होतो आणि तो सिप् प्रत्ययाप्रमाणें पित् समजू नये. उदा. चिनुहि.

१(सू.८८) हि आदेश वेदामध्यें एकदां पितही समजावा. उदा. प्रीणाहि प्रीणीहि.पित् समजला जातो त्या वेळीं ईकार आदेश ( ६।४।११३ ) होत नाहीं. कारण पित् असेल तो ङित् समजला जात नाहीं (१।२।४).

१(सू.८९) लोटाचे स्थानीं झालेला जो मि प्रत्यय त्याचे स्थानीं नि आदेश होतो. उदा. भवानि.

हिन्योरुकारस्य प्रतिषेधो वक्तव्यः। लुनीहि लुनानि। एरुः [३.४.८६] इत्युत्वं प्राप्नोति ॥

## न वोच्चारणसामर्थ्यात् ॥ २ ॥

न वा वक्तव्यः। किं कारणम्। उच्चारणसामर्थ्यादत्रोत्वं न भविष्यति। अलघीयश्चैव हीकारोच्चारणमुकारोच्चारणादिकारं चोच्चारयत्युकारं च नोच्चारयति तस्यैतत्प्रयोजनमुत्वं मा भूदिति ॥

## [ आमेतः ॥३।४।९०॥

## सवाभ्यां वामौ ॥ ३।४।९१ ॥

## आडुत्तमस्य पिच्च ॥ ३।४।९२ ॥ ]

## एत ऐ ॥ ३। ४। ९३ ॥

## एत एत्व आड्गुणप्रतिषेधः ॥ १ ॥

एत ऐत्व आड्गुणस्य प्रतिषेधो वक्तव्यः। पचावेदम् पचामेदम्। आड्गुणे कृत एत ऐदित्यैत्वं प्राप्नोति ॥

## न वा बहिरङ्गलक्षणत्वात ॥ २ ॥

न वा वक्तव्यः। किं कारणम्। बहिरङ्गलक्षणत्वात्। बहिरङ्गलक्षण आड्गुणोऽन्तरङ्गलक्षणमैत्वम्। असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

---

(सू.८९वा.१)हि आणि नि या आदेशांतील इकाराला उत्व होत नाहीं असा प्रतिषेध करावा. उदा०—लुनीहि, लुनानि. येथें एरुः या पूर्व सूत्रानें उत्व प्राप्त होत आहे.

(वा.२)अथवा तसा प्रतिषेध करावयास नको. काय कारण ?

कारण असें कीं – हु आणि नु असे उकारान्त आदेश न सागतां हि आणि नि असे इकारान्त आदेश जे येथें सांगितले आहेत त्यांच्या सामर्थ्यास्तव येथें उत्व होत नाहीं. कारण उकाराचें उच्चारण करण्यापेक्षां इकारा उच्चारण करण्यांत काहीं लाघव होतें असें नाहीं. इकार उच्चारला काय आणि उकार उच्चारला काय सारखेंच. असें असतांही जो येथें इकारच उच्चारल आहे त्याचा उपयोग असा कीं—येथें इकार कायम राहिला पाहिजे; त्याला उत्व होऊं नये.

(सू ९३वा.१) हा जो एकाराला ऐकार आदेश सांगितला आहे तो आद् गुणः (६।१।८७) या गुणानें झालेल्या एकाराला होत नाहीं असा प्रतिषेध सांगावा.उदा. पचावेदम्. पचाव आणि इदम् यादोन पदांचा संधि होऊन पचावेदम् झालें आहे. येथें गुणानें झालेल्या एकाराला ऐकार आदेश प्राप्त होत आहे.

(वा.२)अथवा हा निषेध सागावयास नको. काय कारण ?

कारण असें कीं आद् गुणः हा गुण बहिरंग आहे. आणि प्रकृत सूत्रानें सांगितलेला एकार आदेश हा अंतरंग आहे. आणि अंतरंग शास्त्र कर्तव्य असतांना बहिरंग शास्त्र असिद्ध समजावें अशी परिभाषा आहे.

---

१.(सू.९०)लोटाचे स्थानीं झालेल्या आदेशांतील एकाराला आम् आदेश होतो. उदा. यजताम्.

१.(सू.९१) लोटाचे स्थानीं झालेल्या आदेशांतील एकार जर सकाराच्या पुढे असेल तर त्याला व असा आदेश होतो आणि वकाराच्या पुढे असेल तर त्याला अम् आदेश होतो उदा.पचस्व पचध्वम्.

१. (सू.९२) लोटाचे स्थानीं आदेश झालेला जो उत्तमपुरुष प्रत्यय त्याला आट् आगम होतो आणि तो प्रत्यय पित् समजावा. उदा. करवाणि करवाव करवाम, करवै करववाहै करवामहै.

१. (सू.९३) लोटाचे स्थानीं आदेश झालेल्या उत्तमपुरुष-प्रत्ययांपैकीं जो एकार त्याला ऐकार होतो उदा. करवै, करवावहै करवामहै.

२. कारण, पचाव आणि इदम् या दोन पदांची येथें त्या गुणाला जरूर आहे.

[ लेटोऽडाटौ ॥३।४।९४॥
आत ऐ ॥३।४।९५॥
वैतोऽन्यत्र ॥ ३।४।९६ ॥
इतश्च लोपः परस्मैपदेषु ॥ ३।४।९७ ॥
स उत्तमस्य ॥ ३।४।९८ ॥
नित्यं ङितः ॥ ३।४।९९ ॥
इतश्च ॥ ३।४।१०० ॥
तस्थस्थमिपां तान्तन्तामः ॥ ३।४।१०१ ॥ ]
लिङः सीयुट् ॥ ३ । ४ । १०२ ॥

**यासुडादेः सीयुट्प्रतिषेधः ॥ १ ॥**

यासुडादेः सीयुटः प्रतिषेधो वक्तव्यः। चिनुयुः सुनुयुः। लिङः सीयुडिति सीयुट् प्राप्नोति ॥

**न वा वाक्यापकर्षात् ॥ २ ॥**

न वा वक्तव्यम्। किं कारणम्। वाक्यापकर्षात्। वाक्यापकर्षाद्यासुट् सीयुटं बाधिष्यते ॥

**सुट्तिथोस्त्वपकर्षविज्ञानम् ॥ ३ ॥**

सुटोऽपीदानीं तिथोरपकर्षो विज्ञायेत कृषीष्ट कृषीष्ठाः ॥

---

(सू. १०२ वा. १) यासुट् हा आद्यावयव आगम ज्या ठिकाणीं होत असेल तेथें सीयुट् आगम होत नाहीं असा प्रतिषेध सांगावा. उदा० चिनुयुः सुनुयुः. येथें लिङः सीयुट् या प्रकृत सूत्रानें सीयुट् आगम प्राप्त होत आहे.

(वा. २) अथवा तसा प्रतिषेध सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं लिङः सीयुट् या वाक्याचा यासुट् आगमाच्या उदाहरणांतून अपकर्ष झाला आहे. म्हणजे यासुट् आगमानें सीयुट् आगमाचा बाध होत आहे.

( वा. ३ ) तर मग आतां सुट् आगमाचा ( ३।४।१०७ ) विषय जो तकारादि आणि थकारादि प्रत्यय त्यापासूनही या प्रकृत वाक्याचा अपकर्ष होऊं लागेल उदा. कृषीष्ट, कृषीष्ठाः

---

१ (सू ९४) लेटाचे स्थानीं झालेल्या आदेशाला अट् किंवा आट असे आगम होतात. उदा. पताति, तारिषत्.

१ (सू. ९५) लेटाचे स्थानीं झालेल्या आदेशांतील आकाराला ऐकार होतो. उदा. मन्त्रयैते येथें आताम् प्रत्ययांतील पहिल्या आकाराला ऐकार झाला आहे.

१ (सू. ९६) पूर्व सूत्राचें उदाहरण सोडून इतर ठिकाणीं लेटाचें स्थानीं झालेल्या आदेशांतील एकाराला ऐकार विकल्पानें होतो. उदा. ईशै, गृह्यान्तै.

१ (सू. ९७) लेटाचें स्थानीं झालेल्या परस्मैपद आदेशांतील ऱ्हस्व इकाराचा विकल्पानें लोप होतो. उदा. तारिषत्, पताति.

१ (सू. ९८) लेटाचे स्थानीं आदेश झालेल्या उत्तमपुरुष-प्रत्ययांतील सकाराचा लोप विकल्पानें होतो. उदा. करवाव, करवावः

१ (सू. ९९) ङित् लकाराचें स्थानीं आदेश झालेल्या उत्तम-पुरुष प्रत्ययांतील शेवटच्या सकाराचा लोप नित्य होतो. उदा. अभवाव, अभवाम. लोटामध्येंही हा लोप अतिदेशामुळें ( ३।४।८५ ) होतो. उदा० भवाव भवाम.

१ (सू. १००) ङित् लकाराचें स्थानीं आदेश झालेल्या परस्मैपद प्रत्ययांतील शेवटच्या ऱ्हस्व इकाराचा लोप होतो. उदा० अभवत्.

१ (सू. १०१) ङित् लकाराचे स्थानीं आदेश झालेल्या तस्, थस्, थ आणि मिप् या चार प्रत्ययांना क्रमानें ताम् तम्, त आणि अम् हे आदेश होतात. उदा० अभवताम्, अभवतम्, अभवत, अभवम्. लोटामध्येंही हे आदेश अतिदेशामुळें होतात. उदा० भवताम् भवतम् भवत.

१ (सू. १०२) लिङाचे स्थानीं आदेश झालेल्या आत्मनेपद प्रत्ययांना सीयुट असा आगम होतो. उदा० पचेत ( विधिलिङ ) पक्षीष्ट ( आशीर्लिङ् ).

## अनादेश सुड्वचनम् ॥ ४ ॥

अनादेशे सुड्वक्तव्यः । कृषीयास्ताम् कृषीयास्थाम् । तकारथकारादेर्लिङ इति सुण्न प्राप्नोति ॥

## न वा तिथोः प्रधानभावात्तद्विशेषणं लिङ्ग्रहणम् ॥ ५ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । तिथोः प्रधानभावात् । तिथावेवात्र प्रधानं तद्विशेषणं लिङ्ग्रहणम् । नैवं विज्ञायते तकारथकारादेर्लिङ इति । कथं तर्हि । तकारथकारयोः सुड्भवति तौ चेल्लिङ इति ॥

## यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च ॥ ३।४।१०३ ॥

किमर्थं यासुटो ङित्त्वमुच्यते ।

## यासुटो ङिद्वचनं पिदर्थम् ॥ १ ॥

पिति वचनानि प्रयोजयन्ति ॥ अथ किमर्थमुदात्तवचनं क्रियते ।

## उदात्तवचनं च ॥ २ ॥

किम् । पिदर्थमेव ॥

## आगमानुदात्तार्थं वा ॥ ३ ॥

अथवैतज्ज्ञापयत्याचार्य आगमा अनुदात्ता भवन्तीति ॥ असत्यन्यस्मिन् प्रयोज-

---

(वा. ४) शिवाय तकार अथवा थकार हा प्रत्ययाच्या आरंभीं नसेल अशा ठिकाणीं त्याला सुट् आगम होतो असें म्हणावें. उदा० कृषीयास्ताम् कृषीयास्थाम्. कारण लिङाचे स्थानीं आदेश झालेला जो तकारादि आणि थकारादि प्रत्यय त्याला सांगितलेला सुट् आगम येथें प्राप्त होत नाहीं.

(वा. ५) अथवा हें सुड्वचन करावयास नको.

काय कारण?

कारण असें कीं तकार आणि थकार यांना येथें मुख्यत्व आहे. तिथोः हें येथें विशेष्य आहे आणि लिङः हें त्याचें विशेषण आहे. तेव्हां तकारादि आणि थकारादि लिङ् असा अर्थ येथें नाहीं; तर 'तकार आणि थकार यांना सुट् होतो, ते तकार व थकार लिङासंबंधीं असतील तर' असा येथें अर्थ आहे.[2]

(सू. १०३) यासुट् आगम ङित् समजावा असें येथे कशाकरितां म्हटलें आहे?

(वा. १) पकार इत्संज्ञक ज्यांचा आहे अशा प्रत्ययांकरितां हें ङित्त्व सांगितलें आहे.[2]

आतां येथें उदात्त होतो असें कशाकरितां म्हटलें आहे?

(वा. २) उदात्त-वचन देखील तसेंच.

तसेंच म्हणजे काय?

तसेंच म्हणजे पकार इत्संज्ञक ज्यांचा आहे अशा प्रत्ययांकरितांच.[3]

(वा. ३) अथवा 'आगम अनुदात्त होत असतात' ह्या गोष्टीला आपली संमति

---

२ सुट् तिथोः याचा असा अर्थ केला म्हणजे कृषीयास्ताम् व कृषीयास्थाम् येथें प्रत्ययाच्यामध्यें असलेल्याही तकाराला व थकाराला सुट् आगम सिद्ध होतो. तसेंच सुट् आगमाच्या उदाहरणांतून सीयुट् आगमाची पिछेहाटही होत नाही. कारण सीयुट् आगमाचा विषय लिङ् आणि सुट् आगमाचा विषय तकार अथवा थकार असा विषयभेद असल्यामुळें सुट् आगमानें सीयुट् आगमाचा बाध होत नाहीं.

१ (सू१०३) लिङाचे स्थानीं आदेश झालेल्या परस्मैपद प्रत्ययांना यासुट् आगम होतो आणि तो उदात्त होतो आणि तो प्रत्यय ङित् समजावा.

२ तिप्, सिप् व मिप या तीन पित् प्रत्ययांशिवाय इतर ठिकाणीं ङित्व (१।२।४) सिद्धच आहे. ङित् समजल्यामुळें चिनुयात् येथें गुणाचा (७।३।८४) निषेध (१।१।५) होतो.

३ पित् प्रत्यय अनुदात्त होतो (३।३।४). म्हणून तेथें उदात्त होण्याकरितां हे वचन पाहिजे.

ने ज्ञापकं भवति । उक्तं चैतद्यासुटो ङिद्वचनं पिदर्थमुदात्तवचनं चेति । शक्यमनेन वक्तुं यासुट् परस्मैपदेषु भवत्यपिच्च लिङ्भवतीति सोऽयमेवं लघीयसा न्यासेन सिद्धे सति यद्गरीयांसं यत्नमारभते तज्ज्ञापयत्याचार्य आगमा अनुदात्ता भवन्तीति॥

[ किदाशिषि ॥ ३।४।१०४ ॥

झस्य रन् ॥ ३।४।१०५ ॥

इटोत् ॥ ३।४।१०६ ॥

सुट् तिथोः ॥ ३।४।१०७ ॥

झेर्जुस् ॥ ३।४।१०८ ॥

सिजभ्यस्तविदिभ्यश्च ॥ ३।४।१०९ ॥]

आतः ॥ ३ । ४ । ११० ॥

किमिदं जुस्याकारग्रहणं नियमार्थमाहोस्वित्प्रापकम् । कथं च नियमार्थं स्यात्कथं वा प्रापकम् । यदि सिज्ग्रहणमनुवर्तते ततो नियमार्थम् । अथ निवृत्तं ततः प्रापकम् ॥ कश्चात्र विशेषः ।

---

आहे असें येथें यासुट् आगमाला उदात्त सांगण्यावरून आचार्य ज्ञापन करीत आहेत.

पण ह्या उदात्त वचनाचा दुसरा कांहीं उपयोग होत नसेल तर तसें ज्ञापक मानतां येईल. आणि येथें तर आतांच 'यासुटो ङिद्वचनं पिदर्थम्, उदात्तवचनं च' असा त्या उदात्त सांगण्याचा उपयोग दाखविला आहे.

लिङाच्या स्थानीं आदेश झालेल्या परस्मैपद प्रत्ययांना यासुट् आगम होतो, आणि लिङ् अपित् होतो असें सांगण्यानेंच तें काम भागेल. अशा रीतीनें लघुभूत न्यासानें सिद्ध होत असतांना जो येथें आचार्यांनीं 'उदात्तो ङिच्च' असा गुरुभूत न्यास केला आहे त्यावरून 'आगम अनुदात्त होतात' ही गोष्ट यांच्या मनांत सुचवावयाची आहे असें दिसतें.

(सू.११०) आकारान्त धातूसंबंधानें हें जें येथें सूत्र केलें आहे तें नियमार्थ समजावें किंवा विध्यर्थ समजावें ?

कशा रीतीनें तें नियमार्थ समजतां येईल आणि विध्यर्थ तरी कशा रीतीनें समजतां येईल ?

जर येथें पूर्व सूत्रांतून सिच् याची अनुवृत्ति आणली तर नियमार्थ होईल आणि अनुवृत्ति आणिली नाहीं तर विध्यर्थ होईल.

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

---

४ उदात्तः आणि ङित् या दोन शब्दांऐवजीं अपित् असा शब्द घालणें हा लघुभूत न्यास होय.

१(सू.१०४) आशीर्लिङामध्यें यासुट् आगम केला असतां तो प्रत्यय कित् समजावा; ङित् समजूं नये. उदा० इज्यात्, इज्यास्ताम्. येथें संप्रसारण (६।१।१५) झालें आहे. येथें ङित् न समजल्यामुळें गुण (७।३।८५) झाला आहे.

१(सू.१०५) लिङाचे स्थानीं आदेश झालेला जो झ प्रत्यय त्याला रन् असा आदेश होतो. उदा० एधेरन्, एधिषीरन्.

१ (सू.१०६) लिङाचे स्थानीं आदेश झालेला जो इट् प्रत्यय त्याला अ असा आदेश होतो. उदा० एधिषीय.

१(सू.१०७) लिङाचे स्थानीं आदेश झालेल्या प्रत्ययांतील जे तकार आणि थकार त्यांना सुट् आगम होतो. उदा० भूयास्ताम्, भूयास्थम्, कृषीयास्ताम्, कृषीयास्थाम्.

१ (सू.१०८) लिङाचे स्थानीं आदेश झालेला जो झि प्रत्यय त्याला जुस् आदेश होतो. उदा० भवेयुः, भूयासुः.

१ (सू.१०९) सिच् प्रत्यय, अभ्यस्तसंज्ञक धातु (६।१।५-६) आणि विद् धातु यांच्या पुढील जो ङित् लकाराचे स्थानीं झालेला झि प्रत्यय त्याला जुस् आदेश होतो. उदा० अकार्षुः अजक्षुः, अविदुः.

१(सू.११०) सिच् प्रत्ययाचा लुक् झाला असतां तेथें प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) सिच् आहे असें समजून जर पूर्वसूत्रानें झि प्रत्ययाला जुस् आदेश होईल तर फक्त आकारान्त धातू असेल तरच होईल. उदा० अदुः. या नियमामुळें अभूवन् येथें पूर्वसूत्रानें जुस् होत नाहीं.

## जुस्याकारग्रहणं नियमार्थमिति चेत्सिज्लुग्ग्रहणम् ॥ १ ॥

जुस्याकारग्रहणं नियमार्थमिति चेत्सिज्लुग्ग्रहणं कर्तव्यम् । आतः सिज्लुगन्तादिति वक्तव्यम् । इह मा भूत् । अकार्षुः अहार्षुः ॥ अस्तु तर्हि प्रापकम् ।

## प्रापकमिति चेत्प्रत्ययलक्षणप्रतिषेधः ॥ २ ॥

प्रापकमिति चेत्प्रत्ययलक्षणस्य प्रतिषेधो वक्तव्यः । अभूवन्निति प्रत्ययलक्षणेन जुस्भावः प्राप्नोति ॥

## एवकारकरणं च ॥ ३ ॥

एवकारकरणं च कर्तव्यम् । लङः शाकटायनस्यैव [ ३. ४. १११ ] इति ॥ नियमार्थे पुनः सति नार्थ एवकारेण । ननु च प्रापकेऽपि सति सिद्धे विधिरारभ्यमाणो ऽन्तरेणैवकारं नियमार्थो भविष्यति । इष्टतो ऽवधारणार्थस्तर्ह्येवकारः कर्तव्यः । यथैवं विज्ञायेत लङः शाकटायनस्यैवेति । मैवं विज्ञायि लङ एव शाकटायनस्येति । किं च स्यात् । लुङः शाकटायनस्य न स्यात् । अदुः अपुः अधुः अस्थुः ॥

---

(वा.१)जुस् आदेशासंबंधानें केलेलें 'आतः' हें सूत्र जर नियमार्थ असेल तर येथें 'सिज्लुक्' हा शब्द घातला पाहिजे; म्हणजे 'आतः सिज्लुगन्तात्' असें म्हटलें पाहिजे. कारण अकार्षुः अहार्षुः येथें हा नियम लागू होतां कामा नये.

तर मग हें सूत्र विध्यर्थच असूं दे.

(वा.२)हें सूत्र विध्यर्थ असेल तर प्रत्ययलक्षणाचा प्रतिषेध सांगितला पाहिजे. नाहीं तर अभूवन् येथें प्रत्ययलक्षणानें सिच् आहे असें समजून पूर्व सूत्रानें जुस् आदेश होऊं लागेल.

(वा.३)तसेंच हें सूत्र विध्यर्थ मानलें असतां 'लङः शाकटायनस्यैव' या पुढील सूत्रामध्यें एव शब्द घातला पाहिजे. आणि हें सूत्र नियमार्थ मानलें म्हणजे मात्र पुढील सूत्रामध्यें एव शब्द घालावयास नको.

पण हें ( प्रकृत ) सूत्र विध्यर्थ मानलें तरी देखील उत्तर सूत्रामध्यें एव शब्द नकोच. कारण, जुस् आदेश सिद्ध होत असतांनाही हा प्रकृत सूत्रानें पुनः जुस् सांगितला आहे. म्हणून तो व्यर्थ होऊन आपोआपच नियमार्थ समजला जाईल; त्याकरितां एव शब्द घालण्याची कांहीं जरूर नाहीं.

तरी देखील इष्ट नियम होण्याकरितां एव शब्द ठेवावाच लागेल. तो असा कीं—आकारान्त धातूच्या पुढील लङसंबंधीं झि प्रत्ययाला जर जुस् आदेश होईल तर तो शाकटायनाच्या मतानेंच होईल असाच नियम झाला पाहिजे. आणि आकारान्त धातूच्या पुढील झि प्रत्ययाला शाकटायनाच्या मतानें जर जुस् आदेश होईल तर लङामध्येंच होईल असा नियम न झाला पाहिजे.

पण तसा विपरीत नियम झाला तर काय होईल?

अदुः अयुः अधुः आणि अस्थुः येथें लुङामध्यें शाकटायनाच्या मतीं जुस् आदेश होणार नाहीं.

---

२ सिज्लुक्-ग्रहण केलें नाहीं तर सिच् प्रत्ययामुळें जुस् आदेश होईल तर आकारान्त धातु असेल तरच होईल असा मोघम नियम होईल, आणि अकार्षुः येथें जुस् आदेश हाणार नाहीं.

३ हें सूत्र विध्यर्थ मानलें म्हणजे ह्या सूत्रानें सिद्धि होत असल्यामुळें उत्तरसूत्र व्यर्थ होऊन नियमार्थ होईल-तेव्हां तेथें नियम दाखविणारा एव शब्द असणें जरूर आहे.

४ कारण, पुढील सूत्र विध्यर्थच होणार आहे.

लङ्ग्रहणं च ॥ ४ ॥

लङ्ग्रहणं च कर्तव्यम् । लङः शाकटायनस्यैवेति ॥ नियमार्थे पुनः सति नार्थो लङ्ग्रहणेन । आतो ङित इति वर्तते न चान्य आकारादनन्तरो ङिदस्त्यन्यदतो लङः ॥

अस्तु तर्हि नियमार्थम् । ननु चोक्तं जुस्याकारग्रहणं नियमार्थमिति चेत्सिज्लुग्ग्रहणमिति । नैष दोषः । तुल्यजातीयस्य नियमः । कश्च तुल्यजातीयः । यो द्वाभ्यामनन्तर आतश्च सिचश्च ॥ अथ तदेवकारकरणं नैव कर्तव्यम् । कर्तव्यं च । किं प्रयोजनम् । उत्तरार्थम् । लिट् च लिङाशिषि [ ३.४.११५;११६ ] आर्धधातुकमेव यथा स्यात् । इतरथा हि वचनादार्धधातुकसंज्ञा स्यात्तिङ्ग्रहणेन च ग्रहणात्सार्वधातुकसंज्ञा ॥ अथ तल्लङ्ग्रहणं नैव कर्तव्यम् । कर्तव्यं च । किं प्रयोजनम् ।

---

(वा.४) तसेंच प्रकृत सूत्र विध्यर्थ मानलें असतां उत्तर सूत्रामध्यें लङ् शब्द ठेवावा लागेल. शाकटायनाच्या मतींच लङामध्यें जुस् होतो असा इष्ट नियम लङ्ग्रहणाशिवाय होणार नाहीं. आणि हें प्रकृत सूत्र नियमार्थ मानलें म्हणजे मात्र तेथें लङ्ग्रहण ठेवण्याचा कांहींच उपयोग नाहीं. आतः याप्रमाणें ङितः हेंही पद अनुवृत्त आणावें म्हणजे तेवढ्यानें काम होईल. कारण, लङाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि ङित् लकारामध्यें आकारान्त धातूच्या पुढें अव्यवहित झि प्रत्यय संभवतच नाहीं.

तर मग एकंदरींत प्रकृत सूत्र हें नियमार्थच असूं दे.

पण नियमार्थ मानलें तर सिज्लुक् या शब्दाचें ग्रहण केलें पाहिजे अस म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण, नियम हा नेहमीं तुल्यजातीय म्ह० आपल्यासारखाच जो असेल त्याच्याच संबंधानें होत असतो.

तसा तुल्यजातीय येथें कोण बरें आहे ?

अदुः येथें जसा झि प्रत्यय आहे म्हणजे आकारान्त धातु आणि सिच् प्रत्यय या दोघांच्या जवळ आहे तसा.

पण आतां प्रकृत सूत्र नियमार्थ ठरलें तर उत्तर सूत्र विध्यर्थच होणार. मग तेथें एव शब्द घालूं नयेच कीं काय ?

घालावा.

तर मग त्याचा उपयोग काय ?

पुढें त्याची अनुवृत्ति होणें हा उपयोग आहे. लिट् च ( ३।४।११५ ) लिङाशिषि ( ३।४।११६ ) या सूत्रांमध्यें एव शब्दाची अनुवृत्ति येऊन आर्धधातुक हीच संज्ञा होते असा अर्थ झाला पाहिजे. नाहीं तर त्या सूत्रांनीं आर्धधातुक संज्ञा होईल आणि ते प्रत्यय तिङ् असल्यामुळें त्यांना सार्वधातुक संज्ञा-( ३।४।११३ ) ही होऊं लागेल.

आतां उत्तर सूत्र विध्यर्थ झालें तर तेथें लङ्ग्रहण करूं नयेच कीं काय?

करावयास पाहिजे.

तर मग त्याचा काय उपयोग?

---

५ म्हणजे धातु आणि प्रत्यय या दोघांच्या जवळ असलेला झि प्रत्यय तो तुल्यजातीय होय. अभूवन् येथें धातूच्या जवळ झि प्रत्यय आहेच, आणि प्रत्ययलक्षणानें सिच् प्रत्ययाच्या जवळ आहे, तेव्हां अशा ठिकाणीं धातु जर आकारान्त नसेल तर नियमानें त्याची व्यावृत्ति होईल. अकार्षुः येथें मध्यें सिच् प्रत्यय असल्यामुळें धातूच्या जवळ झि प्रत्यय नाहीं म्हणून त्याची व्यावृत्ति होत नाही.

६ कारण अयुः येथें लङामध्यें जुस् आदेश होण्याकारितां तें पाहिजेच.

७ कारण ङितः या पदाच्या अनुवृत्तीनेंच काम भागेल.

लङेव यो लङ् तत्र यथा स्यात्‌ लङ्भावेन यो लङ् तत्र मा भूदिति ॥

[ लङः शाकटायनस्यैव ॥ ३।४।१११ ॥

द्विषश्च ॥ ३।४।११२ ॥

तिङ्शित् सार्वधातुकम् ॥३।४।११३ ॥ ]

आर्धधातुकं शेषः ॥ ३।४।११४ ॥

आर्धधातुकसंज्ञायां धातुग्रहणम् ॥ १ ॥

आर्धधातुकसंज्ञायां धातुग्रहणं कर्तव्यम्। धातोः परस्यार्धधातुकसंज्ञा यथा स्यात्। इह मा भूत्। वृक्षत्वम् वृक्षतेति ॥ क्रियमाणे चापि धातुग्रहणे

स्वादिप्रतिषेधः ॥२॥

स्वादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । इह मा भूत्। लूभ्याम् लूभिरिति ॥ अनुक्रान्तापेक्षं शेषग्रहणम् ॥ एवमपि अग्निकाम्यति वायुकाम्यतीति प्राप्नोति । तस्माद्धातुग्रहणं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम् । आ तृतीयाध्यायपरिसमाप्तेर्धात्वधिकारः प्रकृतोऽनुवर्तते ।

---

उपयोग असा कीं –'लङच जो लङ् म्ह० मूळचा खराच जो लङ तेथेंच जुस् आदेश झाला पाहिजे. आणि लङासारखा समजावा (३।४।१८५) या अतिदेशानें ज्याला लङ्पणा मिळाला आहे तेथें होऊं नये.

(सू.११४वा.१) आर्धधातुक संज्ञा सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें धातुग्रहण करावें. कारण धातूच्या पुढील प्रत्ययाला आर्धधातुक संज्ञा झाली पाहिजे. वृक्षत्वम् वृक्षता येथें वृक्ष शब्दाच्या पुढील त्व आणि तल् या प्रत्ययांना (५।११।११९) आर्धधातुक संज्ञा न झाली पाहिजे.

येथें धातुग्रहण केलें तरी—

(वा.२)सु वगैरे प्रत्ययांना (४।१।२) आर्धधातुक संज्ञा होत नाहीं असा निषेध सांगितला पाहिजे. कारण लूभ्याम् लूभि : येथें भ्याम् व भिस् या प्रत्ययांना आर्धधातुक संज्ञा न झाली पाहिजे.

पण शेष शब्दानें तिङ् व शित् यांपेक्षां निराळा जो प्रत्यय घ्यावयाचा तो पूर्वी सांगितलेल्या प्रत्ययांपैकींच असला पाहिजे. तेव्हां पुढें सांगितलेल्या सु वगैरे प्रत्ययांना ही अर्धधातुक संज्ञा होणार नाहीं.

तरी पण अग्निकाम्यति वायुकाम्यति येथें काम्यच् (३।१।९) प्रत्ययाला ही संज्ञा होऊं लागेल. तेव्हां येथें धातुग्रहण केलें पाहिजे.

तें करावयास नको. कारण हा तिसरा अध्याय समाप्त होतोंपर्यंत धातोः असा अधिकार चालू आहे. तो येथें अनुवृत्त होत आहेच.

---

८ मागें ( ३।४।८५। वा. १ ) पहा.

१ ( सू.१११ ) आकारान्त धातूच्या पुढील लङाचे स्थानीं आदेश झालेला जो झि प्रत्यय त्याला जुस् आदेश शाकटायनाच्या मतीं होतो. उदा० अयुः. इतरांच्या मतीं अयान् असें होतें.

१.(सू. ११२) द्विष् धातूच्या पुढील लङाचे स्थानीं झालेल्या झि प्रत्ययाला शाकटायनाच्या मतीं जुस् होतो. उदा०अद्विषः. इतरांच्या मतें अद्विषन.

१(सू. ११३) तिङ्(३।४।७८) आणि शित् या प्रत्ययांना सार्वधातुक संज्ञा होते. उदा० सुनोति,भवति.

१(सू. ११४) तिङ् आणि शित् यांशिवाय धातोः या अधिकारांतील जो प्रत्यय त्याला आर्धधातुक संज्ञा होते. उदा० कर्ता.

२ लू धातूहून क्विप् प्रत्यय केला आहे. त्या प्रत्ययापैकी कांहींच शिल्लक राहत नाहीं, फक्त धातूच शिल्लक प्रत्यय राहतो. त्यालाच कृत् प्रत्ययान्त म्हणून प्रातिपदिक संज्ञा ( १।२।४६ ) होऊन पुढें भ्याम् वगैरे झाले आहेत.

३. अध्याय ३ मध्यें.

क प्रकृतः। धातोरेकाचो हलादेः [३.१.२२] इति ॥ एवमपि श्रीकाम्यति भूकाम्यतीति प्राप्नोति ।

**तद्विधानात्सिद्धम् ॥३॥**

विहितविशेषणं धातुग्रहणम्। धातोर्यो विहित इति। धातोरेष विहितः। संकीर्त्य धातोरित्येवं यो विहित इति ॥

**[ लिट् च ॥ ३।४।११५॥**

**लिङाशिषि ॥ ३।४।११६ ॥**

**छन्दस्युभयथा ॥ ३।४।११७॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये तृतीयस्याध्यायस्य चतुर्थे पादे प्रथममाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

॥ तृतीयोऽध्यायः समाप्तः ॥

---

धातोः हा अधिकार कोणत्या सूत्रापासून चालू झाला आहे?

धातोरेकाचो हलादेः (३।१।२२) या सूत्रापासून धातोः हा अधिकार चालू आहे.

तरी पण श्रीकाम्यति भूकाम्यति येथें काम्य प्रत्ययाला आर्धधातुक संज्ञा होऊं लागेल हा दोष येतोच.

(वा.३)धातोः हें विहितविशेषण आहे.धातूहून केलेला जो प्रत्यय असा तेथें अर्थ समजावा.

तरी पण श्रीकाम्यति येथें काम्य प्रत्यय हा वस्तुतः धातूहून केला आहेच.

धातोः असा शब्द उच्चारून सांगितलेला जो प्रत्यय त्यालाच आर्धधातुक संज्ञा होते.

या प्रमाणें भगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील तिसऱ्या अध्यायाच्या चौथ्या पदांतील पहिलें आह्निक समाप्त झालें व पादही समाप्त झाला. त्या प्रमाणेंच तिसरा अध्यायही समाप्त झाला.

---

४. येथे 'श्रि' व 'भू' या धातूंहून क्विप् प्रत्यय झाला आहे. (मागील टीप २ पहा)

१(सू. ११५) लिटाचे स्थानीं आदेश झालेले जे तिङ् प्रत्यय त्यांना आर्धधातुक संज्ञाच होते. सार्वधातुक संज्ञा होत नाहीं. उदा० बभूविथ. आर्धधातुक संज्ञेमुळें इट् आगम (७।२।३५) झाला आहे. सार्वधातुक संज्ञा नसल्यामुळे शप् (३।१।६८) झाला नाहीं.

१(सू.११६) आशीर्लिङाचे स्थानीं आदेश झालेले जे तिङ् प्रत्यय त्यांना आर्धधातुक संज्ञाच होते; सार्वधातुक संज्ञा होत नाहीं. उदा० 'लविषीष्ट' येथें इट् आगम झाला आहे. सार्वधातुक संज्ञा नसल्यामुळें सकाराचा लोप (७।२।७९) व मध्यें विकरण प्रत्यय होत नाहीत.

१(सू.११७) वेदामध्यें दोन्ही संज्ञा एकदम एकाला कारणापुरत्या होतात. उदा० उपस्थेयाम. येथें सार्वधातुकसंज्ञेमुळें सकाराचा लोप (७।२।७८) आणि आर्धधातुकसंज्ञेमुळें स्था धातूला एत्व (६।४।६७) झालें आहे.

**अध्याय ३ समाप्त**